# श्रीनामदेवाची आणि त्यांचे कुटुंबांतील
# व समकालिन साधूंच्या
# अभंगांची गाथा.




दिंडी.

पढा भक्तीचें रूप कळायाला ॥
नामदेवाच्या नित्य अभंगाला ॥
ज्ञान आधीं मग भक्ति असें पाहीं ॥
प्राप्त होतां ती मोक्ष अन्य नाहीं ॥ १ ॥



तुकाराम तात्या यांनीं
तत्वविवेचक ग्रंथप्रसारक मंडळीसाठीं

मुंबईंत "तत्वविवेचक" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केली.

इसवी सन १८९४.



किंमत ४ रुपये.






व्यवस्था पाहून देव नामदेवास बोलला. तूं व तुझी बायको राजाई, तुझा बाप व तुझी आई गोणाई, तुझे चौघे मुलगे व त्यांच्या चौघी बायका आणि तुझी बहीण व मुलगी मिळून एकंदर मनुष्यें चौदा. याशिवाय थोडीबहुत तुझी कुणबीण जनी. या सर्वांनीं शतकोटिकाव्य तडीस लावावें. सर्वत्रांस स्फूर्ति देणें व अभंग लिहिणें तें मजकडे लागलें. याप्रमाणें आज्ञा होतांच सर्वांनीं काव्यरचनेस आरंभ केला.

नामदेव व त्याच्या घरचीं इतर मनुष्यें यांनीं जी कविता केली तिचें नांव अभंग असें पडलें. याच्या पूर्वीं अभंग हें पद्य मुळींच कोणास ठाऊक नव्हतें. ह्मणून अभंगपद्याचा मूळ आचार्य नामदेवच ह्मटला पाहिजे. आतां अभंग हें पद्य पाहूं गेलें तर तें साडेतीन चरणी कित्येक ओंव्यांचा एकत्र समुदाय ह्मणण्यास चिंता नाहीं. म्हणण्याची चाल मात्र निराळी. मग त्यांतूनच दुसऱ्या तऱ्हा निघाल्या. याविषयींचें उदाहरण ह्या खालच्या दोन ओंव्या पहा.—

कृष्णा राहेंरे ऊगला ॥ नाहितर सांगेन त्या बागुला ॥ घुसळणाशीं उशिर झाला ॥ रवी सोड गोविंदा ॥ १ ॥ पहिला बागुल बोलती ऐसा ॥ नाम जयास म्हणती मासा ॥ शंख वधोनी सहसा ॥ चारी वेद आणिले ॥ २ ॥ इ० ओंव्या अक्का.

पुढें नामदेवानें या साडेतीन चरणांचीं दोन अर्धें करून व म्हणण्याची चाल बदलून ज्या कित्येक ओंव्या एकत्र केल्या व शेवटीं नांव घातलें त्याचें नांव अभंग झालें. तेंच खालीं पहा.—

कृष्णा राहेंरे ऊगला नाहितर सांगेन त्या बागुला ॥ घुसळणाशीं उशीर झाला रवी सोड गोविंदा ॥ १ ॥ पहिला बागुल बोलती ऐसा नामजयास म्हणती मासा ॥ शंख वधोनी सहसा चारी वेद आणिले ॥ २ ॥ इत्यादि.

वरील अभंगांतील एकेका कडव्यांत छत्तीसपर्यंत सुमारें अक्षरें असल्याकारणानें याहून अभंगाचें कडवें नामदेवानें संक्षिप्त केलें व त्यास आधार ज्ञानेश्वरींतील साडेतीन चरणी ओंवीचा घेतला. ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायांतील आरंभीची ओंवी, खालीं लिहिली आहे ती पहा.—

ओं नमोजी आद्या ॥ वेदप्रतिपाद्या ॥ जयस्वसंवेद्या ॥ आत्मरूपा ॥ १ ॥

याचीं दोन अर्धें केल्यास याप्रमाणें एक अभंगाचें कडवें होतें.—

ओं नमोजी आद्या वेदप्रतिपाद्या ॥ जयस्वसंवेद्या आत्मरूपा ॥ १ ॥

यास उदाहरण अन्यग्रंथांतील आहे. तें येणेंप्रमाणें.—अध्यात्मरामायण, अयोध्याकांड, अभंग १९ वा.—

राघव सद्गुणी बैसे राज्यासनीं ॥ कैकेयी ऐकोनी सुखावली ॥ १ ॥ बोले मग तीशीं कायगे जल्पसी ॥ अन्यथा अपैसी महानष्टे ॥ २ ॥ श्रीरघुनंदन माझा प्राण पूर्ण ॥ भय त्यापासून कदां नोहे ॥ ३ ॥ सुखस्थानीं कैसें भय सूचवीशी ॥ न बोले वाणीशीं पुन्हा ऐसें ॥ ४ ॥ सकळां पैं प्रीय मज रघुराय ॥ द्वैत ना तें भय मुळीं तेथें ॥ ५ ॥ हंसदास ह्मणे दासीलागीं तिनें ॥ गौरविलें धनें मग बहु ॥ ६ ॥

वर जी ज्ञानेश्वरींतील ओंवी लिहिली आहे तींत पुढें नामदेवानें असें केलें कीं, पहिल्या दोन चरणांत क्रमानेंच—आद्या आणि प्रतिपाद्या, अशा असलेल्या यमकांतून, आद्या या ठिकाणीं दुसरीं अक्षरें आलीं तरी चिंता नाहीं. प्रतिपाद्या एवढें मात्र कायम ठेविलें. आणि तिसऱ्या चरणांतील—स्वसंवेद्या—हें ओंवींतील मूळ यमक त्याचा तिसरा व चौथा चरण मिळवून अभंगांतील कडव्याचें दुसरें अर्ध करतांनां अनुप्रास केला आहे. याविषयीं खालीं लिहिलेला अभंग पहा.—

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा ॥ केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥ नाहीं नाहीं मज आणीक सोयरा ॥ न करीं अव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥ अनाथाचा नाथ होशी तूं दयाळ ॥ किती वेळोंवेळ प्रार्थूं आतां ॥ ३ ॥ नामा ह्मणे जीव होतो कासावीस ॥ केली तुझी आस आतां तरी ॥ ४ ॥

आम्हीं वरती सांगितलेली गोष्ट, या अभंगावरून वाचकांच्या स्पष्ट ध्यानांत येईल. ती अशी कीं, मनोरथ, आणि देवा, मज आणि सोयरा, नाथ आणि दयाळ, तसाच जीव आणि कासावीस, यांचें यमक साम्य नाहीं. मात्र पहिल्या अर्धांतील यमकाचा दुसऱ्या अर्धांतील अनुप्रासाशीं मेळ ठेवून नामदेवानें धडाका काम चालविलें आहे. ज्ञानेश्वरीची ओंवी जी वर लिहिली आहे तींत तीन चरणांचीं नेमकीं साहा साहा अक्षरें असून चौथ्या चरणाचीं चार मिळून एकंदर अक्षरें बेवीस आहेत. याचीं दोन अर्धें करतांना पहिल्या अर्धाचीं अक्षरें बारा, व दुसऱ्याचीं दाहा होऊन अभंगाचें कडवें सिद्ध होतें. या आमच्या म्हणण्यास वर लिहिलेल्या नामदेवाच्या अभंगाशीं मेळ आहे कीं नाहीं तो पहा. सारांश अभंगाचीं कडवीं ओंवींतून मूळ निघालीं हें सांगण्यास जो आम्हीं येथें आरंभ केला होता त्याची सिद्धता झाली.

यापुढें नामदेवानें प्रत्येक कडव्याच्या अर्धांत अक्षरें आठ आठ किंवा क्वचित् एकाद्यांत नऊ अथवा दाहा यावींत अशीं अभंगाची एक नवी तऱ्हा काढिली. तिचें उदाहरण हें खालीं लिहिलें आहे तें पाहा.—

हेंचि देवाशीं मागत ॥ चरण सेवा अखंडित ॥ १ ॥ वास द्यावा पंढरीचा ॥ सदा संग हरिदासांचा ॥ २ ॥ माना म्हणे कमळापति ॥ हेंचि द्यावें पुढती पुढती ॥ ३ ॥

देह जावो अथवा राहो ॥ पांडुरंगीं माझा भावो ॥ १ ॥ चरण न सोडीं सर्वथा ॥ आण तुझी पंढरिनाथा ॥ २ ॥ वदनीं तुझें मंगळनाम ॥ हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवराजा ॥ केला पण चालवी माझा ॥ ४ ॥

या चालींत दुसरी तऱ्हा आहे ती येणेंप्रमाणें:—

भावबळें विष्णुदास ॥ नाहीं नाश पावत ॥ १ ॥ योग भाग्यें घरा येती ॥ सर्व शक्ति चालत ॥ २ ॥ पित्याचें जें काय धन ॥ पुत्रा कोण वंचील ॥ ३ ॥ तुका म्हणे कडे बैसों ॥ तेणें असो निर्भय ॥ ४ ॥

यांतीलच तिसरी तऱ्हा अशी कीं, कधीं कधीं पहिल्या अर्धाचीं अक्षरें सहा असायाचीं. उदाहरण.—

नम्र झाला भूतां ॥ तेणें कोंडिलें अनंता ॥ १ ॥ हेंचि शूरत्वाचें अंग ॥ हरी आणिला श्रीरंग ॥ २ ॥ अवघा झाला पण ॥ लवण सकळां कारण ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाणी ॥ पातळपणें तळ हाणी ॥ ४ ॥

याप्रमाणें नामदेवानें काढिलेल्या अभंगांच्या प्रकारांचें प्रतीक घेऊन त्याच्या चौदा माणसांनीं व त्यानें मिळून एकंदर पंचाणव कोटि अभंग लिहिले; व बाकीचे पुढें तुकारामानें पुरे केले, अशी लोकांत प्रख्याति आहे.

नामदेवाच्या अभंगाचे प्रकार दोन आहेत. ह्मणजे त्याचे कित्येक अभंग गुरूपसत्तीपूर्वींचे आहेत, व कित्येक गुरूपसत्तीनंतरचे आहेत. उदाहरणें क्रमानेंच खालीं दिलीं आहेत तीं पहा.—

सर्व सुख आहे भीवरेचे तीरीं ॥ आमुची पंढरी कामधेनू ॥ १ ॥ प्रेमामृत दुभे सदां संतजनां ॥ वोसंडत पान्हा नित्य नवा ॥ २ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष चारी स्तन ॥ द्रोहोणार धन्य पुंडलिक ॥ ३ ॥ भक्तीचें मेळवण भावचेनि बळें ॥ देखोनियां बोले अधिकाधिक ॥ ४ ॥ जियेचें दुभतें नित्य नवें वाढे ॥ पंढरी पाहूडे पूर्व पुण्यें ॥ ५ ॥ भाग्यवंत नामा तें क्षीर लाधला ॥ प्रेमें वोसंडला गर्जे नामें ॥ ६ ॥

माझें मज कळे माझें मज कळे ॥ माझें मज कळे प्रेमसुख ॥ १ ॥ न करी तुझें ध्यान नलगे ब्रह्मज्ञान ॥ माझी आहे खूण वेगळीच ॥ २ ॥ न करी तुझी स्तुति न वाखाणीं कीर्ती ॥ धरिली ते युक्ति वेगळीच ॥ ३ ॥ न करी काया क्लेश इंद्रियां निरोधू ॥ मज आहे बोधू वेगळाची ॥ ४ ॥ नामा ह्मणे नाम गाईन निर्विकल्प ॥ येशी आपेंआप गिवसीन ॥ ५ ॥

येथें गुरूपसत्तीनंतरचे अभंग सांगण्यापूर्वी, आधीं याला गुरूस शरण जाण्यास निमित्त काय झालें तें सागणें आवश्यक आहे, यास्तव अगोदर तें सांगतों. मागें आह्मीं गोराकुंभाराचें चरित्र लिहितांना असें सांगितलें आहे कीं, गोराकुंभारानें याच्या डोईवर थापटणें मारिलें असतां सर्व संतांदेखत हा झालेला अपमान यास सहन झाला नाहीं. ह्मणून हा रागारागानें तेथून उठून गेला. त्यापुढील गोष्ट अशी कीं, हा तेथून निघाला तो नीट देवळांत आला. आणि मोठ्यानें गळा काढून देवासमोर रडत बसला. तेव्हां देव यास प्रत्यक्ष होऊन व याचा अभिप्राय जाणला असतांही बुध्या न जाणल्यासारखा दाखवून बोलला. नाम्या, अरे रडतोस कां? झालें काय? तेव्हां नामा बोलला, आजपर्यंत आपली सेवा केली, तिचें फळही मला मिळालें, तें कोणतें पुसाल तर सर्व संतमंडळीनें मला कच्चा ठरविलें, त्याअर्थीं आतां मी येतों. लोभ आहे तसा मात्र असूंद्यावा. इतकें बोलून पुनः मोठ्यानें रडूं लागला. देवास या गोष्टीचें आश्चर्य होऊन त्यानें पुसलें, अरे तू येतों ह्मणून निरोप मागितलास त्यास तूं जाणार कोठें? नामदेव ह्मणाला मी जीव देणार! देव बोलला शाबास नाम्या. वाः!! अरे तूं इतका मूर्ख आहेस असें मला ठाऊक न्हतें. अरे पहा, भाषण तर असलें करतोस. आणि कच्चा ह्मटलें त्याचा खेद मानून रडत बसतोस, तेव्हां तुला काय ह्मणावें? परंतु मी तुला खरेंच सांगतों. संत ह्मणाले तें खोटें नाहीं. तूं कच्चाच होय. यांत अगदीं संशय नाहीं. तुला वाटत असेल मी तुजबरोबर गोष्टी सांगतों तसाच जेवतों, पण हें खरें नाहीं; कारण, माझें

खरें स्वरूप तें याहून अगदीं निराळें आहे, व तें श्रीगुरूस शरण गेल्याशिवाय कळायाचेंही नाहीं. याप्रमाणें देवाचें निर्भीड भाषण ऐकून नामदेव वचकला, आणि शुद्धीवर येऊन ह्मणाला, महाराज, आपण ह्मणतां त्याअर्थी मी कच्चा असेन; परंतु आतां गुरु कोणता पाहूं? त्रैलोक्य गुरु जे आपण त्या आपणच मजवर कृपा करावी. देवानें सांगितलें तसें होणें अशक्य आहे. यास्तव तूं बार्शिस आणि तेथें विसोबा खेचर आहे, त्यास शरणहो ह्मणजे तुझें कार्य जा, सिद्ध होईल.

नंतर देवाची आज्ञा घेऊन नामदेव त्याच पावलीं घरीं न जातां निघाला तो बार्शीस आला. गांवांत गेल्यावर त्यानें कोणाएकास विसोबा खेचर कोठें राहतात ह्मणून पुसिलें. त्यानें त्या महादेवाच्या देवळांत जा ह्मणून सांगतांच हा तेथें गेला, व पाहूं लागला तों तो अगदीं ह्मातारा असून लोळत पडला आहे. शिवाय त्याचे पाय महादेवाच्या पिंडीवर पडले आहेत. हें पाहून नामदेवास शंका आली कीं, माझ्यासारख्यास हा असला गुरु. अस्तु. दैव आपुलें. देवानेंच पाठविलें, त्याअर्थीं आंत गेलें पाहिजे. नंतर आंत जाऊन ह्मणाला, अहो महाराज, उठून नीट बसा, व पिंडीवर आपले पाय पडले आहेत ते आटपून घ्या. विसोबा ह्मणाला, बाबारे, मी ह्मातारा असल्यामुळें मला शक्ति नाहीं; यास्तव तूंच ते उचलून एकीकडे ठेव. नामदेवानें तसें करतांच पाहतो तों पुन्हा त्याच्या पायाखालीं दुसरें शिवलिंग आहे. मग पुन्हा नामदेवानें पाय उचलले व ते तिसरीकडे ठेविले. तरी पुन्हा पायांखालीं तिसरें शिवलिंग आहेच. असें पाहून नामदेव विस्मित झाला; आणि देवानें ज्याकडे मला पाठविलें तोच हा योग्य पुरुष होय, असें पूर्णपणें समजून त्याच्या चरणांवर मस्तक ठेविला.

विसोबा खेचर डोळे उघडून व यास नमस्कार करीत आहे असें पाहून ह्मणाला अरे तूं कोण आहेस? मला नमस्कार करितोस याचें कारण काय? नामदेव हात जोडून ह्मणाला महाराज, मला नामा ह्मणतात व मी पंढरपुरचा राहणारा असून देवानें मला आपणांकडे पाठविलें आहे. विसोबा ह्मणाला, बरें तर सेवा करीत जवळ राहा. ह्मणजे ज्या उद्देशानें देवानें मजकडे पाठविलें आहे, तो तुझा उद्देश सिद्धीस जाईल. यावरून नामदेव हर्ष पावून कितीएक महिने त्याजवळ सेवा करीत राहिला असतां श्रवण, मनन, व निदिध्यासन यांच्या योगानें पूर्ण ब्रह्मविद्या पावला.

याचप्रमाणें आणखी कांहीं महिने यानें तेथें राहून सेवा केल्यावर, खेचरानें यास पूर्ण आशीर्वाद देऊन पंढरीस जाण्याची आज्ञा दिली. तेव्हां हा तेथून निघाला; व निघतांना त्यानें बहुतांप्रकारें गुरूचें स्तवन केलें. आणि मागील पायीं पंढरीचा मार्ग धरिला. पहिल्या मुक्कामास येऊन एका धर्मशाळेंत त्यास त्याच्या ओळखीच्या एका मनुष्याची गांठ पडली. त्यानें यास ओळखून विचारिलें, कां नामशेट, इकडे कोणीकडे गेलां होतां? यानें उत्तर केलें बार्शीस गुरुदर्शनार्थ गेलों होतों. तेव्हां तो ह्मणाला अहो, देव तुमच्याशीं बोलतो, तुमच्या हातें जेवतो, व तुमच्यावर त्याची पूर्ण कृपा, त्याचप्रमाणें तुमचाही त्याच्या चरणीं दृढभाव, असें असतां गुरुदर्शनास गेलों होतों म्हणतां, तेव्हां त्या त्रैलोक्यगुरूहून थोर असा तुह्मांस आणखीही कोणी गुरु आहे काय? मला वाटतें तुमची पहिली निष्ठा अगदीं बदलली व अलीकडे तुह्मांस कांहीं तरी भ्रम झाला आहे. त्यावर नामदेव ह्मणाला अहो ऐका.—

## अभंग.

पाषाणाचा देव बोलेच ना कधीं ॥ हरी भवव्याधि केवी घडो ॥ १ ॥ दगडाची मूर्ति मानिला ईश्वर ॥ परी तो साचार देव भिन्न ॥ २ ॥ दगडाचा देव इच्छा पुरवीत ॥ तरी कां भंगत अघातानें ॥ ३ ॥ पाषाण देवाची करिती जे भक्ति ॥ सर्वस्वा मूकती मूढपणें ॥ ४ ॥ प्रस्तराचा देव बोलत भक्तातें ॥ सांगते ऐकते मूर्ख दोघे ॥ ५ ॥ ऐशाचें महात्म्य जे कां वर्णि-ताती ॥ आणि ह्मणविती तेणें भक्त ॥ ६ ॥ परंतु ते जन पामर जाणावे ॥ त्याचे ना ऐकावे बोल कांहीं ॥ ७ ॥ धोंडा घडोनिया देव त्याचा केला ॥ आदरें पूजिला वर्षें बहु ॥ ८ ॥ तरी तो उतराई होय केव्हां काई ॥ बरवें हृदयीं विचारा हें ॥ ९ ॥ धोंडा पाण्यावीण नाहीं देव कोठें ॥ होतां सान मोठें तीर्थ क्षेत्र ॥ १० ॥ द्वादशीचे गांवीं जाहला उपदेश ॥ देवावीण ओस स्थळ नाहीं ॥ ११ ॥ तो देव नामया हृदयीं दाविला ॥ खेचरानें केला उपकारु हा ॥ १२ ॥

याप्रमाणें नामदेवाचें भाषण ऐकून त्या ओळखीच्या मनुष्यास विलक्षण चम-त्कार वाटला. आणि तो पुनः त्यास ह्मणाला अहो, पण देवानें तुमच्या हातचा नैवेद्य खाल्ला वगैरे ज्या गोष्टी आह्मीं ऐकिल्या व तुमचाही त्या योगानें लौकीक

वाटला त्या सर्व खोट्याच कीं काय? नामदेव ह्मणाला, बाबारे त्या सर्व खोट्या नाहींत व खऱ्याही नाहींत. तो कांहींएक भावनेचा विलक्षण प्रकार आहे. ऐकणारा ह्मणाला हें तुमचें बोलणेंच मला उमजलें नाहीं; यास्तव खऱ्या कशा नाहींत व खोट्याही कशा नाहींत याचें मनांत बिंबेल असें स्पष्टीकरण करा. नामदेव बोलला ऐका. कानांत कधीं कधीं घांट वाजते हें तुह्मांस कधीं अनुभवास आलें आहे काय? ऐकणारा ह्मणाला होय. बरें तर तो घंटानाद खरा कीं खोटा? खरा ह्मणाल तर प्रत्यक्ष घांट वाजतां दिसत नाहीं. खोटा ह्मणाल तर नाद ऐकूं येतो, ह्मणून त्याच्या अनुभवाची प्रतीति संशयरहित आहे. यास्तव जसें हें तसेंच तें. इतकें ऐकून तो मनुष्य निरुत्तर झाला. व पहांटेस आपल्या मार्गास लागला. इकडे नामदेव निघाला तो पंढरीस येऊन पोहोंचला.

दुसऱ्या दिवशीं नामदेव स्नान करून देवाच्या पूजेसाठीं देवळांत गेला. परंतु त्याची भावना पूर्वींच्याहून आतां अगदीं निराळी होती. ह्मणजे पूर्वी देवास जसा परिच्छिन्न बुद्धीनें पहात होता तसें यावेळेस त्याचें पाहणें नव्हतें तर सर्वत्र अवघा एक देवच असें याचें पहाणें होतें. येथें शंका अशी होईल कीं, जर असेंच होतें तर देवळांत जाण्याचें कारण काय? तर असें आहे, "पूर्वी ज्याचें दास्य केलें, त्याचें स्वामित्व प्राप्त झालें, पुढें त्याचें महत्व रक्षिलें, तरी तें थोरपणचि" ह्मणून या दास बोधांतील वचनाप्रमाणें पाहातां नामदेवाचें करणें अनुचित असें म्हणतां येत नाहीं. नंतर नामदेवानें देवापुढें कीर्तन केलें त्यांत आरंभीं अभंग म्हटला तो येणेंप्रमाणें.—

नाचूं कीर्तनाचे रंगीं ॥ ज्ञानदीप लाऊं जगीं ॥ १ ॥ सर्व सांडुनी माझाई ॥
वाचे विठ्ठल रखुमाबाई ॥ २ ॥ परेहून परतें वर ॥ तेथें राहूं निरंतर ॥ ३ ॥
सर्वांचें जें अधिष्ठान ॥ तेंचि माझें रूप पूर्ण ॥ ४ ॥ अवघी सत्ता
आली हाता ॥ नामयाचा खेचरि दाता ॥ ५ ॥

पुढें नामदेवानें कीर्तन केलें त्यांत इतका रंग भरला कीं, असा पूर्वी त्याच्या कीर्तनांत कधींच भरला नव्हता. सारांश, याचें हें कीर्तन ऐकून, संतमंडळीस पराकाष्ठेचा आनंद झाला, व सर्वांनीं याची वाहवा केली. भक्तविजयाच्या चौथ्या अध्यायांत याच्या चमत्काराच्या वगैरे गोष्टी अनेक आहेत; परंतु त्या समग्र येथें आम्हांस घेतां येत नाहींत. तथापि ज्यास त्या पाहण्याची इच्छा असेल त्यांनीं तो अध्याय पाहावा.



नामदेवाचे अभंग अगदीं साधे व प्रेमळ आहेत. याची समाधि पंढरपूर येथें देवाच्या महाद्वाराजवळ शके १२६८ मध्यें झाली. व त्यास्थळीं जी हल्लीं चढतांना पाहिली पायरी लागते तिला नामदेवाची पायरी अशी प्रसिद्धिही आहे. वारकरी लोक देवाची पायरी नाम–होय, असा अर्थ करून तो लोकांस भक्ति पुरःसर सांगात असतात. याप्रमाणें गुरूपसत्तीनंतरचे अभंग आम्हीं येथें सांगून हें चरित्र पुरें केलें आहे.

---

# नामदेवाची वंशावळी.



दामाशेटी.—( गोणाई.)
नामदेव.—( राजाई.)
नाऊबाई.
नारा. (लाडाई.)
महादा. (गोणाई.)
गोंदा. (येसाई.)
विठा. (साकराई.)
निंबाबाई.
मुकुंद.
केशव.
सिद्धेश्वर.
पांडुरंग.
संतूबावा.
गोपाळबावा.
गोदूबाई.
नारायण.
विठोजी.
तुकोजी.
महादजी.
सुबानजी.
चिमणाजी.
हरी.
ज्ञानदेव.
बाळाजी.
तुकाराम.
कुसाजी.
भिकाजी.
सखाराम.
केदारजी.
लक्ष्मण.
व्यंकोजी.
लिंबाजी.
उमाजी.
शेटीबा.
आबा.
योगीराज.
धनापा.
दामोदर.
विठोबा.
केदारजी.
रामा
महाळू.
नामदेव
सांवळा.

श्रीनामदेव बाबा व त्यांच्या समकालीन साधूंच्या अभंगांच्या गाथेची

# अनुक्रमणिका.

## नारा.



## गोंदा.



## विठा.



## जनाबाई.

**विठा.**



**जनाबाई.**



**गोराकुंभार.**



**ऐ.**

## नारा.



## विठा.



## जनाबाई.

### विठा.



### जनाबाई.



### चोखामेळा.



### सेनान्हावी.



### न.

## केशव.



## गोंदा.



## विठा.



## जनाबाई.



## कान्होपात्रा.



## सांवतामाळी.



## गोराकुंभार.

## राजाई.



## नारा.



## विठा.

## गोंदा.



## विठा.



अभंग नंबर.

## जनाबाई.



## विसोबाखेचर.



## म.

अभंग नंबर.



अभंग नंबर.

## नारा.



## विठा.

# नामदेव यांचे गाथेंतील प्रकणांची अनुक्रमणिका.

# नामदेवस्तुति.



## मोरोपंतकृत.

आर्या.

श्री नारदमुनिचें जें सुमहद्व्रत तेंचि नामदेवाचें ॥ याणें प्रसिद्ध केलें विठ्ठल हें भव्य नाम देवाचें ॥ १ ॥ शतकोटी अभंग मुखें कवि सत्तम हा सुखें वदे वाहे ॥ पूजा न आठवूं दे लक्ष्मीचीही सुखें व देवा हे ॥ २ ॥ भक्ति प्रताप लोकीं अत्यद्भुत याचि नामदेवाचा ॥ परमप्रिय भक्तसखा कीं आह्मां आप्त कामदेवाचा ॥ ३ ॥ बाळपणींच ह्मणे हा नामा श्रीविठ्ठलास जेव कसा ॥ देव कसा उतरे जो साचा होतो स्वयेंचि सेवकसा ॥ ४ ॥ तो शुद्ध नामयाच्या जो गातो आदरें अभंगातें ॥ जें पातक जड इतरां श्री गंगेच्या तसें न भंगातें ॥ ५ ॥ परमेश्वरप्रसादें भक्तीं अत्यद्भुता वसे शुचिता ॥ रुचिताप हरी तीनहि न तदुक्ति ब्राह्मणासि कां उचिता ॥ ६ ॥ किंबहुना नाम्याची भक्ता दासी जनी तिची वाणी ॥ खाणी पातक आणी तरिच खळाच्याहि लोचनीं पाणी ॥ ७ ॥ ज्ञानेश्वर ने तीर्था विरहें चिंता अनामया लागे ॥ प्रभु साश्रु श्रीस ह्मणे मम मन विसरे न नामयाला गे ॥ ८ ॥ उद्धव अक्रूर प्रिय भक्त श्रुत देव बहु असे कोटि ॥ परि याचि नामदेवीं प्रीतिच रस बालकीं तसी मोठी ॥ ९ ॥ निर्जळ देशीं भरला अड घेतां स्मरुनि आळ या तृषितें ॥ प्रभुनें तेंवि जपावें भक्तास जसें कृषिवळें कृषितें ॥ १० ॥ उठवी यवन प्रतिहता धेनु श्रीनामदेव मग तो बा ॥ निजकर्ण पिळूनि ह्मणे अति पश्चात्ताप पापनग तोबा ॥ ११ ॥ झाला हा गुप्त महा-द्वारीं जी प्रथम पायरी तींत ॥ घालिति जडाहि याचे आपुलिया सदय पाय रीतींत ॥ १२ ॥ नकरी जपोनि आंगें वळकट घालूनी काय कच्छ पर ॥ त्या नामदेवजीचें श्रीविठ्ठल विश्वनायक छपर ॥ १३ ॥ एक जनी हरिभक्ता सिंप्याची हरि हरी ह्मणे बटिक ॥ तीस दळाया लागे भगवान् वदतील साधु कां लटिक ॥ १४ ॥ प्रभुतें तसेंचि संत स्तविती सप्रेम नामदेवास ॥ त्यासि मयूर ह्मणे बा स्वप्रेमाचाचि लेश देवास ॥ १५ ॥

## कबीरकृत.

### दोहे.

सुरतकी सुई नुरतका धागा । नामदेव सीवे हरजीका बागा । ब्राह्मण भगतों आदों बैर । ज्याय पुकारत मारे शोर ॥ ध्रु० ॥ पादशाहा तुम बडे नरीस । मुनियां बिघडा सारा देस । दो छमेदार दिये पठाय । नामदेवकों ल्याओ बुलाय ॥ १ ॥ दिखलावो नामा तेरा हरी बिठला । नामा सुलतानी बादला । कहां तेरा गोविंद कहां तेरा राम । छोडदे तेरा राम जपों रहिमान ॥ २ ॥ पादशाहाजी हमसें जात कभी नही । हिंदु तुरक क्या पीर कही । थाने परसें ल्याई गाई । ले बांधी पिलखानें माही ॥ ३ ॥ आनले गाई बहाले छुरी । हिंदु मुसलमान बैठे फेरी । मुवा मुडदा जियाय दे मोहे । नहितो गडदन मारत तोहे ॥ ४ ॥ पादशहाजी ऐसा कभी नही होय । मुवामुडदा जियावे नही कोय । औट घडिकी आवद जो करे । नामदेवकी माता बिलखी फिरे ॥ ५ ॥ छोड दे पुता राम नाम भायी । जपो खुदा ना तो माऱ्या जायी । मै तेरा पुत न तू मेरी माय । पिंडपडे तब ध्यान न जाय ॥ ६ ॥ गंगा जमुना उलटी बहे । तोभी नामदेव हरनाम कहता रहे । उठकर पादशाहा हुये रिसाय । मस्त हत्ति तहां दिया झुकाय ॥ ७ ॥ हत्ती करे जब छोडकी मोट । नामाजी उबरे हरजीकी वोंट । पांवो बेडी हातों ताल । नामदेव गावे गोपाल ॥ ८ ॥ गाई मारी हुई तीन घडी । अबहु न आये त्रिभुवन हरी । बखत न बाज्या बाजिया । गरुड चेढे गोबिंद आयीया ॥ ९ ॥ लाल कसिदा हिरे जोडी । नामदेव उपर पाखर पडी । नामदेव उठे हरिचरण लय लाय । उठे बचुवा चुंबे गाय ॥ १० ॥ उठकर पादशहा महलमें जाय । महलमें पेखे लागी लाय । बिबियां पुकारे आलापु दिये । छोडदे नामदेवहो तेरी गाय ॥ ११ ॥ काढो कफनी पेनो गलेमाला । हिंदु मुसलमान बैठे शाला । पादशाहा नामदेव झगरो भयो । यह जनदास कबीरजी कह्यो ॥ १२ ॥

---

## गोराकुंभारकृत.

### अभंग.

कासया बहुवसी घालसी मन ॥ तुजविण मना काय काय काय ॥ १ ॥ एकपणीं एक एकपणीं एक ॥ एकचि अनेक विस्तरलें ॥ २ ॥ अनेक तत्वांतें झणी देसी थारा ॥ न चुकती येरझारा संसारीच्या ॥ ३ ॥ म्हणे गोराकुंभार कोणा नाहीं दुजें ॥ विश्वरुप तुझें नामदेवा ॥ ४ ॥

## आरती भक्तविजयाची.

दिंडीरवन पावन क्षेत्र पंढरी ॥ परब्रह्म अवतरले उभे इटेवरी ॥ चंद्रभागातिरीं कर कटावरी ॥ अखंड उभा आहे भक्तांचे द्वारीं ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय पंढरीराया ॥ जड जिव तारून पापि विट जडली पायां ॥ धृ० ॥ पातक पृथ्वीवरी झालें दारुण ॥ तेतीस कोटी देव आले तुज शरण ॥ ह्मणउन आज्ञा केली भक्तांलागून ॥ मृत्यूलोकीं जाउन तारावे जन ॥ २ ॥ प्रथम विप्रकुळीं जयदेव झाले ॥ तस्करानें हस्त चरण तोडिले ॥ पद्मावतिसी छळितां प्राणां त्यागिलें ॥ अष्ट-पदी ह्मणुनी प्रेत उठविलें ॥ ३ ॥ मारुतिचा अवतार तो तुळसीदास ॥ काशीमध्यें त्यानें धरिला रहिवास ॥ ४ ॥ अयोनि संभव भक्त दोघे जन्मले ॥ कबीर नामदेव नाम पावले ॥ नामयाचेसंगें देव जेविले ॥ कबीर गृहीं हरिनें शेले विणिले ॥ ५ ॥ शुकाचा अवतार नामा निज भक्त ॥ वाल्मिक कबिर झाला तोही वीरक्त ॥ तीर्थें करीत आले त्या घरीं संत ॥ चोरीकरितां वधिला कमाल निज भक्त ॥ ६ ॥ निवृत्ती ज्ञानेश्वर तिसरे सोपान ॥ ब्रह्मा विष्णु महेश नटले आपण ॥ चिच्छक्ती मुक्ताई जाणे निज खुण ॥ मांडे केले सत्वे पाठीवर जीण्हें ॥ ७ ॥ सन्याशाच्या पोटीं जन्म ह्मणउन ॥ निंदा करिती ग्रामीं सर्व ब्राह्मण ॥ त्यांचें व्हावयास द्वैत खंडण ॥ म्हैशा मुखें वेद ह्मणविले जाण ॥ ८ ॥ नामा ज्ञानेश्वर गेले तीर्थासी ॥ पंथ क्रमितां उदक न मिळे त्या देशीं ॥ स्तवन करितां तुझें तूं पावलासी ॥ उदकें भरुनि कूप देउळ फिरविसी ॥ ९ ॥ तिर्थें करुनी आले पंढरपुरासी ॥ ब्राह्मणानें प्रायश्चित दिधलें देवासी ॥ चतुरभुज रूप दाखवुनी त्यासी ॥ संशय त्याचा गेला सर्वही लयासी ॥ १० ॥ पांगुळ शक्ति-हिन तो कूर्मदास ॥ व्हावें तुझें दर्शन मनि जडली आस ॥ नामा घेऊन सर्वे जातां भेटींस ॥ माळ्याच्या हृदयीं केला रहिवास ॥ ११ ॥ रांका गोरा आणि होते कुल्हाळ ॥ नकळत बाळहत्या घडली तात्काळ ॥ चिखल मळितां त्या तुडविलें बाळ ॥ पिलीं घालुन केला अग्नि बंबाळ ॥ १२ ॥ विठ्ठल विठ्ठल नामें करितां गजर ॥ पिलीं पुत्र तेव्हां उठवी सत्वर ॥ स्त्रीसी ताडन करितां गोराकुंभार ॥ शपत देतां त्यानें तोडिले कर ॥ १३ ॥ द्वैतभेदें शंकर नर-हरि सोनार ॥ त्यातें दिधलें दर्शन होउन शंकर ॥ जनिचें काज करुनि टाकि-तसे केर ॥ ऐसे भक्त किती सांगूं अपार ॥ १४ ॥ शंकर वरदें जळीं मछंद्र झाला ॥ विभुतीचे प्रतापें गोरक्ष केला ॥ गुरुची आज्ञा वंदुनि भिक्षेसी

गेला ॥ नेत्र देउनी त्याणे वटक आणिला ॥ १५ ॥ चांगदेवें केलें व्याघ्राचें वाहन ॥ भिंती चालविली ज्ञानेश्वरान ॥ नरसीमेहत्याचे पुत्राचें लग्न ॥ हुंडी भरीली देवें नलगतां क्षण ॥ १६ ॥ रामराजाची भक्ती देखोन ॥ विद्या नगरी देव गेले आपण ॥ भानुदास गेले सुधी कारणे ॥ हार दिल्हा त्याला होतीं नवरत्नें ॥ १७ ॥ राजा पाहूं गेला तव हार नाहीं ॥ भानुदासा कंठीं सांपडला पाही ॥ नेमुनियां सूळीं नेला लवलाही ॥ शाखापल्लव आले सुळासी पाही ॥ १८ ॥ कान्होपात्रा वेश्या आणि निराबाई ॥ सांडुन देहभान नटल्या तव पाई ॥ विष देतां अमृत झालें लवलाही ॥ कान्होपात्रा स्वरुपीं मेळविली पाही ॥ १९ ॥ आन्नाचा दुष्काळ पडिला बहूत ॥ मंगळवेढ्या होते दामाजीपंत ॥ पंढरपुर क्षेत्रींचे जन समस्त ॥ ऐकुनी कीर्ती त्याची आले धांवत ॥ २० ॥ दामाजीपंताचें हृदय कोमळ ॥ आज्ञा करोनि धान्य लुटवी सकळ ॥ मुजुमदार तेथें होता चांडाळ ॥ यवनालागीं तेणें लिहिली खबर ॥ २१ ॥ यवनें क्रोधें करुनि दवडिले दूत ॥ आणा दामाजीला बांधुनियां येथ ॥ संकट जाणोनियां द्रव्य भरि बा तेथ ॥ अपार महिमा सखया दाविसी दासातें ॥ २२ ॥ बहिरंभट होता सुज्ञ ब्राह्मण ॥ निंदा व्हावी ह्मणुनी झाला तो यवन ॥ पैठणीचे अवघे मिळोनी ब्राह्मण ॥ प्रायश्चित देतां त्यांसी दाखवितो शिश्न ॥ २३ ॥ पैठणी एकनाथ होता ब्राह्मण ॥ द्वादश वरुषें पाणि भरि नारायण ॥ भेटीलागी आले तेथें हरिजन ॥ देऊनी दर्शन गुप्त झाले जगजीवन ॥ २४ ॥ मारुतीचा अवतार तो रामदास ॥ सावद ह्मणतां निघुन गेला वनास ॥ श्लोक ह्मणुनी प्रार्थीत होता मनास ॥ तेथें जाउन त्यातें तूं भेटलास ॥ २५ ॥ जातीचा वाणी तुकोबा राम ॥ सद्गुरु अवतरला फेडावया भ्रम ॥ छळण करितां झाले पंक्ति पावन ॥ गणपति देवासहित केलें भोजन ॥ २६ ॥ बोधल्यानें शेत लुटविलें जाण ॥ तुंबिनीचें बीज पेरी आणुन ॥ संकट पडतां देवें भरिलें धान्यानें ॥ प्रेत उठउनि देवा करितो कीर्तन ॥ २७ ॥ केशवराज हरिदिनि करितां किर्तन ॥ बचनाग दिधला सुंठ ह्मणोन ॥ संकट पडतां वीष केलें भक्षण ॥ किर्तनरंगि लुटती श्रोते सज्जन ॥ २८ ॥ वृद्धा शक्तीहीन गोदाई जाण ॥ भिमा पार केली तिजला आपण ॥ वृद्धा वश देव होउन ब्राह्मण ॥ चंद्रभागे तीरीं केलें भोजन ॥ २९ ॥ विसोबा सराफ होता ब्राह्मण ॥ आल्या अतीतासी घाली भोजन ॥ त्याचें संकट देवा केलें निर्सन ॥ जाले आध्ये येथुन हे सत्तावन्न ॥ ३० ॥ संताची आरती जे प्राणी गाती ॥ त्यांतें प्रसन्न होइल रुक्मिणीपती ॥ गणेशसुत त्याचे चरणाची माती ॥ मागे देवा तुझे चरणांची भक्ती ॥ ३१ ॥

---

श्री

# नामदेवाच्या अभंगांची गाथा.

## मंगलाचरण.

अभंग.

॥१॥ प्रथम नमन करूं गणनाथा ॥ उमाशंकराचिया सुता ॥ चरणावरी ठेवूनि माथा ॥ साष्टांगीं आतां दंडवत ॥ १ ॥ दुसरी वंदूं सारजा ॥ जे चतुराननाची आत्मजा ॥ वाक्सिद्धि पाविजे सहजा ॥ तिच्या चरणांबोजा दंडवत ॥ २ ॥ आतां वंदूं देव ब्राह्मण ॥ ज्यांचेनि पुण्यपावन ॥ प्रसन्न होऊनि श्रोते जन ॥ त्यां माझें नमन दंडवत ॥ ३ ॥ आतां वंदूं साधु सज्जन ॥ रात्रंदिवस हरिचें ध्यान ॥ विठ्ठल नामा उच्चारिती जन ॥ त्यां माझें नमन दंडवत ॥ ४ ॥ आतां नमूं रंगभूमिका ॥ कीर्तनीं उभे होती लोकां ॥ टाळ मृदंग श्रोते देखा ॥ त्यां माझें दंडवत ॥ ५ ॥ ऐसें नमन करोनि सकळां ॥ हरीकथा बोले बोबड्या बोला ॥ अज्ञान ह्मणोनि आपल्या बाळा ॥ चालवी सकळां नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ २॥ प्रथम नमूं गजवदनु॥ गौरीहराचा नंदनु॥ सकळ सुरवरांचा वंदनु। मूषकवाहनु नमियला ॥ १ ॥ त्रिपुरावधी गणाधिपती ॥ हरें पूजिला भावें भक्ती ॥ एके बाणें त्रिपुर पाडिला क्षितीं ॥ तैं पशुपति संतोषला ॥ २ ॥ इंद्रादिकीं अष्टलोकपाळीं ॥ लंबोदरू पुजिला कनककमळीं ॥ त्यांसी प्रसन्न झाला तयेवेळीं ॥ ह्मणवूनी सकळीं पूजियेला ॥ ३ ॥ सटवें रात्रीं मदनु शंबरें नेला ॥ प्रद्युम्न समुद्रामाजीं टाकिला ॥ तैं कृष्णें विघ्नहरु पूजिला ॥ प्रद्युम्न आला रतीसहित ॥ ४ ॥ पुजिला साही चक्रवर्ती ॥ त्यांचिया पुरती आर्ती ॥ युधिष्ठिरें पुजिला चतुर्थी ॥ राज्य प्राप्ति झाली तया ॥ ५ ॥ ह्मणवूनि सुरवरीं केली पूजा ॥ त्रिभुवनीं आणिक नाहीं दुजा ॥ विष्णुदास नामा ह्मणे स्वामि माझा ॥ भावें भजा एकदंता ॥ ६ ॥

॥ ३ ॥ गाणे जरी ह्मणों तरी गणेश सारजा ॥ आणिक नाहीं दुजा तयांवांचुनी ॥ १ ॥ नाचणु ह्मणों तरी तांडववनीं महेश्वरू ॥ तो एक नृत्यकारु करूं जाणे ॥ धृ० ॥ बोलका ह्मणों तरी बोलके वेद चारी ॥ त्याणें काय उरी जें मी बोलों ॥ २ ॥ जाणु ह्मणों तरी अठराही जाणें ॥ त्यापें काय उणें जें मी जाणों ॥ ३ ॥ कलावंत ह्मणों तरी चंद्र सूर्य दोन्ही ॥ बारा सोळा गगनीं दाविताती ॥ ४ ॥ नामा ह्मणे सर्व अवघे वंचले ॥ केशवें आपुलें ह्मणावें मातें ॥ ५ ॥

॥ ४ ॥ गणेश नमूं तरी तुमचा नाचणा ॥ ह्मणोनि नारायणा नमन माझें ॥ १ ॥ सारजा नमूं तरी तुमची गायणी ॥ म्हणोनि चक्रपाणि नमन माझें ॥ २ ॥ इंद्र नमूं तरी तुमचिया भुजा ॥ म्हणोनि गरुडध्वजा नमन माझें ॥ ३ ॥ ब्रम्हा नमूं तरी तुमचिये कुसी ॥ म्हणोनि हृषीकेशी नमन माझें ॥ ४ ॥ शंकर नमूं तरी तुमचिविभूती ॥ म्हणोनि कमळापति नमन माझें ॥ ५ ॥ वेद नमूं तरी तुझाचि स्थापित ॥ म्हणोनि लक्ष्मीकांत नमन माझें ॥ ६ ॥ गंगा नमूं तरी तुमच्या अंगुष्ठीं ॥ म्हणोनि जगजेठी नमन माझें ॥ ७ ॥ लक्ष्मी नमूं तरी तुमच्या पायांतळीं ॥ म्हणोनि वनमाळी नमन माझें ॥ ८ ॥ ऐसें नमन माझें सकळिका देवां ॥ नामा म्हणे केशवा नमन माझें ॥ ९ ॥

---

## उपास्य दैवत पंढरिचा विठोबा.

॥ ५ ॥ माता पिता बंधु भगिनी इष्टमित्र विठ्ठला तूं रे ॥ धृ० ॥ बापा यावें भेटावें विसावा माझा गा तूं ॥ माझा कुळाचार माहेर रे जिव्हार विठ्ठला तूं ॥ १ ॥ माझें विद्याधन आयुष्य आरोग्यता विठ्ठला तूं गा ॥ माझें तप व्रत तीर्थ दान पुण्य विठोबा तूं गा ॥ २ ॥ माझा गुरुमंत्र दैवत आगम निगम विठ्ठला तूं गा ॥ भूपति सुरपति ब्रम्हमूर्ति विठोबा तूं गा ॥ ३ ॥ माझा आचार विचार सत्यवाद धीर धर्म विठोबा तूं गा ॥ यश कीर्ति निवृत्ति आतां माझी तृप्ति विठोबा तूं गा ॥ ४ ॥ माझे यम नियम प्राणायाम प्रत्याहार विठोबा तूं गा ॥ नामा म्हणे विठोबा केशव परमात्मा माझा तूं गा ॥ ५ ॥

॥ ६ ॥ विठ्ठलेविण जया न गमे एक घडी ॥ सर्वस्व आवडी

विठ्ठलाची ॥ १ ॥ विठ्ठलचि माता विठ्ठलचि पिता ॥ भगिनी आणि भ्राता विठ्ठलचि ॥ २ ॥ विठ्ठलचि क्रिया विठ्ठलचि कर्म ॥ विठ्ठल सकळ धर्म कुळदैवत ॥ ३ ॥ गुज गौप्य जीविचें विठ्ठला सांगावें ॥ विठ्ठलें पुरवावें कोड त्याचें ॥ ४ ॥ सर्वकाळ करणें विठ्ठलाची कथा ॥ विठ्ठल जडला चित्ता जयाचिया ॥ ५ ॥ विठ्ठल जागृति स्वप्न आणि सुषुप्ति ॥ अखंड वदती विठ्ठल विठ्ठल ॥६॥ ऐसें सर्वस्वेसीं विठ्ठल भजतां ॥ सुख आलें हातां विठ्ठलाचें ॥ ७॥ नामा म्हणे त्याचे चरणरज होऊन ॥ जाहलोसें पावन म्हणे आतां ॥ ८ ॥

॥ ७ ॥ वेदांसी अगोचर परब्रह्म कारण ॥ योगिया हृदयींचें ममत्व निर्वाण ॥ आकळूं न कळेचि शेखीं धरियेलें मौन ॥ तें रूप पंढरीये विटे समचरण ॥ १ ॥ कानडा विठ्ठलवो ॥ उभा भिवरेतीरीं ॥ भक्तांचे आर्तवो जीवा लागले भारी ॥ धृ० ॥ भुवैकुंठ पंढरी हे देवें रचियली पैं गा ॥ शिवें ती वंदियेली विठो सम चरणांची गंगा ॥ सदाचा नामघोषु कलिमल जाय भंगा ॥ काय वानूं सुख तेथिचें भेटिलिया पांडुरंगा ॥ २ ॥ विठ्ठल नाम वाचे जना ह्राचि उपचारू ॥ म्हणवूनि दावि तुझे कटीं ठेवूनिया करू ॥ येरांसी माया नदी काम क्रोध मगरू ॥ ठेवा हा नामयाचा स्वामि विठ्ठल वीरू ॥ ३ ॥

॥ ८ ॥ विटेवरी उभा दीनांचा कैवारी ॥ भेटाया उभारी दोन्ही बाह्या ॥ १ ॥ गुण दोष त्यांचे न पाहेचि डोळां ॥ भेटे वेळोवेळां केशिराज ॥२॥ ऐसा दयावंत घेत समाचार ॥ लहान आणि थोर सांभाळितो ॥ ३ ॥ सर्वांलागीं देतो समान दरुशन ॥ उभा तो आपण सम पायीं ॥ ४ ॥ नामा म्हणे तया संतांची आवडी ॥ भेटावया कडाडी उभाची असे ॥५॥

॥ ९ ॥ विटेवरी समचरण सुंदर ॥ बाळक सकुमार येशोदेचें ॥ १ ॥ वाळे वाकी गर्जति तोडर चरणीं ॥ नाद झणझणी वाजताती ॥ २ ॥ कासे कसियेला दिव्य पितांबर ॥ लोपे दिनकर तेणें प्रभा ॥ ३ ॥ नामा म्हणे नाहीं तुझ्या रूपा पार ॥ तेथें मी किंकर काय पाड ॥ ४ ॥

॥ १० ॥ वाकडें पाहणें जया लौकिकासी ॥ मज पंढरिसी वास पुरे ॥ १ ॥ उदंड उपास कासया करावे ॥ पुरे एका भावें भाविकांसी ॥ २ ॥ तीर्थ क्षेत्र मूळ जाणा वाळूवंट ॥ कटीं कर नीट भक्तांसाठीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझी वैकुंठ पंढरी ॥ तेथें निरंतरी जन्म देई ॥ ४ ॥

॥ ११ ॥ मान तोडावया कर शस्त्रांचे ॥ कठिण बहुतांचे उभारिले ॥ १ ॥ तरी न वदें न वदें आन ॥ आन कांहीं या विठोबावांचून ॥ धृ० ॥ विठोबा परतें दैवत आहे म्हणती ॥ ऐसें श्रुति स्मृति जरी बोलती ॥ तरी ते अपशब्द कानीं पडों न द्यावे ॥ पाखांडी म्हणती जरी उगेंचि असावें॥२॥ ब्रम्हदेवेसी झालिया भेटी ॥ तोहि जरी वदेल ऐसिया गोष्टी ॥ या विठोबा परतें दैवत आहे म्हणेल सृष्टीं ॥ चळला पोटीं निभ्रांत जाणा ॥ ३ ॥ कोटी कोटी ब्रम्हांडें एक एक रोमीं ॥ व्यापूनियां व्योमीं वर्ततसे ॥ तो हा माझा विठोबा सर्वां घटीं सम ॥ न सांडावें वर्म म्हणे नामा ॥ ४ ॥

॥ १२ ॥ वेणु वाहोनी सांवळा ॥ गाई चारिसी गोवळा ॥ १ ॥ कां बा न येसि धांवत ॥ विठ्ठल माझें कुळदैवत ॥ २ ॥ अंगीं चंदनाची उटी ॥ पदक मिरवलें कंठीं ॥ ३ ॥ गळां माळ वैजयंती ॥ सुदर्शन घेऊन हातीं ॥ ॥ ४ ॥ कासे पीतांबर शेला ॥ विटेवरलीया विठ्ठला ॥ ५ ॥ नामा म्हणे पीडिलों भुके ॥ देई प्रेमाचें भातुकें ॥ ६ ॥

॥ १३ ॥ संसार करितां देव जैं सांपडे ॥ तरि कां झाले वेडे सनकादिक ॥ १ ॥ संसारीं असतां जरी देव भेटता ॥ शुकदेव कासया जाता तयालागीं ॥ २ ॥ घराश्रमीं जरी जोडे परब्रह्म ॥ तरि कां घराश्रम त्याग केला ॥ ३ ॥ ज्ञातीच्या आचारें सांपडे जरी सार ॥ तरि कां निरहंकार झाले साधु ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां सकळ सांडोन ॥ आलोसें शरण विठोबासी ॥ ५ ॥

॥ १४ ॥ जगीं पेठा जाण असती अनेका ॥ अति सुरंगा वाखाणिती ॥ १ ॥ जंव तूं न देखसी पेठ द्वारकेची ॥ श्रीरंग रायाची राजधानी ॥२॥ द्वारकेची पेठ तेथें स्वरूप चोखट ॥ बरवी बरवंट शोभतसे ॥ ३ ॥ तैसेंचि पंढरीचें सोपें बहु ठाणें ॥ संत सुलक्षण जाणताती ॥ ४ ॥ तयाचे दर्शनें लाभ कोटी गुणें झाला ॥ भवसिंधु आटला हेळामात्रें ॥ ५ ॥ ऐसी पेंठ निर्मिली देवें हे पंढरी ॥ पुंडलीक द्वारीं उभा असे ॥ ६ ॥ या पेठेचा शेट्या पुंडलीक भक्त ॥ नामा शरणांगत केशवासी ॥ ७ ॥

॥ १५ ॥ आह्मीं होतों पंढरिसीं ॥ आमुची जुनाट मिरासी ॥१॥ राई रखमाई माता ॥ पांडुरंग आमुचा पिता ॥ २ ॥ पुंडलीक आमुचा भाई ॥ चंद्रभागा बहिणाई ॥ ३ ॥ नामा ह्मणे हो सेवटी ॥ घर चंद्रभागे काठीं ॥ ४ ॥

॥ १६ ॥ आनंद अद्वय नित्य निरामय ॥ जें कां निज ध्येय योगियांचें ॥ १ ॥ तें समचरण साजिरें ठेवुनी विटेवरी ॥ उभें भीमा तीरीं पंढरिये ॥ २ ॥ जें पुराणांसीं वाड श्रुति नेणती पार ॥ तें झालें साकार पुंडलीका ॥ ३ ॥ नामा ह्मणे ज्याचें सनकादिकां ध्यान ॥ तें माझें कुळदैवत पंढरीराव ॥ ४ ॥

॥ १७ ॥ जयालागिं हृदय उले ॥ तें म्यां जीवेंसि धरिलें ॥ १ ॥ विठ्ठलाचीं पाऊलें ॥ म्यां मस्तकीं वाहिलीं ॥ २ ॥ नामा ह्मणे मुनि रंगले ॥ तें म्यां जीवेंसि धरिलें ॥ ३ ॥

॥ १८ ॥ श्रोते ह्मणती विष्णुदासा ॥ या ब्रह्मांडींचा प्रळय कैसा ॥ पंढरीच्या भासा ॥ नाश कीं नाहीं ॥ १ ॥ तंव नामा ह्मणे सुदर्शनावरी ॥ देवें रचिली पंढरी ॥ भक्तां सहित राज्य करी ॥ रुक्मिणीवर ॥ २ ॥ तो परमात्मा गुणातीत॥ अपरोक्ष भक्तां सहित ॥ तेथें प्रळय हात जोडित ॥ जया लागीं ॥ ३ ॥ जें ब्रह्मयाचें आयुष्य सारें ॥ तें लया जाय चराचरें॥ तें पंढरपूर ॥ मिळे वस्तु माझी ॥ ४ ॥ नामा ह्मणे या खुणा ॥ कळती संतजना ॥ इतर मायिक जना ॥ नेणवती ॥ ५ ॥

॥ १९ ॥ अनंत तीर्थांचें माहेर ॥ अनंत रूपांचें सार ॥ अनंता अनंत अपार ॥ तो हा कटीं कर ठेवूनि उभा ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग ॥ सकळ दोषां होय भंग ॥ पूर्वज उद्धरती सांग ॥ पंढरपुर देखिलिया ॥ धृ० ॥ निरा भिवरा पडतां दृष्टी ॥ स्नान करितां शुद्ध सृष्टि ॥ अंतीं तो वैकुंठप्राप्ती ॥ ऐसें परमेष्टि बोलिला ॥ २ ॥ तेथें एक शीत दिधल्या अन्न ॥ कोटी कुळाचें होय उद्धरण ॥ कोटि याग केले पूर्ण ॥ ऐसें महिमान ये तीर्थींचें ॥ ३ ॥ नामा ह्मणे धन्य जन्म ॥ जे धरिती पंढरीचा नेम ॥ तयां अंतीं पुरुषोत्तम ॥ जीवें भावें न विसंबे ॥ ४ ॥

॥ २० ॥ काय पुण्य केलें इहीं जीवाजनीं । पंढरी नयनीं देखियेली ॥ ॥ १ ॥ अनंतां जन्मांचे हेचि प्रायश्चित ॥ वाचे जपे नित्य रामनाम ॥ २ ॥ कोटी कुळें केलीं क्षणेचि पावन ॥ केल्या एक स्नान चंद्रभागे ॥ ३ ॥ शोक मोह ताप विध्वंसिला हेळां ॥ अवलोकितां डोळा पांडुरंग ॥ ४ ॥ महा पापराशी तिहीं केल्या होळी ॥ वाजविल्या टाळी विठ्ठल नाम ॥ ५ ॥ नामा ह्मणे धन्य धन्य ते संसारीं ॥ चालविती वारी पंढरीची ॥ ६ ॥

॥ २१ ॥ सांडूनि पंढरी जासी आणिका तीर्था ॥ लाज तुझ्या चित्ता कैसी नये ॥ १ ॥ त्रिभुवनिचीं तीर्थें झालीं तीं मळीण । न्हावया पावन आलीं येथें ॥ २ ॥ एवढा ब्रम्हानंद कैंचा आणिका ठायीं । जो या आहे पायीं विठोबाच्या ॥ ३ ॥ काळ मृत्यु दोन्ही घालोनि पायांतळीं । वाजलीया टाळी कीर्तनसंगें ॥ ४ ॥ नित्य नवी दिवाळी सुखाचा सोहळा । भोगीजे अवलीला संतसंगें ॥ ५ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष मुक्ति चारी ॥ देतो हा मुरारी नामें एका ॥ ६ ॥ नामा म्हणे चला जाऊं पंढरिये । पाहूं बापमाये पांडुरंग ॥ ७ ॥

॥ २२ ॥ अगाध भवजळ तरावया दुस्तर ॥ रची पंढरपुर कलीमाजी ॥ १ ॥ तारू पंढरीनाथ मोलेवीण उतरी ॥ उभा भीमातीरीं वाट पाहे ॥ २ ॥ बुडण्याचें भय नाहीं पैं संसारीं ॥ कलीमाजीं पंढरी थोर नाव ॥ ३ ॥ जया नावेवरी अठराही आवलें ॥ साही खण भले मिरवती ॥ ४ ॥ चहुंमुखीं जिचा नकळेचि पार ॥ पाहतां विचार सहस्र मुखा ॥ ५ ॥ सड्या लावी कसे कुटुंबी नावेवरी ॥ उतरीलें तीरीं केशीराजें ॥ ६ ॥ प्रेमाचिया पेठीं बांधोनियां पोटीं ॥ उतरी जगजेठी पांडुरंग ॥ ७ ॥ अंगे घाली उडी बुडतीया काढी ॥ ऐसे कल्पकोडी तारियेले ॥ ८ ॥ तारियेले सत्य हाचि पैं निर्धार । नामा पैल पार उतरला ॥ ९ ॥

॥ २३ ॥ पंढरिचें प्रेम आहे ज्यांचे जीवीं ॥ त्यांची नित्य नवी करीन आशा ॥ १ ॥ ते माझे सोइरे सुखाचे सद्गुरु ॥ भवसिंधुचा तारु उतरतो ॥ ॥ धृ० ॥ माझ्या विठोबाच्या नामीं ज्यां विश्वास ॥ होइन त्यांचा दास आवडीचा ॥ २ ॥ माझ्या विठोबाच्या चरणीं ज्यांचा भाव ॥ दारवंटा पाय धरीन त्यांचे ॥ ३ ॥ माझ्या विठोबाचें ध्यान ज्याचे मनीं ॥ सांडोबा अंगणीं होईन त्यांचे ॥ ४ ॥ ऐसे सर्व भावें माझ्या विठोबा शरण ॥ त्यांचे वंदीन चरण नामा म्हणे ॥ ५ ॥

॥ २४ ॥ पंढरीच्या सुखा अंत पार नाहीं लेखा ॥ शेषा सहस्रमुखा न वर्णवेचि ॥ १ ॥ पंढरीच्या सुखा तोचि आधिकारी ॥ जन्मोजन्मीं वारी घडली तया ॥ धृ० ॥ पंढरीस जातां प्रेम उचंबळत ॥ आनंदें गर्जत नामघोष ॥ २ ॥ विश्वमूर्ति विठो विश्वंभर देखे ॥ विसरला दुःखें देहभाव ॥ ३ ॥ नामा म्हणे त्याचा होइन चरणरज ॥ नुपेक्षील मज पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २५ ॥ यारे नाचों प्रेमानंदें ॥ विठ्ठल नामाचिया छंदें ॥ १ ॥ जाऊं म्हणती पंढरिची वाट ॥ कळिकाळा भय वाटे ॥ २ ॥ चंद्रभागे घडलें स्नान ॥ यमलोकीं पडीलें खान ॥ ३ ॥ झाली पुंडलीका भेटी ॥ पूर्वज आनंदले वैकुंठीं ॥ ४ ॥ आतां राउळासी जातां ॥ झाली जीताचि मुक्तता ॥ ५ ॥ विष्णुदास नामा म्हणे ॥ आतां नाहीं येणें जाणें ॥ ६ ॥

॥ २६ ॥ पुंडलीक वरद आनंदें अभेद ॥ विठ्ठल बीद्रद नाम तुझें ॥१॥ पावला वेगीं मजलागीं झडकरी ॥ बुडतों भवसागरीं तारी मज ॥ धृ० ॥ अकांत अवसरीं स्मरिला गजेंद्रें ॥ दीनानाथ ब्रिद साच केलें ॥२॥ स्मरली संकटीं द्रौपदी वनवासी ॥ धांवूनि आलासी लवलाहीं ॥ ३ ॥ प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणीं ॥ संकटापासुनी रक्षियेलें ॥ ४ ॥ नामा म्हणे थोर पीडिलों गर्भवासें ॥ अखंड पाहतसें वाट तुझी ॥ ५ ॥

॥ २७ ॥ धन्य तोची जगीं जाणा राज योगी ॥ जेणें पाडुरंगीं ठेविला भाव ॥ १ ॥ संकल्प विकल्प शुन्य करोनि मन ॥ हृदयीं धरिले चरण विठोबाचे ॥ २ ॥ कोटी कुळें एका क्षणेंचि पावन ॥ जेणें केलें स्नान चंद्रभागे ॥ ३ ॥ महा पाप रासी साच्या झाल्या होळी ॥ वाजविली टाळी विठ्ठल नामें ॥ ४ ॥ नामा ह्मणे धन्य धन्य ते संसारी ॥ चालविती वारी पंढरीची ॥ ५ ॥

॥ २८ ॥ पंढरीचें सुख जिहीं अनुभविलें ॥ भावें अनुसरले विठ्ठलपायीं ॥ १ ॥ काया वाचा मन रंगले चरणीं ॥ धरियेला मनीं पांडुरंग ॥ २ ॥ नामाचेनी बळें उडविलीं साधनें ॥ तोडीलीं बंधनें संसाराचीं ॥ ३ ॥ मुक्तिपद कोणी नेघे फुकासाठीं ॥ हिंडे वाळवंटी दीनरूप ॥४॥ योगीयांचें घर रिघे काकुलती ॥ आव्हेरीलें संतीं ह्मणोनिया ॥ ५ ॥ दोन्ही कर जोडुनि मोक्ष पाहे वास ॥ ह्मणे होइन दास हरिदासाचा ॥ ६ ॥ तंव तुच्छ करोनि न पाहती दृष्टी ॥ आपंगिलें शेवटीं ब्रह्मज्ञानें ॥ ७ ॥ अष्ट महा सिद्धि ह्मणती कवण गति ॥ यावें काकूलती कवणा आम्ही ॥ ८ ॥ मोक्ष मुक्ति जिहीं हाणितल्या पायीं ॥ आमची ते सोयी काय धरिती ॥ ९ ॥ ऐसे भक्तराज देवां वंद्य झाले ॥ ते एक राज्य केलें पुंडलीकें ॥ १० ॥ हर्षें निर्भर नामा नाचें महाद्वारीं ॥ कीर्ति चराचरीं वर्णीतसें ॥ ११ ॥

॥ २९ ॥ सर्व सुख रासी भिंवरेचे तीरीं ॥ आमुची पंढरी कामधेनू ॥१॥

प्रेमामृतें दुभे सदां संतजनां ॥ वोसंडतो पान्हा नित्य नवा ॥ २ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष चाऱ्ही थानें ॥ दोहोणार धन्य पुंडलीक ॥ ३ ॥ जयाचें दुभतें नित्य नवें वाढतें ॥ बहु पंढरीतें पुर्वपुण्य ॥ ४ ॥ भक्तिचेनि बळें भावाचेंनि मेळें ॥ देखोनियां बोले बहु फार ॥ ५ ॥ भाग्यवंत नामा ते क्षीर लाधला ॥ प्रेमें वोसंडला गर्जे नाम ॥ ६ ॥

॥ ३० ॥ ऐंसें तीर्थ कोणी दाखवा गोमटें ॥ जेथें प्रत्यक्ष हें भेटे परब्रह्म ॥ १ ॥ कोठें ऐसें क्षेत्र आहे त्रिभुवनीं ॥ सकळां शिरोमणि चंद्रभागा ॥ २ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवावें एक ॥ देखतांचि सुख पावे मन ॥ ३ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवा साजिरें ॥ सदा प्रेमपुरें वोसंडत ॥ ४ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुलभ ॥ जेथें समारंभ हरिकथेचा ॥ ५ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवा निर्मळ ॥ परब्रह्म केवळ सकळां जीवा ॥ ६ ॥ नामा ह्मणे आह्मा दीनांचें माहेर ॥ धन्य पंढरपुर गीतीं गातां ॥ ७ ॥

॥ ३१ ॥ पावन पांडुरंगक्षितीं ॥ जे कां दक्षिण द्वारावती ॥ तेथें विराजे विठ्ठलमूर्ति ॥ नाम गर्जती पंढरी ॥ १ ॥ जे पंढरी मनीं ध्याती ॥ तयां तिही लोकीं गती ॥ जे अनेक तिर्थां जाती ॥ तें वेचिती तयातें ॥ धृ० ॥ तयाचे जयां घडे दर्शन ॥ त्यांचे चुके जन्ममरण ॥ अंतकाळीं होय स्मरण ॥ गर्भवासा नये तो ॥ २ ॥ ऐका पंढरीचें महिमान ॥ जितकें राऊळ तितुकें प्रमाण ॥ तेथील तृण पाषाण ॥ तेही देव जाणावे ॥ ३ ॥ वाराणसी चालिजे मासा ॥ गोदावरी एका दिवसा ॥ पंढरी पाउल परियेसा ॥ ऐसा ठसा नामाचा ॥ ४ ॥ शिव सांगे ऋषीं जवळी॥ तीर्थें येती माध्यान्ह काळीं ॥ येउनी चंद्रभागे जवळीं ॥ स्नानें करिती निर्धारें ॥ ५ ॥ ऐशा तिर्थीं पाप घडे ॥ ऐसें म्हणतां जिव्हा झडे ॥ नामा विनवी संतांपुढें ॥ पंढरी पेंठ न सांडावी ॥ ६ ॥

॥ ३२ ॥ पंढरीचें सुख पाहातां एक घडी ॥ वास कल्प कोडी वैकुंठींचा ॥ १ ॥ आणिता अनुमाना न पवे सरी ॥ महिमा न कळे थोरी सहस्रमुखा ॥ धृ० ॥ हें सुख सुरवरां स्वप्नीं नाहीं दृष्टीं ॥ जैसें वाळवंटी तुह्मां आह्मां ॥ २ ॥ धन्य चंद्रभागा पुण्य सरोवर ॥ धन्य भिमातीर पुण्य भूमी ॥ ३ ॥ धन्य नरनारी गर्जती हरिनामें ॥ ऐकोनि डोले प्रेमें शूळपाणी ॥ ४ ॥ धन्य वेणुनाद धन्य वृंदावन ॥ धन्य तें महिमान क्षेत्रवासी ॥ ५ ॥ धन्य पंचक्रोशी धन्य आसपासी ॥ दुमदुमी अहर्निशीं नामघोष ॥ ६ ॥

धन्य पशु पक्षि कीटक आणि भृंग ॥ जयां अंगसंग पांडुरंगीं ॥ ७ ॥
धन्य ते तरुवर आवघे लहान थोर ॥ अवतरले अमर गुप्तरूपें ॥ ८ ॥
धन्य ते संसारी वर्तती जीवन्मुक्त ॥ जया असे आर्त पांडुरंगीं ॥ ९ ॥
धन्य त्याचा वंश ज्या नामीं विश्वास ॥ धन्य विष्णुदास नामा तेथें ॥ १० ॥

॥ ३३ ॥ सहस्रअठ्यांशीऋषि ॥ स्कंद उपदेशी तयांसी ॥ तिहीं एक पुसिली पुसी ॥ ते तयासी अकळ ॥ १ ॥ आतां जाऊं कैलासा ॥ सकळ पुसूं त्या महेशा ॥ मग निघाले आकाशा ॥ पितृदेशा पातले ॥ २ ॥ बरे होऊनियां सावध ॥ ऐका भक्तीचा संवाद ॥ विनवीता झाला स्कंद ॥ तो अनुवाद शंभूचा ॥ ३ ॥ स्कंदें विनविला त्रिपुरारी ॥ सहित वामभागीं गौरी ॥ स्तुति स्तवनें केलीं भारी ॥ हृदासनीं नमियेला ॥ ४ ॥ मग निघाला लोटांगणीं ॥ ह्मणे त्राहें त्राहें शूळपाणि ॥ करें उचलिला धांवोनी ॥ मग आसनीं बैसविला ॥ ५ ॥ ऋषींसि आसनें देउनी वेगां ॥ जवळीं बैसविले पैं गा ॥ ते ह्मणती झडकरी सांगा ॥ जें वेदशास्त्रासी प्रिय ॥ ६ ॥ तंव स्कंद ह्मणे ताता ॥ ऋषिनीं पुसिली जे वार्ता ॥ ते आकळ माझिया चित्ता ॥ वेदशास्त्रार्थ विरहित ॥ ७ ॥ बरवीं तीर्थें पुण्यरासी ॥ महात्म्यें सांगत होतों त्यांसीं ॥ परी तीर्थ क्षेत्र देवांसीं ॥ नाहीं चहूंसी एक मेळा ॥ ८ ॥ जे जे क्षेत्रीं करितां विचार ॥ ते ते ठायीं तेंचि थोर ॥ परि तयांमाजी असे सार ॥ जें माहेर सकळिकां ॥ ९ ॥ पाप घडे जे जे मेदिनी ॥ तयासी तें तीर्थ करी धुणी ॥ तीर्थां वर्णीं शूळपाणि ॥ सांगा हानि जें करी ॥ १० ॥ जळती पातकांचिया कोडी ॥ ऐसीं तीर्थें आहेति गाढी ॥ तयां सकळिकां तीर्थां आहे खोडी ॥ ते मी उघडी सांगेन ॥ ११ ॥ हिमकाळीं किजे स्नान ॥ हेंचि प्रयागासी न्यून ॥ काशी इच्छी जो मरण ॥ थोर निर्वाण पाविजे ॥ १२ ॥ पितृस्मरण आचमन ॥ करोनि देइजे पिंडदान ॥ तेणें पूर्वज होती पावन ॥ हेंचिन्यून गयेसी ॥ १३ ॥ गाढें कुरुक्षेत्र जाण ॥ तेथें किजे हिरण्यदान ॥ केदारींचें उदकपान ॥ करी पीडन देहासी ॥ १४ ॥ उपमा द्वारकेउनी ॥ अरुच गोमतीचें पाणी ॥ सहा मास सेविल्यावांचुनी ॥ नव्हे दाटणी चक्राशीं ॥ १५ ॥ गंगा बारा वरुषें करी ॥ सकळिकां मध्यें गोदावरी ॥ सिंहस्थी महिमा थोरी ॥ हें न्यून भारी तयासी ॥ १६ ॥ अयोध्या माया मथुरा ॥ कांची आवंतिका करवीरा ॥ लोण्हार हाटकेश्वर तुंगभद्रा ॥ आणि पुष्करा कावेरी ॥ १७ ॥ कली माजी वैकुंठ साक्षांत ॥ गाढें क्षेत्र जगन्नाथ ॥ सा देवासी नाहीं पाय हात ॥ उणाव बहुत तयासी ॥ १८ ॥ गाढें श्रीशै-

स्यपर्वत ॥ लक्षावया उदित ॥ तेथें जीवासी करिजे घात ॥ हा उणाव बहुत तयासी ॥ १९ ॥ गाढें क्षेत्र परियेसा ॥ गोकर्ण सेतुबंध महेशा ॥ तयासी उणाव ऐसा ॥ जे यमदिशा ह्मणताती ॥ २० ॥ ऐसीं तीर्थें कोटीरासी ॥ परि लांच्छन आहे सर्वांसी ॥ पहिलें राहिजे उपवासी ॥ मग डोईसी मुंडण ॥ २१ ॥ सकळ तीर्थांचा पारु ॥ जोगा देखिला सागरु ॥ तयासी उणाव आहे थोरु ॥ योग येतो अमावास्ये ॥ २२ ॥ म्हणोनि पुसों आलों तुज ॥ सकळ तीर्थांचे बीज ॥ तें झडकरी सांग मज ॥ देवा तुज जें प्रिय ॥ २३ ॥ ऐसी करोनी विनवणी ॥ मग स्कंद लागला चरणीं ॥ येरें उचलिला झडकरूनीं ॥ मग शूळपाणि हे बोलिले ॥ २४ ॥ पुत्रा तुवां जें केली विनंती ॥ हेंचि गिरिजा पुसत होती ॥ तरी सांगेन तुजप्रती ॥ चित्त देउनी परियेसी ॥ २५ ॥ महिमा दरुशनाचा पूर्ण ॥ एक लक्ष्मी जाणे खूण ॥ शुकसनकादिक मुनि सज्जन ॥ आणि वैष्णव जन प्रेमळ ॥ २६ ॥ जैसा कृपणाचा ठेवा ॥ तैसें आर्त रे माझिया जीवा ॥ पुत्रा पुसिलें तुवां ॥ तरी वृत्तांत बरवा सांगेन ॥ २७ ॥ मी बैसोनियां स्मशानीं ॥ जयाचें नाम जपें ध्यानीं ॥ तें दैवत आहे जये स्थानीं ॥ चित्त देऊनि परियेसा ॥ २८ ॥ युगां अठ्ठावीसांवरी ॥ आहे पुंडलिकाच्या द्वारीं ॥ विठ्ठल उभा भीमातीरीं ॥ विश्व तारी दरुशनें ॥ २९ ॥ घेउनी तरुवरांची बुंथि ॥ देव सेवा जाणवीती ॥ आदिकरोनी पार्वती ॥ आम्हां वस्ति तये ठायीं ॥ ३० ॥ तेजें झळाळें वैकुंठ ॥ तयापरी क्षेत्र चोखट ॥ पहा पंढरपुर नीट ॥ महिमा अद्भुत तिहीं लोकीं ॥ ३१ ॥ जेणें पीडिलें तिन्हीं लोकां ॥ त्यासि वधावया पावलों देखा ॥ ओढी काढोनी त्र्यंबका ॥ श्रीहरि सखा स्मरिला ॥ ३२ ॥ घात करोनी त्रिपुरा ॥ वधियेलें तीन्ही असुरां ॥ तेंचि तीर्थ भिवरा ॥ सचराचरा तारक ॥ ३३ ॥ प्रतिदिनी माध्यान्हीं ॥ सकळ तीर्थें तिये स्थानीं ॥ भिवरे सुस्नात होउनि ॥ विठ्ठलचरणीं लागती ॥ ३४ ॥ तये क्षेत्रीं पाप घडे ॥ ऐसें बोलतां जीव्हा झडे ॥ काय सांगूं तुज पुढें ॥ ब्रह्म उघडें असे जेथें ॥ ३५ ॥ लोहों लागलिया परीसें ॥ सोनें झालें एक सरिसें ॥ आतां पालटेल कैसे ॥ भलतें तैसें जरी झालें ॥ ३६ ॥ एक वेळ पंढरीये जाऊन ॥ मग भलतिये ठायीं राहो कां जन ॥ तो राहे वैकुंठींचा जाण ॥ कर्महीन जरी झाला ॥ ३७ ॥ ऐसें ऐकोनी उत्तर ॥ स्कंद हरुषें निर्भर ॥ आदिकरोनी ऋषीश्वर ॥ पंढरपुर ठाकिती ॥ ३८ ॥ विष्णुदास नामा म्हणे ॥ एक वेळ पंढरीये जाणें ॥ विठ्ठल धन्यावरी पाहणें ॥ नाहीं येणें संसारा ॥ ३९ ॥

॥ ३४ ॥ निंबलोण करूं पंढरीच्या सुखा ॥ आणिक पुंडलीका माय बापा ॥ १ ॥ पाहता भूमंडळीं नाहीं आणिक रे ॥ पांडुरंग क्षेत्रा वांचूनियां ॥ धृ० ॥ अणिमादी सिद्धि भक्तांचिये द्वारीं ॥ होऊनि कामारि वोळंगती ॥ २ ॥ परलोकीं येती परतोनी मागुते ॥ सर्व सुख तेथें भोगावया ॥ ३ ॥ मुक्तिपद कोणी नघे फुकासाठीं ॥ हिंडे वाळवंटीं दीनरूप ॥ ४ ॥ भक्ताचिया पायां पडतो पुढतां पुढती ॥ मज करा सांगाती मोक्ष ह्मणे ॥ ५ ॥ सप्तलोकीं जया सुखाची सिराणीं ॥ तें आह्मा अनुदिनी प्रत्यक्ष दिसे ॥ ६ ॥ बंदीजन नामा उभा महाद्वारीं ॥ कीर्ति चराचरीं वर्णितसे ॥ ७ ॥

॥ ३५ ॥ संपदा सोहोळा नावडे मनाला ॥ छंद हा लागला पंढरीचा ॥ १ ॥ जावें पंढरीसी आवडे मनासी ॥ कधीं एकादशी आषाढी हे ॥ धृ० ॥ आषाढी कार्तिकी कधीं ये ह्मणोनी ॥ जातिया लागोनि पुसतसे ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसें आर्त ज्याचे मनीं ॥ त्याची चक्रपाणि वाट पाहे ॥ ३ ॥

॥ ३६ ॥ ध्यान धारणा नलगे थळी ॥ विठोबा पहावा उघड्या डोळीं ॥ १ ॥ विठो समाधीचें सुख ॥ पाहतां हरे तहान भूक ॥ २ ॥ नामा ह्मणे न करी कांहीं ॥ चित्त रंगलें हरिचे पायीं ॥ ३ ॥

॥ ३७ ॥ सुखालागीं जरी करिसी तळमळ ॥ तरी तूं पंढरिसी जाय एक वेळ ॥ १ ॥ तेथें अवघाची सुखरूप होसी ॥ जन्मोजन्मीचे श्रम विसरसी ॥ धृ० ॥ चंद्रभागेसी करितां स्नान ॥ तुझे दोष पळती रानोरान ॥ २ ॥ लोटांगण घालोनि महाद्वारीं ॥ कान धरोनी नाच गरूडापरी ॥ ३ ॥ नामा ह्मणे उपमा काय द्यावी ॥ माझ्या विठोबाची इडा पीडा घ्यावी ॥ ४ ॥

॥ ३८ ॥ पैल ते पंढरी पैल ते पंढरी ॥ पांढरीवरी काळी वसवीली ॥ १ ॥ सोवळें हें ब्रम्ह सुनिळ हें ब्रम्ह ॥ विद्युल्लता ब्रम्ह पाहूं चला ॥ २ ॥ नामा म्हणे माझा विठ्ठल हा डोळा ॥ अर्धमात्रे जवळां पाहूं चला ॥ ३ ॥

॥ ३९ ॥ नित्य हे दिवाळी असे पंढरपूरीं ॥ ओंवाळिती नारी विठ्ठलासी ॥ १ ॥ पांवा वाजे वेणु बरविया नादें ॥ विठ्ठल आनंदें नाचतसे ॥ २ ॥ नामा ह्मणे आह्मी पंढरीये जावें ॥ कवतुकें पहावें विठ्ठलासी ॥ ३ ॥



॥ ४० ॥ अवघें तीर्थ तीर्थरूप ॥ परि तें विठ्ठल चरणींचें स्वरूप ॥ विठ्ठल देखिलिया निःपाप ॥ जीवजंतु होताती ॥ १ ॥ एवढें क्षेत्र पांडुरंग ॥ सर्वां तीर्थांमाजी अभंग ॥ धरिलीया संतसंग ॥ माहादोष हरताती ॥ धृ० ॥ हरिकीर्तन करी वेगी ॥ हेंचि उद्धरील जगा लागीं ॥ जें जें सरलें पांडुरंगीं ते ते गेले वैकुंठा ॥ २ ॥ नामा जपे सदा काळीं ॥ राम कृष्णा नामावळी ॥ विठ्ठल विठ्ठल हृदय कमळीं ॥ जपतसें सर्वदा ॥ ३ ॥

॥ ४१ ॥ धन्य पंढरीचे सकळही जन ॥ जिहीं सख्य केलें जाण विठ्ठलपायीं ॥ १ ॥ विठ्ठल हा ध्यानीं विठ्ठल हा मनीं ॥ विठ्ठल चिंतनीं रात्रंदिवस ॥ धृ० ॥ विठ्ठलाविण जया नगमे एक घडी ॥ सर्वस्वें आवडी विठ्ठलाची ॥ २ ॥ विठ्ठलची माता विठ्ठलचि पिता ॥ भगिनी आणि भ्राता विठ्ठल ज्यांचा ॥ ३ ॥ विठ्ठलची मित्र विठ्ठलची पुत्र ॥ विठ्ठल कुळगोत्र केला जिहीं ॥ ४ ॥ विठ्ठलचि क्रिया विठ्ठलची कर्म ॥ विठ्ठल सकळ धर्म कुळदैवत ॥ ५ ॥ गुज गौप्य जीवींचें विठ्ठला सांगावें ॥ विठ्ठलें पुरवावें कोड सांचें ॥ ६ ॥ सर्वकाळ करणें विठ्ठलाची कथा ॥ विठ्ठल जडला चित्ता जयाचिया ॥ ७ ॥ विठ्ठल जागृतीं स्वप्नीं आणि सुषुप्तीं ॥ अखंड बोथरती विठ्ठल विठ्ठल ॥ ८ ॥ ऐसा सर्वस्वेंसी विठ्ठल भजतां ॥ सुख आलें हातां विठ्ठलाचें ॥ ९ ॥ नामा ह्मणे त्याचें चरणरेणु होऊन ॥ झालों मी पावन ह्मणे आतां ॥ १० ॥

॥ ४२ ॥ पंढरीचे जन अवघे पावन ॥ ज्यां जवळी निधान पांडुरंग ॥ १ ॥ विठ्ठलनामें घेणें विठ्ठलनामें देणें ॥ विठ्ठलनामें करणें सकळ काम ॥ धृ० ॥ विठ्ठलनामें क्रिया विठ्ठलनामें कर्म ॥ हाचि प्रिय धर्म जया चित्ता ॥ २ ॥ सबराभरित विठ्ठल मागें पुढें ॥ जिकडे जाती तिकडे विठ्ठलचि ॥ ३ ॥ निरंतर गर्जती विठ्ठल पवाडे ॥ होत निवाडे विठ्ठलरूप ॥ ४ ॥ विठ्ठलनाम सरतें विठ्ठलनाम पुरतें ॥ विठ्ठलनाम ज्यातें भांडवल ॥ ५ ॥ विठ्ठलनामें करिती अवघा योग क्षेम ॥ नित्य ज्याचें प्रेम विठ्ठलनामीं ॥ ६ ॥ सदां हृदयीं भरित विठ्ठलाचें प्रेम ॥ हर्षें विठ्ठलनाम गर्जताती ॥ ७ ॥ विठ्ठलनामीं गोडी धरोनी आवडी ॥ विठ्ठलनामीं बुडी दिल्ही जेणें ॥ ८ ॥ नामा ह्मणे अवघे विठ्ठलचि झालें ॥ विठ्ठलें दिधलें प्रेमसुख ॥ ९ ॥

॥ ४३ ॥ दोन्ही हात ठेवुनि कडां ॥ उभा भिवरेच्या थडां ॥ १ ॥ हरि बरवया बरवया ॥ विठोबा पंढरिच्या राया ॥ २ ॥ नामा ह्मणे वेगी धांवा ॥ देव आले याची गांवा ॥ ३ ॥

॥ ४४ ॥ अवघी हे पंढरी सुखाची मांदुस ॥ माझा स्वप्रकाश रत्न हरी ॥ १ ॥ धन्य संतजन तेथिचे पारखी ॥ ज्यां झाली ओळखी विठ्ठलनामी ॥धृ०॥ अनुभवुनीं चित्तीं पाहिलें विवेकें ॥ धरिलें पुंडलीकें हृदयकमळीं॥२॥ त्रिभुवन खेळण प्रेमाचें कोंदण ॥ करोनि भूषण भोगितसें ॥ ३ ॥ युगें गेलीं परी पालटचि नाहीं ॥ नित्य शुद्ध पाहीं तेजःपुंज ॥ ४ ॥ पाहतां नित्य नवें ध्यातां चित्त निवे ॥ ह्मणोनि नामा जिवें विसंबेना ॥ ५ ॥

॥ ४५ ॥ पितयाची भक्ति पुंडलीकें केली ॥ मात हे ऐकिली देवरायें ॥ नवलक्ष गोधनें पांचसें सवंगडे ॥ राम कृष्ण पुढें चालताती ॥ १ ॥ उठा चला जावों पुंडलीक पाहों ॥ देव ह्मणे भावो पाहों साचा ॥धृ०॥ गोकुळीहूनि देव पंढरपुरा पातला ॥ त्वरित पावला वेणुनादीं ॥ तेथूनि परतला वाळुवंटी आला ॥ तंव देव देखिला पुंडलीकें ॥ २ ॥ देव उभा आहे पुंडलीक पाहे ॥ चतुर्भुज स्वयें देखियेला ॥ देखियेले हरि शंख चक्र करीं ॥ आयुधें तीं च्यारी झळकती ॥ ३ ॥ चतुर्भुज मूर्ति देखियेली दृष्टी ॥ पुंडलिकें ईट टाकियेली ॥ इटेवरी उभा राहिला विठ्ठल ॥ ठसा मिरवला त्रिभुवनीं ॥ ४ ॥ पुंडलिक भाव पाहूं आला देव ॥ प्रसन्न झाले सर्व पुंडलीका ॥ वैकुंठ कैलास आणिल हा येथें ॥ नामा ह्मणे हित झालें आह्मा ॥ ५ ॥

॥ ४६ ॥ पंढरीची वारी जयाचीये कुळीं ॥ त्याची पायधुळी लागो मज ॥ १ ॥ तेणें त्रिभूवनीं होईन सरता ॥ नलगे पुरुषार्था मुक्तिचारी ॥ धृ० ॥ नामाची आवडी प्रेमाचा जिव्हाळा ॥ क्षण जिवा वेगळा नकरीं त्यासी॥२॥ नामा ह्मणे माझा सोयरा जीवलग ॥ सदा पांडुरंग तया जवळी ॥ ३ ॥

॥ ४७ ॥ विठोबाच्या गांवा जाईन धांवोनी ॥ घालीन लोळणी चरणावरी ॥ १ ॥ शिणभाग द्र्वाळिला म्हणेल ॥ जीविंचे पुसेल जडभारी ॥ धृ० ॥ हरुषें लोळत जाईन महाद्वारां ॥ भेटाया सामोरा येईल मज ॥ २ ॥ उचलोनी सीस पुसील आदरें ॥ मुख पीतांबरें पुसिल माझें ॥ ३ ॥ धरोनि हनुवटी उठवील हस्तकीं ॥ ठेवील मस्तकीं अभय कर ॥ ४ ॥ राई रखुमाई माता सत्यभामा ॥ कडे घेऊनि नामा स्तनीं लावी ॥ ५ ॥

॥ ४८ ॥ धांउनियां मिठी घालीन संतचरणीं ॥ सांगेन वचनीं मनिचें गुज ॥ १ ॥ विठोबाचे गांवा न्यारे एकवेळां ॥ फार आहळला जीव माझा ॥ धृ० ॥ आनंदाचें जीवन पाहेन श्रीमुख ॥ शोक मोह दुःख हरती माझे ॥ २ ॥ विटे सहित चरण देईन आलिंगन ॥ तेणें माझी तनु ओल्हा-

वेल ॥ ३ ॥ तुम्ही आवडते हरीचे अंतरंग ॥ माझे जीवलग प्राणसखे ॥ ॥ ४ ॥ नामा म्हणे विठोबा कृपेची माउली ॥ तेव्हां ते साउली करील मज ॥ ५ ॥

॥ ४९ ॥ अरूप रूपासीं आलें ॥ परब्रम्ह ठसावलें ॥ भक्ता पुंडलिका फावलें ॥ गौप्य झालें प्रगट ॥ १ ॥ धन्य धन्य भिवरातट ॥ चंद्रभागा हे निकट ॥ धन्य धन्य वाळुवंट ॥ मुक्तिपेठ पंढरी ॥ धृ० ॥ धन्य धन्य प्रेमळ ॥ सबराभरित स्वानंद जळ ॥ स्नान केलिया निर्मळ ॥ कोटि कुळें उद्धरती ॥ २ ॥ धन्य गा हा देशु ॥ जेथें विठ्ठलें केला रहिवासु ॥ नामा विनवी विष्णुदासु ॥ देइ समरसु भक्तीचा ॥ ३ ॥

॥ ५० ॥ विठ्ठल कानडें बोलूं जाणे ॥ त्याची भाषा पुंडलीक नेणे ॥ १ ॥ युगें अठ्ठावीस झालीं ॥ दोवां नाहीं बोला बोली ॥ धृ० ॥ कर ठेवूनि कटावरी ॥ उभा भिवरेच्या तिरीं ॥ २ ॥ नामा म्हणे स्वामि माझा ॥ उभा भक्तांचिया काजा ॥ ३ ॥

॥ ५१ ॥ एक एकादशी होय पंढरीसी ॥ सुकृताच्या रासी ब्रम्हा नेणे ॥ १ ॥ चंद्रभागेतीरीं चतुर्भुज नरनारी ॥ विठ्ठल कैवारी उभा असे ॥ धृ० ॥ परतून येथें न येसी मागुता ॥ आणिकां सर्वथा ऐसें नाहीं ॥ २ ॥ क्षीरसागरींचें जिव्हार वैकुंठीचें सार ॥ पुंडलीकें उपकार केला लोकां ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्हां थोर लाभ झाला ॥ तापत्रय गेला पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ५२ ॥ दीनाची माउली ॥ आजि म्यां देखिली ॥ कटी ठेवूनिया कर ॥ उभी राहे विटेवर ॥ १ ॥ मुगुट रत्नांचा साजिरा ॥ वरी मोतियांचा तुरा ॥ रूप लावण्य गोजिरें ॥ हृदयीं पदक साजिरें ॥ २ ॥ कासे पिंवळा पीतांबर ॥ चरणीं ब्रिदाचा तोडर ॥ भक्तां कृपेची सावली ॥ नामा वंदी पायधुळी ॥ ३ ॥

॥ ५३ ॥ कृत त्रेता द्वापार कली ॥ ऐसा चौ युगांचा मेळीं ॥ तें महायुग शब्द आढळी ॥ वेदांत शास्त्री ॥ १ ॥ ऐसा ब्रम्हयाचा दिनांतर ॥ तैसीच रात्र एक सहस्र ॥ तिसा दिवसांचा प्रखर ॥ एक मास ॥ धृ० ॥ ऐसे बारा मास ॥ त्याचें एक वरुष ॥ शतभरी आयुष्य ॥ ब्रम्हयाचें ॥ २ ॥ ऐसा ब्रम्हयाचा दिनांत ॥ शत वरुषें गणीत ॥ ज्या प्रळयीं पोहत ॥ मार्कंडेय उदकीं ॥ ३ ॥ ऐसीं अठ्ठावीस युगें जाण ॥ पंढरपुरासी झाली पूर्ण ॥

जो कीं ब्रम्हयाचा दिन ॥ प्रळय केला ॥ ४ ॥ नामा म्हणे पंढरिची संख्या ॥ सांगितली संत महंत लोकां ॥ लक्षूनि पादुका ॥ विठोबाच्या ॥ ५ ॥

॥ ५४ ॥ तंव श्रोते म्हणती विष्णुदासा ॥ ये ब्रम्हदिनांचे प्रळयीं कैसा ॥ पंढरीच्या भासा ॥ नाश कीं नाहीं ॥ १ ॥ तंव नामा ह्मणे सुदर्शनावरी ॥ देवें रचिली पंढरी ॥ भक्तांसहित राज्य करी ॥ रुक्मिणीवर ॥ २ ॥ तो परमात्मा गुणातीत ॥ अपरोक्ष भक्तांसहित ॥ जेथें प्रळय हात जोडीत ॥ जयालागीं ॥ ३ ॥ जैं ब्रह्मयाचें आयुष्य सरे ॥ तैं लया जाय चराचर ॥ तैं मिळे पंढरपुर ॥ वस्तु माजी ॥ ४ ॥ नामा म्हणे ह्या खुणा ॥ कळतील संतजना ॥ इतर मायिकजना ॥ नेणवती ॥ ५ ॥

॥ ५५ ॥ निर्गुणींचें वैभव आलें भक्तिमिषें ॥ तें हें विठ्ठलवेषें ठसावलें ॥ १ ॥ बरविया बरवें पाहतां नित्य नवें ॥ हृदयीं ध्यातां निवे त्रिविधताप ॥ २ ॥ चोवीसां वेगळें सहस्रां आगळें ॥ निर्गुणा निराळें शुद्धबुद्ध ॥ ३ ॥ वेदां मौन पडे श्रुतींसी कां नडे ॥ वर्णितां कुवाडें पुराणांसी ॥ ४ ॥ भावाचें आळुक भुललें भक्तिसुखें ॥ दिधलें पुंडलीकें सांधूनियां ॥ ५ ॥ नामा ह्मणे आह्मां अनाथां लागुनी ॥ निडारले नयनीं वाट पाहें ॥ ६ ॥

॥ ५६ ॥ ज्ञान सत्य मुक्त शुद्धबुद्धयुक्त ॥ कारणा रहित निरंजन ॥ १ ॥ तें आह्मी देखिलें चर्मचक्षुदृष्टी ॥ उभें वाळुवंटीं पंढरीये ॥ २ ॥ स्वरूपाचा निर्धार नेणती पुराणें ॥ शिणलीं दर्शनें धांडोळितां ॥ ३ ॥ परतल्या श्रुती ह्मणती नेति नेति ॥ आह्मा गातां गीतीं सांपडलें ॥ ४ ॥ नामा ह्मणे यासी भावचि कारण ॥ पावावया चरण केशवाचे ॥ ५ ॥

॥ ५७ ॥ देव गुज सांगे पंढरीसी यारे ॥ प्रेमेचित्तीं घ्यारे नाम माझें ॥ १ ॥ काया वाचा मन दृढ धरा जीवीं ॥ सर्व मी चालवीं भार त्यांचा ॥ २ ॥ भवसिंधु तारीन घ्यारे माझी भाक ॥ साक्ष पुंडलीक करुनी बोले ॥ ३ ॥ लटकें जरी असे नामयासी पुसा ॥ आहे त्या भरंवसा नामीं माझ्या ॥ ४ ॥

॥ ५८ ॥ हातीं विणा मुखीं हरी ॥ गाये राउळाभितरीं ॥ १ ॥ अन्न उदक सोडीलें ॥ ध्यान देवाचें लागलें ॥ २ ॥ स्त्री पुत्र बाप माय ॥ यांचा आठव न होय ॥ ३ ॥ देहभाव विसरला ॥ छंद हरीचा लागला ॥ ४ ॥ नामा ह्मणे हेंची देई ॥ तुझे पाय माझे डोयी ॥ ५ ॥

॥ ५९ ॥ काशी हे पंढरी ॥ प्रयाग नीरानृसिंह पुरी ॥ पिंड ठेवा पुष्पवती संगमपद्मावरी ॥ पुर्वज होती चतुर्भूज ॥ १ ॥ सकळ तीर्थे वाराणसी ॥ मध्यानकाळीं येती पंढरीसी ॥ ओंवाळिती विठोबासी ॥ विश्वनाथ ह्मणोनियां ॥ २ ॥ ह्मणउनी वेगीं चला पंढरपुरा ॥ विठोबा रायाच्या नगरा ॥ चंद्रभागा सरोवरा ॥ देव कौतुक पाहती ॥ ३ ॥ वाराणसी मनिकर्णिका ॥ चंद्रभागा पुंडलीका ॥ वाराणसी भागीरथी देखा ॥ पांडुरंगीं भीमरथी ॥ ४ ॥ वाराणसी पंचगंगा ॥ पुष्पवती पांडुरंगा ॥ महा पातकें जाती भंगा ॥ तीर्थे मस्तकीं वंदिल्या ॥ ५ ॥ वाराणसी दंडपाणि ॥ क्षेत्रपाळ हे हनुमंत दोन्ही ॥ सकळ तीर्थं विठोबाचे चरणीं ॥ काशी होय पंढरी ॥ ६ ॥ वाराणसी माधवबिंदू ॥ पांडुरंगीं वेणुनादू ॥ पंचक्रोशी तीर्थ उदंडू ॥ पांडुरंगीं पद्मतीर्थ ॥ ७ ॥ वाराणसी मोक्षपंथा ॥ विठ्ठलाचेनि सायुजता ॥ एवढें तीर्थ त्रिभुवनीं पाहतां ॥ तीर्थ नाहीं यापरतें ॥ ८ ॥ वाराणसी चंद्रमौळी ॥ पांडुरंगीं वनमाळी ॥ विश्वनाथ नंदी जवळी ॥ विठोबा जवळी गरुड असे ॥ ९ ॥ वाराणसी गौरी खुणा ॥ पांडुरंगीं रुक्मिणी जाणा ॥ वाराणसी अन्नपूर्णा । पांडुरंगीं जाणा सत्यभामा ॥ १० ॥ वाराणसी त्रिशुळावरी ॥ सुदर्शनावरी पंढरी ॥ कांहीं संदेह मनीं न धरी ॥ काशी होय पंढरी ॥ ११ ॥ ऐसें सकळ तीर्थांचें माहेर ॥ तीर्थ नाहीं यापरतें थोर ॥ विष्णुदास नामयाचा दातार ॥ पुंडलीकासहित असे ॥ १२ ॥

॥ ६० ॥ काशीराजक्षेत्रीं जुंपिलें आउत ॥ अष्ट धान्यें तेथें पेरियेलीं ॥ १ ॥ मेघःश्यामघोष वर्षे सर्वांधारीं ॥ बीज विटेवरी सासिन्नलें ॥ २ ॥ जगाचें जीवन पंढरी पिकली ॥ चारया सोकली भूतजातें ॥ ३ ॥ घालूनियां माळा रक्षी कळिकाळा ॥ नविटोंविठ्ठला संसारासी ॥ ४ ॥ पाप सोकरण भक्ति हें गोफण ॥ भूस कांडी कण नाम घार्यी ॥ ५ ॥ वेद स्मृति श्रुति ऐसें बोलवितां ॥ गूढ वेगळितां लाभ होती ॥ ६ ॥ नामा ह्मणे स्वामि केशव सूकाळ ॥ अन्नब्रह्मफळ नाम बीज ॥ ७ ॥

॥ ६१ ॥ जाऊं ह्मणतां पंढरी ॥ यम थोर चिंता करी ॥ १ ॥ धरितां पंढरीची वाट ॥ पापें पळालीं सपाट ॥ २ ॥ कळस देखतां नयनीं ॥ होय पातकांची धुणी ॥ ३ ॥ घेतां विठोबाची भेटी ॥ दोष जाती उठाउठी ॥ ४ ॥ करितां चंद्रभागे स्नान ॥ सर्व पापा पडे हान ॥ ५ ॥ नामा ह्मणे रे केशवा ॥ आह्मीकरूं तुझी सेवा ॥ ६ ॥

॥ ६२ ॥ निर्विकल्प निराकारू ॥ निःशून्य निराधारू ॥ निर्गुण अपरंपारु ॥ चिदानंद सांवळें ॥ १ ॥ तया पुंडलिका साठीं ॥ येउनि उभें वाळवंटीं ॥ दोन्ही कर ठेवूनि कटीं ॥ प्रसन्न दृष्टि पाहातसे ॥ २ ॥ ह्मणवूनी उठा घ्यारे वाट ॥ ठाका पंढरी वैकुंठ ॥ येर वावगे काय रे कष्ट ॥ ब्रह्मी भेट पंढरीये ॥ ३ ॥ मूळग्राम मायापुर ॥ पडिले भूत ग्रामाचार ॥ ह्मणऊनी कर जघनावर ॥ उभा राहूनी दावितसे ॥ ४ ॥ विठ्ठल नाम हृदयीं धरा ॥ हाचि उतार पैलपारा ॥ मग नाहीं येरझारा ॥ शंभु कुमार सांगतसे ॥ ५ ॥ भेटी चौघे मुरडले ॥ अठरा धांवतां भागले ॥ पंथीं साहि भांडले ॥ ते अद्यापि बुझले नाहीं ॥ ६ ॥ जो सहस्रा माजी न दिसे ॥ चोविसांत न भासे ॥ दो सहस्र अनारिसे ॥ पाहतां अरे न दिसेचि ॥७॥ लय लक्ष लावूनि समाधि॥ योगियां हेचि उपाधि ॥ उघडा डोळा प्रेमपदीं ॥ रे विठोजी न्याहाळा ॥ ८ ॥ येर वाउगि खटपट ॥ ठाका पंढरी वाळुवंट ॥ हरूनि मनुष्यपणा दृष्ट ॥ चतुर्भुज करिल ॥ ९ ॥ जना ऐहिक पाहरे हित ॥ हें पंढरीचें कुळदैवत ॥ येर वाउगे खेचर भूत ॥ रे संगीत चित्रिचें ॥ १० ॥ पूर्वज उद्धरावयाचि चाड ॥ तरी वेणुनादीं जेवण करा गोड ॥ कोटिकुळें उद्धरती तुमचा सुरवाडु ॥ रे पावाल कैवल्य ॥ ११ ॥ धन्य धन्य तो संसारी ॥ जेणें देखिली पंढरी ॥ जेणें सप्रेम होउनि महाद्वारीं ॥ लोटांगण घातलें ॥ १२ ॥ केलें चंद्रभागे स्नान ॥ आणि संतचरणीं दर्शन ॥ नामघोषें निवे मन ॥ समाधान जीवासी ॥१३॥ पंढरी हे वैकुंठ भुवन ॥ ह्मणउनि करी कांरें दरुषण ॥ मग नाहीं आया गमन ॥ रे सुरगण वंदिती ॥ १४ ॥ भुक्ति मुक्तिचा दातारू ॥ तो हा बोळगा सारंगधरु ॥ नामया स्वामीचा दातारु ॥ रुक्मादेवीवरु पंढरीये ॥ १५ ॥

॥ ६३ ॥ माझें कुळींचें दैवत ॥ बाप माझा पंढरिनाथ ॥ १ ॥ पंढरीसि जाऊं चला ॥ भेटूं रखुमाई विठ्ठला ॥ २ ॥ पुंडलीकें बरवें केलें ॥ कैसें भक्तीनें गोविलें ॥ ३ ॥ नामा ह्मणे नीट ॥ पायीं जडलीसे ईट ॥ ४ ॥

॥ ६४ ॥ केशव आराध्यदेवाचाहि देव ॥ पंढरीचाराव पांडुरंग ॥ १ ॥ पांडुरंगाविण नाहीं त्रिभुवनीं ॥ भोळ्या चक्रपाणि वांचूनिया ॥ २ ॥ नामा म्हणे ध्यानीं ध्यावें विठोबासी ॥ अखंडमानसीं भजा देवा ॥ ३ ॥

॥ ६५ ॥ युक्तिप्रयुक्तिचें प्रमाण मी नेणें ॥ केशवचरण ध्यातों मनीं

॥ १ ॥ आणिक साधन काय म्यां करावें ॥ ब्रह्मादिक देव मौन ठेले ॥ २ ॥ आतां मी कायसा करावा आधार ॥ चरण निर्धार देव पूजा ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझा अंत नाहीं पार ॥ काय म्यां पामर जाणों आतां ॥ ४ ॥

॥ ६६ ॥ ऐका पंढरीचें महिमान ॥ राऊळें तितुकें प्रमाण ॥ तेथील तृण आणि पाषाण ॥ तेहि देव जाणावे ॥ १ ॥ ऐसी पंढरी मनीं ध्याती ॥ त्यांसीं तिहीं लोकीं गति ॥ ते आणिका तीर्था जाती ॥ तीं वंदिती तयांसी ॥ २ ॥ वाराणसी चालिजे मासा ॥ गोदावरी एक दिवसा ॥ पंढरी पाऊल परियेसा ॥ ऐसा ठसा नामाचा ॥ ३ ॥ ऐसें शंकर सांगे ऋषींजवळीं ॥ सकळ तिर्थें माध्यानकाळीं ॥ येऊनि पुंडलीकाजवळी ॥ करिती अंघोळी वंदिती चरण ॥ ४ ॥ ऐसेंनि तिर्थीं पाप झडे ॥ असत्य बोलतां जिव्हा झडे ॥ नामा विनवी संतांपुढें ॥ पंढरी येऊन वोसंडावीं ॥ ५ ॥

॥ ६७ ॥ आधीं रचिली पंढरी ॥ मग वैकुंठ नगरी ॥ १ ॥ जेव्हां नव्हतें चराचर ॥ तैं होतें पंढरपुर ॥ २ ॥ जेव्हां नव्हती गोदा गंगा ॥ तेव्हां होती चंद्रभागा ॥ ३ ॥ चंद्रभागेचे तटीं ॥ धन्य पंढरी गोमटी ॥ ४ ॥ नासिलीया भूमंडळ ॥ उरे पंढरीमंडळ ॥ ५ ॥ असे सुदर्शनावरी ॥ ह्मणूनि अविनाश पंढरी ॥ ६ ॥ नामा ह्मणे बा श्रीहरी ॥ ते म्यां देखिली पंढरी ॥ ७ ॥

॥ ६८ ॥ पांडुरंगाचें नाम बरवें ॥ आवडी घेतली माझ्या जीवें ॥ १ ॥ कैसा देहुडा पाउलीं उभा ॥ वेणुनादीं गोपाळ वेणु वाहे ॥ २ ॥ आंगीं चंदन चर्चित माळा गळां ॥ भाळीं शोभताहे कस्तुरीचा टिळा ॥ ३ ॥ नामा ह्मणे धन्य धन्य जिणें ॥ एकवेळा पंढरी पाहणें ॥ ४ ॥

॥ ६९ ॥ पाहातां देऊळाची पाठ ॥ तीर्थें घडलीं तीनशें साठ ॥ १ ॥ स्नान करितां पन्हाळें ॥ उद्धरती सर्व कुळें ॥ २ ॥ सन्मुख पाहतां विठाई ॥ त्यासी उपमा द्यावया नाहीं ॥ ३ ॥ ऐसा पंढरीचा महिमा ॥ काय वर्णूं म्हणे नामा ॥ ४ ॥

॥ ७० ॥ आवडे जें जीवा तें पंढरिये उभें ॥ पुंडलीकें लोभें राहविलें ॥ १ ॥ जोडूनि पाऊलें ठेवियलीं इटे ॥ करद्वय गोमटें कटावरी ॥ २ ॥ कान मुख डोळे न ह्मणती पुरे ॥ सेवितां न पुरे धणी मना ॥ ३ ॥ गोड

लागे पोट न भरे न धाय ॥ भुकेलीच राहे भूक सदां ॥ ४ ॥ नामाह्मणे संतसंगती विश्वासे ॥ घेऊं अनुभवास फार फार ॥ ५ ॥

॥ ७१ ॥ बाहेरी भितरी पाहतां दिसे एकु ॥ उभा असे व्यापकु पंढरीराव ॥ १ ॥ पंढरीचा राणा विटेवरी जाणा ॥ जीवींचिया खुणा भक्तां सांगे ॥ २ ॥ गुंतलों संसारीं भरलों कर्मभांडारीं ॥ विषयामाझारि मोहियेलें ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवा माझें उणें न पाहीं ॥ चरण सेवा देईं जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

॥ ७२ ॥ दिवाळी दसरा निय पंढरपुरीं ॥ ओंवाळिती नारी विठ्ठलासी ॥ १ ॥ पांवा वाहे खांदीं बरविया नादें ॥ विठ्ठलाच्या छंदें नाचतसे ॥ २ ॥ नामा ह्मणे आह्मीं पंढरीसी जावें ॥ कौतुक पहावें विठ्ठलाचें ॥ ३ ॥

॥ ७३ ॥ अभिमानें लोक जाती वाराणसी ॥ आमुची मिरासी पंढरीये ॥ १ ॥ तीर्थ व्रत नेम मज केशिराजा ॥ पंढरीचा राजा बोळवया ॥ २ ॥ पाउला पाउलीं चालती मारग ॥ उभा पांडुरंग मागें पुढें ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज पंढरी विसांवा ॥ दर्शन केशवा पुरे मज ॥ ४ ॥

॥ ७४ ॥ आम्हीं स्वर्गसुख मानू जैसा ओक ॥ देखोनियां सुख पंढरीचें ॥ १ ॥ नलगे वैकुंठ न वांछूं कैलास ॥ सर्वस्वाची आस देवा पायीं ॥ २ ॥ नलगे संतति आणि धन मान ॥ एकअसे ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥ सत्य कीं मायिक आमुचें बोलणें ॥ तुझी तुज आण सांग हरि ॥ ४ ॥ जीवभाव आम्ही सांडूं ओंवाळुनी ॥ नामा लोटांगणीं महाद्वारीं ॥ ५ ॥

॥ ७५ ॥ अगाध महीमा यात्रा कार्तीकीये ॥ आला पंढरीये नामदेव ॥ १ ॥ भक्ता शिरोमणीं श्रीपंढरिनाथ ॥ कृपाळूवा माता बाळकासी ॥ २ ॥ धन्य नामदेव धन्य नामदेव ॥ हृदयीं पंढरिराव न विसंबे ॥ ३ ॥ प्रेमळ हरिभक्त मिळोनी अपार ॥ करितातीं गजर हरिनामाचा ॥ ४ ॥ नट नाट्य कीर्तन झळकतीं गरुड टके ॥ करिती ब्रह्मादिक पुष्पवृष्टी ॥ ५ ॥ नामघोष श्रवण सकळां समाधान ॥ चुकलें जन्ममरण कल्पकोडी ॥ ६ ॥ नामा ह्मणे जीव निवाला वा येथें ॥ पाहातां विठोबातें श्रम गेला ॥ ७ ॥

॥ ७६ ॥ ऐसें तीर्थ कोणीं दाखवा सुलभ ॥ जेथें समारंभ हरिकथेचा ॥ १ ॥ तें एक पंढरी विख्यात त्रिभुवनीं ॥ सकळां शिरोमणि चंद्रभागा ॥ २ ॥

ऐसें तीर्थ कोणीं दाखवा सुखरूप ॥ जेथें त्रिविधताप हारपती ॥ ३ ॥ ऐसें तीर्थ कोणीं दाखवा सुंदर ॥ गरुड टकेभार विराजती ॥ ४ ॥ ऐसें तीर्थ कोणीं दाखवा निर्मळ ॥ जेथें नासे मळ दुष्टबुद्धि ॥ ५ ॥ नामा म्हणे संतजनाचें माहेर ॥ गातां मनोहर गोड वाटे ॥ ६ ॥

॥ ७७ ॥ कार्तिकी एकादशी ॥ पोहा मिळाला पंढरिसी ॥ तेथील महिमा वर्णू कैसी ॥ ब्रह्मादिकां न वर्णवे ॥ १ ॥ दिंड्या गरुड टक्यांचे भार ॥ मृदंग वाजती अपार ॥ वैष्णव नाचती जयजयकार ॥ नादें अंबर गर्जतसे ॥ २ ॥ उपजोनिया संसारी ॥ वेळोवेळां पाहारे पंढरी ॥ विठ्ठलराज भीमा तीरीं ॥ वाट पाहे भक्तांची ॥ ३ ॥ कल्पतरु चिंतामणी ॥ घरीं कामधेनूची दुभणी ॥ मोतियांचे चौक राजांगणीं ॥ वृंदावनें शोभती ॥ ४ ॥ संत बैसले पद्मासनीं ॥ राया विठ्ठला तुझे चरण ध्यानीं ॥ हरिकीर्तन ऐकोनी कानीं ॥ अंतःकरणीं निवाले ॥ ५ ॥ जें जें चिंतन मानसीं ॥ तें फळ पावलें अहर्निशीं ॥ मुक्ति देऊनि तयासी ॥ अढळपदीं बैसविलें ॥ ६ ॥ सकळ तीर्थें मध्यानकाळीं । येती चंद्रभागे जवळी ॥ विमानें येती अंतराळीं ॥ देव स्नानें करिताती ॥ ७ ॥ धन्य धन्य ऐसें चंद्रभागातीर्थ ॥ तेथें चतुर्भूज होती प्राणिमात्र ॥ ऐसें आणिक नाहीं क्षेत्र ॥ भू वैकुंठ पंढरी ॥ ८ ॥ मणिकर्णि वैतरणी ॥ स्नान करिजेली अंतःकरणीं ॥ लीन होईल विठ्ठल चरणीं ॥ पायाधुणी होईल ॥ ९ ॥ अनंत जन्मांचा उपाव ॥ नामया स्वामि पंढरीराव ॥ देईल वैकुंठीं ठाव ॥ पुनर्जन्म चुकवील ॥ १० ॥

॥ ७८ ॥ तूं जाऊं नको जेथें तेथें ॥ जरी तुज मुक्तीचें आर्तें ॥ तुज मी सांगेन हित ॥ देऊनि चित्तपरियेसें ॥ १ ॥ शंभु अडसष्टी तीर्थांचें माहेर ॥ सकळ सिद्धि ऋषीश्वर ॥ मध्यान्हकाळीं सुरवर ॥ पंढरपूर ठाकती ॥ २ ॥ जाई जाई आलियारे ॥ पांडुरंगी राहें स्थिर रे ॥ न लगती आणिक दैवतें रे ॥ एक पुरे विठ्ठलची ॥ ३ ॥ तीर्थ क्षेत्र दैवतें ॥ ऐसें नाहीं जेथें तेथें ॥ तिन्ही सर्वोत्तम जेथें ॥ तें पैं क्षेत्र सांगेन ॥ ४ ॥ श्रीहरीच्या चोविस मुर्ति ॥ विठ्ठल प्रेमदृष्टीं प्रीति ॥ सहस्र नामांवरती कीर्ति ॥ विठ्ठल दैवत जाणावें ॥ ५ ॥ रुद्रार्धांगी गौरी ॥ जान्हवी असे शिरीं ॥ सर्वांग व्यापिनी भीमा सुंदरी ॥ आले त्रिपुरारी ठाकोनी ॥ ६ ॥ कोटिजन्माचें पातक ॥ नासे स्नान केलिया देख ॥ एवढें क्षेत्र अलौकिक ॥ पांडुरंग भींवरा ॥ ७ ॥ काशीं त्यागिजे शरीर ॥ हिंवें शिणलें केदार ॥

पाणी गोमतीचें क्षार ॥ म्हणवोनि महिमा सम नाहीं ॥ ८ ॥ जन्म मरणावेगळें ॥ वैकुंठ तुकिलें सगळें ॥ परि त्याहुनि आगळें ॥ एक अक्षर जाणावें ॥ ९ ॥ गया भोंवुनी चौदापदीं ॥ तीं अनंतें वेणुनादीं ॥ काला केला गोविंदीं ॥ हा दृष्टांत पहा पां ॥ १० ॥ ज्याचेंनि नांवें पिंडदान ॥ त्यासी गयेसी गति जाण ॥ येथें करितां नाम स्मरण ॥ सर्व पूर्वजां मुक्ति ॥ ११ ॥ कार्तीकीये आदित्यवारीं ॥ जो पद्माला स्नानकरी ॥ त्यासीं नाहीं येरझारी ॥ नये पुढती संसारा ॥ १२ ॥ इंद्र येवढे परमेष्टि ॥ तेथें मनुष्यांच्या काय गोष्टी ॥ धन्य धन्य तो एक सृष्टी ॥ पंढरी दृष्टीं जो देखे ॥ १३ ॥ बरवें पुंडलीकें केलें ॥ हें परब्रह्म रे अर्चिलें ॥ जगांत शांतवन केलें ॥ परि नेटकें सर्वथा ॥ १४ ॥ तीर्थ सोपारें सधर ॥ कष्ट न लगती अपार ॥ उपवासी निराहार ॥ कीं क्षौर करणेंचि नलगे ॥ १५ ॥ येथें सुखें येणें जाणें ॥ घेणें नलगे धरणें । मनींचें मनोरथ पुरवणें ॥ एके भेटीसाठीं ॥ १६ ॥ पूर्वजन्मींचा तापसी ॥ तीर्थें केलीं पुण्यराशी ॥ सहस्र शतें भोजनासी ॥ देवां द्विजां भजिन्नला ॥ १७ ॥ शाळिग्रामाची पूजा करी ॥ त्यासी प्रसन्न झाले हरि ॥ त्यासी दावितो पंढरी ॥ पूर्व संस्कारें म्हणोनियां ॥ १८ ॥ जयासी नावडे पंढरी ॥ तो पापिया दुराचारी ॥ उपजोनियां संसारीं ॥ येरझारीं शिणतो ॥ १९ ॥ त्यासी श्वान सूकर हांसती ॥ म्हणती यासीं कैसी पडली भ्रांति ॥ उपजोनियां मनुष्ययातीं ॥ पंढरपूर पति नोळखे ॥ २० ॥ जो विन्मुख पंढरपुरा ॥ त्याचा संग क्षणीं धरा ॥ मोडोनि सुकृताचा थारा ॥ पाप शरीरासी तो गेला ॥ ॥ २१ ॥ जो पंढरीसी आर्तु ॥ त्याची करा बरवी मातु ॥ अंतकाळीं पंढरीनाथु ॥ यमपंथु चुकवील ॥ २२ ॥ बरवें समतुल्य वाळुवंट ॥ वरी वैष्णव मिळाले घनदाट ॥ करिती हरिनामाचे बोभाट ॥ वीर उद्भट विठ्ठ-लाचे ॥ २३ ॥ जे येथें प्रेमासी आतुर ॥ ते चतुर्भुज होती नर ॥ येवढें क्षेत्र पंढरपुर ॥ महिमा थोर तिहीं लोकीं ॥ २४ ॥ अन्य क्षेत्रीं पाप कीजे ॥ तें पुण्य क्षेत्रीं विनसिजे ॥ पुण्य क्षेत्रीं पाप किजे ॥ तें त्यागिजे पंढरीसी ॥ ॥ २५ ॥ पंढरीचें पातक ॥ पंढरीस नासे देख ॥ एवढें क्षेत्र अलौकिक ॥ त्रिभुवनामाझारि ॥ २६ ॥ पैल इटेवरी सांवळा ॥ विठोबा पहा पहा रे डोळां ॥ विघ्न घालोनि पायातळा ॥ आणिक कलिकाळा दमेना ॥ २७ ॥ जप तप अनुष्ठान ॥ नलगे जीवासी रे बंधन ॥ आणिक न करावें साधन ॥ पहावे चरण विठोबाचे ॥ २८ ॥ देवा सांगे वसुंधरा ॥ मी नभियें सप्तसागरा ॥ स्थावर जंगमादि सारा ॥ नाहीं भार तयाचा ॥ २९ ॥ ज्यासी नावडे

विठ्ठल वीरु ॥ साचा मज भार थोरु ॥ सासी नरकीं होय थारु ॥ तो असुर प्राणिया ॥ ३० ॥ ऐसा हा पंढरपुरपति ॥ जीवंतु असतां देतो मुक्ति ॥ मेलिया देतो ब्रह्मप्राप्ति ॥ दोहींकडे सौरस ॥ ३१ ॥ येरां प्राणियां कष्ट थोर ॥ परि तें न भरे उदर ॥ मेलिया यम किंकर ॥ अष्टौप्रहर जाचिती ॥ ३२ ॥ ऐसा हा कैलासींचा राणा ॥ गिरीजे स्कंदा सांगे खुणा ॥ तुह्मीं आणिक मंत्र नेणा ॥ या पांडुरंगावांचुनी ॥ ३३ ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणतां ॥ तुटती महापातकचळथा ॥ विष्णुदास नामा विनवी संतां ॥ सावधान व्हा जी ह्मणतसे ॥ ३४ ॥

॥ ७९ ॥ वैकुंठासी आम्हां नको धाडूं हरी ॥ वास दे पंढरी सर्वकाळ ॥ १ ॥ वैकुंठ कोपट जुनाट झोंपडी ॥ नको अडा अडी घालूं आम्हां ॥ २ ॥ वैकुंठी जाऊनि काय बा करावें ॥ उगेंचि बैसावें मौनरूप ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज येथेंच हो ठेवी ॥ वास सदा देई चरणाजवळी ॥ ४ ॥

॥ ८० ॥ नित्य प्रेमाचें पेटें बांधे माझे पोटीं ॥ उतरी जगजेठि पैलपार ॥ १ ॥ निरेभिवरे ऐक्य तीरीं ॥ कां पक्षळा पंढरपुरीं ॥ २ ॥ केलिया रविवारीं आंघोळी ॥ महा दोषां होय होळी ॥ ३ ॥ पाप जाईचें ॥ पद पावाल अच्युताचें ॥ ४ ॥ ह्मणाल बोलणें कोणाचें ॥ नामया स्वामि केशवाचें ॥ ५ ॥

॥ ८१ ॥ पंढरीस करी नित्य ते दिवाळी ॥ आरति ओंवाळी केशवासी ॥ १ ॥ पावावया भेटि बरव्या विनोदें ॥ नामघोष छंदें नाचतसे ॥ २ ॥ नामा ह्मणे आह्मीं पंढरिसी जाऊं ॥ कवतुकें पाहूं विठोबासी ॥ ३ ॥

॥ ८२ ॥ झळकती पताका ॥ कळस दिसतो नेटका ॥ १ ॥ बरवें बरवें पंढरपुर ॥ विठोबा रायाचें नगर ॥ २ ॥ अरे हें माहेर संताचें ॥ नामया स्वामि केशवाचें ॥ ३ ॥

॥ ८३ ॥ देहीं देखीली पंढरी ॥ आत्मा अविनाश विटेवरी ॥ १ ॥ तोचि पांडुरंग जाणा ॥ शांती रुक्मीणी अंगणा ॥ २ ॥ जितुका आकार तितुका नाश ॥ आत्मा विठ्ठल अविनाश ॥ ३ ॥ तो हा विठ्ठल ह्रदयीं ध्यांई ॥ चोखामेळा लागे पायीं ॥ ४ ॥

॥ ८४ ॥ पंढरीच्या सुखें आनंदें गर्जती ॥ ध्यातसे पार्वती अखंडित ॥ ॥ १ ॥ भीमातीरीं उभा सखा पांडुरंग ॥ देई अंगसंग अखंडित ॥ २ ॥ उशीर झालासे काय कामकाजा ॥ यावें अधोक्षजा अनिरुद्धा ॥ ३ ॥ नामा ह्मणे पहा पंढरी माझारीं ॥ केशिराज तारी एकसरां ॥ ४ ॥

॥ ८५ ॥ अनिर्वाच्य ब्रह्म निगम ह्मणती ॥ शिणले वेवादति अठरा-
साही ॥१॥ तें हें पुंडलीकें चोहोंटा उभें केलें ॥ भावें भुलविलें पंढरीये ॥ धृ० ॥
घ्यारे घ्यारे तुह्मी कैवल्याचें पीक ॥ देतो पुंडलीक सकळ जीवां ॥ २ ॥
उपनिषदांचें मथितार्थ जें साराचें यथार्थ ॥ तो हा पंढरीनाथ प्रगट
जगीं ॥ ३ ॥ हरिहर विरंचि त्रिमूर्ति हाची ॥ माउली दीनांची लोभा
पर ॥ ४ ॥ जो श्रवणांचा श्रवण नयनांचा नयन ॥ ज्ञानाचा दर्पण
दृष्ट होय ॥ ५ ॥ आदि मध्यें अंतीं व्यापक सर्वांभूतीं ॥ तोहा झाला
व्यक्ति भक्तिभावें ॥ ६ ॥ सदा चित्ता आनंदघन परिपूर्ण ॥ कारणें
महा कारण प्रभा हेचि ॥ ७ ॥ चित्ता चेतविता बुद्धीतें पाळिता ॥ मनादि
चाळिता इंद्रीयांसी ॥ ८ ॥ तो या चराचरां जीवलग सोइरा ॥ ह्मणोनी
अनुसरा पांडुरंगा ॥ ९ ॥ नामा ह्मणे काया वाचा मनें त्याचें ॥ नाम
जपा कैचें जन्म मरण ॥ १० ॥







---

## देवाची स्तुती.

॥ ८६ ॥ देहुडा चरण वाहातुसे वेणु ॥ गोपिकारमणु स्वामि माझा ॥
॥ १ ॥ देखिलागे माय यमुनेचे तीरीं ॥ हात खांद्यावरी राधिकेच्या ॥ २ ॥
गुंजावर्ण डोळे शिरीं बाबर झोटी ॥ मयूर पिच्छ वेष्टी शोभतसे ॥ ३ ॥
सगुण मेघश्याम लावण्य सुंदर ॥ नामया दातार केशवराज ॥ ४ ॥

॥ ८७ ॥ संतांची विश्रांति ज्ञानियांचें गूज ॥ मुक्तिचें हें बीज मोक्षदानीं
॥ १ ॥ कृष्णा विष्णु हरी मुकुंद मुरारी ॥ अच्युता नरहरी नारा-
यणा ॥ २ ॥ गोवर्धनधर गोपी मनोहर ॥ भक्त करुणाकर पांडु-
रंग ॥ ३ ॥ तूंचि हें सकळ आदि मध्य अंतीं ॥ निज सुख संपत्ति
सज्जनांची ॥ ४ ॥ सकळ नारायण पातकभंजन ॥ हरि जगज्जीवन पर-
मानंद ॥ ५ ॥ तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता ॥ तूंचि घेता देता प्रेम-
सूख ॥ ६ ॥ नामदेव ऐसें नाम त्वां ठेविलें ॥ येणें अनुभविलें प्रेम
सूख ॥ ७ ॥ विष्णुदास नामा विनवि पुरुषोत्तमा ॥ सोडवीं भवभ्रमा
पासोनियां ॥ ८ ॥

॥ ८८ ॥ बरवेपणें बरवा बाप मदनाचा ॥ तो स्वामि आमुचा पंढ-
रिराव ॥ १ ॥ उदारपणें उदार दाता त्रैलोक्याचा ॥ तो स्वामि० ॥ धृ० ॥

झुंझार आणि शूर अरी त्या दैत्यांचा ॥ तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ २ ॥ चतुरपणें चतुर बाप ब्रह्मयाचा ॥ तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ ॥ ३ ॥ पवित्रपणें पवित्र उद्धार तीर्थांचा ॥ तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ ४ ॥ नामा ह्मणे आधार सकळां जीवांचा ॥ तो स्वामि आमुचा पंढरिराव ॥ ५ ॥

॥ ८९ ॥ ज्ञानि यांचें ज्ञेय ध्यानि यांचें ध्येय ॥ पुंडलिकाचें प्रिय सुख वस्तु ॥ १ ॥ तें हें समचरण उभें विटेवरी ॥ पहा भीमातीरीं विठ्ठल रूप ॥ धृ० ॥ जें तपस्वियांचें तप जें जपकांचें जाप्य ॥ योगियांचें गौप्य परम धाम ॥ २ ॥ जें तेजकांचें तेज जें गुरु मंत्राचें गुज ॥ जें पुजकांचें पूज्य कुळदैवत ॥ ३ ॥ जें जीवनातें जीववितें पवनातें निववीतें ॥ जें भक्तांचें उगवितें माया जाळ ॥ ४ ॥ नामा ह्मणे तें सुखची आयतें ॥ जोडलें पुंडलिकातें भाग्य योगें ॥ ५ ॥

॥ ९० ॥ आषाढी कार्तिकी हेचि आह्मां सुगी ॥ शोभा पांडुरंगी घनवटे ॥ १ ॥ संतांचीं दर्शनें हेंचि पीक जाण ॥ देतां आलिंगन देहनिवे ॥ धृ० ॥ देहनिवे किती नवल सांगावें ॥ जीवासी दुणावे ब्रह्मानंद ॥ २ ॥ नामा ह्मणे यासी मूळ पांडुरंग ॥ त्याचेनि अव्यंग सुख आह्मां ॥ ३ ॥

॥ ९१ ॥ येत येत उभा राजबिदीं ॥ सवें चाले गोपाळांची मांदी ॥ नारी पाहती उभया बिदी ॥ एकीच्या धरूनि बाहुवा खांदीं ॥ १ ॥ हरि हर नंदना सादृश्य लोचना ॥ डोळ्या वेगळा न वा जासी कान्हां ॥ अरे कान्हां मन मोहना ॥ गोपी भुलल्या तुझिया गुणा ॥ धृ० ॥ चतुर्वेद नागवी भाट सांगातें ॥ उभया वर्णिती रामकृष्णातें ॥ श्रुति स्मृति विद्यावंतें ॥ जय जय ह्मणती कृपा निधितें ॥ २ ॥ येत येत उभा राहत ॥ सुदाम्याच्या खांद्यावरी हात ॥ समदृष्टी गोपिका न्याहाळीत ॥ चैतन्य चोरोनी आनंदें डुल्लत ॥ ३ ॥ ऐसा कृष्ण सौभाग्य सुंदर ॥ लावण्य गुण रत्नाकर ॥ विष्णुदास नामयाचा दातार ॥ भक्ति भावें वोळंगा सारंगधर ॥ ४ ॥

॥ ९२ ॥ देवा तूं जया होसी प्रसन्न ॥ तया नलगे कर्मबंधन ॥ निकें ह्मणती सकळ जन ॥ नीच लोक वंदिती ॥ १ ॥ तुझी दृष्टि कृपावंता ॥ जया वरी पडे अनाथनाथा ॥ तया न बाधी संसार व्यथा ॥

सर्वस्व त्याचे हारिसी ॥ धृ० ॥ मातीं धरिल्या होय कनक ॥ भोग भोगिती परम मूर्ख ॥ नाडळती महादोष ॥ मुखीं नाम गर्जतां ॥ २ ॥ धन्य धन्य ते संसारी ॥ पुरुष अथवा हो नारी ॥ दरिद्र नाहीं त्यांचे घरीं ॥ तूं श्रीहरि सानकूळ झालिया ॥ ३ ॥ ऋद्धि सिद्धी द्वारीं वोळंगती ॥ वैरी दास्यत्व करिती ॥ विषें अमृतें होती ॥ तूं श्रीपति सानुकूल झालिया ॥ ४ ॥ येथूनि नेसील परतें ॥ नामा ह्मणे वैकुंठातें ॥ लक्षा नये चहुं वेदां तें ॥ नाना मतें धुंडाळितां ॥ ५ ॥

॥ ९३ ॥ अंगाची सेज फणि छाया धरी ॥ सहस्रमुखीं करी स्तुति शेष ॥ परि तयांतें तुझें चरित्र आकळीत ॥ तेथें माझें गीत कोणीकडे ॥ १॥ कैशापरी तुज ध्यावे देव देवा ॥ हें वर्म केशवा सांग मज ॥धृ०॥ मार्कंडेयो भृशुंडि लोमहर्ष अगस्ति ॥ करितां तुझी स्तुति कल्प गेले ॥ ध्यानीं पाहतां तुज न पवती योगी ॥ तेथें मी तो रोगी कोणीकडे ॥ २ ॥ ब्रह्मचर्यवृत आचरती देव ॥ ऋषिमुनि सर्व करिती सेवा ॥ परि तुवां गर्व हरिला तयांचा ॥ तेथें माझि वाचा कोणीकडे ॥ ३ ॥ इतुकें ऐकोनि बोले केशिराज खुणें ॥ आरुता येई ह्मणे नामयासी ॥ मुखीं माझें नाम हृदयीं धरुनी प्रेम ॥ हेंचि तुज वर्म सांगितलें ॥ ४ ॥

॥ ९४ ॥ प्रल्हादादिकांचें अंतरींचें ध्यान ॥ तें पंढरीये निधान उभें असे ॥ १ ॥ सर्व जन जया नेणते जाहले ॥ सुख दाखविलें पुंडलीका ॥ २ ॥ वेदांचें जें सार श्रुतींचें जिव्हार ॥ तेंचि कटीं कर उभें असे ॥ ३ ॥ ज्ञानाचें जीवन वैराग्या भूषण ॥ तें सुख निधान विटेवरी ॥ ४ ॥ शुद्ध बुद्ध मुक्त समाधीचें सुख ॥ तें उभें प्रत्यक्ष वाळवंटीं ॥ ५ ॥ हृदयीं धरुनी नामा निज बोधें निमाला ॥ शिण हारपला संसाराचा ॥ ६ ॥

॥ ९५ ॥ अणिमादि सिद्धि जयाचिया दासी ॥ उणें तया पासीं काय आहे ॥१॥ आणिकाचे द्वारीं सांडोवा पै होसी ॥ धिग धिग न लाजसी अरे जना ॥ २ ॥ सुलभ सोपारा सेवा माझा स्वामि ॥ म्हणतां जोडे नामीं एक वाचे ॥ ३ ॥ अजामेळ वैकुंठा एक नेला नामें ॥ गणिका विमानें स्वयें नेली ॥ ४ ॥ ऐसा हा कृपाळू आसनीं शयनीं ॥ नविसंबावा मनीं भाग्यवंतीं ॥ ५ ॥ जटायु पक्षियाचें स्वयें झाला लेकरूं ॥ त्याचा क्रियापारु केला रामें ॥ ६ ॥ शबरीचीं फळें उच्छिष्टेंही खाय ॥ ना विसरती पाय कैसे प्राणी ॥ ७ ॥ शाहाणिया द्वारपाळ म्हणतां लाज थोरी ॥ जरी झाला

भिकारी न साहे ॥ ८ ॥ तो बळीचा द्वारपाळू सारथी पार्थाचा ॥ तो गोसावी आमुचा देवराणा ॥ ९ ॥ गर्भवास तया न होती रे जना ॥ म्हणोनि लोक भजना प्रवर्तले ॥ १० ॥ अंबऋषीराया सांपडले सायासें ॥ साहिला गर्भवास सकळ देवें ॥ ११ ॥ उच्छिष्ट हें खातां प्रायश्चित असे ॥ तो गोपाळाचे कैसें खाय हरी ॥ १२ ॥ या सुखा सुरवर जन्म इच्छिताती ॥ म्यां ऐसा लक्ष्मीपति कां न सेवावा ॥ १३ ॥ म्हणोनि सोइरा आन दुजा नाहीं ॥ गुरु पिता पाहीं हाचि बंधु ॥ १४ ॥ सज्जन सांगती अनेक नाहीं आम्हां ॥ कीर्ति वर्णी नामा होउनि भाट ॥ १५ ॥

॥ ९६ ॥ चंदनाची ओवरी उदविली प्रकारीं ॥ कनकाचा मंचक शेजे सुमनें वरी ॥ १ ॥ ओंवाळूं आलिया शेजे आरति ॥ निद्रा करीं बापा लक्ष्मीपती ॥ धृ० ॥ संतसनकादिक यांतें आज्ञा दिजे ॥ शुकादिक ज्ञानि यांचा नमस्कार दिजे ॥ २ ॥ बाळा प्रौढा मुग्धा यातें आज्ञा दिजे ॥ सेवका माझे गाणनें पहुडविजे ॥ ३ ॥ विष्णुदास नामा राहिला द्वारां नेंहटी ॥ जयजयकार करित देतसे घिरटी ॥ ४ ॥

॥ ९७ ॥ धर्माचें नगर ज्याचें विठो पाटील नाम साचें ॥ चला जाऊं तया ठाया भोजन देईल तो साचें ॥ १ ॥ विठोबाचा धर्म जागो याचे चरणीं लक्ष लागो गा ॥ ज्याचे मोडले पंख पाय तेणें करावें तें काय ॥ धृ० ॥ चित्तीं धरोनि दृढ भाव तेणें पंढरीसी जावें ॥ इच्छिलें फळ पावे तेणें येउनी भेटावें गा ॥ २ ॥ भक्ति आणि भावार्थाचा जेणें गुंफियेला शेला ॥ विठोबा दातयाचा घरा उचित तो नेला ॥ उशीर नलगतां जन्मा वेगळा पैं केला गा ॥ ३ ॥ सुदामा ब्राह्मण कैसा दारिद्रें पीडिला ॥ विठोबा दातयाचा घरा भेटीस गेला ॥ मुष्टिभर पोह्यांसाठीं सुवर्णाचा गांव दिल्हा गा ॥ ४ ॥ गण आणि गोत्रज सोयरे हांसती मज ॥ गेलें याचें मनुष्यपण येणें सांडियेली लाज ॥ विनवी तो शिंपी नामा संत चरणीचा रजगा ॥ ५ ॥

॥ ९८ ॥ बरवि कामधेनु गाय ॥ विठोबा आमुची माय ॥ १ ॥ त्रैलोक्या एवढा भरणा ॥ तीचा भरोनि उरला पान्हा ॥ धृ० ॥ न साहे अहंकाराचा वारा ॥ रिघे दिवसा माझ्या घरा ॥ २ ॥ आह्मी घालूं इसी चारा ॥ परि ते अखंड भरिते डेरा ॥ ३ ॥ नामा ह्मणे दुभतें ॥ बापें जोडोनि ठेविलें मातें ॥ ४ ॥

॥ ९९ ॥ अधरींचें अमृत सेविसी एकलारे ॥ काय पुण्य केलें रे नेणो पवया ॥ १ ॥ तुळसीच्या माळा शोभति गोपाळा ॥ तयाहूनि आगळा पवया तूं ॥ ध्रु० ॥ सोळासहस्र गोपी बोलतील मौढी ॥ अधरींची गोडी नेली तुवां ॥ २ ॥ विष्णुदास नामा केशवीं सौरस ॥ उद्धरिला वंश पावया तुवां ॥ ३ ॥

॥ १०० ॥ अगणित गुणवर्णिती पुराणें ॥ पंढरीचेराणे ख्याती जगीं ॥ १ ॥ अलक्ष भेटी लक्षिताची नाहीं ॥ पुंडलिकें कांहीं तप केलें ॥ ॥ २ ॥ युगें गेलीं अठ्ठावीस ते अझुनी ॥ उभा चक्रपाणी राहिलासी ॥ ॥ ३ ॥ वेद ह्मणती नेति पुराणें तें किती ॥ भांबावल्या मती ह्मणें नामा ॥ ४ ॥



॥ १०१ ॥ नाम बरवें रूप बरवें ॥ दर्शन बरवें कानडिया ॥ १ ॥ वेदांसीं कानडें श्रुतिसीं कानडें ॥ परब्रह्म उघडें पंढरीये ॥ २ ॥ नामा ह्मणे विठो त्रिभुवन बरवें ॥ त्याहूनि बरवें प्रेम तुझें ॥ ३ ॥

॥ १०२ ॥ भक्तांसाठीं देव अवतार धरी ॥ कृपाळू श्रीहरि साच खरा ॥ १ ॥ तो हा महाराज चंद्रभागे तीरीं ॥ उभा विटेवरी पांडुरंग ॥ २ ॥ ब्रह्मयाचे वेद चोरी शंखासुर ॥ मत्स्य अवतार तयालागीं ॥ ॥ ३ ॥ समुद्र मंथनीं मंदर बुडाला ॥ कूर्मरूप झाला तया तळीं ॥ ४ ॥ हिराण्याक्ष धरा नेतां रसातळा ॥ वराहरूपें त्याला वधियेलें ॥ ५ ॥ प्रल्हादासी पिता गांजी नानापरी ॥ स्तंभीं नरहरी प्रगटला ॥ ६ ॥ देवकाजीं झाला वामन भूतळीं ॥ बळीसी पाताळीं घातियेला ॥ ७ ॥ भूमिभार झाला क्षत्रियांचें कुळ ॥ केलेंसें निर्मूळ परशुरामें ॥ ८ ॥ सीतेचिया काजा रावण मर्दिला ॥ सूर्यवंशीं झाला रामचंद्र ॥ ९ ॥ गोकुळीं जन्मला श्रीकृष्ण आठवा ॥ होऊनि पांडवां साह्यकारी ॥ १० ॥ व्रतभंगासाठीं बौद्ध अवतार ॥ झाला दिगंबर अवनिये ॥ ११ ॥ कलंकि अवतार होणार श्रीहरि ॥ तेव्हां पृथ्वीवरी तृण न उरे ॥ १२ ॥ नामा ह्मणे तुझे अनंत अवतार ॥ तेथें मी पामर काय वर्णू ॥ १३ ॥

॥ १०३ ॥ विठ्ठल माउली कृपेचि सावली ॥ आठवितां घाली प्रेम पान्हा ॥ १ ॥ न सांगतां सर्व जाणे तान्ह भूक ॥ जवळी व्यापक न विसंबे ॥ २ ॥ माया मोह कैसा करावा सर्वथा ॥ अंतरींची व्यथा तोचि जाणे ॥ ३ ॥ सुखशांति रूपें लेवविलीं अंगीं ॥ लागों नेदी धगी संसा-

राची ॥ ४ ॥ देऊनि अभय करें कुरवाळी ॥ करित सावली पितांबरें ॥ ५ ॥ मुखीं नाम माळा कीर्तन श्रवणीं ॥ लेवविलीं लेणीं नवविध ॥ ६ ॥ नयनीं अंजन सूदलें सांवळें ॥ समधान झालें सर्व अंग ॥ ७ ॥ अच्युत अनंत सुवर्णाची पेटी ॥ घातलीसे कंठीं निर्विकार ॥ ८ ॥ चतुर्भुज शोभा रूप मध्यें मणि ॥ प्रभा त्रिभुवनीं विराजित ॥ ९ ॥ मुक्तलग शुद्ध बिंदुली गोजिरीं ॥ पद्महस्त शिरीं स्थापितसे ॥ १० ॥ संतपाय रज कपाळीं टिळका ॥ नाहीं भय शंका कळिकाळा ॥ ११ ॥ सगुण साजिरा कटीं कडदोरा ॥ अवर्ण दुर्भरा दृढबोधू ॥ १२ ॥ काम क्रोधादिक करूनि पुतळे ॥ पाय जे घातले पायवाट ॥ १३ ॥ वासनेची दृष्टि लागेल या झणीं ॥ उभा चक्रपाणि मागें पुढें ॥ १४ ॥ संतपायीं नामा शृंगार मंडितु ॥ अखंड क्रीडतु महाद्वारीं ॥ १५ ॥

॥ १०४ ॥ वाळवंटीं उभा करें कुरवाळिल ॥ जीवींचें पुसेल जडभारी ॥ १ ॥ हरुषें लोळणी घालूं महाद्वारीं ॥ येईल समोरी केशिराज ॥ २ ॥ शोभतसे पायीं भक्त ब्रिदावळी ॥ जीवासी सांभाळी दीनानाथ ॥ ३ ॥ माझा अभिमान धरून मानसीं ॥ नामा ह्मणे होसी भक्तां साह्य ॥ ४ ॥

॥ १०५ ॥ गोकुळीं गोपिका गोपाळसकळ ॥ मध्यें घननीळ क्रीडा करी ॥ १ ॥ करी खेळ मोठा स्थापिलें निशाण ॥ स्वयें नारायण हाका मारी ॥ २ ॥ मारियेला कंस दुर्घट दुर्जना ॥ पुरवी वासना पांडवांची ॥ ३ ॥ पांडवांचें ध्यान धरूनि अंतरीं ॥ नामा ह्मणे हरि साह्यकरी ॥ ४ ॥

॥ १०६ ॥ विश्वाच्या मोहना कपट नाटका ॥ पंढरीनायका पांडुरंगा ॥ १ ॥ अवतार धरुनि होउनी निमित्त ॥ बुजविसी दैत्यसर्पखाणी ॥ २ ॥ गोपिकांचे घरीं कामासी लंपट ॥ करिसी धीट गवळियांसी ॥ ३ ॥ भाव अभावाचा न करी कंटाळा ॥ दावि बाळलीला ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ १०७ ॥ उपमन्युबाळा स्थापी क्षीरसिंधु ॥ अनाथाचा बंधू नारायण ॥१॥ तुझें नाम मुखीं जपे सर्वकाळ ॥ दिधलें अढळपद त्यासी ॥२॥ अनेक वृत्तांत काय सांगों देवा ॥ अन्याय केशवा कोण मानी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तैसें मी नाहीं मागत ॥ ऐकोनियां मात आलों जन्मा ॥ ४ ॥

॥ १०८ ॥ चारी वेद गात जयासी अखंड ॥ नेणवे प्रचंड कीर्ति ज्याची ॥ १ ॥ तोचि भीमा तीरीं उभा दिगंबर ॥ ठेवी कटीं कर भक्तां-

साठीं ॥ २ ॥ युद्धीं अर्जुनातें सांगितली गीता ॥ सहस्रशा कांता केल्या ज्यानें ॥ ३ ॥ नामा ह्मणे शिवा दिल्हें शिवपण ॥ ब्रह्मया लागोन उपदेश ॥ ४ ॥

॥ १०९ ॥ चातुर्यसागरा आमुची जननी ॥ जाणते रुक्मिणी प्रेमकळा ॥ १ ॥ चरणींची प्रभा जाणे मणिग्रीव ॥ नकुळ वैष्णव सखे माझे ॥ २ ॥ कुबेर गौतम वधू अहिल्या ॥ चक्रपाणी तया मुक्त केलें ॥ ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझे पायीं संजीवन ॥ सदाशिव ध्यान तेंचि करी ॥ ४ ॥

॥ ११० ॥ भक्ता पुंडलीका देखोनि निकटा ॥ आलासी वैकुंठाहूनि आजी ॥ १ ॥ नारद वचन ऐकोनियां मनीं ॥ सुखें चक्रपाणी सुखावला ॥ २ ॥ सुखरूप सदां देव दूरी ठेला ॥ मुनीश्वर काला स्वयें दावी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुज भक्ति पिसें फार ॥ साधिलें नगर क्षणमात्रें ॥ ४ ॥

॥ १११ ॥ योगि मुनि जन तपस्वि याज्ञिक ॥ ते तव पादुका वंदिती शिरीं ॥ १ ॥ हरि हर ब्रह्मा सूर्य चंद्रादिक ॥ ओढवी मस्तक रजरेणु ॥ २ ॥ गंगा भागीरथी होती शुचिमंत ॥ आणिकांची मात काय सांगों ॥ ३ ॥ नामा ह्मणे नेणों पार तुझा देवा ॥ कृपाळु केशवा केशिराजा ॥ ४ ॥

॥ ११२ ॥ मजसाठीं काय लाजतोसी देवा ॥ तृणा आणि जीवा साच होसी ॥ १ ॥ ते काय पवाडे गमाविलों ब्रीदें ॥ ब्रह्मादिकें वृंदें ध्याती कैसीं ॥ २ ॥ जाणतां नेणतां सर्वांसी उद्धार ॥ भवसिंधु पार पावविसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझे उपकार ऐसे ॥ दावीं जगदीश हेळामात्रें ॥ ४ ॥

॥ ११३ ॥ अलक्ष्या अच्युता सख्या भक्तराया ॥ तूंचि देवराया पांडुरंगा ॥ १ ॥ परात्परतरा पार नेणें ब्रह्मा ॥ तूंचि निजधाम स्वयें देसी ॥ २ ॥ विश्वामित्रासाठीं विलंब न करीं ॥ बळिचिया द्वारीं भृत्य होसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझी माव नेणें कोणी ॥ धांवें चक्रपाणि त्वरें नेटें ॥ ४ ॥

॥ ११४ ॥ संतोषाकारणें सज्जन जीवासी ॥ साहाकारी होसी नारा-

यणा ॥ १ ॥ समान करिसी सर्वांभूतीं जाण ॥ पतीत पावना भाक तुझी ॥ २ ॥ भक्ति भाव ज्यांचा भाग्यें आगळिया ॥ होसी देवराया सर्वविध ॥ ३ ॥ समर्थपणासी कोणा विचारावें ॥ नामा ह्मणे भावें कारण हा ॥ ४ ॥

॥ ११५ ॥ षड्गुणसंपन्न पंढरिच्या राया ॥ आमुच्या स्वामिया केशिराजा ॥ १ ॥ राम कृष्ण हरी श्रीधरा मुकुंदा ॥ सज्जनी स्वानंदा सर्वातीता ॥ २ ॥ गोविंदा गोपाळा गोप वेषधारी ॥ गोवर्धन धरी नखावरी ॥ ३ ॥ दुष्ट दुर्जनाची दुखवीना चित्ता ॥ पावन पतिता नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ ११६ ॥ सर्व देवां माजी विठ्ठल वरिष्ठ ॥ बोलतसे स्पष्ट वेद शास्त्रीं ॥ १ ॥ अच्युता अनंता माधवा मुकुंदा ॥ गोपाळा गोविंदा गोपवेषा ॥ २ ॥ कृष्णा कमलाक्षा कस्तुरीचा टिळा ॥ नेसला पाटोळा खोंचे शिरीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे राम कृष्ण नारायण ॥ तारिसी पाषाणां सिंधू माजी ॥ ४ ॥

॥ ११७ ॥ अगम्य सामर्थ्य नयेचि गणना ॥ तारुनि पाषाणा केलें सम ॥ १ ॥ तारिसी वान्नर अवघेची सेना ॥ तोडिसी बंधना पांडूरंगा ॥ २ ॥ काय वनचर जाणती प्रत्यक्ष ॥ परिक्षिती साक्ष दिस सातां ॥ ३ ॥ कृतत्रेतद्वापारांचे आदिअंतीं ॥ नामोचितख्याति ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ ११८ ॥ तुझे कीर्तना देवा कोण जाय आतां ॥ सख्या भगवंता कृपा करीं ॥ १ ॥ भीष्म पहुडला शरांचे पंजरीं ॥ तया प्रश्न करी युधिष्ठिर ॥ २ ॥ महाभयेश्वरी विघ्नें निवारिता ॥ सकळां देखतां दांत पाडी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझी भक्ति अघटित ॥ पवाडे अनंत दाविना कां ॥ ४ ॥

॥ ११९ ॥ पांडुरंगा नमूं परात्परा नमूं ॥ सगुणासी नमूं साक्षिभूता ॥ १ ॥ समस्त संबंध साधियेले हरी ॥ रावणादि वैरी उद्धरिले ॥ २ ॥ नामरूपातीता नाहीं भेटाभेट ॥ झटलें आहे नीट नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ १२० ॥ चोरूनि खादलें दहीं दुध लोणीं ॥ जिहीं चक्रपाणि खेळविला ॥ १ ॥ अखंड उन्मत्तें मतिमंद मूढें ॥ गौळणी पासीं रडे रूपें





दावीं ॥ २ ॥ शकुनीचा पुत्र शिवद्वेष करी ॥ संकट मुरारी निवारिसी ॥ ॥ ३ ॥ उद्धरिल्या सर्व गोप गवळणी ॥ लीला दाखवूनि नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १२१ ॥ वेदां जन्म स्थान शास्त्रां समाधान ॥ काय बुझावण दाखविसी ॥ १ ॥ जगादि अनंत अवतार घेसी ॥ चरित्रें दाविसी भक्तांपुढें ॥ २ ॥ पतीतपावन तुंचि नारायण ॥ सत्वर धावणें दामोदरा ॥ ३ ॥ नामा ह्मणे भवबंधविमोचका ॥ वैकुंठ नायका पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १२२ ॥ आशा तृष्णा माया नाहीं लिथाडिल्या ॥ ह्मणावा तो भला कासयानें ॥ १ ॥ अमृत सेवितां मृत्यु पळे दूरी ॥ सूख होय तरीं तेंचि नाम ॥ २ ॥ तेव्हां कोणी तरीं धरावा सत्संग ॥ होय पांडुरंग प्राप्ति सर्वां ॥ ३ ॥ अविश्वासी नर सर्वस्व पतीता ॥ तारिसी अनंता ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ १२३ ॥ शिशुपाळांदिकां कोठें शुद्ध भाव ॥ उद्धरी केशव उंच नीच ॥ १ ॥ काय कामा पुत्रा कोण आले जाणा ॥ सेखीं त्या रावणा कैवल्यदानीं ॥ २ ॥ महादुष्ट शंखासुरें नेले वेद ॥ शेवटीं गोविंदें सोडविलें ॥ ३ ॥ पित्याचिये हातीं पुत्र वधकरी ॥ कृपाळु बा हरी नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १२४ ॥ पंढरीचा देव तत्सच्चित अद्वय ॥ तुंचि बाप माय पांडुरंगा ॥ १ ॥ सगुण निर्गुण दाविसी प्रकार ॥ दाहि अवतार निमित्तासी ॥ २ ॥ ऐसा माझा स्वामी समर्थ गोविंद ॥ निरंतर छंद हरिनामीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे कांहीं न धरिसी लाज ॥ भाविकासीं गुज कानीं सांगे ॥ ४ ॥

॥ १२५ ॥ अच्युता अनंता श्रीधरा माधवा ॥ देवा आदिदेवा पांडुरंगा ॥ १ ॥ कृष्णा विष्णु हरि गोविंदा वामना ॥ तुंचि नारायणा नामधारी ॥ २ ॥ मुकुंदा मुरारी प्रद्युम्ना केशवा ॥ नाम सदाशिवा शांत रूपा ॥ ३ ॥ रूपातीत हरी दाखवी सगुण ॥ निरंतर ध्यान करी नामा ॥ ४ ॥

॥ १२६ ॥ सगुण तें ब्रह्म इटे वरी नीट ॥ कोण्या प्राणीं कष्ट होऊं नेदी ॥ १ ॥ देऊनियां क्षेम देह पालटिसी ॥ वृद्ध रूप होसी कर्णासाठीं ॥ २ ॥ भजन भक्तांचें मानसी वचन ॥ नाम नारायण ह्मणे कारे ॥ ३ ॥ उफराटी वदवी वाल्मीका नामाख्या ॥ शतकोटीसंख्या प्रवि-

स्तार ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा भक्तिचे पैं पिसें ॥ त्यालागीं हव्यासें होसी जाण ॥ ५ ॥

॥ १२७ ॥ पंढरीचा देव पाहातां सगुण ॥ प्ऱ्हादा कारणें सिद्ध झाला ॥ १ ॥ पंढरीचा देव पतित पावन ॥ उभा नारायण ईटेवरी ॥ २ ॥ पंढरीचा देव प्रत्यक्ष उदार ॥ बाळ्या भोळ्या पार दावीतसे ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा कीर्ति वानुं काय ॥ आह्मां साठीं सोय लावीं बापा ॥ ४ ॥

॥ १२८ ॥ हरि भोळा हरि भोळा ॥ आह्मीं डोळां पाहिला ॥ १ ॥ हरि श्रेष्ठ हरि श्रेष्ठ ॥ आह्मां कष्ट नाहीं ते ॥ २ ॥ हरि उदार हरि उदार ॥ आह्मां धीर होईना ॥ ३ ॥ नामा ह्मणे हरि दाता ॥ आह्मां दासां रक्षितो ॥ ४ ॥

॥ १२९ ॥ पंढरीचा देव बहुत कोंवळा ॥ सगुण सांवळा सारथि हा ॥ १ ॥ सारथि सर्वांचा साक्षिभूत असे ॥ संकटीं सायासें गजेंद्रासीं ॥ २ ॥ गजेंद्रासीं रक्षी गणिका उद्धरी ॥ भिल्लीणीचे करीं फळें भक्षी ॥ ३ ॥ भक्षी सुदाम्याचे पोहे मुष्टिभरी ॥ नामा ह्मणे हरि गोड मानी ॥ ४ ॥

॥ १३० ॥ योगी हे शिणती तुझिये प्राप्तिलागीं ॥ नातुडसी जगीं कवणासी ॥ १ ॥ एक जटा नखें स्वयें वाढविती ॥ दिगंबर होती एक देवा ॥ २ ॥ त्यांसीं तुझी भेटी नव्हेचि कल्पांतीं ॥ अखंड शिणती साधनानें ॥ ३ ॥ आमचे सन्निध सर्वदां राहसी ॥ आमच्या भाग्यासीं पार नाहीं ॥ ४ ॥ धन्य झालों आह्मीं तुझिया प्रसादें ॥ नाचे तुझ्या छंदें नामदेव ॥ ५ ॥

॥ १३१ ॥ भरतें त्यागिली जननि ॥ ख्याति झाली त्रिभुवनीं ॥ १ ॥ ऐसी भक्ति तुझी हरी ॥ जगीं करंटा न करी ॥ २ ॥ बंधु अवज्ञा बिभिषणा ॥ प्रगट झाला रामराणा ॥ ३ ॥ प्ऱ्हाद पितृआज्ञा न करी ॥ स्तंभीं प्रगटला नरहरी ॥ ४ ॥ पति अवज्ञा ऋषिपत्न्यांसीं ॥ कृष्ण दर्शन पूर्ण त्यांसीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे भक्ता अवरोधीं पाहीं ॥ त्यासीं त्यजिल्या दोष नाहीं ॥ ६ ॥

॥ १३२ ॥ योगानें जोडिली सायासें ॥ ते मज बोळली वोरसें ॥ १ ॥ बरवी कामधेनु गाय ॥ विठाबाई माझी माय ॥ २ ॥ नसतां सरा सांठवण ॥ तृप्त केलें त्रिभुवन ॥ ३ ॥ कोटि कुळें वोरसलीं ॥ पुरोनि अवघींच उरलीं ॥ ४ ॥ न साहे अहंकाराचा वारा ॥ आली दीनाचिया घरा ॥ ५ ॥ नामा ह्मणे हें दूभतें ॥ जोडूनि दिधलें असे बापें ॥ ६ ॥

॥ १३३ ॥ एक वाहू तुळसीपत्र ॥ तें देवासीं प्रिय होत ॥ १ ॥

रखुमाईनें देव ॥ सोडविला कृष्णराव ॥ २ ॥ नामा ह्मणे पूर्ण होती ॥ माप्त राधिकेचा पती ॥ ३ ॥

॥ १३४ ॥ बरवें गा शंकरा नाम तुझें ॥ हर हर बरवें गा देवा नाम तुझें ॥ १ ॥ गाल्या ऐकिल्या होय वैष्णवा गती ॥ राम नामें तरले नेणों किती ॥ २ ॥ ऐसा सदां आनंद राउळीं ॥ विष्णुदास नामा पंढरपुरीं ॥ ३ ॥

॥ १३५ ॥ घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदारा ॥ काय जाऊनियां तुझे कृपणाचे द्वारा ॥ १ ॥ उच्छिष्टाचीं शितें न टाकिसी बाहेरी ॥ कोणीं दिधली देवा एवढी भूषणाची थोरी ॥ २ ॥ सोडीं ब्रीद देवा आतां नव्हेसी अभिमानी ॥ पतीतपावन नाम तुझें ठेवियलें कोणीं ॥ ३ ॥ नामा ह्मणें देवा तुझें नलगे मज कांहीं ॥ प्रेम असों द्यावें कीर्तनाचे ठायीं ॥ ४ ॥

॥ १३६ ॥ दिसंदिस कैसा झालासी शाहाणा ॥ गोवळांसीं खेळसी पंढरीच्या राण्या ॥ १ ॥ विश्वामाजी तुझे बोभाट मोठे ॥ जन्ममरणाचे संकल्प तुटे ॥ २ ॥ अकळ करणी नकळे लिहितां धरणीं ॥ सिंधुमाणि करूनी नाम तुझें ॥ ३ ॥ नामा ह्मणे कीर्ति काय वानूं देवा ॥ भक्तांचा कुढावा ब्रीद तुझें ॥ ४ ॥

॥ १३७ ॥ राम पिता सीता माता ॥ लक्ष्मण सोयरा चुलता ॥ १ ॥ तयांसीं भेटों जाऊं आतां ॥ चित्रकूटींच्या पर्वता ॥ २ ॥ नामा ह्मणे माझें गोत ॥ चित्रकूटीं असे नांदत ॥ ३ ॥

॥ १३८ ॥ पैल गरुडाचें वारिकें ॥ गगनीं कृष्ण येतां देखे ॥ १ ॥ दुडवा दुडवी हरि धांवतु ॥ ना भी नामयातें ह्मणतु ॥ २ ॥ वैकुंठाहुनि आले वेगीं ॥ नामयाच्या भक्तिलागीं ॥ ३ ॥

॥ १३९ ॥ अज्ञानबाळकें तुझा हाकारा केला ॥ तेणें तये वेळां स्वर्ग भेदिला ॥ ऐकुनि तो धाविन्नला ॥ अवो देवी खेचरे ॥ १ ॥ स्तंभीं प्रगटलीसे हाक ॥ कापिन्नले तिन्हि लोक ॥ भेणें पळती शंखादिक ॥ आणि कैलास आंदोळले ॥ २ ॥ आली त्रिभुवनदेवता ॥ नाभी नाभीरे ह्मणतां ॥ माझा प्रऱ्हाद केउता ॥ तो कवणें रे गांजिला ॥ ३ ॥ वदन पसरुनि विक्राळ ॥ झरझरीत झरे लाळ ॥ नेत्र जैसे वडवानळ ॥ शोषूं पाहे जळनिधि ॥ ४ ॥ संहार झाला नागकुळ ॥ भ्याले अष्टहि लोकपाळ ॥ स्वर्गीं सुटली खळबळ ॥ अमरावती इंद्रासीं ॥ ५ ॥ मग दैत्यातें पाचारित ॥ लोह खणखणा वाजत ॥ हाकीं अंबर गर्जत ॥ तेणें कांपे मेदिनी ॥ ६ ॥ कवटाळूनि चहूं हातीं ॥ विदारिलें चपेटघातीं ॥ जैसा रुद्र प्रळयांतीं ॥ तैसा

हरी दिसतसे ॥ ७ ॥ दैत्य न मरे कवणें परी ॥ मग तो धरिला जान्हूवरी ॥ देखें उदर फोडूनि सत्वरीं ॥ अस्थि चूर्ण केली या ॥ ८ ॥ मौजे नाचती देवता ॥ मुक्ति दिल्ही दैत्यनाथा ॥ नामया स्वामि वरदहस्ता ॥ अभयदाता भक्तांसीं ॥ ९ ॥

॥ १४० ॥ अंबऋषि रुक्मांगद ॥ नारद महामुनि प्ऱ्हाद ॥ १ ॥ मिळोनि सनकादिका भारू ॥ पांडुरंगीं हरि जागरु ॥ २ ॥ शंख भेरी नादाकार ॥ नादें गर्जत अंबर ॥ ३ ॥ योगनिद्रेसीं पहुडला ॥ आदिपुरुष उपवर जाहाला ॥ ४ ॥ देवी उतरोनि विमानीं ॥ आदि क्षीरसागर भूवनीं ॥ ५ ॥ सुरवर वोळंगती जगन्निवास ॥ गातो नामा विष्णुदास ॥ ६ ॥

॥ १४१ ॥ वैकुंठींहुनी धांवत आला ॥ खांबा आड उभा ठेला ॥ १ ॥ खांब गडगडिला गडगडिला ॥ वीर नरसिंह पावला ॥ २ ॥ पावला नामया स्वामि ॥ जग उद्धरिलें याचे नामीं ॥ ३ ॥

॥ १४२ ॥ पहाहो कडकडिलें गगनीं ॥ भेणें कापते मेदिनी ॥ १ ॥ तो देव दैत्यां अंतकु ॥ होय भक्तांसी नायकु ॥ २॥ भोजें प्ऱ्हाद नाचतु ॥ नामया स्वामि रे अनंतु ॥ ३ ॥

॥ १४३ ॥ कायरे गडगडित दुमदुमीत ॥ ब्रह्मकटाह उलथूं पहात ॥ ॥ १ ॥ तो देव आला रे नरहरी ॥ आतां कवण सांवरी ॥ २ ॥ प्ऱ्हा-दासीं दिधलें जैत्य ॥ हर्षें नामा गुढी उभारीत ॥ ३ ॥

॥ १४४ ॥ तडक फुटला अंबरीं ॥ आला प्ऱ्हाद कैवारी ॥ १ ॥ आला आला हाक देतु ॥ सिंहनादें रे गर्जतु ॥ २ ॥ दैत्यां दचकु नरहरी ॥ नामया स्वामि नरकेसरी ॥ ३ ॥

॥ १४५ ॥ वेदां नकळे पार श्रुतीं अगोचर ॥ उपनिषदां सार नकळेचि ॥ १ ॥ तो हरि गोकुळीं वसुदेवा कुळीं ॥ यशोदे जवळी बाळकृष्ण ॥ धृ० ॥ ब्रह्मादिक वंदिती शिवादिक ध्याती ॥ शास्त्रांसीं तों गति नकळेचि ॥ २ ॥ योग्यांचें चिंतन मुनींचें अंजन ॥ शेषादिकां ध्यान सदां ज्याचें ॥ ३ ॥ पुराणें भागलीं आचारें श्रमलीं ॥ बोलतां राहिलीं साधुवृंदें ॥ ४ ॥ नामा ह्मणे तो हा विठ्ठल पंढरी ॥ नाम मात्रें तारी सकळांसी ॥ ५ ॥

॥ १४६ ॥ चारी वेद तुझ्या नांदती नगरीं ॥ तेथें मी भिकारी काय वानूं॥ १ ॥ वर्णितां पार नेणें चतुरानन ॥ तेथें मी अज्ञान काय जाणें ॥ २ ॥

अंगलग सेवक शेषाच्या सारिखा ॥ तेथें माझ्या लेखा कोणीकडे ॥ ३ ॥ कैलासींचा राणा करितसे ध्यान ॥ तेथें भ्रांत मन कोठें रिघे ॥ ४ ॥ इंद्रासहित देव जेथें ओळंगणें ॥ तेथें दास्य करणें घडे कांहीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशवा काय म्यां करावें ॥ तुझे पायीं रहावें कैशापरी ॥ ६ ॥

॥ १४७ ॥ कोल्हि काय कोल्हीं होती जड ॥ तैसें तुझें मज मिळालें असे वाड ॥ १ ॥ आंधळें मुकें कानीं नायकें ॥ सासीं काय जननीं पोसूं न शके ॥ २ ॥ नामा ह्मणे केशव कृपेचा सागरु ॥ जयाचा जारु तयासींच भारु ॥ ३ ॥

॥ १४८ ॥ सहस्र मिळणीं सिंधु जाहली जे मुखें ॥ ओघ तो उदक आन नाहीं ॥ १ ॥ बीजाचिये पोटीं वटाचा विस्तार ॥ सर्व तो आकार तुझा असे ॥ २ ॥ नामा ह्मणे तुझें अवघें करणें ॥ खवळोनियां सुणें घेवों नको ॥ ३ ॥

॥ १४९ ॥ देवा पांडुरंगा वासुदेवा हरी ॥ गोविंदा मुरारी नारायणा ॥ १ ॥ नारायणा कृष्णा कमळलोचना ॥ माधवा प्रद्युम्ना रावणारी ॥ २ ॥ रावणारि होसी जानकी टाकुनी ॥ हिंडसी अंगणीं अर्जुनाच्या ॥ ३ ॥ अर्जुनाच्या घरीं अंगें घोडे धुसी ॥ लज्जा द्रौपदीची राखियेली ॥ ४ ॥ राखशील द्वार भक्ति बळिवंता ॥ नामा ह्मणे आतां काय सांगूं ॥ ५ ॥

॥ १५० ॥ दुरोनी ओळंगिल्या अविनाश देताहे ॥ तो जवळी जातां काय देईल नेणों ॥ १ ॥ ऐसा तूं कृपाळू लक्षुमीचा कांत ॥ सांडुनि होतात कष्टी ज्ञणीं ॥ २ ॥ सेवा माझा स्वामि वैकुंठनायक ॥ भुक्तिमुक्तिदायक पांडुरंग ॥ ३ ॥ साधिलें नगर देऊनियां शिर ॥ कष्ट दशशिरें एवढे केले ॥ ४ ॥ तें दिलें बिभीषणा एका नमस्कारा ॥ त्या माझ्या उदारा कां न भजा ॥ ५ ॥ मांडीवरी बैसों नेदी सापत्न माता ॥ ह्मणे राजसुता नव्हसी तूं ॥ ६ ॥ हें ऐकोनि वना जाय तो तत्त्वता ॥ सकळ देवा माथां वरिष्ठ केला ॥ ७ ॥ दुर्योधनें भोजना बहु केले सायास ॥ परि नघे ग्रास तया घरीं ॥ ८ ॥ विदुराचे घरीं न पुसतां जाय ॥ भक्तिप्रीय होय स्वामि माझा ॥ ९ ॥ अर्जुनाचे काजीं सांडी निज पैजा ॥ सुदर्शन वोजा धरियेलें ॥ १० ॥ आपण लटिका झाला भीष्म साच केला ॥ काळाचा अभुला स्वामि माझा ॥ ११ ॥ दिक्षित अवदान देती निज करीं ॥ परि मुख न

करी तयांकडे ॥ १२ ॥ सुदाम्याचे पोहे देखे दृष्टिभरी ॥ तयासीं श्रीहरी पसरी हात ॥ १३ ॥ ह्मणुनि हा गावा ह्मणुनियां ध्यावा ॥ तोचि आराधावा हृदयकमळीं ॥ १४ ॥ हरिगुण नाम हेंचि प्रिय आह्मां ॥ कीर्ति गाय नामा होउनीं भाट ॥ १५ ॥

॥ १५१ ॥ तुझिया सत्तेनें वेदांसी बोलणें ॥ सूर्यासीं चालणें तुझिया बळें ॥ १ ॥ ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी ॥ वर्म हें जाणुनी शरण आलों ॥ २ ॥ मेघांनीं वर्षावें पर्वतीं बैसावें ॥ वायूनें विचरावें सत्ते तुझे ॥ ३ ॥ नामा ह्मणे कांहीं न हाले साचार ॥ प्रभु तूं निर्धार पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १५२ ॥ सत्यसंकल्पाचा कर्ता जो विश्वाचा ॥ अनाथ जीवांचा मायबाप ॥ १ ॥ पुंडलीकें तया आणिलें रंगणीं ॥ कटावरी पाणि ठेवूनियां ॥ २ ॥ अणुरेणुमाजि व्यापूनि राहिला ॥ आनत्व जाहला एकलाचि ॥ ३ ॥ नामा ह्मणे वेद ज्यालागीं बोभाय ॥ जोडोनियां पाय उभा ठाके ॥ ४ ॥

॥ १५३ ॥ उभा इटेवरी भक्तांचा कैवारी ॥ भेटावया उभारी दोन्हीं बाह्या ॥ १ ॥ गुण दोष त्याचे न पाहेचि डोळां ॥ भेटे वेळोवेळां केशिराज ॥ २ ॥ ऐसा दयावंत घेतो समाचारु ॥ लहान आणि थोरु सांभाळितो ॥ ॥ ३ ॥ सर्वांलागीं देतो समान दर्शन ॥ उभा तो आपण समपायीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे तया भक्तांची आवडी ॥ भेटावया कडाडी उभा ठेला ॥ ५ ॥

॥ १५४ ॥ दर्दुराचें पिलूं ह्मणे रामकृष्ण ॥ नाहीं उदक उष्ण झालें तेथें ॥ १ ॥ कर्दईमध्यें बाळ करी तळमळ ॥ गोविंद गोपाळ पावे वेगीं ॥ २ ॥ तये काळीं आज्ञा केली पावकासी ॥ झणीं तापविसी तयालागीं ॥ ३ ॥ ऐसा तो कृपाळु आपुलिया दासा ॥ आमुचा कोंवसा नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १५५ ॥ कौस्तुभ सोज्वळ कंठीं शोभताहे ॥ भक्तांसाठीं बाहे उभारिली ॥ १ ॥ आन हितासाठीं करिसी धांवण्या ॥ विदुराच्या कण्या गोड करी ॥ २ ॥ ब्रह्मचारी साक्ष सत्यत्वें करिसी ॥ पुढें तूं धांवसी आवडीनें ॥ ३ ॥ वचना अंतर पडों नेदी सत्य ॥ नामा ह्मणे भृत्य होसी देवा ॥ ४ ॥

॥ १५६ ॥ खगावरी स्वारी करूनियां देवा ॥ धांवसी केशवा भक्तांसाठीं ॥ १ ॥ रामा परशुरामा कृष्णा नारायणा ॥ हरी संकर्षणा भक्तांसाठीं ॥ २ ॥

विभीषण तारी रावणासी मारी ॥ दावी भाव हरी भक्तांसाठीं ॥ ३ ॥ नामा म्हणे भक्तांकारणें गोविंदा ॥ घेवोनियां गदा उभा ठासी ॥ ४ ॥

॥ १५७ ॥ सर्वांभुतीं नांदे सर्व नारायण ॥ सर्व संस्थापन पांडुरंग ॥ १ ॥ अगा देववंद्या अगा गोपवेशा ॥ पावन परेशा परमार्थासीं ॥ २ ॥ मूर्त अमुर्तांचा मुक्त परांगता ॥ सर्व मायातीता साक्षिरूपा ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवादानवां जिंकिसी ॥ ते भाके आह्मांसी सांभाळावें ॥ ४ ॥

॥ १५८ ॥ अनंता श्रीधरा गोविंदा केशवा ॥ मुकुंदा माधवा नारायणा ॥ १ ॥ देवकीतनया गोपिकारमणा ॥ भक्तउद्धरणा त्रिविक्रमा ॥ २ ॥ मकर कुंडलें श्रवणीं शोभती ॥ एकावळी दीप्ति तेजें भारी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझा नकळेचि पार ॥ भजा निरंतर सर्वकाळ ॥ ४ ॥

॥ १५९ ॥ निर्गूण सगुण नव्हे तें समान ॥ तैसें तेंहि जाण योगाभ्यासीं ॥ १ ॥ प्र्ऱ्हादासी हरि शंख चक्र गदा ॥ सगुण गोविंदा शोभतसे ॥ २ ॥ अर्जुनासी देव उभा पाचारिसी ॥ सखा उद्धवासी साक्ष दावी ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझा केशिराज भोळा ॥ दावितो गोपाळां बाळलीळा ॥ ४ ॥

॥ १६० ॥ गगनीं ध्रुव तुवां अढळ पैं केला ॥ तो बाळ धाकुला न ह्मणसी ॥ १ ॥ अजामेळाचें तुवां चुकविलें संकट ॥ ब्राह्मण तो नष्ट न ह्मणसी ॥ ध्रु० ॥ प्र्ऱ्हादाचा तुवां केला कइवारु ॥ वैऱ्याचा कुमरु न ह्मणसी ॥ २ ॥ गजेंद्रपशू सोडविला पानडिये ॥ मृगखोडी ऐसीये न ह्मणसी ॥ ३ ॥ रुक्मांगदाची तुवां उद्धरिली नगरी ॥ विषयी मुरारी न ह्मणसी तया ॥ ४ ॥ ऐसे अपराधी न ह्मणसी देवा ॥ नामा तो केशवा विनवीतसे ॥ ५ ॥

॥ १६१ ॥ वैकुंठ तें घर ॥ सांडुनियां निरंतर ॥ १ ॥ तो हा पुंडलीका द्वारीं ॥ उभा कर कटावरी ॥ २ ॥ क्षीर सागरींची मुर्ती ॥ तो हा रुक्मिणीचा पती ॥ ३ ॥ नये योगीयांचे ध्यानीं ॥ छंदें नाचतो कीर्तनीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे आला ॥ सर्वें परिवार आणिला ॥ ५ ॥

॥ १६२ ॥ नामाचा गजर गर्जे भीमातीर ॥ महिमा साजे थोर तुज एका ॥ १ ॥ रिद्धि सिद्धि दासी अंगण झाडिती ॥ उच्छिष्टें काढिती मुक्ति चारी ॥ २ ॥ चारी वेद भाट होऊनि गर्जती ॥ सनकादिक गाती

कीर्ती तुझी ॥ ३ ॥ सुरवरांचे भार अंगणीं लोळती ॥ चरणरज क्षिति शीव वंदी ॥ ४ ॥ नामा ह्मणे देव ऐसा हो कृपाळू ॥ करि तो सांभाळू अनाथांचा ॥ ५ ॥

॥ १६३ ॥ अपराधाविण बळी ॥ घातला पाताळीं ॥ सवें कणव उपजली ॥ द्वार राखिसी तयाचें ॥ १ ॥ गाऱ्हाणें सांगावें कवणा ॥ केशवा सुजाणा ॥ कोणी आणिक तुजविणा ॥ नाहीं दुसरा आह्मातें ॥ २ ॥ बाळमित्र सुदामा सवें जेवी ॥ धान्य जो मागे गांवोगांवीं ॥ विपत्ति त्याची दूर व्हावी ॥ ह्मणून दिधली राणीव ॥ ३ ॥ तुझें नाम न तोंडीं ॥ वसुदेव देवकी बांधोडी ॥ कंसा केली धांदडी ॥ ऐसी विपत्ति दाखवुनी ॥ ४ ॥ इंद्र वर्षे शिळा धारा ॥ पर्वत केला सामोरा ॥ इंद्रा लाविला दरारा ॥ एवढी विपत्ति दाखवुनी ॥ ५ ॥ जोहरीं सूदलें पांडवां ॥ सवेंचि उपजली कणवा ॥ त्यासी केला त्वां रिघावा ॥ आंगीं पाहण्या धांवसी ॥ ६ ॥ सभा पिशूनाची दाटली ॥ द्रौपदिकाया आंसुडली ॥ तिये वस्त्रें पुरविलीं ॥ येवढी आपदा दाखवुनी ॥ ७ ॥ दैत्यें गांजिला प्ऱ्हादु ॥ तुझ्या नामाचा प्रसादु ॥ ऐसा करूनि विनोदु ॥ तया दैत्या वधियेला ॥ ८ ॥ बिभीषण हाणितला लाथां ॥ लंका दिधली त्या उचिता ॥ कृपा करें रघुनाथा ॥ समर्थ केला तये वेळीं ॥ ९ ॥ गजेंद्र पानेडी ॥ धरिला यमदूत सुसरी ॥ वैकुंठींहुनी घालिसी उडी ॥ येवढी आपदा दाखवुनी ॥ १० ॥ आह्मा डिंगराचें बोलणें ॥ अनाथनाथा परीसणें ॥ विष्णुदास नामा ह्मणे ॥ शाहणें व्हावें यापरतें ॥११॥

॥ १६४ ॥ उभा भीमातिरीं कर कटावरी ॥ राहे निरंतरी भक्तांपुढें ॥ १ ॥ भक्तभाग्य थोर नव्हे कधीं प्राप्ती ॥ जाणोनी श्रीपती गुज बोले ॥ २ ॥ गणिका गजेंद्र उद्धव नारद ॥ आपण गोविंद मिळोनियां ॥ ३ ॥ समुद्रमंथनीं उभा करोनियां ॥ लागतसे पायां नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६५ ॥ एक अंजनीं उत्पन्न ॥ एका खांबीं अवतरण ॥ १ ॥ ते पावले दोघे जण ॥ नरसिंह हनुमंत आपण ॥ २ ॥ एक सिंहनाद करी ॥ एक भुभुःकार करी ॥ ३ ॥ एक सीताशुद्धी करी ॥ एक प्ऱ्हादा कैवारी ॥ ४ ॥ एक बाळब्रह्मचारी ॥ एक अर्धांगीं सुंदरी ॥ ५ ॥ एक रुद्राचा अवतारु ॥ दुसरा नामया दातारू ॥ ६ ॥

॥ १६६ ॥ एक गोक्षीर धाम धवळा ॥ एक तो सहज मेघ सांवळा ॥ एक कंठीं रुंडमाळा ॥ एक गळां वैजयंती ॥ १ ॥ एक तो वृषभारुढ जाण ॥ एका साजे गरुडवाहन ॥ एक स्मशानीं भस्मोद्धुळण ॥ एका शयन क्षीरसागरीं ॥ २ ॥ एक तो भोळा कैलासी चक्रवर्ती ॥ एक तो वैकुंठाधिपती ॥ एका सुरवर मुगूटीं वंदीती ॥ एका अंगुष्ठी गंगा वाहे ॥ ३ ॥ एकाचे चरणीं नेपुरें झणत्कारु ॥ एका पायीं रुळे तोडरु ॥ एका परिधान व्याघ्रांबरु ॥ एका पीतांबर कसीयला ॥ ४ ॥ एका नरकपाल खट्वांग डमरु त्रिशूळ ॥ एकें शंख चक्र गदा कमळ ॥ एका अर्धांगीं हैमवती बाळ ॥ एका कमळा वामभागीं ॥ ५ ॥ एक त्रिपुर संधानी लक्ष न चुके ॥ एकबाणें वाळि वधिला कौतुकें ॥ विष्णुदास नामा एक रूप देखे ॥ हरिहर कौतुकें वर्णितसे ॥ ६ ॥

॥ १६७ ॥ देवा तूं प्रथम गर्भवास भोगिसी ॥ सागरीं जळचरु मत्स्य झालासी ॥ कमठ पाठी नसंडी कैसि ॥ कूर्में कासाविसी केलें तुज ॥ १ ॥ अपवित्र नाम आदि वराह ॥ याहूनि थोर कुर्मकांसव ॥ अर्ध सावज अर्ध मानव ॥ हे भवभाव कर्माचे ॥ २ ॥ खुजेपणें बळिस पाताळीं घातलें ॥ तेणें कर्में तयाचें द्वार रक्षिलें ॥ पितयाचे वचनें मातेसी वधिलें ॥ तें कर्म जडलें परशुरामा ॥ ३ ॥ श्रीरामा झाल्या आपदा बहुता ॥ कर्में भोगविलें अंतरली सीता ॥ भाळुका तिर्थीं वधियलें अवचिता ॥ नाम अच्युता तुज झालें ॥ ४ ॥ ऐसा कष्टि होऊनी बौद्ध राहिलासी ॥ तूं कलंकिया लोका मारिसी ॥ आपुल्या दोषासाठीं आणिका दंडिसी ॥ निष्कळंक होसी नारायणा ॥ ५ ॥ ऐसा तूं बहुता दोषी बांधिलासी ॥ पुढिलाचि जन्में अवगतोसी ॥ विष्णुदास नामा ह्मणे हृषीकेशी ॥ तुझी भीड कायेसी स्वामियाहो ॥ ६ ॥

॥ १६८ ॥ प्ऱ्हादा रक्षिलें पांडवां प्रतिपाळिलें ॥ तया उभें केलें पुंडलीकें ॥ १ ॥ बिभीषणा स्थापिलें ध्रुवासीं अढळ केलें ॥ तया उभें केलें पुंडलीकें ॥ २ ॥ चैद्यादि मर्दिले सुरवर तारीले ॥ तयां उभें केलें पुंडलीकें ॥ ३ ॥ अहिल्ये उद्धरिलें गजेंद्रा उद्धरिलें ॥ तया उभें केलें पुंडलीकें ॥ ४ ॥ गयासुरा वधिलें बळिस पाताळीं घातलें ॥ तया उभें केलें पुंडलीकें ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशवा भक्तांचें ठेवणें ॥ घेउनी केंवि जाणें घडे तुज ॥ ६ ॥

॥ १६९ ॥ वैकुंठाहून केलें पेणें ॥ भक्त प्ऱ्हादा कारणें ॥ १ ॥ नरहरि पावला पावला ॥ महापापा पळ सूटला ॥ २ ॥ शंख चक्र पद्म गदा ॥

महापापा पळ सूटला ॥ ३ ॥ पावला गरुडध्वज ॥ नामया स्वामि केशवराज ॥ ४ ॥

॥ १७० ॥ सहस्र तोंडांचा तोहि भागियला ॥ अंत नाहीं ज्याला गुणालागीं ॥ १ ॥ तेथें मी पामर काय बोलूं वाणी ॥ तुझी कीर्ति जनीं काय कैसी ॥ २ ॥ यथामति कांहीं बोलियलों बोल ॥ तोचि हा विठ्ठल नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ १७१ ॥ काळे गोरे धनुर्वाडे ॥ ते चालती रामापुढें ॥ १ ॥ राम निळीये गुढांरी ॥ कनक दंड चवरे वरी ॥ २ ॥ चला चित्रकूटीं जाऊं ॥ राम दशरथाचा पाहूं ॥ ३ ॥ अयोध्यें केला अवतारु ॥ राम नाम या दातारु ॥ ४ ॥

॥ १७२ ॥ करुणा बहुत तुझ्या चरणापाशीं ॥ धांवोनि हृषीकेशी आलों सर्व ॥ १ ॥ वाळुवंटीं उभे पताकांचे भार ॥ पाहोनि शंकर वेडावला ॥ २॥ सूर्य चंद्रादिक घालिती लोटांगण ॥ करी प्रदक्षिणा स्वयें गंगा ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगतां बहुत ॥ वेदशास्त्र ग्रंथ ठकावले ॥ ४ ॥

॥ १७३ ॥ काय वाणूं आतां पायाचा महिमा ॥ जेथें झाली सीमा बोलायाची ॥ १ ॥ विठोबाचे पाय आठवितां मनीं ॥ गेलें हरपोनी भवभय ॥ २ ॥ पाय नारदानें हृदयीं धरितां ॥ ब्रह्मांडीं मान्यता झाली त्याची ॥ ३ ॥ सनकादिकांलागीं पाय वज्र कवच ॥ ब्रह्मादिदेवांस पद जेणें ॥ ४ ॥ लागतांचि पाय शिळा दिव्य झाली ॥ पाषाण तारिले उदकावरी ॥ ५ ॥ पाय ते रमेचें सौभाग्य साजिरें ॥ योगि ऋषीश्वर थोर जेणें ॥ ६ ॥ नामा ह्मणे मनीं पाय सर्वकाळ ॥ ह्मणोनि सुकाळ आनंदाचा ॥ ७ ॥

॥ १७४ ॥ काय कामा पुत्र कोणा आले जाणा ॥ शेखीं त्या रावणा काय झालें ॥ १ ॥ महादुष्टें शंखासुरें नेले वेद ॥ शेवटीं गोविंदें सोडविले ॥ २ ॥ पितयाचे हातें पुत्र वध केला ॥ केशव सावळा नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ १७५ ॥ केशवा माधवा गोविंदा गोपाळा ॥ जेवी तूं कृपाळा पांडुरंगा ॥ १ ॥ अच्युता वामना दशरथनंदना ॥ जेवी तूं गा कृष्णा पांडुरंगा ॥ २ ॥ कृष्णा विष्णु हरी मधुसुदन मुरारी ॥ जेवी तूं नरहरी

पांडुरंगा ॥ ३ ॥ ऐसी ग्लानि करितां विठ्ठल पावला ॥ नैवेद्य जेविला नामयाचा ॥ ४ ॥

॥ १७६ ॥ खोल बुद्धिचा तो देवकीनंदन ॥ उभा तो गे बाई ॥ १ ॥ नंदनंदन संताचें जीवन ॥ उभा तो गे बाई ॥ २ ॥ कामिनी मनोहर नामया दातारा ॥ उभा तो गे बाई ॥ ३ ॥

॥ १७७ ॥ गोविंद गुणाचें निधान ॥ गोविंद नयनींचें अंजन ॥ गोविंद बाळकाचें स्थान ॥ गोविंद चिंतन योगीयांचें ॥ १ ॥ गोविंद पांघुरे कांबळा ॥ गोविंद कृपेचा कोंवळा ॥ गोविंद भावालागीं भोळा ॥ गोविंदें अजामेळा उद्धरिलें ॥ २ ॥ गोविंद बुद्धिची बुद्धि ॥ गोविंद एकली मांदी ॥ गोविंदें हरिली विघ्नव्याधि ॥ गोविंद सिद्धि स्मरलिया ॥ ३ ॥ गोविंद गोकुळपाळक ॥ गोविंद अंगवणें एक ॥ गोविंदें दैत्या लावियला धाक ॥ गोविंद शेष शयनीं ॥ ४ ॥ गोविंद आडलियाकाजा कैवारी ॥ गोविंद बुडतियातें तारीं ॥ गोविंदा सोळासहस्र नारी ॥ गोविंद बाळब्रह्म-चारी ॥ ५ ॥ गोविंद दान दीक्षा गुरु ॥ गोविंदें अढळ केला धुरु ॥ गोविंद नामया दातारु ॥ रुक्मिणीवरु गोविंदु ॥ ६ ॥

॥ १७८ ॥ होसि भक्तांचा कोवसा ॥ तुझीं ब्रीदें हृषीकेशा ॥ निवविलें सायासा ॥ कृपासिंधु मुरारी ॥ १ ॥ अंबऋषीकारणें ॥ दहा वेळ गर्भवासा येणें ॥ अवतार धरिला नारायणें ॥ गजापुर नगरीं ॥ २ ॥ अंदुरायाच्या घरीं ॥ बाळ जळसेनाच्या कूमरीं ॥ मत्स्य रूप अवतार धरी ॥ वेद हरण-कैवारी नारायण ॥ ३ ॥ विद्यापुर नगरीं ॥ अंधरुराजा राज्य करी ॥ श्रियादेवी सा सुंदरी ॥ उदरीं कुमरु जन्मला ॥ ४ ॥ पृथ्वी रसातळवटीं ॥ जातां थोर अंदोळली सृष्टी ॥ धांवण्या धांवले जगजेठी ॥ धरा पृष्टीं सांव-रिली ॥ ५ ॥ मर्गजपुरीं पुरपती ॥ हिरण्याक्ष चक्रवर्ती ॥ अग्नि असे जन-वंती ॥ घरीं बाळ वराह ॥ ६ ॥ त्रिदशदेवश्रिया चाडा ॥ हिरण्याक्ष वधिला गाढा ॥ भूगोल धरूनियां दाढा ॥ केला निवाडा स्वर्गींचा ॥ ७ ॥ कर्पूर-पुरपाटण ॥ हरिभक्तीचें हें स्थान ॥ सद्यादेवी प्रिया नंदन ॥ उदरीं नृसिंह जन्मला ॥ ८ ॥ पित्या पुत्रा झाली कळी ॥ स्तंभीं प्रगटला तयेवेळीं ॥ असुर मारिला करकमळीं ॥ भक्त प्ऱ्हाद रक्षिला ॥ ९ ॥ कश्यपनंदनव-र्धन ॥ कोवळादशाचा वामन ॥ खुजट रूप धरून ॥ महेंद्रपुरीसीं आला ॥ १० ॥ दानें तपें व्रतें बळी ॥ तोही घातला पाताळीं ॥ अद्यापि राहिला जवळी ॥

चरणातळीं पद देउनी ॥ ११ ॥ रेणापुरीं देवी रेणुका ॥ लाधली जमदग्नीसि देखा ॥ तिये उदरीं विश्वतारक ॥ परशुराम जन्मला ॥ १२ ॥ असुरीं वधियेली माया ॥ ह्मणे धांवे पुत्रराया ॥ अवचित पातला धावया ॥ सहस्रार्जुन मारिला ॥ १३ ॥ अयोध्या नाम नगरीं ॥ जन्म कौसल्ये उदरीं ॥ देवभक्तांचा कैवारी ॥ दशरथनंदन राघव ॥ १४ ॥ राम त्रैलोक्यीं वीर दारुण ॥ तेणें वधियेला रावण ॥ अढळपद देऊन ॥ राज्यीं बिभीषण स्थापिला ॥ १५ ॥ मथुरा नामें नगरीं ॥ वसुदेवदेवकी उदरीं ॥ कृष्ण आठवा अवतारी ॥ लीला विग्रहि जन्मले ॥ १६ ॥ कंस चाणूर मर्दिले ॥ विमळार्जुन उन्मळिले ॥ सप्त गर्भाचे सूड घेतले ॥ रक्षिलें गाई गोपाळां ॥ १७ ॥ बौद्ध श्रीवत्साच्या घरीं ॥ जन्म शांभवीच्या उदरीं ॥ राजा कांतिये नगरीं ॥ निरंतर रूपें राहिला ॥ १८ ॥ ध्यान मुद्रा मांडूनिया ॥ वस्त्रें शस्त्रें सजूनियां ॥ राहिला पैं निरंजनिया ॥ भक्तिभाव ओळखे तो ॥ ॥ १९ ॥ कल्कि जसरायाचा पुत्र ॥ सावित्री देवीचा कूमर ॥ शंभला पुरीं करील अवतार ॥ दाही रूपें प्रगटला ॥ २० ॥ ऐसा अमूर्त मूर्ति विटेवर ॥ उभा राहिला निरंतर ॥ विष्णुदास नाम्याचा दातार ॥ वर विठ्ठल पंढरीये ॥ २१ ॥

॥ १७९ ॥ फेडूनि पीतांबर उभा दिगंबर ॥ कटीं ठेवूनि कर वाळवंटीं ॥ १ ॥ मोतियांचे हार सांडुनी रत्नकीळा ॥ तुळशीच्या माळा गळीं घाली ॥ २ ॥ पर्यंक शयन शेषाचें आसन ॥ सांडूनि निधान उभा वीटे ॥ ३ ॥ सांडुनियां भक्त सनकादिकीं प्रेमा ॥ कलियुगीं नामा आवडला ॥ ४ ॥

॥ १८० ॥ निरंतर नाम जपे ॥ पिता प्रल्हादास कोपे ॥ उदरा आला वैरिरूपें ॥ ह्मणवुनि घायीं त्रासिला ॥ १ ॥ कोपें कोपला नरहरी ॥ कवण तयातें सांवरी ॥ खटखटा वाजती दांतोरी ॥ दैत्यावरी उठावला ॥ २ ॥ हांक देउनि अवचितीं ॥ आंदोळली त्रिजगती ॥ समुद्रपाणी उसळती ॥ उलथों पाहती गिरिवर ॥ ३ ॥ सिंहवदन प्रगटला ॥ मर्गजू अवचिता उठला ॥ भेणें वासुकी मोवाळला ॥ गजबजिला पाताळीं ॥ ४ ॥ जैसा प्रळयांत काळिचा मेघु ॥ तैसा गडबडिला वेगु ॥ अरे मर्गजाच्या खांबीं सवेगु ॥ क्षणामाजी प्रगटला ॥ ५ ॥ केला भक्तांचा कुडावा ॥ शिक लाविली दानवा ॥ नामयास्वामि वोळंगावा ॥ नरहरि विसावा भक्तांचा ॥६॥

॥ १८१ ॥ विठोजी माउली कृपेची कोंवळी ॥ चिंतितांचि घाली प्रेम पान्हा ॥ १ ॥ न सांगतां सर्वज्ञ जाणे तहान भूक ॥ न विसंबे व्यापक जवळी असे ॥ २ ॥ येरी मायामोह झांकवी सर्वथा ॥ अंतरीची व्यथा कळे तिशीं ॥ ३ ॥ सुखशांति स्वरूप लेववूनि आंगीं ॥ लागों नेदी धगी संसाराची ॥ ४ ॥ देउनी अभय दोनें करें कुरवाळी ॥ करितसे साउली पीतांबरें ॥ ५ ॥ नाम रत्नांकित कथा पैं श्रवणीं ॥ लेवविलीं लेणीं नानाविध ॥ ६ ॥ नयनीं कृष्णांजन सुदळें सांवळें ॥ समाधान झालें डोळियांसी ॥ ७ ॥ अच्युता अनंता सुवर्णाची पेटी ॥ बांधिली शेवटीं निर्विकार ॥ ८ ॥ माजि चतुर्भुज रूप मध्यमणी ॥ प्रताप त्रिभुवनीं विराजित ॥ ९ ॥ मुक्तिपद करीं बिंदुली साजिरी ॥ पद्म हस्त करीं पिंपळपान ॥ १० ॥ सत्त्वगुण साजिरा कटीं कडदोरा ॥ आवरण दुर्भरा दृढ बंध ॥ ११ ॥ संत चरणीं रज ललाटीं टिळक ॥ नाहीं भयशंका कळिकाळाची ॥ १२ ॥ कामक्रोधादिक करूनिया पुतळे ॥ पायीं जे घातले पायवट ॥ १३ ॥ वासनेची बिडी लागों नेदी ह्मणी ॥ उभा चक्रपाणि मागें पुढें ॥ १४ ॥ संतसंगें नामा शृंगारमंडित ॥ आनंदें खेळत गरुडपारीं ॥ १५ ॥

॥ १८२ ॥ पाला खाऊनियां धाला बहिणी घरीं ॥ भक्ति लागीं हरि वेडा झाला ॥ १ ॥ सुदाम्याचे पोहे कोरडेचि खाय ॥ मटमटा पाहे चहूंकडे ॥ २ ॥ विदुराच्या कण्या खाय धणीवरी ॥ झाला बळिचे द्वारीं द्वारपाळ ॥ ३ ॥ नामा ह्मणे हरिचे नकळती पवाडे ॥ नेणों भक्तापुढें वेडा झाला ॥ ४ ॥

॥ १८३ ॥ देऊनि भातुकें गळां घाली मिठी ॥ सखा जगजेठी भक्ती भावा ॥ १ ॥ आधार करोनि राहिले पंढरीं ॥ तेथें निरंतरीं प्रेम दावी ॥ २ ॥ नामा ह्मणे सेवा करोनियां शुद्ध ॥ संसार संबंध नाहीं तया ॥ ३ ॥

॥ १८४ ॥ देव आपण नाटक ॥ भक्तां दाखवी वैकुंठ ॥ १ ॥ देव आपण संसारी ॥ होसी भक्तांचा साहकारी ॥ २ ॥ देव आपण निराळा ॥ भक्तां दावितो सोहळा ॥ ३ ॥ नामा ह्मणे भक्तांसाठीं ॥ हात जोडी जगजेठी ॥ ४ ॥

॥ १८५ ॥ नेणे साही शास्त्रें तुज केशिराजा ॥ स्वरूपें कुबजा काय होती ॥ १ ॥ न मागें मी तैसा न मागें मी तैसा ॥ न मागें मी तैसा कदा काळीं ॥ २ ॥ कौरवांचे काजीं घेसी गाढेपण ॥ धर्मा घरीं पूर्ण

घोडे धुसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मीं कीर्ति वाखाणावी ॥ भक्तांसी गोसांवी होसी देवा ॥ ४ ॥

॥ १८६ ॥ पांडव भाग्याची वर्णावया थोरी ॥ शेषाची वैखरी नवर्णवे ॥ १ ॥ पीतांबर कास घालुनी वनमाळी ॥ काढी उष्टावळी आवडीनें ॥ २ ॥ विधीचा जनक रमा ज्याची दासी ॥ ध्यान अहर्निशीं करी शिव ॥ ३ ॥ रोमीं जयाचे ब्रह्मांडें अनंत ॥ चारी वेदां अंत न कळे ज्याचा ॥ ४ ॥ नामा ह्मणे रावे भक्तांचिये घरीं ॥ भाव देखोनि हरि भुलतसे ॥ ५ ॥

॥ १८७ ॥ पुंडलीकाचे भेटीं आणि भींवरेचे तटीं ॥ परब्रह्म उभें वाळवंटीं माये ॥ १ ॥ उभा वीटेवरी कर ठेउनी कटावरी ॥ उभा भीमातीरीं जगजेठी गे माय ॥ २ ॥ विठ्ठल कान्हा चरणीं वाकीं तोडर ॥ कासे पीतांबर पदकलीळा मनोहर गे माय ॥ ३ ॥ कान्हा विठ्ठल कान्हा प्रसन्न-वदन थोरा ॥ जो आर्थी करुणा करा हरि नामया दातारा ॥ ४ ॥

॥ १८८ ॥ देव दाखवी असा नाहीं गुरू ॥ जेथें जाय तेथें दगड शेंदुरू ॥ १ ॥ देव दगडाचा बोलेल कैचा ॥ कोणे काळीं त्यास फुटेल वाचा ॥ २ ॥ देव देव करितां शिणलें माझें मन ॥ जेथें जाय तेथें पूजा पाषाण ॥ ३ ॥ नामा तोचि देव हृदयीं पाहे ॥ नामा केशवाचे न सोडी पाय ॥ ४ ॥

---

## नामदेवास गुरूकरण्याविषयीं देवाचा बोध.

॥ १८९ ॥ देव आणि नामा उभे भीमातीरा ॥ प्रेमें येरयेरां ओंवाळिती ॥ १ ॥ देव ह्मणे नाम्या ऐकें गुह्य गोष्टी ॥ संसाराची तुटी जेणें होय ॥ २ ॥ श्रीगुरुवांचूनि मुक्ति तुज नाहीं ॥ भवनदी डोहीं नुतरसी ॥ ३ ॥ शरण गूरुसी झालिया सप्रेमें ॥ संसाराचा श्रम उतरूनी ॥ ४ ॥ गुरुवांचूनियां कैंचा मुक्तिठाव ॥ संसार हावाव कैसा होय ॥ ५ ॥ ह्मणूनि नाम्या तुवां गुरुसि जावें शरण ॥ तेणें भवबंधनें मुक्त होती ॥ ६ ॥ ऐसें ऐकूनियां नामा थरारिला ॥ मूर्च्छागत झाला भूमीवरी ॥ ७ ॥ भूमीलोळे नामा कंठ सद्ग-

दित ॥ डोळियां स्रवत अश्रुजळ ॥ ८ ॥ इतुकें देखोनियां द्रवला पुरुषोत्तम ॥ नाम्यासि सप्रेमें उचलीलें ॥ ९ ॥ नाम्या तुज काय वाटतसे दुःख ॥ संसाराचें सुख तुज झालें ॥ १० ॥ नामा ह्मणे देवा तुज ऐसा दाता ॥ मज भवव्यथा कवणेपरी ॥ ११ ॥ अनाथांचा नाथ तुझी ब्रिदावळी ॥ मज कां रे जाळी भवव्यथा ॥ १२ ॥ देव ह्मणे नाम्या गुरुवांचूनियां ॥ मुक्ति पावावया अव नाहीं ॥ १३ ॥ आनु नव्हे कांहीं व्युत्पत्ती ॥ नव्हे माझी प्राप्ति गुरूविणें ॥ १४ ॥ जाई नाम्या जाई गुरुसि शरण ॥ तुटे भवबंधन तुझें वेगीं ॥ १५ ॥ नामा ह्मणे देवा कवणा शरण जाऊं ॥ कोणाचा मीं होऊं शरणांगत ॥ १६ ॥ देव ह्मणे नाम्या विसोबा खेचरासी ॥ शरण तयासि जावें वेगीं ॥ १७ ॥ इतुकें ऐकूनियां नमियेलें देवा ॥ चालियेला तेव्हां विसोबापाशीं ॥ १८ ॥ चिंताग्रस्त आला नामा आवढ्यापासीं ॥ पुढें देऊळासि देखियलें ॥ १९ ॥ नामदेव तेव्हां गेला देऊळासी ॥ ते वेळीं कौतुकासि देखियलें ॥ २० ॥ देवावरी पाय ठेवूनि खेचर ॥ निजला परिकर निवांतचि ॥ २१ ॥ देखोनिया नामा पावोनि विस्मय ॥ कैसा हा प्राणि होय देव नेणे ॥ २२ ॥ उठी उठी प्राणिया आंधळा तूं काय ॥ देवावरी पाय ठेवियले ॥ २३ ॥ विसोबा खेचर बोले नामदेवा ॥ उठविलें जीवा कां रे माझ्या ॥ २४ ॥ देवाविण ठाव रिता कोठें आहे ॥ विचारूनि पाहे नामदेवा ॥ ॥ २५ ॥ जेथें देव नसे तेथें माझे पाय ॥ ठेवूनियां जाय विचारूनी ॥ २६ ॥ नामा पाहे अवघा जिकडे तिकडे देव ॥ कोठें रिता ठाव न देखेचि ॥ २७ ॥ इतुकें देखूनियां चरणीं घाली मिठी ॥ सांठवला सृष्टी अवघा देव ॥ २८ ॥ तिन्हीं त्रिभूवनीं आपण व्यापूनी ॥ आनंदें कोंदोनि राहियेला ॥ २९ ॥ श्रीगुरूचे पाय जिवें न विसंबत ॥ नामा वृत्ति सहित ओंवाळीत ॥ ३० ॥ डोळियाचा डोळा उघडिला जेणें ॥ आनंदाचें लेणें लेवविलें ॥ ३१ ॥ जन्ममरणाचें तोडिलें सांकडें ॥ कैवल्यचि पुढें दावियलें ॥ ३२ ॥ नामा ह्मणे माझी भक्ति हे माउली ॥ कृपेची साउली करी मज ॥ ३३ ॥

---

## गुरूची स्तुति.

॥ १९० ॥ सद्गुरुनायकें पूर्ण कृपा केली ॥ निजवस्तु दाविली माझी मज ॥ १ ॥ माझें सुख मज दावियेलें डोळां ॥ दिधली प्रेमकळा ज्ञान-

मुद्रा ॥ २ ॥ तया उतराई व्हावें कवण्या गुणें ॥ जन्म नाहीं येणें ऐसें केलें ॥ ३ ॥ नामा ह्मणे निकी दावियेली सोय ॥ न विसरावे पाय विठोबाचे ॥ ४ ॥

॥ १९१ ॥ पाषाणाचा देव बोलेचि ना कधीं ॥ हरि भव व्याधि केंवि घडे ॥ १ ॥ दगडाची मूर्त्ति मानिला ईश्वर ॥ परि तो साचार देव भिन्न ॥ २ ॥ दगडाचा देव इच्छा पुरवीत ॥ तरि कां भंगत आघातानें ॥ ३ ॥ पाषाण देवाची करिती जे भक्ति ॥ सर्वस्वा मुकती मूढपणें ॥ ४ ॥ प्रस्तराचा देव बोलत भक्तांतें ॥ सांगते ऐकते मूर्ख दोघे ॥ ५ ॥ ऐशाचें महात्म्य जे कां वर्णिताती ॥ आणि ह्मणविती तेणें भक्त ॥ ६ ॥ परंतु ते नर पामर जाणावे ॥ त्यांचे नायकावे बोल कानीं ॥ ७ ॥ धोंडा घडोनियां देव त्याचा केला ॥ आदरें पूजिला वर्षें बहु ॥ ८ ॥ तरी तो उतराई होय केव्हां काई ॥ बरवें हृदयीं विचारा हें ॥ ९ ॥ धोंडापाण्याविण नाहीं देव कोठें ॥ होता सान मोठें तीर्थ क्षेत्र ॥ १० ॥ द्वादशीचे गांवीं जाहला उपदेश ॥ देवाविण ओस स्थळ नाहीं ॥ ११ ॥ तो देव नामया हृदयीं दाविला ॥ खेचरानें केला उपकारु हा ॥ १२ ॥

॥ १९२ ॥ नाचूं कीर्तनाचे रंगीं ॥ ज्ञानदीप लावूं जगीं ॥ १ ॥ सर्व सांडुनी माझाई ॥ वाचे विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥ परेहुन परतें घर ॥ तेथें राहूं निरंतर ॥ ३ ॥ सर्वांचें जें अधिष्ठान ॥ तेंचि माझें रूप पूर्ण ॥ ४ ॥ अवघी सत्ता आली हाता ॥ नामयाचा खेचरी दाता ॥ ५ ॥

॥ १९३ ॥ नाशवंत देतां ब्रह्म येईल हाता ॥ ऐसी ज्याची कथा पुराणांत ॥ १ ॥ सद्गुरूचे पायीं देहासि अर्पितां ॥ तात्काळ मुक्तता हाता येते ॥ २ ॥ माया देवोनियां ब्रह्म घ्यावें हातीं ॥ ऐशा गुरुप्रति कां भजाना ॥ ३ ॥ नामा ह्मणे गुरूपायीं लाभ आहे ॥ मोक्ष तोही पाहें दास होतो ॥४॥

॥ १९४ ॥ मरण हे काया मरण हे माया ॥ मरण हे धाया कवणें गुणें ॥ १ ॥ आह्मा मरण नाहीं मरण तें कायीं ॥ सद्गुरूच्या पायीं राहे मना ॥ २ ॥ मरण सांगा स्वामी कवणिया गुणें ॥ संसार मरणें उरलें नाहीं ॥ ३ ॥ भक्ति अमरकंद रामनामीं वेध ॥ नामा ह्मणे प्रसाद विठोबाचा ॥ ४ ॥

॥ १९५ ॥ कृपेची साउली अखंड लाधली ॥ खेचर माउली भेटलिया ॥ १ ॥ आतां मज भय नाहीं पैं कोणाचें ॥ जन्म मरणाचें दुःख

गेलें ॥ २ ॥ बंधमोक्षाची फिटली काजळी ॥ समाधि लागली समाधीसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझें सर्वही साधन ॥ खेचरचरण न विसंबे ॥ ४ ॥

॥ १९६ ॥ भक्ति हेंचि भावे परब्रह्म पकान्न ॥ गुरुमुखें जेवण जेवीयलें ॥ १ ॥ अनुभव भात लयलक्ष कढी ॥ जेवणार गोडी घेत असे ॥ २ ॥ सुख शांति शाखा भावार्थ हा वडा ॥ जेवणार गाढा आत्माराम ॥ ३ ॥ दया क्षीरधारीं शांति पूर्णपोळी ॥ घृत हें कल्होळी प्रेम माझें ॥ ४ ॥ विषयाचा गूरळा थुंकोनि सांडिला ॥ नामा आंचवला संसारासीं ॥ ५ ॥

॥ १९७ ॥ स्वानंदांत पडोनियां जाती ॥ न संडी वासना चघळीत हस्तीं ॥ १ ॥ तैसें माझें मन मुरारी ॥ वासना धांवे विषयांवरी ॥ २ ॥ डोळियांचीं बुबुळें फुटोनियां जाती ॥ न संडी वासना हालवितों पातीं ॥ ३ ॥ ढोराचें पुच्छ मोडोनियां चांगा ॥ पुढती पुढती हालविती पैंगा ॥ ४ ॥ वोढाळ ढोरा बांधियेलें काष्ठ ॥ पुढती पुढती धरी तीच वाट ॥ ५ ॥ नामा ह्मणे माझी मुळी वासनाच खोटी ॥ खेचर विसा चरणीं घातलीसे मिठी ॥ ६ ॥

॥ १९८ ॥ सूर्याचा प्रकाश सर्व सृष्टीवरी ॥ धन्य तो अंतरीं सर्व काळ ॥ १ ॥ स्वर्गादि पाताळ सर्व पूर्ण जळें ॥ चातका न मिळे मेघाविण ॥ २ ॥ नारायण पूर्ण सर्व भूतांठायीं ॥ अभाग्यासि नाहीं तिहीं लोकीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे गुरु कृपेचें अंजन ॥ पायाळासी धन दिसे जैसें ॥ ४ ॥

॥ १९९ ॥ सुखाचे सोयरे भेटति अंतरीं ॥ बाहेरी भितरी दिधलें क्षेम ॥ १ ॥ सुखाची गवसणी घालोनियां मना ॥ विटली वासना वोल्हावली ॥ २ ॥ वाचे उपरम मन झालें तन्मय ॥ लागलासे लय पर लक्षीं ॥ ३ ॥ शांति क्षमा दया देती आलिंगन ॥ चित्त समाधान पाववीलें ॥ ४ ॥ परतलिया दृष्टी इंद्रियांच्या वृत्ती ॥ पावली विश्रांति ठायिं ठायीं ॥ ५ ॥ विष्णुदास नामा निजबोधें निवाला ॥ खेचरें दीधला अभय कर ॥ ६ ॥

॥ २०० ॥ सद्गुरूचे पाय जीवें न विसंबावे ॥ मन वळवावें वृत्ती सहित ॥ १ ॥ डोळीयाचे डोळे उघडीले जेणें ॥ आनंदाचें लेणें लेववीलें ॥ ध्रु० ॥ जन्ममरणाचें फेडिलें सांकडें ॥ कैवल्यचि पुढें दाखविलें ॥ २ ॥ मोहरले

तरु पुष्पफळभारें ॥ तेचि निर्विकार सनकादिक ॥ ३ ॥ नामा ह्मणे स्वामि खेचर माउली ॥ कृपेची साउली केली मज ॥ ४ ॥

॥ २०१ ॥ वेदांसि न कळे शास्त्रें पैं भांडती ॥ श्रुति विवादती ब्रह्मालागीं ॥ १ ॥ ते अवघेचि पैं मुक्त उपदेशधर्मे ॥ हरती कर्माकर्मे गुरूसेवे ॥ २ ॥ सेवेपरतें साधन नाहीं पैं उपदेश ॥ हरीसि सौरस आपेआप ॥ ३ ॥ नामा ह्मणे हरी गुरुआज्ञा काम ॥ भजन निष्काम गुरुसेवा ॥ ४ ॥

॥ २०२ ॥ उपजोनि सभाग्य तेचि एक झाले ॥ जिहीं विचारिलें आत्महित ॥ १ ॥ सांडोनि मीपण सद्गुरूच्या चरणा ॥ लागलों संपूर्ण भावार्थेसि ॥ ध्रु० ॥ तयाचें जें कांहीं सर्व मज ओझें ॥ नाहीं मज दुजें त्यासि कांहीं ॥ २ ॥ तयाचे हृदयीं संतपण प्रगटे ॥ द्वैतपण तुटे क्षणामाजीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मां विठोबाचे बोल ॥ सांपडली ओल तरावया ॥ ४ ॥

॥ २०३ ॥ सद्गुरू सारिखा सोइरा जीवलग ॥ तोडिला उद्वेग संसारींचा ॥ १ ॥ काय उतराई होऊं कवण्या गुणें ॥ जन्मा नाहीं येणें ऐसें केलें ॥ २ ॥ माझें सुख मज दाखविलें डोळां ॥ दिधली प्रेमकळा नाममुद्रा ॥ ३ ॥ डोळियाचा डोळा उघडिला जेणें ॥ लेवविलें लेणें आनंदाचें ॥ ४ ॥ नामा ह्मणे निकी सांपडली सोय ॥ न विसंबें पाय खेचराचे ॥ ५ ॥

॥ २०४ ॥ सुखाचा सुख तरु सद्गुरू खेचर ॥ स्वरूप साक्षात्कार दाखविला ॥ १ ॥ विठ्ठल पाहतां मावळलें मन ॥ ध्यानीं भरले नयन तन्मय झाले ॥ २ ॥ मी माझें होतें तें मजमाजि निमालें ॥ जळें जळ गिळिलें जयापरी ॥ ३ ॥ तेथें आनंद आनंदु ओळला परमानंदु ॥ नाम्या झाला बोधु विठ्ठलनामें ॥ ४ ॥

॥ २०५ ॥ माझें मन पाहे कसून ॥ चित्त नढळे तुजपासून ॥ १ ॥ मजवरी घाली घन ॥ परी मी न सोडीं चरण ॥ २ ॥ मान कापून देइन शीर ॥ पाहें कृपण कीं उदार ॥ ३ ॥ नामा ह्मणे खेचर माय ॥ आह्मा तारक तुझे पाय ॥ ४ ॥

---

## नामदेवाचे गुरु विसोबा खेचर यांचा नामदेवास बोध.

॥ २०६ ॥ तुझें निजसुख तुजपाशीं आहे ॥ शोधुनियां पाहें गुरूमुखें ॥ १ ॥ विवेकाची गोष्टी प्राप्त जरी होय ॥ तेणें तुज होय ब्रह्मप्राप्ति ॥ २॥ चित्तवृत्ति ज्याची स्वरुपीं वेधली ॥ एकरूप झाली ओंकारासी ॥ ३ ॥ खेचर ह्मणे जेथें ओंकार निमाला ॥ सहजींच झाला ब्रह्मरूप ॥ ४ ॥

॥ २०७ ॥ खेचरीं धरिली माव लिंगावरी ठेविला पाव ॥ पहावया भाव नामयाचा ॥ १ ॥ नामा तेथें आला देव नमस्कारिला ॥ देखोन बोलला वचन त्यासीं ॥ २ ॥ लिंगावरोनी चरण काढाजी वहिले ॥ दिसतां वरी भले करणी न कळे ॥ ३ ॥ तव येरू बोलिला नाम्या तूं भला ॥ मज नाहीं कळला देव तुझा ॥ ४ ॥ जेथें नाहीं देव तेथें ठेवी पाव ॥ सर्वज्ञ सदैव तूंची असती ॥ ५ ॥ मीपणें भूललों मज नकळेची कांहीं ॥ देव नसे ते ठायीं पाय ठेवी ॥ ६ ॥ तव नामा होय विचारिता शब्दाची कुसरी ॥ पाहतां निर्धारी सान नोहे ॥ ७ ॥ देवावीण ठाव हें बोलणेंची वाव ॥ परतोनी संदेह पडला मज ॥ ८ ॥ आपुले उमाणे आपण उमगावे ॥ मजसीं तारावें भवसागरीं ॥ ९ ॥ नामा धरी चरण अगाध तुमचें ज्ञान ॥ आपुलें नाम कोण सांगा स्वामी ॥ १० ॥ येरू ह्मणे खेचर पिसा पैं जाण ॥ लौकिकीं मिरवणें अरे नाम्या ॥ ११ ॥ नाम आणि रूप दोन्हीं जया नाहीं ॥ तोची देव पाहीं येर मिथ्या ॥ १२ ॥ जळ स्थळ आणि काष्ठ हे पाषाण ॥ पिंड ब्रह्मांड व्यापून आणूरेणू ॥ १३ ॥ सर्वत्र साक्षभूत हे जाणोनी पाहो ॥ खेचर ह्मणे नाम्यातें अवघा देवो ॥ १४ ॥

॥ २०८ ॥ नामदेवा काय करसी तीळ तुळसी ॥ उभा गा ठेलासी दर्भ जैसा ॥ १ ॥ भूका कांगा मरसी जेथिचा तेथें ॥ केशवराज तूतें आतुडेना ॥ २ ॥ नाहीं दया ध्यान ईश्वरीं भजन ॥ वायां वीण प्राण कां करितोसी ॥ ३ ॥ हरिभक्तिवीण जन्मलासी नरू ॥ ह्मणे विसोबाखेचरू अरे नाम्या ॥ ४ ॥

॥ २०९ ॥ श्रवणीं सांगितली मात मस्तकीं ठेवियला हात ॥ पदापिंडाविवर्जित केला नामा ॥ १ ॥ खेचरू विसा प्रेमाचा पिसा ॥ तेणें

नामा कैसा उपदेशिला ॥ २ ॥ तया सांगितलें गुज दाखविलें निज ॥ आतां पाल्हाळी तुज काय चाड ॥ ३ ॥ मग खेचरू ह्मणे मज ज्ञान हेंची गुरू ॥ तेणें अगोचरू केला नामा ॥ ४ ॥

॥ २१० ॥ सुखालागीं मन तुझें गीवसीत तळमळीं ॥ परी सुख आहे जवळी नकळे तुज ॥ १ ॥ दर्पणीं दीप्ति कीं दुग्धीं घृतशक्ति ॥ परी करणीवीण हातीं न लभेची जाण ॥ २ ॥ सुखालागीं सुख सोय दाखवीन पाहें ॥ अनुभवोनी होय सुखरूप ॥ ३ ॥ सुख तें शांति सुख तें दया क्षमीं ॥ सुख तें उपदेश मीं निर्विकारीं ॥ ४ ॥ सुख तें नैराश्य सुख हरिदास्य ॥ सुख तें विश्वास सदा वसे ॥ ५ ॥ सुख तें सत्संगती सुख तें नामीं प्रीति ॥ सुख तें विकृति विषय भोगीं ॥ ६ ॥ सुख तें एकांतवास सुख तें लौकीक त्रास ॥ सुख तें संरस स्वस्वरूपीं ॥ ७ ॥ ह्मणे खेचराविसा परीयसीं विष्णुदासा ॥ न घडे भरंवसा तरी अनुभवणें ॥ ८ ॥

॥ २११ ॥ भक्ति त्रिविधा षड्वीध नवविधा ॥ यजन याजन करोनी जीवातें दंडिताती सदा ॥ १ ॥ केशव परमात्मा नेणोनीयां जीं पतीतें ॥ पतनीं पडतां होती भूतें रया ॥ २ ॥ नाहीं रूप स्थिति नाहीं शब्द स्थिति ॥ नित्य तया वस्ती नीरंजनीं ॥ ३ ॥ एकलें परब्रह्म गुरुमुखें जाणावें ॥ तरी चुकवावें पुनरावृत्ति रया ॥ ४ ॥ ऐसें रे नामया वचन ऐक पुढें ॥ हे तो देवाविषीं श्रुतिचे निवाडे ॥ ५ ॥ श्रुती नेती नेती परतोनी आलिया ॥ खेचर पुढें सांगे नामया ॥ ६ ॥

॥ २१२ ॥ मेघावीण जळ जळेंवीण पूर ॥ नख न भिजे परी नाहीं उतार ॥ १ ॥ आहे तें बुडे नाहीं तें तरे ॥ लटकीयाचें खरें वागविसी ॥ २ ॥ खेचर विसा ह्मणे झालासी पिसा ॥ त्या देशाची आशा सांडीं नाम्या ॥ ३ ॥

॥ २१३ ॥ आधीं चैतन्य अपैतें करोनी ॥ मग संचरे तारुण्य वनीं ॥ कामक्रोध तुज देखोनी ॥ जाती पळोनी बारा वाटा ॥ १ ॥ तुज पाठी कवण धांवे ॥ कवण टाकी कवण पावे ॥ कामक्रोधें जग मोहावें ॥ कासी यासी खोववी पोटीं पाय ॥ २ ॥ माया मोहजाळ तुटेल ॥ पळेल पा काळ व्याळ ॥ कां रे स्मरसी ना गोपाळ ॥ मिथ्या व्याकुळ कांजेवीण ॥ ३ ॥ वैराग्य दृढ होई निरुता ॥ कासया भितोसी चपेट घाता ॥ परस्त्री तितुकी मानीं माता ॥ विषयीं निमिसा आल्यासाठीं ॥ ४ ॥ धर्माचेनी मार्गें नि-

घाला कर्ण ॥ शिवी चक्रवर्ती झाला जीवित्वहान ॥ तयामाजी सांग नाडला कोण ॥ लटकी झकवण कां बोलती ॥ ५ ॥ इंद्रिया गोड तें अरोगीजे ॥ मग धनीवरी धावा पोखारिजे ॥ काय सांगूं शहाणपण तुझें ॥ खेचरविसा ह्मणे अरे नामया ॥ ६ ॥

॥ २१४ ॥ पर्वतप्राय पापराशी होती दग्ध ॥ वाचेसी मुकुंद उच्चारितां ॥ १ ॥ अच्युत श्रीहरी केशव नरहरी ॥ माधव हरहरी रामकृष्ण ॥ २ ॥ नामासी साधन करिशील पूर्ण ॥ तें प्रपंचाचें मान उरों नेदी ॥ ३ ॥ उदासीन वृत्ति आचरावें कर्म ॥ नाहीं देहधर्म गुण माया ॥ ४ ॥ ऐसा हा अनकळीत मार्ग साधेल तुज ॥ खेचरविसा गुज सांगे नाम्या ॥ ५ ॥

॥ २१५ ॥ मूळ वदनाचा उदानू नेत्राचा ॥ अंगुळू हस्ताचा स्वामी माझा ॥ १ ॥ मुगूट जयाचा केवळ्या अगळीकाठी ॥ पवित्र तळवटी चरण ज्याचे ॥ २ ॥ सेलीते भागली पोकू वेडावले ॥ अंगुळ मागी झाली थकित तया ॥ ३ ॥ ढकारा वदनाचा आला वर्णावया ॥ जिव्हा चिरलिया नकळे त्यासी ॥ ४ ॥ सद्भावें शरण अवारू जोडूनी ॥ खेचरविसा चरणीं विनटला ॥ ५ ॥

॥ २१६ ॥ आप तेज वायु पृथिवी गगन ॥ मेलें तें कवण पांचामध्यें ॥ १ ॥ आह्मां मरण नाहीं मरशील काई ॥ आत्मवस्तु पाहीं श्रीगुरुमुखें ॥ २ ॥ जिताची मरण आलेंसें हाता ॥ मरण बोलतां लाज नये ॥ ३ ॥ खेचरविसा ह्मणे आह्मां मरण नाहीं ॥ कैसें मरण पाहीं आलें नाम्या ॥ ४ ॥

॥ २१७ ॥ येथोनि तेथवरी धांवोनियां गेलों ॥ कांहीं नाहीं तें पाहुनीयां आलों ॥ १ ॥ कोठें गेलों कोठें धावुनी आलों ॥ कांहीं नाहीं तें पाहुनीयां धालों ॥ २ ॥ खेचरविसा ह्मणे नामदेवा ॥ कांहीं तें तुह्मी मज दाखवा ॥ ३ ॥

॥ २१८ ॥ अधी चैतन्य आपै ते करी ॥ मग सवरें तारुण्य वनीं ॥ काम क्रोध तुज देखोनी ॥ जाती पळोनी बारा वाटा ॥ १ ॥ तुज पाठीं कोण धांवे ॥ कवण टाकी कवण पावे ॥ काम क्रोधें जग मोहावें ॥ कासयासी खावे पोटीपाये ॥ २ ॥ माया मोह जाळी तुटेल पळ ॥ आहे गरळ ॥ मिथ्या व्याकुळ ॥ काजेवीण ॥ ३ ॥ वैराग्ये दृढ होई नीरुता ॥ परस्त्री तीतुकी मानीपा माता ॥ कासया भीतोसी चपेट घाता ॥ विषया निमित्ता आल्यासाठीं ॥ ४ ॥ धर्माचेंनीमार्गें रीघाला कर्ण ॥ शीवी

चक्रवर्ती झाला जीवीत रहन ॥ तया माजी सांग नाडला कोण ॥ लटीकी झकव नको बोलतोसी ॥ ५ ॥ इंद्रियां गोड तें आरोगी जें ॥ मगध धनीवरी धावा पोकारीजे ॥ कायरे सांगो शाहाणपण तुझें ॥ खेचर-वीसा ह्मणे अरे नामया ॥ ६ ॥

---

## गुरूपदेशानंतर नामदेवास प्राप्त झालेली स्थिति.

॥ २१९ ॥ नामा स्वयंपाक करोनि बैसला ॥ केशव श्वानरूपें आला ॥ रोटी घेऊनि पळाला ॥ सर्वां भूतीं केशव ॥ १ ॥ हातीं घेऊनि तुपाची वाटी ॥ नामा लागला श्वानापाठीं ॥ तूप घे गा जगजेठी ॥ कोरडी रोटी कां खाशी ॥ २ ॥ तंव श्वान हांसोनी बोलिलें ॥ नामया तुज कैसें कळलें ॥ येरु ह्मणे खेचरें उपदेशिलें ॥ सर्वां भूतीं विठ्ठल ॥ ३ ॥

॥ २२० ॥ मरण सांगा स्वामी कवणीया गुणें ॥ संसारीं मरण उरलें नाहीं ॥१॥ आह्मा मरण नाहीं मेलें होतें काई ॥ श्रीगुरुच्यापायीं राहें मना ॥ २ ॥ मरणें हें काया मरणें हें माया ॥ मरे हे छाया कवण्या गुणें ॥ ३ ॥ भक्ति अमरकंदू रामनाम वंदुं ॥ नामयासी छंदु विठोबाचा ॥ ४ ॥

---

## संतस्तुति.

॥ २२१ ॥ ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले ॥ उद्धरावया आले दीन जना ॥ १ ॥ ब्रह्मादिक यांचे वंदिती पायवणी ॥ नाम घे वदनीं दोष जाती ॥ २ ॥ हो कां दुराचारी विषयीं आसक्त ॥ संतकृपें त्वरित उद्धारतो ॥ ३ ॥ अखंडित नामा याचा वास पाहे ॥ निशिदिनीं ध्याय सत्संगती ॥ ४ ॥

॥ २२२ ॥ संतांच्या चरणा द्यावें आलिंगन ॥ जीवें निंबलोण उतरावें ॥ १ ॥ तेथें तूं निश्चळ राहें माझ्या मना ॥ मग तुज यातना न्हती कांहीं ॥ धृ० ॥ संतांचें द्वारींचें होई द्वारपाळ ॥ तुटे मायाजाळ मोहपाश ॥ २ ॥

संतांचे प्रसाद सेविसीं उरले ॥ आयुष्य सरलें दुणावेल ॥ ३ ॥ नामा ह्मणे संत आहेत कृपासिंधु ॥ देती भक्तिबोधु प्रेमसुख ॥ ४ ॥

॥ २२३ ॥ कर्दळी फळ कर्पूर परिमळें भिन्न ॥ परि दोहींचें जन्म तें एकत्र जाण ॥ आत्मा कीं परमात्मा अभेद कीं भिन्न ॥ चंद्र सोमकांत शून्य महाशून्य ॥ १ ॥ सूर्य सूर्यकांतु प्रकाश एकु ॥ साधुसंत आरति रावो ना रंकु ॥ धृ० ॥ भ्रमरांच्या रुंजी मकरंद उधळती ॥ असाध्य साधनीं लागल्या ज्योति ॥ लयाचें लक्ष हारपली स्थिति ॥ ह्मणोनि साधुचरणी नित्य पंचारति ॥ २ ॥ गोदेचा उगमु तो ठाईचा ठाई ॥ आणिकें उदकें तीं चालीं प्रवाहिं ॥ तैसी साधु संत कृपा उन्मत्त देहीं ॥ सागरा भेटलीं क्षीरसिंधु तेही ॥ ३ ॥ सागरींचें उदक जगा विनवीत ॥ निवळूनि मागुतें पूर्ण भरीत ॥ तैसें अंतरीचें निर ओघें हे साधुसंत ॥ परि सागरा अंतरीं न वर्णवे मुक्त ॥ ४ ॥ तेथें अनुपम्या ऐकिजे शब्दाची रचना ॥ हें जाणतें नो जाणा अमृतखुणा ॥ हें रत्न कीं माणिक ऐसें अनुमाना ॥ तें पानबुडिया परसोबा लाधलें निधाना ॥ ५ ॥ दुधावरील सायेवरी साखर मेळवणी ॥ जैसी जिव्हा लोधली मधु लागुनि ॥ तेथील गौलता तें रहस्य लागलें ध्यानीं ॥ तें परसोबा लाधले येरां मूर्खां भुलवणी ॥ ६ ॥ तापलें लोहो तेणें शोखियेलें जीवन ॥ तैसें अंतरीं निवालें आपेआप आपण ॥ परसा भागवत हें सकळांचें जीवन ॥ विष्णुदास नामा त्याचे चरणीचे रजरेण ॥ ७ ॥

॥ २२४ ॥ वैष्णवांचे घरीं मांडिला पाहुणचार ॥ नामाचा वोगर वाढियेला ॥ १ ॥ घ्यारे ताटभरी जेवा पोटभरी ॥ आनंदगजरीं रामनाम ॥ २ ॥ होईल पाइख दुर्जना न सांगावें ॥ एकांतीं सेवावें नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ २२५ ॥ संतचरणरज सेवितां सहज ॥ वासनेचें बीज जळुनी जाय ॥ १ ॥ मग रामनामीं उपजे आवडी ॥ सुख घडोघडी वाढों लागे ॥ धृ० ॥ भेद भ्रम आटे आशापाश तुटे ॥ विश्रांति हे भेटे संतसंगें ॥ २ ॥ प्रेमें कंठ दाटे आनंदें पूर लोटे ॥ हृदयीं प्रगटे रामरूप ॥ ३ ॥ नामा ह्मणे सोपें साधन गोमटें ॥ साधे ज्या उत्कृष्ट पूर्वपुण्यें ॥ ४ ॥

॥ २२६ ॥ वैष्णवां घरीं सर्वकाळ ॥ सदा झणझणिती टाळ ॥ १ ॥ कण्या भाकरीचें खाणें ॥ गांठीं रामनाम नाणें ॥ धृ० ॥ बैसावयासी

कांबळा ॥ द्वारीं तुळसी रंगमाळा ॥ २ ॥ घरीं दुभे कामधेनु ॥ तुपावरी तुळसी पानु ॥ ३ ॥ फराळासीं पीठ लाह्या ॥ घडी घडी पडती पायां ॥ ४ ॥ नामा ह्मणे नेणाति कांहीं ॥ चित्त अखंड विठ्ठलपायीं ॥ ५ ॥

॥ २२७ ॥ रवि रश्मी धरोनि स्वर्गीं जाऊं येईल ॥ परी साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥ १ ॥ वैतरणी उतरोनि वैकुंठा जाऊं येईल ॥ परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥ धृ० ॥ स्वप्नींचा हा ठेवा साचहि होईल ॥ परिसाधु संगतीचा पार नकळे नकळे ॥ २ ॥ माय बाप बंधु भगिनी मिळे योनी ॥ परि साधुची मिळणी भाग्ययोगें ॥ ३ ॥ तपें व्रतें दानें गोविंद पैं भेटे ॥ परि साधु तंव न भेटे भाग्येंविण ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशवा बरा साधुसंग ॥ या वेगळा भवरोग न तुटे न तुटे ॥ ५ ॥

॥ २२८ ॥ ध्वजा कुंचे गरुडटके ॥ वैष्णव चालिले नेटके ॥ १ ॥ आलें वैष्णवांचें दळ ॥ भेणें पळे कळिकाळ ॥ २ ॥ तुळसी मंजरीचे भाले ॥ देखोनि यमदूत पळाले ॥ ३ ॥ ऐकोनि नामाचा गजर ॥ प्रेमें डुल्लतो शंकर ॥ ४ ॥ नामा ह्मणे भक्ति गाढी ॥ सेवा न सोडीं अर्ध घडी ॥ ५ ॥

॥ २२९ ॥ रखुमाई माता राई ओंवाळिती ॥ नित्य पंचारति हरिच्या दासा ॥१॥ नित्य भक्तां हरि यालागीं विनट ॥ पंढरीची पेठ वसविली ॥ ध्रु० ॥ धन्य हा निवृत्ति धन्य हा सोपान ॥ धन्य हा निधान ज्ञानदेव ॥ २ ॥ खेचर सांवता धन्य जनमित्र ॥ यांसि सकळ देत हरी ब्रह्म ॥ ३ ॥ पांडुरंग पिसा यालागीं जाहला ॥ मुक्ताई फावला पूर्ण पान्हा ॥ ४ ॥ नामा ह्मणे खूण जाणती सज्जन ॥ अखंड तें ध्यान निवृत्तिदेवीं ॥ ५ ॥

॥ २३० ॥ धन्य महाराज जन्मले संसारीं ॥ जे ध्याती अंतरीं नारायणा ॥ १ ॥ नारायण गाय नारायण ध्याय ॥ धन्य त्यासि माय प्रसवली ॥ २ ॥ प्रसवली तया कुळाचा उद्धार ॥ तो तरे निर्धार नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ २३१ ॥ प्रतिदिनीं स्वधर्म करी ॥ हरिमूर्ति नमस्कारी ॥ भावें भजन वसे शरीरीं ॥ तोचि भक्त हरीचा ॥ १ ॥ अनंत जन्मींचे कांट ॥ तेणेंचि केलें सपाट ॥ स्वधर्में करोनियां नीट ॥ शुद्धपक्ष हरि हरि ॥ धृ० ॥ तेंचि तापसा सामर्थ्य ॥ तेणेंचि जोडिलें तीर्थ ॥ त्याचे धरोनि मनोरथ ॥ हरिभजन पथीं लागला ॥ २ ॥ देवो त्याचा आखिला ॥ सत्त्वा न टळे तो कष्टविला ॥ अकर्मीं तोचि भला ॥ त्याचें धन्य जीवित्व ॥ ३ ॥ तोचि



सफळ सकळीं ॥ सदां निर्मळ सर्वकाळीं ॥ जो हरिनामें वाजवी टाळी ॥ तोचि समर्थ त्रिभुवनीं ॥ ४ ॥ नामा हरिरंगीं रंगला ॥ तेणें विठ्ठल संतोषला ॥ येऊनियां राहिला ॥ हृदयकमळीं आमुच्या ॥ ५ ॥

॥२३२॥ शुक सनकादिक जन चक्रवर्ती ॥ प्रऱ्हाद परिक्षिति बिभीषण ॥ १ ॥ बळि भीष्म नारद आणि उद्धव ॥ रुक्मांगद श्रुतिदेव इत्यादिक ॥ २ ॥ शास्त्राचें हें सार वेदांचें गहिंवर ॥ नामा परिकर कलियुगीं ॥ ३ ॥

॥ २३३ ॥ वैष्णवांमाजी एक बळी ॥ पृथु झाला दुजा महीतळीं ॥ हरि नांदे प्रऱ्हादाजवळी ॥ नारदें वनमाळि दान घेतला ॥ १ ॥ बिभीषणें पूजिला लंके हरी ॥ भीष्म देखिला द्वारके भितरीं ॥ अर्जुनें केला साहकारी ॥ सारथि हरि पांडवांचा ॥ २ ॥ उद्धवें तप केलें समर्थ ॥ अक्रूर नित्य वंदनार्थ ॥ गाई गोपिका गोपाळांत ॥ तो स्तन पीत यशोदेचे ॥ ३ ॥ नंदा वसुदेवा लाधलें ॥ बळिदेवें ऐसेंचि पुण्य केलें ॥ उग्रसेनें तप साधिलें ॥ रत्न साधिलें रुक्मिणीनें ॥ ४ ॥ गरुड हनुमंत शेषादिक ॥ नित्य झाले हरीचे सेवक ॥ चरणींच्या उदका शिवादिक ॥ नित्य मस्तक रेषा लाविती ॥ ५ ॥ ऐसा दुर्लभ हरिराजा ॥ वर्णितां होती चतुर्भुजा ॥ जड जिवां तारिल केशव माझा ॥ उभारोनि भुजा सांगे नामा ॥ ६ ॥

॥ २३४ ॥ आषाढी पर्वणी आला यात्राकाळ ॥ निघाले सकळ वारकरी ॥१॥ यांचे समागमें जात असे खुळें ॥ स्मरे वेळोवेळे विठ्ठलासीं ॥२॥ धन्य पुण्यतिथि आली एकादशी ॥ पावले क्षेत्रासी विश्वजन ॥ ३ ॥ स्नानविधि करोनि समस्तां भेटला ॥ कीर्तनीं बैसला हरिदास ॥ ४ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान सांवता ॥ नामयाची कथा ऐकताती ॥ ५ ॥ तंव तो ह्मणे करा नामाचा उच्चार ॥ टाळीचा गजर करोनियां ॥६॥ गोरियाचे नेत्रीं आले जळबिंदु ॥ मज कां गोविंदु विसरला ॥ ७ ॥ कांगा केशिराजा मोकळिलें मातें शरण कोणातें जाऊं आतां ॥८॥ तुजविण मज न दिसे निर्वाणीं ॥ माय बाप धनी गण गोत ॥ ९ ॥ आतां माझी लाज राखें पंढरिनाथा ॥ तुजविण आतां कोणी नाहीं ॥१०॥ अनाथाचा नाथ दिनाचा कैवारी ॥ पावला झडकरी आपुल्या दासा ॥११॥ गोरियाचे हात आले ततक्षणीं ॥ गर्जोनि नामध्वनि उभा ठेला ॥१२॥ सकळ संतजनीं देखोनि नयनीं ॥ टाळिया पिटोनि गर्जताती ॥ १३ ॥ निधडा ह्मणती भक्त हा वैष्णव ॥ अघटीत भाव नकळे याचा ॥१४॥ कैसा येणें केला ऋणि पंढरिनाथ ॥ आहे पंढरिनाथ याचे उदरीं

॥१५॥ पूर्वीं तो प्ऱ्हाद श्रवणीं ऐकिला ॥ किंवा हा देखिला संतांमधीं ॥१६॥ नामा येऊनियां चरणासीं लागला ॥ हृदयीं आलिंगिला भक्तराज ॥१७॥

॥ २३५ ॥ निवृत्ति सोपान आणि मुक्ताबाई ॥ चालताती पायीं चहूंकडे ॥ १ ॥ देवाशीं गुह्यार्थ केलासे एकांत ॥ ज्ञानदेवा हित आरंभिलें ॥ २ ॥ नामा ह्मणे अवघे बैसा एकीकडे॥ ऐकूं द्या निवाडगुज याचें ॥ ३ ॥

॥ २३६ ॥ निवृत्ति सोपान मुक्ताई धाकुटी ॥ धरियेला कंठीं पांडुरंग ॥ १ ॥ कळवळली मनीं करी दीर्घ ध्वनी ॥ आठवतो मनीं ज्ञानदेव ॥ २ ॥ विकळित झालें चित्त संत हे दुःखित ॥ नामा विवळीत तेथ होत असे ॥ ३ ॥

॥ २३७ ॥ तिघां जनालागीं केलें समाधान ॥ सांगितली खूण अंतरींची ॥ १ ॥ कलियुगीं जग आसाती करिती ॥ साहवेना कीं यांसीं कांहीं केल्या ॥ २ ॥ पापी उद्धरिले पतीत तारिले ॥ जड पावविले मोक्षपंथीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे यांचें करितां समाधान ॥ कळलें अंतःकरण मन यांचें ॥ ४ ॥

॥ २३८ ॥ निःसंगासिसंग नलगे आणिकाचा ॥ परमार्थ हा साचा गहन केला ॥ १ ॥ जड जीव यांचें हारपिलें अज्ञान ॥ नेलें उतरून भवसिंधु ॥ २ ॥ ज्ञानियासि केली सिद्ध संजिवनी ॥ डुल्ले तो निर्जनीं एक तारूं ॥ ३॥ नामा ह्मणे सत्य माझें हें बोलणें ॥ करी निंबलोण पदीं त्याच्या ॥ ४ ॥

॥ २३९ ॥ जैसा वृक्ष नेणे मान अपमान ॥ तैसे ते सज्जन वर्ततातीं ॥ १ ॥ येऊनियां पूजा प्राणि जे करिती ॥ त्याचें सुख चित्तीं तया नाहीं ॥ २ ॥ अथवा कोणी प्राणि येऊनि तोडिती ॥ तया न ह्मणती छेदूं नका ॥ ३ ॥ निंदास्तुति सम मानिती जे संत ॥ पूर्ण धैर्यवंत साधु ऐसे ॥ ४ ॥ नामा ह्मणे त्याची जरी होय भेटी ॥ तरी जीव शिवा गांठी पडुनी जाय ॥ ५ ॥

॥ २४० ॥ नामाची आवडी तोचि जाणा देव ॥ न धरा संदेह मनांमाजीं ॥ १ ॥ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणता ॥ आणूनि संमता संतांचिया ॥ २ ॥ नामा ह्मणे तया आणिक नाहीं साधन ॥ ऐसें हें वचन बोलों नये ॥ ३ ॥

॥ २४१ ॥ धना जाय घरीं नित्य उभा हरी ॥ एकनाथा घरीं धोतरें धूत ॥ १ ॥ कबीराची पांजणी करी चक्रपाणी ॥ जनीसवें शेणी वेंचूं लागे ॥ २ ॥ बोधल्याचें शेत पेरी श्रीअनंत ॥ नामयासांगातें केशव हरी ॥ ३ ॥ गोऱ्या कुंभाराचीं मडकीं घडी अंगें ॥ चोख्यामेळ्यासंगें ढोरें ओढी ॥ ४ ॥ रोहिदासाचें कुंड धुतो श्रीगोपाळ ॥ सांवत्याचा मळा खुरपूं लागे ॥ ५ ॥ नामा ह्मणे देव भक्तांचा वल्लभ ॥ मागें पुढें उभा पांडुरंग ॥ ६ ॥

॥ २४२ ॥ यम सांगूं गेला वैकुंठा ॥ देवा सांभाळाजी आपुल्या मठा ॥ आह्मी नवजाऊं तयांचिया वाटा ॥ वैष्णवदूत नागवती ॥ १ ॥ कुंभीपाक पडला ओस ॥ दूतां लागला त्रास ॥ देवा कोपेल महेश ॥ ह्मणोनि सांगावया आलों ॥ २ ॥ देवा तुह्मीं एक वोखटें केलें ॥ गंगेसि मृत्युलोकासीं पाठविलें ॥ तेणें थोर कार्य नाशिलें ॥ हा प्रसाद गौतमाचा ॥ ३ ॥ ऐसे वैष्णव दूतीं गांजिलों ॥ तुजप्रति सांगावया आलों ॥ देवें पाहिजे मना आणिलें ॥ माझें साह्य करावें स्वामी ॥ ४ ॥ विशेष शिंपी नामा ॥ तो पंढरीये पुरुषोत्तमा ॥ हाचि बोल ऐकुनी प्रेमा ॥ त्याच्या शिवाणा न जावें ॥ ५ ॥

॥ २४३ ॥ यम सांगे दूतां कानीं ॥ तुह्मी जातां मेदिनी ॥ विष्णुभक्त चुकवूनि ॥ येर बांधोनि आणावे ॥ १ ॥ दूत सांगती यमा ॥ दिंडीपुढें चाले नामा ॥ ते नागविती आह्मा ॥ विष्णुदूत ह्मणोनी ॥ २ ॥ जे नेणती धर्मवेळा ॥ वाचे न उच्चारिती गोपाळा ॥ तयांसि जाचवावें वेळोवेळां ॥ एकवीस कुळांसहित ॥ ३ ॥ जे न करिती हरिची भक्ति ॥ तयांसि जाचवावें पुढतांपुढती ॥ रघुनाथनाम ज्याच्या कंठीं ॥ त्याच्या वाटे नवजावें ॥ ४ ॥ दिंडी पताका टाळघोषाच्या गजरीं ॥ नाद उठताति अंबरीं ॥ तेथें पाड नाहीं काळाचा ॥ शिंपी नामा दळपति केशव रायाचा ॥ ५ ॥

॥ २४४ ॥ आला वैष्णवांचा मेळ ॥ पळालाहो कळिकाळ ॥ धृ० ॥ आले आले हरिदास ॥ कळिकाळावरी घाला कास ॥ १ ॥ कलमषा पडिला धाक ॥ ते पळाली देउनी हाक ॥ २ ॥ पैल नामा केशवाचा ॥ सवें मेळू वैष्णवांचा ॥ ३ ॥

॥ २४५ ॥ सर्वांभूतीं पाहें एक वासुदेव ॥ पुसोनियां ठाव अहंतेचा ॥ १ ॥ तोचि संतसाधु ओळखावा निका ॥ येर ते आईका मायाबद्ध

॥ २ ॥ देखिलिया धन मृत्तिकेसमान ॥ नवविधा रत्नें जैसे धोंडे ॥ ३ ॥ काम क्रोध दोघे घातले बाहेरी ॥ शांति क्षमा घरीं राववीत ॥ ४ ॥ नामा ह्मणे नाम गोविंदाचें वाचे ॥ विसंबेना त्याचे क्षणमात्र ॥ ५ ॥

॥ २४६ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताई ॥ ह्मणती ज्ञान कायी कथूनिया ॥ १ ॥ भक्तिचीया बळें देव पैं जिंकीला ॥ ऋणायित केला कैसा येणें ॥ धृ० ॥ धन्य ते भाविक नामा आणि कबीर ॥ रोहिदास चांभार बहिरा पिसा ॥ २ ॥ त्यांची पायधुळी वंदितां कपाळीं ॥ वंशहि समूळीं उद्धरती ॥ ३ ॥ नामा ह्मणे मुक्ताबाई ऐक स्पष्ट ॥ भक्तिहूनि श्रेष्ठ आणिक नाहीं ॥ ४ ॥

॥ २४७ ॥ सांडोनि नित्य नेम कर्म ॥ बोलति कळिकाळाचें वर्म ॥ १ ॥ नामधारक नामाचे ॥ झालें डिंगर केशवाचे ॥ २ ॥ टाळ मृदंग वाजती ॥ टके पताका शोभती ॥ ३ ॥ कंठीं तुळसीच्या माळा ॥ वज्रपंजराचा टिळा ॥ ४ ॥ शंख चक्र मुद्रा धरणें ॥ अंगीं मिरवती भूषणें ॥ ५ ॥ संतरज उधळले ॥ तेणें सर्वांग डवरलें ॥ ६ ॥ सहस्र नामें गर्जित ॥ तेणें पळाले यमदूत ॥ ७ ॥ नामा ह्मणे ते माझे सखे ॥ स्वामी विठोबा सारीखे ॥ ८ ॥

॥ २४८ ॥ उठा पांडुरंगा भक्तजनकैवारी ॥ सेवकजन द्वारीं तिष्ठताती ॥ १ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान हा पाहीं ॥ आली मुक्ताबाई चांगदेव ॥ २ ॥ खेचर विसोबा असनदास सुदामा ॥ चोखा पुरुषोत्तमा आला असे ॥ ३ ॥ भैराळा जनक वत्सल तो नारा ॥ विठा सारंगधरा आला असे ॥ ४ ॥ परिसाभागवत सांवता नरहरी ॥ चोखामेळा द्वारीं भानूदास ॥ ५ ॥ नटनाट्यें कुसरी कान्होपात्रा द्वारीं ॥ चंवरें विंझणे हरी जाणविती ॥ ६ ॥ नाचगाण अनंत नरसीपुरीं मेहेता ॥ तोहि पंढरिनाथा आला असे ॥ ७ ॥ मच्छिंद्र गोरक्ष चर्पटी चौरंगी ॥ गोपीचंद योगि आला असे ॥ ८ ॥ विडा तो पिंगळा सूक्ष्म सा अबला ॥ षड्स गोपाळा घेउनि आल्या ॥ ९ ॥ तेथें टाळ दिंडी घेउनियां नामा ॥ भेटों पुरुषोत्तमा आला असे ॥ १० ॥

॥ २४९ ॥ लोभ सांडिला सर्वांचा ॥ संग केला विठ्ठलाचा ॥ १ ॥ केला निधडा निःशंक ॥ नाचे गाये कवतुकें ॥ २ ॥ प्रेमभरित सर्वदां ॥ मुखीं हरिनाम गोविंदा ॥ ३ ॥ ऐसें सर्वकाळ गाये ॥ भावें विठोबाचे पाय ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐके हरी ॥ दासी जनीची वाट करी ॥ ५ ॥

॥ २५० ॥ क्रिया कर्म धर्म तिहीं केलें सांग ॥ जिहीं पांडुरंग देखियेला ॥ १ ॥ ओळखोनि मनें धरिला मानसीं ॥ उभा अहर्निशीं हृदय कमळीं ॥ २ ॥ निजानंदबोधें नामाचेनि छंदें ॥ डोलती आनंदें वोसंडत ॥ ३ ॥ नाहीं देहस्मृति निमाली वासना ॥ मावळली कल्पना भावाभाव ॥ ४ ॥ अखंड विदेही रजतमा वेगळे ॥ भोगिती सोहळे प्रेमसुख ॥ ५ ॥ त्याचिये द्वारींचा झालोंसें सांडोवा ॥ ह्मणोनि केशवा पढिये नामा ॥ ६ ॥

॥ २५१ ॥ तिन्ही देव जैसे परब्रह्मिचे ठसे ॥ जगीं सूर्य जैसे उगवले ॥१॥ धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान ॥ धन्य तो निधान ज्ञानदेव ॥ २ ॥ उपजतचि ज्ञानी हें वर्म जाणोनी ॥ आले लोटांगणीं चांगदेव ॥ ३ ॥ प्रत्यक्ष पैठणीं भटीं केला वाद ॥ बोलविला वेद ह्मैसीपुत्रा ॥ ४ ॥ सोहंसुकृताच्या सोडोनियां गांठी ॥ केलीसे मराठी गीता देवी ॥ ५ ॥ नामा ह्मणे सर्व सुकृत लाहिजे ॥ एक वेळा आइजे अळकावतीं ॥ ६ ॥

॥ २५२ ॥ आशा नाहीं ज्याला ॥ देव कां मारी तयाला ॥ १ ॥ जेव्हां सुखाचि उन्नती ॥ मोह पायांसि लागती ॥ २ ॥ सर्वां चित्तीं समभाव ॥ सर्व मानी वासुदेव ॥ ३ ॥ नामा ह्मणे अंगीं प्रेम ॥ मुखीं विठोबाचें नाम ॥ ४ ॥

॥ २५३ ॥ आपुलें शरीर घालूनियां पुढें ॥ पडे वाडेंकोडें सर्व भावें ॥१॥ नाम आवडतीं नानाभूत सृष्टि ॥ देखेन मी दृष्टीं ब्रह्मरूप ॥ २ ॥ विष्णुरूप सर्व भावें अखंडित ॥ मानी सर्वभूत आत्मा माझा ॥ ३ ॥ नामा ह्मणे सत्य सत्य जे बोलती ॥ त्यांचे पायिंची माती इच्छितसें ॥ ४ ॥

॥ २५४ ॥ सदां विचरती जनीं वनीं रानीं ॥ मुखीं चक्रपाणि जपतसे ॥ १ ॥ विरक्ताची मात असे कोण्या गुणें ॥ नामाचें चिंतन योगिराज ॥ २ ॥ तेव्हां योगियासी कीर्तनाचे ध्यास ॥ मुक्तीचारी त्यास हात जोडी ॥ ३ ॥ पंढरीस उभा राहे पांडुरंग ॥ तीर्थ चंद्रभागा नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ २५५ ॥ जयाचेनि तीर्थ आलें तीर्थपणा ॥ केली सांठवण हृदयीं ती ॥ १ ॥ नवल महिमा हरिदासां जीवीं ॥ तीर्थें उपजवी त्यांचे कुसी ॥ २ ॥ वाराणसीं प्राणि मरे अंतीं कोणी ॥ तया चक्रपाणि नामें तारी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तीर्थें तया येती भेटी ॥ वोळंगती दृष्टी त्रिभुवना ॥ ४ ॥

॥ २५६ ॥ सत्त्वसमाधानि कर्मनिष्ठ जाण ॥ अखंडित ध्यान रामकृष्ण ॥ १ ॥ सत्संग सर्वदा साक्ष सर्व देहीं ॥ सर्वांभूतीं पाहीं अंशमात्रें ॥ २ ॥ आपणासमान सर्वत्र पाहती ॥ अन्य सर्वांभूतीं रामविष्णु ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें सकळिके संमत ॥ नामीं सदोदित भक्ति मार्ग ॥ ४ ॥

॥ २५७ ॥ गौतम वसिष्ठ आणि विश्वामित्र ॥ भारद्वाज अत्रि कश्यपादि ॥ १ ॥ बळि हनुमंत बिभीषण नळ ॥ दुष्ट अजामिळ वाल्हा श्रेष्ठ ॥ २ ॥ उद्धव अर्जुन अंगद अगस्ति ॥ सर्वांभूतीं भक्तिभाव ऐक्य ॥ ३ ॥ नामा ह्मणे सदा साधु संत जन ॥ जनीं जनार्दन आह्मां एक ॥ ४ ॥

॥ २५८ ॥ माझे मायबाप साधुसंतजन ॥ माझे जीवप्राण अंतरींचे ॥१॥ भवभयाहूनि तारियेलें मज ॥ बाळें भोळें गुज प्रेम दावी ॥ २ ॥ रंकाहूनि रंक झालों मी सेवक ॥ ब्रह्मादिक देख इच्छिती सुख ॥ ३ ॥ नामा ह्मणे संतभाग्य अलौकिक ॥ शुद्ध निष्कलंक पुण्यरूप ॥ ४ ॥

॥ २५९ ॥ तोचि पुराणीक जो होय कृतार्थ ॥ विषयीं विरक्त विधि पाळी ॥ १ ॥ मानी तो हरिदास ज्या नामीं विश्वास ॥ सर्वस्वें उदास देहभावीं ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसे संत भेटावे गा देवा ॥ त्यांलागीं केशवा हृदय फुटे ॥ ३ ॥

॥ २६० ॥ पत्रावळी काढी वैकुंठनायक ॥ धांवूनियां शुक आला तेथें ॥ १ ॥ दाटी पाहूनी द्वारीं मानसीं विचारी ॥ जावया भितरीं काय काज ॥ २ ॥ हा वाहे प्रसाद स्वहस्तें अनंत ॥ वेंचोनियां शीत घाली मुखीं ॥ ३ ॥ घंटानाद वाजे लक्ष द्विजपंक्ति ॥ अक्षयी वाजती वेळोवेळां ॥ ४ ॥ ऐकोनि विस्मित ऋषिसमुदाव ॥ पुसे धर्मराव देवाजीसीं ॥ ५ ॥ सांगतसे खूण वैकुंठनायक ॥ ब्रह्मनिष्ठ एक आला येथें ॥ ६ ॥ तेथूनि उठले धर्म नारायण ॥ बाहेर येऊन पाहाताती ॥ ७ ॥ शुकाचिया मिषें व्यासाचा नंदन ॥ सांगतसे खूण जगदीश ॥ ८ ॥ धरूनियां करीं नेला तो भितरीं ॥ नामा ह्मणे करीं पूजा त्याची ॥ ९ ॥

॥ २६१ ॥ ज्ञानराज माझी योग्यांची माऊली ॥ जेणें निगमवल्लि प्रगट केली ॥ १ ॥ गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी ॥ ब्रह्मानंद लहरी प्रगट केली ॥ २ ॥ अध्यात्म विद्येचें दाविलेंसे रूप ॥ चैतन्याचा दिप उजळिला ॥ ३ ॥

छपन्न भाषेचा केलासे गौरव ॥ भवार्णवीं नाव उभारिली ॥ ४ ॥ श्रवणाचे मिषें बैसावें येऊनी ॥ सामराज्य भुवनीं सुखी नांदे ॥ ५ ॥ नामा ह्मणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी ॥ एक तरी ओंवी अनुभवावी ॥ ६ ॥

॥ २६२ ॥ आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळां ॥ माझिया सकळां हरिच्या दासां ॥ १ ॥ कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं ॥ हे संतमंडळी सुखी असो ॥ २ ॥ अहंकाराचा वारा न लागो राजसां ॥ माझ्या विष्णुदासां भाविकांसीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे तया असावें कल्याण ॥ ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २६३ ॥ कांरे पुंड्या मातलासी ॥ उभें केलें विठ्ठलासी ॥ १ ॥ ऐसा कैसा तूं रे धीट ॥ मागें भिरकाविली वीट ॥ २ ॥ युगें झालीं अठ्ठाविस ॥ अझून कांरे न ह्मणसी बैस ॥ ३ ॥ नामा ह्मणे पुंडलीका ॥ भक्तांमाजि तूंची निका ॥ ४ ॥

॥ २६४ ॥ संताचा महिमा कोण जाणे सीमा ॥ शीणला हा ब्रह्मा बोलवेना ॥ १ ॥ संताची हे कळा पाहतां नकळे ॥ खेळोनियां खेळ वेगळाचि ॥ २ ॥ संताचिया पारा नेणें आवतारा ॥ ह्मणती याच्या पारा कोण जाणे ॥ ३ ॥ नामा ह्मणे धन्य धन्य भेट झाली ॥ कल्पना निमाली संता पायीं ॥ ४ ॥

॥ २६५ ॥ संताचें लक्षण ओळखावया खूण ॥ जो दिसे उदासीन देहभावा ॥ १ ॥ सतत अंतरीं प्रेमाचा जिव्हाळा ॥ वाचे वसे चाळा रामकृष्ण ॥ २ ॥ त्या संताचे चरण देखीले मीं दृष्टीं ॥ जळतीं कल्पकोटी पापराशी ॥ ३ ॥ जयाच्या हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा ॥ जीवें भावें गोपाळा न विसंबती ॥ ४ ॥ त्याचे आंगणीचा होईन सांडावा ॥ मग तूं केशवा नुपेक्षिसी ॥ ५ ॥ तुझ्या ध्यानीं ज्याचें सदा भरलें मन ॥ विश्व तूंचि ह्मणोन भजती भावें ॥ ६ ॥ त्याच्या उष्टावळींचा होईन मागता ॥ तरीच पंढरीनाथा भेटी देसी ॥ ७ ॥ ऐसे नित्यानंदें बोधें जे निवाले ॥ ते जीवावेगळे न करीं नाम्या ॥ ८ ॥

॥ २६६ ॥ नित्य सर्वकाळ पुण्याचिया राशी ॥ हरिनाम आलेया जिव्हेसी ॥ नित्य तपानुष्ठानाच्या राशी कोटी यज्ञासी लाभ झाला ॥ १ ॥

धन्यधन्य साचा वंश ॥ जे जे रतले नामास ॥ रामनामीं नित्य सौरस ॥ ते विष्णुदास पवित्र जाणा ॥ २ ॥ पवित्र ते स्वधर्मीं ज्यासीं सर्वकाळ नेम नामीं ॥ तयाचें नाम पूर्णकामी ॥ मनोरथ पुरतील ॥ ३ ॥ नामा जपे नाम हरीचें ॥ सार्थक केलें संसाराचें ॥ ओझें फेडिलें पूर्वजन्मींचें ॥ हरि स्मरण केलिया ॥ ४ ॥

॥ २६७ ॥ नावडे निजांगना शेजेवरी रुचेसी ॥ कीं पतिसेजे जेविं व्यभिचारिणी अप्रीत जैसी ॥ १ ॥ गांधी विष संग्रहीत भक्षणाची नाहीं प्रीत ॥ चकोरा देखत सिद्धि अमावास्या ॥ २ ॥ याच परी संत वर्ते प्रपंच देह कर्मीं ॥ समूळ बुडे ब्रह्मीं ब्रह्मपणें ॥ ३ ॥ पोसणा पुत्र लटकेचि बाबा ह्मणे ॥ स्वपितयातें अंतरुनि पिंडदान करणें ॥ ४ ॥ बहु रूपि स्त्रियेचे कटाक्ष इतरा दावी ॥ आपण जाणत जीवीं हें मीं नव्हे ॥ ५ शत्रु सभे नाना उपचार होती ॥ ते न लगती कांहीं चित्तीं भूपा ॥ ६ ॥ नामा ह्मणे हृदयभानीं योगि निरंजन मनीं ॥ मिथ्या विनोद कानीं क्षणिक जैसा ॥ ७ ॥

॥ २६८ ॥ भक्त केशवाचे आले ॥ दूत यमाचे पळाले ॥ १ ॥ भक्त हरीचे चालिले ॥ हातीं हरिनामाचे भाले ॥ २ ॥ तळपे शांतीचे ओढण ॥ घेती स्वानंदें उड्डाण ॥३॥ नामा ह्मणे निजदास ॥ कळिकाळाचे भरवसे ॥४॥

---

## नामदेव चरित्र.

॥ २६९ ॥ शिंपियाचे कुळीं जन्म मज झाला ॥ परि हेतु गुंतला सदाशिवीं ॥ १ ॥ रात्रि माजि शींवी दिवसामाजि शींवी ॥ आराणुक जीवीं नाहीं माझ्या ॥ २ ॥ सुई आणि सातुळी कात्री गज दोरा ॥ मांडिला पसारा सदाशिवीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे शींवी विठोबाचे अंगीं ॥ त्याचेनि मीं जगीं धन्य झालों ॥ ४ ॥

॥ २७० ॥ कल्याणींचा शिंपी हरिभक्त गोमा ॥ त्याची कांता उमा नरहरि भजनीं ॥ १ ॥ सरिता सुकृताचि त्या पोटीं उत्पन्न ॥ झाली संबोधन गोणाबाई ॥ २ ॥ गोणाई दामशेटी झालें पाणिग्रहण ॥ संसारीं असोन नरसी गांवीं ॥ ३ ॥ गोत्र संज्ञा ऐका पूर्वजांची सहज ॥ गाधिज भारद्वाज

दोनीं कुळें ॥ ४ ॥ आऊबाई कन्या झाली गोणाईसीं ॥ पुढें देवा नवसी पुत्रा साठीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे होतें विठोबाचे मनीं ॥ तेंचि नित्य जननी नवस करी ॥ ६ ॥

॥ २७१ ॥ नरसीब्रह्मणीचा दामाशेट शिंपी ॥ केशिराजरूपीं मग्न असे ॥ १ ॥ ग्रामाचे बाहिर देवालय मूर्तिचें ॥ तेथें भजन त्याचें एकनिष्ठ ॥ २ ॥ मूर्तीसि नैवेद्य दाविल्यावांचूनि ॥ न करी भोजन दामाशेटी ॥ ३ ॥ त्याचिये स्त्रियेचें नाम गोणाबाई ॥ पोटीं पुत्र नाहीं सेवा करी ॥ ४ ॥ देवानें दिधलें शुक्तिकाकमळ ॥ ह्मणे उकलेल नववेमासीं ॥ ५ ॥ भरतां नवमास गरोदरी दिसे ॥ शिंपी वाढतसे आपोआप ॥ ६ ॥ शुक्ति उकलितां प्रगटलें बाळ ॥ गर्भचिन्हें सकळ मावळलीं ॥ ७ ॥ नामदेव नाम ठेविलें घेतलें ॥ पान्हा तयेवेळीं फुटलासे ॥ ८ ॥ झाला असे थोर पांचा वरुषांचा ॥ नेम नैवेद्याचा त्याचे हातीं ॥ ९ ॥ प्रथम दिवशीं दूध घेउनि गेला ॥ देवासि बोलला दूध पीई ॥ १० ॥ पाषाण. प्रतिमा न पी कोणेकाळीं ॥ लोळणी घातली नामदेवें ॥ ११ ॥ हें तों कलियुग तुज मज उपसर्ग ॥ घरा आला मग विष्णुदास ॥ १२ ॥ मातेसि तो सांगे देव दूध प्याला ॥ तंव ती ह्मणे त्याला सांडलें असे ॥ १३ ॥ दुसरे दिवशीं पाहतां तैसेंचि जाहलें ॥ दामाशेटी भ्याले मनामाजी ॥ १४ ॥ चोरोनि पाहिलें तैसेंचि देखिलें ॥ दूध तें वर्जिलें त्याचे हातीं ॥ १५ ॥ दिवसें दिवस नामा थोरचि जाहला ॥ विवाह तो केला पितयानें ॥ १६ ॥ प्राक्तनाचे योगें भरलासे ओहटा ॥ पाडितसे वाटा चोरा संगें ॥ १७ ॥ ब्राह्मण कापडी गरीब सावडी ॥ केली प्राणघडी बहुतांची ॥ १८ ॥ नायके सर्वथा वडीलांचा शब्द ॥ बाच्छायें तामजाद पाठविले ॥ १९ ॥ मारोनियां तेणें सर्वहि चोहोटा ॥ फौजा सारनेटा पाठविल्या ॥ २० ॥ चौऱ्यांशीं राऊत नाम्यानें मारिले ॥ चहूंकडे झाले भयाभीत ॥ २१ ॥ थोरली विशाळ बैसावया घोडी ॥ त्यावरी देशधडी करीतसे ॥ २२ ॥ नित्य नेम असे तयाचा तत्त्वता ॥ आंवढ्या नागनाथा दर्शनाचा ॥ २३ ॥ एके दिवशीं नामा आला दोनप्रहरा ॥ ब्राह्मण मुखद्वारा अभिषेक ॥ २४ ॥ दर्शनासि नामा जातां ॥ नैवेद्य दावितां उभा तेथें ॥ २५ ॥ तेथें स्त्री शूद्राची होती एक अनाथ ॥ कडीयेसि सुत घेउनी उभी ॥ २६ ॥ तिचीये बाळकें घेतलासे छंद ॥ ह्मणे मज नैवेद्य मागून देई ॥ २७ ॥ नायके सर्वथा तिनें पुडसाविलें ॥

नाम्याचें कळवळलें चित्त तेव्हां ॥ २८ ॥ ह्मणे कां कुमरा मारितेसी मूढे ॥ तरी काय घालूं हाडें नाम्या यासीं ॥ २९ ॥ चौऱ्यांशीं स्वारांत भ्रतार पडला ॥ नामा नोळखिला तेव्हां तिनें ॥ ३० ॥ तेव्हां नामदेव मनांत खोंचला ॥ ऐसे सकळांला कष्ट होती ॥ ३१ ॥ आहा सदाशिवा काय करूं आतां ॥ बाहेर मागुता आला वेगीं ॥ ३२ ॥ घोडी वस्त्र सर्व दिधले ब्राह्मणा ॥ अनुताप जाणा केला सखा ॥ ३३ ॥ सुरी एक करीं आपण एकला ॥ देउळांत गेला तांतडीनें ॥ ३४ ॥ ह्मणे सदाशिवा ऐक महादेवा ॥ यमजाच भोगावा कोणें आतां ॥ ३५ ॥ मस्तकांत सुरी घालूनि कर्वती ॥ धार लिंगावरुती पाडितसे ॥ ३६ ॥ पुजारी धांवले नाम्यासि धरिलें ॥ शस्त्र तें घेतलें हिरोनियां ॥ ३७ ॥ बांधोनिया पाय पडला शिवद्वारीं ॥ उपहास करी सर्व जन ॥ ३८ ॥ तंव नागनाथ ह्मणे नामदेवा ॥ पंढरी येथवां जाई आतां ॥३९॥ हरील तो दोष करील पावन ॥ वाढेल महिमान तुझें तेथें ॥ ४० ॥ यात्रेचे संगती नामा तो निघाला ॥ मस्तक बांधिला आंवळोनि ॥ ४१ ॥ माशांची घोंगाणी जनांची निंदणी ॥ सोशी अंतःकरणीं नामदेव ॥ ४२ ॥ आला पैल तीरा भरलीसे भिंवरा ॥ अपार हे यात्रा उतरती ॥ ४३ ॥ देवें भक्तां हातीं सांगून पाठविलें ॥ नामदेव आले घेऊं नका ॥ ४४ ॥ परम पातकी अघोर चांडाळ ॥ त्यासिं माझे जवळ आणूं नका ॥ ४५ ॥ ऐसें नामयासिं कळलें वर्तमान ॥ भरले नयन अनुतापें ॥ ४६ ॥ तंव भक्तराज नाम्यानें देखिले ॥ साष्टांग घातलें तेव्हां त्यानें ॥ ४७ ॥ ह्मणे कां देवासिं पडला अमुचा धाक ॥ कळला पुण्यलोक इतुकेनि ॥ ४८ ॥ दुरोनि डोंगर दिसतो साजिरा ॥ तैसें झालें मजला आतां खरें ॥ ४९ ॥ आमुचें एक पत्र देवापुढें ठेवा ॥ लिहीतसे तेव्हां नामदेव ॥ ५० ॥ पतीतपावन ब्रीद सोडवीन आतां ॥ तरीच पंढरीनाथा दास तुझा ॥ ५१ ॥ गुण दोष माझे न धरावे मनीं ॥ सांग मजहूनि कोण वंद्य ॥ ५२ ॥ पितयापतन स्वामीची करणी ॥ गणिका विमानीं कीर्त कोण ॥ ५३ ॥ अजामिळ अधिकारी जावया वैकुंठा ॥ माझिया अदृष्टा काय झालें ॥ ५४ ॥ शिशुपाळें शिव्या दिल्या सभे आंत ॥ त्याहूनि पतीत काय झालों ॥ ५५ ॥ नामा ह्मणे पुढतीं न बोलें तुझें वर्म ॥ अंगिकारूनि प्रेम देईं मज ॥ ५६ ॥

॥ २७२ ॥ नामा शिंपे नामा शिंपे ॥ रोप लाविलें केशव बापें ॥ १ ॥ एक उगवली आरडी दरडी ॥ एक वाळुनि झाली कोरडी ॥ २ ॥ एक

पुष्प फळासि आली ॥ एक कळींच निर्फळ झाली ॥ ३ ॥ नामा उगवला केशव द्वारीं ॥ न माये आंत बाहेरी ॥ ४ ॥

॥ २७३ ॥ परिसासि लोह लागती ते कनकचि होती ॥ तया मागील ते गति बोलों नये ॥ १ ॥ आड ओहोळ वाहती ते गंगेसि मिळती ॥ तया मागिल ते गति बोलों नये ॥ २ ॥ काक विष्ठा करिती तेथें पिंपळ होती ॥ तया मागिल ते गति बोलों नये ॥ ३ ॥ परद्वारीं होती पतिसरसे होय सती ॥ तया मागिल ते गति बोलों नये ॥ ४ ॥ नामा मध्यम जाति परिस प्रेमळ भक्ति ॥ तया मागिल ते गति बोलों नये ॥ ५ ॥

॥ २७४ ॥ लोखंडाचा विळा परिसीं लागला ॥ मागिलिया मोला मागूं नये ॥ १ ॥ दासी होती परि रायासि रतली ॥ मागील ते बोली बोलों नये ॥ २ ॥ वेश्या होती तेचि पतिव्रता झाली ॥ मागील ते बोली बोलों नये ॥ ३ ॥ विष्णुदास नामा विठ्ठलीं रंगला ॥ तो शिंपी वहिला ह्मणों नये ॥ ४ ॥

॥ २७५ ॥ कुश्चळ भूमीवरी उगवली तुळसी ॥ अपवित्र तियेसी ह्मणों नये ॥ १ ॥ काकविष्ठे माजि जन्मे तो पिंपळ ॥ तया अमंगळ ह्मणों नये ॥ २ ॥ दासीचिया पुत्रा राज्यपद आलें ॥ उपमा मागील देऊं नये ॥ ३ ॥ नामा ह्मणे तैसा जातीचा मी शिंपी ॥ उपमा जातीची देऊं नये ॥ ४ ॥

॥ २७६ ॥ कागाचिये विष्ठे जन्म त्या पिंपळा ॥ अपवाद तयाला बोलुं नये ॥ १ ॥ परद्वारीण येति करूनि जालि सती ॥ मागील त्या स्थिती बोलुं नये ॥ २ ॥ विळा होता तो परिसासि लागला ॥ मागिलिया मोला बोलुं नये ॥ ३ ॥ गांवरस होता तो गंगेसी मिळाला ॥ गंगाजळा वांचुनि त्याला बोलुं नये ॥ ४ ॥ श्वानाचिया अस्थि पडिल्या चक्रातिर्थीं ॥ चक्रांकिता वांचुनि त्यासीं बोलुं नये ॥ ५ ॥ तैसी मज परी जाहली गा देवा ॥ नामा ह्मणे केशवा विनवितसें ॥ ६ ॥

॥ २७७ ॥ माझें जन्मपत्र बाबाजी ब्राह्मणें ॥ लिहिलें त्याची खुण सारू ऐका ॥१॥ अधिक ब्याण्णव गणित अकराशतें ॥ उगवतां आदित्य रोहिणी-सीं ॥ २ ॥ शुक्लएकादशी कार्तिकी रविवार ॥ प्रभव संवत्सर शालिवाहन शके ॥ ३ ॥ प्रसवली माता मज मळमूत्रीं ॥ तेव्हां जिव्हेवरी लिहीलें देवें ॥४॥

शत कोटी अभंग करील प्रतिज्ञा ॥ नाम मंत्र खुणा वाचुनी पाहे ॥ ५ ॥ ऐशीं वर्षें आयुष्य पत्रिका प्रमाण ॥ नाम संकिर्तन नामया वृद्धि ॥ ६ ॥

॥ २७८ ॥ आह्मां कीर्तन कुळवाडी ॥ आणिक नाहीं उदीम जोडी ॥१॥ वाचा पिकली पिकली ॥ हरिनामाची वरो झाली ॥२॥ एकादशीचे दिवशीं ॥ झाल्या कैवल्याच्या राशी ॥ ३ ॥ संत ह्मणती नामा आला ॥ हरि नामाचा सुकाळ झाला ॥ ४ ॥

॥ २७९ ॥ केशवाचें प्रेम नामयाचि जाणे ॥ नाम्या हृदयीं असणें केशवातें ॥ १ ॥ नामा तो केशव केशव तो नामा ॥ अभिन्नत्व आह्मां केशवासीं ॥ २ ॥ नामा ह्मणे केशवा दुजेपण नाहीं ॥ परि प्रेम तुझ्या ठायीं ठेवियेलें ॥ ३ ॥

॥ २८० ॥ सुख दुःख दोन्हीं आह्मासि सारिखीं ॥ प्रतीति पारखीं मना आली ॥ १ ॥ अंतर्बाह्य एक ब्रह्मचि कोंदलें ॥ दुजेपण गेलें निपटोनी ॥२॥ त्वचा टाकूनियां सर्प गेला बिळीं ॥ मग तो सांभाळी कोण सांगा ॥ ३ ॥ ओघ सोडूनियां गंगा सिंधू ठाये ॥ विस्तराळी धाये खळाळाची ॥ ४ ॥ नामा ह्मणे रात्र जैसी कां पाहाळे ॥ धारणातें झाले तैसें अह्मां ॥ ५ ॥

॥ २८१ ॥ भक्ताचिया भावा होऊनि ऋणायितु ॥ उभा असे तिष्ठतु पंढरीये ॥ १ ॥ महाद्वारींची हे तळींची यापरी ॥ तो वैकुंठावरीं कळस केला ॥ २ ॥ भूतळींचें वैभव कायसें बापुडें ॥ बोलतां लाज पडे देवराया ॥ ३ ॥ त्या सुखाची नव्हाळी कैची रसातळीं ॥ बोलतां बोबडी जिव्हा पडे ॥ ४ ॥ ह्मणोनि पांडुरंग मौनचि राहिला ॥ नाम्यानें धरिला दोहीं चरणीं ॥ ५ ॥

॥ २८२ ॥ आजि आवतणें संतांचें ॥ जेवण जेऊं हरि नामाचें ॥ १ ॥ आम्हीं जेविलों जेविलों ॥ नामामृतें पूर्ण धालों ॥ २ ॥ बरवी परवडी हरिनामाची ॥ आवडी पुरविली जीवाची ॥ ३ ॥ नामा केशवाचा ह्मणे ॥ माझे हृदयीं नारायण ॥ ४ ॥

॥ २८३ ॥ उठोनि प्रातःकाळीं ओढितां कांचोळी ॥ जातो वळावळी महाद्वारा ॥ १ ॥ अहोजी दातारा विनंती अवधारा ॥ तुम्ही यावें घरा भोजनासि ॥ २ ॥ रखुमाई माते तुम्हीं यावें तेथें ॥ सामोग्री सांगतें चाल-

वावी ॥ ३ ॥ सडे संमार्जन हें माझें करणें ॥ उदक भरीन सुगंधेसि ॥ ४ ॥ शेषपत्रावळी काढीन उष्टावळी ॥ नित्य वेळोंवेळीं हाचि धंदा ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा तुमचे तुम्ही जेवा ॥ प्रसाद तो द्यावा सेवकासि ॥ ६ ॥

॥ २८४ ॥ माता वाट पाहे नामा अझुन कां नये ॥ देखोनि विठ्ठल काय भुलला तेथें ॥ १ ॥ ऐसें मज पाहतां हेंचि घडे साचें ॥ विठ्ठलीं मन त्याचें गुंतलें असे ॥ २ ॥ काय सांगों माय जाल देवळासीं ॥ जपतो अहर्निशीं विठ्ठल नाम ॥ ३ ॥ तहान भूक कांहीं आधींच ना मनीं ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणोनि हाचि छंद ॥ ४ ॥ नेणो कवण्या गुणें भुलविलें यातें ॥ विंदान आमुतें न कळे कांहीं ॥ ५ ॥ दिशा अवलोकितां प्राण नव्हे निश्चित ॥ बहुत क्षुधाक्रांत झाली असे ॥ ६ ॥ तेथून लवलाहें धांवत निघाली ॥ महाद्वारा आली पहावया ॥ ७ ॥ तो तव पांडुरंगा सन्मुख देखिला ॥ चित्रींचा लिहिला पुतळा जैसा ॥८॥ नाहीं चळणवळण तटस्थ नयन ॥ केलें निंबलोण योगिजनीं ॥९॥ तें देखोनि मातेसि थोर द्वेष आला ॥ क्रोधें आंसुडिला करीं धरुनि ॥ १० ॥ तंव प्रेताचियेपरी पडिला भूमीवरी ॥ देखोनि सुंदरी रुदना करी ॥११॥ मग उचलोनि ओसंगा धरिला पोटासीं ॥ म्हणे कां रे रुसलासि सांग नाम्या ॥ १२ ॥ निढळासि निढळ मिळवूनि ते रडे ॥ माझीये कान्हाडे काय झालें ॥ १३ ॥ दृष्टि उघडूनि नामा भोंवतें जंव पाहे ॥ तंव सन्मुख माय देखियेली ॥ १४ ॥ येरी उचलूनि दिधलें आलिंगन ॥ झालें समाधान तयेवेळीं ॥ १५ ॥ सुहृदें सोयरीं सकळिकें मिळोनि ॥ करिती झाडणी नानापरी ॥ १६ ॥ माउली नव्हेसि तूं वैरिणी जाण ॥ माझ्या केशवाची खूण अंतरली ॥ १७ ॥ शस्त्रेंविण वध केला अवचिता ॥ जीव तळमळतां जाऊं पाहे ॥ १८ ॥ आतां परतोनि माझी वाट पाहसी ॥ त्याच रिपू होसी तरी जाण ॥ १९ ॥ नामा म्हणे माते जाई हो येथूनि ॥ मज जाई निरवूनि विठोबासी ॥ २० ॥



॥ २८५ ॥ नवमास वरी म्यां वाहिलासि उदरीं ॥ आस केली थोरी होसी ह्मणोनी ॥ १ ॥ शेखीं त्वां रे नाम्या ऐसें काय केलें ॥ वनीं मोकळिलें निरंजनीं ॥ २ ॥ कां रे नामदेवा झालासी निष्ठुर ॥ न बोलसी उत्तर मजसि कांहीं ॥ ३ ॥ सज्जन सोयरीं सांडियली लाज ॥ झालासि निर्लज्ज एकसरा ॥ ४ ॥ प्रेम पिसें तुज लाविलें विठ्ठलें ॥ रूप दावूनि केलें तद्रूप

तुज ॥ ५ ॥ यासि सेविलिया कैंची बाप माय ॥ सर्व हाचि होय सर्वां ठायीं ॥ ६ ॥ ऐसियाचा संग धरियला तुवां ॥ परिणामीं अनुभवा जाणशील ॥ ७ ॥ संत सनकादिकां लावियेलें वेधीं ॥ तिहीं संसार उपाधि सांडियेली ॥ ८ ॥ विठ्ठल विठ्ठल हेंचि पै चिंतना ॥ इटेसहित चरण धरियेले ॥ ९ ॥ ऐसें शिकवितां बहुत नाम्याचें न मोहरे चित्त ॥ पाहतसे तटस्थ तन्मय दृष्टीं ॥ १० ॥ नामा ह्मणे माते वाया कां कष्टसी ॥ विठोबा जीवेंसि जडला जाण ॥ ११ ॥

॥ २८६ ॥ माता ह्मणे नामा राउळासि खेळतां ॥ तुज कोण्या दैवता ओढियलें ॥ १ ॥ लाजिरवाणें नाम्या तुवां केलें जिणें ॥ हांसती पिशुनें देशोदेशीं ॥२॥ सांडीं देवपिसें नको करूं ऐसें ॥ बळें घर कैसें बुडविसी ॥३॥ जन्मा येऊनियां पराक्रम करीं ॥ कां होसी संसारीं भूमिभार ॥ ४ ॥ सुदैवाचीं लेंकरें वर्तताति कैसीं ॥ तूं मज झालासि कुळक्षय ॥ ५ ॥ कैसी तुज नाहीं लौकिकाची लाज ॥ हेंचि थोर मज नवल वाटे ॥ ६ ॥ अभिमान अहंता सांडूनियां जगीं ॥ नाचतोसि रंगीं गीत गातां ॥ ७ ॥ तुजविण लोक अज्ञान नसती ॥ क्षण न विसंबती मायबापा ॥ ८ ॥ पुत्र आणि कलत्र घराची विपत्ति ॥ तुज अभाग्याचे चित्तीं पंढरीनाथ ॥ ९ ॥ यातें भजती त्याचें न उरेचि कांहीं ॥ हा देव पाहीं घरघेणा ॥ १० ॥ जयाचें खुंटे तो लागे याच्या पंथें ॥ तुजसि शिकवितें ह्मणोनियां ॥ ११ ॥ गोणाई ह्मणे नाम्या हें नव्हे पैं भलें ॥ विठोबानें केलें आपणा ऐसें ॥ १२ ॥

॥ २८७ ॥ गरुडपाराजवळी नामदेव आला ॥ सन्मुख देखिला पांडुरंग ॥ १ ॥ मेघश्याम मूर्ति डोळस सांवळी ॥ तें ध्यान हृदयकमळीं धरुनी ठेला ॥ २ ॥ धन्य नामदेव भक्त शिरोमणि ॥ ज्याचा चक्रपाणि वेळायित ॥ ३ ॥ पूर्वस्थिति सुखाचा झालासे अनुभव ॥ सकळ देहभाव परुषले ॥ ४ ॥ मन पांगूळलें स्वरूपीं गुंतलें ॥ बोलणें खुंटलें भीतिमौन ॥ ५ ॥

॥ २८८ ॥ दृष्टि उघडूनि नामा भोंवती जंव पाहे ॥ तंव पुढें माय देखियली ॥ १ ॥ म्हणे मजशीं नाम्या वैर कां साधिलें ॥ बहुत दुःख झालें कोणा सांगों ॥ २ ॥ भक्तजनवत्सला परियेसी केशवा ॥ भेटसी केधवां पूर्वस्थिती ॥ ३ ॥ भोजना बैसले जेविं क्षुधाक्रांत ॥ ते कोणाशीं मात न बोलें कांहीं ॥ ४ ॥ तें बळें उठविलें नव्हतां पैं तृप्ति ॥ तैसी दुःख माप्ति

झाली मज ॥ ५ ॥ पूर्ण पान्हा धेनु घातला वोरसें ॥ वत्स थोर हर्षे पान करी ॥ ६ ॥ तें धनियें देखोनि बळें आसुंडलें ॥ तळमळित ठेलें थोर आशा ॥ ७ ॥ कृपणें संपत्ति जोडिली सायासें ॥ तळमळीतें कैसें नेलीयातें ॥ ८ ॥ तैसी परी मज जाहली गा देवा ॥ परियेसीं केशवा मायबापा ॥ ९ ॥ दुःखाचे सागरीं पडिलों गा श्रीहरी ॥ सुखरूप मुरारी निववी मातें ॥१०॥नामा ह्मणे विठो कृपेचा सागरु॥करावा अंगीकारु अनाथाचा ॥११॥

॥ २८९ ॥ गोणाई ह्मणे नाम्या सोडीं देवपिसें ॥ बुडविसी कैसें घर बळें ॥ १ ॥ तुज सईल लेंकुरें वर्ततातीं कैसीं ॥ तूं मज झालासी कुळक्षय ॥ २ ॥ धन धान्य पुत्र कलत्रें नांदती ॥ तुज अभाग्या तो चित्तीं पांडुरंग ॥ ३ ॥ शिवण्या टिपण्या घातलेंसे पाणी ॥ न पहासी परतोनी घराकडे ॥ ४ ॥ कैसी तुझी भक्ति लौकिका वेगळी ॥ संसाराची होळी केली नाम्या ॥ ५ ॥ याची तुंवा कैसी धरलिसे कास ॥ हा तो कवणास झाला नाहीं ॥ ६ ॥ यातें जे अनुसरती त्यांचें नुरे कांहीं ॥ हा देव नव्हे पाहीं घरघेणा ॥ ७ ॥ गोकुळीं करी चोरी आपुलें पोट भरी ॥ तो तुज निर्धारीं देईल काय ॥ ८ ॥ गोणाई ह्मणे नाम्या हें तों नव्हे भलें ॥ घर त्वां बुडविलें कुळासहित ॥ ९ ॥

॥ २९० ॥ अरे नामदेवा नव्हेसि लेंकरूं ॥ जरी जाणसी विचारु संसारिक ॥ १ ॥ शिवण्याटिपण्यासी त्वां घातलें पाणी ॥ न पाहसी परतोनि घराकडे ॥ २ ॥ कैसी तूझी भक्ति या देशा वेगळी ॥ संसाराची धुळी केली नाम्या ॥ ३ ॥ उदंड पैं आह्मीं देखियले भक्त ॥ परि तूं आपुलें हित न विचारिसी ॥ ४ ॥ अन्नेंसि उपवासी बैसलासि येथें ॥ काय देईल तूतें विठ्ठल हा ॥ ५ ॥ थिता पुंडलीकें भाकेसीं गोंविला ॥ त्यासि प्रयत्न बळ नचले कांहीं ॥ ६ ॥ गोकुळीं करूनि चोरी आपुलें पोट भरी ॥ तो तुज निर्धारीं देईल काय ॥ ७ ॥ तूं निलाजिरा पाहीं तुज लाज नाहीं ॥ वेळोवेळां कायी सांगों तुज ॥ ८ ॥ सांडून घरदार आपुला संसार ॥ नाचतां विचार न करिसी मनीं ॥ ९ ॥ काम कष्ट तुवां सांडियले आतां ॥ संसाराची चिंता कोण करी ॥ १० ॥ गोणाई ह्मणे नाम्या नव्हे रे हें भलें ॥ विठ्ठलनामें केलें आपणा ऐसें ॥ ११ ॥

॥ २९१ ॥ नामा ह्मणे माते ऐक वो वचना ॥ मी गेलों दर्शना नागनाथा ॥ १ ॥ आंवढ्या देउळीं जाहला संचार ॥ पारुषला धीर या देहाचा ॥ २ ॥ तैंहूनि तुज मज तुटला संबंधु ॥ विठ्ठलाचा छंदु घेतला जीवीं

॥ ३ ॥ लौकिक व्यवहार नाठवेचि कांहीं ॥ कल्पना ते देहीं आथीचना ॥ ४ ॥ टाळ दिंडी घेऊनि नाचतों रंगणीं ॥ तेणें माझ्या मनीं सुख वाटे ॥ ५ ॥ या देहघरसंसाराचा आलासे कंटाळा ॥ ह्मणोनि गोपाळा शरण आलों ॥ ६ ॥ पुत्र कलत्र येथें कायसीं बापुडीं ॥ जेणें रौरव कुंडीं वास घडे ॥ ७ ॥ तूं जरी ह्मणसी हें सत्य संसारसुख ॥ तरी हें केवळ विख विस्तारलें ॥ ८ ॥ तेंचि हें जाण ह्मणोनि टाकियलें दुरी ॥ तें सेवितां उरी कैंची माते ॥ ९ ॥ ह्मणोनि मी झालों या संतांचा दीन ॥ तेणें हरिला शीण जन्मांतरिंचा ॥ १० ॥ नामा ह्मणे आतां मीतूंपण कैचें ॥ मी या विठोबाचें शरणागत ॥ ११ ॥

॥ २९२ ॥ जनिता जीवविता सर्वज्ञ प्रतिपाळिता ॥ आडणीं सांभाळिता चराचरीं ॥ १ ॥ एक पांडुरंग दुजा नाहीं चांग ॥ ह्मणूनि याचा संग धरिला माते ॥ २ ॥ माझी तुज कांहीं करणें नलगे चिंता ॥ मज आहे पोसिता पांडुरंग ॥ ३ ॥ हा शरणागतांचा जाणे कळवळा ॥ हा पैं कळिकाळा पाहों नेदी ॥ ४ ॥ केले कोटिवरी न मानी अपराध ॥ हें पैं साजे ब्रीद पांडुरंगा ॥ ५ ॥ आह्मीं आपुल्या सुखें असों भलत्या ठायीं ॥ प्रीती तया पायीं जडली असे ॥ ६ ॥ तेणें उपकारें न विसंबे क्षण ॥ हातीं सुदर्शन घेउनि उभा ॥ ७ ॥ जाणतां नेणतां राम गावों गीतीं ॥ जन्माची विश्रांति होय जेणें ॥ ८ ॥ ऐसी जीवलग होईल कैचें आन ॥ संचला परिपूर्ण सर्वांठायीं ॥ ९ ॥ इष्टमित्र बंधु सज्जन सोयरा ॥ माझिया संसारा हाचि एक ॥ १० ॥ नामा ह्मणे माते मज नचले मोहोपिसें ॥ तुझासि मज ऐसें होईल कई ॥ ११ ॥

॥ २९३ ॥ साधावया आत्मसुख ॥ तें हें विटेवरी देख ॥ १ ॥ नको जाऊं परदेशीं ॥ वास करीगे पंढरीसीं ॥ २ ॥ भाव धरूनि बळकट ॥ मुखीं नाम एकनिष्ठ ॥ ३ ॥ नामा ह्मणे गोणाबाई ॥ सर्व सुख याचे पायीं ॥ ४ ॥

॥ २९४ ॥ अगा ये विठोबा पाहें मजकडे ॥ कां गा केलें वेडें बाळ माझें ॥ १ ॥ तुझें काय खादलें त्वां काय दिधलें ॥ भलें दाखविलें देवपण ॥ २ ॥ आह्मीं ह्मणुं तूं रे कृपाळु अससी ॥ आतां तूं कळलासि पंढरिराया ॥ ३ ॥ कांरे देवपण आपुलें भोगूं पैं जाणावें ॥ भक्तां सुख द्यावें हेळामात्रें ॥ ४ ॥ देव होऊनियां अपेश कां घ्यावें ॥ माझें कां बिघडावें एकुलतें बाळ ॥ ५ ॥ तूं कैसारे देव या देशा वेगळा ॥ बांधितें तुझा गळा

परि संतां भ्यालें ॥ ६ ॥ तुझी करणी अवघी आम्हां ठाउकीच आहे ॥ बोलोनियां काय हलकट व्हावें ॥ ७ ॥ जाणोनि पुंडलिक तुझी न पाहेचि वास ॥ तूं भला नव्हेस घरयेणा ॥ ८ ॥ तो बैस पैं न ह्मणे तुज याचकाकारणें ॥ जडसी जीवें प्राणें सात्त्विक भावें ॥ ९ ॥ ह्मणीं तूं आपुला करिसी बोभाट ॥ मग येईल वीट लोकाचारीं ॥ १० ॥ थोरपणें नामा करी मज आधीन ॥ गोणाई ह्मणे चरण धरीन तुझे ॥ ११ ॥

॥ २९५ ॥ ऐके गोणाबाई ह्मणे केशिराज ॥ सदा आवडि ही नाम्या देवा ॥ १ ॥ संसारादि यासीं नावडेचि कांहीं ॥ मिठीच वो पायीं घातलीसे ॥ २ ॥ नेणो याच्या जीवें घेतलेंसे कांहीं ॥ लोळणीच पायीं घातलीसे ॥ ३ ॥ पुसें वो जीवींचें काय काय आवडे ॥ उबगोनि कोडें नेई यासी ॥ ४ ॥ देतां कांहीं न मागे. नसतां कांहीं नेघे ॥ गुज पैं न सांगे अंतरींचें ॥ ५ ॥ जन्मोनि सांकडें घातलें वो कैसें ॥ गिळील मज ऐसें वाटतसे ॥ ६ ॥ मी भावासि भुललों सांपडलों याचे हातीं ॥ करील काय अंतीं नकळे कांहीं ॥ ७ ॥ एक वेळ मज सोडवीं यापासोनि ॥ दे कां मज लागोनि जीवदान ॥ ८ ॥ माझिये पैं बोलें मजचि गोविलें ॥ यातें आपंगीलें अनाथ ह्मणोनि ॥ ९ ॥ अंगोळिये धरितां खांदी वोळंगलें ॥ आतां माझें केलें न चले कांहीं ॥ १० ॥ तूं आपुलिया मनीं विचारूनि पाहीं ॥ नामा आपला नेई आवडता ॥ ११ ॥ मायलेंक दोघे साम्राज्य करा ॥ द्यावें धणीवरी सुख याचें ॥ १२ ॥ कठीण बोल तुझे बहुसाळ ऐकिले ॥ नाहीं त्वां गे पाहिलें मागें पुढें ॥ १३ ॥ चित्त तुझें कैसें सांठविलें माया ॥ कां करिसी वांया इष्ट तुटी ॥ १४ ॥ आतां तुझी कैसी झांकोळिली माया ॥ मज करिसी वांयां इष्ट तुटी ॥ १५ ॥ ऐसें देवाचें बोलणें ऐकोनि उदास ॥ नाम्या झाले क्लेश तयेवेळीं ॥ १६ ॥ नामा ह्मणे देवा ऐसें कैसें घडे ॥ सृष्टिही पै बुडे तरी न सोडी तुज ॥ १७ ॥

॥ २९६ ॥ थितें माझें प्रेम घेऊनि बैसला ॥ अझुनि नुठी वहिला नामा तुझा ॥ जीवें भावें सर्वस्वें घेतलें धरणें ॥ म्यां काय करणें ऐशियासी ॥ कासया अपराध ठेविशील मज ॥ शिकवितें तुज नाहीं कोणी ॥ १ ॥ संसारा गांजले जन्ममरणा उबगले ॥ ह्मणोनि शरण आले भयाभीत ॥ कृपा उपजली जीवें अनुसरला ॥ जीव याचा गुंतला माझे ठायीं ॥ २ ॥ दवडितां वेगळें वोसंगा रिघालें बळें ॥ बोलतां हें साळेंभोळें करुणावचनीं ॥ तेणें

माझें हृदय कळवळलें ॥ ह्मणोनि देखतां डोळे निवती माझे ॥ ३ ॥ शरण आलिया तें म्यां जरि अव्हेरावें ॥ कोणें आपंगावें सांग सत्य ॥ शत्रुमित्र आदिकरूनि सकळ ॥ दुःख अळुमाळ पडों नेदी ॥ ४ ॥ संसाराची येणें सांडियेली सोयी ॥ प्राणें माझ्या ठायीं अनुसरला ॥ आतां याची लटिकी करीं दूर आस ॥ नामा ह्मणे उदास सर्वस्वासि ॥ ५ ॥

॥ २९७ ॥ तूझिया नाम्यानें देऊनियां चित्त ॥ जन्मुनियां आप्त केलें मज ॥ १ ॥ इष्ट मित्र बंधु जननि जनक ॥ सर्व मीच एक करुनि ठेलों ॥ २ ॥ ऐसी याची करणी अझूनि नेणसी ॥ बाळ माझें ह्मणसी चाळविलें ॥ ३ ॥ प्रेमाचें लाघव लावूनी माझ्या पायीं ॥ बांधिलें हृदयीं धरूनियां ॥ ४ ॥ वृत्तिसहित मन लाविलें राखण ॥ केलें जीवें जतन मजलागीं ॥ ५ ॥ उचंबळले नयन अंतरींच्या अनुरागें ॥ रात्रंदिवस जागे माझ्या ठायीं ॥ ६ ॥ बोले चाले परि लक्ष मजवरी ॥ बाहेर भीतरीं मजचि देखे ॥ ७ ॥ सर्व सुखा गुणारूपा देऊनि मिठी ॥ निर्गुणीं हिंपुटी होऊं नेदी ॥ ८ ॥ न मागे नेघे न धरी सोय संसाराची ॥ कल्पना देहाची मावळली ॥ ९ ॥ ऐसें येणें मज विश्वासें गोविलें ॥ सर्वत्र लाविलें मजचि कोडें ॥ १० ॥ निर्गुणीं हा नामा न सोडी सर्वथा ॥ सांपडलों आतां एकरूप ॥ ११ ॥

॥ २९८ ॥ देवा माझें घर त्वां पूर्वींच घेतलें ॥ जैं दरशना आलें बाळ माझें ॥ १ ॥ काय वर्म तूतें सांपडलें हातीं ॥ रिघालासि चित्तीं जेणें द्वारें ॥ २ ॥ लौकिक परिहार देशील कासया ॥ मी तुज ऐसेया बरवें जाणें ॥ ३ ॥ कटीं कर ठेवूनि उभा गरुडपारीं ॥ पाहे तंव अंतरीं हारपला ॥ ४ ॥ नाहीं चलन-वलन पाखा पातें लागलें ॥ निरुतें लाविलें लक्ष तुझें ॥ ५ ॥ तुझी याची खूण अंतरींची एकी ॥ दाविसील कीं भिन्न भिन्न ॥ ६ ॥ सांडियेली येणें लौकिकाची लाज ॥ नव्हे माझा मज कांहीं केल्या ॥ ७ ॥ तुझे सुखें घाला अनारिसा झाला ॥ अभिमान मावळला समूळ याचा ॥ ८ ॥ देहीं पैं असोनि विदेहि दिसत ॥ प्रेम वोसंडत हृदयकमळीं ॥ ९ ॥ अनाथा कैवारी ऐसी वेदवाणी ॥ परी कां नये अझूनि कवण तुज ॥ १० ॥ गोणाई ह्मणे माझा नामा देई हातीं ॥ लागेन पुढतापुढतीं तुझ्या पायीं ॥ ११ ॥

॥ २९९ ॥ वाचेचेनि बळें बोलसी आगळें ॥ मर्यादे वेगळें वांया जाण ॥ १ ॥ भ्रमलीसि आरजे न पाहसी आपणाकडे ॥ धारिष्ट केवढें पाहें तुझें

॥ २ ॥ नेई आपुला नामा काय चाड आह्मां ॥ जरी आहे तुज भ्रम ममतेचा ॥ ३ ॥ पाहें पां पूर्वींचा कवणीये जन्मींचा ॥ न कळे तुझा याचा ऋणानुबंध ॥ ४ ॥ तो सरला कीं उरला विचारितां आपुला ॥ हा तुज अंतरला कवण्या गुणें ॥ ५ ॥ सांडिला संसार लौकिक ॥ अविद्या अहंभाविक दोन्ही नाहीं ॥ ६ ॥ प्रपंचावेगळा नकळे याची लीला ॥ लागलीसे डोळां प्रेममुद्रा ॥ ७ ॥ ऐसी याची स्थिति देखोनियां डोळां ॥ मज कां वेळोवेळां छळीतेसि ॥ ८ ॥ जाणसी त्यापरी बुझावीं वो यातें ॥ जेणें सुखें तूतें ओळखलें ॥ ९ ॥ याचेनि संसार चालवीन ह्मणोनि ॥ ऐसी भ्रांति मनीं धरिली वांयां ॥ १० ॥ नामा तरी निमाला आह्मां अनुसरला ॥ तरंग उरला जेंवीं जळीं ॥ ११ ॥

॥ ३०० ॥ मग पंढरिनाथ ह्मणे नाम्यासि ॥ तूं जाई गोणाईसि घेऊनियां ॥ १ ॥ अतिशय कां इणें मांडिलासे फार ॥ मातेसि निष्ठुर होऊं नये ॥ २ ॥ स्तनपान देऊनि मोहें पाळिलासी ॥ अंतर तियेसीं देऊं नये ॥ ३ ॥ नामा ह्मणे शरण आलों जिच्या भेणें ॥ तिचे हातीं देणें उचित नव्हे ॥ ४ ॥

॥ ३०१ ॥ नामयाची माता विनवीतसे संतां ॥ ह्मणे पुत्रनाथा काय करूं ॥ १ ॥ नामा चालविला पंढरीये नेला ॥ विठ्ठलीं मीनला नामदेव ॥ २ ॥ नेणें अन्नपाणी शिवणी टिपणी ॥ अखंड चक्रपाणी हृदयीं वसे ॥ ३ ॥ संत ह्मणती गोणाई विपरीत अवधारीं ॥ नामा पंढरपुरीं वैष्णवांमाजीं ॥ ४ ॥

॥ ३०२ ॥ नामयासारिखें निधान तुझे कुशीं ॥ धन्य एक तूं होसी जगामाजीं ॥ १ ॥ धन्य वाचे सुख देखियेलें डोळां ॥ प्रेमाचा जिव्हाळा अलोलिक ॥ २ ॥ धन्य तुझें कुळ धन्य तुझा वंश ॥ दिपासवें प्रकाश दिसे जेवीं ॥ ३ ॥ धन्य तुझी काया धन्य वाचा मन ॥ करविलें स्तनपान नामयासीं ॥ ४ ॥ धन्य हा दिवस तुवां केलें सार्थक ॥ खेळविलें कौतुकें नामयासीं ॥ ५ ॥ धन्य तुझें भजन नाहीं नाम्याविण ॥ धन्य उदकपान केलें तुवां ॥ ६ ॥ धन्य विश्रांतीसि केलें त्वां शयन ॥ ओसंगा घेऊन नामयासीं ॥ ७ ॥ तुझे धन्य कर कुरवाळिला नामा ॥ धन्य तो संभ्रमा स्नेह तुझा ॥ ८ ॥ धन्य कृपादृष्टिं नाम्यातें पाजिलें ॥ केश कुरवाळिले बाळपणीं ॥ ९ ॥ ऐसी तूं धन्य जन्मोनियां धन्य ॥ तुझें नाम धन्य मिरवत ॥ १० ॥

धन्य तुझा नामा ज्याची भेटी आह्मां ॥ धन्य साचा प्रेमा नित्य नवा ॥ ११ ॥

॥ ३०३ ॥ गोणाई ह्मणे रे विठ्ठला ॥ नाम्या हातीं भोंपळा दिला ॥ १ ॥ नारद वैष्णव जगजेठी ॥ त्यासी लाविली लंगोटी ॥ २ ॥ भीष्म वैष्णवाचा राव ॥ त्याचा सेना पुसला ठाव ॥ ३ ॥ रुक्मांगद तुझा दास ॥ त्याचा गांव केला वोस ॥ ४ ॥ ताम्रध्वज राजा भला ॥ त्यासी करवतीं घातला ॥ ५ ॥ अंजनीबाळ भक्त निकट ॥ त्यासीं केलें त्वां मर्कट ॥ ६ ॥ ध्रुवबाळ कोडीस वाणें ॥ त्याचें खुंटलें येणें जाणें ॥ ७ ॥ उपमन्यु प्रेमें भक्ति करीत ॥ त्यासीं ठेविलें सागरांत ॥ ८ ॥ बळीराजा सद्याबळी ॥ त्यासी घातलें पाताळीं ॥ ९ ॥ व्यास वाल्मिक कवी गाढे ॥ त्यासीं फिरवीसी वाडेकोडे ॥ १० ॥ हरिश्चंद्र ताराराणी ॥ वाहे डोंबा घरीं पाणी ॥ ११ ॥ पहा पहा राजा श्रीयाळ ॥ त्याचें मारियेलें बाळ ॥ १२ ॥ भक्तांसीं नकळे तुझा पार ॥ हिंडविसी दारोदार ॥ १३ ॥ गोणाई ह्मणे विठोबाला ॥ काय उतराई होऊं तुला ॥ १४ ॥

॥ ३०४ ॥ अगाध महीमा यात्रा कार्तीकिये ॥ आला पंढरीये नामदेव ॥ १ ॥ भक्तां शिरोमणी श्रीपंढरीनाथा ॥ कृपाळु वा माता बाळकासी ॥ २ ॥ धन्य नामदेव धन्य नामदेव ॥ हृदई पंढरिराव न विसंबे ॥ध्रु० ॥ प्रेमळ हरीभक्त मिळोनी अपार ॥ करिताती गजर हरिनामाचा ॥३॥ नट नाट्य कीर्तन झळकती गरूडटके ॥ करिती ब्रह्मादीक पुष्पवृष्टी ॥ ४ ॥ नामघोष श्रवण सकळां समाधान ॥ चुकलें जन्ममरण कल्पकोटीं ॥ नामा ह्मणे जीव निवालावा येथें ॥ पहातां विठोबातें श्रम गेला ॥ ५ ॥

॥ ३०५ ॥ गरुडपाराजवळी नामदेव आला ॥ सन्मुख देखीला पांडुरंग ॥ मेघःशाममूर्ती डोळस सांवळी ॥ तें ध्यान हृदयकमळीं धरोनि ठेला ॥ १ ॥ धन्य नामदेव भक्तशिरोमणी ॥ ज्याचा चक्रपाणी येळाइतु ॥ ध्रु० ॥ पूर्वस्थिती सुखाचा झालासे अनुभव ॥ सकळ देहभाव पारुशले ॥ मन पांगुळलें स्वरूपीं गुंतलें ॥ बोलणें खुंटलें प्रीतिमौन ॥ २ ॥ सबाह्य अभ्यंतरीं स्वरूप कोंदलें ॥ द्वैत निरसलें दृश्याकारें ॥ निजरूप निर्धारितां नयन सोज्वळ झाले ॥ रोमांच दाटले खरबरीत ॥ ३ ॥ आनंदघन वोळलासे अंबरीं ॥ वर्षाव सहस्रधारीं होतो तेथें ॥ तें क्षीर सेवीतां झालें समाधान ॥ चुकलें जन्ममरण कल्पकोटीं ॥ ४ ॥ सहज सुखें निवाला भवदुःख विस-

रला ॥ विसावा भेटला पांडुरंग ॥ नामा ह्मणे दृष्टी लागेल पा झणीं ॥ धन्य पुंडलीकाचेनी जोडलें सुख ॥ ८ ॥

॥ ३०६ ॥ माता वाट पाहे नामा अझुनी कां नये ॥ देखोनी विठ्ठल काय भुलला तेथें ॥ ऐसें सहज पाहातां हेंची दिसे साचें ॥ विठ्ठलीं मन त्याचें गुंतलेंसे ॥ १ ॥ काय सांगों माये झाला देवलसी ॥ जपतो अहर्निशीं विठ्ठलनाम ॥ ध्रु० ॥ तान्ह भुक कांहीं आथीच ना मनीं ॥ विठ्ठल ह्मणोनी हाची छंद ॥ नेणों कवण्या गुणें भुलवीलें यातें ॥ विंदान आमुतें नकळे कांहीं ॥ २ ॥ दिशा अवलोकीतां प्राण नव्हे निश्चीत ॥ बहु क्षुधाक्रांत झाली असे ॥ तेथुनी लवलाहें धांवत निघाली ॥ माहाद्वारीं आली पहात पहात ॥ ३ ॥ तंव तो पांडुरंगा सन्मुख देखीला ॥ चित्रींचा लीहिला पुतळा जैसा ॥ नाहीं चलन वलन तटस्थ नयन ॥ केलें निंबलोण योगी जनीं ॥ ४ ॥ तें देखोनी मातेसी थोर द्वेष आला ॥ क्रोधें अडसीला करीं धरोनी ॥ प्रेताचीये परी पडिला भूमीवरी ॥ देखोनी सुंदरी रुदना करी ॥ ५ ॥ मग उचलोनी ओसंगा धरिला पोटासीं ॥ ह्मणे कांरे रुसलासी सांग नाम्या ॥ नीडळानीडळ दे मेळउनी आलिंगन ॥ झालें समाधान तयेवेळीं ॥ ६ ॥ दृष्टी उघडोनी नामा भोंवते जंव पाहे ॥ तंव सन्मुख माये देखीयेली ॥ सुहृदें सोइरीं सकळीकें मीळोनी ॥ करिती झडपणी नानापरी ॥ ७ ॥ माउली नव्हेसी तूं वैरी जाण ॥ माझ्या केशवाची खूण अंतरली ॥ शस्त्रें-वीण वधु केला अवचिता ॥ जीव तळमळीता जाऊं पाहे ॥ ८ ॥ आतां परतोनी माझी वाट पहासी ॥ साच रिपु होसी तरी जाण ॥ नामा ह्मणे जाईं वो येथुनी ॥ मज जाय नीरउनी विठोबासी ॥ ९ ॥

॥ ३०७ ॥ नव मास वरी म्यां वाहीलासे उदरीं ॥ आस केली थोरी मज होसी ह्मणोनी ॥ सर्वीं त्वांरे नाम्या ऐसें काय केलें ॥ वनीं मोकलीलें नीरंजनीं ॥ १ ॥ कांरे नामदेवा झालासी निष्ठुर ॥ न बोलसी उत्तर समजे कांहीं ॥ ध्रु० ॥ सज्जन सोइरीं सांडियेली लाज ॥ झालासी निर्लज्ज येक-सरा ॥ प्रेमपिसें तुज लाविलें विठ्ठलें ॥ रूप दाऊनि केलें तन्मय तुज ॥२॥ यासी सेवीलिया कैंची बाप माय ॥ सर्व हाची होय सर्वांठायीं ॥ ऐसीयाचा संग धरियेला तुवां ॥ परिणामीं अनुभवा जाणसील ॥ ३ ॥ संतसनका-दिकां लावियेलें वेधीं ॥ तीहीं संसार उपाधी सांडियेली ॥ विठ्ठल विठ्ठल हेंचि पैं चिंतन ॥ वीटेसहित चरण धरीयेले ॥ ४ ॥ शिकवितां बहुत ना-

म्याचे न मोहरे चित्त ॥ पाहतसे तटस्थ तन्मय दृष्टी ॥ नामा ह्मणे माते वांयां कष्टसी ॥ विठोबा जीवेसी जडला मज ॥ ५ ॥

॥ ३०९ ॥ वडील वडील आमुचे बोलती ती परी ॥ तुज ऐसा श्रीहरी देवो नाहीं ॥ दर्शना आलिया पाडीसी आन्हांटा ॥ मन मारूनी चोहोटा भुलविसी तूं ॥ १ ॥ ऐस कैसा कोणे केलासीरे देव ॥ आमुच्या जाणीया खेव आणियेला ॥ ध्रु० ॥ माझें बाळ तूझ्या दर्शनासीं आलें ॥ तें त्वां भुलवीलें केशीराजा ॥ रात्रीं दीवस तुझ्या नामाचारे छंदु ॥ गोविंद गोविंद ह्मणतसे ॥ २ ॥ तान्हभूक वीसरला पीसाट पैं झाला ॥ नोळखे मजला काय करूं ॥ परतोनी संसाराची सांडीयेली आस ॥ बोलतो उदास सर्वांपरी ॥ ३ ॥ लोकांची लेंकुरें कांगा चाळविसी ॥ आपणा ऐसें करसी भलत्यासी ॥ आणीक असतां नाश वेगळा थोर ॥ मग माझा विचार कळतां तुज ॥ ४ ॥ तुज एक वर्म पुंडलीक आहे ॥ जेणें जडवीले पाय वीटेवरी ॥ याहुनी आणीक आधीक पावसी ॥ अह्मां दुबळ्यासी कष्टवितां ॥ ५ ॥ मागें पुढें तूज ऐसेंची फावलें ॥ तें तव नचले मजसी कांहीं ॥ जीव मी देईन कीं नामा नेईन ॥ नांव मी करीन गोतां माझी ॥ ६ ॥ आतां बरवें विचारीं अगा ये श्रीहरी ॥ माझा नामा करीं मज आधीन ॥ नाहीं तरी जीवित्व वेंचीन तुझ्या पायीं ॥ विनवीते गोणाई केशीराजा ॥ ७ ॥

॥ ३१० ॥ अगा ये विठोबा पाहें मजकडे ॥ कां गा केलें वेडें बाळ माझें ॥ तुझें काय खादलें त्वां काय दीधलें ॥ भलें दाखविलें देवपण ॥ १ ॥ आह्मीं ह्मणो तूंरे कृपाळु आहेसी ॥ आतां तूं कळलासी पंढरिराया ॥ ध्रु० ॥ देवपण आपुलें भोगूं पैं जाणावें ॥ भक्तां सुख द्यावें हेळा मात्रें ॥ १ ॥ देव होऊनियां आपेश कां घ्यावें ॥ माझें कां विघडावें एकूलतें ॥ २ ॥ तूं कैसारे देव या देशा वेगळा ॥ बांधतें तुझा गळा परी संतां भ्यालें ॥ तुझी करणी आह्मां ठावकीच आहे ॥ बोलोनियां काय हालकट व्हावें ॥ ३ ॥ जाणोनी पुंडलीकु तुझी न पाहेची वाट ॥ तूं भला नव्हेस घरघेणा ॥ तो बैसेन ह्मणे तुजयाची कारणें ॥ जडसी जिवें प्राणें सात्वीक भावें ॥ ४ ॥ ह्मणी तूं आपुला करिसी बोभाट ॥ मग येइल वीट लोकाचारी ॥ थोरपणें नामा करी मज आधीन ॥ गोणाइ ह्मणे चरण धरिन तुझे ॥ ५ ॥

॥ ३११ ॥ अरे नामदेवा नव्हेसी लेंकरूं ॥ जाणसी विचारु संसारीक ॥ शीवण्याटिपण्या त्वां घातलेंसें पाणी ॥ न पाहासी परतोनी घराकडे

॥ १ ॥ कैसी तुझी भक्ती या देशा वेगळी ॥ संसाराची होळी केली नाम्या ॥धृ०॥ उदंड पैं आह्मीं देखीयेले भक्त ॥ परी तूं आपुलें हीत न विचारिसी॥ अन्नेंवीण उपवासि बैसलासि येथें ॥ काय देईल तूतें विठ्ठल हा ॥ २ ॥ पुंडलिकें गोंवीला आजुनी उभा केला ॥ त्यासी प्रयत्न बळ नचले कांहीं ॥ गोकुळीं करि चोरी हा आपुलें पोट भरी ॥ तो तुज निर्धारीं देइल काई ॥३॥ तूं निलाजरा पाहीं तुज लाज नाहीं ॥ वेळोवेळां काइ सांगों तुज ॥ सांडोनी घरदार आपुला संसार॥ नाचतां विचार न करिसी ॥ ४॥ कामकष्ट तुंवा सांडीयेले आतां ॥ संसाराची चिंता कोण करी ॥ गोणाइ ह्मणे नाम्या नव्हेरे हें भलें ॥ विठ्ठल नामें केलें आपणा ऐसें ॥ ५ ॥

॥ ३११ ॥ नामा ह्मणे माते ऐक हो वचना ॥ मी गेलों दर्शना नागनाथा ॥ आंवढ्या देउळीं झाला हा संचारु ॥ पारुषला धीरु या देहाचा ॥ १ ॥ तैंहुनी तुज मज तूटला संबंधु ॥ विठ्ठलाचा छंदु घेतला जीवें॥ धृ० ॥ लौकिक वेव्हार नाठवेची कांहीं ॥ कल्पना ते देहीं आथींचना॥ टाळदिंडी घेउनियां नाचतों रंगणीं ॥ तेणें माझ्या मनीं सुख वाटे ॥ २ ॥ या घरसंसाराचा आलासे कंटाळा ॥ ह्मणोनी गोपाळा शरण आलों ॥ पुत्र कलत्र तेथें कायसीं बापूडीं ॥ जेणें रोख कुंडीं वास घडे ॥ ३ ॥ तूं जरी ह्मणसी सत्य संसारसुख ॥ तरी केवळ हें विख विस्तारलें ॥ तेंचि हें जाणोनीं टाकियेलें दूरीं ॥ तें सेवितां उरी कैंची मातें ॥ ४ ॥ ह्मणोनी मी झालों या संतांचा दीन ॥ तेणें हरिला शीण जन्मांतरींचा ॥ नामा ह्मणे आतां मीतूंपण कैंचें ॥ मी या विठोबाचें शरणांगत ॥ ५ ॥

॥ ३१२ ॥ गोणाइ ह्मणे नाम्या राहिलासी उदरीं ॥ तैंहुनी मी करीं आस तुझी ॥ उपजलासी तैं मज झाला संतोष ॥ आनंद उल्हास वाटे जीवा ॥ १ ॥ गण गोता माजीं केलें बारे नांव ॥ पंढरीचा देव प्रसन्न केला ॥ धृ० ॥ रात्रंदिवस लेखी अंगोळी बरी ॥ तूं मज संसारीं होसी ह्मणोनी ॥ तंव तुज अवचितीं उपजली बुद्धी ॥ भोंपळा हा खांदी आवडला ॥ २ ॥ हातीं टाळ घेऊनीं करीसी आळवणी ॥ घागरीया चरणीं बांधोनियां ॥ सांडोनी घरदार आपूला संसार ॥ नाचतां विचार न धरीसी ॥ ३ ॥ नव्हे तें करितां कोण असे वारिता ॥ परी त्वां अपुल्या हिता प्रवर्तावें ॥ मी एक आहें तव करीन तळमळ ॥ मग तुझा सांभाळ करील कोण ॥ ४ ॥ या विठ्ठलावांचुनी तुज नाहींरे संसार ॥ हा बोल निर्धार

सत्य माझा ॥ कोण्या गुणें तुवां घेतलें धरणें ॥ गोणाइ ह्मणे करणें फळासी आलें ॥ ५ ॥

॥ ३१३ ॥ आपणा वेगळा कशाला निवडीसी ॥ कां मज दवडीसी सांग नाम्या ॥ बरवें पुत्रपण झालासी उत्तीर्ण ॥ आतां अभीमान पाहें माझा ॥ १ ॥ तुज नेल्यावांचून नव जाय येथून ॥ पंढरी गिळीन विठोबा सहित ॥ धृ० ॥ जरीं झालासी शाहाणा तरी माझें लेंकरूं ॥ माझा आहे वेव्हारू या विठ्ठलासी ॥ हा दानवातें छळी आपणा ह्मणवी बळी ॥ तें मज जवळी नचले कांहीं ॥ २ ॥ विटेसहित चरणीं बांधीन आपुला गळा॥ क्षण जीवा वेगळा जाउं नेदी ॥ आसनीं शयनीं न विसंबें भोजनीं ॥ घालीन मुरडोनी हृदयामाजीं ॥ ३ ॥ या देहाचा संकल्प आलेसें करोन ॥ घातलेसें पाणी घरादारां ॥ हा त्रिभुवनीं समर्थ मी असें जाणत ॥ पाहेन पुरुषार्थ आजी याचा ॥४॥ अठ्ठावीस युगें भरलीं तया बोला ॥ धरोनी उभा केला पुंडलीकें ॥ गोणाइ ह्मणे देवा होइका शहाणा ॥ वांया कां परधना धरिसी लोभ ॥ ५ ॥

॥ ३१४ ॥ जनीता जीवविता सर्वज्ञ पाळीता ॥ आडणी प्रतिपाळिता चराचरीं ॥ एक पांडुरंग दुजा नाहीं चांग ॥ ह्मणोनी याचा संग धरिला माते ॥ १ ॥ माझी कांहीं तूज करणे नलगे चिंता ॥ मज आहे पोशीता पांडूरंग ॥धृ०॥ हा शरणागताचा जाणें कळवळा ॥ हा पैं कळीकाळा पाहोंनेदी ॥ केले कोटीवरी न मनी अपराध ॥ हें पैं साजे ब्रीद पांडूरंगा ॥ २ ॥ आह्मीं आपुल्या सुखें असों भलते ठाईं ॥ प्रीति तया पायीं जडली असे ॥ तेणें उपकारें न विसंबे क्षण ॥ हातीं सुदर्शन घेउनी उभा ॥३॥ जाणता नेणता राम गाऊं गीतीं ॥ जन्माची विश्रांती होय जेणें ॥ ऐसें जीवलग होईल कैचें आन ॥ संचलें परिपूर्ण सर्वां ठायीं ॥ ४ ॥ ह्मणोनी इष्टमित्र बंधु सज्जन सोईरा ॥ माझीया संसारा हाची एकू ॥ नामा ह्मणे माते मज नलगे मापीसें ॥ तुह्मांसीं मज ऐसें होईल पैं ॥ ५ ॥

॥ ३१५ ॥ जन्मासीं येऊनी पराक्रम धरी ॥ कां होशी संसारीं भूमिभार ॥ आणीकांचीं मुलें संसारीक कैसीं ॥ तूं मज झालासी कुलक्षण ॥ १ ॥ कैसी नाहीं तुज या लोकांची लाज ॥ हेंचि तों मज नवल वाटे ॥ धृ० ॥ अभीमान अहंकार सांडोनियां जगीं ॥ नाचतोसी रंगीं गीत

गात ॥ तुजहूनि लोक आहेती अज्ञान ॥ न विसंबती क्षण मायबापा ॥ २ ॥ याची कांरे तुवां धरीयेली आस ॥ हा तव कवणास झाला नाहीं ॥ यातें जे भजती त्याचें नुरे कांहीं ॥ हा देव नव्हे पाहीं घरघेणा ॥ ३ ॥ याचें नांव चक्रपाळ हा ब्रह्मादिकां आकळ ॥ तो कैसा कृपाळ दीनांलागीं ॥ होणार सारिखी तुज रचिली बुद्धी ॥ देव नव्हे त्रिशुद्धी मारकु जगीं ॥ ४ ॥ ज्याचें खुंटतें तो लागे याची पंथें ॥ माऊली ह्मणुनी तूतें सांगतेंरे ॥ गोणाइ ह्मणे नाम्या हें नव्हे भलें ॥ विठोबानें केलें आपणा ऐसें ॥ ५ ॥

॥ ३१६ ॥ वाघाचीया गळा बांधलीसे गाय ॥ तैसी तूंगे माय लोभापर ॥ १ ॥ तैसे मज संसारीं घालीसील खेवां ॥ कैसें तुझ्या जीवा गोड वाटे ॥ धृ० ॥ विषाचें गराळ पाजिसी केवळ ॥ हृदय कोमळ कैसें तुझें ॥ २ ॥ नामा ह्मणे मज आदीअंतीं एकु ॥ जननी आणि जनकु पांडुरंग ॥ ३ ॥

॥ ३१७ ॥ बहुत दिवस भरले पैं गोपाळा ॥ अगा ये विठ्ठला कणव नये ॥ नामा माझा वेगीं देईं माझ्या हातीं ॥ जाउंदे परती अनाथनाथा ॥१॥ खाऊं जेऊं तुज असोस पैं देऊं ॥ कीर्ति तुझी गाऊं जगा माजीं ॥ धृ० ॥ तुज काय उणें ब्रह्मांड नाइका ॥ नव्हेसी मजसारिखा एक देसी ॥ अनंत ब्रह्मांडें क्षणें घडमोडीसी ॥ कां मज दुर्बळीसी कष्टवीलें ॥ २ ॥ तुज दुजेपणाचा सहज आला वीट ॥ तूं तव एकट एकलाची ॥ ऐसी कीर्ति वेद वर्णीती पुराणें ॥ तें कां लाजिरवाणें करिसी देवा ॥ ३ ॥ तूं कृपेचा कोंवळा ह्मणति विश्वजन ॥ सा तुझें निर्वाण कळलें नाहीं ॥ मैंद मुद्रा धरणें गळां तुळसी माळा ॥ निवटितोसी गळा न कळतां ॥ ४ ॥ आतां आपुला भ्रमु राखे तो शहाणा ॥ झणीं माझ्या निर्वाणा पहासी देवा ॥ गोणाइ ह्मणे माझा नामा देउनी हातीं ॥ अंगिकारीं कीर्ति पंढरि-राया ॥ ५ ॥

॥ ३१८ ॥ तुझा नामा तुज व्हावा जन्मोजन्मीं ॥ काय यासी आह्मीं करूं शकों ॥ मर्यादा सांडोनी बोलसी कठीण ॥ करिसी वायांवीण इष्टतुटी ॥ १ ॥ ऐसें कांहीं सुख अनुपम्य दाखवीं ॥ जया ओळखी जी-वीं नीजरूपा ॥ धृ० ॥ जेणें लोभें त्याचें मन मागें मोहरे ॥ वृत्ति सहित

वीरे ठाई ठाई ॥ तेणें या जन्माचे विसरोनी संताप ॥ सोय आपेआप धरिल तुझी ॥ २ ॥ जरीं तूं देखतीस स्वहित पूर्वी याचें ॥ तरीं कां चित्त त्याचें त्रास घेतें ॥ संसार करितां कांहीं न देखेची सुख ॥ ह्मणोनी विन्मूख झाला तुज ॥ ३ ॥ वरपंगाचें पेहें पाजीसिल काय ॥ हा निजसुखीं धाय ऐसें करीं ॥ तरींच तूं निजाची लोभापर माता ॥ ह्मणोनी श्लाघ्यता जगामाजी ॥ ४ ॥ आतां असो सहज येणें वीण काय काज ॥ मी बोलीलों तुज कळेल तें करीं ॥ नामा ह्मणे देवा ऐसें काय केलें ॥ काय तुज वेगळें जीवन माझें ॥ ५ ॥

॥ ३१९ ॥ माझा नामा जंव नाम रूपासीं आला ॥ जो ह्मणों लागला घरदार ॥ तंव कैसें विघ्न उद्‌लें गे माये ॥ नामा पंढरिरायें भुलविला ॥ १ ॥ सांग वा विठ्ठला म्यां काय केलें ॥ नाम्या कां भुलवीलें कवण्या गुणें ॥ धृ० ॥ आह्मींगा शिंपीये अनाथें पैं दीनें ॥ करूं शिवणें टिपणें पोट भरूं ॥ त्यासीं तुवां आतां आणियेला क्षयो ॥ कैंचा आह्मां देवो निर्मीलासी ॥ २ ॥ असतां चराचर न बुडतां हे सृष्टी ॥ कां गा घेसी पाठी दुर्बळीची ॥ एकबाळ माझें धरिली त्याची आस ॥ त्या कैसी निराश मांडीयेली ॥ ३ ॥ दीसां मासां गर्भ जाणोनीयां पोटीं ॥ त्याची आस मोठी करिती लोक ॥ एवढा माझा नामा कैसेन वीसरेन ॥ देईं कृपादान दुर्बळीसी ॥ ४ ॥ तूं अनाथा गोसावी दीनाचा कैवारी ॥ तें ब्रीद श्रीहरी काय झालें ॥ विघडीलें पाडस करीं एकेठायीं ॥ विनवीते गोणाइ केशीराजा ॥ ५ ॥

॥ ३२० ॥ तुझीया नाम्यानें बळी देउनी चित्त ॥ जन्मूनियां आप्त केलें मज ॥ इष्ट मित्र बंधु जननी जनक ॥ सर्व मीच एक करुनी ठेला ॥ १ ॥ ऐसी याची करणी आजोनी नेणसी ॥ बाळ माझें ह्मणसी चाळविलें ॥ धृ ॥ प्रेमाचें लाघव लाउनी माझ्या पायीं ॥ बांधलें हृदयीं धरोनियां ॥ वृत्तिसहित मन लावीलें राखण ॥ केलें जीवें जतन मजलागीं ॥ २ ॥ उचंबळले नयन अंतरीच्या अनुरागें ॥ रात्रंदिवस जागे माझ्या ठायीं ॥ बोले चाले परी लक्ष मजवरी ॥ बाहेरी भीतरीं मज देखे ॥ ३ ॥ सर्व सुख गुणा रूपा देउनी मीठी ॥ आणि निर्गुणीं हिंपुटी होऊं नेदी ॥ न मागे न घे न धरी सोय संसाराची ॥ कल्पना देहींची मावळली ॥ ४ ॥ ऐसें येणें

मज विश्वासीं गोंविलें ॥ सर्वत्र लावीलें मजची कडे ॥ निर्गुणीं हा नामा न सोडी सर्वथा ॥ सांपडला आतां एकरूपा ॥ ५ ॥

॥ ३२१ ॥ बुडविली क्रीया बुडविलें कर्म ॥ बुडविला धर्म पाहा येणें ॥ तुझीया नामाचें लागलेंसे पिसें ॥ असोनी न दीसे लोकाचारीं ॥ १ ॥ नेणों काय कळे तुवां वागवीला ॥ संबंधु तुटला मज नाम्याचा ॥ ध्रु० ॥ बुडविला आचार बुडविला विचार ॥ बुडविला संसार कुळासहित ॥ आपुलें पारिखें सर्वथां सारीखें ॥ नेणों कवणा सुखें वेडावला ॥ २ ॥ बुडविला मोहो बुडविली ममता ॥ बुडविली अहंता मीतूंपण ॥ हा नेणे वेव्हार कां इंद्रियांचें सुख ॥ अखंड याचें लक्ष तुझे पायीं ॥ ३ ॥ बुडविली कल्पना समुळीं वासना ॥ बुडविली सेवा त्रिविध कैसी ॥ हांसे नाचे प्रेमें फुंदतु डुल्लतु ॥ अहर्निशीं गातु नाम तुझें ॥ ४ ॥ असोनी नसता केला ये संसारीं ॥ म्यां वाहिला उदरीं तैसा नाहीं ॥ गोणाइ ह्मणे देवा त्वां केली निरास ॥ चाळविलें उदास बाळ माझें ॥ ५ ॥

॥ ३२२ ॥ गोणाइ ह्मणे ऐकें केशीराजा ॥ सदां अरज तुझे नामें देवा ॥ नेणों याच्या जीवें घेतलेंसे काई ॥ लोळणीच पायीं घाली तुझे ॥ १ ॥ पुसे या जीवींचें या काय आवडे ॥ उगउनी कोडें नेई यासी ॥ देतां कांहीं न घे नसतां कांहीं न मागे ॥ धृ० ॥ गुज पैं न सांगे अंतरींचें ॥ जन्मोनी सांकडें घेतलें वो कैसें ॥ गिळील मज ऐसें वाटतसे ॥ २ ॥ मी भावासीं भुललों सांपडलों याच्या हातीं ॥ करील काय अंतीं नकळे कांहीं ॥ एक वेळ मज सोडवीं यापासोनी ॥ दे कां मज लागोनी जीवदान ॥ ३ ॥ माझीया पैं बोलें मजची गोंविलें ॥ यातें आपंगीलें अनाथ ह्मणोनी ॥ अंगोळीये धरितां खांदीये वोळंगलें ॥ आतां माझें केलें नचले कांहीं ॥ ४ ॥ तूं आपुले मनीं विचारून पाहीं ॥ नामा आपुला नेई आवडता ॥ मायलेंक दोघें सामराज्य करीं ॥ घेई धनिवरी सुख याचें ॥ ५ ॥ कठीण बोल तुझे बहुसाळ ऐकीले ॥ नाहीं त्वां पाहिलें मागें पुढें ॥ चित्त तुझें कैसें सांठवले माया ॥ कां करिसी वांयां इष्टतुटी ॥ ६ ॥ ऐसें देवाचें बोलणें ऐकोनी उदास ॥ नाम्या झाले क्लेश तयेवेळीं ॥ नामा ह्मणे देवा ऐसें कैसें घडे ॥ सृष्टि हे पैं बुडे परी न सोडीं तुज ॥ ७ ॥

॥ ३२३ ॥ विश्वजन मोहना कपटीया नारायणा ॥ काय देवपणा मिरवितोसी ॥ दर्शना आलिया हृदयीं संचरसी ॥ देहभाव घेसी हिरोनियां

॥ १ ॥ या विश्वा वेगळें नवल तुझें करणें ॥ सांगावें गाऱ्हाणें कोणापासीं ॥ धृ० ॥ सर्वांग सकुमार परी हृदयीं कठीण थोर ॥ नेणसी जेव्हां रे मज दुर्बळीचें ॥ मज अनाथाचें बाळ वेधोनी मोहिलें ॥ बहुत दुःख झालें सांगों कोणा ॥ २ ॥ कासया पितृभक्ती पुंडलिकें केली ॥ विवसी आणिली पंढरीसीं ॥ माया दुखऊनी मोहिसी बाळकें ॥ देवपण निकें कैसें तुझें ॥ ३ ॥ यातें अनुसरल्या कैंची बाप माय ॥ नाठवेची सोय संसाराची ॥ ऐसीयानें संग धरिला तुझा देवा ॥ प्रत्यक्ष अनुभवा आलें मज ॥ ४ ॥ माझीया मनींचें जाणोनियां गुज ॥ कांहींएक तुज सांगेन मीं ॥ माझा नामा लावीं संसाराचे सोई ॥ विनवीते गोणाई केशवातें ॥ ५ ॥

॥ ३२४ ॥ निर्गुणपणाचा अभिमान सांडिला ॥ निगम लाजविला नारायणा ॥ कपट करोनि भक्तांसी तारिसी ॥ तुझा तूं ठकसी पंढरिराया ॥ १ ॥ ठकुनी पुंडलिकासी न्यावया वैकुंठासी ॥ या बुद्धीं आलासी पंढरीये ॥ तंव सा भक्तराजें धरीयेलें चित्तें ॥ परतोनि मागुतें जाऊं नेदी ॥ २ ॥ अठ्ठावीस युगें गेलीं विचारितां ॥ निर्गम सर्वथा नव्हे देवा ॥ मग कटावरीं कर धरोनियां धीर ॥ उभा निरंतर राहिलासीं ॥ ३ ॥ सर्व घे प्रेमें ते हीरोनि बांधिले ॥ विचारें साधिले कोणेकोणा ॥ द्वारीं द्वारपाळ झालासी अंकित ॥ सांग बुद्धीमंत कोण ऐसा ॥ ४ ॥ नाथीलेंची कारिसी आपणा गोंविसी ॥ बोल कां ठेविसी नामयातें ॥ गोणाइ ह्मणे तूझें नकळे विंदान ॥ देईं कृपादान बाळ माझें ॥ ५ ॥

॥ ३२५ ॥ माझें घर त्वां पूर्वींच बुडवीलें ॥ जें दर्शनासीं आलें बाळ माझें ॥ नेणों काय वर्म तूझें सांपडलें हातीं ॥ रिघालासी चित्तीं जेणें द्वारें ॥ १ ॥ लौकिक परिहार देसील कासया ॥ मी तुज ऐसीया बरें जाणें ॥ धृ ॥ कटीं कर ठेउनी ऊभा गरुडपारीं ॥ हें तंव अंतरीं हारपला ॥ नाहीं चळणवळण न लावी पात्यापातें ॥ लागलें नीरूतें लक्ष तुझें ॥ २ ॥ तुझी याची खूण अंतरींची येकी ॥ दाविसी लोकीकीं भिन्नपण ॥ सांडियेली येणें लौकिकाची लाज ॥ नव्हे माझा मज कांहीं केल्या ॥ ३ ॥ तुझेनीं सुखें धाला आनारीसा झाला ॥ अभिमान मावळला समूळ याचा ॥ देहीं पैं असोनी विदेही दीसत ॥ प्रेमें वोसंडत हृदयकमळीं ॥ ४ ॥ तूं अनाथा कैवारी ऐसी वेदवाणी ॥ परी कां नये अजोनी कणव तुज ॥ गोणाइ ह्मणे माझा नामा देईं हातीं ॥ लागेन पुढतां पुढतीं तुझे पायीं ॥ ५ ॥

॥ ३२६ ॥ वाचेचेनीं बळें बोलसी आगळें ॥ मर्यादे वेगळें वायांवीण ॥ भ्रमलीसी आरजे न पाहसी आपणाकडे ॥ धारिष्ट केवढें पाहें तुझें ॥ १ ॥ नेई आपला नामा काय चाड आह्मां ॥ जरी आहे तुज भ्रमा ममत्वाचा ॥ धृ० ॥ पाहेंपां पूर्वींचा कवणीये जन्मींचा ॥ नकळे तुझा याचा ऋणानुबंध ॥ तो सरला कीं उरला विचारितां आपुला ॥ हा तुज अंतरला कवण्या गुणें ॥ २ ॥ येणें सांडीला संसार वेव्हार लौकिक ॥ अविद्या अहंभाविक दोन्हीं नाहीं ॥ हा प्रपंचावेगळा नकळे याची लीळा ॥ लागलासे डोळां प्रेम मुद्रा ॥ ३ ॥ ऐसी याची स्थिति देखोनियां डोळां ॥ मज कां वेळोवेळां छळीतेसि ॥ जाणसी त्या परी बुजावीं वो यातें ॥ जेणें सुखें तूतें ओळखिल ॥ ४ ॥ याचेनी संसार चालवीन ह्मणोनी ॥ ऐसी भ्रांती मनीं धरिली वायां ॥ नामा तरि नीमाला आह्मा अनुसरला ॥ तरंगु विराला जळीं जेंवी ॥ ५ ॥

॥ ३२७ ॥ नामयासारीखें निधान तुझे कुसी ॥ धन्य तूं वो होसी जगा माजी ॥ धन्य याचें सुख देखीयेलें डोळां ॥ प्रेमाचा जिव्हाळा आलोलिक ॥ १ ॥ धन्य तुझें कूळ धन्य तुझा वंश ॥ दिपासवें प्रकाश दीसे जेंवी ॥ धृ० ॥ धन्य तुझी काया धन्य वाचा मना ॥ करवीलें स्तनपान नामयासीं ॥ धन्य हा दिवस तुंवा केलें सार्थक ॥ खेळवीलें कौतुकें नामयासीं ॥ २ ॥ धन्य तुझें भोजन नाहीं नाम्याविण ॥ धन्य उदकपान केलें तुवां ॥ धन्य विश्रांतीसीं केलें त्वां शयन ॥ वोसंगा घेऊन नामयासीं ॥ ३ ॥ तुझे धन्य कर कुरवाळिला नामा ॥ धन्य तो संभ्रमा स्नेह तुझा ॥ धन्य कृपा दृष्टीं नाम्यातें पाहिलें ॥ केंस कुर्वाळीले बाळपणीं ॥ ४ ॥ ऐसी तूं ओ धन्य जन्मोनियां धन्य ॥ तुझें नाम धन्य मीरवत ॥ धन्य तुझा नामा ज्याची भेटी आह्मां ॥ धन्य त्याचा प्रेमा नित्य नवा ॥ ५ ॥

॥ ३२८ ॥ लावोनी भवभय तुंवा केलें साचें ॥ देह नव्हे याचें ऐसें केलें ॥ सुखभोग सर्व दिल्हा टाकोनियां ॥ नेणें तुझ्या पायां परतें कांहीं ॥ १ ॥ ऐसें काय केलें नाम्या चाळवीलें ॥ समूळ बुडविलें आपणा माजीं ॥ धृ० ॥ आह्मां दुर्बळाचा करोनियां घात ॥ केला वाताहात घरचार ॥ आतां तुजवीण कोणाचे साउली ॥ पाळीली पोसिली तुझी देवा ॥ २ ॥ संकटीं उदरीं वाहिली म्यां आशा ॥ होता भरंवसा थोर याचा ॥ तंव त्वां आपुल्या लावीयेली सोई ॥ नव्हे मज कांहीं ऐसा केला ॥ ३ ॥ काया वाचा मनें सांडोनियां मज ॥ अनु-

सरला तुज मनोभावें ॥ नकळे तुझी माव काय या दावीलें ॥ परतेनासें केलें चित्त याचें ॥ ४ ॥ आतां माझा शीण निवारील कोण ॥ एका तुजवीण पांडुरंगा ॥ गोणाइ ह्मणे देवा देईं जीवदान ॥ सुखाचें निधान नामा माझा ॥ ५ ॥

॥ ३२९ ॥ राही रकुमाइ सत्यभामा माता ॥ शिवाय कांता बहुतां परी ॥ संत सनकादिक साक्ष हे सकळ ॥ येणें माझें बाळ चाळवीलें ॥ १ ॥ हा काय अमुचा धनी कीं गोसावी ॥ नाहीं तें शिकवी लेंकुरासी ॥ धृ ॥ झाला देव तरी पडों याच्या पायां ॥ मैं दावें केलीया भलें नव्हे ॥ भींड तुटलीया नेईन चौघां चारीं ॥ होईल समसरी याची मज ॥ २ ॥ देव कांहीं आह्मीं नसतें ऐकीलें ॥ परी नाहीं देखीलें ऐसें कोठें ॥ दर्शनेची जेथें जीवित्वाची हानी ॥ नाठवे परतोनी घराचार ॥ ३ ॥ कैंची ओ पंढरी मी वो काय जाणें ॥ याच्या पुत्रपणें देखीयेली ॥ या देवासी भेटीं जन्म मरणें तुटी ॥ मावळली गोष्टी संसाराची ॥ ४ ॥ तुह्मीं औघ्याजनीं याच्या सांगातिनीं ॥ पुसा याचे मनीं काय आहे ॥ देऊनिया नांवा मज लावा वाटे ॥ गोणाइ ह्मणे वोखटें न करीं देवा ॥ ५ ॥

॥ ३३० ॥ अरे विठोबा आतां पाहें मजकडे ॥ कां रे केलें वेडें बाळ माझें ॥ तुझें उच्छिष्ट खादलें त्वां काय दीधलें ॥ भलें दाखवीलें देवपण ॥ धृ० ॥ अधीं त्वां तयाचें भोगुं पैं जाणावें ॥ भक्तां सुख द्यावें आनंदाचें ॥ १ ॥ गोणाइ ह्मणे देवा तुज बांधलें दावें ॥ तरी तुज भ्यावें लागे संतां ॥ २ ॥

॥ ३३१ ॥ हरी त्वां कोणाचें बरवें केलें ॥ पूर्ण आह्मां कळों आलें ॥ नारद वैष्णव जगजेटी ॥ त्यासि लावीली लंगोटी ॥ १ ॥ मयुरध्वज राजा भला ॥ त्यासि करवतीं घातला ॥ २ ॥ बळी दानशीळ भला ॥ तुंवा पाताळीं घातला ॥ ३ ॥ भीष्म वैष्णवांचा राव ॥ त्याचा बाणें पुजिला ठाव ॥ ४ ॥ रुक्मांगद हरिचा दास ॥ त्याचा गांवच केला वोस ॥ ५ ॥ बाळ एकुलतें एक ॥ तो त्वां ज्ञानीच केला शुक ॥ ६ ॥ उपमन्य बाळक पाहें ॥ क्षीरसागरीं कोंडिलें आहे ॥ ७ ॥ धुरु बाळक गोजिरवाणें ॥ त्याचें खुंटलें येणें जाणें ॥ ८ ॥ हरिश्चंद्र ताराराणी ॥ डोंबाघरीं वाहे पाणी ॥ ९ ॥ प्रल्हाद भक्तीचा भूकेला ॥ त्याचा बाप त्वां वधीला ॥ १० ॥ हनुमंत भक्त नीकट ॥ त्यासी केलें त्वां मर्कट ॥ ११ ॥ पुण्यवंत राजा नळ ॥ त्याचा केला तुंवां

छळ ॥ १२ ॥ श्रियाळ राजा भला ॥ त्याचा बाळ त्वां खादला ॥ १३ ॥ तुज कोणी न ह्मणे भलें ॥ बाळ पोटीचें कोंवळें ॥ १४ ॥ जिकडे तिकडे तुह्मीं दोघें ॥ तिकडे तिसरा नामा मागें ॥ १५ ॥ तुज नाहीं जाती कुळ ॥ जेउनी भ्रष्टवीलें बाळ ॥ १६ ॥ जेणें तुझें नाम घेतलें ॥ ते संसारा वेगळे केले ॥ १७ ॥ आतां जेविसी तरी तुज आण ॥ ऐकोनि हांसे जगजीवन ॥१८॥ नामा दिल्हा माते हातीं ॥ नयन भरले आश्रुपातीं ॥ १९ ॥ माय पाहे नामदेव ॥ तंव तो झाला केशवराव ॥ २० ॥ माय ह्मणे नये कामां ॥ तुह्मा वोपिला तुज नामा ॥२१॥ गोणाइ ह्मणे हरी ॥ तुझी करणी तुजची बरी ॥२२॥

॥ ३३३ ॥ शिवणें टिपणें करोनी आपुलें ॥ नित्य चालवणें संसारिक ॥ गणगोता माजीं बरें केलें नांव ॥ माझें सत्त्व सर्व बूडवीलें ॥ १ ॥ कवणें गुणें तूज पडिली वा भूली ॥ सुख या विठ्ठलीं देखिलें काय ॥ धृ० ॥ तूं भक्त नीधडा हा देव धडफुडा ॥ मेळविला जोडा येरयेरां ॥ यासीं नाहीं आप तुज नाहीं पर ॥ आमुचा संसार विभांडिला ॥ २ ॥ सरलें आयुष्य उरले थोडे दीस ॥ थोर केली आस होती जीवीं ॥ आमच्या माघारें राखीसी वो नांव ॥ त्वां तंव बरवें दैव काढीयेलें ॥ ३ ॥ खांदीये भोंपळा गळां तुळसी माळा ॥ जपसी वेळोवेळां रामकृष्ण ॥ तेणें छंद नयनीं आश्रुचीया धारा ॥ केली ख्याती गंव्हारा जनामाजीं ॥ ४ ॥ आरे ऐसें तुंवा बुडवीलें कुळ ॥ सांडिली सकळ लोकलाज ॥ बरवी धरीली दृढ सत्त्वाची पाउडी ॥ शिकवी दामशेटी नामयासी ॥ ५ ॥

॥ ३३४ ॥ लाभाचीया लोभें मज ह्मणसी आपुलें ॥ परी नेणसी तापलें चित्त माझें ॥ जन्म मरण दुःखें शिणलों यातायातीं ॥ ऐसी माझी खंती न विचारीसी ॥ १ ॥ ह्मणोनी विठोबाचा झालों शरणांगत ॥ तेणें माझें हीत ऐसें केलें ॥ ध्रृ० ॥ पुत्र कलत्र सकळ भजती हीतालागीं ॥ दुःखाचे विभागी नव्हती कोणी ॥ जन्मोनी भजतां उचित एक चुके ॥ तें होय पारिखें क्षणामाजीं ॥ २ ॥ नाना योनी हिंडतां आपुलें नीज कर्म ॥ मज होय श्रम तें तूं देईं ॥ परी माझ्या विठोबाची सेवा सुखगोडी ॥ नाहीं एक घडी न देखों कोठें ॥ ३ ॥ जाती कुळ माझें नाहीं विचारीलें ॥ नेणों अंगीकारिलें कवण्या गुणें ॥ तुजवीण साचें हृदय कोंवळें ॥ पाळी माझे लळे नानापरी ॥ ४ ॥ शीणलिया बोभाय मग मी वाट पाहें ॥ येवो माझे माये पांडुरंगे ॥ शब्द माझा कानीं पडतां तत्क्षणीं ॥ येतसे टाकोनी

झेंपावत ॥ ५ ॥ न सांगतां कांहीं सर्व जाणे जिवींचें ॥ आणीक ऐसें कैचें लोभापर ॥ देउनी अभयदान करें कुरवाळी ॥ करीतसे साउली पीतांबरें ॥ ६ ॥ मायबाप सखा जीवलग सोइरा ॥ माझीया संसारा हाची एक ॥ नामा ह्मणे माझ्या हृदयींचा विसावा ॥ गीती गातां जीवा गोड वाटे ॥ ७ ॥

॥ ३३५ ॥ गोणाइ ह्मणे नाम्या वचन माझें ऐक ॥ पोटीचें बाळक ह्मणोनी सांगें ॥ महीमेचा संसार सांडोनी आपुला ॥ संग त्वां धरीला निःसंगाचा ॥ १ ॥ या काय मागसी तो काय देईल ॥ शीघ्रची नेइल वैकुंठासीं ॥ ध्रु० ॥ सविल्याचीं लेंकुरें वर्ततातीं कैसीं ॥ तूं मज झालासी कुळक्षय ॥ धनधान्य पुत्र कलत्रें नांदती ॥ तुज अभाग्याचे चित्तीं पांडुरंग ॥ २ ॥ शिवण्या टीपण्या घातलेंसे पाणी ॥ नपाहसी परतोनी घराकडे ॥ कैसी तुझी भक्ती या लौकीका वेगळी ॥ संसाराची होळी केली नाम्या ॥ ३ ॥ याची तुवां कैसी धरीयेली कांस ॥ हा तंव कवणास झाला नाहीं ॥ यातें जे अनुसरती त्यांचें नुरे कांहीं ॥ देव नव्हे पाहीं हा घर घेणा ॥ ४ ॥ गोकुळीं करी चोरी आपुलें पोट भरी ॥ तो तुज निर्धारीं देइल काई ॥ लक्षुमी सारीखी सुंदरा टाकोनी ॥ ताटीका गौळणी गौळीयांच्या ॥ ५ ॥ अष्टसिद्धी दासी जयाच्या कामारी ॥ कल्पवृक्ष द्वारीं कामधेनु ॥ टाकोनी बळीचे द्वारीं भीक मागों गेला ॥ धरोनी बांधला दारवंटा ॥ ६ ॥ कुरूप कुबज्या कंसाचीया दासी ॥ जीवेंभावें तीसी रतलासे ॥ यातें भजति त्यांच्या संसाराची नासी ॥ जडला जीवेसीं नवजाय ॥ ७ ॥ ठकोनियां येणें बहु नाडीयेलें ॥ तैसें तुज झालें सत्य जाण ॥ गोणाइ ह्मणे नाम्या नाइकसी शिकवीलें ॥ घर त्वां बुडवीलें कुळासहित ॥ ८ ॥

॥ ३३६ ॥ नामा ह्मणे माते परीयेसीं वचन ॥ गुज मी सांगेन अंतरींचें ॥ धरोनी माझी वृत्ती पाहें माझें सुख ॥ मी सांगतों तें ऐक जननीये ॥ १ ॥ कायावाचामनें ममत्व माझ्या ठायीं ॥ तें तूं ठेवीं पाई विठोबाचे ॥ ध्रु० ॥ मग हा कृपासिंधु न विसंबेल तूज ॥ अनाथाची लाज हाची राखे ॥ पाहेपां पशु मज जळचरें गांजीलें ॥ सकळीं सांडीलें जीवलगीं ॥ २ ॥ पीतांबरासहीत घालोनीयां उडी ॥ सोडवीला पानेडी अनाथ ह्मणोनी ॥ प्रऱ्हादाकारणें झाला पैं पीसाट ॥ धरीलें विकट रूप देवें ॥ ३ ॥ विदारूनी दैत्य आवेशें बहूत ॥ यानें माझा भक्त गांजीयेला ॥

पांडवांचें काज करितां नाहीं लाज ॥ ह्मणे शरण मज अनन्यभावें ॥ ४॥ पाडसा कारणें जैसी कुरंगीणी ॥ तैसा रानींवनीं सांभाळीत ॥ ५ ॥ जन्मोनीयां माझे बहु लोक पाळीले ॥ आडणीं सांभाळीले अनाथनाथें ॥ नामा ह्मणे याचे दृढ धरी चरण ॥ कळीकाळापासोन सोडवील ॥ ६ ॥

॥ ३३७ ॥ गोणाइ ह्मणे नाम्या जल्पसी भलतें ॥ तुज कोण्या दैवतें चोढीयेलें ॥ लाजीरवाणें तुंवा केलें रे हें जिणें ॥ हांसती पिसूनें देशोदेशीं ॥ १ ॥ सांडी सांडी नाम्या तूं हें देवपीसें ॥ बळें घर कैसें बुडवितोसी ॥ ध्रु० ॥ नवमास उदराभितरीं वाहीला ॥ माझ्या नेणत्या बाळा चालवीलें ॥ तुझे द्वारीं बैसोनी उपवास करीन ॥ नामा घेऊन जाईन गुणराशी ॥ २ ॥ येथें तें होईल लटिकेंची भांडण ॥ नामा द्यावा ह्मणे गोणाइ माझा ॥ गोणाइ ह्मणे नाम्या कळेल तें करीं ॥ स्वहीत विचारीं सांगों किती ॥ ३ ॥

॥ ३३८ ॥ देव झाला नामा नामा झाला देव ॥ गोणाइचा भाव पहावया ॥ १ ॥ हा घे तुझा नामा काय चाड आह्मां ॥ आनंदाचा प्रेमा गोणाइसीं ॥ धृ० ॥ हातीं धरोनियां घेउनी चालिली ॥ फिरून पाहती झाली तंव तो देव ॥ २ ॥ आगा माझ्या बापा तूं कोणा ह्वासी ॥ मज दुर्बळीसीं काय होय ॥ ३ ॥ सोळा सहस्र मुख्य अष्ट तुझ्या कांता ॥ सा माझ्या घाता प्रवर्ततील ॥ ४ ॥ पुंडलीकासीं तूंवा दीधली आहे भाक ॥ गोणाई ह्मणे ठक बहु होसि ॥ ५ ॥

॥ ३३९ ॥ माझा नामा मज देईं ॥ जीव देइन तुझे पायीं ॥ १ ॥ पुंडलीका भुलवीलें ॥ तैसें माझें बाळ केलें ॥ धृ० ॥ तें गा नचले मज पासीं ॥ देगा माझ्या नामयासीं ॥ २ ॥ तुज संगतीं जे लागले ॥ ते त्वां जीतेची मारिले ॥ ३ ॥ विठ्ठल ह्मणे गोणाबाई ॥ आपुला नामा घेऊनी जाईं ॥ ४ ॥ हातीं धरोनीयां गेली ॥ गोणाइ तेव्हां आनंदली ॥ ५ ॥

॥ ३४० ॥ पोर निर्दय झालें देवपीसें लागलें ॥ लोकाचें गोंवीलें तेंहि पोर ॥ १ ॥ नित्य करी अंघोळी धोत्रेंही फाडीलीं ॥ कळी मांडीयेली याहीं पोरें ॥ धृ० ॥ गांवींचे महाजन करीती गुडघे स्नान ॥ या पोरा व्यसन अंघोळीचें ॥ २ ॥ जन्मोजन्मीं नेणों आह्मीं ह्या तुळसी ॥ या पोरें

वीवसी मांडीयेली ॥ ३ ॥ गोणाइ ह्मणे नाम्या तुंवा भलें केलें ॥ तया वश्य केलें वीठोबासीं ॥ ४ ॥

॥ ३४१ ॥ ज्याचें दैव त्या सांगातें ॥ मला नवल वाटतें ॥ १ ॥ एक बैसती अश्वावरी ॥ एक चालती चरण चालीं ॥ धृ० ॥ एक जेविती मिष्टान्न ॥ एका न मिळे कोरान्न ॥ २ ॥ गोणाई ह्मणे धन्य देवा ॥ नामयाचा संचित ठेवा ॥ ३ ॥

॥ ३४२ ॥ सोय सांडीली घराची ॥ जोडी केली विठ्ठलाची ॥ १ ॥ माय बापासीं टाकिलें ॥ ध्यान देवाचें लागलें ॥ धृ० ॥ स्त्री पुत्र बंधु बहीणी ॥ केली सर्वांची सांडणी ॥ २ ॥ गणगोत इष्टमित्र ॥ सर्व जोडिलें विठ्ठलपात्र ॥ ३ ॥ गोणाइ ह्मणे नामा ॥ भली केली बारे सीमा ॥ ४ ॥

॥ ३४३ ॥ युक्तायुक्त ज्ञान वैराग्यसाधन ॥ महातपोधन वरद योग्य ॥ १ ॥ आनंदाचा ओघ भक्तीचा सोहळा ॥ हरि वेळोवेळां जपत वाचे ॥ २ ॥ नित्य हें पूजन करी नामदेव ॥ विठ्ठलीं हा भाव ठेवूनियां ॥३॥ नामयाची कांता क्रोधयुक्त बोले ॥ भजन सोहळे तुह्मां गोड ॥ ४॥ परी हा नावडे संसाराचा संग ॥ अखंड पांडुरंग चिंतीतसां ॥ ५ ॥ तुमची हे गति लेंकुरें नेणतीं ॥ धान्य नाहीं नित्य भक्षावया ॥६॥ ऐसा हा वेव्हार तुमचा जी स्वामी ॥ आतां पुसेन मी पांडुरंगा ॥ ७ ॥ माझिया संसारा घातलेंसें पाणी ॥ नाचती रंगणीं विठ्ठलाच्या ॥ ८ ॥ ऐसें देवा तुझें अघटित मत ॥ ह्मणोनि रडत देवा पुढें ॥ ९ ॥ देव ह्मणे नाम्या अंगीकार इचा ॥ करूनि देवाचा होई सुखी ॥ १० ॥ नामा ह्मणे देवा ऐकाजी वचन ॥ उबग कोण्या गुणें आला असे ॥ ११ ॥ राहो हे पंढरी सुखें नांददेवा ॥ मज नाहीं हेवा उणें कांहीं ॥ १२ ॥ तुझिया कृपेचा अंकित मी होय ॥ तुजवीण आहे मज कोण ॥ १३ ॥ माझिया संसारा पाडियलें पाणी ॥ काय आहे वाणी गति कोण ॥ १४ ॥ ऐसें असूनीयां उबग केशवा ॥ माझ्या आला देवा कोण्या गुणें ॥ १५ ॥ जन्मा पासोनिया सेवेसीं लाविलें ॥ निःसंतान केलें पांडुरंगा ॥ १६ ॥ आतां मजलागीं लावियतां उद्वेगा ॥ अगा पांडुरंगा माय बापा ॥ १७ ॥ आतां मज ह्मणसी संसार करावा ॥ काय मी केशवा करूं आतां ॥ १८ ॥ देवा ऐसी युक्ति उगा राहे आतां ॥ समर्था केशिनाथा देवराया ॥ १९ ॥ मागूनि

अंतरीं विचार पैं केला ॥ चित्तीं पैं सांचला क्रोध फार ॥ २० ॥ ह्मणोनियां आतां विठो सुखें राहे ॥ मुख तुज पाहें दाखवीना ॥ २१ ॥ देवाचे चरण पहावयासाठीं ॥ संसाराची तुटी करावया ॥ २२ ॥ ऐसें मी करीन जाण विठोराया ॥ पंढरीचे ठायां मोडवीन ॥ २३ ॥ राहें नामीं आतां जाईन दूर देशां ॥ भक्तीची हे आशा सोडोनियां ॥ २४ ॥ जाईल भिंवरा जाईल पुंडलीक ॥ जाईल सकाळिक महिमा तुझी ॥ २५ ॥ ऐसें बा विठ्ठला त्वां दुखविलें मज ॥ सोडीना सहज पंढरीतें ॥ २६ ॥ उदास हें चित्त माझें झालें देवा ॥ जाईन केशवा मायबापा ॥ २७ ॥ आतां असों द्यावा लोभ हाचि देवा ॥ समर्था केशवा मायबापा ॥ २८ ॥ अपूल्या सांगातें नेईन पंढरी ॥ नेईन संतनगरीं भिंवराजना ॥ २९ ॥ नेईन सांगातें महिमा येथिंची ॥ मागें हेत हाचि धरूनि राहे ॥ ३० ॥ चक्रतीर्थ आणि पद्माळें हें जाण ॥ सर्वही करीन आपणापासीं ॥ ३१ ॥ आपणचि तीर्थ आपणचि व्रत ॥ आपण दीनानाथ होईन मी ॥ ३२ ॥ येथें हे पंढरी होती ऐसें लोक ॥ ह्मणतील देख पुढें देवा ॥ ३३ ॥ बोलोनियां ऐसें पुढें चाले नामा ॥ मग झाला प्रेमा पांडुरंगा ॥ ३४ ॥ पळतां पळतां नाटोपे तो जाणा ॥ मागें देवराणा धांवतसे ॥ ३५ ॥ धांवतां धांवतां भागला केशव ॥ उभा राहे तंव हात कटीं ॥ ३६ ॥ जें कां पंढरपुर वस्तीचें असणें ॥ धरिला नामा तेणें पांडुरंगें ॥ ३७ ॥ तंव तो पळत लोळणी घातली ॥ साक्षणीं न बोले देवाशीं जो ॥ ३८ ॥ देव ह्मणे नाम्या पाहें परतोन ॥ तुज मी शरण आलों असें ॥ ३९ ॥ न करीं उदास चाल तूं पंढरीं ॥ ऐसें बोले हरि नामयासीं ॥ ४० ॥ तंव ह्मणे नामा ऐसें मी करीन ॥ पंढरीं नेईन भिंवरे सहित ॥ ४१ ॥ मोडीन महिमा तीर्थांचा केशवा ॥ कळेल तुज तेव्हां भक्त ऐसा ॥ ४२ ॥ मग ह्मणे विठ्ठल पुंडलीका साठीं ॥ चाल उठाउठीं पंढरीसीं ॥ ४३ ॥ पितृभक्त पाहीं तोचि पुंडलीक ॥ ऐसा भाव देख जाणीवेचा ॥ ४४ ॥ मग धरूनि मनगटीं चालविला नामा ॥ मोठा आला प्रेमा विठोबासीं ॥ ४५ ॥ ऐसें हें आख्यान सारूनियां देवें ॥ मग आले भावें पंढरीसीं ॥ ४६ ॥

॥ ३४४ ॥ आई जें शिकवि तीतें तुह्मीं नायका ॥ नाहीं भय शंका लौकिकाची ॥ १ ॥ लंगोटी लावूनी झालेति गोसांवी ॥ आमुची ठेवा ठेवी कोण करी ॥ २ ॥ तुमची तंव हे गति लेंकरें नेणति ॥ कवण चालविति

चराचारु ॥ ३ ॥ सुखाचा संसार केला बारा वाटे ॥ नांव केलें मोठें जगामाजीं ॥४॥ घडचि कांटिये घातलें वो कैसें ॥ बळें आपणां पिसें लावियेलें ॥ ५ ॥ सांडियेला मोह त्यजियली माया ॥ भुलविलें तुमचिया जीवा कोणें ॥६॥ सर्वस्व सांडुनि धरियेला देव ॥ पुसियेला ठाव संसाराचा ॥ ७ ॥ माझी हे कणव नये अझुनी कांहीं ॥ विनविती राजाई नामदेवा ॥ ८ ॥

॥ ३४५ ॥ ऐसी चिंताक्रांत मनीं दुःख धरिलें ॥ ह्मणे कां बापें दिधलें ऐशियासीं ॥ १ ॥ खाया ना जेवाया लेया ना नेसाया ॥ दैन्य भोगावया आलें जन्मां ॥ २ ॥ जयाची करी भक्ति त्याचेंचि करणें ॥ घरोघरीं हिंडणें न चुके माझें ॥ ३ ॥ लाज सांडूनियां निलाजरा झाला ॥ सूड पडसूड मारिला जोग ज्याणें ॥ ४ ॥ देवापुरीं वाहिली तेचि दैना आली ॥ उचितें राहिली तैंहूनि ॥ ५ ॥ ऐसी भक्तकांता मनीं वाहे चिंता ॥ काय झाला करिता पंढरीराव ॥ ६ ॥ वेष वाणियाचा सवें बैल द्रव्याचा ॥ ह्मणे नामा आमुचा केउतां गेला ॥ ७ ॥ बिदी उभा राहिला घर पुसों लागला ॥ ह्मणे नामा राहिला कोणे ठायीं ॥ ८ ॥ सांगितलें बिराड तुळसीवन अपार ॥ तेंचि जाणा घर नामयाचें ॥ ९ ॥ बाहेर तरी कोणी बैसलासे द्वारीं ॥ बोलाविली नारी नामयाची ॥ १० ॥ अहो घ्याहो बाई हे ठेवावी गोणी ॥ नामा ये तों परतोनि येईन मी ॥ ११ ॥ येरी ह्मणे तुह्मीं साचें काय जाणा ॥ आपुली नाम खूणा सांगा तुह्मीं ॥ १२ ॥ नाम पुसेल तरी केशवशेटी सांगावें ॥ लागेल तितुकें वेचावें हें द्रव्य ॥ १३ ॥ आणिक मज मागावें कांहीं न ठेवावें ॥ माझें क्षेम सांगावें सखा ह्मणोनि ॥ १४ ॥ इतुकें बोलूनि देव पाठमोरा झाला ॥ सवेंचि घरा आला विष्णुदास ॥ १५ ॥ ह्मणे कैंची गोणी टाकून गेला वाणी ॥ परि आह्मीं कोणी ओळखूं ना ॥ १६ ॥ त्यानें नांव केशवशेटी ह्मणितलें ॥ तंव येरें जाणिलें माझा देव ॥ १७ ॥ कांगे धांवा केला देव माझा कष्टला ॥ अपराध झाला तुजपाशीं ॥ १८ ॥ राजाई ह्मणे आह्मां थोर लाभ झाला ॥ बिढवई भेटला केशवशेटी ॥ १९ ॥

॥ ३४६ ॥ नामा ह्मणे स्त्रिये तुवां अनुचित केलें ॥ कां माझ्या शिणविलें विठोबासी ॥ १ ॥ निंदेच्या उत्तरीं निषेधिलें मज ॥ वाटली ती लाज मायबापा ॥ २ ॥ मग तो माझा स्वामी झाला वेषधारी ॥ तुजलागीं सुंदरी पुढारला ॥ ३ ॥ रत्नजडित मुकुट सत्वर फेडोनि ॥ आलासे वेढोनि शुभ्र

शेला ॥ ४ ॥ तेणें भारें साचा धगधगिला मस्तक ॥ ह्मणोनि मज शोक वाटतसे ॥ ५ ॥ कस्तुरी मळवट सुरेख पुसोनि ॥ आलासे लावूनि विभुति भाळीं ॥ ६ ॥ रुद्राक्षाचे मणि लेऊनि कर्णपुटीं ॥ कुंडलें गोमटीं लपविलीं ॥ ७ ॥ कौस्तुभ वैजयंती काढिली परती ॥ बांधलेंसे प्रीति शिवलिंग ॥ ८ ॥ देखूनि रखुमाईस वाटलें उदास ॥ हसतीं उपहास केले साचे ॥ ९ ॥ रमा शरणागतें आलिंगिली दोहीं तोहीं ॥ कैसी गोणी तिहीं कवळिली ॥ १० ॥ सर्वांगीं साजिरी चंदनाची उटी ॥ भ्रंशली गोमटी श्रम झाला ॥ ११ ॥ सोनसळापटा फेडोनि गोमटा ॥ नेसला धूवटा बोटधारी ॥ १२ ॥ इंद्रनीळ तनु रुळली असेल रजें ॥ श्रीमुख रवितेजें कोमाइलें ॥ १३ ॥ धन्य तुझे नयन देखिले श्रीचरण ॥ परी जीवें निंबलोण नाहीं केलें ॥ १४ ॥ द्रव्याचेनि लोभें भ्रांत झालें मन ॥ हातींचें निधान हारपलें ॥ १५ ॥ आतां आदिअंतीं पाहतां केवळ ॥ मूळ आणि फळ दुःखरूप ॥ १६ ॥ जाणोनि निवृत्ति धरिली सज्जनीं ॥ सांडिलें निर्वाणीं वमन ऐसें ॥ १७ ॥ जाणसीं तें करीं तूं आपुलें हित ॥ म्यां ठेविलें चित्त साचे पायीं ॥ १८ ॥ नामा ह्मणे केशव न पाहे निर्वाण ॥ माझा अभिमान आहे त्यासीं ॥ १९ ॥

॥ ३४७ ॥ सावध सावध राजाई हो सुखे ॥ नामयानें दुःख निरासिलें ॥ १ ॥ संसारसांते या येऊनि भाग्याचा ॥ छंद विठ्ठलाचा लागला यासीं ॥ २ ॥ याचें नाम ऐसें न दिसे त्रिभूवनीं ॥ नायकों दुजें कर्णीं नाम्या ऐसें ॥ ३ ॥ वैष्णवांचे गजर टाळघोष दिंडी ॥ उभयतां ब्रह्मांडीं घोष गेला ॥ ४ ॥ तयाच्या दर्शनें कलिमाजीं तारिलीं ॥ भाग्यें विनटलीं विठ्ठलेसीं ॥ ५ ॥ राजाई ह्मणे माते रखुमाई बुद्धिवंते ॥ आमुच्या अदृष्टातें लिहिलें कैसें ॥ ६ ॥

॥ ३४८ ॥ दोन्ही जोडूनी कर माथा ठेवी चरणीं ॥ ह्मणे परिसा विनवणी स्वामी माझी ॥ १ ॥ मी तंव अज्ञान नकळे तुमचा महिमा ॥ अपराध क्षमा करा माझा ॥ २ ॥ अंतरींची खूण कांहीं सांगा मज ॥ जें तुह्मीं हृदयीं बीज धरूनि असा ॥ ३ ॥ जेणें सुखें तुमचें चित्त निरंतर ॥ आनंदें निर्भर सदा असा ॥ ४ ॥ इच्छा तृष्णा देहीं मानवली कल्पना ॥ सदा समाधाना इंद्रियांसि ॥ ५ ॥ मायबापें मज दिधलें तुमच्या हातीं ॥ जन्मोनि सांगातिं लावियलें ॥ ६ ॥ देव द्विज गुरु साक्ष हे करूनी ॥ स्वामीचे चरणीं जोडियलें ॥ ७ ॥ तुमची चित्तवृत्ति उदास देखोनि ॥ पडिलें चितवनीं काय करूं ॥ ८ ॥ मग तुमचा स्वामि कृपेचा कोंवळा ॥ न धरत

पातला अनाथबंधु ॥ ९ ॥ मग त्या विश्वंभरें कृपेच्या सागरें ॥ पुसिली आदरें तुमची गोष्टी ॥ १० ॥ तंव मी दुराचारें निर्भर्त्सिलें तुह्मां ॥ ऐकोनि मेघश्यामा करुणा आली ॥ ११ ॥ तंव तो जगज्जीवन बोले अमृतवाणी ॥ लोटोनियां गोणी दारवंटा ॥ १२ ॥ ह्मणोनि हें द्रव्य तुह्मीं सर्वहि वेंचावें ॥ आणिक मागावें लागेल तें ॥ १३ ॥ सद्गदित कंठें सांगितलें तुह्मां ॥ परि नकळे मज महिमा दैवहीना ॥ १४ ॥ लोभाचा वोरसु कोणिये जन्मिचा ॥ नकळे तुमचा ऋणानुबंधु ॥ १५ ॥ पाहतां श्रीमुख निवालें माझें चित्त ॥ मग हे मनोरथ विसरलें ॥ १६ ॥ क्षण एक आनंद झाला माझे जिवीं ॥ उपमा कवणें द्यावी तया सुखा ॥ १७ ॥ आतां ये संसारीं मीच धन्य जगीं ॥ जे तुह्मां अर्धांगीं विनटलें ॥ १८ ॥ परी मला एक वेळ घाला विठोबाचे पायीं ॥ विनविते राजाई नामदेवा ॥ १९ ॥

॥ ३४९ ॥ नामदेवा घरीं पाहुणे मेहुणे ॥ आले दोघे जण पंढरीसीं ॥ १ ॥ राजाईनें बंधु देखूनि दृष्टिसीं ॥ उल्हास मानसीं थोर झाला ॥ २ ॥ कडकडूनि भेटी लोभाची आवडी ॥ टाकली घोंगडी बैसावया ॥ ३ ॥ भ्रतार लागले विठोबाचे ध्यानीं ॥ संसाराची मनीं आस्था नाहीं ॥ ४ ॥ नाचतो निर्लज्ज होऊनि निःशंक ॥ सांडिला लौकिक देहभाव ॥ ५ ॥ ऐसें जंव सांगे राजाई बंधूसि ॥ तंव आले घरासि नामदेव ॥ ६ ॥ तयासीं सोइरे अभ्युत्थान देती ॥ न भेटे तयांसीं विष्णुदास ॥ ७ ॥ देखुनि कांतेसी क्रोध आला फार ॥ असोनि संसार नाहीं आह्मां ॥ ८ ॥ अगडधूत येती घेऊनि टाळविणा ॥ लागे त्यांचे चरणा वेळोवेळां ॥ ९ ॥ जन्मामध्यें आले माझे सहोदर ॥ न बोले उत्तर त्यांसीं कांहीं ॥ १० ॥ भोंदू घरीं येती हरिनामें गर्जती ॥ धुवूनि त्यांचें पिती पायवणी ॥ ११ ॥ माझे सखे बंधु घरा आले बाई ॥ रामराम तोहि न घे त्यांचा ॥ १२ ॥ नामा ह्मणे कांते राम हृदयांत ॥ सांठवूनी तृप्त झालों आह्मीं ॥ १३ ॥

॥ ३५० ॥ राजाई ते पुसे अहो नामयाला ॥ करा जेवायाला कांहीं यांसीं ॥ १ ॥ प्रातःकाळीं घरीं सारूनि भोजन ॥ आले ते चालून माझे भेटी ॥ २ ॥ नामा ह्मणे कांते दशमी एकभुक्ति ॥ भोजन निश्चिती करूं नये ॥ ३ ॥ उदईक हरिदिनी उपवास जागरण ॥ ऐकावें कीर्तन चार प्रहर ॥ ४ ॥ द्वादशी पारणें झालिया भोजन ॥ ऐकोनी पाहुणे चिंतातुर ॥ ५ ॥ क्षुधातुर पोटीं निद्रा नलगे कांहीं ॥ वर्षाएवढी पाहीं रात्र झाली ॥ ६ ॥



॥ ३५१ ॥ कुलूप अर्गळा घालोनि कोठडिसीं ॥ घातलें धोंड्याशीं बंदीखानीं ॥ १ ॥ गोणाइ दामशेटी नव्हतीं तेव्हां घरीं ॥ गेलीं भीमातीरीं स्नानालागीं ॥ २ ॥ नामदेव गेले राऊळा त्वरित ॥ सांगतसे मात केशवासी ॥ ३ ॥ दामाशेटी आले स्नान सारूनियां ॥ राजाई सां पायां लागूनि बोले ॥ ४ ॥ ऐका हो मामाजी पुत्राची हे मात ॥ धोंड्यासीं घरांत कोंडियलें ॥ ५ ॥ दामाशेटी बोले नामा कोठें गेला ॥ बोलावा तयाला झडकरी ॥ ६ ॥ नारा महादा दोघे गेले राऊळासीं ॥ बोलाविती नाम्यासीं चला घरीं ॥ ७ ॥ मुखाकडे पाहे केशवाच्या नामा ॥ घरीं जातां दामा मारील तो ॥ ८ ॥ देव ह्मणे नाम्या भिऊं नको मनीं ॥ नाम हें निर्वाणीं तारील तुज ॥ ९ ॥ नामा घरा आला दामाशेटी पायीं ॥ नमस्कारूनि त्यांही उभा पुढें ॥ १० ॥ दामाशेटी ह्मणे नाम्या काय केलें ॥ धोंड्यासीं कोंडिलें घरामध्यें ॥ ११ ॥

॥ ३५२ ॥ बराईची गोणी कळली राजाईसी ॥ नामा ब्राह्मणासि बोलाविती ॥ १ ॥ इतक्यामध्यें होन मडकेंभर काढिले ॥ गोणी ते शिविली होती तैसी ॥ २ ॥ द्विज मिळवूनि आला नामदेव ॥ वांटियलें सर्व द्रव्य त्यानें ॥ ३ ॥ नामा ह्मणे द्रव्य ज्याचें त्या दिधलें ॥ ऋण तें ठेविलें नाहीं कांहीं ॥ ४ ॥ राजाई ते होन राखावया गेली ॥ हाता राख आली कोळशांची ॥ ५ ॥ कोळसे देखोनि खोंचियली मनीं ॥ धन्य तुझी करणी पांडुरंगा ॥ ६ ॥ नामदेवा पुढें सांगे वर्तमान ॥ चोरून म्यां होन ठेविले होते ॥ ७ ॥ पाहतां होनांचे झाले हो कोळसे ॥ नामा पाहतां ते झालें सोनें ॥८॥ वांटिले ब्राह्मणां ते होन तयानें ॥ फेडियलें ऋण गोविंदाचें ॥९॥

॥ ३५३ ॥ सुवर्णाच्या ताटीं ओगरूनी परिकर ॥ रुक्माईनें सत्वर आणियेलें ॥ १ ॥ कळस घेऊनी सत्यभामा आली ॥ आपोशन घाली देव त्रयां ॥ २ ॥ सुखाचा सुरतरु भक्त चिंतामणी ॥ पुरवितो आयनी निजभक्तांची ॥ ३ ॥ तेथें उद्धव अक्रूर नारद तुंबर ॥ आणि भक्त अपार परियेसी ॥ ४ ॥ महाद्वारीं नामा ऊभा तये वेळां ॥ तो बोलाविला जवळां केशीराजें ॥ ५ ॥ देवाचा ओरसु देखोनी गौरव ॥ देहीं देह भाव विसरला ॥ ६ ॥ देखोनी पंढरीनाथ धाविन्नला वेगीं ॥ जैसी वत्सा लागीं तान्हे धेनू ॥ ७ ॥ उचलूनि चौभुजीं दिधलें आलिंगन ॥ आणिलें उमजोन देहावरी ॥८॥ धरून बाहु ओढूनी वैसविला ताटीं ॥ स्फुंदतां हिंपुटी

होत असे ॥ ९ ॥ कुरवाळूनी माथा घांस घाली मुखीं ॥ तंव तो परम लक्षीं तन्मय होय ॥ १० ॥ अंतरीचें गुज बोले कृपासिंधु ॥ करूनिया सावधू नामयासीं ॥ ११ ॥ ह्मणे जीवलगा बोलों सुख गोष्टी ॥ आर्त आहे पोटीं बहु दिवसांचें ॥ १२ ॥ अंतरीचें सुख बाहेर तूं पाहें ॥ गगना काय आहे पाठीं पोटीं ॥ १३ ॥ तैसा तो आनंदु आहे पैं निर्मळ ॥ चिद्रूप केवळ सदोदित ॥ १४ ॥ तुझें तेंचि माझें माझें तेंचि तुझें ॥ आहे रे सहजें एक विधा ॥ १५ ॥ परतोन दृष्टी घालीं मजवरी ॥ मी तो निरंतरीं तूंची होसी ॥ १६ ॥ हा तुझा सोहळा पाहें उघड्या डोळां ॥ जंव मी आहें जवळां ज्ञान दीपू ॥ १७ ॥ आवडते तुझे भेटी आले भक्तराणे ॥ सुखाचें पारणें करवा यांसी ॥ १८ ॥ परमानंद मूर्ति धन्य हा निवृत्ति ॥ सुखाचा सांगाति ज्ञानदेव ॥ १९ ॥ पवित्र हा सोपान परलोकींचें तारूं ॥ करी यांचा आदरु भाग्यवंता ॥ २० ॥ ह्मणोनि पंढरिनाथें आश्वासिलें करें ॥ ठेविलें शिर परें चरण कमळीं ॥ २१ ॥ नामा ह्मणे तूझिये कृपेचा ओलावा ॥ विश्रांति या जीवा आली असे ॥ २२ ॥

॥ ३५४ ॥ नामियाच्या मुखीं घालूनि कवलु ॥ पुसत कृपाळू शिण भागू ॥ १ ॥ जें करकमळ सनकादिकां शिरीं ॥ नामा तीहीं करीं कुरवाळीला ॥ २ ॥ सांडीं सर्व खंती जीविची काजळी ॥ विश्रांती जवळी आहे तुज ॥ ३ ॥ विरहाच्या शोकें शिणलासीं मार्गी ॥ देह मजलागीं वाळविला ॥ ४ ॥ कोमायलें वदन निरांजलासी नयनी ॥ नेणे तुझी कोणी तहान भूक ॥ ५ ॥ गेलासि जवळूनी ज्या दिवसा पासूनी ॥ न दिसे माझें कोण्ही आवडतें ॥ ६ ॥ धीर न धरवे जीवा पाहे दाही दिशा ॥ माझा विष्णुदास येईल केव्हां ॥ ७ ॥ पाहे गरुडपारीं पाहे महाद्वारीं ॥ पाहे भिमातीरीं चंद्रभागे ॥ ८ ॥ पाहे पद्मतिर्थीं पाहे वेणु नादीं ॥ नलगे तुझी शुद्धी खंती वाटे ॥ ९ ॥ अनुदिनीं भोजन करितां उदक पान ॥ तेव्हां आठवण होय तुझी ॥ १० ॥ मी ह्मणे धांवत येसी न धरत ॥ प्रसादाचें आर्त बहु तुज ॥ ११ ॥ धांऊनियां येसी आलिंगन देसी ॥ पुसेन सांगसि सुख गोष्टी ॥ १२ ॥ तेणें हर्षें निघती डोळयासीं दोंदें ॥ हृदय माझें कोंदे करुणा रसें ॥ १३ ॥ आवडते आली नवे जननीचें बाळ ॥ जाणते कृपाळ भूक त्याची ॥ १४ ॥ तैसा पंढरीनाथ मोहें ओरसला ॥ नामयातें पाजिला प्रेम पान्हा ॥ १५ ॥

॥ ३५५ ॥ संसाराची सोय चुकलें बापुडें ॥ केशव मागें पुढें सांभाळित ॥ १ ॥ आळीकर नामें खेळे महाद्वारीं ॥ आंतून बाहेरी न वचे कांहीं ॥ २ ॥ संतां तें देखोनी मिठी घाली चरणीं ॥ कुरवंडी करूनी देह टाकी ॥ ३ ॥ ऐसें निजबोधें राहिलें निवांत ॥ नामा राहे एक केशवचरणीं ॥ ४ ॥

॥ ३५६ ॥ भक्तांचें हृदयींची जाणोनि अवस्था ॥ आल्या शरणागता लोभापरू ॥ १ ॥ संतां पुसे माझा दाखवा रे नामा ॥ तुह्मां समागमा खेळे सदा ॥ २ ॥ दृष्टिसीं दाटलें कृपेचें भरितें ॥ ह्मणे तें आवडतें केउतें गेलें ॥ ३ ॥ निरंजलें नयनीं कोमायिलें वदनीं ॥ आणा रे गवसणी आळीकर ॥ ४ ॥ तंव वाट पाहात होता परलक्षीं ॥ भेटी देऊनि सुखी केला देवें ॥ ५ ॥ नामा ह्मणे विठो माझा सुखराशी ॥ क्षणीं दूर जासी हृदयींचा ॥ ६ ॥

॥ ३५७ ॥ मायबापासि टाकिलें ॥ ध्यान देवाचें लागलें ॥ १ ॥ स्त्री पुत्र बंधु बहिणी ॥ केली सर्वांची सांडणी ॥ २ ॥ गणगोत इष्ट-मित्र ॥ तूंचि माझें कुळ गोत्र ॥ ३ ॥ गोणाबाई ह्मणे नाम्या ॥ भली केली बारे सीमा ॥ ४ ॥

॥ ३५८ ॥ देवा त्वां कोणाचें बरें केलें ॥ तें मज पूर्ण कळों आलें ॥ १ ॥ हरिश्चंद्र तारा राणी ॥ वाहे डोंबा घरीं पाणी ॥ २ ॥ रुक्मांगद राजा भला ॥ त्याचा गांव ओस केला ॥ ३ ॥ पांचा वर्षांचें धृव बाळ ॥ पदीं बसविलें अढळ ॥ ४ ॥ गोणाइ ह्मणे बा विठ्ठला ॥ माझा नाम्या वेडा केला ॥ ५ ॥

॥ ३५९ ॥ त्या तुवां कैसा आणि एके माये ॥ येणें पंढरीरायें बुड-विलें ॥ १ ॥ असतां चराचरा न बुडतां सृष्टी ॥ कां घेतली पाठी दुब-ळीची ॥ २ ॥ एक बाळ माझें त्याची धरिली आस ॥ तेथें कां बा निरास केलें देवा ॥ ३ ॥ एवढा हा दान कशानें विसरेन ॥ देई कृपादान पांडुरंगा ॥ ४ ॥ विघडलें पाडस करी एके ठायीं ॥ विनवीते गोणाइ केशवराजा ॥ ५ ॥

॥ ३६० ॥ जेऊनिया हातीं देवें दिधली वाटी ॥ आला उठाउठी नामा घरा ॥ १ ॥ गोणाइ ह्मणरे ऐकें नामदेवा ॥ नैवेद्य आणावा माझे हातीं ॥ २ ॥ तेव्हां नामदेवें हातीं दिधली वाटी ॥ पाहूं गेली दृष्टीं रिकामी

ते ॥ ३ ॥ काय तुज घरीं उणें होतें अन्न ॥ नैवेद्य आपण तेथें खावा ॥ ४ ॥ ते दोघे बोलतां दामाशेटी आला ॥ पुसे त्या दोघांला काय गुह्य ॥ ५ ॥ देखीयेलें नाहीं नाहीं ऐकीयेलें ॥ ऐसें सांगीतलें नामदेवें ॥ ६ ॥ दामाशेटी ह्मणे आतां असों द्यावें ॥ सकाळीं पहावें प्रचित हें ॥ ७ ॥

## करुणा.

॥ ३६१ ॥ अगा पांडुरंगा भक्तजन कैवारी ॥ सेवकजन द्वारीं तिष्ठताती ॥ १ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान हा पाहीं ॥ आली मुक्ताबाई चांगदेव ॥ २ ॥ खेचर विसोबा अंसद सुदामा ॥ चोभा पुरुषोत्तमा आला असे ॥ ३ ॥ भैराळ जनक वत्सरा तो नारा ॥ विठा सारंगधरा आला असे ॥ ४ ॥ परसाभागवत सांवता नरहरि ॥ चोखामेळा द्वारीं भानूदास ॥ ५ ॥ नटनाव्यकुसरी कान्होपात्रा द्वारीं ॥ चवरें विंजणे हरि जाणविती ॥ ६ ॥ माचंगा अनंता नरसीपुरीं होता ॥ तो हा पंढरीनाथा आला असे ॥ ७ ॥ मच्छिंद्र गोरक्ष चरपटी चौरंगी ॥ गोपीचंद योगी आला असे ॥ ८ ॥ इडा ती पिंगळा सूक्ष्म ती आवळा ॥ षड्स गोपाळ घेऊनि आला ॥ ९ ॥ तेथें टाळ दिंडी घेऊनियां नामा ॥ भेटों पुरुषोत्तमा आला असे ॥ १० ॥

॥ ३६२ ॥ संसारींच्या आद्या आहाळलों भारी ॥ निववीं गा श्रीहरी अमृतदृष्टी ॥ १ ॥ मी अनाथ अपराधि दुर्बळ दुराचारी ॥ कृपाळु बा हरी तारीं मज ॥ २ ॥ नामा ह्मणे विठो कृपेचा कोंवळा ॥ जाणसी कळवळा अनाथाचा ॥ ३ ॥

॥ ३६३ ॥ बाप संतसभा भली ॥ बहुता पुण्यें जोडली ॥ हृदयींचि गोंवी आपुली ॥ संतांप्रति निवेदीन ॥ १ ॥ आजि प्रसंग हरिभक्तिचा ॥ हरि स्वभावें उच्चारु वाचा ॥ विठोबा ऋणियारे भक्तांचा ॥ ऋण फेडितो भक्तांचें ॥ २ ॥ अरे हा अनादिचा लाग करीं ॥ अरे जन्माची उभरा भरी ॥ आमुचा लागिया श्रीहरि ॥ दों उत्तरीं निवडावा ॥ ३ ॥ आतां असो हें कर्म विभागु ॥ आह्मीं मागूं आपुला लागू ॥ जरि हा ह्मणेल निःसंगु ॥ तयासि आह्मांसीं संबंध कायसा ॥ ४ ॥ जरि हा नलगे आमुचें ऋण ॥ हातीं घेऊनि सुदर्शन ॥ आह्मीं करूं हरीकीर्तन ॥ तेथें तिष्ठे कां उभा ॥ ५ ॥ मागें चाळाचिये रीती ॥ परि आह्मांसि आलीया प्रचीति ॥ ज्यासि हरिची सोय संगति ॥ तयासि न मने अन्य स्थळ ॥ ६ ॥ हरि

कौसाळ मल्ल ह्मणती ॥ ते अवघीरे जाणावि भ्रांति ॥ सेवा हरिची सांगताती ॥ संत होती हरीकडे ॥ ७ ॥ आणिक एकु आह्मांसीं आठवलें ॥ आह्मीं भांडू कां रे एकले ॥ आमुचें केलें काय चाले ॥ या हरि भक्तांवांचूनि ॥ ८ ॥ जे हरि भक्ति विरहित ॥ त्यांचें हरिचरणीं न बोधे चित्त ॥ अवघे मिळूनि हरिचे भक्त ॥ हरि व्हावा ह्मणताति ॥ ९ ॥ आणिक एक नवल परि ॥ जो याची सेवा करी ॥ याचें सर्वस्व हरी ॥ आणि श्रीहरि नाम मिरवितु ॥१०॥ हरि आळवितां मागा उभा ॥ आठवितां पुढें उभा ॥ हरि ध्यातां हृदयीं उभा ॥ हें तंव सभा विचारा ॥११॥ आमुचें हो तेंच तुह्मीं विनवावें आह्मांसि मानलें आघवें ॥ किती येरझारीं शिणवावें ॥ शरण रिघावें श्रीहरी ॥ १२ ॥ विश्व श्रीहरिचें आघवें ॥ म्यां गाऱ्हाणें कवणासिं द्यावें ॥ लागे त्यासिच मागावें ॥ हरिविण ठावो नसे वो ॥ १३ ॥ वीरराया पंढरिनाथा ॥ आतां अपंगावें शरणागता ॥ जरी उपेक्षिसी सर्वथा ॥ वाट कोणाची पहावी ॥ १४ ॥ नको नको निंदा स्तुति ॥ हाचि भावो वरी भक्ति ॥ मज नेदीं पुनरावृत्ति ॥ विष्णुदास ह्मणे नामा ॥ १५ ॥

॥ ३६४ ॥ देव दगडाचा भक्त हा भावेचा ॥ संदेह दोघांचा फिटे कैसा ॥ १ ॥ ऐसे देव हेंहि फोडिले तुरकीं ॥ घातले उदकीं बोभातिना ॥ २ ॥ ऐसीं लोहदैवतें नको दावूं देवा ॥ नामा ह्मणे केशवा विनवितसें ॥ ३ ॥

॥ ३६५ ॥ विठ्ठल माउली कृपेची कोंवळी ॥ आठवितां घाली प्रेम पान्हा ॥ १ ॥ मज कां मोकलीलें कवणा निरविलें ॥ कठिण कैसें झालें हृदय तुझें ॥ २ ॥ तुजवीण जिवलग दुजें कोण होईल ॥ तें माझें साहिल जड भारी ॥ ३ ॥ तूं माझी माउली मी वो तुझा वत्स ॥ परतों परतों वाट पाहें तुझी ॥ ४ ॥ माता मोहें कैसी नविसंवे सर्वथा ॥ अंतरींची व्यथा कोण जाणे ॥ ५ ॥ नामा ह्मणे विठ्ठले कां गे रुसलीसि ॥ केव्हां सांभाळिसी अनाथनाथे ॥ ६ ॥

॥ ३६६ ॥ अपत्याचेपरी सांभाळितो श्रीहरि ॥ वाट निरंतरीं पाहतु असे ॥१॥ संसारांत कष्ट झाले बहु भारी ॥ मज निववी हरि मायबापा ॥२॥ गांव तें पंढरी भिवरेच्या तीरीं ॥ निरोप माहेरीं सांगें जो कां ॥ ३ ॥ क्षीरसागरा भितरीं पहुडले श्रीहरि ॥ कवण धाक करी कुमारीचा ॥ ४ ॥ पुंडलीकाची भक्ति मांडली चराचरीं ॥ गुढिया निरंतरी उभारिल्या ॥५॥

संत सनकादिक ते माझे सज्जन ॥ द्वारीं असे वाहन गरुडाचें ॥६॥ रखुमाई माता विठो माझा पिता ॥ नामा ह्मणे संतां भेटावया ॥ ७ ॥

॥ ३६७ ॥ दाही दिशा पाहतां दिसति निर्मळ ॥ स्फुरण वक्षःस्थळ होत असे ॥ १ ॥ येईल माझा विठो देईल आलिंगन ॥ जीवें निंबलोण करीन त्यासी ॥ २ ॥ प्रेमपूर भरतें सुखसिंधू लोटली ॥ माउली भेटली जीवलग ॥ ३ ॥ धरूनि हनुवटी सांगेल गुज गोष्टी ॥ पाहील कृपादृष्टीं माझें ह्मणोनि ॥ ४ ॥ प्रीतीचें पडिभरें कुर्वाळील मज ॥ सांगेन निजगुज संसारींचें ॥ ५ ॥ हर्षें निर्भर नामा निवाला निवाडें ॥ नाचे संतांपुढें सांगेन गुज ॥ ६ ॥

॥ ३६८ ॥ अज्ञान बापुडें नेणें कांहीं वेडें ॥ जन्मोनि सांकडें तुजचि देवा ॥ १ ॥ जाणसीतें करीं कृपाळु बा हरि ॥ लाज सर्वांपरि आहे तुज ॥ २ ॥ मी तव अपराधी आहे लक्षकोटी ॥ परि ह्मणवितों जगजेठी दास तुझा ॥ ३ ॥ नाहीं तुझी सेवा केली मनोभावें ॥ लोभ दंभ गर्वें भ्रांत सदां ॥ ४ ॥ बहुतां मुखीं तुझी ऐकिली बा कीर्ति ॥ दीनानाथ ह्मणती आर्तबंधु ॥ ५ ॥ नामा ह्मणे मज मोकलिसी झणीं ॥ अनाथ ह्मणवूनि पाळीं देवा ॥ ६ ॥

॥ ३६९ ॥ काया हरपें फुटुं नेदी ॥ टाळ दिंडी वाहिन खांदी ॥ १ ॥ तूं बा माझा तूं बा माझा ॥ तूं बा माझा केशिराजा ॥ २ ॥ आळवणीचा तूं बा वाचे ॥ तेणें छंदें पै बा नाचे ॥ ३ ॥ तूं बा माझा मी दास तुझा ॥ विनवितो नामा केशीराजा ॥ ४ ॥

॥ ३७० ॥ येई वो कृपावंते अनाथांचे नाथे ॥ निवारीं भवव्यथे पांडुरंगे ॥ १ ॥ मी बाळक भूकाळु तूं माउली कृपाळु ॥ करीं माझा सांभाळु पंढरिराया ॥ २ ॥ माझें माहेर पैं निस आठवे अंतरीं ॥ सखा विटेवरी पांडुरंग ॥ ३ ॥ मी देह तूं चैतन्य मी क्षुधार्थि तूं अन्न ॥ तृषार्थी तूं जीवन पांडुरंगा ॥ ४ ॥ मी चकोर तूं चंद्र मी सरिता तूं सागर ॥ मी याचक तूं दातार पांडुरंगा ॥ ५ ॥ मी धनलोभि शुद्ध तूं पूर्ण कनककुंभ ॥ मी मगर तूं अंभ पांडुरंगा ॥ ६ ॥ मी चातक तूं मेघ मी प्रवृति तूं बोध ॥ मी शुष्कनादि तूं ओघ पांडुरंगा ॥ ७ ॥ मी दोषी तूं तारक मी भृत्य तूं नायक ॥ मी प्रजा तूं पाळक पांडुरंगा ॥ ८ ॥ मी पाडस तूं कुरंगीणी मी अंडज तूं पक्षिणी ॥ मी अपत्य तूं

जननी पांडुरंगा ॥ ९ ॥ मी भक्ति तूं निजसोय मी ध्यान तूं ध्येय ॥ मी आडळ तूं साह्य पांडुरंगा ॥ १० ॥ ऐसी जे जे माझी विनंती ते तुजचि लक्ष्मिपती ॥ निज सुख सांगाती पांडुरंगा ॥ ११ ॥ शीघ्र येई वो श्रीरंगे भक्त मानस रंगे ॥ प्रेमपान्हा देगे नामदेवा ॥ १२ ॥

॥ ३७१ ॥ अनाथाचा नाथ दिनाचा दयाळ ॥ भक्तांचा कृपाळ पांडुरंग ॥ १ ॥ येगा तूं विठ्ठला माझिया माहेरा ॥ कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ २ ॥ वर्णिती पुराणें न करी लाजिर्वाणें ॥ बोलती वचनें सनकादिक ॥ ३ ॥ कृपेचा सागरु ॥ कैवल्य उदारु रखमाईचा वरु पांडुरंग ॥ ४ ॥ पुंडलीकाचे भेटी अससी वाळवंटी ॥ हात ठेवूनि कटीं विटेवरी ॥ ५ ॥ भक्तिलागीं कैसा उभा असे तिष्ठत ॥ असे वाट पाहत भीमातीरीं ॥ ६ ॥ येऊनि संसारा पहावी पंढरी ॥ तेणें भवसागरीं तरसील ॥ ७ ॥ नामा ह्मणे मज हरीचा विश्वास ॥ झालों असें दास जन्मोजन्मीं ॥ ८ ॥

॥ ३७२ ॥ शरीर प्राणाचें देऊनि बळिदान ॥ साधावें निधान प्रेमभक्ति ॥ १ ॥ हेंचि नित्य मागे तया श्रीवल्लभ ॥ याहूनि दुर्लभ आन नाहीं ॥ २ ॥ हरिदासांचा संग हरिकथा अनुराग ॥ हेंचि परमभाग्य पुण्यरूप ॥ ३ ॥ सर्व भावें करूनि सर्व भूतीं करुणा ॥ सर्वत्र देखणा विठ्ठलरूप ॥ ४ ॥ विषयीं विकृति नामीं नित्य प्राप्ति ॥ हृदयीं कृष्णमूर्ति वसे सदा ॥ ५ ॥ नामा ह्मणे मग तो केशव कृपासिंधु ॥ देईल भक्ति बोधु प्रेमसुखें ॥ ६ ॥

॥ ३७३ ॥ केधवां भेटसी माझिया जिवलगा ॥ येगा पांडुरंगा मायबापा ॥ १ ॥ आशा धरूनि पोटीं दिवस लेखी बोटीं ॥ प्राण ठेउनि कंठीं वाट पाहें ॥ २ ॥ चित्त निरंतर ठेउनी महाद्वारीं ॥ अखंड पंढरी हृदयीं वसे ॥ ३ ॥ श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं ॥ तेथें माझी दृष्टि बैसलीसे ॥ ४ ॥ आसवें दाटूनि पसरूनि बाहे ॥ नामा वाट पाहे विठ्ठलाचि ॥ ५ ॥

॥ ३७४ ॥ हेंचि देवापैं मागत ॥ चरणसेवा अखंडित ॥ १ ॥ वास द्यावा पंढरीचा ॥ सदां संग हरिदासांचा ॥ २ ॥ जन्म होका भलते याति ॥ परि मी न चुके हरिभक्ति ॥ ३ ॥ नामा ह्मणे कमळापती ॥ हेंचि द्यावें पुढतो पुढती ॥ ४ ॥

॥ ३७५ ॥ नेणें भक्ति कांहीं करूं कैसी सेवा ॥ हें तों मज देवा समजेना ॥ १ ॥ करूं कैसा जप करूं कैसें ध्यान ॥ नाहीं माझें मन स्थिर देवा ॥ २ ॥

कामक्रोध यांची मोठी हे जाचणी ॥ झालों वेडाराणीं समजेना ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझे सांवळे विठाबाई ॥ येऊनियां राहीं हृदया माजी ॥ ४ ॥

॥ ३७६ ॥ वारंवार काय विनवावें आतां ॥ समजावें चित्ता आपूलिया ॥ १ ॥ तूं काय ह्मणसी कंटाळेल हाचि ॥ जाईल ऊगाचि उठोनियां ॥ २ ॥ मजलागीं देवा जासी चुकवोनी ॥ आणिन धरूनि तुजलागीं ॥३॥ दृढ भक्ति भाव प्रेमाचा हा दोरा ॥ बांधीन सत्वर तुझे पांयीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे बोल काय विठो आतां ॥ भेटावें सर्वथा यांत बरें ॥ ५ ॥

॥ ३७७ ॥ तुझिया चरणाचें तुटतां अनुसंधान ॥ नेलें माझें मन षड्वर्गीं ॥ १ ॥ धांवगा विठ्ठला सोडवीं आपुला दास ॥ थोर कासाविस केलें बापा ॥ २ ॥ कर्म कुळाचार क्रोध हा अनिवार ॥ मदें निरंतर भ्रांत केलें ॥ ३ ॥ मत्सरें तूजसि दूराविलें देवा ॥ लोभें केला गोंवा गर्भवासीं ॥ ४॥ दंभ रसातळीं जातसे घेऊनि॥ विश्वचक्षु होऊनि पाहसी कैसा ॥५॥ नामा ह्मणे मज तुझाचि भरंवसा ॥ अनाथ कुंवसा होसी देवा ॥ ६ ॥

॥ ३७८ ॥ अनाथांचा नाथ भक्तांचा कैवारी ॥ पुराणीं हे थोरी आइकिली ॥ १ ॥ ऐकोनियां कीर्ति आलों तुजपाशीं ॥ निवारीं दुःखासि कशिराजा ॥ २ ॥ त्रितापें तापलों दुःखें आहळलों ॥ कासाविस झालों दयासिंधू ॥ ३ ॥ तुजवीण आतां कोणातें मी सांगूं ॥ तोडीं हा उद्वेगु नारायणा ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां नको पाहूं अंत ॥ उद्धारीं त्वरित पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ३७९ ॥ आह्मीं काय नेणों तुझा अंतपार ॥ होसी निरंतर निवारिता ॥ १ ॥ बहु अपराधी जाणा यातिहीन ॥ पतित पावन तुह्मी देवा ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसा पातकी पामर ॥ करिसी उद्धार साच ब्रीद॥३॥

॥ ३८० ॥ अनंत जन्मींचें चुकवी सांकडें ॥ काय मी बापुडें विनवूं कैसें ॥ १ ॥ सगुण गुणाची वोतिलीसे मूर्ति ॥ राहो माझे चित्तीं निरंतर ॥ २ ॥ माझा मीच झालों सकळ व्यापारी ॥ संसारा बाहेरी कोण काढी ॥ ३ ॥ नामा ह्मणे नको गोवूं आशा ॥ पावन परेशा केशिराजा ॥ ४ ॥

॥ ३८१ ॥ आतां माझी चिंता तुज नारायणा ॥ रुक्मिणीरमणा वासुदेवा ॥ १ ॥ द्रौपदी संकटीं वस्त्रें पुरवीलीं ॥ धांव त्वां घेतली गजेंद्रासी

॥ २ ॥ उपमन्या आळी तुवां पुरवीली ॥ अढळपदीं दिली वस्ति ध्रुवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे करुणा करिसी केशवा ॥ तूं माझा विसांवा पांडुरंगा ॥४॥

॥ ३८२ ॥ माय मेली नाम्या पोरटें लहान ॥ कवाड धरून उभें ठेलें ॥ १ ॥ नेणतें बापुडें दारवंटी धरी ॥ शेवीं आस करी भितरील ॥ २ ॥ राउळीं ह्मणती कैंचें हें भणंग ॥ जंव तंव आंग चुकवितें ॥ ३ ॥ जाति नाहीं त्यासि काइसी पंगती ॥ ह्मणोनि एकांतीं बैसविलें ॥ ४ ॥ केशवाचे नामें बाह्य ठाकी पूजा ॥ तेथें बऱ्यावोजा बैसविलें ॥ ५ ॥ देव ह्मणे नाम्या पोशीन मी तूतें ॥ नामामृतशितें देऊनियां ॥ ६ ॥

॥ ३८३ ॥ हत्तीच्या चरणावरी बैसे माशी ॥ नमन तयासी करावया ॥ १ ॥ काय म्यां अन्याय केले तुजपाशीं ॥ कैसे हृषीकेशी सांग बापा ॥ २ ॥ तैसें कायसें मी केवढें बापुडें ॥ लागें कोणीकडे देवराया ॥ ३ ॥ नामा ह्मणे तैसें मी एक दूबळें ॥ चरणा वेगळें करूं नको ॥ ४ ॥

॥ ३८४ ॥ येईना अझूनी श्रीकृष्ण सदना ॥ गोंवळा रक्षण मायबाप ॥ १ ॥ कृपा करा देवा कृपा करा देवा ॥ कृपा करा देवा पांडुरंगा ॥ २ ॥ लावूनियां आशा फिरविसी दिशा ॥ प्रेमभाव कैसा दावीं आतां ॥ ३ ॥ बाळेभोळे जन करिती विनंती ॥ मोकलिसी अंतीं ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ ३८५ ॥ जीवन्मुक्त झाले नामाचे गजरीं ॥ सर्व अधिकारी वैकुंठींचे ॥ १ ॥ देई देवा मज प्रेमाचा जिव्हाळा ॥ मुक्तीचा सोहळा अखंडीत ॥ २ ॥ सगुणभक्तीस साक्ष काय जाण ॥ कर्म नारायण कर्मनिष्ठ ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा नये अनुमाना ॥ वर्णितां पुराणां ठक पडे ॥ ४ ॥

॥ ३८६ ॥ जेथें जेथें मन जाईल हो माझें ॥ तेथें तेथें तुझें रूप असे ॥१॥ ऐशी मज संवई लावीं निरंतरीं ॥ जन्मजन्मांतरीं केशिराजा ॥ २ ॥ आपणास काम जरूर कायसा ॥ आतां पंढरीशा आटोपावें ॥ ३ ॥ नामा ह्मणे नको पाहों माझी लाज ॥ संसाराचें बीज मूळ खुडी ॥ ४ ॥

॥ ३८७ ॥ दाविसी अनंता स्वरूपें अनेक ॥ वाउगाचि शोक वाढविसी ॥ १ ॥ आपण मानसीं विचारूनि पाहे ॥ सावधान होये तुझे पायीं ॥ २ ॥ तूंचि परमार्थ भक्तां अंगसंगें ॥ तारि पांडुरंगे बहुतांसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे हरी निर्वाणाचें बीज ॥ मजसाठीं गुज सांगा वेगीं ॥ ४ ॥

॥ ३८८ ॥ नव्हे माझें कांहीं नेणों तुजविण ॥ होसी नारायणा साहाकारी ॥ १ ॥ खांबसूत्रीं दावी अनेक पूतळे ॥ नकळेचि खेळे खेळकरी ॥ २ ॥ दैसवृत्रासूर आपटी आकाशीं ॥ आनंदें खेळविसी सुरवरां ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझी नकळे करणी ॥ जन्मोजन्मीं ह्मणी दावीं पाय ॥४॥

॥ ३८९ ॥ आसनीं शयनीं भोजनीं गमनीं ॥ तुझे पाय दोन्ही दावी मज ॥ १ ॥ संसार कल्मष समूळ छेदिसी ॥ दावीं अहर्निशीं पाय मज ॥ २ ॥ हरी ध्यानीं मनीं भक्तां तूं परेशा ॥ अनाथा कोंवसा गोंवळिया ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाम ऐकों सर्वोत्तमा ॥ संसारींच्या श्रमा वारीं देवा ॥ ४ ॥

॥ ३९० ॥ भेटिलागीं माझा फुटतसे प्राण ॥ काया वाचा मनें जीवेंभावें ॥ १ ॥ जया देखें तया पुसें हेचि मात ॥ कैं मज अनंत बोलावील ॥ २ ॥ संतसमागमें दसरा दिवाळी ॥ ठेवूनि निढळी वाहे सदा ॥ ३ ॥ सखे पंढरीचे येती वारकरी ॥ आर्त निरंतरीं त्यांचे पायीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसे करी दंडवत ॥ आमुचे पुनीत मायबापा ॥ ५ ॥

॥ ३९१ ॥ धांवोनी घालीन संतपायीं मिठी ॥ तेणें ते धूर्जटि वंदीतसे ॥ १ ॥ विठोबाचे गांवा न्यारे एकवेळां ॥ देह अहळला सर्वकाळ ॥ २ ॥ आर्ता केशिराजा देई आलिंगनु ॥ तेणें माझी तनु वोल्हावेल ॥ ३ ॥ नामा ह्मणे तूंचि कृपेची माउली ॥ तेव्हां ते साउली करीं मज ॥ ४ ॥

॥ ३९२ ॥ तूं माय माउली आस केली थोरी ॥ वास निरंतरीं पंढरीये ॥ १ ॥ रूपें तीं दाखवी एकवेळा मज ॥ धरूं नको लाज केशिराजा ॥ २ ॥ आपणा समान करी कोणे काळीं ॥ तंव वनमाळि देव ह्मणू ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुज भक्तिचिये पिसें ॥ पुरविसी आस दुर्बळाची ॥ ४ ॥

॥ ३९३ ॥ काय पांडुरंगा सांग म्यां करावें ॥ शरण कोणा जावें तुह्मांविण ॥ १ ॥ पाहतांना वाट भागले लोचन ॥ कठिणच मन केलें तुवां ॥ २ ॥ ऐकिली म्यां कानीं कीर्ति तुझी देवा ॥ उठलासे हेवा याचि गुणें ॥ ३ ॥ अनाथ अन्यायी काय मी करीन ॥ दयावंता खूण सांगसी तूं ॥४॥ नामा ह्मणे आस पूर्ण किजे देवा ॥ रूपडें दाखवा नेटें पाटें ॥ ५ ॥

॥ ३९४ ॥ कांसवीचीं पिलीं राहोति निराळीं ॥ दृष्टि पान्हावली सुधामय ॥ १ ॥ तैसा जवळूनि असेन मी दूरी ॥ दृष्टि मजवरी असों द्यावी

॥ २ ॥ तान्हें वत्स घरीं वनीं धेनू चरे ॥ परी ती हुंबरे क्षणोक्षण ॥ ३ ॥ नामा ह्मणे सत्ता करिती नीकट ॥ भक्तांसी वैकुंठपद देसी ॥ ४ ॥

॥ ३९५ ॥ विष्णुदास नामा ह्मणताती जगीं ॥ नाहीं माझ्या अंगीं प्रेम-भाव ॥ १ ॥ तेणें थोर लाज वाटे देवराया ॥ ये माझ्या हृदया वेळोवेळां ॥ २ ॥ द्वेषाद्वेष उभे होती माझ्या ठायीं ॥ अनुभव नाहीं प्रेम सुख ॥ ३ ॥ नामा ह्मणे करीं उजळ हा माथा ॥ भेट द्यावी संता एक वेळा ॥ ४ ॥

॥ ३९६ ॥ कैसा पांडुरंगा करावा विचार ॥ सांग बा निर्धार साक्ष-रूपा ॥ १ ॥ काय आलें देवा कैचें थोरपण ॥ आकारासि कोणीं आणियेलें ॥ २ ॥ आणियलें आतां आपणासारिखें ॥ गोपिकांसि रूपें दावी नाना ॥ ३ ॥ काय जीवेंभावें सकळां संमत ॥ सगुण अनंत ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ ३९७ ॥ वाल्मिकादि भीष्म द्रोण कृपाचार्य ॥ द्रुपदतनया दिल्ही भेटी ॥ १ ॥ उद्धव नारद अंबरिष शुक ॥ बळी ध्रुवादिक आले भेटी ॥ २ ॥ देवी देवऋषि गोपाळांसहित ॥ भाष्यकारें नीत शुद्ध केली ॥ ३ ॥ नामा ह्मणे आतां पाहूं नको देश ॥ पतितास यश तुझे नामीं ॥ ४ ॥

॥ ३९८ ॥ काय करूं आतां देवा विश्वंभरा ॥ मजलागीं थारा नाहीं कोठें ॥ १ ॥ इष्टगोति सोयरीं धायरीं समस्त ॥ काय करूं अंत पहाती माझा ॥ २ ॥ तूंचि मातापिता गुरुबंधु होसी ॥ जाऊं मी कोणासी शरण आतां ॥ ३ ॥ पायीं थारा मागे नाम्याची विनंती ॥ चित्त द्या श्रीपती आतां वेगें ॥ ४ ॥

॥ ३९९ ॥ तंव पांडुरंगा संतामाजीं उणें ॥ तुजला निर्वाण वाटे देवा ॥ १ ॥ तुजसि संबंध लौकिका वेगळा ॥ पाळिसी गोपाळा लळे माझे ॥ २ ॥ उपजतां बाळ हितार्था लागोनी ॥ प्रसन्न जननी करी आधीं ॥ ३ ॥ भिडे-स्तव पान्हा फुटोनियां स्तनीं ॥ प्रीयें सापाजूनि आपण काय ॥ ४ ॥ उदित सूर्यास लागे विनवावा ॥ यावें तूं बा गांवा प्रकाशित ॥ ५ ॥ मग तें तयाचें निवारावें तमा ॥ हें तों मेघश्यामा नाहीं श्रुत ॥ ६ ॥ पृथ्वी भोंवर्णी करावा आदरु ॥ मग त्याचा भारु चालवावा ॥ ७ ॥ जीवना जीवनीं प्रार्थूनि आणोनी ॥ काय निववूनि शांति सासी ॥ ८ ॥ सर्वज्ञ उदार होसी चक्रवर्ति ॥ कार्या कारणांतीं नाद तुझी ॥ ९ ॥ नामा ह्मणे माझें चित्त कृष्णाकार ॥ करूनि निर्धार प्रेम देईं ॥ १० ॥

॥ ४०० ॥ निरंतर सुख द्यावें येणें मनें ॥ पायीं समाधान व्हावें वेगीं ॥ १ ॥ वासने वेगळें होऊनि एकट ॥ असावें निकट संतसंगीं ॥ २ ॥ कृपा मजवरी करीं बा विठ्ठला ॥ ह्मणवी आपुला दास जगीं ॥ ३ ॥ कानीं तुझें नाम ऐकेन आवडी ॥ चित्त द्यावें बुडीं प्रेमरस ॥ ४ ॥ मुखी तुझें नाम गाईन निष्काम ॥ धरूनियां प्रेम हृदयांत ॥ ५ ॥ नेत्रीं तुझें रूप पहावें सर्वत्र ॥ व्हावें भूतमात्र सखे माझे ॥ ६ ॥ मनाचाहि त्रास अपमान तोष ॥ अखंड उदास देहबुद्धि ॥ ७ ॥ सर्वकाळ व्हावा भक्तांचिये संगें ॥ सदा अनुराग तुझ्या नामीं ॥ ८ ॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत ॥ दास्य जें पवित्र संतसेवा ॥ ९ ॥ नामा ह्मणे देवा तारिसी अंकिता ॥ नाहीं तरी पतिता तारा मातें ॥ १० ॥

॥ ४०१ ॥ राहोनि भोंवतीं नामा वाट पाहे ॥ श्वास न समाये दुःखें पोटीं ॥ १ ॥ ह्मणती मायेनें वैर साधियलें ॥ विषयीं बुडालों सांगों कोणा ॥ २ ॥ भक्तां अंतरंग देतोसी तूं देवा ॥ भेटसि केशवा पूर्ण स्थिती ॥ ३ ॥ पूर्ण पान्हा धेनू घालीत वोरसें ॥ वत्स थोर हर्षें पान करी ॥ ४ ॥ देखोनि पैं स्वामी बळेंचि वोढिलें ॥ तळमळीत ठेलें थोर आशा ॥ ५ ॥ कृपणें संपत्ति जोडीलिया राशी ॥ हिरोनियां घेती बळियानें ॥ ६ ॥ आळवी करूणा धांवे दाहिदिशा ॥ तैसें हृषीकेशा झालें मज ॥ ७ ॥ क्षुधाक्रांत जेवि भोजनीं बैसले ॥ कोणासीं न बोले मातु कांहीं ॥ ८ ॥ उठवितेवेळीं नव्हतांचि तृप्ति ॥ तैसी दुःख प्राप्ति झाली मज ॥ ९ ॥ अघोर संसार मोहोमहापुरीं ॥ अखंड मुरारी सुखरूप ॥ १० ॥ नामा ह्मणे विठो अनाथाच्या बंधू ॥ देई सुखसिंधु मज आतां ॥ ११ ॥

॥ ४०२ ॥ कीटकीतें भयें स्वयें भृंगी ध्यातां ॥ तैसा तूं अनंता करीं आतां ॥१॥ भजनें पाठविलें श्रीहरि रूपासी ॥ नेतो वैकुंठासी नारायण ॥ २ ॥ नाम नारायण अंतीं उद्धारक ॥ नामा ह्मणे देख भाक माझी ॥ ३ ॥

॥ ४०३ ॥ मयुरध्वज राजा महापापी जाण ॥ उभा नारायण जोडी हात ॥ १ ॥ कर्वत आणिसी सकळां देखतां ॥ कांतिसी तत्वतां मांस त्याचें ॥ २ ॥ कपोतणी मागें पारध्याचा वेष ॥ दावी हृषीकेश रूप त्यासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझें कारणें उचित ॥ कां मज प्रचित नये देवा ॥ ४ ॥

॥ ४०४ ॥ जयाचे उदरीं जन्मला नर ॥ पिंडी तया थोर सर्वकाळ ॥ १ ॥ मानिली अंतरीं सखी जीवलग ॥ आत्महत्या मग घात करी ॥ २ ॥

मानीना तो भक्ति भ्रष्ट आचरण ॥ दोषी नारायण सदोदित ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें पातकी चांडाळ ॥ बुडविलें कुळ बेचाळिस ॥ ४ ॥

॥ ४०५ ॥ अपराधी तरी केला अंगिकार ॥ कासया विचार तुज माजीं ॥ १ ॥ लोहो होतें परी परिस संगति ॥ तैसा तूं श्रीपती जगामाजीं ॥ २ ॥ घुसळितां रवी नेणे लाभ हानी ॥ तैसें चक्रपाणी होऊं नये ॥ ३ ॥ हीन दीन सर्व तुझाच आधार ॥ नामा ह्मणे सार हेंचि आतां ॥ ४ ॥

॥ ४०६ ॥ रमासिंधु माजी सौंदर्याची धणी ॥ ब्रिदें चक्रपाणी मिरविसी ॥ १ ॥ मेघ देहाकृति घनश्याम मूर्ति ॥ नटतसे भक्तीं भक्तजना ॥ २ ॥ भाक देऊनियां गौळियाचे घरीं ॥ गाई निरंतरी चारीतसे ॥ ३ ॥ इंद्र वेडावला मुनि थोर थोर ॥ न कळेचि पार ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ ४०७ ॥ पांचमुखीं रुद्र स्वयें करी स्तुति ॥ चहूं मुखीं कीर्ति वर्णी ब्रह्मा ॥ १ ॥ देवीं देव सर्व विस्मयो पावती ॥ विठोबाची ख्याती कोण वानी ॥ २ ॥ परिक्षितिसाठीं प्राण त्यजी सर्व ॥ रावणाचे गर्व स्वयें हानी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुज सकळ समान ॥ माझे दोष गुण मानी काय ॥ ४ ॥

॥ ४०८ ॥ दुर्घट तें दुःख लागो नेदी भक्ता ॥ त्याची तुज चिंता असे फार ॥ १ ॥ आणिक प्रकार जरूर निकट ॥ पैठणीं प्रकट रूप दावीं ॥ २ ॥ जेथूनी सत्वर निघाले स्वदेशा ॥ मुक्त केलें महिषा मार्गीं जाण ॥ ३ ॥ जाणती प्रेमळ कीर्तनासि तर ॥ समाधी निरंतर ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ ४०९ ॥ समर्थाचें बाळ पांघरे वाकळ ॥ हांसती सकळ लाज कोणां ॥ १ ॥ देव असतां दैन्य उरे कैंचे बापा ॥ आह्मांसि तूं कैसा विसरलासी ॥ २ ॥ ऐसा तूं अविनाश त्रिभुवनींचा राजा ॥ नामा ह्मणे माझा तूंचि स्वामी ॥ ३ ॥

॥ ४१० ॥ प्रेमपिसें भरलें अंगीं ॥ गीतसंगें नाचों रंगीं ॥ १ ॥ कोणे वेळे काय गाणें ॥ हें तों भगवंता मीं नेणें ॥ २ ॥ वारा वाजे भलतया ॥ तैसी माझी रंग छाया ॥ ३ ॥ टाळमृदंग दक्षिणेकडे ॥ आह्मीं गातों पश्चिमेकडे ॥ ४ ॥ बोले बाळक बोबडें ॥ तरी तें जननीये आवडे ॥ ५ ॥ नामा ह्मणे गा केशवा ॥ जन्मोजन्मीं देई सेवा ॥ ६ ॥

॥ ४११ ॥ तुझें भक्तिसुख द्यावें मज प्रेम ॥ वसो तुझें नाम माझे मुखीं ॥ १ ॥ सद्भक्ति विचार राहो माझे चित्तीं ॥ हेंचि कृपामूर्ती द्यावें मज ॥ २ ॥ तुझा दास जनीं ह्मणवितों विख्यात ॥ पसरिला हात फिरवूं नको ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा इतुकें द्यावें मज ॥ ऐकोनि केशवराज काय बोले ॥ ४ ॥

॥ ४१२ ॥ अंतकाळीं मी परदेशीं ॥ ऐसें जाणोनि मानसीं ॥ ह्मणोनियां हृषीकेशी ॥ शरण तुजसि मी आलों ॥ १ ॥ नव मास गर्भवासीं ॥ कष्ट झाले मातेसी ॥ ते निष्ठुर झाली कैसी ॥ अंतीं दूर राहिली ॥ २ ॥ जीवीं बापासि आवड ॥ मुखीं घालोनि करी कोड ॥ जेव्हां लागली यमओढ ॥ तेव्हां दूरि टाकिलें ॥ ३ ॥ बहिणी बंधूचा कळवळा ॥ तें तूं जाणसी रे दयाळा ॥ ४ ॥ जेव्हां लागली यमशृंखला ॥ तेव्हां दूर राहिलीं ॥ ४ ॥ कन्या पुत्रादिक बाळें ॥ हीं तव स्नेहाचीं स्नेहाळें ॥ तुझ्या दर्शनाहून व्याकुळ ॥ अंतीं दूर राहिलीं ॥ ५ ॥ देहगृहाची कामिनी ॥ ते तंव राहिली भवनीं ॥ मी तव जळतसें स्मशानीं ॥ अग्निसवें येकला ॥ ६ ॥ मित्र आले गोत्रज आले ॥ तेहि स्मशानीं परतले ॥ शेवटीं टाकोनिया गेले ॥ मजलागिं स्मशानीं ॥ ७ ॥ ऐसा जाणोनि निर्धार ॥ मग मज आला गहींवर ॥ तंव दाही दिशा अंधःकार ॥ मग मज कांहीं नसुचे ॥ ८ ॥ ऐसें जाणोनि निर्वाण पाहीं ॥ मनुष्यजन्म मागुता नाहीं ॥ नामा ह्मणे तुझे पायीं ठाव देईं विठोबा ॥ ९ ॥

॥ ४१३ ॥ आरुष सावडें नेणें कांहीं वेडें ॥ जन्मोनि सांकडें केलें तुज ॥ १ ॥ जाणसी तें करीं कृपाळु बा हरी ॥ लाज सर्वांपरी आहे तुज ॥ २ ॥ मी तंव अपराधी असें लक्षकोटी ॥ ह्मणतों जगजेठी दास तुझा ॥ ३ ॥ नाहीं तुझी सेवा केली मनोभावें ॥ लोभदंभगर्वें भ्रांत झालों ॥ ४ ॥ कीर्ति म्यां ऐकिली बहुतांच्या मुखीं ॥ केली बहु स्तुति शरणांगतें ॥ ५ ॥ नामा ह्मणे मज मोकलिसी झणीं ॥ अनाथ ह्मणोनि शरण आलों ॥ ६ ॥

॥ ४१४ ॥ रात्रंदिवस खंती वाटे माझे जीवीं ॥ अनुदिनीं आठवीं चरण तुझे ॥ १ ॥ नेरे पांडुरंगा आपुलिया गांवा ॥ तूं माझा विसांवा जीवलग ॥ २ ॥ मी एक बापुडें रंकाहूनि रंक ॥ त्रिभुवननायक कीर्ति तुझी ॥ ३ ॥ मी तुझें पोसणें दास पैं दुर्बळ ॥ तूं दीनवत्सल स्वामि माझा ॥ ४ ॥ तुझें मी अनाथ चरणीं ठेवीं माथा ॥ सांभाळीं समर्था ब्रीद

तुझें ॥ ५ ॥ नामा ह्मणे विठो झालों कासाविस ॥ पुरवी माझी आस मायबापा ॥ ६ ॥

॥ ४१५ ॥ काय मागों विठ्ठल धुरे ॥ एक तुळसी दळ पुरे ॥ १ ॥ मागों मुकुट माथींचा ॥ तों तंव आणिला कोणाचा ॥ २ ॥ मागों कुंडलें कर्णींचीं तीं तंव आणिलीं इंद्राचीं ॥ ३ ॥ मागों पितांबर शेला ॥ तों तव कासेसीं कसिला ॥ ४ ॥ मागों जातां लक्ष्मीसी॥ रिद्धीसिद्धी जिच्या दासी ॥ ५ ॥ नामा ह्मणे कांहीं न मागों ॥ तुझे चरणीं लक्ष लागो ॥ ६ ॥

॥ ४१६ ॥ माझें मागणें तें किती ॥ दाता लक्षुमीचा पती ॥ १ ॥ मेघ वर्षे शाळाधारी ॥ तेथें चातक चंचूभरी ॥ २ ॥ महा डोहो गंगाजळ ॥ तृप्त एखादा अंजुळ ॥ ३ ॥ साखरेची साठी ॥ तेथें मुंगीची मुखवटी ॥ ४ ॥ नामा ह्मणे मी सेवेसीं ॥ तूं तो उदाराचा राशी ॥ ५ ॥

॥ ४१७ ॥ मायबापांपरीस लोभ तुझा हरी ॥ आहे मजवरी केशिराजा ॥ १ ॥ आतां जाणसी तें कृपालु बा करी ॥ लाज सर्व हरी आहे तुज ॥ २ ॥ माझें जातिकुळ नाहीं त्वां पूसिलें ॥ अन्याय साहिले कोट्यानकोटी ॥ ३ ॥ जन्मोजन्मीं मज घातलें पाठिसीं ॥ संकटीं रक्षिसी नारायणा ॥ ४ ॥ देऊनि प्रेमभातें पाळिलें पैं मातें ॥ साउली तेव्हां ते केली देवा ॥ ५ ॥ जे खूण जाणती तेचि माझे सखे ॥ मी तुझें लाडकें ह्मणवीं देवा ॥ ६ ॥ नामा ह्मणे कांहीं होऊं उतराई ॥ पुढें जन्म नाहीं ऐसें केलें ॥ ७ ॥

॥ ४१८ ॥ अरे स्फुरती भुजा दंड वक्षस्थळ ॥ हर्षें नेत्रकमळ विकासलें ॥ १ ॥ आनंदें रोमांच उभारले अंगीं ॥ क्षेम दे गा वेगीं भक्तराया ॥ २ ॥ मज नानारूपें तुमचेनि संभ्रमें ॥ केलीं जन्मकर्में असंख्यात ॥ ३ ॥ तुमचे आवडी असे मी विकिला ॥ नुठसी कां वहिला आलिंगना ॥ ४ ॥ हृदयींचें गुज सांगतों सकळिकां ॥ तेणें मज सुख होईल जीवा ॥ ५ ॥ परतोनि दीठी पाहें आळुमाळ ॥ तेणें हरे सकळ श्रम माझा ॥ ६ ॥ भक्तजन वत्सल भक्तांचा विसांवा ॥ भक्ताचिया भावा भुलला कैसा ॥ ७ ॥ कटीं कर ठेवूनि उभा पुंडलिका द्वारीं ॥ नामया स्वामि हरि न विसंबे ॥ ८ ॥

॥ ४१९ ॥ मनीं जें जें देखें परि दृष्टीं नेणें ॥ प्रेमाची ते खूण सांगावया ॥ १ ॥ काय करूं मायबापा गा विठ्ठला ॥ मज कां अबोला धरिलासी ॥ २ ॥ मानसीं वसणें प्रत्यक्ष पाहणें ॥ तुझें नाम गाणें तरी साच ॥ ३ ॥ नामा ह्मणे किती सांगावें गा तुज ॥ केशवा हें गुज पुरवीं माझें ॥ ४ ॥

॥ ४२० ॥ तान्हेलिया जाय उदका लागोनि ॥ पारधी देखोनि मुरडे वेगीं ॥ १ ॥ तैसे तुझे चरण विसरलों देवा ॥ संसार केशवा देखोनियां ॥ २ ॥ तैसी परी मज झाली जाण देवा ॥ नामा ह्मणे केशवा विनवीतसें ॥ ३ ॥

॥ ४२१ ॥ ऐकें मोक्षाची मी कथा ॥ तेणें भय वाटे चित्ता ॥ १ ॥ देवा कांहीं न मागें न मागें ॥ मौन असे संतसंगें ॥ ध्रु० ॥ ऐके मुक्तीचिया गोष्टी ॥ तेणें होतसे हिंपुटी ॥ २ ॥ ऐकें समाधिची गोडी ॥ मन तुझे पायां ओढी ॥ ३ ॥ ऐकें स्वर्गसुख थोरी ॥ भेणें कांप येतो भारी ॥ ४ ॥ नामा ह्मणे अभयदान ॥ देऊनि सांगे प्रेमखूण ॥ ५ ॥

॥ ४२२ ॥ सांडोनी अभिमान झालों शरणांगत ॥ ऐसीयाचा अंत पहासी काई ॥ १ ॥ माझे गुण दोष मनीं गा न धरी ॥ पतीतपावन जरी ह्मणविसी ॥ २ ॥ पडलीया पापराशी झणीं देसी देवा ॥ हे लाज केशवा कोणास जी ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा चतुरा शिरोमणी ॥ निःकुरा होसी झणीं मायबापा ॥ ४ ॥

॥ ४२३ ॥ आशा नदी पूरीं वाहवलोंसे दुरी ॥ कृपाळा बाहेरी काढीं मज ॥ १ ॥ धीर आणि विद्या ह्या दोन्ही सांगडी ॥ मायादोरी पुढी तुटोनि गेली ॥ २ ॥ अगाये थडीये कां पाहतोसी हरी ॥ हानी झाली थोरी काढी मज ॥ ३ ॥ न निघें मी देवा आणिके पोहणारें ॥ सहित पितांबरें घाली उडी ॥ ४ ॥ नामा ह्मणे विठो धांव लवलाहीं ॥ बुडतों चिंताडोहीं काढीं मज ॥ ५ ॥

॥ ४२४ ॥ कुस्ती खेळतां कासाविसी ॥ शेंबुड खरकटें नाकासी ॥ करें घेऊनि सावकासीं ॥ आतां बहु भितो यासी ॥ १ ॥ आह्मीं तुह्मीं सवें जेवूं ॥ गाई वळावया जाऊं ॥ त्याच्या मानेवर बुक्या देऊं ॥ जवळ जावयासि आतां भिऊं ॥ २ ॥ नामा ह्मणे चला जाऊं ॥ हात जोडोनि उभे राहूं ॥ पायां पडुनि मागोनि घेऊं ॥ जनीं वनीं तो कृष्ण ध्याऊं ॥ ३ ॥

॥ ४२५ ॥ आह्मां वैष्णवांचा कूळधर्म कुळींचा ॥ विश्वास नामाचा सर्व भावें ॥ १ ॥ तरी त्याचे दास ह्मणतां श्लाघिजे ॥ निर्वासना कीजे चित्ता आधीं ॥ २ ॥ गाऊं नाचों आह्मीं आनंदें कीर्तनीं ॥ भक्ति मुक्ति दोन्ही मागूं देवा ॥ ३ ॥ वृत्तिसहित मन बुडे प्रेमडोहीं ॥ नाठवती देहीं देह

भाव ॥ ४ ॥ सगुणीं निर्गुणीं एकच आवडी ॥ मनें दिली बुडी चिदाकाशीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा ऐसी मज सेवा ॥ द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

॥ ४२६ ॥ अन्न उदक सोडिलें ॥ ध्यान देवाचें लागलें ॥ १ ॥ स्त्री पुत्र बापमाय ॥ त्याचा आठव न होय ॥ २ ॥ देहभाव विसरला ॥ छंद हरीचा लागला ॥ ३ ॥ नामा ह्मणे हेंचि देई ॥ तुझे पाय माझे डोई ॥ ४ ॥

॥ ४२७ ॥ अनाथ अनाथ ह्मणती मातें ॥ अनाथनाथ ह्मणती तूतें ॥ १ ॥ आपुलें ब्रीद साच करी ॥ भेट मज एक वेळ मुरारी ॥ २ ॥ पतीत पतीत ह्मणती मातें ॥ पतीतपावन ह्मणती तूतें ॥ ३ ॥ दीन दीन ह्मणती मातें ॥ दीनानाथ ह्मणती तूतें ॥ ४ ॥ आर्त आर्त ह्मणती मातें ॥ आर्तपरायण ह्मणती तूतें ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐके सुजाणा ॥ नाइकसी तरी लाज कवणा ॥ ६ ॥

॥ ४२८ ॥ पाहूं द्यारे मज विठोबाचें मुख ॥ लागलीसे भूक डोळां माझ्या ॥ १ ॥ कस्तुरी कुंकुम भरोनियां ताटीं ॥ अंगीं बरवी उटी गोपाळाच्या ॥ २ ॥ जाईजुई पुष्पें गुंफोनियां माळा ॥ घालूं घननिळा आवडीनें ॥३॥ नामा ह्मणे विठो पंढरीचा राणा ॥ डोळियां पारणा होत असे ॥ ४ ॥

॥ ४२९ ॥ पूर्ण कृपा केली देवा ॥ दिधली पादपद्मसेवा ॥ १ ॥ पापें पळालीं पळालीं ॥ नामकीर्तनकल्लोळीं ॥ २ ॥ रंगमाळा जागरणीं ॥ तेथें मुक्ति वाहती पाणी ॥ ३ ॥ जन्म वैष्णवकुळीं द्यावा ॥ घडो संताचिये सेवा ॥ ४ ॥ नामदेवाची आवडी ॥ संतचरणीं देतो बुडी ॥ ५ ॥

॥ ४३० ॥ वासनेचा फांसा पडिला माझे कंठीं ॥ हिंडलों जगजेठी नाना योनी ॥ १ ॥ सोडवी गा देवा दीनदयानिधी ॥ मी एक अपराधी दास तुझा ॥ २ ॥ शरण आलियाचे न पाहसी अवगुण ॥ कृपेचें लक्षण तुज साजे ॥ ३ ॥ त्रिभुवनीं समर्थ उदार मनाचा ॥ कृपाळू दीनाचा ब्रीद तुझें ॥ ४ ॥ गजेंद्र गणिकेची राखिली तुवां लाज ॥ उद्धरिला द्विज अजामेळ ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा अव्हेरिसी मज ॥ जगीं थोर लाज येईल तुला ॥ ६ ॥

॥ ४३१ ॥ तुज गीतीं गातां नयेसी पांडुरंगा ॥ प्रेमेंचि दडूं गा पायांपाशीं ॥ १ ॥ वांकडें तिकडें जैसें आलें तैसें ॥ गावया उल्हास उगवला ॥ २ ॥

त्याचि भरें तोंडा आलें तें बोलतों ॥ नाम मुखीं घेतों अखंडित ॥ ३ ॥ तुझा ह्मणवितों सांभाळावें देवा ॥ नामया केशवा सर्वकाळ ॥ ४ ॥

॥ ४३२ ॥ कांहो माझी सांडी केली हृषीकेषी ॥ आह्मी कोणापाशीं तोंड वासूं ॥ १ ॥ नित्य देवा तुज यावें काकुळती ॥ काय या संचितीं लिहिलें माझ्या ॥ २ ॥ ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं ॥ तूंचि एक धनी त्रैलोक्याचा ॥ ३ ॥ समूळ घेतला पृथिवीचा भार ॥ माझाचि जोंजार काय तुज ॥ ४ ॥ नको पाहूं अंत पांडुरंगे आई ॥ नामा हरिपायीं मिठी घाली ॥ ५ ॥

॥ ४३३ ॥ अपत्याचें हित कीजे त्या जनकें ॥ जरी वेडें मुकें झालें देवा ॥ १ ॥ तैसें मी पोसणें तुझें जीवलग ॥ अंतरींचें सांग गुज कांहीं ॥२॥ राखीन मी नांव तुझें सर्वभावें ॥ चित्त वित्त जीव देईन पायीं ॥ ३ ॥ जरी देवा हीन ह्मणसील मज ॥ नामा ह्मणे लाज येईल कोणा ॥ ४ ॥

॥ ४३४ ॥ माझी कोण गति सांगा पंढरिनाथा॥ तारिसी अनाथा कीं बुडविसी ॥ १ ॥ मनापासोनियां सांग मज प्रती ॥ पुसें काकुळती जीविंचिया ॥ २ ॥ न बोलसी कांरे धरिला अबोला ॥ कोणासि विठ्ठला शरण जाऊं ॥ ३ ॥ कोणासि सांकडे घालावें हें सांगा ॥ नको करूं रागा दीनावरी ॥ ४ ॥ बाळकासि जैसी एकलीच माय ॥ तैसे तुझे पाय आह्मा-लागीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा अनाथाच्या नाथा ॥ कृपाळुवा कांता रखुमाईच्या ॥ ६ ॥

॥ ४३५ ॥ पाषाण करी तरी पायरीच्या मिषें ॥ तुझ्या द्वारीं वसें ऐसें करी ॥१॥ उदक करीं तरी मार्जनाचे मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ २ ॥ पशू करी तरी गाईचिया मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ३ ॥ पक्षि करी तरी चारियाचे मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ४ ॥ नामा ह्मणे विठो कीर्तनाच्या मिषें ॥ तुझ्या द्वारीं वसें ऐसें करी ॥ ५ ॥

॥ ४३६ ॥ अपराधाची कोडी हेचि माझी जोडी ॥ पतीत पावन प्रौढि तुझी देवा ॥ १ ॥ माझियानि दैवें ऐसेंचि घडलें ॥ तूं तंव आपुलें नसंडिसी ॥ २ ॥ सहस्र अपराध घाली माझे पोटीं ॥ तारीं जगजेठी ह्मणे नामा ॥ ३ ॥

॥ ४३७ ॥ शरणांगता तारीतां अपमान न व्हावा ॥ हें तरी केशवा जाणतोसी ॥ १ ॥ तुज सांगणें नलगे सांगणें नलगे ॥ सांगणें नलगे तुज देवराया ॥ २ ॥ समर्था सांगतां सर्वेचि विसरी ॥ त्याच्या अभ्यंतरीं न राहे बोल ॥ ३ ॥ नामा ह्मणे तैसा तूं नव्हेसि शहाणा ॥ अठराही पुराणां वेडाविसी ॥ ४ ॥

॥ ४३८ ॥ श्रीमुखाची सोय पाहों ह्मणें जरी ॥ एवढा अधिकारी कैंचा देवा ॥ १ ॥ चरणांजवळूनि नसावें जी दूरी ॥ जन्मजन्मांतरीं हेंचि देई ॥ २ ॥ तुज देतां सोपें मज तृप्ति अल्प ॥ सर्वज्ञा साक्षेप सांगतसें ॥ ३ ॥ अनाथाचा नाथ हें तों ब्रीद साच ॥ न करावें उदास नामा म्हणे ॥ ४ ॥

॥ ४३९ ॥ देवा माझें मन ठेवीं तुझे चरणीं ॥ घालीं माझे मनीं रूप तुझें ॥ १ ॥ मज या लोकांचा शीण असे मनांतु ॥ तुजचि चिंतीतु हृदय-कमळीं ॥ २ ॥ चंदनाच्या दृती वेधले तरुवर ॥ सबाह्य अभ्यंतर काय झालें ॥ ३ ॥ सरिता सिंधुमाजी मिळोनि लपाली ॥ सागरची झाली एकसरें ॥ ४ ॥ लवण जळाचें प्रसिद्धचि असे ॥ ऐक्यभावें वसे न दिसे कांहीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे शरण आलों केशिराजा ॥ ऐसा भावो माझा करी वेगीं ॥ ६ ॥

॥ ४४० ॥ धांवूनि जाईन श्रीमुख पाहीन ॥ ईडापीडा घेइन विठोबाची ॥ १ ॥ तया सुखा दृष्टि लागेल वो क्षणीं ॥ मग मी साजणी काय करूं ॥ २ ॥ ह्मणोनि माझें चित्त व्यापिलें उद्वेगें ॥ शिणलों मी उबगें जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ धरोनियां घालीं जीवाचे अंतरीं ॥ आंतोनि बाहेरी जाऊं नेदी ॥ ४ ॥ वासना पापिणी करील पायरव ॥ मग हा अनुभव कोठें पाहूं ॥५॥ वृत्तिसहित करीन मनाचें सांडणें ॥ न विसंबें प्राणें ह्मणे नामा ॥ ६॥

॥ ४४१ ॥ अगे तूं माउली संताची साउली ॥ आठवितां घाली प्रेम-पान्हा ॥ १ ॥ प्रेमपान्हा पाजी अगे माझे आई ॥ विठाईगे मायी वोरसोनी ॥ २ ॥ येतों काकुळती प्रेमपान्ह्यासाठीं ॥ उभा तो धूर्जटी मागें पुढें ॥ ३ ॥ नामा ह्मणे जिवें करीन लिंबलोण ॥ ओंवाळीन चरण विटेसहित ॥ ४ ॥

॥ ४४२ ॥ पक्षिणी प्रभातीं चारियासि जाये ॥ पिलूं वाट पाहे उप-वासी ॥ १ ॥ तैसें माझें मन करी वो तुझी आस ॥ चरण रात्रंदिवस चिंती-तसें ॥ २ ॥ तान्हें वत्स घरीं बांधलेंसें देवा ॥ तया हृदयीं धांवा माउ-

लीचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा तूं माझा सोईरा ॥ ह्मणी मज न अव्हेरा अनाथनाथा ॥ ४ ॥

॥ ४४३ ॥ तापत्रयअग्निची जळतसे शेगडी ॥ आहाळोनि कोरडी झाली काया ॥ १ ॥ केव्हां करुणाघना वोळसी अंबरीं ॥ निवविसी नरहरी कृपादृष्टीं ॥ २ ॥ शोकमोहाचिया झळंबलों ज्वाळीं ॥ क्रोधाचे काजळीं पोळतसें ॥ ३ ॥ चितेचा वोणवा लागला चहूंकडां ॥ जातों तळा बुडां धांव देवा ॥ ४ ॥ धांव धांव करुणाघना तुजविण ॥ नामा ह्मणे प्राण जातो माझा ॥ ५ ॥

॥ ४४४ ॥ देव देवी देवतार्चन ॥ तूंचि माझें पूर्णपण ॥ १ ॥ नमगें नमगें विठ्ठला ॥ येथूनियां राहें उगला ॥ २ ॥ तुझी भक्ति हेचि गोड ॥ आणिक आह्मा नाहीं चाड ॥ ३ ॥ जप तप नेम निष्ठा ॥ तुजचि जाणों गा वैकुंठा ॥ ४ ॥ यज्ञ याग मंत्र तंत्र ॥ तूंचि आमुचें कुळ गोत्र ॥ ५ ॥ येथूनि पंढरिराय हरी ॥ आह्मांसि तूं अंगीकारी ॥ ६ ॥ आह्मी करितों कीर्तन ॥ तारावे हे तुवां जन ॥ ७ ॥ हेंचि मागणें हो देवा ॥ नामा ह्मणे द्यावी सेवा ॥ ८ ॥

॥ ४४५ ॥ डोळे शिणले पाहतां वाटुली ॥ अवस्था दाटली हृदयामाजी ॥ १ ॥ तूं माझी जननी सरसीये सांगातिणी ॥ विठ्ठले धांवोनि देई क्षेम ॥ २ ॥ तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज ॥ क्षुधें पीडलों मज विसरलीसी ॥ ३ ॥ तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस ॥ गुंता भवपाश तोडीं माझा ॥ ४ ॥ तूं माझी माउली मी तुझी तान्हुली ॥ वोरस वो घालीं प्रेम पान्हा ॥ ५ ॥ नामा ह्मणे आस पुरवावी माझी ॥ तान्हूलया पाजीं प्रेम पान्हा ॥ ६ ॥

॥ ४४६ ॥ तत्व पुसावया गेलों वेदज्ञासी ॥ तंव भरले सापासी विधिनिषेध ॥ तया समाधान नुमजे कोणे काळीं ॥ अहंकार बळि झाला तेथें ॥ १ ॥ ह्मणोनि तुझें नाम धरिलें सर्व भावें ॥ उचित करावें पांडुरंगा ॥ ध्रु० ॥ स्वरूप पुसावया गेलों शास्त्रज्ञासी ॥ तंव भरले तयापाशीं भेदाभेद ॥ एकएकाच्या न मिळती मतासी ॥ भ्रांत गर्वराशि भुलले सदां ॥ २ ॥ पुराणिकासि पुसूं स्वरूपाची स्थिति ॥ तंव त्यासी विश्रांति नाहीं कोठें ॥ विषयीं ठेवुनि मन सांगती ब्रह्मज्ञान ॥ तेणें समाधान नुपजे कदां ॥ ३ ॥ हरिदासासी पुसूं भक्तीचा उपाय ॥ तव तयापाशीं नाहीं भाव कोठें ॥

वाचेनें सांगती नामाचा वडिवार ॥ विषयीं पडी भर सदाकाळीं ॥ ४ ॥ ऐसें विचारितां बहुत भागलों ॥ ह्मणोनि शरण आलों पांडुरंगा ॥ भयाभीत झालों संसार करितां ॥ नामा ह्मणे आतां तारी मज ॥ ५ ॥

॥ ४४७ ॥ सगुण निर्गुण श्रुति ज्या बोलती ॥ ते तूं माझे चित्तीं पंढरिराया ॥ १ ॥ आहेसि तीतुकें तूंचि सर्वांगत ॥ मी काय अनाथ वर्णू तुज ॥ २ ॥ चरणीची आवडी नसंडावी मनें ॥ यापरि पोषणें मायबापा ॥ ३ ॥ साक्ष भीमरथी संत पुंडलीक ॥ नाम्यातें आणीक नलगे कांहीं ॥ ४ ॥

॥ ४४८ ॥ गंगा गेली सिंधुपासी ॥ तों तो येऊं नेदी तिसी ॥ १ ॥ तिणें जावें कवणा ठाया ॥ बोल वेगीं पंढरिराया ॥ २ ॥ जळ कोपलें जलचरा ॥ माय बाळा नेदी थारा ॥ ३ ॥ नामा ह्मणे आलों शरण ॥ तरि कां विठो धरिलें मौन ॥ ४ ॥

॥ ४४९ ॥ अठ्ठावीस युगें उभा ठेला द्वारीं ॥ पुंडलीकावरी ठेवुनि लक्ष ॥ १ ॥ कृपेचा सागर भक्तजनवत्सल ॥ आमुचा विठ्ठल मायबाप ॥ २ ॥ भक्तीसि भाळला अरूप रूपा आला ॥ वेळाईत झाला भक्तांलागीं ॥ ३ ॥ भक्तीचिया रूपें न घडे तें केलें ॥ वैकुंठा आणिलें भूमंडळीं ॥ ४ ॥ भक्ति मुक्ति सिद्धि त्यापायीं लागती ॥ उद्भट गर्जती विठ्ठलनामें ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशव उदाराचा राव ॥ सेवा चरणीं ठाव देई आह्मां ॥ ६ ॥

॥ ४५० ॥ देवा हे विनंती माझी ॥ जे म्यां सेवा करावी तुझी ॥ आस न करावी दुजी ॥ अभिलाषा कारणें ॥ १ ॥ तुज म्यां जीवें अनुसरावें ॥ त्वां मज तैसें आपंगावें ॥ आणिकाचें न ह्मणावें ॥ जन्मोजन्मीं दातारा ॥ २ ॥ वदनीं तुजचि वर्णावें ॥ श्रवणीं गुणनाम ऐकावें ॥ नयनीं चरण न विसंबावे ॥ क्षण एक दातारा ॥ ३ ॥ अगा येऊनि संसारा ॥ न जावें आणिकाच्या द्वारा ॥ इष्टमित्र सज्जन सोयरा ॥ बंधु आदि करोनी ॥ ४ ॥ जरी तुज न पोसवे दातारा ॥ तरी या आयुष्या घाली चिरा ॥ एका पोटा गा दुस्तरा ॥ साटीं अव्हेरूं नको ॥ ५ ॥ मज ह्मणोत सकळ जन ॥ परि तूं नको उदासीन ॥ तुझ्या नामावांचून ॥ आणिक नको दातारा ॥ ६ ॥ सेवक न करी आणिकाचा ॥ जन्मोजन्मीं दास तुमचा ॥ आणिक वर्णीन तरी वाचा ॥ उच्छिष्ट करूं नको ॥ ७ ॥ नामविक्रय न करावा ॥ दानप्रति-

ग्रह न घ्यावा ॥ कष्टार्जित मेळवावा ॥ तोचि ग्रास आपुला ॥ ८ ॥ नको दिवटीया छत्र घोडे ॥ जेणें तुजसि अंतर पडे ॥ तुझें नामचि आवडे ॥ मज बापुडें ह्मणोत कां ॥ ९ ॥ ऐसा अन्यायि अपराधी ॥ तरी मज तारी कृपानिधी ॥ तुझें नाम उच्चारी आधीं ॥ थोर अट्टाहास्यें करोनियां ॥ १० ॥ विष्णुदास नामा ह्मणे ॥ आह्मा उपेक्षिसी झणें ॥ जन्मोजन्मींचें पोसणें ॥ केशवा उणें येऊं नेदी ॥ ११ ॥

॥ ४५१ ॥ मन नेणें तुझ्या नामाचा विश्वास ॥ येर तो हव्यास गोड वाटे ॥ १ ॥ तुझें प्रेम नेणें तुझें प्रेम नेणें ॥ सांग काय कारणें केशिराजा ॥ २ ॥ घातलें संसारीं कर्माचे भांडारीं ॥ कृपा नरहरी करी मज ॥ ३ ॥ नामा ह्मणे मी ठायींचाचि अपराधी ॥ केशवा बुद्धि कांहीं सांग मज ॥ ४ ॥

॥ ४५२ ॥ मोह भुजंगें डंखिलें ॥ विषय लहरी झाकोळिलें ॥ १ ॥ धांव धाव चक्रपाणी ॥ आणिका न करवे धांवणी ॥ २ ॥ नामा ह्मणे निर्विष झालों ॥ केशव नामें उपचारिलों ॥ ३ ॥

॥ ४५३ ॥ मनें ध्यान करणें वाचे उच्चारणें ॥ नयनें तुज पाहणें हेंचि देई ॥ १ ॥ करें पूजा करणें माथा चरणीं ठेवणें ॥ श्रवणीं गुण ऐकणें हेंचि देई ॥ २ ॥ षट् चक्रावरी मार्ग बावन्न अक्षरीं ॥ निरालंब निरंतरीं भेटि देई ॥ ३ ॥ मनसा वाचा कर्म आणि दश इंद्रियें ॥ तुझ्या चरणीं दृढ होय ऐसें करी ॥ ४ ॥ डावी उजवीकडे आणि मागें पुढें ॥ अंतीं चरण जोडे ऐसें करी ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशवा तुझी मज गोडी ॥ जन्मोजन्मीं जोडी हेचि देई ॥ ६ ॥

॥ ४५४ ॥ तरी मी गाण नव्हे गाणीव करी ॥ जेणें तुमतें हरी संतोष उपजे ॥ १ ॥ जाण नव्हे मी तें जाणीव हें करी ॥ जेणें तुमतें हरी संतोष उपजे ॥ २ ॥ दाता नव्हे जें मी दातृत्व तें करी ॥ जेणें तुमतें हरी संतोष उपजे ॥ ३ ॥ बहुरूपि नव्हे जें मी अभिनव नट धरी ॥ जेणें तुमतें हरी संतोष उपजे ॥ ४ ॥ तरि योगि नव्हे जें मी ध्यान धरी ॥ जेणें तुमतें हरी संतोष उपजे ॥ ५ ॥ यावरी जाणसि तें तूं करी अनंता ॥ विष्णुदास संता विनवीतसे ॥ ६ ॥

॥ ४५५ ॥ निर्धन धनातें कीं आंधळे लोचनातें ॥ मयूर घनातें जेंवि भावी ॥ १ ॥ पारधीयें पाडस धरियलें वनीं ॥ तें चिंती जननि रात्रंदिवस ॥ ध्रु० ॥

तैसा तुझा छंद लागो कां गा देवा ॥ माझिया बा जीवा केशिराजा ॥ २ ॥ सर्पं डंखिलें तें स्मरतो गारोडी ॥ पुरीं जातां सांगडी मन चिंती ॥ ३ ॥ रोगी वैद्यातें बोलावू धाडी ॥ पडिले बांदवडी सुटका इच्छी ॥ ४ ॥ बोळविली बाला ते मनीं वाहे कुवसा ॥ कां रसज्ञु जैसा औषध गिवसी ॥५॥ धेनुकारणें व्याकुळ होय वत्स ॥ तें दशदिशेस अवलोकितें ॥ ६ ॥ निचेतन देह भाण असे अलक ॥ धायवट उदक स्मरे वनीं ॥ ७ ॥ चकोरें मिळोनि चंद्रा जेंवि ध्याती ॥ इंद्रियां निवृत्ति कैं होईल ॥ ८ ॥ पक्षिणीचें पिल येउनि द्वारा-जवळे ॥ मुख पसरी कोंवळें आलोहित ॥ ९ ॥ नामा ह्मणे म्यां आन नाहीं जाणितलें ॥ मज पुरे इतुकलें केशिराजा ॥ १० ॥

॥ ४५६ ॥ टाळ दिंडी हातीं उभा महाद्वारीं ॥ नामकीर्तन करी पंढ-रीये ॥ आवडीचेनि सुखें वोसंडतु प्रेमें ॥ गातो मनोधर्में हरिचे गुण ॥ १ ॥ सांडोनि अभिमान नाचे धरोनि कान ॥ अंतरीं तें ध्यान विठोबाचें ॥ ध्रु० ॥ श्रीहरिची उत्तम जन्मकर्मनामें ॥ घेतलीं त्या प्रेमें सुखरूपें ॥ संताची विश्रांति ज्ञानियांचें गुज ॥ जें कां मुक्तिबीज मोक्षदानी ॥ २ ॥ कृष्णा विठ्ठला हरी मुकुंदा मुरारी ॥ अच्युता नरहरी नारायणा ॥ गोवर्धनधर गोपीमनोहर ॥ भक्तकरुणाकर पांडुरंगा ॥ ३ ॥ सकळ मंगळनिधी पातकभंजना ॥ हरीज-गज्जीवना परमानंदा ॥ तूंचि एक सकळ आदिमध्यअंतीं ॥ नित्य सुखसंपत्ति सज्जनांची ॥ ४ ॥ तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता ॥ तूंचि घेता देता प्रेमसुख ॥ विष्णुदास नामा विनवी पुरुषोत्तमा ॥ सोडवीं भवश्रमा पासू-नियां ॥ ५ ॥

॥ ४५७ ॥ संसारीं गांजलों ह्मणोनि शरण आलों ॥ पाठीसि रिघा-लों देवराया ॥ १ ॥ कळिकाळा वास पाहों न देसी ॥ भरंवसा मानसीं आहे मज ॥ २ ॥ नामा ह्मणे देवा स्वामिया तूं एक ॥ आवडता सेवक करीं मज ॥ ३ ॥

॥ ४५८ ॥ कृपणाचें धन असे भूमिआंत ॥ जेथें जाय चित्त तेथें राखी ध्यान ॥ १ ॥ ऐसी मज देवा लावावि सवय ॥ हेंचि मज द्यावें पांडुरंगा ॥ २ ॥ जेथें जेथें मन जाईल हें माझें ॥ तेथें तेथें तूझें रूप भासे ॥ ३ ॥ नामा ह्मणे सर्वांपरी मी अज्ञान ॥ विनवीं आस करून पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ४५९ ॥ नेत्र तान्हेले पाजी पाणी ॥ पंढरपुराचे मायबहिणी ॥ १ ॥ बाळ पालखीं करी सोर ॥ माते आला निद्राभर ॥ २ ॥ जागी न होसी गे

माय ॥ प्राण जातो करूं काय ॥ ३ ॥ नामा ह्मणे चक्रपाणी ॥ चरणीं घातली लोळणी ॥ ४ ॥

॥ ४६० ॥ भेटी लागीं जीवा लागलीसे आस ॥ पाहें रात्रंदिवस वाट तुझी ॥ १ ॥ पौर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन ॥ तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥ दिवाळीच्या मूळा मोठी आस केली ॥ पाहतां वाटुली मायबापा ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मी लेंकराची जाति ॥ भेटावया खंती वाटतसे ॥ ४ ॥

॥ ४६१ ॥ आसनीं शयनीं भोजनीं मनीं ध्यानीं ॥ तुझे चरण दोन्ही देई मज ॥ १ ॥ पातक कल्मष समूळचि छेदूं ॥ मज परमानंदु तुझे नामीं ॥ २ ॥ ध्यानीं हृषीकेशा भक्तजनपरेशा ॥ अनाथा कोंवसा गोवळिया ॥ ३ ॥ विष्णुदास नामा विनवी मेघःशामा ॥ संसारीच्या श्रमा तारी देवा ॥ ४ ॥

॥ ४६२ ॥ नव जावे तेथें लागे जाणें ॥ न करावें तेंचि लागे करणें ॥ न बोलवें त्यासि लागे बोलणें ॥ पडे मागणें नेदी तया ॥ १ ॥ कृष्णें देवकीये उदरा येणें ॥ कंसा सांगोनि गोकुळासि जाणें ॥ तेथें नंदाच्या गाई राखणें ॥ संगतीं असणें गोंवळ्यांच्या ॥ २ ॥ राम वानरांची सेवा करी ॥ पांडव कौरवांचे घरीं ॥ हरिश्चंद्र डोंबाघरीं पायकी करी ॥ हें अपूर्व परियेसा ॥ ३ ॥ रुद्रें अंजनी उदरा येणें ॥ रामाची सेवा वानरपणें ॥ प्रसंग पडे तैसें वर्तनें ॥ रुसणें नलगे कवणासी ॥ ४ ॥ स्वामीनें सेवकाची सेवा करणें ॥ नुपेक्षी कदन्न भक्षणें ॥ ह्मणवूनि अहंकार न धरणें ॥ विषम संसार अरे जना ॥ ५ ॥ अवचट घडविती तुझिया मावा ॥ थोर विस्मय होतो माझिया जीवा ॥ विष्णुदास नामा विनवी केशवा ॥ देवा तूं करिसी तें बरवें ॥ ७ ॥

॥ ४६३ ॥ आणिक न मागे हें ब्रीद साजे चातका ॥ भूमिच्या उदका न खालवी माथा ॥ १ ॥ आणिकापुढें न गाय हें ब्रीद साजे कोकिळीये ॥ वसंत ऋतु स्वयें आळवीतसे ॥ २ ॥ आणिकापुढें न नाचे हें ब्रीद साजे मयूरा ॥ वर्षला घन सारा वळोनियां ॥ ३ ॥ एका लक्ष्मीपती वांचूनि न बैसे आणिकापुढें ॥ हें ब्रीद साजे रोकडें गरुडासी ॥ ४ ॥ आणिकांचा पांगिल न करी गा देवा ॥ नामा ह्मणे केशवा रंक तुझा ॥ ५ ॥

॥ ४६४ ॥ कृपा करोनि त्वां मज प्रसन्न व्हावें ॥ आणि म्यां मागावें बुद्धिज्ञान ॥ १ ॥ ऐसी भुली मज न घाली पांडुरंगा ॥ बिघड सत्संगा न करी मज ॥ २ ॥ मोक्षासि साधन एक ते उपाधि ॥ दाखवूनि बुद्धि भ्रंश

केलें ॥ ३ ॥ एक पुत्र कलत्र राज्याचा संभ्रम ॥ दावोनि दुर्गम भ्रम केला ॥ ४ ॥ नामा ह्मणे तुझ्या प्रेमालागीं भक्ति ॥ घेतली म्यां सुती जन्म मरण ॥ ५ ॥

॥ ४६५ ॥ तुझें नित्य सुख घ्यावें येणें मनें ॥ असावें संधानें चरणाचेनि ॥ १ ॥ वासनेविरहित होऊनि एकवट ॥ असावें निकट संतसंगें ॥ २ ॥ ऐशी मज कृपा करी गा विठ्ठला ॥ ह्मणविसी आपुला दास जरी ॥ ३ ॥ श्रवणीं तुझें नाम ऐकावें आवडी ॥ चित्तें देऊनि बुडी प्रेमडोहीं ॥ ४ ॥ नयनीं तुझें रूप देखावें सर्वत्र ॥ व्हावे भूतमात्र सखे माझे ॥ ५ ॥ वदनीं तुझें नाम गावें निर्विकल्प ॥ धरोनि तुझें रूप हृदयकमळीं ॥ ६ ॥ काया संतापायीं जावी लोटांगणीं ॥ तें भाग्य अनुदिनीं देई बापा ॥ ७ ॥ हेंचि माझें व्रत हेंचि तपतीर्थ ॥ करावें दास्यत्व संताचें हें ॥ ८ ॥ अनुदिनीं व्हावा संतांचा हा संग ॥ असावा अनुराग कीर्तनाचा ॥ ९ ॥ मानाचा मज ओस अपमानीं उल्हास ॥ देई तुझा ध्यास सर्वकाळ ॥ १० ॥ नामा ह्मणे विठोबा तरीच शरणांगत ॥ नाहीं तरी पतीत ह्मणती मज ॥ ११ ॥

॥ ४६६ ॥ आह्मी शरणांगत परि सर्वस्वें उदार ॥ भक्तीचे सागर सत्वशील ॥ १ ॥ काया वाचा मनें अर्थ संपत्ति धन ॥ दिधलें तुजलागुन पांडुरंगा ॥ २ ॥ आह्मां ऐसें वित्त तुह्मां कैचें देवा ॥ हा बडिवार केशवा न बोलावा ॥ ३ ॥ सत्वाचा सुभटु बळि चक्रवर्ति ॥ पहा पाहा केव्हढी ख्याति केली तेणें ॥ ४ ॥ त्रिभुवनींचें वैभव जोडिलें ज्या लागुनी ॥ तें शरीर तुझ्या चरणीं समर्पिलें ॥ ५ ॥ रावणा ऐसा बंधु सांडूनि सधर ॥ ओळंगति परिवार ब्रह्मादिकां ॥ ६ ॥ ते सांडोनि एकसरा आलासे धांवत ॥ झाला शरणांगत बिभीषण ॥ ७ ॥ हिरण्यकश्यपें तुझा वैर संबंध ॥ पाहे पा प्रल्हाद गांजीयला ॥ ८ ॥ अजगर कुंजर करितां विषपान ॥ परि तुझें स्मरण नसंडीच ॥ ९ ॥ पति पुत्र स्नेह सांडोनि गोपिका ॥ रासक्रीडे देखा भुललीया ॥ १० ॥ एकीं तुझें ध्यान करितां त्यजिले प्राण ॥ सांग ऐसें निर्वाण कवणें केलें ॥ ११ ॥ ऐसे मागा पुढां झाले असंख्यात ॥ भक्त भागवत सखे माझे ॥ १२ ॥ त्यांचेनि सरता झालासि त्रिभुवनीं ॥ विचारी आपुल्या मनीं पांडुरंगा ॥ १३ ॥ आतां केलें उच्चारण बोलता लाजिरवाणें ॥ हांसती पिसुनें संसारींचीं ॥ १४ ॥ नामा ह्मणे केशवा अहो शिरोमणी ॥ निकुराजासी ह्मणी मायबापा ॥ १५ ॥

॥ ४६७ ॥ बाळका स्तनपान माता करविते ॥ टाकिलें परतें चरणीं लोळे ॥ १ ॥ हातीं घेऊनि शिपटी माय लागे पाठीं ॥ चरणीं घाली मिठी परतें नोहे ॥ २ ॥ तैसें माझें मन तुजलागिं देवा ॥ नविसंबें केशवा क्षणभरीं ॥ ३ ॥ चातका नलभे पाणी तृषाक्रांत मनीं ॥ वाट पाहे गगनीं जीवनाची ॥ ४ ॥ निराळीं पियूषें वर्षे तयालागीं ॥ आळवितां वेगीं मेघराया ॥ ५ ॥ बाळलें हें तृण नसंडी हो क्षीर ॥ तैसें भक्तीं स्थिर मन राहे ॥ ६ ॥ नामा म्हणे या जन्माचिया साटीं ॥ चरणीं घाली मिठी परता नोहे ॥ ७ ॥

॥ ४६८ ॥ कृपेच्या सागरा भक्तजन करुणाकरा ॥ परियसी उदारा केशिराजा ॥ १ ॥ मज घातलें संसारीं काळाचे आहारीं ॥ करुणा कैसी हरी नये तुज ॥ २ ॥ माझी सोडवण करी गा कृपानिधी ॥ तोडी हे उपाधि संसाराची ॥ ३ ॥ पुत्र कलत्र बंधु सांगाति देहाचे ॥ मज बांधिलें मोहाचे वज्रपाशीं ॥ ४ ॥ तिहीं माझें चित्त केलें तडातोडी ॥ नाहीं एक घडी सुखलेश ॥ ५ ॥ सकळहि सांगती संभार कर्माचे ॥ नेदिती नामाचें स्मरण कोणी ॥ ६ ॥ दुःखाचे डोंगर पडिले मजवरी ॥ धांव बा श्रीहरी पांडुरंगा ॥ ७ ॥ ऐशा सुखगोष्टी मजसीं न करिती कोणी ॥ झालों चक्रपाणी परदेशी ॥ ८ ॥ शिणलिया न ह्मणती बैस घे विश्रांती ॥ आठवी या श्रीपति पांडुरंगा ॥ ९ ॥ सकळांचें दास्यत्व केली थोर आशा ॥ मानिला भरंवसा मज होती ह्मणोनी ॥ १० ॥ तंव ते भजती आपुलिया हिता ॥ न करिती माझी चिंता परलोकींची ॥ ११ ॥ ऐसा दुर्जनांचा धरोनि पातेरा ॥ केला म्यां मातेरा आयुष्याचा ॥ १२ ॥ कुटुंब कावाडी तुजसी कानकोंडा ॥ झालों या ब्रह्मांडा भूमिभार ॥ १३ ॥ ऐसीं करुणेचीं उत्तरें ऐकोनि पंढरिरायें ॥ कटिवरुनि बाहे उभारिली ॥ १४ ॥ नाभी नाभी नामया भय न धरी सर्वथा ॥ माझ्या शरणांगता कोण गांजी ॥ १५ ॥

॥ ४६९ ॥ जो कां करी संतनिंदा ॥ त्यासि दंडावें गोविंदा ॥ १ ॥ करी संतासीं पाखंड ॥ त्याचें करावें त्रिखंड ॥ २ ॥ निंदक दंडावे दंडावे ॥ नेऊनि अंधारी कोंडावे ॥ ३ ॥ नामा म्हणे सांगेन एक ॥ निंदक श्वानाचे ते लेक ॥ ४ ॥

॥ ४७० ॥ ध्यान करूं पाहे तुझें हृदयकमळीं ॥ आळीलागी भृंगी करिसी झणीं ॥ १ ॥ निर्वासन चित्त भजन तुझें करितां ॥ झणीं सायु-

ज्यता देसी मज ॥ २ ॥ संकल्प तरी यावें वाटे चरणाजवळी ॥ विकल्प काजळीं न येउ देसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा कांहींच न करीं ॥ होत कल्पवरी गर्भवास ॥ ४ ॥

॥ ४७१ ॥ देवा माझें मन आणि तुझे चरण ॥ एकत्र करोन दिधली गांठी ॥ १ ॥ होणार तें हो गा सुखें पंढरीनाथा ॥ कासया शिणतां वांयाविण ॥ २ ॥ माझिया अदृष्टीं ऐसेंचि पैं आहे ॥ सेवावे तुझे पाय जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ असतां निरंतर येणें अनुसंधानें ॥ प्रारब्ध भोगणें गोड वाटे ॥ ४ ॥ हृदयीं तुझें रूप वदनीं तुझें नाम ॥ बुद्धि हे निष्काम धरिली देवा ॥ ५ ॥ नामा ह्मणे तुझीं पाउलें चिंतीतां ॥ झाली कृतकृत्यता जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

॥ ४७२ ॥ गाणीं मी गाईलों भाटीं वाखाणिलों ॥ जन्मोनियां झालों दास तुझा ॥ १ ॥ आतां माझी लाज राखे नारायणा ॥ ह्मणी केविलवाणा देशोदेशीं ॥ २ ॥ माय दुऱ्हाविलों मोहें मोकलिलों ॥ सोय पैं चुकलों संसाराची ॥ ३ ॥ विषया विटलों गोत्रजां तुटलों ॥ जन्मोनि पैं आलों तुझे पायीं ॥ ४ ॥ षड्वर्गीं सांडिलों प्रवृत्ती दंडिलों ॥ मीपणा मुकलों मायबापा ॥ ५ ॥ नामा ह्मणे तुझ्या चरणाची आवडी ॥ लागली न सोडी चित्त माझें ॥ ६ ॥

॥ ४७३ ॥ तूं माय माउली ह्मणोनि आस केली ॥ विठ्ठले पाहिली वाट तुझी ॥ १ ॥ मज कां मोकलिलें कवणा निरविलें ॥ कठीण कैसें झालें हृदय तुझें ॥ २ ॥ तुजविण जीवलग मज कोण होईल ॥ तो माझें जाणेल जड भारी ॥ ३ ॥ आह्मी अपराधी तुझे शरणांगत ॥ तुजविण माझें हित कोण करी ॥ ४ ॥ करुणा कल्लोळवाणी अमृतसंजीवनी ॥ चिंतिल्या निर्वाणीं पाव वेगें ॥ ५ ॥ नामा म्हणे तुजविण झालों परदेशी ॥ केव्हां सांभाळिसी अनाथनाथा ॥ ६ ॥

॥ ४७४ ॥ नको गा मोकलूं दीन पंढरिनाथा ॥ तुजविण आतां कोण धांवे ॥ १ ॥ अपराधाच्या कोटी पाहूं नको कांहीं ॥ येगे विठाबाई झडकरी ॥ २ ॥ माझ्या दोषासाठीं पाठमोरा होसी ॥ पावन ब्रीदासि लागे बोल ॥ ३ ॥ नामा म्हणे जननी तूंचि चराचर ॥ तारिले अपार जड जीव ॥ ४ ॥

॥ ४७५ ॥ तुझें रूप माझ्या दाखवीं मनातें ॥ मग तुझ्या चरणातें न विसंबें ॥ १ ॥ कां मज शिणविसी थोडिया कारणें ॥ काय तुझें उणें होईल देवा ॥ २ ॥ चातकाची तहान पुरवी जळधर ॥ काय त्याचें सरे थोरपण ॥ ३ ॥ चंद्र चकोराचा पुरवी सोहोळा ॥ काय त्याच्या कळा न्यून होतीं ॥ ४ ॥ कूर्मी अवलोकी आपुलिया बाळा ॥ काय तिच्या डोळां दृष्टिनासे ॥ ५ ॥ नामा म्हणे देवा तुझाचि भरंवसा ॥ अनाथां कुंवसा होसी तूंचि ॥ ६ ॥

॥ ४७६ ॥ जाणोनि नेणतें करीं माझें मन ॥ तुझी प्रेम खूण देऊनियां ॥ १ ॥ आइकोनि नायकें निंदा स्तुति दोन्ही ॥ जैसा का उन्मनि योगिराज ॥ २ ॥ मग मी वेव्हारीं असेन वर्तत ॥ जैसें त्या जळांत कमळपत्र ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा करिसी कवणें वेळे ॥ जीवनीं जीवन मिळे लवणकणु ॥ ४ ॥

॥ ४७७ ॥ बहु पुरें पाहिलीं बहु दुःखें साहिलीं ॥ बहुचिंता वाहिली दुर्धर हे ॥ १ ॥ बहु आसक्तता बहु बोलंगणा ॥ बहु विटंबना झाली माझी ॥ २ ॥ बहु काळ गेले अनुचित केलें ॥ परि नाहीं गाइलें नाम तुझें ॥ ३ ॥ बहु जन्माशेवटीं स्वामी तुझी भेटी ॥ बहुत हिंपुटी झालों देवा ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशवा एक उरली वासना ॥ घ्यावी नारायणा चरणसेवा ॥ ५ ॥

॥ ४७८ ॥ भेटीची आवडी उत्कंठित चित्त ॥ न राहे निवांत एके ठायीं ॥ १ ॥ जया देखे तया हेंचि पुसे मात ॥ कां मज पंढरिनाथ बोलाविना ॥ २ ॥ कृपेचा सागर विठोबा लोभापर ॥ माझा कां विसर पडिला त्यासी ॥ ३ ॥ माहेरीची आसें दसरा दिवाळी ॥ बाहे ठेवूनि निढळीं वाट पाहे ॥ ४ ॥ सखे वारकरी पंढरीस जाती ॥ निरोप त्या हातीं पाठवीन ॥ ५ ॥ निर्बुजला नामा कंठीं धरिला प्राण ॥ करी तुझें ध्यान रात्रंदिवस ॥ ६ ॥

॥ ४७९ ॥ तुझा विष्णुदास ह्मणताती जगीं ॥ नाहीं माझे अंगीं प्रेमभावो ॥ १ ॥ तेणें थोर लाज वाटे पंढरिराया ॥ ये माझ्या हृदया एक वेळा ॥ २ ॥ द्वैताद्वैतभाव आहे माझे ठायीं ॥ अनुभव नाहीं स्वरूपाचा ॥ ३ ॥ देखावेखीं बैसे संतांचे संगती ॥ नाहीं माझे चित्तीं ध्यान तुझें

॥ ४ ॥ नामा ह्मणे माझा उजळ करी माथा ॥ भेटी देउनि संतां निरवी मज ॥ ५ ॥

॥ ४८० ॥ शंख चक्र गदा पद्मेंसि अंकित ॥ मी तुह्मां सांगात निरंतर ॥ १ ॥ जिकडे जाल तिकडे मी तुमचा सांगाति ॥ तुह्माविण संपत्ति आणिक नाहीं ॥ २ ॥ संसाराचें ओझें पडो नेदी कोणातें ॥ या वैष्णवा सांगातें निरंतर ॥ ३ ॥ जें मज आवडे तें तुमचिये घरीं ॥ ह्मणोनि तुमचे द्वारीं तिष्ठतसें ॥ ४ ॥ विठोबा ह्मणे नामा नविसंबे मातें ॥ हेंचि वर्म तूतें सांगितलें ॥ ५ ॥

॥ ४८१ ॥ जननिये जिवलगे ये वो पांडुरंगे ॥ शिणलों भेटि देगे एक वेळां ॥ १ ॥ त्राहे त्राहे त्राहे कृपादृष्टी पाहे ॥ येऊनिया राहे हृदयामाजी ॥ २ ॥ वासनेच्या संगें शिणलें माझें चित्त ॥ विषयाचे आघात पडती वरी ॥ ३ ॥ नाहीं तुझी सेवा केली मनोधर्में ॥ संसार संभ्रमें भ्रांत सदां ॥ ४ ॥ नाहीं तुझें नाम गाइलें आवडी ॥ वाळली कुर्वंडी त्रिविधतापें ॥ ५ ॥ नामा ह्मणे आई धांवें लवलाहीं ॥ बुडतों चिंताडोहीं काढी मज ॥ ६ ॥

॥ ४८२ ॥ संसारपडचक्रीं पडिलों महाडोहीं ॥ सोडवण्या येई पांडुरंगा ॥ १ ॥ दवडादवडी धांव दवडा दवडी धांव ॥ नको भक्तिभाव पाहो माझा ॥ २ ॥ माझी चित्तवृत्ति अज्ञान हे गाई ॥ व्याघ्रें धरिली आहे अहंकारें ॥ ३ ॥ पंचाननीं मज घेतलें वेढोनि ॥ नेताति काढोनि प्राण माझा ॥ ४ ॥ गजेंद्राकारणें घातली तुवां उडी ॥ तैसा लवडसवडीं पावे मज ॥ ५ ॥ नामा ह्मणे मज तुझाचि आधार ॥ पोसणा डिंगर जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

॥ ४८३ ॥ क्रिया कर्म धर्म तूंचि होसी माझें ॥ राखण मी तुझें द्वार देवा ॥ १ ॥ मज पाळिसी तैसें पाळी दीनानाथा ॥ न सोडीं सर्वथा नाम तुझें ॥ २ ॥ गाईन तुझें नाम हृदयीं धरोनि प्रेम ॥ हाचि नित्य धर्म सर्व माझा ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठो कृपेच्या सागरा ॥ तूं आह्मां सोइरा आदिअंतीं ॥ ४ ॥

॥ ४८४ ॥ अमृताहूनि गोड नाम तुझें देवा ॥ मन माझें केशवा कां वा नेघे ॥ १ ॥ सांग पंढरिराया काय करूं यासी ॥ कां रूप ध्यानासि नये तुझें ॥ २ ॥ कीर्तनीं बैसतां निद्रे नागविलें ॥ मन माझें गुंतलें विषय-

सुखा ॥ ३ ॥ हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति ॥ नये माझ्या चित्तीं नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४८५ ॥ जाणीव शाहणीव वाहियलें ओझें ॥ तेणें चरण तुझे अंतरले ॥ १ ॥ आतां नेणतेंचि करी मज हरी ॥ लौकिका बाहेरि घाली मज ॥ २ ॥ तुझिया नामाचें लागोंदे गा पिसें ॥ देहीं देह न दिसे ऐसें करी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुज एकातें मी जाणें ॥ रहित कारण कल्पनेसी ॥ ४ ॥

॥ ४८६ ॥ विठ्ठल विग्ददे पुंडलीकवरदे ॥ अनंत अभेदें रूपें तुझीं ॥ १ ॥ येईगे विठ्ठलें मजलागि झडकरी ॥ बुडतों भवसागरीं काढीं मज ॥ २ ॥ आकांता अवसरीं स्मरिलें गजेंद्रें ॥ दीनानाथ ब्रीदें सत्य केलीं ॥ ३ ॥ स्मरली संकटी द्रौपदी वनवासी ॥ धांवोनि आलासि लवलाहीं ॥ ४ ॥ प्रल्हादें तुजलागी स्मरिलें निर्वाणीं ॥ संकटापासोनि राखियलें ॥ ५ ॥ नामा ह्मणे थोर पीडिलों गर्भवासें ॥ अखंड पाहतसें वास तुझा ॥ ६ ॥

॥ ४८७ ॥ नलगे तुझी मुक्ति नलगे तुझी भक्ति ॥ मज आहे विश्रांति वेगळीच ॥ १ ॥ माझें मज कळलें माझें मज कळलें ॥ माझें मज कळलें प्रेमसुख ॥ २ ॥ न करीं तुझें ध्यान नलगे ब्रह्मज्ञान ॥ माझी आहे खूण वेगळीच ॥ ३ ॥ न करीं तुझी स्तुति न वाखाणी कीर्ति ॥ धरिलीसे ते युक्ति वेगळीच ॥ ४ ॥ न करीं काया क्लेश इंद्रियां निरोध ॥ माझा आहे बोध वेगळाचि ॥ ५ ॥ नामा ह्मणे नाम गाईन निर्विकल्प ॥ येसि आपोआप गवसीत ॥ ६ ॥

॥ ४८८ ॥ तुझे चरण देखोनि हरली भवव्यथा ॥ पुढती एक चिंता वाटे थोर ॥ १ ॥ झणी मज मुक्ति देसी पांडुरंगा ॥ मग मी संतसंगा केंवि मिळे ॥ २ ॥ पंढरीचा आनंद हा सुखसोहोळा ॥ कवणाचिया डोळां पाहूं जाऊं ॥ ३ ॥ तुझ्या कथा मज अमृत संजीवनी ॥ कवणाच्या श्रवणीं ऐकों जावों ॥ ४॥ ह्मणोनि माझ्या जीवा वाटे जड भारी ॥ उदास मुरारी करिसी झणीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे मज तुझी चरणसेवा ॥ जन्मोजन्मीं देवा द्यावी मज ॥ ६ ॥

॥ ४८९ ॥ तुझे पायीं माझ्या मनें दिल्ही बुडी ॥ इंद्रियें बापुडीं

वेडावलीं ॥ १ ॥ इंद्रियें विषय जाणावे कवणे ॥ जाणोनि भोगणें कवणें स्वामी ॥ २ ॥ देह सहजस्थिती पाहिलें निष्काम ॥ हृदयीं सप्रेम वोसंडत ॥ ३ ॥ नामा ह्मणे भक्तजनवत्सला ॥ क्षण जीवावेगळा न करी मज ॥ ४ ॥

॥ ४९० ॥ तुझे चरणीं सुख अनुपम आहे ॥ तें तूं जाणसी काय केशिराजा ॥ १ ॥ आह्मां व्हावें तेंचि एकांते मागावें ॥ नकळे जीवेंभावें ब्रह्मादिकां ॥ २ ॥ चतुरा शिरोमणी आमुची जननी ॥ जाणते रुक्मिणी चरणमहिमा ॥ ३ ॥ चरणींचा प्रताप जाणें गौतमवधु ॥ जे कां श्रापें बद्धमुक्तशिळा ॥ ४ ॥ चरणींचा प्रवाह जाणती वैष्णव ॥ नलकुबर मणिग्रीव सखे माझे ॥ ५ ॥ नामा ह्मणे तुझी चरणींची त्रिपथा ॥ भूषण उमाकांता ऐसें झालें ॥ ६ ॥

॥ ४९१ ॥ मुक्ति पद मी गा अभिलाषीं न चित्तीं ॥ झणीं अंतरती पाय तुझे ॥ १ ॥ निर्वासना चित्तें भजन तुझें करितां ॥ झणी सायुज्यता देसी मज ॥ २ ॥ मग मी काय करूं वैकुंठनायका ॥ ऐशा प्रेमसुखा कोठें पाहों ॥ ३ ॥ ध्यान सुखें करूं पाहे हृदयकमळीं ॥ पक्षिणी ऐसी आळी करिशी झणीं ॥ ४ ॥ संकल्पें यावें वाटे चरणा जवळी ॥ विकल्प काजळीं झणीं देशी ॥ ५ ॥ नामा म्हणे आतां कांहींच मी नकरीं ॥ मज होत कोटीवरी गर्भवास ॥ ६ ॥

॥ ४९२ ॥ माझे गुण दोष जरी विचारिसी ॥ केवळ पापराशि आहें देवा ॥ १ ॥ अंगुष्ठ धरोनि मस्तक पर्यंत ॥ अखंड दुश्चित आचरलों ॥ २ ॥ स्वप्नामाजीं ही तुझी घडली नाहीं भक्ति ॥ पुससी विरक्ति कोठोनियां ॥ ३ ॥ तूंचि माझा गुरु तूंचि माझा स्वामी ॥ सकळ अंतर्यामीं गातों तुज ॥ ४ ॥ नामा म्हणे माझें निवारी जन्ममरण ॥ न करी मज शीण पंढरिनाथा ॥ ५ ॥

॥ ४९३ ॥ बाहेरींभीतरीं तुजचि मी देखें ॥ चित्त तेणें सुखें वेडावलें ॥ १ ॥ संतसंगें मज पालट हा झाला ॥ पाहतां विठ्ठला रूप तुझें ॥ २ ॥ मीपणासहित आनंदी बुडालें ॥ न निघे कांहीं केलें चित्त माझें ॥ ३ ॥ नामा म्हणे एक उरलीसे वासना ॥ स्वामिसेवकपणा देईं देवा ॥ ४ ॥

॥ ४९४ ॥ कलियुगीं जन मूर्ख शुन्य वृत्ति ॥ तारिसी श्रीपति नाम घेतां ॥ १ ॥ परमपावना पवित्रा निर्मळा ॥ भक्ताचा सांभाळ करीं देवा ॥ २ ॥

देवा तूं दयाळ जिवलग मूर्ति ॥ पुराणें गर्जती वेदशास्त्रें ॥ ३ ॥ नामा म्हणे आतां नको भागाभाग ॥ सखा पांडुरंग स्वामि माझा ॥ ४ ॥

॥ ४९५ ॥ आस धरोनि पोटीं दिवस लेखी बोटीं ॥ प्राण ठेवुनि कंठीं वाट पाहे ॥ १ ॥ भेटसी केधवां माझ्या जीवलगा ॥ येई पांडुरंगा मायबापा ॥ २ ॥ चित्त निरंतर तुझ्या महाद्वारीं ॥ अखंड पंढरी हृदयीं वसे ॥ ३ ॥ श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं ॥ तेथें माझी दृष्टि बैसलीसे ॥ ४ ॥ कटीं कर वीटे समचरण साजिरे ॥ देखावया झुरे मन माझें ॥ ५ ॥ असुखें दाटलीं नेत्रपातें वाहे ॥ नामा वाट पाहे रात्रंदिवस ॥ ५ ॥

॥ ४९६ ॥ जीवलग कोण तुजविण होईल ॥ जें माझें जाणेल जडभारी ॥ १ ॥ अन्यायी अपराधी तुझा शरणांगत ॥ तुजवीण हीत कोण करी ॥ ॥ २ ॥ नामा ह्मणे आई धांवे लवलाही ॥ बुडतो या डोहीं दंभाचिया ॥ ३ ॥

॥ ४९७ ॥ निंदा आणि स्तुति तुझीच करणें ॥ आणिकांचे कां घेणें गुणदोष ॥ १ ॥ आतां माझें चित्त असो तुझे चरणीं ॥ अगा चक्रपाणी पांडुरंगा ॥ २ ॥ वैर अथवा सख्य करणें तुझे ठायीं ॥ न पडो हृदयीं विसर तुझा ॥ ३ ॥ दास्यत्व करावें गोपाळांचे परी ॥ असो तुजवरी सर्व लोभ ॥ ४ ॥ जीवणें अथवा मरणें तुमचिये द्वारीं ॥ उदास नरहरी ह्मणी करिसी ॥ ५ ॥ नामा म्हणे थोर शिणलों पंढरिनाथा ॥ स्वामी तुझें नेणतां प्रेमसुख ॥ ६ ॥

॥ ४९८ ॥ मन माझें आंधळें कपटाचें कवाड ॥ भक्ता केंवि उघडे ज्ञानेंविण ॥ १ ॥ काय करूं देवा माझिया मी दैवा ॥ अभक्तांसि भाव केंवि होय ॥ २ ॥ हें माझें ह्मणती कुबुद्धि लेंकुर ॥ मागें काळ वैर पाहतसे ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवा सांडी दूजा भाव ॥ तुझे पायीं ठाव देई देवा ॥ ४ ॥

॥ ४९९ ॥ लाज सांडोनियां झालों शरणागत ॥ ऐसियाचा अंत पाहसी ह्मणीं ॥ १ ॥ गुण दोष माझे मनीं गा न धरीं ॥ पतीतपावन जरी म्हणविसी ॥ २ ॥ पडलिया पाथरा लाथ देसी देवा ॥ हे लाज केशवा कोणास जी ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा चतुरा शिरोमणी ॥ विचारावें मनीं मायबापा ॥ ४ ॥

॥ ५०० ॥ मज गांजिल्याचा धांवा ॥ सावधान परिसावा ॥ १ ॥ विठो सुजाणाच्या राया ॥ धांव माझ्या करुणालय ॥ २ ॥ मोहोपाशीं मज

बांधिलें ॥ थोर वैर त्वां साधिलें ॥ ३ ॥ माझें मन हें पामर ॥ भ्रांत हिंडे दारोदार ॥ ४ ॥ नामा ह्मणे काय करूं ॥ तुजविण भूमिभारू ॥ ५ ॥

॥ ५०१ ॥ बहुत दिवस तुमचे गांवीं ॥ आतां कृपा असो द्यावी ॥ १ ॥ आह्मीं जातों आपुल्या गांवा ॥ विठोबा लोभ असो द्यावा ॥ २ ॥ तुझे पायीं माझें मन ॥ माझे ठायीं तुझा प्राण ॥ ३ ॥ लिखित पत्र पाठवावें ॥ माझें स्मरण असो द्यावें ॥ ४ ॥ नामा म्हणे जी केशवा ॥ अखंड प्रेमभाव द्यावा ॥ ५ ॥

॥ ५०२ ॥ वाढवेळ कां लाविला ॥ कोण्या भक्तानें गोंविला ॥ १ ॥ झडकर ये बा विठ्ठला ॥ कंठ आळवितां शोकला ॥ २ ॥ वाट पाहें दाही दिशा ॥ जिवीं धरोनि भरंवसा ॥ ३ ॥ प्राण केव्हां येइल माझा ॥ आलिंगीन चतुर्भुजा ॥ ४ ॥ नामा गहिंवरें दाटला ॥ देह धरणिये लोटला ॥ ५ ॥

॥ ५०३ ॥ मन माझें चोरटें लागलें कुसंगीं ॥ बांधिलें षड्वर्गीं धरोनि त्यातें ॥ १ ॥ केउता गेलासि माझ्या कृपावंता ॥ ये गा पंढरिनाथा मायबापा ॥ २ ॥ वासनेची बेडी घालोनि माझे पायीं ॥ विषयवज्रघायीं ताडितोसी ॥ ३ ॥ आशा तृष्णा माया आणि ते कल्पना ॥ करिताति कामना नानाविध ॥ ४ ॥ कामक्रोध दंभ लाविताती कळा ॥ ये माझ्या गोपाळा सोडवणें ॥ ५ ॥ नामा म्हणे माझें घेऊनि चित्तवित्त ॥ करी बंधनमुक्त संसारीचें ॥ ६ ॥

॥ ५०४ ॥ नापिकाचेपरी वरी वरी बोडी ॥ परि अंतरींची वाढी उणी नव्हे ॥ १ ॥ तैसें माझें मन न राहे समूळीं ॥ प्रपंच कवळी दाही दिशा ॥ २ ॥ भक्ति प्रेमभाव वरी वरी दावी ॥ अंतरीं आठवी घराचार ॥ ३ ॥ ऐसा लटिका जाण असे परोपरी ॥ तारी भवसागरीं म्हणे नामा ॥ ४ ॥

॥ ५०५ ॥ लटिकें तरी गायें तुझेंचि हें नाम ॥ लटिकें तरी प्रेम तुझेंचि आणि ॥ १ ॥ सहजेंचि लटिकें असे माझें ठायीं ॥ तुझिया पालट नाहीं साचपणा ॥ २ ॥ लटिकें तरी हरी करीं तुझें ध्यान ॥ लटिकें माझें मन तुजचि चिंती ॥ ३ ॥ लटिका तरी ह्मणवी तुझाच मी दास ॥ परि नामीं विश्वास सत्य आहे ॥ ४ ॥ लटिका तरी बैसे संताचे संगतीं ॥ परि आहे माझे चित्तीं ध्यान तुझें ॥ ५ ॥ ऐसें लटिकें माझें मन सफळ करी देवा ॥ नामा म्हणे केशवा विनवित आहें ॥ ६ ॥

॥ ५०६ ॥ आधीं मी लटिका वरी लटिकी तुझी माया ॥ भजन ऐसिया पाहसी काय ॥ १ ॥ जाणतां नेणतां नाम तुझें देवा ॥ गाईन केशवा तारी मज ॥ २ ॥ विषयीं असक्त भ्रांत माझें मन ॥ कैसें तुझें ध्यान घडेल यासी ॥ ३ ॥ नामा म्हणे आतां जाणसी तें करी ॥ पतीत पावन हरि नाम तुझें ॥ ४ ॥

॥ ५०७ ॥ लटिका मी गाणु लटिका मी नाचणु ॥ संतांसि देखोनु लोचन लावी ॥ १ ॥ लटिका माझा भाव लटिकी माझी भक्ति ॥ तूं तंव श्रीपती कृपासिंधु ॥ २ ॥ लटिकी माझी क्रिया लटिकें माझें कर्म ॥ परि हें तुझें नाम गातु असें ॥ ३ ॥ लटिकें माझें ध्यान लटिकें माझें ज्ञान ॥ तूं तंव सहजगुण सत्स्वरूप ॥ ४ ॥ लटिकी माझी पूजा लटिकें माझें पूजन ॥ लटिकें माझें भजन भावहीन ॥ ५ ॥ लटिकें वत्समेत धेनु हे स्वीकारी ॥ तैसें मज करी ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ ५०८ ॥ लोभियाचे घरीं लटिकेचि उपवास ॥ मरे न हृषीकेशा ह्मणती जगीं ॥ १ ॥ तूं तव भावाचा अंकुर जी देवा ॥ लटिका मी पहावा दास तुझा ॥ २ ॥ लटकी पक्षियातें बोभाये कुंटणी ॥ ते त्वां माझी ह्मणोनि अंगिकारिली ॥ ३ ॥ लटिका अजामेळ पुत्राचेनि मोहें ॥ सोडविला पाहे कैसा तूवां ॥ ४ ॥ या अवघ्यांहूनि मी लटिका सहगुणें ॥ तारूनि कीर्ति करणें म्हणे नामा ॥ ५ ॥

॥ ५०९ ॥ उलिसा प्रपंच परि हा लटिका ॥ तेणें तुज व्यापका झांकियलें ॥ १ ॥ तैसियाच्या मज घालोनिया खेवा ॥ स्वामिद्रोहि देवा करिसी कैसा ॥ २ ॥ मेरूचिया गळां बांधोनि मशक ॥ पाहसी कवतुक अनाथनाथा ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा कळली तुझी माव ॥ माझा मी उपाव करीन आतां ॥ ४ ॥

॥ ५१० ॥ आह्मीं शरणांगतीं केलासे सरता ॥ येऱ्हवीं अनंता कोण जाणे ॥ १ ॥ वेदशास्त्र पुराणीं उबगोनि सांडिलासी ॥ तो आह्मीं धरिलासे हृदयकमळीं ॥ २ ॥ चतुरा शिरोमणी अहो केशिराजा ॥ अंगीकार तुझा केला आह्मीं ॥ ३ ॥ सहस्रैक नामें झालासि संपन्न ॥ तरी हेंहि भूषण आमुचेंनचि ॥ ४ ॥ येऱ्हवीं या नामांची कोण जाणे सीमा ॥ पाहे मेघःश्यामा विचारोनी ॥ ५ ॥ होतासि क्षीरसागरीं अनाथाचे परी ॥ लक्ष्मी

तेथें करी चरणसेवा ॥ ६ ॥ तेहि तंव जाण आमुची जननी ॥ तूं तिये-वांचोनि शोभसी कैसा ॥ ७ ॥ तुज नाहीं नाम रूप जाति कुळ ॥ अनादीचें मूळ ह्मणती तूज ॥ ८ ॥ आह्मी भक्त तरी तूं भक्तवत्सल ॥ ऐसा प्रगट बोल जगामाजी ॥ ९ ॥ ऐसी आमुचेनि भोगिसी थोरीव ॥ आमुचा जीव भाव तुझ्या पायीं ॥ १० ॥ नामा ह्मणे केशवा जरी होसी जाणता ॥ तरी या बोला उचिता प्रेम देई ॥ ११ ॥



॥ ५११ ॥ विषयीं आसक्त झालें माझें मन ॥ न करी तुझें ध्यान पंढरिराया ॥ १ ॥ नाथिले संकल्प करी नानाविध ॥ तेणें थोर खेद पाव-तसें ॥ २ ॥ ऐसा मी अपराधि दुराचारि देवा ॥ भेटसी केशवा कवणे परी ॥ ३ ॥ आयुष्य सरो परी न सरे कल्पना ॥ भोगवी यातना नानावीध ॥ ४ ॥ जन्ममरण कष्ट भोगितां संकटीं ॥ होतसे हिंपुटी येरझारीं ॥ ५ ॥ माया मोहो रत भ्रांत माझें चित्त ॥ चुकलों निजहित नारायणा ॥ ६ ॥ तूं अनाथ कैवारि ह्मणोनि धांवा करी ॥ सोडवी मुरारी ह्मणे नामा ॥ ७ ॥

॥ ५१२ ॥ जीवन्मुक्त केले नामाचे गजरीं ॥ सेवक अधिकारी विठो-बाचे ॥ १ ॥ कांहीं उतराई होऊं तुज देवा ॥ उदारा केशवा मायबापा ॥ २ ॥ अंतरीं देऊनि प्रेमाचा जिव्हाळा ॥ मुक्तीचा सोहोळा भोगविसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मा दीनांचें माहेर ॥ हृदयीं निरंतर ध्यान करूं ॥ ४ ॥

॥ ५१३ ॥ माझे मनीं ऐसें होतसे गा देवा ॥ देह समर्पावा तुझे पायीं ॥ १ ॥ तंव या मायामोहें मजसी केला हेवा ॥ लोटियेलें देवा भवजळांमाजीं ॥ २ ॥ आशा नदी पूरीं वाहविलें दूरीं ॥ काढी मज हरी कृपाळुवा ॥ ३ ॥ सरिता माजीं धरिलों मदन मगरीं ॥ पुढारीं माघारीं होऊं नेदी ॥ ४ ॥ ननिघें न निघें न निघें आणिका पोहणारें ॥ सहित पितांबरें घाली उडी ॥ ५ ॥ धडीये उभया धांवगा श्रीहरी ॥ हानि झाली थोरी सर्व गेलें ॥ ६ ॥ भक्ती नवरत्नाची बुडाली वाखोरी ॥ काढी वेगीं हरी कृपाळुवा ॥ ७ ॥ धिर आणि विचार या दोन्ही सांगडी ॥ श्रद्धा पुढें दोरी तुटोनी गेली ॥ ८ ॥ भावबळें सांपडलों दाटलों उभडी ॥ वेगी घाली उडी कृपाळुवा ॥ ९ ॥ नामा ह्मणे भजनेंविण कोरडा गळा ॥ नेतो रसातळा क्रोध मीन ॥ १० ॥

॥ ५१४ ॥ असोनि न दिसे लौकिक वेव्हारीं ॥ ऐसें निरंतरीं लपवी मातें ॥ १ ॥ तुझे स्वरूपीं माझें असो अनुसंधान ॥ वरी प्रेमजीवन देई देवा

॥ २ ॥ मनाचिये वृत्ति अंतरापासूनि ॥ झोंबों नेदी दोन्ही काम क्रोध ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें पाळिशील मातें ॥ तरी मी जीवें तूतें न विसंबे ॥ ४ ॥

॥ ५१५ ॥ आपुलें रूपीं मज लपवी निरंतर ॥ सबाह्यभीतर आड राखीं ॥ १ ॥ परि तुज मज असावा संवादु ॥ भ्रांति माया बाधु काय करी ॥ २ ॥ काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर ॥ हे वैरी अपार मारी माझे ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मीं जन्मजन्मांतरींचे ॥ पोसणे घरींचे दास तुझे ॥ ४ ॥

॥ ५१६ ॥ देवा माझें मन करोनि स्वाधीन ॥ निर्मोळी स्वामिपण भोगिसीना ॥ १ ॥ फुकाचा कांपारा बोळंगे निरंतर ॥ न घालीं तुज भार कल्पनेचा ॥ २ ॥ तुज नलगे देणें मज नाहीं मागणें ॥ असेन अनुसंधानें चरणाचेनि ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा तूं सर्वज्ञ जाणता ॥ समर्थीच्या उचिता चुकों नको ॥ ४ ॥

॥ ५१७ ॥ अज्ञान बाळक कोमाइलें जनीं ॥ जाणते जननी तान भूक ॥ १ ॥ तैसें मजलागिं होऊनि कृपाळ ॥ करी गा सांभाळ अनाथाचा ॥ २ ॥ वत्सालागि धेनु येतसे वोरसें ॥ पान्हा स्तनीं जैसें वोसंडती ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुज हे न साहे उपमा ॥ मी कुडी तूं आत्मा केशवराजा ॥ ४ ॥

॥ ५१८ ॥ छंदाधिस्थ हें मन माझें पंढरीनाथा ॥ न सोडी सर्वथा पाय तुझे ॥ १ ॥ यासि काय करूं सांगा जी विठ्ठला ॥ स्नेह कां लाविला पूर्वींहूनि ॥ २ ॥ कांसवीचीं पिलीं राहोनि निराळीं ॥ दृष्टि पान्हावली अमृतमय ॥ ३ ॥ तैसा मी जवळूनि असेन हो दूरी ॥ दृष्टि मजवरी असो द्यावी ॥ ४ ॥ तान्हें वत्स घरीं वनीं धेनु चरे ॥ परतोनि हंबरे क्षणक्षणा ॥ ५ ॥ नामा म्हणे सलगी करी न निकट ॥ ह्मणें मज वैकुंठपद देसी ॥ ६ ॥

॥ ५१९ ॥ असे सदा माझें मन पंढरिनाथा ॥ न सोडी सर्वथा चरण तुझे ॥ १ ॥ यासि काय करूं सांगा जी गोपाळा ॥ कां स्नेह लाविला पूर्वींहूनि ॥ २ ॥ हृदयींची वृत्ति मनेंसि मिळोनि ॥ अवघी तुझे चरणीं सुरवाडली ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा धरिली तुझी सेवा ॥ सुख अनुभवा आलें मज ॥ ४ ॥

॥ ५२० ॥ तुझ्या चरणीं माझ्या मनें दिल्ही बुडी ॥ इंद्रियें बापुडीं वेडावलीं ॥ १ ॥ आतां विषयसुख जाणावें कवणें ॥ जाणोनि भोगणें

कवणें स्वामी ॥ २ ॥ देह सहज स्थिति राहिला निष्काम ॥ हृदयीं सदा प्रेम वोसंडत ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा भक्तजनवत्सला ॥ क्षण जीवा वेगळा न करी तुज ॥ ४ ॥

॥ ५२१ ॥ येई गे विठ्ठले अनाथाचे नाथे ॥ माझे कुळदैवते पंढरीचे ॥ १ ॥ पंचही प्राणांचा उजळोनि दीप ॥ सुंदर श्रीमुख ओंवाळीन ॥ २ ॥ मनाचा प्रसाद तुजलागिं केला ॥ रंगभोग आपुला घेऊनि राहे ॥ ३ ॥ आनंदाचा भोग घालीन आसनीं ॥ वैकुंठवासिनी तुझ्या नांवें ॥ ४ ॥ आपुलें ह्मणवावें सनाथ करावें ॥ भावें संचरावें हृदयघटीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे माझे पुरवी मनोरथ ॥ देई सदोदित प्रेमकळा ॥ ६ ॥

॥ ५२२ ॥ कां गा मोकलीलें माझिया विठ्ठला ॥ धांवा तुझा केला मायबापा ॥ १ ॥ त्रितापें तापलों बहु गा पोळलों ॥ चिखलीं पडिलों दीनानाथा ॥ २ ॥ यालागिं तुजला भाकितों करुणा ॥ धांवसी निर्वाणा पांडुरंगा ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा अनाथाच्या नाथा ॥ रुक्मिणीच्या कांता घाली उडी ॥ ४ ॥

॥ ५२३ ॥ ह्मणी दृष्टि लागे तुझ्या सगुणपणा ॥ जेणें माझ्या मना बोध केला ॥ १ ॥ अनंता जन्मींचें विसरलों दुःख ॥ पाहतां तुझें मुख पांडुरंगा ॥ २ ॥ योगियांच्या ध्यानीं ध्यातां नातुडसी ॥ तो तूं आह्मांपाशीं मागें पुढें ॥ ३ ॥ नामा ह्मणे जीवें करीन निंबलोण ॥ वीटेसहित चरण वोंवाळीन ॥ ४ ॥

॥ ५२४ ॥ आतां होणार तें हो कां पंढरिनाथा ॥ न सोडीं सर्वथा पाय तुझे ॥ १ ॥ हृदयीं तुझें ध्यान मुखीं जपें नाम ॥ हाचि नित्यनेम सर्व माझा ॥ २ ॥ आह्मीं तुझी देवा धरियेली कास ॥ न करी उदास पांडुरंगा ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा भक्तजनवत्सला ॥ क्षण जीवा वेगळा न करी मज ॥ ४ ॥

॥ ५२५ ॥ उडाली पक्षिणी गेली अंतराळीं ॥ चित्त बाळाजवळी ठेवूनियां ॥ १ ॥ तैसें माझें मन राहो कां ईश्वरीं ॥ मग सुखें संसारीं असेन कां ॥ २ ॥ धेनु चरे वनीं वत्स असे घरीं ॥ चित्त वत्सावरी ठेवूनि फिरे ॥ ३ ॥ दुडीवरी दुडी सखिसीं गोष्टि करी ॥ चित्त दुडीवरी ठेवूनियां ॥ ४ ॥ विष्णुदास नामा विनवी परोपरी ॥ हें प्रेम श्रीहरी द्यावें मज ॥ ५ ॥

॥ ५२६ ॥ जन्म हो कां भलते याती ॥ परि मज घडो हरिभक्ति ॥ १ ॥ हेंचि देवा मागत ॥ चरण सेवा अखंडित ॥ २ ॥ वास द्यावा पंढरीचा ॥ सदां संग हरिदासांचा ॥ ३ ॥ नामा विनवी पुढतो पुढती ॥ हेंचि दे गा कमळापती ॥ ४ ॥

॥ ५२७ ॥ कां हो मोकळिलें कवणा निरविलें ॥ कठीण कैसें झालें चित्त तुझें ॥ १ ॥ करुणाकल्लोळणी अमृत संजीवनी ॥ चिंतिल्या निर्वाणीं पावे वेगीं ॥ २ ॥ अपराधी अनाथ जरी झालें अमंगळ ॥ करावा सांभाळ लागे साचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठ्ठले आलों मी तुजपाशी ॥ केशवा भेटसी अनाथनाथा ॥ ४ ॥

॥ ५२८ ॥ भुक्ति मुक्ति मागों तुज ॥ माझे हांसती पूर्वज ॥ १ ॥ मज प्रेम पढियें देवा ॥ न मागें आन कांहीं केशवा ॥ २ ॥ चाड धरीन ब्रह्मज्ञानीं ॥ तरी मज व्यर्थ व्याली जननी ॥ ३ ॥ मोक्ष मागूं तुजप्रति ॥ संत छळवादे हांसती ॥ ४ ॥ होउं सिद्धीचा साधिता ॥ दैवें सांडीलें सर्वथा ॥ ५ ॥ नामा ह्मणे तूं जाणसी ॥ माझा भाव हृषीकेशी ॥ ६ ॥

॥ ५२९ ॥ होईन संतांचा वोळांगणा ॥ दास डिंगरपोसणा ॥ १ ॥ प्रेम द्यावें नारायणा ॥ भूतदया परिपूर्णा ॥ २ ॥ संतचरणींचे रज ॥ हेंचि सर्व तीर्थ मज ॥ ३ ॥ सेवीन संतउष्टावळी ॥ तेणें पवित्र माझी कुळी ॥४॥ राखेन संतांचें मी द्वार ॥ तें मज वैकुंठाहूनि थोर ॥ ५ ॥ नामा म्हणे पंढरीनाथा ॥ न मागें आन कांहीं सर्वथा ॥ ६ ॥

॥ ५३० ॥ मनुष्य करिसी तरी भक्तीचेनि मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ १ ॥ श्वान करिसी तरी उच्छिष्टाचेनि मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ २ ॥ पक्षि करिसी तरी चारियाचेनि मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ३ ॥ झाड करिसी तरी तुळसीचेनि मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ४ ॥ वृक्ष करिसी तरी मंडपमेखाचेनि मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ५ ॥ पाषाण करिसी तरी रंग शिळेचेनि मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ६ ॥ उदक करिसी तरी सडियाचेनि मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ७ ॥ नामा ह्मणे विठो कीर्तनाचेनि मिषें ॥ तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ८ ॥

॥ ५३१ ॥ अठ्ठावीस युगें उभा विटेवरी ॥ मुद्रा अगोचरी लावूनियां ॥ १ ॥ ध्यान विसर्जन केधवां करिसी ॥ नेणवे कवणासि ब्रह्मादिकां ॥ २ ॥ पाहतां तुजकडे माझें मीपण उडे ॥ भेदाचें सांकडें हारपलें ॥ ३ ॥ तुजपासीं असतां मुकिजे जीवित्वा ॥ ठकले तत्वतां नेणों किती ॥ ४ ॥ नामा ह्मणे स्वामी कृपादृष्टी पाहें ॥ मन पायीं राहे ऐसें कीजे ॥ ५ ॥

॥ ५३२ ॥ जरी हें आकाश पडों पाहे ॥ ब्रह्मांडगोल भंगा जाये ॥ १ ॥ वडवानळ त्रिभुवन खाये ॥ तरी मी तुझीच वास पाहे गा विठोबा ॥ २ ॥ नको आणिकाचा पांगिला ॥ नामधारक तुझाचि आथिला ॥ ३ ॥ सप्तसागर एकवट होती ॥ तयीं हे विरोनि जाय क्षिति ॥ ४ ॥ पंच महाभूतें प्रळय पावती ॥ तरी मी तुझाचि सांगाति गा विठोबा ॥ ५ ॥ भलतेसें जड पडो भारी ॥ नाम नसंडी निर्धारीं ॥ ६ ॥ जैसी पतिव्रता प्राणेश्वरी ॥ नामा अधिकारी पंढरीचा ॥ ७ ॥

॥ ५३३ ॥ अनाथासि साह्य होसी नारायणा ॥ करूणावचना बोलविसी ॥ १ ॥ पांडुरंगा कृपा करा मजवरी ॥ पामरा उद्धरी पाहतांची ॥ २ ॥ गणिके सत्वर मोक्षपद देसी ॥ उपमन्यु बाळासी क्षीरसिंधु ॥ ३ ॥ नामा म्हणे काय याति न विचारी ॥ विदुराचे घरीं खासी कण्या ॥ ४ ॥

॥ ५३४ ॥ गुण दोष माझे पाहों नको आतां ॥ तारिसी अनंता मज आतां ॥ १ ॥ अगाध महीमा काय वाणूं हरी ॥ गोकुळा भीतरी गाई राखी ॥ २ ॥ अंबऋषीसाठीं जन्म सोशियले ॥ महत्वाचे केले हूड स्वयें ॥ ३ ॥ नामा म्हणे तुझे नामाचेनि बळ ॥ प्रसादें केवळ लाधलों मी ॥ ४ ॥

॥ ५३५ ॥ मी तो तुझा दास नकरीं उदास ॥ मायामोहपाश तोडी देवा ॥ १ ॥ प्राण जावो परि नको करूं त्याग ॥ करी अंगसंग अंगीकार ॥ २ ॥ अंगीकारीं आतां अजामेळ अंतीं ॥ समान श्रीपती सम करी ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें वर्णावें म्यां किती ॥ नामें केली ख्याति चराचरीं ॥ ४ ॥

॥ ५३६ ॥ जन्मल्या पासूनि सोशिले प्रवास ॥ वियोग पहायास झाले आतां ॥ १ ॥ आतां एक करी धावणिया धावा ॥ बुडतों केशवा काढी मज ॥ २ ॥ लाभ नव्हे हानी झाली भागाभाग ॥ तूंचि पांडुरंग पुरविसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें सर्वस्वें रक्षिलें ॥ पाषाण तारिले जळामाजीं ॥ ४ ॥

॥ ५३७ ॥ देहअभिमानें पुरविली पाठी ॥ कांहो जगजेठी नये कृपा ॥ १ ॥ स्वात्मसुखासाठीं स्तुति करी ब्रह्मा ॥ व्याधा निजधामा स्थिर पद ॥ २ ॥ काय करीतसे मातृपितृभक्ति ॥ तया जगत्पति नाचतसे ॥ ३ ॥ नाचती वैकुंठीं सर्व ऋषेश्वर ॥ नामा ह्मणे पार नाहीं नाहीं ॥ ४ ॥

॥ ५३८ ॥ आह्मांपासीं काय मागसी तूं देवा ॥ नाहीं भक्तिभाव भांडवल ॥ १ ॥ भांडवल गांठीं देखोनि साचार ॥ सुदाम्याची फार पाठ घेसी ॥ २ ॥ घेसी सोडूनियां पोहे मुठीभर ॥ हिडसावल्या कर नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ ५३९ ॥ स्वप्नीं तरी कैसा न पडसी डोळां ॥ सुंदर सांवळा यज्ञघवीत ॥ १ ॥ चरणीं गर्जती तोडर नेपुरें ॥ रेखित कस्तुरी निढळांमाजीं ॥ २ ॥ शंख चक्र हातीं गळां वैजयंती ॥ कुंडलें तळपती श्रवणांमाजीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे स्वप्नीं तरी तूं बा येई ॥ पांडुरंगे माई कृपावंते ॥ ४ ॥

॥ ५४० ॥ तुज नेणों गा महेशा ॥ ह्मणूनि आलों गा गर्भवासा ॥ अंध कूपीं पडिला जैसा ॥ रात्रंदिवसा तो नेणे ॥ १ ॥ तुझिया नामाची सांगडी ॥ अखंड देईन ते खंडी ॥ पावेन मी पैलथडी ॥ त्यासाठीं आधारु ॥ २ ॥ कामक्रोधादि जळचरीं ॥ कासाविस जालों भारी ॥ व्याकुळ होय चिंतालहरीं ॥ दुःखें भारी दाटलों ॥ ३ ॥ कल्पनाव्यालीं गुंडाळिलों पायीं ॥ तेणें बुडालों विषयडोहीं ॥ भवतें पाहें तंव कोण्ही नाहीं ॥ मग तुज ध्यायीं विश्वेशा ॥ ४ ॥ मज बांधुनी कर्मडोहीं ॥ घातलें संसारदुर्धरीं ॥ मायानदीच्या महापुरीं ॥ वाहावलों गा दातारा ॥ ५ ॥ ऐसा खेदक्षीण जालों बहुवस ॥ न देखें विश्रांतीची वास ॥ विनवी नामा विष्णुदास ॥ गर्भवास पुरे आतां ॥ ६ ॥

॥ ५४१ ॥ काळ देहासी आला खाऊं ॥ आह्मी आनंदें नाचूं गाऊं ॥ १ ॥ कोणें वेळे काय गाणें ॥ हें तों भगवंता मी नेणें ॥ २ ॥ टाळ मृंदग दक्षिणेकडे ॥ माझें गाणें पश्चिमेकडे ॥ ३ ॥ नामा ह्मणे बा केशवा ॥ जन्मोजन्मीं द्यावी सेवा ॥ ४ ॥

॥ ५४२ ॥ द्रौपारींची ठेव संपूर्ण पाहून ॥ विनवी जोडोन करांलागीं ॥ १ ॥ रामरूप धरून मज बोळवावें ॥ तें रूप राहावें हृदयामाजीं ॥ २ ॥ मनोरथ त्याचा ऐकोनि श्रवणीं ॥ झाला चापपाणि तात्काळिक ॥ ३ ॥

पाहोनियां ध्यान करूनि नमन ॥ निघाला तेथून वायुसूत ॥ ४ ॥ घेवोनिया आज्ञा सेतुबंधा गेला ॥ ध्यानस्थ बैसला नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ ५४३ ॥ देवा आह्मीं तुह्मां दिलें थोरपण ॥ मानीं हें वचन सत्य माझें ॥ १ ॥ पतीत अमंगळ झालों तुह्मां सहाय ॥ विचारूनि पाहें खरें खोटें ॥ २ ॥ रोग व्याधि पीडा जनासि नसतां ॥ कोण पाचारिता वैद्यालागीं ॥ ३ ॥ कल्पनेचें भूत झडपी या संसारीं ॥ माने पंचाक्षरि पाचारितां ॥ ४ ॥ नामा ह्मणे विठो दैव येतें घरा ॥ नको लावूं दारा पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ५४४ ॥ आह्मी विष्णुदास सांडिली वासना ॥ तुम्ही नारायणा कळों आलां ॥ १ ॥ अज्ञान बाळक ठकविला ध्रुरु ॥ तैसा मी अधीरु नव्हे देवा ॥ २ ॥ उपमन्या बाळका दुधाचा पैं छंद ॥ तैसा मी मतिमंद नोहे देवा ॥ ३ ॥ शरण आला तुज मूर्ख बिभीषण ॥ लंकाराज्य तेणें मागितलें ॥ ४ ॥ नामा म्हणे तुझें नलगे आम्हां कांहीं ॥ वास सदा देई चरणाजवळी ॥ ५ ॥

॥ ५४५ ॥ अडलीया कोंवसा अनाथकैवारी ॥ ब्रिदें चराचरीं वर्णिताती ॥ १ ॥ येईवा श्रीहरी तूं आमुचा कैवारी ॥ सुदर्शन करीं घेई शीघ्र ॥ २ ॥ गजेंद्राकारणें कळवळा अगाध ॥ जगीं तुझें ब्रीद तैसा येई ॥ ३ ॥ सुदामा ब्राह्मण अनाथ दुर्बळ ॥ तेथें तूं केवळ अवतरलासी ॥ ४ ॥ ध्रुवासि स्थापिलें उपमन्या कारणें ॥ क्षीरसागर देणें तैसा येई ॥ ५ ॥ अंबऋषीसाठीं सेविसी गर्भवास ॥ दुर्वासा कासाविस तैसा येई ॥ ६ ॥ विदुरासि भक्तपणें तूं उद्धवासी जवळी ॥ अर्जुना सर्वकाळीं तैसा येई ॥ ७ ॥ गोपाळा यशोदा नंदासी खेळसी ॥ गाई रानीं चारिसी तैसा येई ॥ ८ ॥ नामा म्हणे मागे सदां अभय कर ॥ प्रेमाचा उद्गार तैसा येई ॥ ९ ॥

॥ ५४६ ॥ वत्साकारणें मोहाळु गाय ॥ अनुसरल्या पान्हाय ॥ १ ॥ तैसें तुझें वांसरूं बांधलों मी असें ॥ मज लावी कासे आपुलिया ॥ २ ॥ मज बांधलें त्वां संसारखुंटीं ॥ माझी माउली दूर वैकुंठीं ॥ ३ ॥ थोरु करी मनालाहो ॥ तंव आणिकें नेती पान्हावो ॥ ४ ॥ थोरु नव्हें याचि परी ॥ नामा विनवितसे मुरारी ॥ ५ ॥

॥ ५४७ ॥ तूं माझी जननी कायगे साजणी ॥ विठ्ठले धांवोनि भेट देई ॥ १ ॥ डोळे माझे शिणले पाहतां वाटोली ॥ अवस्था दाटली हृद-

यामाजीं ॥ २ ॥ मी तुझें पाडस गुंतलों भवपाशीं ॥ माते धीर तुजशीं कैसा धरवला ॥ ३ ॥ तूं माझी पक्षिणी मी तुझा अंडज ॥ क्षुधें पीडिलों मज विसरशी ॥ ४ ॥ तूं माझी गाडली मी तुझें वोरस ॥ पुढती पुढती वास पाहतसें ॥ ५ ॥ नामा ह्मणे विठ्ठले आस पुरवी माझी ॥ ओरसे वेळा पाजी प्रेमपान्हा ॥ ६ ॥

॥ ५४८ ॥ जयवंत असो लक्षुमीचा चूडा ॥ धांवत दुडदुडां त्वां बा यावें ॥ १ ॥ बैसावयालागीं नको घेऊं घोडा ॥ धांवत दुडदुडां त्वां बा यावें ॥ २ ॥ अडखळूनि पडसी नको घालूं जोडा ॥ धांवत दुडदुडां त्वां बा यावें ॥ ३ ॥ येथें येतेवेळीं आळस तुम्ही सोडा ॥ ख्याला वाहे वेडा नामदेव ॥ ४ ॥

॥ ५४९ ॥ वेदपरायण मनीं तो ब्राह्मण ॥ चित्त समाधान संतुष्ट सदां ॥ १ ॥ येरा माझें नमन सर्वसाधारण ॥ ग्रंथाचें राखण ह्मणोनियां ॥ २ ॥ शास्त्रज्ञपंडित तोचि मी बहुमानी ॥ जो आपणांते जाणोनि तन्मय झाला ॥ ३ ॥ पुराणिक ऐसा मानितो कृतार्थ ॥ विषयीं विरक्त विधीपाळी ॥ ४ ॥ मानी तो हरिदास ज्या नामीं विश्वास ॥ मी त्याचा दास देहेंभावें ॥ ५ ॥ नामा म्हणे ऐके कईं भेटविसी विठ्ठला ॥ त्यालागीं फुटला प्राण माझा ॥ ६ ॥

॥ ५५० ॥ देवा पाप छळें कापते मेदिनी ॥ षट्कर्मं ब्राह्मणीं सांडियेलीं ॥ दैत्यांचेनि भारें दाटली अवनी ॥ प्रथम चरणीं कलियुगीं ॥ १ ॥ लटिक्याचा साच जिंकियेला कली ॥ पाखांडी वेदांतें न मानिती बळीं ॥ अधर्म प्रवर्तला महीतळीं ॥ ऐसीं पापें कळीं थोर झालीं ॥ २ ॥ ह्मणोनि करुणा भाकितु आहे ॥ जैसी व्याघ्रें वेढिली गाय ॥ तेंवि पंचानन ग्रासूं पाहे ॥ तैसा दिसतों नारायणा ॥ ३ ॥ भक्ति भावो नावडे पैं गा ॥ जैसें कां अमृत मुखीं भुजंगा ॥ डंख करूं आवडे जगां ॥ ऐसें श्रीरंगा नवल चोज ॥ ४ ॥ भ्रतारभक्ति सोडियली नारीं ॥ परपुरुषीं मन निर्धारीं ॥ पितियासि पुत्र असों नेदी घरीं ॥ नित्य निंदा करी रे अपमान ॥ ५ ॥ ह्मणोनियां जीवें त्रासु घेतला ॥ सत्य लोपलें धर्म बुडाला ॥ अझूनि काय पाहतोसि उगला ॥ धांवे विठ्ठला ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ ५५१ ॥ संसारसागरीं पडलों महापुरीं ॥ सोडवण करी देवराया ॥ १ ॥ नामाची सांगडी देऊनियां मातें ॥ वैकुंठाविरुतें नेऊनि घाली ॥ २ ॥

काम क्रोध मगर करिती माझा ग्रास ॥ म्हणीं तूं उदास होशील देवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे ह्मणीं मोकलिसी मातें ॥ नाम तुझें सरतें धरलें एक ॥ ४ ॥

॥ ५५२ ॥ देवा दिवस गेले वांयाविण ॥ हरिसी न रिघतां शरण ॥ बाळकत्व अज्ञानपण ॥ तैं आठवण नव्हेचि ॥ १ ॥ आला तारुण्याचा अवसरु ॥ सवेंचि विषयाचा पडिभारु ॥ काम क्रोध मदमत्सरु ॥ अति व्यापारु तृष्णेचा ॥ २ ॥ सवेंचि वृद्धत्व पातलें ॥ सकळ इंद्रियें सांडियलें ॥ देह न करी ह्मणितलें ॥ अंतर पडलें भक्तीसी ॥ ३ ॥ देवा हित कांहीं नव्हे माझें ॥ दास्यत्व न घडेचि तुझें ॥ आयुष्य गेलें वांया काजें ॥ धरणिये ओझें पैं झालें ॥ ४ ॥ पुनरपि जन्मा येणें मागुता ॥ कवण जाणे कैसी व्यवस्था ॥ कैसा देह लाधेल अनंता ॥ केव्हां तव चरणीं येईल ॥ ५ ॥ आतां मज करूं नको उदास ॥ तुझिया नामाचा विश्वास ॥ हृदयीं नांदे हृषीकेश ॥ विष्णुदास ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ ५५३ ॥ चौऱ्यांशी लक्ष जन्म हिंडतां ॥ घोंगडें अनंता जर्जर झालें ॥ १ ॥ जेथें जाय तेथें तुटचि हे पडे ॥ मुद्दल न घडे काय करूं ॥ २ ॥ संचित आटलें व्यवसाय खुंटले ॥ ह्मणोनि ठाकिलें द्वार तुझें ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठोबा जरी होसी जाणता ॥ तरी या बोला उचिता प्रेम देईं ॥ ४ ॥

॥ ५५४ ॥ मज चालतां आयुष्यपंथें ॥ तारुण्यवन पातलें तेथें ॥ मदमत्सरादि श्वापदें बहुतें ॥ आलीं कळकळीत मजपाशीं ॥ १ ॥ तीं धांवती पाठोपाठीं ॥ पाहें तंव विषयाचे घाटीं ॥ काम क्रोध व्याघ्रांची वाटी ॥ देखोनि पोटीं रिघाले पाय ॥ २ ॥ मग स्वधर्ममार्गीं रिघालों ॥ तंव अहंकारतस्करें आकळिलों ॥ राहें राहें ह्मणोनि उभा केलों ॥ तेणें अंतरलों स्वामिया ॥ ३ ॥ जंव क्षण एक उघडिले डोळे ॥ पाहें तंव कंठ व्यापिला व्याळें ॥ मायामोहसर्पीं डंखिलें ॥ त्यांचिये गरळें झळंबलों ॥ ४ ॥ जंव न पवेल शेवटील लहरी ॥ तंव धांव उपाव करी ॥ विष्णुदास नामा धांवे पुकारी ॥ माझा कैवारि केशिराज ॥ ५ ॥

॥ ५५५ ॥ कावे पान अंगणीं उभे उगें ॥ भोजन मागें रामनाम ॥ १ ॥ आणिक नाहीं मज चाड ॥ रामनाम गोड जेवूं घाला ॥ २ ॥ अन्नरस सेवितां मंद पडलें ॥ तुझेचि नामें रुचीस आलें ॥ ३ ॥ इच्छाभोजनी तूं एक दाता ॥ नामा विनवी पंढरिनाथा ॥ ४ ॥

॥ ५५६ ॥ चोरां ओढोनियां नेईजे जैं शुळीं ॥ चालतां पाउलीं मृत्यु जैसा ॥ १ ॥ तैसी परी मज झाली नारायणा ॥ दिवसें दिवस उणा होत असें ॥ २ ॥ वृक्षाचिये मुळीं घालितां कुऱ्हाडी ॥ वेंचे तैसी घडी आयुष्याची ॥ ३ ॥ नामा ह्मणे हेंहि लहरीचें जळ ॥ आटत सकळ भानुतेजें ॥ ४ ॥

॥ ५५७ ॥ भवव्याघ्र देखोनि भ्याले माझे डोळे ॥ झालेंसे व्याकूळ चित्त माझें ॥ १ ॥ पाव गा विठोबा पाव गा विठोबा ॥ पावगा विठोबा मायबापा ॥ २ ॥ तूं भक्त कैवारि कृपाळुवा हरी ॥ येई गा झडकरी देवराया ॥ ३ ॥ नामा ह्मणे नेणें आन तुज वांचूनि ॥ जनकजननी केशिराजा ॥ ४ ॥

॥ ५५८ ॥ दंभें गर्वें मदें घेरलेंसे भारी ॥ अनुसरलों केसरी पंचानना ॥ १ ॥ तूंतें वेद नेणें तूंतें शास्त्र नेणें ॥ तुझें नाम नेणें गातूं असें ॥ २ ॥ त्रिविद्या तूं पारु दोहींचा वृत्तांतु ॥ सत्व राहेतीतु जयालागीं ॥ ३ ॥ निर्गुण निराकार केशव उदार ॥ नामा ह्मणे पार उतरतील ॥ ४ ॥

॥ ५५९ ॥ तुवां चाळविलें अनंत सेवकां ॥ तोचि चाळा मज दाविसी तूं निका ॥ १ ॥ आदि अंतीं तुझ्या जाणितल्या खुणा ॥ आतां काय करिसी पंढरीच्या राणा ॥ २ ॥ भलारे भला झालासि शाहणा ॥ भेष पळविले शास्त्रपुराणां ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा मज मारून दवडी ॥ पुढती धरावी सोय माझी ॥ ४ ॥

॥ ५६० ॥ भावेंविण भक्ति कशानें करावी ॥ माया मोह वैरि देहामाजीं ॥ १ ॥ तुझें नाम दिव्य रस जिव्हे स्वाद ॥ काम क्रोध नाश करिती माझा ॥ २ ॥ जे जे वस्तूसि मी नित्य नयनीं पाहें ॥ सा सा विषया मन धांवताहे ॥ ३ ॥ नामा ह्मणे थोर उबगलों संसारा ॥ काळ वैरी पुढारां ग्रासूं पाहे ॥ ४ ॥

॥ ५६१ ॥ मुंगीचिया गळां बांधोनियां मेरु ॥ तेणें हा प्रकारु कळों आला ॥ १ ॥ माळियाचे पोरें लपविलें पोटीं ॥ तेणें जगजेठी सुख मानी ॥ २ ॥ कुलालाचे हातीं तुडविलें मूल ॥ दाखवी नवल तयासाठीं ॥ ३ ॥ मजसाठीं काय धरिलेंसि मौन ॥ धांव नारायणा नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ ५६२ ॥ निर्गुणपणाच्या घेसी अभिमाना ॥ तुज नारायणा शोधीं नामीं ॥ १ ॥ काय तुझी भीड धरावी म्यां आतां ॥ कृपाळु अनंता ह्मणे

नामीं ॥ २ ॥ पुंडलीकासाठीं उभा राहिलासी ॥ ठकडा तूं होसी मजलागीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे नको मज चाळवण ॥ लवकरी चरण ना कां दावा ॥ ४ ॥

॥ ५६३ ॥ भक्तीची अपेक्षा धरोनि अंतरीं ॥ राहे भीमातीरीं पंढरीये ॥ १ ॥ अठ्ठावीस युगें गेलीं विचारितां ॥ निगम सर्वथा नव्हे देखा ॥ २ ॥ कटीं कर उभा शिणलें शरीर ॥ धरोनि निर्धार भक्तिभावो ॥ ३ ॥ नामा ह्मणे आतां नको खटपट ॥ आमुचे बोभाट नको पाहूं ॥ ४ ॥

॥ ५६४ ॥ वाजविली डांक चौक ठेवियला ॥ ठायीं पंढरीचे विठ्ठले तुज हाकार केला ॥ १ ॥ रंगा येईवो खेंचरे विठाई सुंदरी ॥ तुझीं पाउलें गोजिरीं कैं मी दृष्टी देखेन ॥ २ ॥ पाजळला दीप फिटला अंधकारु ॥ न लावा उशीरु पांडुरंगे माउलिये ॥ ३ ॥ तमोगुणाचा रज जाळूनि धूप केला ॥ उशीरु कां लाविला पांडुरंगे माउलिये ॥ ४ ॥ तनुमनाची मृद् टाकीन तुजवरोनी ॥ वैकुंठवासिनी पांडुरंगे माउलिये ॥ ५ ॥ अहंकार दैवतें झडपिलें नामयासी ॥ येऊनिया रंगासी रंग राखी आपुले ॥ ६ ॥

॥ ५६५ ॥ गर्भवास ऐसा मजसी भिवविती ॥ गाई बैसविती व्याघ्रापुढें ॥ १ ॥ नको हा संसार नको हा संसार ॥ नको हा संसार देवराया ॥ ॥ २ ॥ कोपें काळदर्पें धरिलें अजेसी ॥ तेणें कासाविसी सांगों नेणें ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझें केशवा मी बाळ ॥ ऐसा तूं कृपाळ मायबापा ॥ ४ ॥

॥ ५६६ ॥ भिऊनि रिघीजे समर्थाचे पोटीं ॥ विषयांची तों भेटी नको मज ॥ १ ॥ तैसा मी शरण आलोंसें केशवें ॥ मज त्वां राखावें पायांतळीं ॥ २ ॥ नको उदासीन राखों अभिमान ॥ माझें आगमन विचारी कां ॥ ३ ॥ तुझेनि होईल तेंच मी मागेन ॥ न सोडी चरण अहर्निशीं ॥ ४ ॥ अविद्या अपार संचरली देवा ॥ आह्मासि कुढावा नाहीं कोणी ॥ ५ ॥ देवा आतां मज नको गर्भवास ॥ नामा विष्णुदास विनवीतसे ॥ ६ ॥

॥ ५६७ ॥ शरणांगतासी नये मोकलावा ॥ हें तरी केशवा जाणतोसी ॥ १ ॥ सांगणें नलगे सांगणें नलगे ॥ सांगणें नलगे मायबापा ॥ २ ॥ सांगतां समर्थ सर्वेंचि विसरे ॥ त्याच्या अभ्यंतरीं नव्हे बोल ॥ ३ ॥ नामा ह्मणे तैसा नव्हेसि शाहणा ॥ अठराही पुराणा वेडाविसी ॥ ४ ॥

॥ ५६८ ॥ सांडोनि संसार झालों मी अंकित ॥ ऐशियाचा अंत पाहूं नको ॥ १ ॥ पातकी मी सत्य पातकी मी सत्य ॥ पातकी मी सत्य पांडुरंगा

॥ २ ॥ माझे गुण दोष न धरिसी चित्तीं ॥ थोरपण ख्याति दावी आह्मा ॥ ३ ॥ ऐसा अपराध आणूं नको मना ॥ पंढरीचा राणा ह्मणोनियां ॥ ४ ॥

॥ ५६९ ॥ साचपणें ब्रीदा सांडवीन तुझ्या ॥ आतां केशिराजा पण हाचि ॥ १ ॥ लबाड तूं देवा लबाड तूं देवा ॥ लबाड तूं देवा ठावा आह्मा ॥ २ ॥ काय मूर्खपणें सांगशील गोष्टी ॥ थोरपणें मोठी पुरे आतां ॥ ३ ॥ नामा ह्मणे काय खवळिसी आह्मा ॥ लाज नाहीं तुह्मा कोणेविशीं ॥ ४ ॥

॥ ५७० ॥ अपराध कोटि हेचि माझी जोडी ॥ पावनत्व मौढि नाम तुझें ॥ १ ॥ द्रौपदी संकटीं वस्त्रें पुरविलीं ॥ धांव त्वां घेतली गजेंद्रासी ॥ २ ॥ उपमन्या लागीं आळी पुरविली ॥ अढळपदीं दिली वस्ती ध्रुवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे करा करुणा केशवा ॥ तूं माझा विसांवा पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ५७१ ॥ हेचि माझी संध्या हेंचि माझें ध्यान ॥ तुझ्या पायीं मन लागो देवा ॥ १ ॥ हेचि माझी रिद्धि हेचि माझी सिद्धि ॥ अखंड समाधी पाय तुझे ॥ २ ॥ नामा ह्मणे हेंचि देईगा श्रीपती ॥ कथेची विश्रांति जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

॥ ५७२ ॥ विणा घेऊनियां करीं ॥ उभा राउळा माझारीं ॥ १ ॥ तहान भूक हरपली ॥ छंद लागला विठ्ठलीं ॥ २ ॥ कन्या पुत्र बापमाय ॥ त्यांचा आठव तो नये ॥ ३ ॥ नामा ह्मणे हेंचि देई ॥ तुझे पाय माझे डोई ॥ ४ ॥

॥ ५७३ ॥ तुझिये पायांचे प्राण हे माझे ॥ चरण कमळ तुझें विसंबेना ॥ १ ॥ संसाराच्या गोष्टी कीट झाल्या पोटीं ॥ रामकृष्ण कंठीं माळ घाली ॥ २ ॥ दुरोनियां देखें गरुडाचें वारिखें ॥ गोपाळासारिखें चतुर्भुज ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठो जन्मजन्मांतरीं ॥ ऋणि करुनि करीं घेई मज ॥ ४ ॥

॥ ५७४ ॥ कटीं कर उभा ऐसा ॥ पहा कैसा घर घेण्या ॥ १ ॥ माझा हिशेब करी हिशेब करी रे केशवा ॥ चौऱ्यांशीं लक्ष जन्म केली तुझी सेवा ॥ २ ॥ माझें ठेवणें देईगा देवा ॥ नाहिं तर धरीन मी तुझ्या सेवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज खवळिसी वांया ॥ पिसाळलों तरी झोंबेन तुझ्या पायां ॥ ४ ॥

॥ ५७५ ॥ देशीं परदेशीं झालों तुजवीण ॥ माझें समाधान कोण करी ॥ १ ॥ चातक चकोरा परी पाहें वास ॥ तूं कांहो उदास पांडुरंगा ॥ २ ॥ नामा ह्मणे चित्त देई माझ्या बोला ॥ जिव तो उरला निघों पाहे ॥ ३ ॥

॥ ५७६ ॥ मी असें तेथें मग तूं कैंचा ॥ हा उपजत ठायींचा तोडी वेलू ॥ १ ॥ आपुलें करोनि ठेवी तुझें चरणीं ॥ न मानिती कोणी क्षिती माजीं ॥ २ ॥ सेवा तुझी देईं नको दुजेपण ॥ येर तो अभिमान खंडीं माझा ॥ ३ ॥ देवा आवडसी माझिया जीवा ॥ सुखरूप केशवा विठ्ठलराजा ॥ ४ ॥

॥ ५७७ ॥ निरंतर येणें राहे समाधान ॥ मग प्रारब्ध भोगणें गोड वाटे ॥ १ ॥ हृदयीं तुझें रूप वदनीं तुझें नाम ॥ बुद्धि हे निष्काम धरीन देवा ॥ २ ॥ नामा ह्मणे तुझी पाउलें चिंतीत ॥ झालों कृतकृत्य जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

॥ ५७८ ॥ असो आतां किती हेचि ठेवाठेवी ॥ कृपा विठ्ठल देवीं केलीं मज ॥ १ ॥ अंतरींच्या सुखा नाचतसे भोजें ॥ हेंचि निजगुज जाणवलें ॥ २ ॥ नामा ह्मणे अंतरींचें निजगुज ॥ सांगितलें मज पांडुरंगें ॥ ३ ॥

॥ ५७९ ॥ नामयाचें प्रेम केशवचि जाणे ॥ केशवासी राहणें नाम्यापाशीं ॥ १ ॥ केशव तोचि नामा नामा तोचि केशव ॥ प्रेमभक्ति भाव मागतसे ॥ २ ॥ विष्णुदास नामा उभा केशवद्वारीं ॥ प्रेमाची शिदोरी मागतसे ॥ ३ ॥

॥ ५८० ॥ पंढरीचा वास चंद्रभागे स्नान ॥ आणिक दर्शन विठोबाचें ॥ १ ॥ हेंचि घडो मज जन्मजन्मांतरीं ॥ मागणें श्रीहरी नाहीं दुजें ॥ २ ॥ मुखीं सदा नाम संतांचें दर्शन ॥ जनीं जनार्दन ऐसा भाव ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझें नित्य महाद्वारीं ॥ कीर्तन गजरीं सप्रेमाचें ॥ ४ ॥

॥ ५८१ ॥ देवा तुझी अवज्ञा घडे ॥ तयाचे दांत होती वांकुडे ॥ व्याधिविण देहीं पीडे ॥ बुडे सागरीं चिंतेच्या ॥ १ ॥ देवा तूं होसी उदासीन ॥ तरी हांसती सकळ जन ॥ जेथें जाय तेथें होय अनमान ॥ जगाधीन होऊनि ठाके ॥ २ ॥ देवा तूं नाहींस जयाचे चित्तीं ॥ सोनें धरिल्या होय माती ॥ पीक न पिके तयाचे शेतीं ॥ पेंवीं पाणी निघतसे ॥ ३ ॥ सेवा करी जयाचे घरीं ॥ तींचि होती पाटमोरीं ॥ इष्टमित्र सज्जन सोयरीं ॥ आस वैरि होऊनि ठाके ॥ ४ ॥ ठेवा ठेविला चुके आपण ॥ मागतोचि मागे जाण ॥ सयास घडे आपदास्थपण ॥ बोल तितुके लटिकेचि ॥ ५ ॥ ऐसा अनुभव घडला मज ॥ ह्मणोनि बा शरण आलों तुज ॥ नामा ह्मणे केशीराजा ॥ कृपा करी गा दातारा ॥ ६ ॥

॥ ५८२ ॥ ज्याचियारे मनें देखियेलें तुज ॥ साची लोकलाज मावळली ॥ १ ॥ नाहीं तया क्रिया नाहीं तया कर्म ॥ वर्णाश्रमधर्म सुख दुःख ॥ २ ॥ नाहीं देह स्फूर्ति जाती कुळ भेद ॥ अखंड आनंद ऐक्यतेचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे साचे चरणरज व्हावें ॥ हेंचि भाग्य द्यावें केशिराजा ॥ ४ ॥

॥ ५८३ ॥ बोलावूं पाठवूं एवढी कैची शक्ति ॥ या रंगा श्रीपति त्वां बा यावें ॥ १ ॥ येईगा विठ्ठला बाहातसें आतां ॥ या रंगीं अनंता त्वां बा यावें ॥ २ ॥ धांवत त्वां यावें धांवत त्वां यावें ॥ या रंगीं नाचावें पांडुरंगा ॥ ३ ॥ तिहीं त्रिभुवनीं तुझीच करणी ॥ ठाव मागे चरणीं नामदेव ॥ ४ ॥

॥ ५८४ ॥ तूं माझी माउली मी वो तुझा तान्हा ॥ पाजी प्रेमपान्हा पांडुरंगे ॥ १ ॥ तूं माझी गाउली मी तुझें वासरूं ॥ नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥ २ ॥ तूं माझी हरिणी मी तुझें पाडस ॥ तोडी भवपाश पांडुरंगे ॥ ३ ॥ तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज ॥ चारा घाली मज पांडुरंगे ॥ ४ ॥ नामा ह्मणे होसी भक्तीचा वल्लभ ॥ मागें पुढें उभा सांभाळिसी ॥ ५ ॥

॥ ५८५ ॥ तुजविण आह्मा कोण हो पोशिता ॥ अहो जी कृपावंता पंढरिराया ॥ १ ॥ न करी विठ्ठला आतां लाजिरवाणें ॥ मी तुझें पोसणें पांडुरंगा ॥ २ ॥ काकुळती कोणा येऊं हो मी आतां ॥ अनाथाच्या नाथा विठ्ठला तूं ॥ ३ ॥ एकवेळ आतां पाहे मजकडे ॥ नामा ह्मणे वेडें रंक तुझें ॥ ४ ॥

॥ ५८६ ॥ तुजवांचुनि कांहीं गोड न वाटे जीवा ॥ तुझे पाय मज दिव्य केशवा ॥ १ ॥ लौकिकापासूनि कधीं सोडविसी ॥ सांग हृषीकेशी उघडोनी ॥ २ ॥ तुझे पाय दिव्य तुझे पाय दिव्य ॥ तुझे पाय दिव्य रे दातारा ॥ ३ ॥ नामा ह्मणे जिव्हे काढीन मी रवा ॥ तुझे पाय मज दिव्य केशवा ॥ ४ ॥

॥ ५८७ ॥ जाणसी तें करी कृपाळुवा हरी ॥ लाज सर्वांपरी आहे तुज ॥ १ ॥ आरुष साबडें मी कांहीं नेणें वेडें ॥ जन्मोजन्मीं सांकडें केलें तुज ॥ २ ॥ बहुकीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं ॥ बहुत केले सुखी शरणांगत ॥ ३ ॥ नाहीं तुझी सेवा केली मनो भावें ॥ लोभ दंभ गर्व भ्रांति सदा ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज होताति विपत्ति ॥ सोडवी श्रीपति येथोनियां ॥ ५ ॥

॥ ५८८ ॥ येईवो विठ्ठले मजलागीं झडकरी ॥ बुडतों भवसागरीं काढी मज ॥ १ ॥ आकांता अवसरीं स्मरलासि गजेंद्रें ॥ दीनानाथ ब्रिदें

सत्य केलीं ॥ २ ॥ द्रौपदी संकटीं स्मरलासे वनवासीं ॥ धांवोनि आलीसि लवडसवडी ॥ ३ ॥ प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणीं ॥ संकटापासोनि राखियेलें ॥ ४ ॥ नामा ह्मणे थोर पीडिलों गर्भवासें ॥ अखंड पाहतसें वास तुझी ॥ ५ ॥

॥ ५८९ ॥ वाघाचिया गळां शेळी बांधोनियां ॥ तैसी तुझी माया लोभापर ॥ १ ॥ कां मज संसारीं घालितोसि देवा ॥ कैसें तुझिया जीवा गोड वाटे ॥ २ ॥ विषयाचे कल्लोळ पाजिसी केवळ ॥ हृदय कोमळ कैसें तुझें ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज आदि अंत एकु ॥ जननी जनकु पंढरिरावो ॥ ४ ॥

॥ ५९० ॥ किती तुला देवा येऊं काकुळती ॥ काय तें संचितीं लिहिलें असे ॥ १ ॥ केली कां हो सांडी माझी हृषीकेशी ॥ आह्मी कोणापाशीं तोंड वासूं ॥ २ ॥ ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं ॥ तूंचि एक धनी त्रिलोकींचा ॥ ३ ॥ समूळ घेतला पृथ्वीचा भार ॥ माझाचि जंजार काय तुला ॥ ४ ॥ नको पाहूं अंत पांडुरंगे आई ॥ नामा विठोपायीं मिठी घाली ॥ ५ ॥

॥ ५९१ ॥ भावें तुझे चरण धरिले विठ्ठला ॥ अतां तूं पांगिला करूं नको ॥ १ ॥ नलगे मज कांहीं ऋद्धि सिद्धि पाही ॥ मुक्तिसुख तेंहि नलगे मज ॥ २ ॥ नामा ह्मणे मज जन्म दे अनंता ॥ भक्तिविरहिता जन्म नको ॥ ३ ॥

॥ ५९२ ॥ घालूनि आसन साधिला पवन ॥ घेतलें जीवन अंतरिक्षीं ॥ १ ॥ परहस्तें तृप्ति नव्हे जी दातारा ॥ कृपा करुणा करा केशिराजा ॥ २ ॥ जीवाचें जीवन सर्वांचें कारण ॥ धांव मजलागुन केशिराजा ॥ ३ ॥ अनाथाचा नाथ हें ब्रीद साचार ॥ ह्मणीं माझा अव्हेर करिसी देवा ॥ ४ ॥ विष्णुदास नामा अंकियेला तुझा ॥ निववी केशिराजा प्रेमसुखें ॥ ५ ॥

॥ ५९३ ॥ तुवां येथें यावें कीं मज तेथें न्यावें ॥ खंती माझ्या जीवें मांडियली ॥ १ ॥ माझें तुजविण येथें नाहीं कोणी ॥ विचारावें मनीं पांडुरंगा ॥ २ ॥ नामा ह्मणे वेगीं यावें करुणाघना ॥ जातो माझा प्राण तुजलागीं ॥ ३ ॥

॥ ५९४ ॥ प्रपंचीं कां मातें करिसी उदासीन ॥ तरी तुझें ध्यान लागो मना ॥ १ ॥ हेंचि तुज मागणें जन्मजन्मांतरीं ॥ न मागतां अंतरीं

प्रगट होसी ॥ २ ॥ इंद्रियांचे व्यापार अवघेचि तोडी ॥ प्रेमरसगोडी देई मातें ॥ ३ ॥ नामा ह्मणे शरण आलों मी केशवा ॥ हाचि तूं पुरवावा मनोरथ ॥ ४ ॥

॥ ५९५ ॥ माता पिता बंधु कुळगुरुदैवत ॥ सखा सर्व गोत केशिराज ॥ १ ॥ जन्मोनि पोसणा तुझा मी अंकिला ॥ आणिकाचा पांगिला न करी देवा ॥ २ ॥ विष्णुदास नामा विनवितो केशवा ॥ झणीं घालिसी देवा संसारासी ॥ ३ ॥

॥ ५९६ ॥ माता तेचि तात सोयरे हरिजन ॥ यम नेम नेणें दोन गोष्टी ॥ १ ॥ गोष्ट ते कोणती ह्मणाल तुह्मी जरी ॥ वाचे हरिहरि ह्मणतसों ॥ २ ॥ नामा ह्मणे आह्मी मागतों देवासी ॥ कीर्तनीं उपवासी करावें देवा ॥ ३ ॥

॥ ५९७ ॥ वासरूं भोंवें खुंटिया भोंवतें ॥ आपआपणियातें गोविंयलें ॥ १ ॥ तैसी परी मज झाली गा देवा ॥ गुंतलों मी भावा लटिकिया ॥ २ ॥ नामा ह्मणे केशवा तोडी कां बंधनें ॥ मी एक पोसणें भक्त तुझा ॥ ३ ॥

॥ ५९८ ॥ अहो सदाशिवा ॥ देसी भुक्ति मुक्ति भावा ॥ १ ॥ करावी ते तुझी सेवा ॥ ऐसें धरावें या जीवा ॥ २ ॥ नामा ह्मणे महादेवा ॥ चुकवी चौऱ्यांशीचा हेवा ॥ ३ ॥

॥ ५९९ ॥ जगत्र जीवना अगा नारायणा ॥ कां नये करुणा दासाची हे ॥ १ ॥ अच्युता केशवा येगा दीनानाथा ॥ सर्वज्ञा समर्था कृपामूर्ती ॥ २ ॥ चिद्‍घना चिद्रूपा विरंचीच्या बापा ॥ करावी जी कृपा सर्वांभूतीं ॥ ३ ॥ तुझें ह्मणविलें उपेक्षिसी जरी ॥ नामा ह्मणे हरी ब्रीद काय ॥ ४ ॥

॥ ६०० ॥ आह्मीं दिला जीव तुझिया कीर्तनें ॥ पांगुळलीं मनें योगियांचीं ॥ १ ॥ न बोलवे वाचा न बोलवे कांहीं ॥ आपेआप पाही ठाकलोंसे ॥ २ ॥ ऐसें तुझें नाम दे गोड गा देवा ॥ घाली बा केशवा हृदयामाजीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मा सांपडलें वर्म ॥ निस वाचे नाम रामकृष्ण ॥ ४ ॥

॥ ६०१ ॥ तुझें प्रेम माझे हृदया आवडी ॥ चरण मी न सोडी पांडुरंगा ॥ १ ॥ कशासाठीं शीण थोडक्याकारणें ॥ काय तुज उणें होय देवा ॥ २ ॥

चंद्र चकोराचा पुरवी सोहळा ॥ काय त्याच्या कळा न्यून होती ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज अनाथा सांभाळी ॥ हृदयकमळीं स्थिर राहे ॥ ४ ॥

॥ ६०२ ॥ आशा मनीषा तृष्णा लागलीसे पाठीं ॥ धांव जगजेठी स्वामी माझ्या ॥ १ ॥ गेलीसि केउता वाढिलें दुश्चिता ॥ अगा कृपावंता स्वामी माझ्या ॥ २ ॥ नामा ह्मणे मज नाहीं कोण गत ॥ तारिसी अनंता स्वामी माझ्या ॥ ३ ॥

॥ ६०३ ॥ आठवितां मनीं तुझी ब्रीदावळी ॥ येउनि जवळी उभा ठाके ॥ १ ॥ लाज धरोनियां होतोसि माघारा ॥ तुजची दातारा दिसे शोभा ॥ २ ॥ नामरूपासाठीं घेसी नाना सोंगें ॥ भक्त जीवलग अंतः-काळीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज नको हा संसार ॥ मज निरंतर देई संग ॥ ४ ॥

॥ ६०४ ॥ अग्निमाजीं पडे बाळू ॥ माता धांवे कनवाळू ॥ १ ॥ तैसा धांवे माझिया काजा ॥ अंकिला मी दास तुझा ॥ २ ॥ सवेचि झेंपावे पक्षिणी ॥ पिलीं पडतांचि धरणी ॥ ३ ॥ भुकेलें वत्सरावें ॥ धेनु हुंबरत धांवे ॥ ४ ॥ वणवा लागलासे वनीं ॥ पाडस चिंतीत हरणी ॥ ५ ॥ नामा ह्मणे मेघा जैसा ॥ विनवितो चातक तैसा ॥ ६ ॥

॥ ६०५ ॥ काशिये कनोजा द्वारके गुजरु ॥ कानडा विठ्ठल पंढरीये ॥ १ ॥ मायबापें माझीं विठ्ठलरुक्मिणी ॥ द्वारका पाटणीं माहियेर ॥ २ ॥ पर्वत शिखरीं ब्रीद नारायण ॥ सोयरा सज्जन पंढरीये ॥ ३ ॥ बारसी भगवंत तेरसी तिखया ॥ विठ्ठलू सोयरीया पांडुरंगा ॥ ४ ॥ विटेवरी नीट सम चरणीं उभा ॥ पुंडलीकाचे लोभा भक्तिलागीं ॥ ५ ॥ विष्णुदास नामा चरणीं उतावेळु ॥ करावा सांभाळू अपत्याचा ॥ ६ ॥

॥ ६०६ ॥ कृपावंत समर्थ ह्मणूनि करी आर्त ॥ येईन सांवरत पांडु-रंगे ॥ १ ॥ मज कां विसंबली विठ्ठल माउली ॥ तनु तृषावली जीवनेविण ॥ २ ॥ तूं माझें जीवन नाम जनार्दन ॥ हृदयीं भरी पूर्ण प्रेमरस ॥ ३ ॥ अमृताच्या करें कांसवीच्या भरें ॥ कुरवाळी त्वरें देह माझा ॥ ४ ॥ पूर्ण पान्हा देई निववी हृदयीं ॥ येई वो कान्हाई सांवळिये ॥ ५ ॥ नामा ह्मणे पावे जीवा शीण न साहे ॥ वेगीं लवलाहे पाजी पान्हा ॥ ६ ॥

॥ ६०७ ॥ गरुडावरी हरी बैसोनियां यावें ॥ आह्मांसि रक्षावें दीन-बंधू ॥ १ ॥ अच्युता केशवा मुकुंदा मुरारी ॥ येई लवकरी नारायणा ॥ २ ॥

ऐकोनियां धांवा धांवला अनंत ॥ उभा गरुडासहित मागें पुढें ॥ ३ ॥ वैजयंती माळ किरीट कुंडलें ॥ नामयानें केलें निंबलोण ॥ ४ ॥

॥ ६०८ ॥ चरण देखोनि गेली भवव्यथा ॥ पुढें एक चिंता वाटतसे ॥ १ ॥ ह्मणीं मुक्तिपद देसी पांडुरंगा ॥ मग या संतसंगा कोठें पाहूं ॥ २ ॥ मग पंढरीचा आनंद सोहळा ॥ कोणाचिया डोळां पाहूं देवा ॥ ३ ॥ मग हरिकथा अमृतसंजीवनी ॥ कोणाचिया कानीं ऐकूं देवा ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज पंढरीची सोय ॥ जन्मोजन्मीं होय याचिलागीं ॥ ५ ॥

॥ ६०९ ॥ जनार्दना कृपाळुवा हृषीकेशा ॥ पुराणपुरुषा तुज नमों ॥ १ ॥ अभिज्ञा क्षेत्रज्ञा अचिंत्या कूटस्था ॥ त्रैलोक्याचा नाथा तूज नमों ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें तुझिया उदरीं ॥ मेघश्यामा हरी तुज नमों ॥ ३ ॥ देवराया तुझें कोमळ हृदय ॥ कृपादृष्टी पाहें मजकडे ॥ ४ ॥ तुझा मी किंकर आहें वासुदेवा ॥ अभय या जीवा देई आतां ॥ ५ ॥ नामा ह्मणे घाली चरणासी मिठी ॥ बोले जगजेठी स्वामी माझा ॥ ६ ॥

॥ ६१० ॥ काय गुण दोष माझे विचारिसी ॥ आहें मी तो राशी अपराधांची ॥ १ ॥ अंगुष्ठामासोनी मस्तकापर्यंत ॥ अखंड दुश्चित आचरलों ॥ २ ॥ स्वप्नीं देवा तुझी नाहीं घडली भक्ति ॥ पुसशी विरक्ति कोठुनियां ॥ ३ ॥ तूंची माझा गुरू तूंची तारी स्वामी ॥ सकळ अंतर्यामीं गाऊं तुज ॥ ४ ॥ नामा ह्मणे माझें चुकवी जन्ममरण ॥ नको करूं शीण पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ६११ ॥ कागदींचें वित्त वेश्येसी दिधलें ॥ तैसें आह्मां केलें नारायणें ॥ १ ॥ जोडोनियां हस्त बोले मढ्यापाशीं ॥ तैसें तूं मजशीं केलें देवा ॥ २ ॥ कडू भोंपळ्याचा कोणता उपयोग ॥ तैसें पांडुरंगें केलें जाण ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें करूं नको देवा ॥ समागम व्हावा पायांसवें ॥ ४ ॥

॥ ६१२ ॥ काय अपराध पाहसी कोणाचे ॥ धांवे भाविकांचे कामकाजीं ॥ १ ॥ काय केशीराजा वाणू मी दुबळें ॥ शरणांगता लळे पुरविशी ॥ २ ॥ पतीतपावन ब्रीद चराचरीं ॥ तेथें मी भीकारी कोणीकडे ॥ ३ ॥ नामा ह्मणे तूंची करिशी उद्धार ॥ मज देवा पार नाहीं भाग्या ॥ ४ ॥

॥ ६१३ ॥ काय गुण दोष आणितोसी मना ॥ नको नारायणा अभक्तची ॥ १ ॥ शरीरसंबंधा सुचती अंतरें ॥ काय म्यां पामरें आवरावें ॥ २ ॥ नामा ह्मणे मज नागविसी दातारा ॥ नको वा अंतरा पाहों अंत ॥ ३ ॥

॥ ६१४ ॥ कां मज शिणविसी थोडिया कारणें ॥ काय तुझें उणें होईल देवा ॥ १ ॥ चातकाची तृषा पुरवी जलधर ॥ काय त्याचें सरे थोरपण ॥ २ ॥ माता अवलोकी आपुलिया बाळा ॥ काय तिया डोळां दृष्टि नसे ॥ ३ ॥ चंद्र चकोराचा पुरवी सोहळा ॥ काय त्याच्या कळा न्यून होती ॥ ४ ॥ नामा ह्मणे तुझ्या चरणाची आवडी ॥ गुंतलें न सोडी मन माझें ॥ ५ ॥

॥ ६१५ ॥ काय आह्मापाशीं आहे धन वित्त ॥ दान तें उचित देऊं काय ॥ १ ॥ देतां घेतां आह्मां पुरे पुरे झालें ॥ संगती लागिलें भिवोनियां ॥ २ ॥ काय वाणूं गुण भिकारपणाचे ॥ होसी पंढरीची नामनौका ॥ ३ ॥ नामा ह्मणे पुढें दाखवी मारग ॥ आह्मी तुज मागें येऊं सुखें ॥ ४ ॥

॥ ६१६ ॥ काया मनें वाचा नेणों भक्तिभाव ॥ करिसी उपाव केशिराजा ॥ १ ॥ थोरपणासाठीं मन घे हव्यासु ॥ मी तो कासाविसु होय देवा ॥ २ ॥ सर्वां भूतांमाजीं समत्व दिससी ॥ नामा ह्मणे ऐसी दावी लीला ॥ ३ ॥

॥ ६१७ ॥ कोठें मी रे तुझा धरूं गेलों संग ॥ लावियलें जग माझे पाठीं ॥ १ ॥ सर सर परता अगुणा गोपाळा ॥ नका लावूं चाळा खोटें येथें ॥ २ ॥ रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ति ॥ न देखें भोंवतीं मी हीं माझीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मी जीवींच बैसलां ॥ बोलाचिया बोला दावोनियां ॥ ४ ॥

॥ ६१८ ॥ तुझिया संतांची अंगसंगसंगति ॥ ते पावलिया विश्रांति संसारिया ॥ १ ॥ श्रवण कीर्तन ध्यान घडे अनायासें ॥ भेदभ्रम नासे तेचि क्षणीं ॥ २ ॥ ऐसें भाग्य मज देसी कवणे काळीं ॥ होईन पायधूळी वैष्णवांची ॥ ३ ॥ वदनीं तुझें नाम वसे निरंतर ॥ राखीन त्याचें द्वार थोर आशा ॥ ४ ॥ येतां जातां मज करिती सावधान ॥ वदनीं कृष्ण कृष्ण ह्मणविती ॥ ५ ॥ कामधेनु घरीं असे प्रसवली ॥ ते विकावया नेली दैवहतें ॥ ६ ॥ पंथीं पडिला पायां लागे चिंतामणि ॥ पाषाण ह्मणऊनि उपेक्षिला ॥ ७ ॥ तैसी परी मज जाहली अधमा ॥ चुकलों तुझ्या वर्मा केशिराजा ॥ ८ ॥ नामा ह्मणे थोर खंती वाटे चित्तां ॥ कृपा करूनि माथा ठेवी चरणीं ॥ ९ ॥

॥ ६१९ ॥ पाहुनि न दिसे लौकिका व्यवहारीं ॥ ऐसा तूं अंतरीं रूपवी मज ॥ १ ॥ परि तुझ्या चरणीं माझें अनुसंधान ॥ तरी प्रेम पावन देई देवा ॥ २ ॥ मनाचिये वृत्ती अखंड तूं राहोनी ॥ झेंपावती झणीं काम क्रोध ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें पावसी तूं मातें ॥ तरी मी जीवें तूंतें न विसंबे ॥ ४ ॥

॥ ६२० ॥ येई हो विठ्ठले भक्तजनवत्सले ॥ करुणा कल्लोळे पांडुरंगे ॥ १ ॥ सजलजलदघन पीतांबर परिधान ॥ येई उद्धारणे केशिराजे ॥ २ ॥ नामा ह्मणे तूं विश्वाची जननी ॥ क्षिराब्धि निवासनी जगदंबे ॥ ३ ॥

॥ ६२१ ॥ शरीराचा भाव तुज नाहीं देवा ॥ तेथें मी केशवा काय बोलूं ॥ १ ॥ अंगदाचे आंगीं बळ देसी फार ॥ बहु उपकार कळों आले ॥ २ ॥ तुह्मा नित्य न्याय नोव्हे साचपण ॥ बळि तूतें दान देऊनि ठके ॥३॥ नामा ह्मणे सदा काय म्यां गाऱ्हाणें ॥ किती नारायणे देऊं आतां ॥ ४ ॥

॥ ६२२ ॥ हेंचि मागतसें तुज ॥ वनीं जन्म देई मज ॥ १ ॥ सुखें करूनि राहेन ॥ तुझे पाहीन चरण ॥ २ ॥ शीण बहुत पावलों ॥ आतां तुजपाशीं आलों ॥ ३ ॥ नकरी अव्हेर ॥ दास तुझा मी किंकर ॥ ४ ॥ येत काकुळती ॥ नामा ह्मणे देवाप्रती ॥ ५ ॥

॥ ६२३ ॥ हिरे जळामधीं भिजतील कधीं ॥ तैसें कृपानिधी केलें आह्मां ॥ १ ॥ आमुचा विकल्प आमुचा विकल्प ॥ आमुचा विकल्प आह्मा नाडी ॥ २ ॥ कामधेनु संगें गाढव बांधिलें ॥ तयाचें तें मोलें तुके केंवि ॥ ३ ॥ काय म्यां करावें पाठीलागे भोग ॥ नामा ह्मणे योग तुझ्या हातीं ॥ ४ ॥

॥ ६२४ ॥ सदा माझें मन ओढे पंढरीनाथा ॥ न सोडी सर्वथा पाय तुझे ॥ १ ॥ यासि काय करूं सांगाजी विठ्ठला ॥ स्नेह कां लाविला पूर्वींहूनि ॥ २ ॥ हृदयीं चित्तवृत्ति मनासि मिळोनि ॥ अवघी तुझे चरणीं सुरवाडली ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा धरली तुझी सेवा ॥ सुख अनुभवा अनुभविलें ॥ ४ ॥

॥ ६२५ ॥ आशा तृष्णा व्याघ्र देखोनियां डोळां ॥ झालेंसें व्याकुळ चित्त माझें ॥ १ ॥ पावेगा विठोबा पावेगा विठोबा ॥ पावेगा विठोबा मायबापा ॥ २ ॥ तूं भक्त कैवारी कृपाळुवा हरि ॥ येईगा झडकरी देवराया ॥ ३ ॥ नामा ह्मणे आन नाहीं तुजवांचोनि ॥ जनक जननी केशिराजा ॥ ४ ॥

॥ ६२६ ॥ संसार परजनीं ॥ दूर दिधलें मज साजणी ॥ द्वारकापुर पाटणीं ॥ माझें माहियेर ॥ १ ॥ थोर उत्कंठा मनीं ॥ वाट पाहें प्रतिदिनीं मज नेत कां न कोणी ॥ तया माहियेरा ॥२॥ चित्तीं न लगती व्यापार ॥ मनीं हेंचि वारंवार ॥ आड ठाकले गिरी डोंगर ॥ तया माहियेरा ॥ ३ ॥ माझिये सासुये निष्ठुरें ॥ दुरळ बोलिलीं उत्तरें ॥ तंव तंव मी तुतें स्मरें ॥ विठू बापु माहियेर ॥ ४ ॥ येथें कोणी नाहीं माझें एक ॥ जें त्यासि बोलूं सुख दुःख ॥ हें मन उतावेळ देख ॥ तया माहियेरा साठीं ॥ ५ ॥ कामक्रोध भावे दीर ॥ बोलती अति निष्ठुर ॥ तेवेळीं त्यजिजे संसार ॥ ऐसें वाटतसे मना ॥ ६ ॥ या वो संसारीं न सीजे ॥ संगु अवघाची सांडिजे ॥ निःसंग होऊनी राहिजे ॥ तया माहियेरा ॥ ७ ॥ या वो प्राणाचे संकटीं ॥ आत्मा ठेवूनियां कंठीं ॥ मग चालवी घररहाटी ॥ ह्मणिये काम रात्रंदिवस ॥ ८ ॥ याचे क्रूर बोल न होती ॥ तेणें मी असें निर्बुज चित्तीं ॥ निरोप धाडूं कवणा हातीं ॥ तया माहियेरा ॥ ९ ॥ तंवचि वो शिणिजे ॥ जंव यातें न वोळंगीजे ॥ याचें बीज पाविजे ॥ नामें एकें विठ्ठलें ॥ १० ॥ आतां बहु काय बोलिजे ॥ यासि सुवेळा न पुसिजे ॥ पुण्य मार्गें जाईजे ॥ तया माहियेरा ॥ ११ ॥ माझि सखी जे का भक्ति ॥ मज तेचि संबोखिती ॥ तिये लाविलें शुद्धमती ॥ साच ते मज चुकों नेदी ॥ १२ ॥ सत्य भावो मज सांगाती ॥ येर लटकिया व्युत्पत्ति ॥ मी वो जाईन हरखें जतीं ॥ तया माहियेरा ॥ १३ ॥ कृष्ण माउली भेटेल ॥ शीण अवघाची हरेल ॥ सुख आनंदु न मायेल ॥ या या त्रिभुवनीं ॥ १४ ॥ या बहु जन्माचा शीण वो जाईल ॥ विठोदर्शनें दुःख हरेल ॥ नामा सुखिया होईल ॥ केशव चरणीं ॥ १५ ॥

॥ ६२७ ॥ स्वामि एक व्हावा तुजचि सारिखा ॥ करी निज सेवका जगद्वंद्य ॥ १ ॥ देऊनि प्रेमभातें पाळिसी तूं बाळे ॥ न करिसी जीवा वेगळें क्षणभरी ॥२॥ बळि भीष्म नारद उद्धव रुक्मांगद ॥ हनुमंत प्रल्हाद अंबऋषि ॥ ३॥ नामा ह्मणे हेंचि देई जन्मोजन्मीं ॥ मी दास तूं स्वामि केशिराजा ॥४॥

॥ ६२८ ॥ विश्वंभर नाम तुझें कमळापती ॥ जगीं श्रुति स्मृति वाखाणिती ॥ १ ॥ गौळ्यांचे घरींचें दहीं लोणी चोरुनी ॥ खातां चक्रपाणी लाजसीना ॥ २ ॥ आतां दीनानाथा तुझें ब्रीद साचें ॥ तरी भूषण आमुचें जतन करी ॥ ३ ॥ येर ठेवा ठेवी कायसी आतां आह्मा ॥ विनवितो नामा केशिराजा ॥ ४ ॥

॥ ६२९ ॥ ह्मणती गौळणी हरिचीं पाउलें धरा ॥ रांगत रांगत येतो राजमंदिरा ॥ १ ॥ परब्रह्म निज स्वरूप हें गौळियां घरीं ॥ पायीं वांकिया अंदुवा कृष्ण नवनीत चोरी ॥ २ ॥ लपत छपत येतो राजभुवनीं ॥ नंदाचे देव टाकुनि आपण बैसे सिंहासनीं ॥ ३ ॥ सांपडला देव्हारा यासि बांधी दावेंनि ॥ तंव पाहे शंखचक्र गदा शार्ङ्गपाणि ॥ ४ ॥ थोरा कष्टें बहुता पुण्य जोडलेति देवा ॥ अनंत पवाडे तुमचे नकळती मावा ॥ ५ ॥ विष्णुदास नामा ह्मणे अहो केशवा ॥ जन्मोजन्मीं द्यावी आह्मां चरणसेवा ॥ ६ ॥

॥ ६३० ॥ तुझें नाम ह्मणतां सुलभ अनंता ॥ दुर्लभ ह्मणतां अंतकाळीं ॥ १ ॥ तैसें तुवां मज केशवा करावें ॥ हृदयीं भेदावें नाम तुझें ॥ २ ॥ मुके पशु पक्षि वृक्ष आणि पाषाण ॥ तयां नारायणा गति कैसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे कैसें केशवा सांगणें ॥ अज्ञानी तें नेणें कवणें परी ॥ ४ ॥

॥ ६३१ ॥ मुक्तपण आह्मां नको देवराया ॥ भेटी मज पायां पुरे बापा ॥ १ ॥ चातुर्यपणाची नको मज चाड ॥ प्रेमभाव गोड पुरे बापा ॥ २ ॥ खाय भिल्लिणीचीं फळें आवडतीं ॥ काय त्याचे चित्तीं दुजा भाव ॥ ३ ॥ भावापाशीं देव उभा सर्वकाळ ॥ खेंचरानें बळें दाखविला ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज सद्गुरूची सत्ता ॥ आह्मासि मुक्तता नको बापा ॥ ५ ॥

॥ ६३२ ॥ ममता तुटेना मज केशिराजा ॥ आंगीं भाव दुजा लागे पाठीं ॥ १ ॥ शरीरीं तितिक्षा नाहीं क्षमा शांति ॥ यालागीं श्रीपति वायां गेलों ॥ २ ॥ नामा ह्मणे देवा तारिसी पतीता ॥ ह्मणोनियां सत्ता केली आह्मीं ॥ ३ ॥

॥ ६३३ ॥ पाहतां तुझे चरण हरली भवव्यथा ॥ पुढती एक चिंता वाटतसे ॥ १ ॥ क्षणीं मुक्तिपद देसी पांडुरंगा ॥ मग या संतसंगा कोठें पाहूं ॥ २ ॥ मग हे पंढरी आनंद सोहळा ॥ कवणाचे डोळां पाहूं देवा ॥ ३ ॥ मग हे हरिकथा अमृत संजीवनीं ॥ कवणाचे श्रवणीं ऐकों देवा ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज पंढरीची सोय ॥ अनंत जन्म होय याचि लागीं ॥ ५ ॥

॥ ६३४ ॥ सगुण निर्गुण जें कांहीं बोलिजे ॥ तें तूं सर्व माझें पांडुरंगा ॥ १ ॥ आहे तितुकें तूंचि सर्वगत ॥ मी काय अनाथ वर्णूं तुज ॥ २ ॥ चरणाची आवडी न संडावी मनें ॥ यापरि पोसणें मायबापा ॥ ३ ॥ साक्ष भीमरथी संत पुंडलीक ॥ नामा ह्मणे आणीक नलगे कांहीं ॥ ४ ॥

॥ ६३५ ॥ बहुत जन्मांशेवटीं तुजशीं झाली भेटी ॥ बहु मी हिंपुटी झालों थोर ॥ १ ॥ बहुकीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं ॥ बहुत केले सुखी शरणांगत ॥ २ ॥ बहुतां आसक्त बहुतां ओळंगणा ॥ बहुत विटंबना झाली माझी ॥ ३ ॥ बहु फेरे पाहिले बहु दुःख साहिलें ॥ बहु चित्तें वाहिलें दुर्भरुचि ॥ ४ ॥ बहुत काळ गेले बहु अन्याय केले ॥ बहु नाहीं जोडिलें नाम तुझें ॥ ५ ॥ ऐसा मी अपराधी पावे कृपानिधी ॥ बहु संतां सन्निधीं ठेवी नामा ॥ ६ ॥

॥ ६३६ ॥ तान्हेलों भूकेलों ॥ तुझेनि नामें निवालों ॥ १ ॥ तहान नेणें भूक नेणें ॥ अखंड पारणें नामीं तुझ्या ॥ २ ॥ अमृतलिंग केशव हा चित्तीं ॥ तेणें नामया तृप्ति अखंडित ॥ ३ ॥

॥ ६३७ ॥ माझें व्रत एक चालवी विठ्ठला ॥ सकळां घटीं तुला देखें ऐसें ॥ १ ॥ तेव्हां माझें चित्त पावे समाधान ॥ नाहीं तरी जिणें काय व्यर्थ ॥ २ ॥ तुझी कास आणि बुडे महापूरीं ॥ ऐसें होतां हरी लाज कोणा ॥ ३ ॥ मागितलें फार तुज काय देवा ॥ नको बा केशवा मीतूंपण ॥ ४ ॥ नामा ह्मणे माझा कैवारि सबळ ॥ असोनियां काळ भोगूं कशा ॥ ५ ॥

॥ ६३८ ॥ माझ्या बोबडिया बोला ॥ चित्त द्यावें बा विठ्ठला ॥ १ ॥ वारा जाय भलत्या ठाया ॥ तैसी माझी रागछाया ॥ २ ॥ गातां येईल तेणेंचि गावें ॥ येरीं हरि हरि ह्मणावें ॥ ३ ॥ तान मान नेणें देवा ॥ नामा विनवितो केशवा ॥ ४ ॥

॥ ६३९ ॥ माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा ॥ केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥ नाहीं नाहीं मज आणिक सोयरा ॥ न करी अव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥ अनाथाचा नाथ होशी तूं दयाळा ॥ किती वेळोवेळां प्रार्थूं आतां ॥ ३ ॥ नामा ह्मणे जीव होतो कासावीस ॥ केली तुझी आस आतां बरी ॥ ४ ॥

॥ ६४० ॥ भीत नाहीं भीत नाहीं ॥ अखंडहि सावध ॥ १ ॥ उघड समाधि उघड समाधि ॥ अंतर बुद्धि निर्मळ ॥ २ ॥ गोंविसी कासया गोंविसी कासया ॥ पढंरिराया सांभाळी ॥ ३ ॥ नामा ह्मणे जगज्जीवना ॥ नारायणा सांभाळी ॥ ४ ॥

॥ ६४१ ॥ पुलक धर्म रोमांच नाहीं जंव उठले ॥ सजळ नाहीं झाले नयन जंव ॥ १ ॥ हरिभक्तीचें सुख कळलें जे ह्मणती ॥ लटिके बोलीजेति उभय-

लोकीं ॥ ध्रु० ॥ ऐसा भक्तीप्रेमा देई जी देवा ॥ सर्व भावें सेवा घडे तुझी ॥ २ ॥ श्रवणीं ऐकतां नाम वाचे भव बोले ॥ नाहीं सुखावलें मन त्याचें ॥ ३ ॥ श्रीहरिचें नाम ह्मणवितां न ह्मणे ॥ सहज उच्चारणें कैंचे त्यासी ॥ ४ ॥ दर्दुरा चोरापरी जिव्हा चटचटी ॥ नाम सांडोनी गोष्टी राज्याची करी ॥ ५ ॥ देवाच्या मूर्ती संत महंत देखोनी ॥ नवचे लोटांगणी भावें त्यांसी ॥ ६ ॥ न लावी त्यांचें रज टकमका पाहात ॥ बुजवण जैसें सेत राखे तैसें ॥ ७ ॥ ऐसे कैक प्राणी आहेत मूढमती ॥ हीत सांगतां चित्तीं दुःख वाटे ॥ ८ ॥ नामा ह्मणे केशवा मी तुझें दीन ॥ नेणें तुज वांचोन आनदुजा ॥ ९ ॥

॥ ६४२ ॥ कपट नाटका कल्लोळ करूणा ॥ मजलागीं दिन होसी देवा ॥ १ ॥ रात्रंदिस मज ठेवुनि जवळी ॥ घालसी कवळी मुखामाजीं ॥ २ ॥ पेंद्या सुदाम्याचे करिसी कैवार ॥ मजसी अंतर केलें आतां ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें करितों बोभाटा ॥ भेऊं नको ठका पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ६४३ ॥ महिमा अगाध यात्रा कार्तिकीये ॥ आला पंढरिये नामदेव ॥ १ ॥ भक्तशिरोमणी पंढरीच्या नाथा ॥ कृपाळु बा माता बाळकासी ॥ २ ॥ धन्य नामदेव धन्य नामदेव ॥ जिवीं तुझे पाव न विसंबे ॥ ३ ॥ भक्त सप्रेमळ मिळाले अपार ॥ करिती गजर हरिनामीं ॥ ४ ॥ नटे महाद्वारीं झळके पताका ॥ करिती ब्रह्मादिक पुष्पवृष्टि ॥ ५ ॥ नामघोष कानीं समस्त ऐकती ॥ पाषाण द्रवती तेणें प्रेमें ॥ ६ ॥ नामा ह्मणे जीव निवालासे येथें ॥ पहातां विठोबातें श्रमु गेला ॥ ७ ॥

॥ ६४४ ॥ पतित पावना धांवसि निर्वाणीं ॥ ब्रीद चक्रपाणी सत्य केलें ॥ १ ॥ काय अपराध कोणाचे पाहिले ॥ नाहीं तूं त्यागिलें नष्टखळां ॥ २ ॥ अजामेळासाठीं अहार वर्जिले ॥ बीज तें भर्जिलें भवमूळ ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा नागवण बारे ॥ आतां उणें पुरे पाहूं नको ॥ ४ ॥

॥ ६४५ ॥ गोक्षीर लाविलें अंधळिया मुखीं ॥ तेथील पारखी जिव्हा जाणे ॥ १ ॥ तैसें देवा तुझें नाम निरंतर ॥ जिव्हेसी पाझर अमृताचे ॥ २ ॥ सोलुनियां केळें साखरें घोळिलें ॥ अंधारीं खादलें तरी गोड ॥ ३ ॥ द्राक्ष-फळां घड सेवितां चोखड ॥ तयाहुनि गोड नाम तुझें ॥ ४ ॥ आळुनियां क्षीर तुपाचिये आळें ॥ कालविले गुळें गोड जैसें ॥ ५ ॥ जाणोनियां नामा करी विनवणी ॥ अमृताचि खाणी नाम तुझें ॥ ६ ॥

॥ ६४६ ॥ आजकाळीं मी परदेशी ॥ ऐसें जाणोनी मानसीं ॥ ह्मणोनिया हृषीकेशी ॥ शरण आलों मी तुज ॥ १ ॥ नवमास गर्भवासी ॥ कष्ट झाले तया मातेसी ॥ तिही निष्ठुर झाली कैसी ॥ आजी दूर राहिली ॥ २ ॥ जें जें बापासी आवड ॥ मुखीं घाली करी कोड ॥ जेव्हां लागे यम वोढ ॥ तेव्हां दूर राहिला ॥ ३ ॥ बंधुबहिणीचा कवळा ॥ हे तूं जाणसी दयाळा ॥ जेव्हां पडली यमशृंखळा ॥ तेव्हां दुरी राहिलीं ॥ ४ ॥ कन्यापुत्रादिक बाळ ॥ हे तो स्नेहाचे स्नेहाळ ॥ तुझे दर्शनाविण व्याकुळ ॥ अंतीं दुरी राहीलीं ॥ ५ ॥ देहघराची कामीनी ॥ ती तो राहिली भूवनीं ॥ अंतीं जळून स्मशानीं ॥ अग्निसवें एकला ॥ ६ ॥ मित्र आले गोत्र आले ॥ ते तों स्मशानातुनी परतले ॥ सेखीं टाकोनियां गेले ॥ एकलाची स्मशानीं ॥ ७ ॥ ऐसा जाणोनि निर्धार ॥ मग मज आलासे गहिंवर ॥ दाही दिशा अंधःकार ॥ मग मज कांहीं न सुचे ॥ ८ ॥ ऐसें जाणोनिया पाही ॥ मनुष्य-जन्म मागुता नाहीं ॥ नामा ह्मणे तुझे पायीं ॥ ठाव देई विठ्ठला ॥ ९ ॥

॥ ६४७ ॥ दासत्व न घडेची तुझें ॥ आयुष्य वेचीलें वीण काजें ॥ धरणी ओझें पैं झालें ॥ तुझ्या प्राप्ति वाचोनि ॥ १ ॥ पुनरपी जन्मा येइन मागुता ॥ कवण जाणे कैसी व्यवस्था ॥ तुज मी ध्याइन अनंता ॥ ऐसा लाभ कैं होइल आतां ॥ २ ॥ तुझ्या नामाचा वोरसु ॥ तेणें चुकला गर्भवासु ॥ नामा वीनवी विष्णुदासु ॥ देइ सौरसु आपुले नामीं ॥ ३ ॥

॥ ६४८ ॥ कां गा केशिराजा मोकलीलें मातें ॥ शरण मी कोणातें जाऊं आतां ॥ १ ॥ तुजविण मज न दिसे निर्वाणीं ॥ मायबाप धणी गण-गोत ॥ २ ॥ आतां माझी लाज राखे पंढरीनाथा ॥ तुजविण अनंता आणिक नाहीं ॥ ३ ॥ अनाथांचा नाथ दीनांचा कैवारी ॥ पाव झडकरी आपुल्या दासा ॥ ४ ॥ गोरियाचे हात आलेचि तत्क्षणीं ॥ नामा कीर्ति वर्णी विठोबाची ॥ ५ ॥

॥ ६४९ ॥ पांडुरंगा तुझी पाहतसें वास ॥ चरण रात्रंदिवस चिंतीतसें ॥ १ ॥ तान्हें वत्स घरीं बांधलेंसे दाव्यां ॥ हृदयीं स्मरे धांवा माउलीचा ॥ २ ॥ नामा ह्मणे विठो तूं माझा सोयरा ॥ झणीं मज अव्हेरा अनाथनाथा ॥ ३ ॥

॥ ६५० ॥ आडलीया कोंवसा आनाथ कैवारी ॥ ब्रीद चराचरीं वर्णीताती ॥ १ ॥ येई बा श्रीहरी तूं आमुचा कैवारी ॥ सुदर्शन करीं वेगीं येई

॥ ध्रु० ॥ द्रौपदीच्या आक्रांतीं पावलासी लौकरी ॥ तैसा झडकरीं येई शीघ्र ॥ २ ॥ गजेंद्राकारणें कळवळा अगाध ॥ जगीं तुझें ब्रीद तैसा येई ॥ ३ ॥ सुदामा ब्राह्मण अनाथ दुर्बळ ॥ तेथें तूं केवळ अवतरलासी ॥ ४ ॥ ध्रुवासी स्थापिलें उपमन्यु कारणें ॥ क्षीरसागर देणें तैसा येई ॥ ५ ॥ अंबऋषी-साठीं सोशी गर्भवास ॥ दुर्वासा कासावीस तैसा येई ॥ ६ ॥ विदुरासी भक्तपण तूं उद्धवासी जवळी ॥ अर्जुना सर्वकाळीं तैसा येई ॥ ७ ॥ गोपाळा यशोदा नंदासी खेळसी ॥ गायी रानीं चारिसी तैसा येई ॥ ८ ॥ नामा ह्मणे मागेन सदा अभयकर ॥ प्रेमाचा उद्धार तैसा येई ॥ ९ ॥

॥ ६५१ ॥ शेळीस घातली उंसाचि वैरणी ॥ घेऊं नये धणी त्या रसाची ॥ १ ॥ तैसी तें चुकलीं जगाच्या जीवना ॥ अनुभवाविणा खुणा नेणे कोण ॥ २ ॥ दर्दुर कमळणी एकची बिऱ्हाड ॥ मूर्ख ते गव्हार भोगूं नेणें ॥ ३ ॥ परब्रह्मीची गोडी नेणती बापुडी ॥ संसार अकडी विषय भरीत ॥ ४ ॥ कुलालाचे घरीं बांधिलासे हात्ति ॥ तया घरीं माती वाहतसे ॥ ५ ॥ नामा ह्मणे चुकली तुज न देखतां ॥ अमृत सेवितां रुची नेणे ॥ ६ ॥

॥ ६५२ ॥ हरी रे वाढवेळ झाला ॥ कोण्या भक्तानें गोंविला ॥ १ ॥ झडकरीं येई गा विठ्ठला ॥ कंठ आळवितां शोषला ॥ २ ॥ प्राण केव्हां येइल माझा ॥ आलिंगीन चहुंभुजां ॥ ३ ॥ नामा गहिवरें दाटला ॥ पूर धरणीये लोटला ॥ ४ ॥

॥ ६५३ ॥ केशवाचें मज पाहूं द्या श्रीमुख ॥ लागलीसे भूक नय-नांसी ॥ १ ॥ कस्तुरीकुंकूमें भरोनियां ताट ॥ अंगीं वरवंट गोपाळासी ॥ २ ॥ जाई जुई पुष्पें गुंफियेल्या माळा ॥ घालोनि घननीळा आवडीनें ॥ ३ ॥ नामा ह्मणे हरी पंढरीचे राणे ॥ श्रीमुख पारणें होत असे ॥ ४ ॥

॥ ६५४ ॥ वायां ताडातोडी केली माझ्या मनें ॥ राहिलों लपोन तुझे पायीं ॥ १ ॥ नको नको मज कल्पनेचा संग ॥ आलासे उद्वेग नारायणा ॥ २ ॥ कामक्रोध लोभ पाठिं लागों येती ॥ झणीं सांचे हातीं देसी देवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे होसी अनाथांचा कैवारी ॥ ब्रिदें चराचरीं वर्णि-ताती ॥ ४ ॥

॥ ६५५ ॥ तुझ्या पायीं चित्त रंगलेंसे माझें ॥ नाहीं केशीराजें ऐसें केलें ॥ १ ॥ उठवितां काय होईल संतोष ॥ मज अभाग्यास मोकलीलें ॥ २ ॥

प्रपंच कावाडीं घाली मज दृढ ॥ नको वाडें कोडें झणीं देवा ॥ ३ ॥ नामा शिंपियाचा विनवी समस्तां ॥ नको भंगु आतां प्रेमपान्हा ॥ ४ ॥

॥ ६५६ ॥ केशव चरणीं मनें दिली बुडी ॥ इंद्रियें बापुडीं धांवतीं पाठीं ॥ १ ॥ संसार समग्र नको सुखलेश ॥ भातुकें सरीसें पाठवीसी ॥ २ ॥ जन्म जन्मांतरीं जाणावें कवणें ॥ नेणोनी भोगणें कोणें स्वामी ॥ ३ ॥ नामा ह्मणे भक्तवत्सला केशवा ॥ आह्मांसाठीं धांवा घाली हरी ॥ ४ ॥

॥ ६५७ ॥ सकळ वैभव निजकर्म भोग ॥ तो तुज उद्वेग दावी कांई ॥ १ ॥ मीतूंपण तेथें असे मग कैचें ॥ निर्माण ठायींचें तोडी वेळे ॥ २ ॥ आपुला करुनी ठेवा तुझे पायीं ॥ थोरपण कांहीं नको मज ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझें सोलीन ढोंपर ॥ कायसा विचार देखों आतां ॥ ४ ॥

॥ ६५८ ॥ भागलासि देवा धांव धांवणिया ॥ दाखविसी पायां पांडुरंगा ॥ १ ॥ गजेंद्र गणिका तुह्मा श्रमविलें ॥ मी काय उगलें परदेशीं ॥ २ ॥ सोळा सहस्र गोपी त्या उद्धरती ॥ माझी कींव चित्तीं कां बा नये ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मां पुरे तुझा संग ॥ वारंवार मग वारी कोण ॥ ४ ॥

॥ ६५९ ॥ बाराहि मारग मोकळे ते केले ॥ कोंकण वाहिलें नामदेवें ॥ १ ॥ आणिलें तें केणें आणिलें तें केणें ॥ आणिलें तें केणें विठ्ठल नाम ॥ २ ॥ शंख चक्राचा केला पडिभरू ॥ टका निरंतरु झळकतसे ॥ ३ ॥ जिवींचिया जीवा भावाचिया भावा ॥ तुज वांचुनी केशवा आन नावडे ॥ ४ ॥ जीवें अनुसरलीये अझुनि कां नये ॥ वेगीं आणी सर्वे प्राण माझा ॥ ५ ॥ गरुडवाहन गंभीरा स्वामी नाम्या दातारा ॥ रखुमादेवीवरा श्रीविठ्ठला ॥ ६ ॥

॥ ६६० ॥ बा भेटीचें आर्त उत्कंठित चित्त ॥ न राहे निवांत कवणे ठायीं ॥ १ ॥ जया देखे तया पुसे हेचि मात ॥ कैं मज पंढरिनाथ बोलावील ॥ २ ॥ माहेरींची आस दसरा दिवाळी ॥ बाहे ठेवुनि निढळीं वाट पाहे ॥ ३ ॥ कृपेचा सागरु विठो लोभापरु ॥ परि कां माझा विसरु झाला त्यासी ॥ ४ ॥ विटेसहित चरण देइन आलिंगनु ॥ तेणें माझी तनु वोलावेल ॥ ५ ॥ ऐसा निलाजिरा नामा कंठीं धरूनि प्राण ॥ करितों तुझें ध्यान रात्रं-दिवस ॥ ६ ॥

॥ ६६१ ॥ बुद्धिहीन अती करितो हव्यास ॥ उठती उद्देश नाना मतें ॥ १ ॥ एकापुढें एक नासोनियां जाती ॥ सोशिली विपत्ति जन्म मरण

॥ २ ॥ वासनेचे संगें बुडालों मी वांया ॥ चुकवूं नको पायांसवें भेटी ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे गेले बहुतेक ॥ वैकुंठनायका तारी मज ॥ ४ ॥

॥ ६६२ ॥ दुरुनि आलों तुझे भेटी ॥ सांगावया जीवींची गोष्टी ॥ १ ॥ बोल गा बोल मजशीं कांहीं ॥ दृष्टि वळवूनि मजकडे पाही ॥ २ ॥ अरे तूं कृपाळु दीनांचा ॥ महा उदार थोर मनाचा ॥ ३ ॥ भक्तें पुंडलीकें गोंविलासी लोभें ॥ प्रीतीच्या प्रेमें वळलासी वल्लभे ॥ ४ ॥ युगें अठ्ठावीस भरलीं ॥ धणी अझुनी नाहीं पुरली ॥ ५ ॥ प्राण होती माझे कासाविस ॥ नामा ह्मणे कां धरिलें उदास ॥ ६ ॥

॥ ६६३ ॥ दास झाल्यावरी करिसी उदास ॥ मनीं तें तुह्मांस आणी देवा ॥ १ ॥ सोशिले प्रवास जन्मजन्मांतर ॥ करिसी अव्हेर आह्मांलागीं ॥ २ ॥ भार खांद्यावरी घेउनी हिंडसी ॥ होसी मजविशीं पाठमोरा ॥ ३ ॥ श्रुति सावकाश गाती इतिहास ॥ काय कासाविस होय तुम्हां ॥ ४ ॥ नामा ह्मणे नको वाउगे उदीम ॥ न सोडीं मी नाम केल्या कांहीं ॥ ५ ॥

॥ ६६४ ॥ देवा निढळावरी हात दोनी ॥ पाहे चक्रपाणी वाट तुझी ॥ १ ॥ धांव गा धांव गा सख्या पांडुरंगा ॥ जीवीं जीवलगा मायबापा ॥ २ ॥ तुजविण ओस दिसती दाही दिशा ॥ धांव जगदीशा मजसाठीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे काय बैसलों निवांत ॥ धांवतो अनंत भक्तांसाठीं ॥ ४ ॥

॥ ६६५ ॥ नेणों विठो मार्ग चुकला ॥ उघडा पंढरपुरा आला ॥ भक्त पुंडलीकें देखिला ॥ उभा केला ॥ १ ॥ तो हा विठोबा निधान ॥ ब्रह्मादिकां ज्याचें ध्यान ॥ पाउल समान ॥ विटेवरी गोजिरीं ॥ २ ॥ रूप पाहतां डोळसु ॥ सुंदर पाहतां गोपवेषु ॥ महिमा पाहतां महेषु ॥ तेहीं मस्तकीं वंदिला ॥ ३ ॥ भक्तिसुखें लांचावला ॥ जाऊं नेणे उभा केला ॥ विष्णुदास नामा ह्मणे विठ्ठला ॥ जन्मोजन्मीं न विसंबें ॥ ४ ॥

॥ ६६६ ॥ नेणें मन कांहीं विश्वास नामाचा ॥ गोसावी आमुचा पांडुरंग ॥ १ ॥ संसारीं पडलों कर्माचे भांडारीं ॥ कृपा निरंतरीं करी मज ॥ २ ॥ नेणें तुझें ध्यान नेणें तुझें प्रेम ॥ दावी मज वर्म सेवकासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझे गुण दोष कांहीं ॥ ठाव तुझे पायीं देई मज ॥ ४ ॥

॥ ६६७ ॥ न विचारितां बळि घातला पाताळीं ॥ सर्वेची कणव उपजली तये वेळीं ॥ द्वार न संडीसी कवणे काळीं ॥ ऐसी तुझी करणी दातारा

॥ १ ॥ अगा केशवा सुजाणा ॥ गाऱ्हाणें सांगूं कवणा ॥ तुझीये नामें तुटे बंधना ॥ देवकीनंदना वासुदेवा ॥ २ ॥ वसुदेव बांधवडी ॥ आपदा करोन एवढी ॥ मग त्या कंसा केली धाडी ॥ मोक्ष तया दिधला ॥ ३ ॥ सुदामा सांगातें जेवी ॥ धान्य मागे गांवोगांवीं ॥ आपदा करोनी बहुही ॥ मग त्यासी राज्य दिधलें ॥ ४ ॥ जोहरीं सुदलें पांडवां ॥ सर्वेची उपजली कणवा ॥ अग्नी पासोनी केशवा ॥ रक्षियलें तयांसी ॥ ५ ॥ सभा पिसुनाची दाटली ॥ द्रौपदा वस्त्रें आसुडली ॥ एवढी आपदा करविली ॥ मग वस्त्रें पुरविलीं तियेतें ॥ ६ ॥ दैत्यें गांजियला प्रल्हाद ॥ तुझ्या नामाचा घेतला छंद ॥ एवढा करोनियां खेद ॥ मग त्या दैत्या वध केला ॥ ७ ॥ बिभीषणा हाणितल्या लाथा ॥ लंका दिली त्या उचिता ॥ समर्थें केलें तें बरवें आतां ॥ तूं रघुनाथा ऐके पैं ॥ ८ ॥ आह्मी लाडके डिंगर ॥ माझें बोलणें उद्धट फार ॥ तूं तंव कृपेचा सागर ॥ उतरी पार ह्मणे नामा ॥ ९ ॥

॥ ६६८ ॥ नेत्र माझे रोडले आठवे माहेर ॥ कैं भेटेन निरंतर बाईयांनो ॥ १ ॥ चतुर्भुज विठ्ठलु कैं देखेन डोळां ॥ भक्तांचा जिव्हाळा जीव माझा ॥ २ ॥ येणें शोकें रे वाळलों शरिरीं ॥ आठव तो हरी मी काय सांगूं ॥ ३ ॥ चारी भुजा उचलोनि क्षेम देईल ॥ कैं मज नेईल पंढरपुरा ॥ ४ ॥ काम चित्तीं नलगे आतां कांहीं मज ॥ कैं भेटेल राजा पंढरीचा ॥ ५ ॥ त्यासि आठवितां हृदय वो फुटे ॥ तो कैं मज भेटे बाप माझा ॥ ६ ॥ येणें देह न पवती मग काय येउनी करिती ॥ सांगा काकुळती रखुमाईसी ॥ ७ ॥ वामांगीं रुक्मिणी कैं देखेन दोन्ही नयनीं ॥ फेडीन पारणीं डोळियांचीं ॥ ८ ॥ जंव जंव आठवती तंव तंव उभड येती ॥ कोणी न सांगती विठ्ठलासी ॥ ९ ॥ ऐसें श्रवणीचें सुख कैचेंनवो देखें ॥ येथ येवोनि बहुतेकें काय करिती ॥ १० ॥ गरुडटके अवघे आकाशीं वोळले ॥ येवोनि सांगितलें विष्णुलोकीं ॥ ११ ॥ मग जावोनियां तया ठाया पाहें पंढरीराया ॥ लागेन मी पायां तयाचिये ॥ १२ ॥ याचि लागोनियां आलों लवडसवडी ॥ सांडियेली थडी मग रोखिलासी ॥ १३ ॥ गरुडावरी आरुढ बाप माझा झाला ॥ मज न्यावया आला बाईयानों ॥ १४ ॥ येणें हर्षें संतोष कोठेंच न माये ॥ भेटला विठ्ठल माय रुक्मिणीसहित ॥ १५ ॥ नामा जातसे माहेरा एकला पंढरपुरा ॥ हारि दातारा संसारा वेगळें करी ॥ १६ ॥

॥ ६६९ ॥ पंढरी माहेर विठ्ठल माउली ॥ धांवोनि हे बोली सांगावी ॥ १ ॥ संसारगांवीं लेंकी असे तुमची ॥ चिंता कां तियेची सांडियेली ॥ २ ॥

सासुरवासिणी पाहतसे वाट ॥ सांगावे कष्ट विठोबा माउलीये ॥ ३ ॥ अन्हेर माझा असे अविचारु भावा ॥ आशा तृष्णा लावा वहिनी कां ॥ ४ ॥ एकलीये माते खेदती बहुतें ॥ एकांतें तुमतें आठवीन ॥ ५ ॥ चांडाळी हे सासू तृष्णा पैं पापिणी ॥ कांहीं केल्या धनी पुरों नेदी ॥ ६ ॥ रात्रंदिवस मज नाहीं कामाचा शेवट ॥ जीवित्वाचा वीट येत असे ॥ ७ ॥ सखी सांगातिणी तिसी नाहीं भेटी ॥ अज्ञान हें पोटीं वाढतसे ॥ ८ ॥ सुखाचे डोह दुःख कां नावडे ॥ ऐसें केंवि घडे तुजविण ॥ ९ ॥ नवां ठायीं तरळली चोळी असे लेइली ॥ आपुलिये चांग अंगींची ते ॥ १० ॥ ती धाडी जों कां रुसलिये ऐसें सांगिजे तिजपाशीं ॥ जेवीना कां भेटी वांचोनिया ॥ ११ ॥ चहूं पुरुषार्थीं नाहीं मज चाड ॥ सेवेचें खाजें झडकरी मज पाठवावें ॥ १२ ॥ रखुमाई माता पांडुरंग पिता ॥ मी त्यांची दुहिता ह्मणे नामा ॥ १३ ॥

॥ ६७० ॥ पैल पिकली पंढरी ॥ विठ्ठल रायाची नगरी ॥ १ ॥ पाहा पाहा एकलें निरुतें ॥ विश्व केलें हें मागुतें ॥ २ ॥ केशव खेळे दान देतां ॥ नामा झालासे मागता ॥ ३ ॥

॥ ६७१ ॥ विसांवा विठ्ठल सुखाची साउली ॥ प्रेमपान्हा घाली भक्तांवरी ॥ १ ॥ दाखवी चरण दाखवी चरण ॥ दाखवी चरण नारायणा ॥ २ ॥ विठ्ठल आचार विठ्ठल विचार ॥ दावी निरंतर पाय आतां ॥ ३ ॥ नामा ह्मणे नित्य बुडालों संसारीं ॥ धांवोनियां धरी हातीं मज ॥ ४ ॥

॥ ६७२ ॥ वानरांच्या संगें स्वयें क्षेम देसी ॥ मज हृषीकेशी न बोलावें ॥ १ ॥ रिसापाशीं सदा स्वभावें तुह्मी खेळा ॥ माझिया कपाळा नातुडसी ॥ २ ॥ पक्षि जटायूचें लेंकरुं तूं होसी ॥ माझ्या कां मनासि नातुडसी ॥ ३ ॥ लावोनि चरण तारियली शिळा ॥ कोळियाचा केला अंगीकार ॥ ४ ॥ नामा ह्मणे तुह्मां सांगावें म्यां किती ॥ राग माना चित्तीं काय वाणूं ॥ ५ ॥

॥ ६७३ ॥ वाणी गांधिपण पाही पसारा ॥ घेवोनि संसारा आलों असे ॥ १ ॥ पसारे करी पसारे करी ॥ वांया उभराउभरी करीतसें ॥ २ ॥ रस रसायण आणि भाजीपाला ॥ शकुन आह्मां झाला पुरता आहे ॥ ३ ॥ वाटे एक खोटें दांडीचें पा नेटें ॥ कवणेपरी न फिटे कुडेंपण ॥ ४ ॥ बोलतों पैं खोटें देतात पैं उणें ॥ यायाच शिणें रात्रंदिवस ॥ ५ ॥ विष्णुदास नामा विनवी केशवा ॥ तेहिपरी देवा उद्धरावें ॥ ६ ॥

॥ ६७४ ॥ वाजविली डाक तेव्हां पडियेले ठायीं ॥ अहाकार केला धांव वेगें विठाबाई ॥ १ ॥ अगा येई वो खेचरे विठाई सुंदरे ॥ तुझीं पाउलें गोजिरें तें मी कैं पाहीन ॥ २ ॥ पाजळला दीप फिटला अंधकार ॥ न लावा उशीर कृपाळूवो विठ्ठले ॥ ३ ॥ तनुमनाची मूद सांडीली ओंवाळूनि ॥ वैकुंठवासिनी भक्तजन विठ्ठले ॥ ४ ॥ अहंकार दैवतें झडपिलें नामयासी ॥ येवोनि वेगेंसी राख रंक आपुला ॥ ५ ॥

॥ ६७५ ॥ स्फुंदत स्फुंदत नामा उभा महाद्वारीं ॥ दृष्टि पायावरी विठोबाच्या ॥ १ ॥ देखोनि केशवें उभारिल्या बाहे ॥ पालवीतु आहे पीतांबरें ॥ २ ॥ संसारावरी रुसलासे नामा ॥ दाटलासे प्रेमा ओसंडत ॥ ३ ॥ येई नाम्या तुज धरीन पोटाशीं ॥ कोणें गांजिलासि दुराचारें ॥ ४ ॥ ऐके वो रूक्मिणि अंजारूनि तुम्ही ॥ वोसंगा घेऊनि आळवावा ॥ ५ ॥ जगत्र जननी संभ्रमें करूनि ॥ प्रीतिपान्हा स्तनीं वोसंडला ॥ ६ ॥ वोरसा हा नामा घेतलासे करीं ॥ मुख पीतांबरें पुसीतसें ॥ ७ ॥ कवणे तुझे चित्तीं लावियला चाळा ॥ न देखतां डोळा स्फुंदतसे ॥ ८ ॥ बुझाविला नामा दाटलासे प्रेमा ॥ हांसे सत्यभामा काय झालें ॥ ९ ॥ कोण कुळीं नामा काय लोभ याचा ॥ तूं स्वामी दीनाचा पांडुरंग ॥ १० ॥

॥ ६७६ ॥ करुणेचीं उत्तरें बोले नामदेव ॥ ऐकोनि पंढरीराव हांसिनले ॥ १ ॥ मग हे विवंचना सांगे रखुमाईसी ॥ ह्मणे नामयासि आणा वेगीं ॥ २ ॥ मग रखुमाई चरणीं ठेवूनि माथा ॥ ह्मणे आणाजी समर्था नामयासि ॥ ३ ॥ मग पंढरीराव रखुमाई ज्ञानदेव ॥ पुंडलीक समुदाय चालिलासे ॥ ४ ॥ येऊनि नाम्यापाशीं उभे पैं ठाकले ॥ पुंडलीक बोले नामयासि ॥ ५ ॥ धन्य नामदेवा तुझा एक भाव ॥ सहित पंढरीराव आले येथें ॥ ६ ॥ पीतांबर छाया रूप प्रगट केलें ॥ नामया आळंगीलें पंढरीरायें ॥ ७ ॥ कडे घेऊनि नामा रखुमाई जननी ॥ प्रेम पान्हा वोसंडोनि पाजी तया ॥ ८ ॥ नामयासि घेऊनि आले पंढरीसी ॥ वैकुंठ ओवरीसि कळस केला ॥ ९ ॥

॥ ६७७ ॥ जन्मजन्मांतरीं घेतलें धरणें ॥ सांग कवण्या गुणें विष्णुदासा ॥ १ ॥ न तूं कांहीं घेसी कांहीं न मागसी ॥ ऋणें किती करिसी सेवारूपें ॥ २ ॥ चतुर्विध मुक्ति अथवा धन संपत्ति ॥ नलगे तुझे चित्तीं काय करूं ॥ ३ ॥ समुद्र वलयांकित अवघें भूमंडल ॥ अथवा रसतळ दुर्लभ

कांहीं ॥ ४ ॥ तुझिये भेटिलागीं आर्त आहे वैकुंठा ॥ पाही तुझी वाट रात्रं-दिवसा ॥ ५ ॥ नामा ह्मणे सर्व ओसंडिलें चित्तें ॥ तुझिया चरणा परतें नलगे कांहीं ॥ ६ ॥

॥ ६७८ ॥ घेरेघेरे नाम्या दिलें माझें प्रेम ॥ घोकी माझें नाम सर्व-काळ ॥ १ ॥ शिरावरी हात ठेवीतसे माझा ॥ अभिमान तुझा गेला ह्मणूनि ॥ २ ॥ भक्तिसुख देवें दिलें नामयातें ॥ नामा परमामृतें तृप्त झाला ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा झालों मी पावन ॥ माझें तुजविण कोण आहे ॥ ४ ॥

॥ ६७९ ॥ आह्मी कांहीं नेणों तुझा अंत पार ॥ होसी निरंतर निवारीता ॥ १ ॥ बहू अपराधी जाण यातिहिण ॥ पतित पावन पांडुरंगा ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसा पातकी पामर ॥ करिसी उद्धार साच ब्रिद ॥ ३ ॥

॥ ६८० ॥ तुझा माझा देवा कांरे वैराकार ॥ दुःखाचे डोंगर दाखविसी ॥ १ ॥ बळें बांधोनिया देशी काळा हातीं ॥ ऐसें काय चित्तीं आलें तुझ्या ॥ २ ॥ आह्मी देवा तुझी केली होती आशा ॥ बरवें हृषीकेशा कळों आलें ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा करा माझी कींव ॥ नाहीं तरी जीव घ्यावा माझा ॥ ४ ॥

॥ ६८१ ॥ माझे गुणदोष आणशील मना ॥ सर्व नारायणा अपराधी ॥ १ ॥ सेवाहीन दीन पातकाची रासी ॥ आतां विचारिसी काय ऐसें ॥ २ ॥ अंगुष्ठ धरूनि मस्तका पर्यंत ॥ अखंड दुष्कृत्य आचरलों ॥ ३ ॥ स्वप्नीं मज तुझी घडली नाहीं भक्ति ॥ पुससी विरक्ति कोठोनियां ॥ ४ ॥ तूंचि माझा गुरु तूंचि माझा स्वामी ॥ सकळ अंतर्यामीं वससी तूं ॥ ५ ॥ नामा ह्मणे माझें चुकवी जन्ममरण ॥ नकरी उदासीन पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ ६८२ ॥ पापाचें संचित देहासी दंडण ॥ तुज नारायणा बोल नाहीं ॥ १ ॥ सुख अथवा दुःख भोगणें देहासी ॥ सोस वासनेसी वाउगाची ॥ २ ॥ पेरि कडु जीरें इच्छी अमृतफळ ॥ अर्कवृक्षा केळीं केविं येती ॥ ३ ॥ मुसळाचें धनु न होय सर्वथा ॥ पाषाण पिळितां रस कैंचा ॥ ४ ॥ नामदेव ह्मणे देवा कां रुसावें ॥ मनाला पुसावें आपुलीया ॥ ५ ॥

॥ ६८३ ॥ निर्गुण निराकार होतें शून्यपणें ॥ आह्मासी असणें तेंचि ठायां ॥ १ ॥ आपुली करणी तुह्मी न विचारोनी ॥ दुसरीया क्षणीं बोल ठेवा ॥ २ ॥ सुखें एकरूप होतों तुझे पोटीं ॥ कासया हे सृष्टी वाढवीली

॥ ३ ॥ विकाराचें मूळ दिधलें हें शरीर ॥ तेणें कष्टी थोर झालों आह्मी ॥ ४ ॥ पाप पुण्य दोन्हीं लाविलीं सांगातें ॥ ह्मणउनी सुखातें अंतरलों ॥ ५ ॥ यमलोकीं वास रौरव यातना ॥ तेणें नारायणा धाक थोर ॥ ६ ॥ खातों जेवितों तें न लागेच अंगीं ॥ झालोंसों उद्वेगी रात्रंदिवस ॥ ७ ॥ ऐसे देह आह्मा कासया दिधले ॥ काय मागितले आह्मीं तुह्मा ॥ ८ ॥सृष्टि पूर्वी पाप नव्हतें ते गा हरि ॥ कासया श्रीहरी कष्टी केलें ॥ ९ ॥ वेदशास्त्रभय आह्मांसी लाविलें ॥ तें तुह्मीं टाकिलें एकीकडे ॥ १० ॥ वेदशास्त्रवचन चुकल्या अवचिता ॥ गोसावीजी होता दंडावया ॥ ११ ॥ मागा चुकलेती तें ठेवा एकीकडे ॥ आतां तरी पुढें सांभाळावें ॥ १२ ॥ एकरूप तुह्मीं होतेती निर्गुणी ॥ तेथें आमचे कोण्ही बोलों आलें ॥ १३ ॥ निर्गुण सांडुनि तुह्मी व्हावें जी सगुण ॥ ऐसें तुह्मा कोणें बोलाविलें ॥ १४ ॥ आपुलीये इच्छें ब्रह्मांडें रचिलीं ॥ काय सांगितलीं जी आह्मी तुह्मा ॥ १५ ॥ लक्ष्मीचे विलास धरिले नाना वेश ॥ हा काय उपदेश आह्मी केला ॥ १६ ॥ विश्व हें निर्गुनी झालेती गोसावी ॥ हे काय सांगावी आह्मी केली ॥ १७ ॥ जें तुह्मां पाहिजे तें तुह्मी निर्मिलें ॥ आपणासवें केलें कष्टी आह्मां ॥ १८ ॥ कल्प जन्मांतरीं योग यागांतरीं ॥ जवळी श्रीहरी होतों आह्मी ॥ १९ ॥ तुह्मी तेथें आह्मी आह्मी तेथें तुह्मी ॥ विचारावें स्वामी पांडुरंगा ॥ २० ॥ तुह्मां आह्मां कांहीं वेगळीक नाहीं ॥ बोलोनियां काई दावूं आतां ॥ २१ ॥ आह्मांहुनि तुह्मी काय सोसिलें अधिक ॥ ठकितसा लोक तैसें नव्हे ॥ २२ ॥ तुह्मांसी अवतार कोरडें काष्टी ॥ तुमच्या नामें दैत्यें कष्टी केलें ॥ २३ ॥ तुह्मांसी मातेनें धाडियलें वना ॥ आमची विटंबना बहुत जाहली ॥ २४॥ वल्कलें वेष्टोनी जालेती तापसी ॥ वेष आह्मां देसी मर्कटाचे ॥ २५ ॥ जवळीच असुनी हरविली कांता ॥ आह्मी शुद्धि करितां कष्टी जालों ॥ २६ ॥ तियेचे वियोगें शोक करा वनीं ॥ वानरें होऊनि आह्मां मरण घडे ॥ २७ ॥ तुह्मां स्वामीपणें बैसलिये ठायीं ॥ आह्मी शिळा डोई वाहियेल्या ॥ २८ ॥ लंकेपुढें आह्मी वेचियेले प्राण ॥ तुह्मी ते दुरून बाण टाकां ॥ २९ ॥ अयोध्येचे राज्यीं तुह्मां सिंहासन ॥ आमचे कपाळीं हीन चुकेचिना ॥ ३० ॥ वस्त्रें अलंकार तुह्मांसी तें घोडें ॥ आह्मी ते उघडे पायीं चालों ॥ ३१ ॥ चाड सरलिया नाहीं अडवण ॥ कांहो लक्ष्मण दवडिला ॥ ३२ ॥ लोक ह्मणो तरी पाठीं सहोदर ॥ जालेति निष्ठुर देवराया ॥ ३३ ॥ तुह्मां एकलेनि न करवे गमन ॥ सर्व अवघेजण आलों आह्मी ॥ ३४ ॥ कंसाभेण तुह्मी राखि-

येल्या गाई ॥ तेथें आह्मी काई नव्हतों देवा ॥ ३५ ॥ भोगा स्वामीपण राखितां गोधनें ॥ ठकोनिया खाणें आमच्या रोड्या ॥ ३६ ॥ सर्पापोटीं आह्मी घाबरलोंसो विखें ॥ तुह्मी आपुलें सुखें वेगळेची ॥ ३७ ॥ खेळतां यमुनेडोहीं टाकियेली उडी ॥ आह्मी थडी थडी रुदन करूं ॥ ३८ ॥ गोवर्धन गिरी आमुचिये शिरीं ॥ तुह्मी नानापरी वेणु वाहा ॥ ३९ ॥ आह्मां चोरून नेले वर्ष भरी ॥ तुह्मी आपुले घरीं सुखी असा ॥ ४० ॥ असो आतां चाड नाहीं येणें वीण ॥ आमुचे निर्वाण पाहूं नका ॥ ४१ ॥ आमुचे दिवस काय वांया गेले ॥ स्वामीया उगले राहा तुह्मी ॥ ४२ ॥ कल्पाचे शेवटीं तुह्मां आह्मां भेटी ॥ तेथें पैं हा गोष्टी कळों येती ॥ ४३ ॥ नामा ह्मणे आह्मी पाईक फुकाचे ॥ धारक नामाचे दास तुझे ॥ ४४ ॥

॥ ६८४ ॥ भोगावरी आह्मी घातिला पाषाण ॥ मरणामरण आणियेलें ॥ १ ॥ नाहीं यासी पतन न होय बंधन ॥ नित्य हेंचि स्नान रामनामीं ॥ २ ॥ नामा ह्मणे भाव सर्वां भूतीं करा ॥ आणिक पसारा घालूं नका ॥ ३ ॥

---

## मनास बोध.

॥ ६८५ ॥ दाही दिशा मना धांवसी तूं सईरा ॥ न चुकती येरझारा कल्पकोटी ॥ १ ॥ विठोबाचे नामीं दृढ धरी भाव ॥ येर सांडी वाव मृगजळ ॥ २ ॥ भुक्तिमुक्ति सिद्धि जोडोनियां कर ॥ करिति निरंतर वळगणें ॥ ३ ॥ नामा ह्मणे मना धरी तूं विश्वास ॥ मग गर्भवास नव्हे तुज ॥ ४ ॥

॥ ६८६ ॥ अरे अलगटा माझिया तूं मना ॥ किती रानोराना हिंडविसी ॥ १ ॥ विठोबाचे पायीं दृढ घाली मिठी ॥ कां होसी हिंपुटी वांयाविण ॥ ध्रु० ॥ क्रिया कर्म धर्म तुज काय चाड ॥ जवळी असतां गोड प्रेमसुख ॥ २ ॥ संकल्प विकल्प सांडी तूं समूळ ॥ राहे रे निश्चळ क्षणभरी ॥ ३ ॥ आपुलें निजहित जाण तूं त्वरित ॥ वासना रहित होई वेगीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे तुज ठायींचें कळतें ॥ सोसणें कां लागते गर्भवास ॥ ५ ॥

॥ ६८७ ॥ वासनेची करणी ऐके तूं मना ॥ या केली रचना ब्रह्मांडाची ॥ १ ॥ निर्गुण चैतन्य सदा सुखरासी ॥ सा दिल्ही चौऱ्यांशी लक्ष सोंगें ॥ २ ॥ ऐसी हे लाघवी खेळे नाना खेळ ॥ तेथें तूं दुर्बळ काय करिसी

॥ ३ ॥ क्षण एक चंचळ क्षण एक निश्चळ ॥ क्षण एक विफळ सावध करी ॥ ४ ॥ क्षण एक कृपाळ क्षण एक निष्ठुर ॥ क्षण एक उदार कृपण करी ॥ ५ ॥ क्षण एक सात्विक क्षण एक राजस ॥ क्षण एक तामस करोनि सांडी ॥ ६ ॥ क्षण एक प्रवृत्ति क्षण एक निवृत्ति ॥ क्षण एक विश्रांति तप्त कर ॥ ७ ॥ क्षण एक आवडे क्षण एक नावडे ॥ क्षण एक विघडे घडलें सुख ॥ ८ ॥ ऐसी हे लाघवी पाहतां क्षणभंगुर ॥ ब्रह्मादि हरिहर ठकिले जेणें ॥ ९ ॥ नामा ह्मणे तरीच इचा संग तुटे ॥ दैवयोगें भेटे संतसंग ॥ १० ॥

॥ ६८८ ॥ परियेसी वासने संकल्प स्वरूपें ॥ विश्व त्वां आटोपें वश केलें ॥ ब्रह्मादिक तुझे इच्छेचें खेळणें ॥ विषयाकारणें लोलिंगत ॥ १ ॥ परि माझ्या मना सांडी वो समर्थे ॥ देई मज दीनातें कृपादान ॥ २ ॥ वेदशास्त्र वक्ते व्युत्पन्न थोरले ॥ तृणापरीस केले हलुवट ॥ कृपणाचे द्वारीं होऊनि याचक ॥ विसरले सकळिक आत्महित ॥ ३ ॥ एके अभिमानें भ्रांत झालें चित्त ॥ भजती इंद्रियांतें दिनरूपें ॥ शब्द स्पर्श रूप रसगंधे फांसा ॥ गुंतलें दुराशा तळमळित ॥ ४ ॥ एकांतें लाविला पुत्र कलत्र धंदा ॥ नेणती ते कदां सुखगोष्टी ॥ जन्ममरणांचे जुंपियले पांतीं ॥ अकल्प भोगिती नाना योनी ॥ ५ ॥ ऐसे तुझे संगें बहु झाले हिंपुटी ॥ ह्मणोनि पाडिली तुटी संतसंगा ॥ नामा ह्मणे पुढती गांजीसील मज ॥ येईल केशिराज सोडवणें ॥ ६ ॥

॥ ६८९ ॥ धांवत धांवत जाइन वोरसे ॥ दाटला उल्हासें कंठ माझा ॥ १ ॥ अंतरींचें गुज सांगेन आपुलें ॥ हृदयीं दाटले प्रेमअश्रु ॥ २ ॥ पीतांबर छाया करूनि भक्तांसीं ॥ सांगेन मी खंती तयापुढें ॥ ३ ॥ संतसमागमें दावीं कवतुकें ॥ पाठवी भातुकें देऊनियां ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज आहे भरंवसा ॥ मना तूं विश्वास दृढ धरी ॥ ५ ॥

॥ ६९० ॥ गणपति पूजिले ते दोंदिल भले ॥ वैष्णव न भले अरे मना ॥ १ ॥ सीतळा पूजिली ते ह्मइसे भले ॥ वैष्णव न भले अरे मना ॥ ध्रु० ॥ मैराळ पूजिले ते वाघे भले ॥ वैष्णव न भले अरे मना ॥ २ ॥ सूर्य पूजिले ते घोडे भले ॥ वैष्णव न भले अरे मना ॥ ३ ॥ नामा ह्मणे जे कां विठ्ठलीं भजिले ॥ ते वैष्णव भले सत्य मना ॥ ४ ॥

॥ ६९१ ॥ प्रेमामृत सरिता पवित्र हरिकथा ॥ त्रिभुवनींच्या तीर्थां मुगुटमणि ॥ १ ॥ तेथें माझ्या मना होइ क्षेत्रवासी ॥ राहें संतांपाशीं सुख घेतां ॥ ध्रु० ॥ ऐहिक्य परत्र दोन्हीं समतीरीं ॥ परमानंदलहरी झेंपावत

॥ २ ॥ मुक्तांचें जीवन मुमुक्षा माउली ॥ शिणल्या साउली विषयासक्तां ॥ ३ ॥ परमहंसकुळ सनकादिक सकळ ॥ राहिले निश्चळ करोनि चित्त ॥ ४ ॥ नामा म्हणे मना सोइरे हरिजन ॥ तारक त्यांचे चरण दृढ धरीं ॥ ५ ॥

॥ ६९२ ॥ अरे मना शोका करिसी किती ॥ हे तंव वांया धनसंपत्ति ॥ आयुष्य भविष्य नाहीं तुझे हातीं ॥ हें अवघें अंतीं जायजणें ॥ १ ॥ एक अर्बुद साठी कोटी देखा ॥ तीस लक्ष दहा सहस्र लेखा ॥ सात शतें नव-मास मापा ॥ तया हिरण्य कश्यपा काय झालें ॥ ध्रु० ॥ चौदा चौकड्या लंकानाथा ॥ नव्याण्णव सहस्र राया दशरथा ॥ तेहि गेले स्वर्गपंथा ॥ मागें सर्वथा नुरलेचि ॥ २ ॥ चौदा कल्प मार्कंडेया पडे ॥ तैं लोमहर्षणाचा एक रोम झडे ॥ बकदालभ्याचे निमिषें मोडे ॥ गेले येवढे अरे मना ॥ ३ ॥ बकदालभ्याचे पुरे निमिषें ॥ तें वटहंसाचें उपडे पिच्छ ॥ तयासि होतां मृत्यु-प्रवेश ॥ तो एक श्वास भृशंडीचा ॥ ४ ॥ मरणांत पुरे भृशंडीचा ॥ तैं एक दिवस कूर्माचा ॥ नामा विनवी केशवाचा ॥ वेगी विठोबाचा पंथ धरा ॥ ५ ॥

॥ ६९३ ॥ धरीं रे मना तूं विश्वास या नामीं ॥ अखंड रामनामीं ओळखी धरी ॥ १ ॥ जप करी ऐसा अखंड खंडेना ॥ निशिदिनीं मना होय जागा ॥ २ ॥ नामा ह्मणे मना होई रामरूप ॥ अखंडित जप सोहं सोहं ॥ ३ ॥

॥ ६९४ ॥ उत्कंठित तप एक विठ्ठल नाम ॥ आतां क्रियाकर्म कोणालागीं ॥ १ ॥ राहेरे तूं मना राहेरे निवांत ॥ ध्यायीं अखंडित नारा-यण ॥ २ ॥ संतसमागमें साधी हें साधन ॥ पावसी निर्वाण नित्य सुख ॥ ३ ॥ नामा ह्मणे तूं सहज सुखरूप ॥ होऊनि निर्विकल्प विचारी पां ॥ ४ ॥

॥ ६९५ ॥ वेदीं तोचि शास्त्रीं सर्वांठायीं तोचि ॥ पुराणांत तोचि अंतःकरणीं ॥ १ ॥ नाम सदां ध्यायी नाम सदां ध्यायी ॥ रामनाम ध्यायी अरे मना ॥ २ ॥ नामा ह्मणे देह नाहीं पुनरुपं ॥ केशवनाम सोपें उच्चारी बापा ॥ ३ ॥

॥ ६९६ ॥ नको नको मना हिंडों दारोदारीं ॥ कष्ट झाले भारी वायांविण ॥ १ ॥ कल्पना सांडूनि संतांसंगें राही ॥ सर्व त्यांचे पायीं सुख आहे ॥ २ ॥ ज्याचिया दर्शनें शोक मोह जळे ॥ पाप ताप पळे काळभय ॥ ३ ॥ जवळीच देखती पायाळा वांचून ॥ तें सुख निधान वैकुंठींचें ॥ ४ ॥ नामा ह्मणे आली शेवटील घडी ॥ तों घेई आवडी हाचि एक ॥ ५ ॥

॥ ६९७ ॥ धणीवरी ध्यान करी कांरे मना ॥ या सुख निधाना विठोबाच्या ॥ १ ॥ पंढरीये तैसें सुख आहे त्याचे पायीं ॥ अनुसरोनि राही एकवेळ ॥ २ ॥ श्रीमुख साजिरें पाही दृष्टिभरी ॥ जीवित्वाचें करीं निंबलोण ॥ ३ ॥ जेणें लक्ष धरोनि आहे पुंडलीक ॥ तोचि भाव एक दृढ धरी ॥ ४ ॥ नलगे गुरुमंत्र नलगे जप तप ॥ उघडें स्वरूप विटेवरी ॥ ५ ॥ नामा ह्मणे जरी निकट संतचरण ॥ तरीच प्रेमखूण पावसील ॥ ६ ॥

॥ ६९८ ॥ अरे मना तूं मर्कटा ॥ पापिया चांडाळा लंपटा ॥ परद्वार हिंडसी सुनाटा ॥ अरे पापी चांडाळा ॥ १ ॥ अरे तुज पापावरी बहु गोडी ॥ देवाधर्मीं नाहीं आवडी ॥ तेणें न पावसी पैल थडी ॥ कर्मबांधवडी पडिसिल ॥ २ ॥ अरे तूं अभिलाषिसी परनारी ॥ तेणें सिद्धपंथ राहेल दूरी ॥ जवळी येईल यमपुरी ॥ आपदा थोर पावसील ॥ ३ ॥ आतां तुज वाटतसे गोड ॥ अंतकाळीं जाईल जड ॥ महादोष येति सुखा आड ॥ करितील कईवाड यमदूत ॥ ४ ॥ माझें शिकविलें नाइकसी ॥ आतां सांगेन बळिया केशवासी ॥ धरूनि नेईल वैकुंठासी ॥ चरणीं जडसी ह्मणे नामा ॥ ५ ॥

॥ ६९९ ॥ पृथ्वी ध्यासी तरी पृथ्वीचि होसी ॥ केशव न होसि अरे मना ॥ १ ॥ आप ध्यासी तरी आपचि होसी ॥ केशव न होसि अरे मना ॥ २ ॥ वायु ध्यासि तरी वायुचि होसी ॥ परी केशव न होसि अरे मना ॥ ३ ॥ आकाश ध्यासी तरी आकाशचि होसी ॥ परी केशव न होसि अरे मना ॥ ४ ॥ नामा ह्मणे जरी केशवासी ध्यासी ॥ तरी केशवचि होसी अरे मना ॥ ५ ॥

॥ ७०० ॥ क्षण एक मना बैसोनि एकांतीं ॥ विचारी विश्रांति कोठें आहे ॥ १ ॥ लक्षचौऱ्यांशिच्या करितां येरझारा ॥ शिणलासि गव्हारा वेळोवेळां ॥ २ ॥ अझूनि तुज लाज न वाटे पैं कैसी ॥ नरकाचे द्वारांसि जावें किती ॥ ३ ॥ दुर्लभ आयुष्य मनुष्य देहिंचें ॥ जातसे मोलाचें वायाविण ॥ ४ ॥ खापराचे साटीं सांडिला परिस ॥ गहिंवरें फुटतसे हृदय माझें ॥ ५ ॥ पुत्रकलत्रादिक सुखाचीं सोयरीं ॥ त्यांची ममता थोरी धरिली तुवां ॥ ६ ॥ अनुदिनीं पाळितां अनुभवेंचि पाहे ॥ कोण सुख आहे तयाजवळीं ॥ ७ ॥ जगाचा जीवलग मायबाप आपुला ॥ तो तुवां दुराविला केशिराज ॥ ८ ॥ स्वप्नींचिया धना लुब्धलासि काय ॥ आलें काळभय हाकित तुज ॥ ९ ॥ संतापाचें सदन शोकाचे पुतळे ॥ ते त्वां मानियले हितकारी ॥ १० ॥ कैंची सुख निद्रा इंगळाचे शेजे ॥ प्रत्यया आणूनि तुझे तूंचि पाही ॥ ११ ॥ तुज

राखेल कोण येवढिये संकटीं ॥ रिघसी ज्याचे पोटीं मरणाभेणें ॥ १२ ॥ आदिमध्य आवसानीं सोडविल निर्वाणीं ॥ तया चक्रपाणी सेवि वेगीं ॥ १३ ॥ जों जों क्षण लाविसी हरिभजनाकडे ॥ तों तों गांठीं पडे सार्थकीं रे ॥ १४ ॥ नामा ह्मणे तुजचि येतों काकुळती ॥ सोडिरे संगती वासनेची ॥ १५ ॥

॥ ७०१ ॥ मन धांवें सैरावैरा ॥ मन मारूनि केलें एकमोरा ॥ १ ॥ मन केलें तैसें होय ॥ मन धांवडिलें तेथें जाय ॥ २ ॥ मन लांचावलें न राहे ॥ तत्वीं बैसले कधि नव जाये ॥ ३ ॥ नामा ह्मणे सोहंशुद्धि ॥ मन वेधलें गोविंदीं ॥ ४ ॥

॥ ७०२ ॥ बोलिलें वेदांतीं ऐकिलें सिद्धांतीं ॥ बोल नेति नेति अनिर्वाच्य ॥ १ ॥ तोचि हा बोल बोल रे मना ॥ बोल नारायणा समर्पावे ॥ २ ॥ माझा मायबापें सोडवूनि गळा ॥ केशवीं बांधला बोला बोल ॥ ३ ॥ नामा ह्मणे बोल बोलताहि बोला ॥ खेचरें दाविला प्रेमभक्ति ॥ ४ ॥

॥ ७०३ ॥ हेंगे आयुष्य हातोहातीं गेलें ॥ आंगीं आदळलें जन्ममरण ॥ १ ॥ कां रे निदसुरा दैवहत मना ॥ आपुली सूचना न करिसी ॥ २ ॥ कां रे तुज भ्रांति पडलीसे मूढा ॥ वेढी चहुंकडा काळ सैन्य ॥ ३ ॥ नाना रोगें तुझी काया वेधियेली ॥ नरकाचीं भरलीं नवही द्वारें ॥ ४ ॥ पाळिलीं पोशिलीं आप्त माझीं सखीं ॥ अंतीं तुज पारखी होतीं जाण ॥ ५ ॥ नामा ह्मणे तुज येतों लोटांगण ॥ तारील नारायण भरंवशानें ॥ ६ ॥

॥ ७०४ ॥ परब्रह्म विश्वाकारें अवतरलें भक्तिकाजा ॥ मूर्ति सुनीळु सांवळी केशिराजु स्वामी माझा ॥ १ ॥ गोविंदारे तुझें ध्यान लागो मना ॥ पाहिजे प्रेमपद निर्मळ होत ज्ञान ॥ २ ॥ मन हें वोवरी असे सुमनाचे चित्रशाळी ॥ दोन्ही चरण सकुमारे वरीं अष्टदळ कमळीं ॥ ३ ॥ संध्याराग रातले सुनीळ दिशातळवटीं ॥ ध्वज वज्रांकुश चिन्हें साजती गोमटीं ॥ ४ ॥ इंदिरा तिथें थोकली तिच्या सुखा नाहीं पारु ॥ ते चरणीं स्थिर झाली ह्मणोनि ह्मणती लक्ष्मीवरु ॥ ५ ॥ घवघवीत वांकी चरणीं ब्रिदाचा तोडरु ॥ नखप्रभा फांकली तिनें लोपला दिनकरु ॥ ६ ॥ सृष्टि घडीत मोडीत उत्पत्ति स्थिति प्रळय अवघें नवें ॥ तो चतुर्मुख ब्रह्मा चरण पूजितो स्वभावें ॥ ७ ॥ देवाधिदेव शंभू कैलासींचा राणा ॥ गंगा मुगुटीं धरिली तिचा जन्म अंगुळीं चरणा ॥ ८ ॥ दैत्यकुळीं जन्मला देव पळती ज्याचेनि धाकें ॥

पावो पाठीसी लागला ह्मणऊनि दारवंटा राखे ॥ ९ ॥ शेष वर्णितां श्रमला वेद परतले माघारीं ॥ नामा ह्मणे अरे मना याचे चरण धरी झडकरी ॥१०॥

॥ ७०५ ॥ लाजों नको मना हरीच्या कीर्तना ॥ संसार पाहुणा दो दिवसांचा ॥ १ ॥ कंठीं नाहीं आइती ह्मणोनि सांडु नको ज्योति ॥ इतुकिये भ्रांती पडूं नको ॥ २ ॥ बाळकाचे बोल माउली प्रीति करी ॥ तैसी कीर्ति हरी परिसे चित्तें ॥ ३ ॥ भलतिया परी बोले बा श्रीहरी ॥ तो भवसागरीं तारील जाणा ॥ ४ ॥ येणें तारुण्यपणें भ्रमलासि झणीं ॥ भोगिसी पतनी जन्मांतरीं ॥ ५ ॥ तूं होय मागता हरि होय दाता ॥ शरण जाई अनंता ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ ७०६ ॥ शोधोनियां चारी वेद ॥ सार काढूनियां भेद ॥ १ ॥ मना जाण जाण जाण ॥ विठोबाची प्रेमखुण ॥ २ ॥ साहि शास्त्रांचें संमत ॥ मंथूनि काढिलें यथार्थ ॥ ३ ॥ याज्ञिकांची जीवनकळा ॥ उन्मनीचा जो जिव्हाळा ॥ ४ ॥ नामा ह्मणे माझे बापें ॥ साधियलें संतकृपें ॥ ५ ॥

॥ ७०७ ॥ देवा तुझें मी चाटारु ॥ सहस्रा एका हाकीं करूं ॥ लाभ होतसे अपारु ॥ घडी घडीये माझारी ॥ १ ॥ तुझ्या पायांची जोडी ॥ त्यासि होतसे परवडी ॥ आवारु न लाहे एक घडी ॥ नंदप्रिय होतसे ॥ २ ॥ मुद्दल पुसतसे वेळोवेळां ॥ हा मनारे पापी चांडाळा ॥ सांग चोविसां आगळा ॥ कवणेपरी न धाय ॥ ३ ॥ वासना मागतसे तुज ॥ हे द्यावी जी मज ॥ दाटणी होतसे सहज ॥ ह्मणवोनि मज अंकीतसे ॥ ४ ॥ नामा ह्मणे जी दातारा ॥ तुझीये भेटी सारंगधरा ॥ लाभ होतसे अपारा ॥ घडी घडीये विठ्ठला ॥ ५ ॥

॥ ७०८ ॥ संसारीं असतां जीवन्मुक्त आह्मी ॥ विठ्ठल हे नामीं विनटलों ॥ १ ॥ काया क्लेश करणें शरीर दंडणें ॥ नलगे हिंडणें दाही दिशा ॥ २ ॥ कोण वाहे मंत्र वाउगी खटपट ॥ गाऊं निष्कपट रामनाम ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज आहे हा भरंवसा ॥ मना तूं विश्वासा दृढ धरी ॥ ४ ॥

॥ ७०९ ॥ काय देतील ते नर ॥ जंव दिलें नाहीं रघुवीरें ॥ १ ॥ आजि दिलें उद्यां नाहीं ॥ ऐसियासी मागों कांहीं ॥ २ ॥ हात पसरू ऐसें धुरे ॥ दिलें कल्पांतीं न सरे ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवाधिदेव ॥ समर्थ दाता पंढरिराव ॥ ४ ॥

॥ ७१० ॥ नित्य नेम आह्मां चिंतन श्रीरामा ॥ आणिक उपमा नेघों नेघों ॥ १ ॥ वळघलों हरि भूतभाव निर्धारी ॥ दिसे चराचरीं हरिरूप ॥ २ ॥ जें जें पडे दृष्टी आणिक नाहीं सृष्टी ॥ हरिरूपीं भेटी हेंचि दिसे ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठ्ठल सर्वभूतीं आहे ॥ आणिक उपाय नलगती ॥ ४ ॥

---

## नामदेवसंवाद.

॥ ७११ ॥ नाहीं भीड चाड बोलसी आगळें ॥ तोंडाचेनि बळें अरे नाम्या ॥ १ ॥ आपुलीया चाडें करीतसा सेवा ॥ आभारू कां लावा आह्मांलागी ॥ धृ० ॥ माझ्या ठाईं काय उणें मज होतें ॥ मज देउनी सरतें केलें तुह्मीं ॥ २ ॥ निर्गुण निराकारीं होतों निजानंदें ॥ त्यासि तुह्मीं भेद केला देखा ॥ ३ ॥ संकल्प वासना नाना भजन मतें ॥ शुद्ध स्वरूपातें भेद झाला ॥ ४ ॥ वैकुंठ निजधाम सर्व सुखरासी ॥ तें सांडोनी तुह्मांपासी येणें झालें ॥ ५ ॥ शेषाच्या आरूवरीं निद्रा क्षीरसागरीं ॥ सांडोनी वेषधारी झालों आह्मीं ॥ ६ ॥ दाही अवतारीं युगयुगांतरीं ॥ अनुष्ठान थोरी केलें नाम्या ॥ ७ ॥ अवतारीं कष्ट झाले थोर थोर ॥ मारीले असुर तुह्मांलागीं ॥ ८ ॥ नाना योनी दुःखें भोगा अनंत जन्में ॥ निरसलीं नामें माझ्या एका ॥ ९ ॥ विषय भोगीतां रवरव वास ॥ मन केलें उदास वैराग्येंसी ॥ १० ॥ प्रपंच प्रज्वाळ अग्नीचे कल्लोळ ॥ सुखरूप सीतळ आत्मज्ञानें ॥ ११ ॥ माया हे दुस्तर नकळे इचा पार ॥ ते नदी उतार केली तुह्मां ॥ १२ ॥ कामक्रोधादिक षड्वैरी विकार ॥ महा थोर थोर वश्य केले ॥ १३ ॥ परदारा परधन परनिंदा परपीडा ॥ दिधलीया झाडा दयाधर्मा ॥ १४ ॥ अहंकार अविवेक निरसली भ्रांती ॥ सुखरूप शांती दिधली तुह्मां ॥ १५ ॥ अविश्वास अलोट मेरुहुनी घनवट ॥ देउनी भावार्थ पीठ केलें ॥ १६ ॥ देउनीया ज्ञान निरसीलें अज्ञान ॥ येणें समाधान झालें तुह्मां ॥ १७ ॥ अधर्म अन्याय अनाचारा मूळ ॥ देउनी स्वधर्म तारीयेले ॥ १८ ॥ ऐसें सर्वांपरी म्यां केलें गोमटें ॥ परी शब्द उफराटे न संडीसी ॥ १९ ॥ रात्रंदिवस तुज लागला छंद ॥ आह्मांसी विनोद करीं पाहसी ॥ २० ॥ अवधियापरी तूं झालासी धीट ॥ बोलसी वाईट अमर्याद ॥ २१ ॥ भक्तीचीया भीडा म्यां बहु साहिलें ॥ त्वां नाहीं पाहिलें मागेंपुढें ॥ २२ ॥ जें आह्मीं पेरीलें तेंचि फळ

आलें ॥ उफराटें झालें तुझिया कृपें ॥ २३ ॥ पहिलीच चुकी पडीयेली थोरी ॥ तुझे अधिकारी झालों आह्मीं ॥ २४ ॥ खांदी बैसलें तें नुतरे खालतें ॥ तैसें हें आमुतें वोढवलें ॥ २५ ॥ सलगी खेळवितां चुंबीतां वदन ॥ तें देतां टाकुनि मिठी घाली ॥ २६ ॥ तुझा त्याग करितां कोपतील संत ॥ हांसती समर्थ पीसुन लोक ॥ २७ ॥ सृष्टयादीक व्यापार राहिला परता ॥ तुजसी बोलतां न पुरे वेळ ॥ २८ ॥ कांहीं न मागसी देतांही न घेसी ॥ अखंड जीवेंसी जडोनी ठेला ॥ २९ ॥ वाढवीतां भक्ति तुज नाहीं तृप्ती ॥ काय करिसी अंतीं नकळे मज ॥ ३० ॥ मागें भक्त आह्मी बहुत देखीले ॥ उठोनीयां गेले क्षणामाजी ॥ ३१ ॥ अवतार अवतारीं नव्हेसी परता ॥ संबंध तुटतां न दीसे तुझा ॥ ३२ ॥ नामा ह्मणे देवा होइ सावधान ॥ परीयेसी वचन एक माझें ॥ ३३ ॥

॥ ७१२ ॥ पितीयाचें भाग्य पुत्रासी पैं नये ॥ विरळा एखादा होय नांव राखा ॥ १ ॥ मी तंव अज्ञान झालों तुझे पोटीं ॥ तुझेनि आह्मां तुटी संसाराची ॥ ध्रु० ॥ होणार तें झालें न चुके कांहीं केलें ॥ विठ्ठलें दुराविलें जीणें मरणें ॥ २ ॥ माझीये अदृष्टीं ऐसेंची लिहिलें ॥ जें मज निर्मियलें चतुराननें ॥ ३ ॥ या विठोबाचे पाय हृदयीं धरावे ॥ तेणें हें तरावें भवदुःख ॥ ४ ॥ नेणें पूजा विधि नेणें क्रिया सिद्धी ॥ ऐसा मी अपराधि तारी देवा ॥ ५ ॥ अनुपम्य सुख देखीलिया चरणीं ॥ घातली लोळणीं माझ्या चित्तें ॥ ६ ॥ बहुत देव माझ्या पाहियेले जीवें ॥ केलें सर्वभावें कुटुंबदास्य ॥ ७ ॥ इहीं माझें चित्त केलें तडातोडी ॥ नाहीं सुख घडी देखिलें कांहीं ॥ ८ ॥ मग या पांडुरंगें माझी राखीयेली लाज ॥ हा माझा पूर्वज प्राणसखा ॥ ९ ॥ अंतरींचें गुज सांगितलें मज ॥ दिल्हें प्रेमबीज नाम निधि ॥ १० ॥ सुख दुःखाची निवारिली बाधा ॥ शरीर संबंधा वेगळें केलें ॥ ११ ॥ आपुलें ह्मणोनी कृपेनें न्याहाळीलें ॥ आवडी सांभाळीलें मायबापें ॥ १२ ॥ ऐसा मज लागी स्नेहाळू न विसंबे जीवें ॥ त्यां काय याचे व्हावें उतराई ॥ १३ ॥ नामा ह्मणे मज अनाथा लागुनी ॥ न विसंबे निर्वाणीं पंढरिराव ॥ १४ ॥

॥ ७१३ ॥ पतीत अनेक पावन तूं एक ॥ झालासी सुश्लोक कवणाचेनी ॥ १ ॥ पतीत मी भला कीं पावन तूं भला ॥ सांग बा विठ्ठला मायबापा ॥ ध्रु० ॥ परिसाचें महीमान कैसेंनी वाढतें ॥ निर्माण नसतें लोह जरी ॥ २ ॥ कल्पतरुची कीर्ति कैसेनी वाढते ॥ जरी कल्पना नसती याचकाची ॥ ३ ॥ प्रजेसी

पोसीले शोभती राजेश्वर ॥ तैसा हा विचार तुह्मां आह्मां ॥ ४ ॥ नामा ह्मणे स्वामी आहे ते आमुचे ॥ तुज देवा कैचें क्रिया कर्म ॥ ५ ॥

॥ ७१४ ॥ सर्व जीव तूं झालासी आपण ॥ आह्मीं कां पतीत तूं कैसा पावन ॥ १ ॥ मन इंद्रीयें तूंची झालासी चाळीता ॥ आमुच्या ठायीं कोणें ठेविली सत्ता ॥ ध्रु० ॥ सुवर्णाच्या पोटीं झाला अलंकार ॥ एकी भला वाणिती साचार ॥ २ ॥ गंगासिंधु मिळणीं झाली सहस्रमुख ॥ ओघ तो उदक अन्य नाहीं ॥ ३ ॥ बीजाचीया पोटीं वटाचा विस्तार ॥ सर्व तो आकार तुझाची असे ॥ ४ ॥ नामा ह्मणे सर्व तुझेंचि करणें ॥ उणे खवलुन घेउं नको देणें ॥ ५ ॥

॥ ७१५ ॥ विषयाचे आळुके जरी नव्हतो दीन ॥ दीनानाथ कोण ह्मणतें तुज ॥ १ ॥ सुष्ट दुष्ट तरी आमुचें आचरण ॥ तें तुज भूषण झालें देवा ॥ध्रु०॥ पतीतपावन ब्रीद कैसेंनि जोडतें ॥ जरी आह्मी नव्हतों कर्मजड ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसें आहे गा हें देवा ॥ विचारी केशवा मायबापा ॥ ३ ॥

॥ ७१६ ॥ आपल्या सुखाचा देईन मी वांटा ॥ जरी येसी वैकुंठा एकवेळ ॥ १ ॥ आपुले नीजपदीं तुज बैसवीन ॥ उभा मी राहेन मागेंपुढें ॥ ध्रु० ॥ पीतांबर छाया करीन तुजवरी ॥ जीवें क्षणभरी वीसंबेना ॥ २ ॥ अंबऋषी प्रल्हाद रुक्मांगद ॥ साहुनी नीजपद देईन तुज ॥ ३ ॥ ऐसा धीर नाम्या होता माझ्या मनीं ॥ परी तूं सर्वांहुनी उदासीन ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशवा नलगे माझा चित्तीं ॥ मज आहे विश्रांती तुझ्या नामीं ॥ ५ ॥

॥ ७१७ ॥ नेघें भूमंडळ न घाली तुज कोड ॥ तुजहुनि केवढी जोडी-यांची ॥ १ ॥ चरण मी सेवीन गाईन तुझें नाम ॥ हृदयीं धरोन प्रेम नाचेन सदां ॥ ध्रु० ॥ रिद्धी सिद्धी नेघें कामना नलगती ॥ तुजवीण श्रीपती अवघें व्यर्थ ॥ २ ॥ रसातळ भूतळ वैकुंठासी नये ॥ तुजवीण न पाहे ठाव कोठें ॥ ३ ॥ विष्णुदास आह्मीं भक्तीवीण नेघों ॥ दारींच वोळघों तुझ्या देवा ॥ ४ ॥ नामा ह्मणे हेचि चाड गा विठ्ठला ॥ पुंडलीकें सांगितला निज-ठेवा ॥ ५ ॥

॥ ७१८ ॥ एसा नामा बोले आनंदें करोनी ॥ तंव देव विचारूनी बोलीयेले ॥ १ ॥ भला भला नाम्या शहाणा झालासी ॥ कां रे हें न घेसी सांग मज ॥ ध्रु० ॥ येरु ह्मणे देवा अवघेंची नैश्वर ॥ तूंची एक सार पुरे

आह्मां ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें कोटी वसती रोमरंध्रीं ॥ त्या चरणाचे अग्रीं वसों आह्मीं ॥ ३ ॥ पुंडलीक जाणे त्याचें गुह्य गुज ॥ उमजोन तुज काय सांगो ॥ ४ ॥ नामा ह्मणे धरूं मुळ सोय चोंखडी ॥ ब्रह्मांडा येवढी नलगे पृथ्वी ॥ ५ ॥

॥ ७१९ ॥ प्रेमपडीभारु देवासी वोसंडे ॥ नामा तयापुढें शोभतसे ॥ १ ॥ प्रेमाचें स्फुंदन न सांवरे नामया ॥ पसरोनीया बाह्या क्षेम देत ॥ ध्रु० ॥ सावधेरे नाम्या आलिंगीला बाहीं ॥ आवडतें कांहीं सांग मज ॥ २ ॥ उघडोनियां नयन पाहे दृष्टीभरी ॥ वैकुंठाभीतरीं चाल जाऊं ॥ ३ ॥ ऐकोनीयां नामा झालासे सावध ॥ मग देतसे शब्द नारायणा ॥ ४ ॥ भक्तीवीण सुख नघे पैं वैकुंठ ॥ पंढरीं प्रगट परब्रह्म ॥ ५ ॥ हेंची गोड आह्मां आवडे हो हरी ॥ वैकुंठाभीतरीं चाड नाहीं ॥ ६ ॥ सर्वकाळ सेवा करूं पै कीर्तन ॥ येणें माझें मन संतुष्ट सदां ॥ ७ ॥ संबोखिला नामा हृदयावरी हस्तक ॥ येरु ठेवी मस्तक चरणावरी ॥ ८ ॥ मागरे नामया आवडेल जीतुलें ॥ त्रीभुवनाइतुलें ब्रह्मसुख ॥ ९ ॥ देईन अखंडीत सर्व काम जाणा ॥ रिद्धिसिद्धी पूर्ण अखंडीत ॥ १० ॥ नामा ह्मणे पंढरीं कीर्तन करीन ॥ न सोडी चरण परी तुझे ॥ ११ ॥

॥ ७२० ॥ घेऊनियां नाम्या बैससील किती ॥ पहाशील स्थिति अंतरीची ॥ १ ॥ कांहींच न होसी विचारी मानसीं ॥ चैतन्य तत्वासि शुद्धबुद्ध ॥ २ ॥ क्रिया कर्म कर्ता नव्हेसी सर्वथा ॥ आहे सर्वगता रूप तुझें ॥ ३ ॥ भजतां भजन पूजिताति पूज्य ॥ हेंही काय तुज अति चिंता ॥ ४ ॥ ज्ञाता ज्ञान ज्ञेय ध्यातां ध्यान ध्येय ॥ नाथिले उपाय नाहीं तुज ॥ ५ ॥ नामा ह्मणे मज नकळेचि देवा ॥ मज देई सेवा जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

॥ ७२१ ॥ कांहींच मी नव्हें ऐसें जरी केलें ॥ तरि कां जन्मविलें पांडुरंगा ॥ १ ॥ काय ब्रह्मज्ञान सांगशील मातें ॥ खातया न खाते न देखेचि ॥ २ ॥ यातिहीन शिंपी अधिकारी कैंचा ॥ हा धर्म तयाचा सांग त्यासी ॥ ३ ॥ चतुर्थआश्रमी यति दिगांबर ॥ अशक्त संसार सोसवेना ॥ ४ ॥ तुझी सेवा सुरवर नेणती प्रेमगोडी ॥ झाली देशधडी वांयावीण ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि सखा चिंतामणि ॥ मूर्ख समजावणी न करावी ॥ ६ ॥

॥ ७२२ ॥ खवळलों आतां न भियेरे तूज ॥ सांडिली रे लाज लौकिकाची ॥ १ ॥ आह्मीं दीन शिंपी इये यातिहीन ॥ दे माझें ठेवणें केशी-

राजा ॥ २ ॥ साठलक्ष संख्या चौऱ्यांसी कोटि ॥ त्यांत मी कवडी सोडूं काय ॥ ३ ॥ आणि याहून असेल वेगळें ॥ घेईन तें बळें जाण आतां ॥ ४ ॥ तुझें थोरपण ऐक हें देवा ॥ दुर्बळाचा ठेवा अभिलाषी ॥ ५ ॥ ह्मणूनि पोरटा नामा खेचराचा ॥ कायामनें वाचा सत्य करी ॥ ६ ॥

॥ ७२३ ॥ निर्विकल्प नामा अनंत कल्पना ॥ होसि नारायणा अव्यक्तेसी ॥ १ ॥ लाज ते लाविली निर्गुणपणासी ॥ श्रुति पुराणासी साम्य दावी ॥ २ ॥ चातुर्यसागरा नंदाचा खिल्लारी ॥ गायी निरंतरी चारवीसी ॥ ३ ॥ सगुण संबंध पडिलासे गांठी ॥ कोण्या भक्तासाठीं काय धंदा ॥ ४ ॥ तुझें देवपण मिरविसी निकें ॥ नामा ह्मणे सुख तुझे पायीं ॥ ५ ॥

॥ ७२४ ॥ काय थोरपण मिरविसी व्यर्थ ॥ खोटेंपण स्वार्थ कळों आलें ॥ १ ॥ हिता अनहिता केलें आपस्वार्थ ॥ वचन यथार्थ बोल आतां ॥ २ ॥ होसी कलिमाजीं कलिसारिखाची ॥ भोळ्या भाविकाच्या भक्ति काजा ॥ ३ ॥ नामा ह्मणे माळ घालिसी स्वहस्तें ॥ करितोसी दंडवत निमिसासी ॥ ४ ॥

॥ ७२५ ॥ काय तुज देवा आलें थोरपण ॥ दाविसी कृपणा उणें पुरे ॥ १ ॥ पुरे आतां सांगो नको बा श्रीहरी ॥ गोकुळाभीतरीं खेळ मांडी ॥ २ ॥ हलाहल शांत करी तत्क्षण ॥ अमृत जीवन नाम तुझें ॥ ३ ॥ तुझें नाम सर्व सदा गोपाळासी ॥ नामा ह्मणे यासी काय झालें ॥ ४ ॥

॥ ७२६ ॥ काय केलें मागें कोणाचें तूं बरें ॥ शेवटीं वानरें संग करी ॥ १ ॥ संगें करूनियां हिंडे रानोरान ॥ दशरथा खुण चुकविसी ॥ २ ॥ काय काय तरी सांगों तुज गुण ॥ भिल्लिणीची आण सत्य मानी ॥ ३ ॥ सत्य मानी वाळी वशिष्ठासही ॥ नामा ह्मणे मात ही पुरातन ॥ ४ ॥

॥ ७२७ ॥ उदाराचा राणा ह्मणविसी आपणा ॥ सांग त्वां कवणा काय दिल्हें ॥ १ ॥ उचिता उचित देसी पंढरिनाथा ॥ न बोलों सर्वथा वर्मे तुझीं ॥ २ ॥ वर्मे तुझीं कांहीं बोलेन मी आतां ॥ क्षमा पंढरिनाथा करी बापा ॥ ३ ॥ न घेतां न देसी आपुलेंही कोणा ॥ प्रौढी नारायणा न बोलावी ॥ ४ ॥ बाळमित्र सुदामा विपत्तीं पिडला ॥ भेटावया आला तुजलागीं ॥ ५ ॥ तीन मुष्टी पोह्यासाठीं मन केलें हळुवट ॥ मग तया उत्कृष्ट राज्य दिलें ॥ ६ ॥ छळावया पांडव दुर्वास पातला ॥ द्रौपदीनें केला धांवा

तुझा ॥ ७ ॥ येवढीया आकांतीं घेऊनि भाजीपान ॥ मग दिलें अन्न ऋषी-लागीं ॥ ८ ॥ बिभीषणा दिधली सुवर्णाची नगरी ॥ हे कीर्ति तुझी हरी वाखाणिती ॥ ९ ॥ वैरियाचें घर भेदें त्वां घेतलें ॥ त्याचें त्यासी दिधलें नवल काय ॥ १० ॥ ध्रुव आणि प्रल्हाद अंबऋषि नारद ॥ हरिश्चंद्र रुक्मांगद आदि करूनी ॥ ११ ॥ त्याचें सेवाऋण घेऊनि अपार ॥ मग त्या देशी वर अनिर्वाच्य ॥ १२ ॥ एकाचि शरीरसंपत्ति आणि वित्त ॥ एकाचें तें चित्त हिरोनि घेसी ॥ १३ ॥ मग तया देशी आपुलें तूं पद ॥ जगदानी हें ब्रीद मिरविसी ॥ १४ ॥ माझें सर्वस्व तूं घेई तुझें नको कांहीं ॥ मनोरथाची नाहीं चाड मज ॥ १५ ॥ नामा ह्मणे केशवा जन्मजन्मांतरीं ॥ करीन मी हरी सेवा ऋण ॥ १६ ॥

॥ ७२८ ॥ परियेसी नाम्या सांगतों मी तुज ॥ अंतरीचें गुज भक्तराया ॥ १ ॥ तूं माझें आवडतें कृपेचें पोसणें ॥ चित्ताचें बसणें करीन तुज ॥ २ ॥ येणें संतसंगें यावें माझ्या गांवा ॥ भोगावें राणिवा वैकुंठीच्या ॥ ३ ॥ माझीया कथेची ज्या बहु आवडी ॥ माझी प्रेम गोडी पढीये जया ॥ ४ ॥ त्याची पायधुळी लागावी सर्वांगें ॥ ह्मणोनी मागें मागें हिंडतसें ॥ ५ ॥ भक्त त्या यातीचे भलतेनी भावें ॥ भलते एक घ्यावें नाम माझें ॥ ६ ॥ त्याची या उपकारें दाटे मी सर्वथा ॥ मुगुट करुनी माथां वाहीन त्यासी ॥ ७ ॥ तनु मन प्राण दिधलें जेणें मातें ॥ मजहुनी पढीयंते नाहीं त्यासी ॥ ८ ॥ चिंता न करी नाम्या नुपेक्षी सर्वथा ॥ अभयकरू माथां ठेविला देवें ॥ ९ ॥

॥ ७२९ ॥ त्वरें धांवोनिया आलासे गोविंद ॥ सावध सावध नामदेवा ॥ १ ॥ रुसलासे नामा देवासी न बोले ॥ करें कुर्वाळिलें वदन त्याचें ॥ २ ॥ समजावुनी नामा धरिलासे पोटासी ॥ बोले मजपाशीं नामदेवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा उशीर कां केला ॥ किंवा माझा आला तुला राग ॥ ४ ॥ मागें बहुतांनीं वर्णिले प्रबंध ॥ पाहुनी म्यां तुझा संबंध वेडावलों ॥ ५ ॥ ऐसें बोलूनिया माथा ठेवी चरणीं ॥ प्रताप तूं नामदेवा ॥ ६ ॥

॥ ७३० ॥ भक्त पुंडलीकें अससी उभा केला ॥ त्याचेनि रागें मजशीं धरिला अबोला ॥ १ ॥ मी तुझें पोसणें मी तुझें पोसणें ॥ मी तुझें पोसणें पांडुरंगा ॥ २ ॥ तुझी कृपा नाहींरे हें सत्य ॥ मी तरी प्रत्यक्ष रूप अवलोकितों

॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा तूं जाणतोसी मातें ॥ उफराटें पाहोनी गिळतों मी तुतें ॥ ४ ॥

॥ ७३१ ॥ जिहीं शरणांगतीं सांडिली वासना ॥ ते त्वां नारायणा आपंगिले ॥ १ ॥ ह्मणोनी उतराई व्हावया आमुतें ॥ ओसरलें चित्तें चाळविसी ॥ २ ॥ अज्ञान लेंकरूं ठकविलें धुरु ॥ तैसा मी अधिकारु नव्हें जाणा ॥ ३ ॥ लंकापति तुवां केला बिभीषण ॥ झालासी उत्तीर्ण वाचाऋणें ॥ ४ ॥ नामा ह्मणे तैसा नव्हें मी अज्ञान ॥ माग सर्व देईन तुझ्या हातीं ॥ ५ ॥

॥ ७३२ ॥ तुज विकोनी घातली वोरे ॥ मज समोर बोलतोसी ॥ १ ॥ उच्छिष्ट शिदोरी घेउनिया करीं ॥ भक्तांचा भिकारी तूंचि एक ॥ २ ॥ चोर आणि शिनळू चाळविले गोवळे ॥ अनंत मर्दिले दुष्टकाळ ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा सांगेन वर्म ॥ ऐकतां न राहे संतांचें कर्म ॥ ४ ॥

॥ ७३३ ॥ मरणें पेरणें जन्म उगवणें ॥ मायेची ती खूण सांगितली ॥ १ ॥ संग तुझा पुरे संग तुझा पुरे ॥ संग तुझा पुरे नारायणा ॥ २ ॥ तूं तरी न मरे मी तरी न पुरे ॥ भक्ति हे संचरे हाचि लाभु ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझ्या ठायींचा मी नेणें ॥ संसार भोगणें तुझी लाज ॥ ४ ॥

॥ ७३४ ॥ मुळींच मी जाणें तुझें ठेंगेपण ॥ काय नारायणा बोलसील ॥ १ ॥ पुरे पुरे आतां तुमचे आचार ॥ मजशीं वेव्हार घालूं नको ॥ २ ॥ लालुचाईसाठीं मागे भाजी पाना ॥ लाज नारायणा तुज नाहीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे काय सांगों तुझी कीर्ति ॥ वाउगी फजिती करूं तुज ॥ ४ ॥

॥ ७३५ ॥ उदार कृपाळ सांगशील जना ॥ तरी त्या कां रावणा मारियेलें ॥ १ ॥ नित्यानित्य पूजा शिर कमळावरी ॥ तेणें तुझें हरी काय केलें ॥ २ ॥ किती बडिवार सांगसील वांया ॥ ठावा पंढरिराया आहेसी आह्मां ॥ ३ ॥ कर्णा ऐसा वीर जुंझार उदार ॥ त्यासी त्वां जर्जर केलें बाणीं ॥ ४ ॥ पाडिले भूमीसी नयेचि करुणा ॥ त्याचे नारायणा पाडिले दांत ॥ ५ ॥ श्रियाळ बापुडें सात्विक निर्वाणी ॥ खादलें कापोनी त्याचें पोर ॥ ६ ॥ ऐसा कठिण कोण होईल दुसरा ॥ कांडियेलें शिरा उखळामाजीं ॥ ७ ॥ शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग ॥ कापिलें त्याचें अंग ठायींठायीं ॥ ८ ॥ जाचोनियां प्राण घेतला तयाचा ॥ काय सांगशी वाचा बडीवार ॥ ९ ॥ हरिश्चंद्राचें राज्य घेउनी सर्व ॥ विकिला त्याचा जीव डोंबाघरीं ॥ १० ॥

बहुतचि श्रम दिधले तयासी ॥ परी तो सत्वासी ढळेचिना ॥ ११ ॥ पाडिला विघड नळा दमयंती ॥ ऐसी कृपामूर्ती बुद्धि तुझी ॥ १२ ॥ आणिक तुझी कीर्ति सांगावी ती किती ॥ केली ते फजिती माउशीची ॥ १३ ॥ मारियेला मामा सखा पुरुषोत्तमा ॥ नामा ह्मणे सीमा फार केली ॥ १४ ॥

॥ ७३६ ॥ स्फुंदस्फुंदोन नामा उभा महाद्वारीं ॥ चित्त पायांवरी विठोबाच्या ॥ १ ॥ उभा दीनानाथ उभारुनी बाहे ॥ पालवीत आहे पीतांबरें ॥ २ ॥ आरता येरे नामया धरिला पोटासी ॥ कोणे गांजिलासी दुर्जनानें ॥ ३ ॥ अंतरींचें सांगे पडे माझ्या मागें ॥ कां करिसी उद्वेग संसारींचे ॥ ४ ॥ नामा ह्मणे विठो असें मी नेणता ॥ आठवीं पंढरिनाथा वेळोवेळां ॥ ५ ॥

॥ ७३७ ॥ भूमी लोळे नामा कंठ सद्गदित ॥ डोळया स्रवत अश्रुजळ ॥ १ ॥ इतुकें देखोनियां द्रवला पुरुषोत्तम ॥ नाम्यासी सप्रेमें उचलिलें ॥ २ ॥ नाम्या तुज काय वाटतसें दुःख ॥ संसाराचा शोक तुज झाला ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा तुज ऐसा दाता ॥ मज भवव्यथा कवणेपरी ॥ ४ ॥

॥ ७३८ ॥ विष पाजावया पुतना ते आली ॥ ते तुवां तारिली काय ह्मणुनी ॥ १ ॥ पुसाया ह्मणोनि वेश्या बोभाइली ॥ ती तुवां तारिली काय ह्मणुनी ॥ २ ॥ पिंगळेची आख्या पुराणीं ऐकिली ॥ ते तुवां तारिली काय ह्मणुनी ॥ ३ ॥ गौतमाचे शापें अहल्या शिळा झाली ॥ ते तुवां तारिली काय ह्मणुनी ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशवा अकळ तुझी करणी ॥ विसंबसी झणीं तूंचि मज ॥ ५ ॥

॥ ७३९ ॥ शरण आल्याचा न पाहसी अवगुण ॥ कृपेचें लक्षण सहज आहे ॥ १ ॥ गजेंद्र गणिकेची राखिली त्वां लाज ॥ सोडविला द्विज अजामिळ ॥ २ ॥ सांगणें हें काय तुह्मी दिलें देवा ॥ उदारा केशवा मायबापा ॥ ३ ॥ नामा ह्मणे झणीं अव्हेरिसी मज ॥ जगीं होईल लाज थोर तुज ॥ ४ ॥

॥ ७४० ॥ केशव पुसे नामयासी ॥ तुझी नांदणूक कैसी ॥ १ ॥ आह्मां काय उणें काय उणें ॥ तुझेनि धर्में दातारा ॥ २ ॥ तुह्मां घरीं बोचकें लुगडीं ॥ आह्मां घरीं पोरें उघडीं ॥ ३ ॥ तुह्मां दुर्ग दारवंटा ॥ आह्मां घरीं बाराबाटा ॥ ४ ॥ तुह्मां घरीं गाई ह्मैशी ॥ आह्मां घरीं उंदीर घुशी ॥ ५ ॥ तुह्मां घरीं बटकी दासी ॥ आह्मां घरीं आहेत लासी ॥ ६ ॥

तुह्मां घरीं शेजा बाजा ॥ आह्मां घरीं तृण शेजा ॥ ७ ॥ तुह्मां घरीं सुवर्ण मडकीं ॥ आह्मां घरीं खापरें फुटकीं ॥ ८ ॥ तुह्मां घरीं लेंकुरें वाडें ॥ आह्मां घरीं तुळसीझाडें ॥ ९ ॥ नामा ह्मणे तुमचे घरीं सोनें दाम ॥ आमुचे घरीं तुमचें नाम ॥ १० ॥

॥ ७४१ ॥ कुटुंब काबाडी सदा कानकोंडा ॥ जळो या ब्रह्मांडा भूमीभार ॥ १ ॥ खादलें जेविलें न लागे माझे आंगीं ॥ झालों मी उद्वेगी रात्रंदिवस ॥ २ ॥ पाळिली पोशिली बहुता सायासीं ॥ येती कामासी ह्मणोनियां ॥ ३ ॥ तंव भजती आपुलिया स्वार्था ॥ न करिती चिंता परलोकींची ॥ ४ ॥ ऐसा दुर्जनांचा धरोनी पातेरा ॥ केला म्यां मातेरा आयुष्याचा ॥ ५ ॥ भागल्या न ह्मणती बैस घे विश्रांती ॥ आठवी श्रीपति जीवलगातें ॥ ६ ॥ दुःखाचे डोंगर पडती मजवरी ॥ पाव बा श्रीहरि मायबापा ॥ ७ ॥ करुणेचीं उत्तरें ऐकोनी पंढरीराय ॥ वीटेवरूनी बाह्य उभारिली ॥ ८ ॥ नाभी नाभी नाम्या भिऊं नको आतां ॥ माझ्या शरणांगता कोण गांजी ॥ ९ ॥

॥ ७४२ ॥ कल्पतरुतळीं बैसलिया ॥ कल्पिलें फळ न पविजे ॥ १ ॥ कामधेनू जरी दुभती ॥ तरी उपवासी कां मरावें ॥ २ ॥ उगे असा उगे असा ॥ होणार तें होय जाणार तें जाय ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा काय तुझी भीड ॥ संतां महंतांदेखतां सांगेन तुझी खोड ॥ ४ ॥

॥ ७४३ ॥ धरोनी हस्तक बैससी एकांतीं ॥ भक्तांसी श्रीपति सर्वकाळ ॥ १ ॥ दाखवी चरण दाखवी चरण ॥ दाखवी चरण धांव नेटें ॥ २ ॥ सर्व आचरण दाविसी प्रकार ॥ कल्पना अंधार निमित्याचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे होसी चतुर आपण ॥ आमुचें निर्वाण पाहूं नको ॥ ४ ॥

॥ ७४४ ॥ महाद्वारीं सुख असे या सुखाचें ॥ लागती संताचे चरणरज ॥ १ ॥ ह्मणोनियां स्थळ पाहिलें निवांत ॥ झालें चित्त तेथें समाधान ॥ २ ॥ सकळ वैष्णवांसहित बोळवण करा ॥ तुह्मी हो दातारा मजलागीं ॥ ३ ॥ देव ह्मणे नाम्या राहें पक्षभरी ॥ पुरतील अंतरीं कोड तुझे ॥ ४ ॥

॥ ७४५ ॥ राजमंदिराभीतरीं रुक्मिणी सेजेवरी ॥ नामा परसासरीं बोळगो आले ॥ १ ॥ नामया देखोनी झडकरी उठली ॥ आड उभी ठेली जाऊनियां ॥ २ ॥ अचळ सरिसा करी श्रृंग माथावरी ॥ पाहे पां निदसुरी होती कैसी ॥ ३ ॥ मी ह्मणे नावेक लागेल वेळ यातें ॥ तंव अवचित देखियेलें

॥ ४ ॥ कनक परयेळीं घेऊनी आरती करीं ॥ ओवाळिलें हरि नामया सहित ॥ ५ ॥

॥ ७४६ ॥ हा चाळविलें अनंत सेवका ॥ तोचि चाळा मज दाविसी निका ॥ १ ॥ भला भला जाहलासी शाहणा ॥ भेणें पळविलें शास्त्रा पुराणा ॥२॥ आदि अंतीं तुझ्या जाणविल्या खुणा ॥ आतां काय करिसी पंढरीच्या राण्या ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा मज मारोनी दवडिसी ॥ पुढती न धरिसी सोय माझी ॥ ४ ॥

॥ ७४७ ॥ सांडुनी वैकुंठ न धरत पातलों ॥ तुज भेटावया आलों पुंडलिका ॥ १ ॥ प्रितीचा वोरसू हृदयीं दाटला ॥ नुठेची कां वहिला आलिंगना ॥ २ ॥ भक्त शिरोमणी आमचा जीवलग ॥ ह्मणे पांडुरंग पुंडलिका ॥ ३ ॥ स्फुरती भुजादंड आणि वक्षस्थळ ॥ हरुषें नयनकमळ विकासले ॥ ४ ॥ आनंदें रोमांच उद्भवले आंगीं ॥ क्षेमा देई वेगीं भक्तराया ॥ ५ ॥ मज नामरूप तुमचेनी संभ्रमें ॥ केलीं जन्मकर्मं असंख्यात ॥ ६ ॥ तुमचीया आवडी असे म्यां विकला ॥ सांग कोण्या बोला रुसलासी ॥ ७ ॥ हृदयींचें निजगुज सांगरे सकळीक ॥ तेणें मज सुख होईल जीवा ॥८॥ परतोनियां दृष्टि पाहे आळूमाळ ॥ तेणें हरेल सकळ श्रम माझा ॥ ९ ॥ ऐसा भक्तजनवत्सलू भक्तांचा विसांवा ॥ भक्तांचिया भावा भाळलासे ॥ १० ॥ कटावरी दोनी हात उभा पुंडलिका द्वारीं ॥ नामया स्वामी हरि विनवीतसे ॥ ११ ॥

॥ ७४८ ॥ तुझा तूं आहेसी एकलारे एकु ॥ वाया कां हा शोकु वाढवीसी ॥ १ ॥ आपणा मानसीं विचारोनी पाही ॥ सावध नाम्या होई सोय धरी ॥ धृ० ॥ तुझा तूंचि देव तुझा तूंचि भक्त ॥ पाहेपां सिद्धांत गुरुमुखें ॥ २ ॥ तुझा तूंचि पूज्य तुझा तूं पुजीता ॥ भजन भजता तुझा तूंचि ॥ ३ ॥ तुझा तूंचि गुरु तुझा तूंचि शिष्य ॥ तुझा उपदेश तुज नाम्या ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशवा हें सर्व माझें ॥ हृदयीं चरण तुझे निरंतर ॥ ५ ॥

॥ ७४९ ॥ तुझ्या चरणाचें तुटतां अनुसंधान ॥ जाईल माझा प्राण तत्क्षणीं ॥ १ ॥ मग हें ब्रह्मज्ञान कोणापें सांगसी ॥ विचारी मानसीं पांडुरंगा ॥ धृ० ॥ वदनीं तुझें नाम होतांची खंडणा ॥ शतखंडरसना होईल माझी ॥ २ ॥ सांवळें सुंदर रूप पाहतां तुझे दृष्टि ॥ न देखता उन्मळती नयन हे

॥ ३ ॥ तुज परतें साध्य आणीक नाहीं साधन ॥ साधक माझें मन होईल भ्रांत ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशवा अनाथाचा नाथ ॥ झणीं माझा अंत पाहसी देवा ॥ ५ ॥

॥ ७५० ॥ विचारीतां सहज कोण्ही नव्हे माझें ॥ ह्मणोनी चरण तुझे दृढ धरिले ॥ १ ॥ हेंचि माझें ज्ञान हाचि गुरुमंत्र ॥ व्रत तप तीर्थ चरण तुझे ॥ धृ० ॥ हेचि माझी क्रिया हेंचि माझें कर्म ॥ हा माझा स्वधर्म चरण तुझे ॥ २ ॥ हेचि माझी पूजा हें माझें पूजन ॥ ध्याईन तुझे चरण हृदयकमळीं ॥ ३ ॥ हाचि परमानंद हेचि योगसिद्धि ॥ लय लक्ष समाधि चरण तुझे ॥ ४ ॥ नामा ह्मणे मनें मानीला निर्धार ॥ तरला भवसागर याचीपरी ॥ ५ ॥

॥ ७५१ ॥ तुझीया चरणाची नसंडी मी आस ॥ होत गर्भवास कोठवरी ॥ १ ॥ हेंचि मज देई जन्मजन्मांतरीं ॥ वाचे श्रीहरी नाम तुझें ॥ धृ० ॥ तुझीया नामाचा करीन विसांवा ॥ मनाचा हा ठेवा तुझे पायीं ॥ २ ॥ नामा ह्मणे माझे हेचि मनोरथ ॥ होईन शरणांगत जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

॥ ७५२ ॥ जन्ममरणाची कायसी हे चिंता ॥ तुझ्या शरणांगता पांडुरंगा ॥ १ ॥ वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी ॥ असतां चक्रपाणी भय कवणा ॥ २ ॥ हृदयीं तुझें रूप बिंबलें साचार ॥ तेथें कवणा पार संसाराचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझ्या नामाची परिवार ॥ असतां कळीकाळ पायांतळीं ॥ ४ ॥

॥ ७५३ ॥ जन्ममरणाचें घेतोसी धरणें ॥ सांग कवण्या गुणें विष्णुदासा ॥ १ ॥ कांहींच न घेसी कांहीं न मागसी ॥ ऋणिया करीसी सेवा ऋणें ॥ २ ॥ चतुर्विधा मुक्ति अथवा धनसंपत्ति ॥ नलगे तुझ्या चित्तीं काय करूं ॥ ३ ॥ समुद्रवलयांकित अवघे भुमंडळीं ॥ अथवा रसातळीं दुर्लभ कांहीं ॥ ४ ॥ भेटीलागी आर्त आहे रे वैकुंठ ॥ पाहातसे वाट रात्रंदिवस ॥ ५ ॥ नामा ह्मणे सर्व वोसंडीन चित्तें ॥ तुझ्या चरणापरतें नलगे गोड ॥ ६ ॥

॥ ७५४ ॥ मज तूं घेऊनिया बैससील किती ॥ तूं पाहा सहज स्थिति आत्मसुख ॥ १ ॥ कांहींच तूं नव्हेसी विचारी मानसी ॥ चैतन्य आहेसी शुद्धबुद्ध ॥ २ ॥ भजन भजीतां पूजन पूजितां ॥ आहे सर्वगता रूप तुझें ॥ ३ ॥ क्रिया कर्म कर्ता नव्हेसी सर्वथा ॥ सर्वांभूतीं देखतां तूंचि एक

॥ ४ ॥ ज्ञान ज्ञेय ज्ञाता ध्यान ध्येय ध्याता ॥ नाथिली उपाधी आतां नाहीं तुज ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशवा मज नलगे कांहीं ॥ देवा इतुकें देई सेवा तुझी ॥ ६ ॥

॥ ७५५ ॥ जन्ममरणाच्या खुंटती लहरी ॥ वायां कां येरझारी सीणतोसी ॥ १ ॥ सांगेन तें करी मन मुळीं आंवरी ॥ एकांतीं क्षणभरी चल जाऊं ॥ ध्रु० ॥ आकारलें तितुकें आहे नाशीवंत ॥ देव आणि भक्त कैंचे तेथें ॥ २ ॥ नामा ह्मणे केशवा असो तुझें गुज ॥ तुजवांचोनी मज नकळे कांहीं ॥ ३ ॥

॥ ७५६ ॥ जन्ममरणाचें मज भय दाविसी ॥ तें म्यां हृषीकेशी स्वीकारीलें ॥ १ ॥ आतां माझी चिंता तुज कां पंढरिनाथा ॥ असोंदे भलता भलते ठायीं ॥ ध्रु० ॥ सुखदुःख भोगणें माझें मीच जाणें ॥ तुज तंव सोसणें नलगे कांहीं ॥ २ ॥ नामा ह्मणे माझे हेची मनोरथ ॥ होईन शरणांगत जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

॥ ७५७ ॥ सहज तुझें सुख आहे तुजजवळी ॥ वायां मृगजळीं बुडो नको ॥ १ ॥ सोय धरी वेगीं होय पां सावध ॥ अनुभवी आनंद स्वस्वरूपीं ॥ ध्रु० ॥ हा जगडंबर पसरला पाल्हाळ ॥ मायामय सकळ स्वप्न सर्व ॥ २ ॥ शरीरसंपत्तीचा मानिसी निर्धार ॥ तों हें क्षणभंगुर सत्य जाण ॥ ३ ॥ आपुले साउलीं जासी बैसावया ॥ कोण तापलीया निववी तुज ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशवा असो तुझें ज्ञान ॥ देवा तुजवांचून नकळे कांहीं ॥ ५ ॥

॥ ७५८ ॥ माझीया मनासीं म्यां केला विचार ॥ तेणें मज निर्धार सांगीतला ॥ १ ॥ मज नलगे मुक्ति नलगे ब्रह्मज्ञान ॥ सांडोवा होईन पंढरीचा ॥ २ ॥ इंद्रिया मारीतां येती काकुळती ॥ तुज ओळगूं ह्मणती ठायीं ठायीं ॥ ३ ॥ श्रवणीं श्रवण अखंड तुझी कीर्ति ॥ विश्व विठ्ठल मूर्ती देखेन डोळां ॥ ४ ॥ नामामृतें रसना निवाली सा सुखें ॥ नाठवती दुःखें जन्मांतरीचीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसा कोण भाग्यहीन ॥ जो धरी वासना वैकुंठीची ॥ ६ ॥

॥ ७५९ ॥ व्यापकापरीस मन म्यां केलें वाड ॥ सांपडलें गोड प्रेमसुख ॥ १ ॥ जिकडे पाहे तिकडे विठोबा अवघा ॥ भीमा चंद्रभागा पुंडलीक ॥ ध्रु० ॥ बाहेरीं भीतरीं सर्व निरंतरीं ॥ हें ब्रह्मांड पंढरी झाली मज ॥ २ ॥

महुरलें तरुवर फळीं पुष्पीं भार ॥ तेंची निर्विकार सनकादिक ॥ ३ ॥ आवडीचा आनंदु तोची वेणुनादु ॥ अनुभवें गोविंदु गोपवेशें ॥ ४ ॥ नामा ह्मणे विठो भक्तीच्या वल्लभा ॥ मागें पुढें उभा सांभाळीत ॥ ५ ॥

॥ ७६० ॥ आह्मीं शरणांगतीं सांडिली वासना ॥ ते त्वां नारायणा अंगिकारिली ॥ १ ॥ ह्मणोनी प्रसन्न व्हावया आमुतें ॥ वोरसल्या चित्तें चालवीसी ॥ ध्रु० ॥ अज्ञान बाळकु ठकवीला धुरु ॥ तैसा मी अधिरु नव्हे जाण ॥ २ ॥ लंकापति केला तुवां बिभीषण ॥ झालासी उत्तीर्ण वाचाऋणें ॥ ३ ॥ उपमन्यें घेतला दुधाचाची छंद ॥ तैसा बुद्धिमंद नव्हे जाण ॥ ४ ॥ नामा ह्मणे तैसा नव्हे मी अज्ञान ॥ माग तुज देईन शरीर अवघें ॥ ५ ॥

॥ ७६१ ॥ बरें आह्मां कळों आलें देवपण ॥ आतां गुज कोण राखे तुझें ॥ १ ॥ मारिलें कां देवा मज आजिवरी ॥ आतां बरोबरी तुजमज ॥ २ ॥ जें आह्मीं बोलतों आहे तुझे आंगीं ॥ देईन प्रसंगीं शिव्या तुज ॥ ३ ॥ निलाजऱ्या तुज नाहीं यातिकुळ ॥ चोरटा शिंदळ ठावा जना ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज खवळीलें भांडा ॥ आतां धीर तोंडा न धरवे ॥ ५ ॥

॥ ७६२ ॥ कांरे विष्णुदासा कोमाईलें वदन ॥ गांजिलासी कवणें दुराचारीं ॥ १ ॥ क्षणएक जीव नगमे मज वेगळा ॥ मीहि साजवळा सदां असे ॥ २ ॥ वैकुंठ भुवन नलगे माझे चित्तीं ॥ झणीं याची खंति होईल तुज ॥ ३ ॥ लक्ष्मीचे विलासीं न घडे माझें मन ॥ झणीं याचे प्राण जांचावती ॥ ४ ॥ मी हो याचे प्राण हाही माझें मन ॥ जाणती हे खूण भक्त माझे ॥ ५ ॥ ह्मणोनी जवळी बोलाविला केशिराजें ॥ नामा धरी वोजे चरण दोन्ही ॥ ६ ॥

॥ ७६३ ॥ संकल्प विकल्प निरसूनिया भ्रांति ॥ दावीन विश्रांति अभिन्नव तुज ॥ १ ॥ सर्व भावें माझी धरूनी आवडी ॥ आस तूंरे सोडी इंद्रियांची ॥ २ ॥ जें जें विषयसुख लागेल तुझे मनीं ॥ तें तूं खेवा घालुनी घेई मज ॥ ३ ॥ श्रवण घ्राण रसना त्वचा आणि लोचन ॥ हे सकळ होउनी मीचि भोगी ॥ ४ ॥ यातायातीं तुज न घालीरे सायास ॥ धरि माझा विश्वास दृढ मनीं ॥ ५ ॥ अंतरीचें गुज बोलुनि पंढरिनाथ ॥ आलिंगन देत नामयासी ॥ ६ ॥

॥ ७६४ ॥ केशव ह्मणे नामयासी ॥ जैं तूं दुरी धरिला होतासी ॥ तैं तूं काकुळती भाकिसी ॥ मजलागीं हिंडसी दाही दिशा ॥ १ ॥ तुझें गाऱ्हाणें

सांगो संतापाशीं ॥ तीहीं तुज सरतें केलें भक्तिसी ॥ मी तंव वंद्य तिहीं लोकांसीं ॥ त्वां तव मजशीं भजियेलें ॥ २ ॥ आमुची वर्में कर्में बोलतोसी ॥ सलगी करुनि फार जातोसी ॥ उंच पदवी दिल्या पाइकासी ॥ तरी काय स्वामीसी भिऊं नये ॥ ३ ॥ मी विश्वासलों तुझीया भावासी ॥ परि तूं शब्देंहि न पुससी ॥ म्यां तव अमृतदृष्टीं पाहिलासी ॥ अढळपदासी दावीयलें ॥ ४ ॥ मी तंव वंद्य त्रिभुवनासी ॥ श्रुति स्मृति आगमासी ॥ न कळे अठरा पुराणांसी ॥ ऐसें त्वां मजसी भजियेलें ॥ ५ ॥ आतां असो बहु बोलासी ॥ शाहाणे सिणले मानसीं ॥ तप्तलोह उदक ग्रासी ॥ तैसा होउनि ठेलासी विष्णुदासा नामयारे ॥ ६ ॥

॥ ७६५ ॥ जगदानिया हें ब्रीद आहे जगीं ॥ ते आजि मजलागीं काय झालें ॥ १ ॥ मज पाहतां विसरूं पडिला नामाचा ॥ कीं तुज आमुचा वीट आला ॥ २ ॥ सुजाण्याच्या राया परिसे केशिराजा ॥ भक्ताचिया काजा लाजों नको ॥ ३ ॥ भक्तकाज कैवारी हें ब्रीद चराचरी ॥ तें ठेविलें क्षीरसागरीं लक्ष्मीपाशीं ॥ ४ ॥ मज पाहतां अभिलाष धरिला मानसीं ॥ मग तूं हृषीकेशी विसरलासी ॥ ५ ॥ दिनानाथ ऐसें नाम बहुतांसी वाटिलें ॥ निर्गुण तें उरलें तुजपाशीं ॥ ६ ॥ ह्मणोनि केशिराजा विसरलासी आह्मां ॥ विनवीतसे नामा विष्णुदास ॥ ७ ॥

॥ ७६६ ॥ क्षणएक एकांतीं बैसोनी निवाडे ॥ सांग मजपुढें आवडे जें जें ॥ १ ॥ सीण भाग आपुला सांगे पैं वहीला ॥ असेल जो वाटला मजवीण ॥ २ ॥ पुरवीन जीवीचें सर्व तुझें कोड ॥ गगनाहुनी वाड असेल जरी ॥ ३ ॥ वाटे माझें सर्व द्यावें तुझे हातीं ॥ नामरूप वृत्ति सहित मन ॥ ४ ॥ परि सर्व भावें तुझें उदासीन चित्त ॥ उरलें माझें आर्त कवण पुरवी ॥ ५ ॥ ह्मणोनि पांडुरंगें धरूनी हनुवटी ॥ सांगे जीवीच्या गोष्टी नाम्या जवळी ॥ ६ ॥

॥ ७६७ ॥ आषाढी कार्तिकी विसरूं नका मज ॥ सांगतसें गुज पांडुरंग ॥ १ ॥ पतितपावन मी तो आहे खरा ॥ तुमचेनि बरा दिसतसें ॥ २ ॥ तुह्मी जातां गांवा हुरहुर माझे जिवा ॥ भेटेल केधवां मजलागीं ॥ ३ ॥ धांवोनियां देव गळां घाली मिठी ॥ स्फुंदस्फुंदून गोष्टी बोलतसे ॥ ४ ॥ तिहीं त्रिभुवनीं मज नाहीं कोणी ॥ ह्मणे चक्रपाणी नामयासी ॥ ५ ॥

॥ ७६८ ॥ नामाची सांगडी देऊनीं आमुतें ॥ वैकुंठावरुतें नेउनी घाली ॥ १ ॥ कामक्रोध मगर करिती माझा त्रास ॥ झणीं तूं उदास होशी

देवा ॥ २ ॥ नामा ह्मणे झणीं मोकलिसी मातें ॥ तुझें नाम सरितें धरियेलें ॥ ३ ॥

॥ ७६९ ॥ माझिया मनें मज उपदेश केला ॥ तो मज बिंबला हृदयकमळीं ॥ १ ॥ निर्वाणीची एक सांगितली खूण ॥ कैवल्य चरण केशवाचे ॥ २ ॥ वेदशास्त्र श्रुति आणीक पुराणें ॥ पढोनि जाणणें हेंचि सत्य ॥ ३ ॥ क्रिया कर्म धर्म करणें ज्या कारणें ॥ ते खूण निर्वाण चरण हेचि ॥ ४ ॥ जप तप अनुष्ठान करोनि साधन ॥ प्रत्यक्ष निधान चरण हेचि ॥५॥ नामा ह्मणे मज कळलें अनुभवें ॥ न विसंबें चरण जीवें तुझे ॥ ६ ॥

॥ ७७० ॥ तूं आकाश मी भूमिका ॥ तूं लिंग मी साळुंका ॥ तूं समुद्र मी द्वारका ॥ स्वयें दोन्ही ॥ १ ॥ तूं वृंदावन मी चिरी ॥ तूं तुळशी मी मंजुरी ॥ तूं पांवा मी मोहरी ॥ स्वयें दोन्ही ॥ २ ॥ तूं चांद मी चांदणी ॥ तूं नाग मी पद्मिणी ॥ तूं कृष्ण मी रुक्मिणी ॥ स्वयें दोन्ही ॥ ३ ॥ तूं नदी मी थडी ॥ तूं तारूं मी सांगडी ॥ तूं धनुष्य मी भातोडी ॥ स्वयें दोन्ही ॥ ४ ॥ तूं वेद मी स्तविता ॥ तूं शास्त्र मी गीता ॥ तूं गंध मी अक्षता ॥ स्वयें दोन्ही ॥ ५ ॥ नामा ह्मणे पुरुषोत्तमा ॥ स्वयें जडलों तुझ्या प्रेमा ॥ मी कुडी तूं आत्मा ॥ स्वयें दोन्ही ॥ ६ ॥

॥ ७७१ ॥ आह्मी तुझें असों एकचि बोळघे ॥ नित्य परमानंदें वोसंडत ॥ १ ॥ या परपार न दिसे सर्वथा ॥ केले येतां जातां गर्भवास ॥ २ ॥ नामा ह्मणे चित्तीं विठ्ठलाचें प्रेम ॥ संकल्प विकल्प मन मावळले ॥ ३ ॥

॥ ७७२ ॥ लोखंडाचा विळा परिसासि लागला ॥ मागीलिया मोला केंवि पावे ॥ १ ॥ तैसे तुझे पाय वंदिले श्रीरंगा ॥ ह्मणोनियां जगा वंद्य झालों ॥ २ ॥ काष्ट होतां जरी कष्टें कमाविला ॥ नाम तो पावला देवपाट ॥ ३ ॥ दासी होती रंगी देव तिच्या संगीं ॥ तीसि नाना भोगीं उपचारिती ॥ ४ ॥ गांवरस होता गंगेसि मिळाला ॥ नद्या उद्धरिल्या नामें एकें ॥ ५ ॥ ऐसा बहुता पुण्यें जोडलासि आह्मां ॥ विनवीतसे नामा केशिराजा ॥ ६ ॥

॥ ७७३ ॥ संत ते कवण असंत ते कोण ॥ सांगावी हे खूण दोहीमाजीं ॥ देवा तुज कारणें ऐसें झालें ॥ १ ॥ पैल संत ह्मणोनि जवळी गेलें ॥ तेणें अमृत ह्मणोनि विष पाजिलें ॥ जीवासि घेतलें जालें तैसें ॥ २ ॥ संसारें गांजिलें गुरु गिरवसितीं ॥ भगवें देखोनि तारावें ह्मणती ॥ तंव ते नेणोनि उपदेशाची रीति ॥ कुकर्मीं घालिती तैसें झालें ॥ ३ ॥ कोणी एक

प्राणी सागरा पातले ॥ पैल तारूं ह्मणोनि जवळी गेले ॥ तंव ते तारूं नव्हेती तेथिचे हेर ॥ बुडविती शरिर तैसें झालें ॥ ४ ॥ कोणी प्राणी हिंवें पीडिलें ॥ पैल झाडी ह्मणोनि जवळी गेलें ॥ तंव अस्वल खिखाळत उठिलें ॥ नाक कान तोडिलें तैसें झालें ॥ ५ ॥ कोणी एक अंधारीं पडिला प्राणी ॥ जवळी गेला पैल दीप ह्मणोनी ॥ दीप नव्हे सर्प माथींचा मणि ॥ डंखिला प्राणि तैसें झालें ॥ ६ ॥ केशव ह्मणे नामयातें ॥ जे सर्वांभूतीं भजती मातें ॥ ऐसें हें वर्म सांगतसें तूतें ॥ ऐसिया संतांतें ह्मणिजे संत ॥ ७ ॥

॥ ७७४ ॥ काय मागूं विठ्ठल धुरे ॥ एक तुळशी दळ पुरे ॥ १ ॥ मागूं मुगुट माथाचा ॥ तरी तो आणिला इंद्राचा ॥ २ ॥ मागूं कुंडलें कर्णींचीं ॥ तरी तीं आणिलीं कर्णाचीं ॥ ३ ॥ मागूं पितांबर शेला ॥ तरी तो कासेसी कसिला ॥ ४ ॥ मागूं पादुका चरणींच्या ॥ तरी त्या आणिल्या शेषाच्या ॥ ५ ॥ मागूं तोडर पायींचा ॥ धाक जाईल असुरांचा ॥ ६ ॥ मागूं जातां लक्ष्मीसी ॥ रिद्धिसिद्धि जिच्या दासी ॥ ७ ॥ मागूं ह्मणे शंख जरी ॥ तरी तो मिरवे तुमच्या करीं ॥ ८ ॥ मागों सुदर्शन दळ ॥ या शस्त्राचें तुह्मां बळ ॥ ९ ॥ मागों वैजयंतीमाळ ॥ तरी शून्य दिसेल वक्षस्थळ ॥ १० ॥ कारण तेंचि मागितलें ॥ नामया केशवाचें प्रेम दिलें ॥ ११ ॥ नामा ह्मणे कांहीं न मागों ॥ तुझे चरणीं लक्ष लागो ॥ १२ ॥

॥ ७७५ ॥ देवें चहूं भुजीं दिलें आलिंगन ॥ कुरवाळिलें वदन चहूं करें ॥ १ ॥ धरूनि हनुवटी पाहे कृपादृष्टि ॥ केली सुखवृष्टि करूणाघनें ॥ २ ॥ नामदेव ऐसें नाम त्या ठेविलें ॥ तेणें अनुभविलें प्रेमसुख ॥ ३ ॥ हे संत भागवत माझिये आवडी ॥ माझ्या रूपीं बुडी देऊनि ठेले ॥ ४ ॥ परि या सकळांहूनि तुझा भक्तिभावो ॥ अमृत पान्हावो अधिक बोल ॥ ५ ॥ ज्ञान विज्ञानाचें मंडण ज्ञानेश्वरू ॥ वैराग्याचा मेरू निवृत्तिरावो ॥ ६ ॥ स्वात्मसुखबोधाचा सिंधु हा सोपान ॥ सर्वांत भूषण भक्तराय ॥ ७ ॥ परमानंद जोगा जगन्मित्र नागा ॥ वटेश्वर चांगा केशवदास ॥ ८ ॥ सांवता वंका चोखा आणि रोहिदास ॥ या सकळांहूनि विशेष महिमा तुझा ॥ ९ ॥ हा दास खेचर नरहरि सोनार ॥ आणि गोराकुंभार भानुदास ॥ १० ॥ हे माझे आवडते महाभक्तराज ॥ परि तुझेनि तृप्ति मज अधिक होय ॥ ११ ॥ उद्धव रुक्मांगद भिष्म आणि नारद ॥ बाळकें ध्रुव प्रल्हाद प्रसिद्ध जगीं ॥ १२ ॥ हे विषयीं विरक्त सहज जीवन्मुक्त ॥ परी तुझा अधिक भाग्यम-

हिमा ॥ १३ ॥ हे संत सोइरे जीवलग आमुचे ॥ सांगाति जीवाचे आवडते ॥ १४ ॥ परी तुझा आनंद सर्वांहुनी आगळा ॥ मज असे मानला नामदेवा ॥ १५ ॥

॥ ७७६ ॥ तुझें गुणनाम ऐकतां श्रवण नाराध्ये ॥ अवलोकन करितां नयन नाराध्ये ॥ पूजन करितां कर नाराध्ये ॥ ऐसी आराणुक द्यावी कमळापती ॥ १ ॥ नरहरि नरहरि या नामें उदंड ॥ केव्हांहि नसावें रिकामें तोंड ॥ ध्रु० ॥ खांदीं सतत करंडा वाहे ॥ मस्तकीं अखंड निर्माल्य राहे ॥ नेत्रीं आनंदजळ वाहे ॥ यामध्यें देवा म्हणें कांहीं उणें होय ॥ २ ॥ तुझेनि प्रसादें जठर पोसिलें ॥ चरणोदकें तृषाहरण केलें ॥ नामें नृत्य करितां मन हें निवालें ॥ दंडवत घालितां श्रम हरले ॥ ३ ॥ गतशयनीं विसर न द्यावा श्रीरामा ॥ यापरि निश्चित परमात्मा ॥ तूं आलिया निवारिसी श्रमा ॥ ऐसें केशिराजा विनवितो नामा ॥ ४ ॥

॥ ७७७ ॥ तुझ्या माझ्या शेता नाहीं पेंडवळ ॥ दावियेला डोळा पांडुरंगा ॥ १ ॥ कल्पनेची पेंडी पाप कुंदा काढी ॥ काशा देशधडी लावियेल्या ॥ २ ॥ त्रिगुण तिफणी धरोनी सूत्रधारी ॥ वेद बैल चारी जुंपियेले ॥ ३ ॥ अनाथाचें शेत प्रेमाचा ओलावा ॥ शेत राखे देवा पांडुरंगा ॥ ४ ॥ ब्रह्मनामबीज बांधोनियां ओटी ॥ पेरी दाटोदाटी नामदेव ॥ ५ ॥

॥ ७७८ ॥ यज्ञ याग दान व्रत उद्यापन ॥ हें नेणें मी साधन काय करूं ॥ १ ॥ जप तप होम स्वधर्मरक्षण ॥ नव्हें तीर्थाटण काय करूं ॥ २ ॥ गये पिंडदान प्रयागीचें स्नान ॥ कर्म अनुष्ठान नव्हें मज ॥ ३ ॥ भक्ति उपासना देवाचें पूजन ॥ ध्यान उपोषण नव्हें मज ॥ ४ ॥ पृथ्वीचें भ्रमण अनुताप संपूर्ण ॥ सारासार खूण नकळे कांहीं ॥ ५ ॥ पुण्य नाहीं गांठीं पापाचें संचित ॥ परम पतीत वाटे मज ॥ ६ ॥ माझा देह आहे पातकाचा थारा ॥ मी अपराधी खरा कळलें मज ॥ ७ ॥ पुराणप्रसिद्ध नाम तुझें सार ॥ ऐसें निरंतर बोलताती ॥ ८ ॥ अन्यथा वचन नव्हें हें प्रमाण ॥ तरी ब्रीदें जाण सांडविलीं ॥ ९ ॥ तुझां ब्रीद आपूलें जतन करणें ॥ तरी नारायणें सांभाळावें ॥ १० ॥ नामेविण कांहीं आह्मांपाशीं नाहीं ॥ विचारोनि पाहीं पांडुरंगा ॥ ११ ॥ धन वित्त सर्व आमची हे जोडी ॥ नामा ह्मणे गोडी नामीं तुझ्या ॥ १२ ॥

॥ ७७९ ॥ माझीया भक्तां जे ठेविती दूषणां ॥ तुटोनी रसना पडेल त्यांची ॥ १ ॥ ऐसे दुराचारी असती जे नर ॥ भोगिती अघोर सत्य जाणा ॥ ध्रु० ॥ माझीया भक्तां जे करिती छळण बुद्धि ॥ त्यांची वंशवृद्धि नव्हे कदां ॥ २ ॥ माझीया भक्तांचा करिती उपहास ॥ त्यांचा समूळ वंश यमलोकीं ॥ ३ ॥ केशव ह्मणे नाम्या बोलीलों सत्यवाणी ॥ लटीकें ह्मणेल तो पडेल पतनीं पापी ॥ ४ ॥

---

## गुरु करण्यास देवाचा नामदेवास बोध.

॥ ७८० ॥ अनाथांचा नाथ तुझी ब्रिदावळी ॥ मज कांरे जाळी भवव्यथा ॥ १ ॥ देव ह्मणे नाम्या गुरु वांचूनिया ॥ मुक्ति पावावया आन नाहीं ॥ २ ॥ आन नेणे कांहीं करीसि विपत्ति ॥ नव्हे माझी प्राप्ति गुरुवीण ॥ ३ ॥ जाई नाम्या जाई गुरुसी शरण ॥ तुटे भवबंधन तुझें वेगीं॥ ४॥ नामा ह्मणे देवा कवणा शरण जाऊं ॥ कोणा मी होऊं शरणांगत ॥ ५ ॥

॥ ७८१ ॥ देव ह्मणे नाम्या विसोबाखेचरासि ॥ शरण तयासि जावें वेगीं ॥ १ ॥ इतुकें ऐकोनि नमियेलें देवा ॥ चालियेला तेव्हां विसोबापाशीं ॥ २ ॥ चिंताग्रस्त नामा आला आंवढ्यासि ॥ पुढें देउळासी देखीयेलें ॥ ३ ॥ नामा तयेकाळीं गेला देउळासी ॥ देउळीं कौतुकासी देखीयेलें ॥ ४ ॥

॥ ७८२ ॥ देवावरी पाय ठेवूनि खेचर ॥ निजेला परिकर निवांतचि ॥ १ ॥ देखोनियां नामा पावला विस्मया ॥ कैसा हा प्राणीया देवो नेणें ॥ २ ॥ उठिउठि प्राण्या आंधळा तूं काय ॥ देवावरी पाय ठेवीयेले ॥ ३ ॥ विसोबाखेचर बोले नामदेवा ॥ उठविलें जीवा कांरे माझ्या ॥ ४ ॥ देवावीण ठाव रिता कोठें आहे ॥ विचारोनि पाहे नामदेवा ॥ ५ ॥ जेथें देव नसे तेथें माझे पाय ॥ ठेवि पा अन्वय विचारूनी ॥ ६ ॥ नामा पाहे अवघा जिकडे तिकडे देव ॥ कोठें रिता ठाव न देखेची ॥ ७ ॥

॥ ७८३ ॥ इतुकें देखोनियां चरणीं घाली मिठी ॥ सांठवला सृष्टि अवघा देव ॥ १ ॥ तिहिं त्रिभुवनीं आपण व्यापूनी ॥ आनंदें कोंदोनी राहियेला ॥ २ ॥ श्रीगुरुचे पाय जीवें न विसंबत ॥ मनोवृत्तिसहित ओंवाळीले ॥ ३ ॥

डोळीयांचे डोळे उघडीले जेणें ॥ आनंदाचें लेणें लेवविलें ॥ ४ ॥ जन्ममरणाचें तोडीलें सांकडें ॥ कैवल्यचि पुढें दावीयेलें ॥ ५ ॥ कैवल्याचा गाभा विटेवरी उभा ॥ दिसे दिव्य शोभा पांडुरंग ॥ ६ ॥ नामा ह्मणे माझी भक्ति हे माउली ॥ कृपेची साउली केली मज ॥ ७ ॥

॥ ७८४ ॥ सर्वकाळीं परमात्मा आहे सर्व देशीं ॥ भावना हे अहर्निशीं दृढ धरी ॥ १ ॥ संतसमुदाय मिळती जेथें जेथें ॥ जाय तेथें तेथें लोटांगणी ॥ २ ॥ चिंता न करी नाम्या येणें तरसी जाण ॥ तुज सांगितली खूण निर्वाणीची ॥ ३ ॥

---

## *नामदेवास अंभग करण्यास देवाच्या आज्ञेविषयीं तुकारामबावांचा लेख.

॥ ७८५ ॥ नामयासी केलें स्वप्नामाजीं जागें ॥ स्वयें पांडुरंगें येऊनियां ॥ १ ॥ सांगितलें कानीं करावें कवित्व ॥ वाउगें अनुचित बोलूं नये ॥ २ ॥ माय टाकी सळे धरिलें विठ्ठलें ॥ थापटोनी केलें सावधान ॥ ३ ॥ प्रमाणाची संख्या केली शत कोटी ॥ उरले शेवटीं लावी तुका ॥ ४ ॥

॥ ७८६ ॥ नामयानें संकल्प केला शत कोटी ॥ पूर्णता शेवटीं कैसी आली ॥ १ ॥ साठी लक्ष आणि चौऱ्याण्णव कोटी ॥ ळीत शेवटीं नव लक्ष ॥ २ ॥ माता पिता कांता भगिनी कुमारी गोमटी ॥ अभंग नवकोटी वदले वाचे ॥ ३ ॥ येथूनिया जाहला सरस्वतीचा लेख ॥ पुढें गजमुख सादर जाहला ॥ ४ ॥ सत्राची कविता आलीसे मेळणीं ॥ प्रेमरस वाणि प्रेमळचि ॥ ५ ॥ चौघेजण पुत्र चौघी त्याच्या सुना ॥ कोटी सत्रा जाणा वदलीं वाचे ॥ ६ ॥ एक कोटी अभंग श्रीमुखाची साक्ष ॥ पन्नास ते लक्ष रुक्मिणीचे ॥ ७ ॥ येथोनिया जाहला गजवदनाचा लेख ॥ बाकी राहिली देख पंचविसाची ॥ ८ ॥ जनीचे अभंग साडे बाराकोटी ॥ प्रेमरस मिठी प्रेमाचिये ॥ ९ ॥ चौपन्न हे कोटी एकोणहत्तर लक्ष ॥ कवित्व हें साक्ष नमायाचें ॥ १० ॥ अनंतभटें केला असे लेख ॥ श्रीमुख देख नारायण ॥ ११ ॥ तुका ह्मणे ऐसी निवड केली निकी ॥ राहिली ती बाकी शेष पुढें ॥ १२ ॥

---

* हे दोन अभंग आह्मी छापलेल्या तुकारामबावांच्या गाथेंत आले नाहींत.

## नामदेवाचा संकल्प, आणि त्यास अभंग करण्याविषयीं देवाचें साह्य.

॥ ७८७ ॥ चंद्रभागे तीरीं आयकिली गोष्टी ॥ वाल्मीकें शतकोटी ग्रंथ केला ॥ १ ॥ माझिया चित्तासी फार झाले क्लेश ॥ वृथा म्यां आयुष्य गमाविलें ॥ २ ॥ जाऊनि राऊळा विठोसी विनवीलें ॥ वाल्मीकानें केलें रामायण ॥ ३ ॥ असेन मी खरा तुझा भक्त देवा ॥ सिद्धीस हा न्यावा पण माझा ॥ ४ ॥ शतकोटी तुझे करीन अभंग ॥ ह्मणे पांडुरंग ऐक नाम्या ॥ ५ ॥ तयेवेळीं होती आयुष्याची वृद्धि ॥ आतांची अवधि थोडी असे ॥ ६ ॥ नामा ह्मणे जरी न होतां संपूर्ण ॥ जिव्हा उतरीन तुज पुढें ॥ ७ ॥

॥ ७८८ ॥ निश्चय पाहूनि उपजली दया ॥ स्वामी देवराया पांडुरंगा ॥ १ ॥ सारजेसी सांगे भीमातीरीं हरि ॥ बैस जिव्हेवरी नामयाच्या ॥ २ ॥ लाडकें लडिवाळ नामा माझें तान्हें ॥ तयाला मजवीण कोण आहे ॥ ३ ॥ मजवरी त्याचें फार असे ऋण ॥ होईन उत्तीर्ण एवढ्यानें ॥ ४ ॥ नामा ह्मणे हातीं बांधोनियां वह्या ॥ बैसे लिहावया पांडुरंग ॥ ५ ॥

---

## नामदेवाचा संकल्प.

॥ ७८९ ॥ जें जें घडेल तें तें घडो ॥ देह राहो अथवा पडो ॥ १ ॥ नाम न सोडीं सर्वथा ॥ दीनबंधू पंढरिनाथा ॥ २ ॥ जैसा जैसा असेल भोग ॥ तैसा तैसा घडेल योग ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवातें ॥ घडेल तें घडो या देहातें ॥ ४ ॥

॥ ७९० ॥ बोलूं ऐसे बोल ॥ जेणें बोलें विठ्ठल डोले ॥ १ ॥ प्रेम सर्वांगाचें ठायीं ॥ वाचे विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥ नाचूं कीर्तनाचे रंगीं ॥ ज्ञानदीप लावूं जगीं ॥ ३ ॥ परेहुनि परतें घर ॥ तेथें राहूं निरंतर ॥ ४ ॥ सर्व सत्ता आली हातां ॥ नामयाचा खेचर दाता ॥ ५ ॥

॥ ७९१ ॥ देह जावो अथवा राहो ॥ पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥ चरण न सोडी सर्वथा ॥ तुझी आण पंढरिनाथा ॥ २ ॥ मुखीं तुझें मंगळ-

नाम ॥ हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवराजा ॥ केला नेम चालवी माझा ॥ ४ ॥

॥ ७९२ ॥ विठ्ठल आवडी प्रेमभावो ॥ विठ्ठलनामाचा रे टाहो ॥ तुटला हा संदेहो ॥ भवमूळव्याधीचा ॥ १ ॥ ह्मणा नरहरि उच्चार ॥ कृष्ण हरि श्रीधर ॥ हेंचि नाम आह्मां सार ॥ संसार तरावया ॥ २ ॥ एकतत्व त्रिभुवनीं ॥ हेंचि आह्मां हरिपर्वणी ॥ जें गाइजे पुराणीं ॥ वेदशास्त्रांसहित ॥ ३ ॥ नेघों नामाविण कांहीं ॥ विठ्ठल कृष्ण लवलाहीं ॥ नामा ह्मणे तरलों पाहीं ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणतांचि ॥ ४ ॥

॥ ७९३ ॥ अवघा संसार सुखाचा करीन ॥ अवघ्या भावें धरीन विठ्ठल एक ॥ १ ॥ अवघा शिणभाग हिरोन घेईल ॥ अवघेचि तोडीन मायाजाळ ॥ २ ॥ अवघा जीवलग हाचि पैं होईल ॥ अवघा घेईल भार माथां ॥ ३ ॥ अवघा त्रिविधताप क्षणें मावळेल ॥ अवघा चालवील योगक्षेम ॥ ४ ॥ अवघ्या संसाराचें बैसणें मोडील ॥ अवघेंचि तोडील मायाजाळ ॥ ५ ॥ नामा ह्मणे अवघी सांडीं मिथ्या भ्रांति ॥ विठ्ठलेविण विश्रांति नाहीं कोठें ॥ ६ ॥

॥ ७९४ ॥ नामें तरूं अवघे जन ॥ यमपुरी घालूं वाण ॥ १ ॥ करूं हरिनामकीर्तन ॥ तोडूं देहाचें बंधन ॥ २ ॥ करूं हरिनामाचा घोष ॥ कुंभपाक पाडूं ओस ॥ ३ ॥ ऐसा नामा यशवंत ॥ विठोचा शरणांगत ॥ ४ ॥

॥ ७९५ ॥ तपें केलीं दाटोदाटीं ॥ थोरां पुण्याचिया साटीं ॥ १ ॥ जन्मोजन्मींच्या संकटीं ॥ विठो तुझी झाली भेटी ॥ २ ॥ दोन्ही चरण ललाटीं ॥ नामा ह्मणे न सोडीं मिठी ॥ ३ ॥

॥ ७९६ ॥ माथां मोरपिसां वेंठी ॥ श्रवणीं कुंडलें पदक कंठीं ॥ हातीं घेऊनि वेताटी ॥ गोधना पाठीं लागले ॥ १ ॥ तुझीं पाउलें अनंता ॥ न विसंबे गा सर्वथा ॥ गोविंदा अच्युता ॥ श्रीविठ्ठला ॥ २ ॥ गाई गोवळीं पावला ॥ एक ह्मणती वळावळा ॥ विष्णुदास नामा चरणा जवळा ॥ अखंड वळत्या देतसें ॥ ३ ॥

॥ ७९७ ॥ तूं एक ह्मणोनि मी एक ऐसा जाणें ॥ तुझें नाम नाणें विस्तारिलें ॥ १ ॥ आतां करिसी काय आतां करिसी काय ॥ सांपडली सोय रामचंद्रा ॥ २ ॥ चरणी जे आहे ते माझी पैं माये ॥ विश्वरूप तो वाहे

श्रीकमळीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा न सोडी मी भावा ॥ जन्मोजन्मीं सेवा द्यावी तुझी ॥ ४ ॥

॥ ७९८ ॥ अवघा संसार करीन सुखाचा ॥ जरी झाला दुःखाचा दुर्धरु हा ॥ १ ॥ विठोबाचें नाम गाईन मनोभावें ॥ चित्त तेणें नांवें सुखावेल ॥ २ ॥ इंद्रियांचीं कोडें सर्वस्वें पुरती ॥ मनाचे मावळती मनोधर्म ॥ ३ ॥ श्रवणीं श्रवणा नामाचा मबंदा ॥ नायकें स्तुतिनिंदा दुर्जनांची ॥ ४ ॥ कुंडल मंडित श्रीमुख निर्मळ ॥ पाहतां हे डोळे निवती माझे ॥ ५ ॥ विटे सहित चरण धरीन मस्तकीं ॥ तेणें तनु सुखी होईल माझी ॥ ६ ॥ संतसमागमें नाचेन रंगणीं ॥ तेणें होईल धुणी त्रिविध तापा ॥ ७ ॥ नामा ह्मणे सर्व सुखाचा सोइरा ॥ न विसंबें दातारा क्षणभरी ॥ ८ ॥

॥ ७९९ ॥ मीच माझा देव मीच माझा भक्त ॥ मी माझा कृतार्थ सहज असे ॥ १ ॥ बंध आणि मोक्ष मायेची कल्पना ॥ पडली होती मना कैसी भ्रांती ॥ २ ॥ विठ्ठलें विचारें दाखविलें सुख ॥ होतें जें असंख्य हारपलें ॥ ३ ॥ नामा ह्मणे सोय सांपडली निकीं ॥ झालों एकाएकीं हरीचा दास ॥ ४ ॥

॥ ८०० ॥ नमन करीन द्वारका नायका ॥ पांडव पाळका देवराया ॥ १ ॥ आतां मी गाईन गुण नामकीर्ति ॥ जेणें च्याऱ्ही मुक्ति दासी होती ॥ २ ॥ साधक लोकांसी हेंचि पैं साधन ॥ ब्रह्म सनातन वश होय ॥ ३ ॥ नामा ह्मणे सर्व साराचें हें सार ॥ जेणें निरंतर सुख वाटे ॥ ४ ॥

॥ ८०१ ॥ प्रीति नाहीं रायें वर्जियेली कांता ॥ परि तिची सत्ता जगावरी ॥ १ ॥ तैसे दंभधारी आह्मी तुझे भक्त ॥ घालूं यमदूत पायांतळीं ॥ २ ॥ रायाचा तो पुत्र अपराधी देखा ॥ तो काय आणिका दंडवेल ॥ ३ ॥ बहात्तर खोडी देवमण कंठीं ॥ आह्मां जगजेठी नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ ८०२ ॥ सर्व भावें तुतें जे ध्याती दातारा ॥ त्यांचिया संसारा तूंच होसी ॥ १ ॥ ज्याचे चित्तीं नाहीं आणिक कांहीं काम ॥ त्याचा योगक्षेम तूंचि होसी ॥ २ ॥ ऐहिक परत्र जें कांहीं देखिजे ॥ तें तुवां होईजे मायबापा ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझी भक्ति हे माउली ॥ केशवा वाहिली क्षणमात्रें ॥ ४ ॥

॥ ८०३ ॥ देह जावो हेचि घडी ॥ पाय हरीचे न सोडीं ॥ १ ॥ क्लेश हो नानापरी ॥ मुखीं रामकृष्ण हरी ॥ २ ॥ क्रीडा वैष्णवाचे मेळीं ॥ हाक केशव आरोळी ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठोबासी ॥ जें तें घडो या देहासी ॥ ४ ॥

॥ ८०४ ॥ फुटल्या घड्याचें नाहीं नागवणें ॥ संसार भोगणें तेणें न्यायें ॥ १ ॥ स्वप्नींची मात जागृतीस सांगे ॥ तैसा भवरोग प्रारब्धाचा ॥ २ ॥ नामा ह्मणे आतां जाणा तो संसार ॥ वाउगा पसार जाय जाणा ॥ ३ ॥

॥ ८०५ ॥ माझें सर्व भाग्य केशवाचे पायीं ॥ आणिक उपाय नेणों आह्मी ॥ १ ॥ पक्षि अवचित अंगणांत आला ॥ घेउनियां गेला चारा तेणें ॥ २ ॥ हाटकरी आह्मी हाटासि पैं गेलों ॥ फिरोनियां आलों गांवामाजीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे नमूं सर्व जीवजंत ॥ दिसे ते अनंत दृष्टीपुढें ॥ ४ ॥

॥ ८०६ ॥ भक्ति आह्मीं केली सांडोनि उद्वेग ॥ पावलों सत्संग सुख प्रेमें ॥ १ ॥ प्रेम काय करी बहु दोष वारी ॥ वैकुंठा माझारि वस्ती देसी ॥ २ ॥ सुख झालें आह्मा धरूं याचा संग ॥ पळे भवभंग श्रमूनियां ॥ ३ ॥ नामा ह्मणे सुख बहु झालें जीवा ॥ घडलिया सेवा विठोबाची ॥ ४ ॥

॥ ८०७ ॥ संसारसंकटें रिघालों पाठिसी ॥ आतां झणीं देसी याचे हातीं ॥ १ ॥ ब्रिदें बडिवार ऐकोनियां फार ॥ रिघों आह्मी द्वार विठोबाचें ॥ २ ॥ आणिकहि वार्ता सांगों काय आतां ॥ पंढरीच्या नाथा परिसावें ॥ ३ ॥ अमृत पाजणें प्रीतीनें भक्तासी ॥ सत्य हृषीकेशी नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ ८०८ ॥ आह्मां सांपडलें वर्म ॥ करूं भागवतधर्म ॥ १ ॥ अवतार हा भेटला ॥ बोलूं चालूं हा विसरला ॥ २ ॥ अरे हा भावाचा लंपट ॥ सांडुनि आलासे वैकुंठ ॥ ३ ॥ संतसंगतीं साधावा ॥ धरूनि हृदयीं बांधावा ॥ ४ ॥ नामा ह्मणे केउता जाय ॥ आमुचा गळा याचे पाय ॥ ५ ॥

॥ ८०९ ॥ जीव तूं प्राण तूं ॥ आह्मां तूं गा विठ्ठला ॥ १ ॥ जनक तूं जननी तूं ॥ सोयरा तूं गा विठ्ठला ॥ २ ॥ माझा गुरू तूं गुरु मंत्र तूं ॥ सर्वस्व तूं माझें ह्मणे नामा ॥ ३ ॥



॥ ८१० ॥ श्रीहरि श्रीहरि ऐसें वाचें ह्मणेन ॥ वाचा धरिसी तरी मी श्रवणीं ऐकेन ॥ १ ॥ श्रवणीं दाटसी तरी मी नयनीं पाहीन ॥ ध्यानीं मी ध्याईन जेथें तेथें ॥ २ ॥ जेथें जाये तेथें लागला हा आह्मां ॥ न संडी तुझें वर्म ह्मणे नामा ॥ ३ ॥

॥८११॥ आह्मांसि हो नाहीं आणिक प्रमाण ॥ नामासि कारण विठोबाच्या ॥ १ ॥ घालूनियां कास करितो कैवाड ॥ येऊं नेदी आड कळीकाळासी ॥ २ ॥ अवद्ध वांकडें गाऊं कैसें तरी ॥ वाचें नाम हरि उच्चारण ॥३॥ नामा ह्मणे निकी सांपडली सोय ॥ न सोडीं मी पाय खेचराचे ॥ ४ ॥

॥ ८१२ ॥ टाळ दिंडी घेऊनि हातीं ॥ केशवराय गाऊं गीतीं ॥ १ ॥ फुलें तोडूं बेल पाती ॥ नामें वाहूं कमळापती ॥ २ ॥ नामा ह्मणे लाखोली सदां ॥ सहस्र नामाच्या गोविंदा ॥ ३ ॥ आह्मी देवाचे देवाचे ॥ दास पंढरिरायाचे ॥ ४ ॥

॥ ८१३ ॥ वतन मिरासी आमुची पंढरी ॥ विठोबाचे घरीं नांदणूक ॥ १ ॥ सेवा करूं नित्य महाद्वारीं ॥ नामाची उजरी जागऊं तेथें ॥ २ ॥ साधु संतां शरण जाऊं एक्या भावें ॥ प्रसाद स्वभावें देती मज ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मी पायरीचे चिरे ॥ संत पाय हिरे देती वरु ॥ ४ ॥

॥ ८१४ ॥ आलासि आरते धरिलासि चित्तें ॥ आतां तुज मागुतें जावों नेदी ॥ १ ॥ शरीर प्राणाचा देईन मी बळी ॥ तुज हृदयकमळीं सांठवीन ॥ २ ॥ धरिलासि तूं एक वैकुंठनायक ॥ ह्मणे पुंडलीक पांडुरंगा ॥ ३ ॥ इहलोकीचें सुख न मागों सकळीक ॥ आणिक परलोक चाड नाहीं ॥ ४ ॥ पंढरीस राई रखुमाई समवेत ॥ तेणें मनोरथ पूर्ण होती ॥ ५ ॥ तुझें रूप दृष्टी नामस्मरण पुटीं ॥ मना चरणीं मिठी पडोनि गेली ॥ ६ ॥ तुझे चरणीं आर्त हृदयीं नामामृत ॥ तेणें मी समर्थ मिरवें जगीं ॥ ७ ॥ संतां सोयरियांची व्हावया भेटी ॥ ह्मणोनि वाळवंटीं वस्ती केली ॥ ८ ॥ परब्रह्म पुतळा देखिलासि डोळां ॥ समाधि सुख सोहळा पांडुरंगा ॥ ९ ॥ कटीं ठेवूनि हात आपण पंढरिनाथ ॥ भक्तांचा एकांत श्रवण करी ॥ १० ॥ उभारे ह्मणोनि दिधलें आपणातें ॥ संवोखून नाम्यातें प्रेम दिलें ॥ ११ ॥

॥ ८१५ ॥ भजूं येका विठोबास ॥ आणिक न करूं अभ्यास ॥ १ ॥ येथें साधन आहे एक ॥ पाहों विठोबाचें मुख ॥ २ ॥ वर्णूं हरीचे पवाडे ॥

काळ लावूं देशधडे ॥ ३ ॥ नामा विष्णुदास ह्मणे ॥ ऐसें करूं हरि किर्तन ॥ ४ ॥

॥ ८१६ ॥ आमुचा विठ्ठल प्रचंड ॥ इतरां देवांचें न पाहूं तोंड ॥ १ ॥ एका विठ्ठलावांचून ॥ न करूं आणिक भजन ॥ २ ॥ आह्मां एकविध भाव ॥ कदां न ह्मणूं इतरां देव ॥ ३ ॥ नित्य करूं हा अभ्यास ॥ ह्मणे नामा विष्णुदास ॥ ४ ॥

॥ ८१७ ॥ साठींसहस्र विप्रांवरी ॥ शिवनाम पंचाक्षरी ॥ १ ॥ तो राजा देखेन ॥ पर्वतु जेथें असे मल्लिकार्जुन ॥ २ ॥ भक्तिभावाचें अंजन ॥ साधावया निधान ॥ ३ ॥ मन मारूनि देईन बळि ॥ साधावया चंद्रमौळी ॥ ४ ॥ भ्रांति पाटा फिटला ॥ शिव मार्ग देखिला ॥ ५ ॥ विष्णुदास नामा पायाळ भला ॥ तेणें मळयानिळ देखिला ॥ ६ ॥

॥ ८१८ ॥ कोण होईल आत्मज्ञानि ॥ जो बा राहे साच्या ध्यानीं ॥ १ ॥ मज तों चरणांची आवडी ॥ जन्मोजन्मीं मी न सोडी ॥ २ ॥ होईल सिद्धीचा साधक ॥ त्यासि देई स्वर्गसुख ॥ ३ ॥ कोण होईल देहातीत ॥ त्यासी करी संग रहित ॥ ४ ॥ नामा ह्मणे जीवें साठीं ॥ तुज मज जन्में पडिली गांठीं ॥ ५ ॥

॥ ८१९ ॥ ऐसें माझें मनीं येतें पंढरीनाथा ॥ न सोडीं सर्वथा चरण तुझे ॥ १ ॥ यासि काय करूं सांगा जी गोपाळा ॥ कां स्नेह लावियेला पूर्वींहुनी ॥ २ ॥ हृदयीं चित्तवृत्ति मनेंसी मिळोनी ॥ अवघीं तुझ्या चरणीं सुरवाडिलीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा धरिली तुझी सेवा ॥ सुखा अनुभवा अनुभविलें ॥ ४ ॥

॥ ८२० ॥ कस्तुरीचा टिळा रेखिला कपाळीं ॥ तेणें ते शोभली मुर्ति बरी ॥ १ ॥ बरवा बरवा विठ्ठल गे बाई ॥ वर्णावया साही शिणताती ॥ २ ॥ श्रीवत्सलांछन वैजंयती गळां ॥ नेसला पाटोळा तेजःपुंज ॥ ३ ॥ पाउलें समान विटेवरी नीट ॥ नामा ह्मणे भेट द्यावी त्यांची ॥ ४ ॥

॥ ८२१ ॥ लपालासि तरी नाम कैसें नेसी ॥ आह्मी अहर्निशीं नाम गाऊं ॥ १ ॥ आह्मांपासूनियां जातां नये तुज ॥ तें हें वर्म बीज नाम घोंकूं ॥ २ ॥ आह्मांसी तों तुझें नामचि पाहिजे ॥ मग भेटी सहजें देणें लागे ॥३॥ भोळीं भक्तें आह्मीं चुकलों होतों वर्म ॥ सांपडलें नाम नामयासी ॥४॥

॥ ८२२ ॥ मायबापाची सांडूनियां आस ॥ धरिली तुझी कास पांडुरंगा ॥ १ ॥ ह्मणीं पांडुरंगा उपेक्षिसी मातें ॥ तरी हांसती तूंतें संतजन ॥ २ ॥ नामा ह्मणे तुझीं पाउलें समान ॥ तेथें माझें मन स्थिरावलें ॥ ३ ॥

॥ ८२३ ॥ तुझिये चरणीं असती दोनी भाव ॥ तरीच हा जीव नरककुंडीं ॥ १ ॥ बोल बोले एक मनीं असे आणिक ॥ तरी तयासी देख दोन बाप ॥ २ ॥ तुजवीण सुख आणिकांचें मानी ॥ तरी मज जननी दोन देवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझा सत्याचा साहाकारी ॥ आस मी न करी आणिकाची ॥ ४ ॥

॥ ८२४ ॥ पतीतपावन ब्रीद सोडवीन आतां ॥ तरीच पंढरीनाथा दास तुझा ॥ १ ॥ माझे गुण दोष न धरावे मनीं ॥ तारिले मजहूनि वंद्य कोण ॥ २ ॥ पितीया पतन स्वामीची करणी ॥ गणीका विमानीं कीर्ती कोण ॥ ३ ॥ अजामेळा अधीकार जावया वैकुंठा ॥ माझीया अदृष्टा काय झालें ॥ ४ ॥ शिशुपाळें शिव्या दिधल्या सभें आंत ॥ त्याहूनी पतीत थोर झालों ॥ ५ ॥ नामा ह्मणे पुढती न बोले मी वर्म ॥ अनुभवोनी प्रेम देई मज ॥ ६ ॥

॥ ८२५ ॥ सुख दुःख जिवाचें सांगेन आपुलें ॥ हृदय फुगलें फुटों पाहे ॥ १ ॥ धरुनी पीतांबर नेईन एकांतीं ॥ सांगेन जिवींची खंती तया पुढां ॥ २ ॥ संतसमागमें खेळवील कौतुकें ॥ प्रेमाचें भातुकें देउनियां ॥ ३ ॥ अंतरींची आवडी तोचि जाणे एक ॥ जिवलग जनक पंढरीरावो ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसा आहे पैं भरंवसा ॥ मना तूं विश्वासा दृढ धरी ॥ ५ ॥

॥ ८२६ ॥ उचितानुचिता भजे पंढरिनाथा ॥ न बोलें सर्वथा वर्मै तुझीं ॥ १ ॥ बिभीषणा तुवां दिधली नगरी ॥ कीर्ति चराचरीं वाखाणिती ॥ २ ॥ ध्रुव प्रल्हाद अंबऋषि नारद ॥ हरिश्चंद्र मुचकुंद करोनिया ॥ ३ ॥ नामा ह्मणे आतां जन्मजन्मांतरीं ॥ करीन ऋणि हरी तुज आतां ॥ ४ ॥

॥ ८२७ ॥ प्रेमफांसा घालुनियां गळां ॥ जित धरीलें गोपाळा ॥ १ ॥ एक्या मनाची करूनि जोडी ॥ विठ्ठल पायीं घातली बेडी ॥ २ ॥ हृदय करूनि बंदीखाना ॥ विठ्ठल कोंडूनी ठेविला जाणा ॥ ३ ॥ सोहंशब्दें मार केला ॥ विठ्ठल काकुळती आला ॥ ४ ॥ नामा ह्मणे विठ्ठलासी ॥ जीवें न सोडीं सायासीं ॥ ५ ॥

॥ ८२८ ॥ ऐकतां कीर्तन होती जीवन्मुक्त ॥ दाविसी अनंत नाममात्रें ॥ १ ॥ मृत्युलोकीं जो जन्म इच्छी नर ॥ त्याच्या पुण्या पार कोण वाणी ॥ २ ॥ भक्तिसारामृत श्रेष्ठ कलियुगीं ॥ उद्धरिले योगी ब्रह्मादिक ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज नाहीं चिंता भय ॥ हृदयीं तुमचे पाय पुरे आतां ॥ ४ ॥

॥ ८२९ ॥ ऐसी चाल नाहीं कोठें ॥ नमस्कारा आधीं भेटे ॥ १ ॥ मायबाप निर्विकारी ॥ सखा नांदतो पंढरीं ॥ २ ॥ देव भक्तपण ॥ नाहीं नाहीं त्यासी आन ॥ ३ ॥ नामा ह्मणे आधीं भेटी ॥ मग चरणां घालीन मिठी ॥ ४ ॥

॥ ८३० ॥ कृपेचा कोंवळा रघुनाथ दास ॥ धरीन त्याची कास सर्व भावें ॥ १ ॥ सांडूनि सर्व संगु होईन शरणागत ॥ करिती मनोरथ पूर्ण माझे ॥ २ ॥ भवसिंधूचा पार उतरोनि निर्धारीं ॥ त्या परती सोयरी नाहीं सृष्टीं ॥ ३ ॥ अंतरींचें गुज सांगती श्रवणीं ॥ अमृत संजीवनीं रामनाम ॥ ४ ॥ तेणें त्रिविध ताप हरती मनींचे ॥ जाणती जीवींचे झाले कष्ट ॥ ५ ॥ तो जीवलग जननी परिस लोभा परू ॥ स्वर्वस्व उदारु प्राणसखा ॥ ६ ॥ नामा त्याचे बळें झेलतु यमासी ॥ रिघोनि पाठींसी केशवाच्या ॥ ७ ॥

॥ ८३१ ॥ करीन ह्मणसी व्यापार ॥ नाम चोखट करी अक्षर ॥ १ ॥ देवा तुझा मी व्यापारी ॥ सेवा करीन नाना परी ॥ २ ॥ धर्म खर्डा केला जमा ॥ खर्च घातला पूर्वकर्मा ॥ ३ ॥ दोन्ही रोजनामे महिन्याचे ॥ एकादशी द्वादशी पोत्याचे ॥ ४ ॥ सेवेची घडली वा शिल्लक बाकी ॥ भरत हुजत नेटकी ॥ ५ ॥ नाम्यानें मोह जबाब दिला ॥ तो वैकुंठीं सरता केला ॥ ६ ॥

॥ ८३२ ॥ गुण दोष त्याचे ह्मणतां श्लाघीजे ॥ निर्वासन किजे चित्त आधीं ॥१॥ गाऊं नाचूं आनंदें कीर्तनीं ॥भुक्ति मुक्ति दोन्ही नको देवा ॥२॥ मनाची पै वृत्ति बुडे प्रेमडोहीं ॥ नाठवती देहीं दुजा भाव ॥ ३ ॥ सगुणीं निर्गुणीं एकचि आवडी ॥ चित्तीं दिली बुडी चिदानंदीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा मागणें ऐसी सेवा ॥ द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥ ५ ॥

॥ ८३३ ॥ घालीन लोटांगण वंदीन चरण ॥ डोळ्यांनीं पाहीन रूप तुझें ॥ १ ॥ प्रेमें आलिंगीन अनंत पूजीन ॥ भावें ओंवाळीन ह्मणे नामा ॥ २ ॥

॥ ८३४ ॥ घोंगडें हें नव्हे धडूत पैं माझें ॥ पांघुरतां ओझें होत असे ॥ १ ॥ घे आपुलें घोंगडें देई माझा पांवा ॥ अझूनि कां चाळवा केशिराजा ॥ २ ॥ विष्णुदास नामा केशवा विनवी ॥ ऐहिक्य परत्र नाहीं चाड मज ॥ ३ ॥

॥ ८३५ ॥ धेनु विये वनीं तीसि कैची सुयणी ॥ तरि तें वत्स स्तनीं लावी कवण ॥ १ ॥ भुंजगाचीं पिलीं उपजतांचि वेगळीं ॥ त्यांसि डंखूं शिकविलें हो कोणीं ॥ २ ॥ सहज लक्षण जयाचियेठायीं ॥ तो आपुलिये सोई धांवतसे ॥ ३ ॥ उपजताचि फूल मोगऱ्याच्या माथां ॥ त्यासि परिमळता कोणें लावियेली ॥ ४ ॥ कडू दुध्याच्या अळ्यासी साखर दूध घातलें ॥ तें अधिकचि कडुवाळें कवणें केलें ॥ ५ ॥ गाळिला तोडिला खंड विखंडी ॥ ऊंस न संडी सोय गोडीसी ॥ ६ ॥ नामा ह्मणे तैसें आहे गा श्रीहरी ॥ सोईचे व्यापारीं घेईन तूंते ॥ ७ ॥

॥ ८३६ ॥ विठ्ठल आमुचें सुखाचें जीवन ॥ विठ्ठल स्मरण प्रेमपान्हा ॥ १ ॥ विठ्ठलचि ध्यावो विठ्ठलचि गावो ॥ विठ्ठलचि पाहों सर्वांभूतीं ॥ २ ॥ विठ्ठला परतें न दिसे सर्वथा ॥ कल्प येतां जातां गर्भवास ॥ ३ ॥ नामा ह्मणे चित्तीं आहे सुखरूप ॥ संकल्प विकल्प मावळती ॥ ४ ॥

॥ ८३७ ॥ जन्मोजन्मीं आह्मीं बहु पुण्य केलें ॥ तेव्हां या विठ्ठलें कृपा केली ॥ १ ॥ जन्मोनि संसारीं झालों याचा दास ॥ माझा तो विश्वास पांडुरंगीं ॥ २ ॥ अनेक दैवतां नेघे माझें चित्त ॥ गोड गातां गीत विठोबाचें ॥ ३ ॥ भ्रमर सुवासीं मधावरी मासी ॥ तैसें या देवासि माझें मन ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज पंढरीस न्या रे ॥ हडसोनि द्या रे विठोबासी ॥ ५ ॥

॥ ८३८ ॥ तुटोनि आकाश पडेलहि शिरीं ॥ न सोडीं मी हरी पाय तुझे ॥ १ ॥ तुझे पाय गोड तुझे पाय गोड ॥ तुझे पाय गोड सर्वकाळ ॥ २ ॥ डोंगरा सांगातें कोण करी वाद ॥ वाउगी उपाद आहे आह्मां ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझें थोरपण काय ॥ कायसे उपाय सांग आह्मां ॥ ४ ॥

॥ ८३९ ॥ मूर्खाहातीं दिलें रत्न पारखीसी ॥ तयाच्या मोलासी घेऊं नका ॥ १ ॥ आह्मीं तैसें झालों आह्मीं तैसे झालों ॥ आह्मीं तैसें झालों जाणतेची ॥ २ ॥ आंगीं नाहीं बळ होड घाली राया ॥ आह्मीं गेलों वांयां

तेणें न्यायें ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें केलें तयापरी ॥ आह्मीं निरंतरीं तुह्मां-सवें ॥ ४ ॥

॥ ८४० ॥ माझें मज नकळे ॥ माझें मज नकळे प्रेमसुख ॥ १ ॥ न करी तुझें ध्यान नलगे ब्रह्मज्ञान ॥ माझी आहे खूण वेगळीच ॥ २ ॥ नकरी तुझी स्तुति न वाखाणी कीर्ति ॥ धरिली ते युक्ति वेगळीच ॥ ३ ॥ नकरीं काया क्लेश इंद्रियां निरोधु ॥ मज आहे ओघु वेगळाची ॥ ४ ॥ नामा ह्मणे नाम गाईन निर्विकल्प ॥ येसी आपेआप गिवसीत ॥ ५ ॥

॥ ८४१ ॥ ब्रह्म अविनाश आनंदघन ॥ याहूनि चरण गोड तुझे ॥१॥ तें जीवें न सोडी अगा पंढरीनाथा ॥ जाणसीं तत्वतां हृदय माझें ॥ २ ॥ परात्पर वस्तु जे कां अपरंपर ॥ तियेचा साक्षात्कार पाय तुझे ॥ ३ ॥ सच्चिदानंदघन जेथें हरपलें मन ॥ त्याहूनि चरण गोड तुझे ॥ ४ ॥ नामा ह्मणे तुझीं पाउलें सकुमार ॥ तें माझें माहेर विटेवरी ॥ ५ ॥

॥ ८४२ ॥ नित्य आह्मां सुख तुझ्या पायांपासीं ॥ शरण कोणासी जाऊं आह्मी ॥ १ ॥ सकाळीं उठोनि ऐकतों कीर्तन ॥ तेणें समाधान मज होय ॥ २ ॥ उभा महाद्वारीं वैष्णव भेटती ॥ सांखळ्या तुटती चौऱ्यांशींच्या ॥ ३ ॥ नामा ह्मणे सदां पंढरीं रहिवास ॥ मागुता जन्मास येतो कोण ॥ ४ ॥

॥ ८४३ ॥ नेणे धात मात नव्हे कळावंत ॥ शास्त्रज्ञ पंडित तोहि नव्हे ॥ १ ॥ रंकाहूनि रंक संतांचा सेवक ॥ मी नामधारक विठोबाचा ॥ २ ॥ नामा ह्मणे राया विठोचा डिंगर ॥ नामें पैलपार पाववील ॥ ३ ॥

॥ ८४४ ॥ नामाचें लेखन श्वानाचिये कानीं ॥ धांवतसे घाणी चर्माचिये ॥ १ ॥ विंचू ह्मणतसे मी उदार दाता ॥ उचित हें देतां नलगे वेळ ॥ २ ॥ सूकर ह्मणे गृहस्थ भला ॥ शेखीं तयाचा डोळा विष्टेवरी ॥ ३ ॥ नापिक ह्मणे माझी नांदणूक मोठी ॥ धोकटि माझारीं जन्म गेला ॥ ४ ॥ नामा ह्मणे माझी वासना हे खोटी ॥ विठ्ठल चरणीं मिठी पडली असे ॥५॥

॥ ८४५ ॥ वासनेविरहित होवोनि एकवट ॥ असावें निकट संतसंगें ॥ १ ॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत ॥ करावें दास्यत्व हरिभक्तांचें ॥२॥ नामा ह्मणे केशवा तरीच शरणांगत ॥ नाहीं तरी पतीत ह्मणा मातें ॥ ३ ॥

॥ ८४६ ॥ देहाचें ममत्व नाहीं जों तुटलें ॥ विषयीं विटलें मन नाहीं ॥ १ ॥ तंव नित्य सुख कैसेनि आतुडे ॥ नेणती बापुडे प्रेमसुख ॥ २ ॥ मीच एक भक्त मीच एक मुक्त ॥ ह्मणवी पतीत दुराचारी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझे कृपेविण देवा ॥ केंवि जोडे ठेवा विश्रांतीचा ॥ ४ ॥

॥ ८४७ ॥ प्रपंच घडामोडी न सरे कल्पकोडी ॥ वासनेची बेडी पडली पायीं ॥ १ ॥ सोडवण करा आलेनो संसारा ॥ शरण जा उदारा विठोबाशीं ॥ २ ॥ लटकी माया देवी गर्भवासी गोंवी ॥ नरक भोगवी नाना योनी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मी विचारावें मनीं ॥ सोयरा निर्वाणीं पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ८४८ ॥ अद्वैत सुख कैसेनि आतुडे ॥ जंववरी नसंडे मीतूंपण ॥ १ ॥ शब्द चित्र कथा सांगती पाल्हाळ ॥ मन नाहीं केवळ विठ्ठलदेवीं ॥ २ ॥ अणुचें प्रमाण असतां दुजेपण ॥ मेरुतें समान देईल दुःख ॥ ३ ॥ नामा ह्मणे सर्व आत्मरूप पाहीं ॥ तरीच ठायींच्या ठायीं निवशील ॥ ४ ॥

॥ ८४९ ॥ उदाराचा राजा उभयांचि काजा ॥ उभारोनि भुजा वाट पाहे ॥ १ ॥ ह्मणे घ्यारे सुख प्रेम अलोलिक ॥ साधन आणिक नलगे कांहीं ॥ २ ॥ मनाचेनि मानें हृदयीं मज धरा ॥ वाचेसि उच्चारा नाम माझें ॥ ३ ॥ जेणें कर्में मज साधिलें पुंडलीकें ॥ तेंचि तुह्मां निकें सांगितलें ॥ ४ ॥ अनुदिनीं आवडी करूनि नित्य नवी ॥ मज धरा जीवीं सर्वभावें ॥ ५ ॥ ह्मणोनि पांडुरंग उभा भीमातीरीं ॥ नामा निरंतरीं वोळंगे चरण ॥ ६ ॥

॥ ८५० ॥ विषयाचा आंदणा दिसे केविलवाणा ॥ करीतसे कल्पना नानाविध ॥ कुटुंब पाईक ह्मणवी हरिचा दास ॥ मागे ग्रासोग्रास दारोदारीं ॥ १ ॥ जळो साचें कर्म जळो साचा धर्म ॥ जळो तो आश्रम जाणीवेचा ॥धृ०॥ कल्पद्रुमातळीं काखे घेऊनि झोळी ॥ बैसोनि सांभाळी भिक्षा अन्न ॥ अधम पोटभरी विचार तो न करी ॥ पुढती दारोंदारीं हिंडों जाय ॥ २ ॥ पोटालागीं करी नाना विटंबना ॥ संतोषवी मना दुर्जनांच्या ॥ न करी हरीचें ध्यान बैसोनि एकांतीं ॥ जन्माची विश्रांति जेणें होय ॥ ३ ॥ द्रव्याच्या अभिलाषें जागे सटवीपाशीं ॥ नवजे एकादशी जागरणा ॥ उत्तम मध्यम अधम न विचारी ॥ स्तुति नाना करी आशाबद्ध ॥ ४ ॥

वैराग्याची वार्ता कैची दैवहता ॥ नुपजे सर्वथा प्रेमभाव ॥ नामा ह्मणे ऐसें तारी एक्या गुणें ॥ अजा आरोहण गजस्कंधीं ॥ ५ ॥

॥ ८५१ ॥ भुजंग विखार पवनाचा आहार ॥ परि योगेश्वर ह्मणो नये ॥ पवनाच्या अभ्यासें काया पालटी ॥ परि तो वैकुंठीं सरता नव्हे ॥ १ ॥ शुद्ध करी मन समता धरोनि ध्यान ॥ तरीच भवबंधन तुटेल रे ॥ ध्रु० ॥ पवित्र गंगाजळ मीन सेवी निर्मळ ॥ परि दुष्ट केवळ कर्म त्याचें ॥ अवचिता हेतु सांपडला गळीं ॥ न सुटे तयेवेळीं तीर्थोदकें ॥ २ ॥ घर सांडोनियां वन सेविताती ॥ वनीं कां नसती रीस व्याघ्र ॥ काम क्रोध लोभ नसंडवे मनीं ॥ असोनियां वनीं कोण काज ॥ ३ ॥ बहुरूप्याचा नटा माथां भार जटा ॥ भस्म राख सोटा हातीं दंड ॥ धोति पोति कर्मा-वेगळा आदेसें ॥ हुंबरत असे अंगबळें ॥ ४ ॥ त्रिपुंड्र टिळे अंगीं चंदनाची उटी ॥ घालोनियां कंठीं तुळसीमाळा ॥ व्यापक हा हरि न धरिती चित्तीं ॥ लटिकीयाची गति गातु असे ॥ ५ ॥ मीतूंपण जरी हीं दोन्ही सांडी ॥ राखिसी तरी शेंडी हेंचि कर्म ॥ मनासी तूं मुंडीं देहभाव सांडी ॥ वासनेसी दंडी आत्ममयें ॥ ६ ॥ मन हें दर्पण करोनि निर्मळ ॥ पाहे पां केवळ आत्मास्वयें ॥ तुझा तूं केवळ तुजमाजीं पाहीं ॥ नामा ह्मणे ध्यायी केशिराजु ॥ ७ ॥

॥ ८५२ ॥ सुख सांगावें संतांपुढें ॥ जेणें सुख अधीक वाढे ॥ १ ॥ आणिका न करावें शाहणें ॥ प्रेम दिठावेल झणें ॥ २ ॥ खंडितां कल्पनेचा लाग ॥ त्यासि असावा अनुराग ॥ ३ ॥ तोडितां वासनेचा तंतु ॥ त्यासि असावा एकांतु ॥ ४ ॥ गिळिलें अहंतेचें बीज ॥ त्याचे व्हावें चरणरज ॥ ५ ॥ नामा ह्मणे त्याचे संगतीं ॥ चित्तां आपेआप येईल निवृत्ति ॥ ६ ॥

॥ ८५३ ॥ अहंकारें आथिलें ऐसें जें शरीर ॥ तें जाणा मंदिर चांडाळाचें ॥ १ ॥ आपुलिया मुखें सांगे पंढरिनाथ ॥ नव्हेचि तो भक्त सत्य जाणा ॥ २ ॥ नाम विटंबिती संतांसि हांसती ॥ ते मूर्ख ह्मणिजेती सर्प-पिलीं ॥ ३ ॥ तयांसि लक्ष्मीवल्लभ सांगे उपदेश ॥ नामा विष्णुदास विन-वीतसे ॥ ४ ॥

॥ ८५४ ॥ मूर्ख बैसलें कीर्तनीं ॥ नकळे अर्थाची करणी ॥ १ ॥ घुबड पाहे भलतीकडे ॥ नाइके नामाचे पवाडे ॥ २ ॥ पाहूं इच्छी परनारी ॥

चित्त पादरक्षावरी ॥ ३ ॥ नामा ह्मणे सांगूं किती ॥ मूढ सांगितलें नाइकती ॥ ४ ॥

॥ ८५५ ॥ पुंडलीकें रचिली पेंठ ॥ संत ग्राहिक चोखट ॥ १ ॥ प्रेम साखरा वांटिती ॥ नेघे त्यांचे तोंडीं माती ॥ २ ॥ समतेचे फणस गरे ॥ आंबे पिकले पडिभरें ॥ ३ ॥ नामद्राक्षाचे घड ॥ अपार रसा आले गोड ॥ ४ ॥ नामा ह्मणे भावें घ्यावें ॥ अभक्ताचें मढें जावें ॥ ५ ॥

॥ ८५६ ॥ विठ्ठलाचे पाय मनीं धरोनि राहे ॥ मग संसार तें काय करील तुझें ॥ १ ॥ संसाराचें भय नाहीं हरिच्या दासा ॥ विठो आह्मां-सरिसा निरंतर ॥ २ ॥ निरंतर वसे हरि भक्तांपाशीं ॥ विसंबेना त्यांसीं कदाकाळीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसा विठ्ठल सांडोनी ॥ व्यर्थ काय जनीं शिण-ताती ॥ ४ ॥

॥ ८५७ ॥ मायेचा हा फांसा अहंकार वळसा ॥ परि हृषीकेशा भज-तीना ॥ १ ॥ नव्हे हे सुटिका हा बोल लटिका ॥ केशवासी एका न भजकारें ॥ २ ॥ होतील त्यां मुक्ती पुरतील त्यां आर्ती ॥ चरण हे चिंती विठ्ठलाचे ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशव सर्वांभूतीं देव ॥ ऐसा धरी भाव भजनशीळ ॥ ४ ॥

॥ ८५८ ॥ न फिटे हें ओझें मायेचा गुंडाळा ॥ एका तूं गोपाळा शरण जाई ॥ १ ॥ तुटेल बिरडें सुटेल हा मोह ॥ केशवींच भाव असों देणें ॥ २ ॥ कईंचे हे क्लेश उदासीन वायां ॥ भजणें यादवराया हेंचि सत्य ॥ ३ ॥ नामा ह्मणे सुफळ भजनचि करी ॥ सर्वांभूतीं हरि भजनभावो ॥ ४ ॥

॥ ८५९ ॥ बाळ वृद्ध तरुण काया हे जर्जर ॥ वेगीं हा पामर आळशी झाला ॥ १ ॥ काय करूं देवा नाहीं यासि भावो ॥ न करी हा उपावो तुझ्या भजनीं ॥ २ ॥ मन ठेवी ठायीं रंगें तूं श्रीरंगीं ॥ गोष्टी त्या वाउगी बोलूं नको ॥ ३ ॥ नामा ह्मणे श्रीरंगु चित्तीं पां चोखडा ॥ उघडा पवाडा सांगितला ॥ ४ ॥

॥ ८६० ॥ मृगजळडोहो कां उपससी वायां ॥ वेगीं लवलाह्या शरण रिघे ॥ १ ॥ भजे तूं विठ्ठला सर्वांभूतीं भावें ॥ नलगती नांवें आणिकांचीं ॥ २ ॥ होईल सुटका घडेल भजन ॥ नाम जनार्दन येईल वाचे ॥ ३ ॥ नामा ह्मणे घडे भजन विठ्ठलीं ॥ ऐसीये निमोली भक्ति करी ॥ ४ ॥

॥ ८६१ ॥ मी तूं हें कथन सांगसी काबाड ॥ विठ्ठलयेवढें न सांगसी ॥ १ ॥ ऐसें कांहीं सांग जेणें फिटे पांग ॥ नित्य पांडुरंगभजन सोपें ॥ २ ॥ मी आणि तूं हें वचन हो खोटें ॥ विठ्ठलीं विनटें दिननिशीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे भाव ऐसा धरी सकळ ॥ तुष्टेल गोपाळ न विसंबिता ॥ ४ ॥

॥ ८६२ ॥ सांडी सांडी पसारा विषयाचा चारा ॥ विठ्ठल मोहरा वोळंगे वेगीं ॥ १ ॥ होईल तुझें हित होसील पूर्ण भरित ॥ सर्वांभूतीं हित हेचि दया ॥ २ ॥ वोळंगें विठ्ठलरूपा मार्ग हाचि सोपा ॥ विषयाच्या खेपा तुटतील ॥ ३ ॥ नामा ह्मणे केवळ आह्मां नित्यकाळ ॥ दिननिशीं पळ विठ्ठलदेव ॥ ४ ॥

॥ ८६३ ॥ कां रे तूं शिणतोसी घरदार बंधनें ॥ वायांचि व्यसनें आणितोसी ॥ १ ॥ भजे यादवराया लागे साच्या पायां ॥ आणिक उपायां करूं नको ॥ २ ॥ सर्वभावें हरिभजन तूं करी ॥ भक्ति हे पुढारी तारील सत्य ॥ ३ ॥ नामा ह्मणे दया मांडी सोडी माया ॥ भजन लवलाह्या हरीचें करी ॥ ४ ॥

॥ ८६४ ॥ व्यर्थ या व्युत्पत्ति लावितोसी श्रुति ॥ विषयांचि तृप्ति काय चाड ॥ १ ॥ मायेचा हा फांसा मोहजाळ सोसा ॥ वायां कासाविसा होसी झणीं ॥ २ ॥ टाकी टाकी असत्य विठ्ठल हेंचि सत्य ॥ होईल सर्व कृत्य एका नामें ॥ ३ ॥ नामा ह्मणे दैवत तो एक अच्युत ॥ सांगितलें हित खेचर विसें ॥ ४ ॥

॥ ८६५ ॥ देवो देवो बोले तूं जीवन भातें ॥ मेहुडें दुभतें जना यया ॥ १ ॥ तैसें मना करा भजनभाव धरा ॥ विषयपसारा टाका वेगीं ॥ २ ॥ उपावो नलगे दया ते धरावी ॥ आपुली ह्मणावी माय जगीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे बाप विठ्ठल तो आमुचा ॥ कुळदेव साचा पुरातन ॥ ४ ॥

॥ ८६६ ॥ एकचि हें तत्व एकाकार देशीं ॥ एक तो नेमेसीं सर्व जनीं ॥ १ ॥ ऐसें ब्रह्म पाहा आहे सर्व एक ॥ नलगे तो विवेक करणें कांहीं ॥ २ ॥ मिथ्या हें डंबर माया मथितार्थ ॥ हरि हाचि स्वार्थ वेगीं करी ॥ ३ ॥ नामा ह्मणे समर्थ बोलिला तो वेद ॥ नाहीं भेदाभेद ब्रह्मपणीं ॥ ४ ॥

॥ ८६७ ॥ शिकला गाणें राग आळवण ॥ लोकां रंजवण करावया

॥ १ ॥ भक्ताचें तें गाणें बोबडिया बोलीं ॥ तें तें विठ्ठलीं अर्पियलीं ॥ २ ॥ बोबडीया बोलीं जें कोणी हांसती ॥ ते पचिजेती रौरवीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे बहुत बोलों आतां काई ॥ विठोबाचे पाय अंतरती ॥ ४ ॥

॥ ८६८ ॥ देवराज आले मंचकीं बैसले ॥ भक्तांसि दिधलें अभयदान ॥ १ ॥ दासहो तुह्मी सकळ सुखी रहा ॥ सुखी राहोनियां आनंद करा ॥ २ ॥ रात्रंदिवस माझें करारे चिंतन ॥ यमाचें बंधन नाहीं तुह्मां ॥ ३ ॥ विष्णुदास नामा गाऊनिया गेला ॥ शेजे पहुडला देवराणा ॥ ४ ॥

॥ ८६९ ॥ दिशा फेरफेरे कष्टशील सैरा ॥ किती येरझारा कल्पकोटी ॥ १ ॥ विठ्ठलाचे नामीं दृढ धरी भाव ॥ येर सांडी वाव मृगजळ ॥ २ ॥ भक्ति मुक्ति सिद्धि जोडोनियां कर ॥ करिती निरंतर वोळगण ॥ ३ ॥ नामा ह्मणे जना मानी पैं विश्वास ॥ मग तुज गर्भवास नव्हे नव्हे ॥ ४ ॥

॥ ८७० ॥ विषय सेवितां तुज ॥ नव्हे पुढील काज ॥ कदां न भेटे तुज ॥ गरुडध्वज निश्चयेंसीं ॥१॥ काय करिसी खटपट ॥ वायां मार्ग दुर्घट ॥ वरपडा होसील कष्ट ॥ परि संसार न सुटेचि ॥ २ ॥ सुटकेचें मूळ जाण ॥ रामकृष्ण नारायण ॥ येणें तुटेल भवबंधन ॥ जन्मा न येसी सर्वथा ॥ ३ ॥ साधन इतुकेंचि पुरे ॥ नलगती मंत्रांचे भार ॥ ते बुडविती साचार ॥ परि तरों न देती ॥ ४ ॥ नामा ह्मणे ते पामर ॥ नेणतीच हा मार्ग सार ॥ हरि वाचें नाहीं उच्चार ॥ तो जाणावा महादोषी ॥ ५ ॥

॥ ८७१ ॥ जाय जणा देह जाईल नेणसी ॥ लौकिक मिरविसी लाजसीना ॥ १ ॥ माझें माझें माझें मानिसी निभ्रांत ॥ करिसी अपघात रात्रंदिवस ॥ २ ॥ सांग तूं कोणाचा आलासि कोठोनी ॥ दृढ बुद्धि मनीं विचारी पां ॥ ३ ॥ धन संपत्ति करोनि मदें मातलासी ॥ पुढत पुढती पडसी गर्भवासीं ॥ ४ ॥ पुत्र कलत्र दारा यांचा झालासी ह्मणियारा ॥ यांच्या पातकाचा भारा वाहशील ॥ ५ ॥ अंतीं यमापाशीं बांधोनियां नेती ॥ कवतुक पाहती सकळ जन ॥ ६ ॥ नानापरी तुज करिती यातना ॥ सांग तेथें कोणा बोभाशील ॥ ७ ॥ धन पुत्र दारा तुज नये कामा ॥ एका मेघश्यामा वांचोनियां ॥ ८ ॥ विषयाचेनि संगें भुलशील झणें ॥ भोगीसी पतन रात्रंदिवस ॥ ९ ॥ नामा ह्मणे ऐक ध्यायीं कमळापति ॥ निजाचा सांगाति केशिराज ॥ १० ॥

॥ ८७२ ॥ जें जें पुण्य जोडे हरिनाम गजरीं ॥ त्याचे वांटेकरी दोघे-जण ॥ सावधान श्रोता आणि प्रेमळ वक्ता ॥ जो भजे अनंता निर्विकल्प ॥ १ ॥ तेणें सुखें सुख चढे नित्य नवें ॥ जाणती अनुभवें संतजन ॥ ध्रु० ॥ हातीं सुदर्शन आनंदें कीर्त्तनीं ॥ उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ प्रीतीच्या वोरसें अभयदान देत ॥ हृदयीं आलिंगित अपुल्या दासां ॥ २ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष आणि मुक्ति ॥ टाकोनिया येती विश्रांतीसी ॥ नामा ह्मणे धन्य ते झाले संसारीं ॥ न संडिती वारी पंढरीची ॥ ३ ॥

॥ ८७३ ॥ चंद्र सूर्यादि बिंबें लिहिताति सांग ॥ परि प्रकाशाचें अंग लिहितां नये ॥ १ ॥ संन्यासाचीं सोंगें आणिताति सांग ॥ परि वैराग्याचें अंग आणितां नये ॥ २ ॥ नामा ह्मणे कीर्तन करिताति सांग ॥ प्रेमाचें तें अंग आणितां नये ॥ ३ ॥

॥ ८७४ ॥ शब्दाचें सुख श्रवणाचेनि द्वारें ॥ माझिया दातारें ऐसें केलें ॥ १ ॥ स्पर्शाचें सुख त्वचेचेनि द्वारें ॥ माझिया० ॥ २ ॥ रूपाचें सुख नेत्राचेनि द्वारें ॥ माझिया० ॥ ३ ॥ रसाचें सुख रसनेचेनि द्वारें ॥ माझिया० ॥ ४ ॥ गंधाचें सुख नाकाचेनि द्वारें ॥ माझिया० ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसे जयाचे उपकार ॥ तयासी गव्हार विसरले ॥ ६ ॥

॥ ८७५ ॥ वेडिया उपचार गाढवा गुऱ्हाळ ॥ ह्मैसिया बिऱ्हाड पुष्पवनीं ॥ पद्मासनीं कैंवि कुंजर हा बैसे ॥ कोडिया न दिसे चंदन बरवा ॥ १ ॥ तैसा नव्हे देव मूर्ख जनांच्या भक्ति ॥ भल्याचा विरक्ति ज्ञानवांटा ॥ धृ० ॥ शेळीस ऊंस कळकटीया सुदिवस ॥ सूकराप्रति रस आंबियाचा ॥ दर्दुरा क्षीरपान त्रिदोषिया मौन ॥ मद्यपिया मन स्थिर नव्हे ॥ २ ॥ नामा ह्मणे हरि सबाह्य भरला ॥ भरोनि उरला दाही दिशा ॥ परि काय कीजे मूर्खा पडिला दुष्काळ ॥ पाशींचा गोपाळ कल्पांतीं न भेटे ॥ ३ ॥

॥ ८७६ ॥ कर्मजड मूढ पतीत पामर ॥ भवसिंधुपार नटके जया ॥ १ ॥ यालागीं पंढरी केली मुक्ति पेंठ ॥ भक्तें भूवैकुंठ वसविलें ॥ २ ॥ हेंचि पुंडलिकें मागितलें निकें ॥ जें सर्वथा परलोकें चाड नाहीं ॥ ३ ॥ भक्ति मुक्ति सिद्धि जें जया आवडे ॥ तें तया पवाडे विठ्ठल नामें ॥ ४ ॥ नलगती सायास करणें काया क्लेश ॥ नामाचा विश्वास दृढ धरा ॥ ५ ॥ नामा ह्मणे अवघे चला पंढरीये ॥ भेटों बापमाय पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ ८७७ ॥ पवित्र आणि परिकर ॥ उभविलें मंदिर ॥ दीपेविण मनोहर ॥ शोभा न पवे ॥ १ ॥ श्यामअंगीं तरुणी ॥ सुंदर होय रमणी ॥ पुरुषावीण कामिनी ॥ शोभा न पवे ॥ २ ॥ द्रव्यावीण नर ॥ जरी जाहला सुंदर ॥ तो सावीण चतुर ॥ शोभा न पवे ॥ ३ ॥ योगिया आणि कठीण ॥ इंद्रियां नाहीं दमन ॥ षट् कर्मेवीण ब्रह्मज्ञान ॥ शोभा न पवे ॥ ४ ॥ नामा ह्मणे सुंदरा ॥ रखमादेवीवरा ॥ तुजवीण दातारा ॥ शोभा न पवे ॥ ५ ॥

॥ ८७८ ॥ अवघे सावधान होऊनि विचारा ॥ सोडवण करा संसाराची ॥ १ ॥ अवघा काळ वाचे ह्मणा नारायण ॥ वायां एक क्षण जाऊं नेदी ॥ धृ० ॥ अवघें हें आयुष्य सरोनि जाईल ॥ मग कोण होईल साह्य तुह्मां ॥ २ ॥ अवघा प्रपंच जाणोनि लटिका ॥ शरण रिघा एका पंढरिराया ॥ ३ ॥ अवघे मायामोह गुंतलेति पहा ॥ अवघे सहज आहां जीवन्मुक्त ॥ ४ ॥ नामा ह्मणे अवघे सुखाचेचि व्हाल ॥ जरी मन ठेवाल विठ्ठलपायीं ॥ ५ ॥

॥ ८७९ ॥ अवघे निरंतर करा हा विचार ॥ भवसिंधुपार तरीजे ऐसा ॥ १ ॥ अवघे जन्म वायां गेले विषयसंगें ॥ भुललेति वाउगे माया मोहा ॥ २ ॥ अवघा वेळ करितां या संसाराचा धंदा ॥ वाचे वसो सदा हरिचें नाम ॥ ३ ॥ अवघ्या भावीं एका विठ्ठलातें भजा ॥ आतें करा पूजा हरिदासांची ॥ ४ ॥ अवघें सुख तुह्मां होईल आपैतें ॥ न याल मागुते गर्भवासा ॥ ५ ॥ नामा ह्मणे अवघे अनुभवूनि पाहा ॥ सर्वकाळीं रहा संतसंगें ॥ ६ ॥

॥ ८८० ॥ अवघी हे पंढरी सुखाची वोवरी ॥ अवघा घरोघरीं ब्रह्मानंद ॥ १ ॥ अवघा हा विठ्ठल सुखाचाचि आहे ॥ अनुसरे तो लाहे सर्व सुख ॥ २ ॥ पहावा अवघा नयनीं ऐकावा श्रवणीं ॥ अवघा ध्यावा ध्यानीं अवघ्या मनें ॥ ३ ॥ अवघिये आवडी अवघा गावा गीतीं ॥ अवघा सर्वांभूतीं तोचि आहे ॥ ४ ॥ अवघा हा जाणावा अवघा हा मानावा ॥ अवघा वाखाणावा अवघी वाचा ॥ ५ ॥ अवघा ओळखोनि अवघा गिळिजे मनें ॥ अवघा हाचि होणें ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ ८८१ ॥ अवघे ते संसारी जाणावें ते धन्य ॥ ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं ॥ १ ॥ अवघे ते दैवाचे विठ्ठल ह्मणती वाचे ॥ अवघे कुळ त्याचें

पुण्यरूप ॥ २ ॥ अवघ्यारूपीं एक विठ्ठल भाविती ॥ अवघ्या मनें भजती अवघेपणें ॥ ३ ॥ अवघे मिथ्या जाणोनि अवघींया विठ्ठलें ॥ अवघे विनटले विठ्ठलपायीं ॥ ४ ॥ अवघे पूर्ण बोधें भावें प्रेमें प्रीती ॥ ध्यानीं गीती गाती केशिराज ॥ ५ ॥ अवघा हा विठ्ठलु भोगूं दिनराती ॥ वोळंगें किंकरवृत्ति नामा त्यासी ॥ ६ ॥

॥ ८८२ ॥ अवघें हें पवित्र पांडुरंगक्षेत्र ॥ सुखचि सर्वत्र भरलें असे ॥ १ ॥ अवघा हा विठ्ठल गीतीं गातां गोड ॥ अवघें पुरवी कोड नामें एकें ॥ २ ॥ अवघें जे सांडोनि अनुसरले यातें ॥ अवघें देतो त्यांतें आपुलें प्रेम ॥ ३ ॥ अवघी चित्तवृत्ति ठेविती याच्या पायीं ॥ त्यांतें अवघ्या बाहीं आलिंगितो ॥ ४ ॥ अवघें आपुलें मन दिल्हें जिहीं यातें ॥ असे त्यांसांगातें मागें पुढें ॥ ५ ॥ अवघ्यासि अनुसरला अवघेंचि विसरला ॥ अवघा नामा झाला सुखरूप ॥ ६ ॥

॥ ८८३ ॥ अवघे हो ऐका अवघे श्रवणीं ॥ अवघेचि होऊनि एकचित्त ॥ १ ॥ विठोबाचें नाम अवघेंचि गोमटें ॥ विचारीं नेटेंपाटें आपुल्या मनीं ॥ २ ॥ अवघी हेचि क्रिया अवघें हेंचि कर्म ॥ अवघा हा स्वधर्म सत्य जाणा ॥ ३ ॥ अवघें हें सगुण अवघें हें निर्गुण ॥ अवघें परिपूर्ण शुद्ध बुद्ध ॥ ४ ॥ अवघा हा आचार अवघा हा विचार ॥ अवघा हा संसार सर्व काळ ॥ ५ ॥ अवघा जेणें दूरी टाके भवभ्रम ॥ निरंतर नाम गाय नामा ॥ ६ ॥

॥ ८८४ ॥ अवघी चित्तवृत्ति एकवटोनि जेणें ॥ अवघा धरिला मनें पांडुरंग ॥ १ ॥ अवघें सुख एक तयासि फावलें ॥ अवघें सफळ झालें जन्म त्याचें ॥ २ ॥ अवघीं व्रतें दानें केलीं पैं तयानें ॥ ज्याचें विठ्ठलीं ध्यान मन जडलें ॥ ३ ॥ नित्य विठ्ठलनाम गर्जती सप्रेमें ॥ अवघे नित्यनेम झाले त्यांचे ॥ ४ ॥ अवघा इष्ट मित्र बंधु माता पिता ॥ केला आवडता पांडुरंग ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसे अवघे संप्रदाय ॥ मिळोनि धरा पाय विठोबाचे ॥ ६ ॥

॥ ८८५ ॥ तो देव स्मरा रे अनंत ॥ जो कां वैकुंठींचा नाथ ॥ दृढ धरा रे हृदयांत ॥ तेणें यमपंथ चुकेल ॥ १ ॥ आकांतीं द्रौपदिये स्मरिला ॥ तिचीं वस्त्रें आपणचि झाला ॥ सभेमाजीं मान रक्षिला ॥ काळ

पैं झाला कौरवांचा ॥ २ ॥ विमळार्जुन उन्मळिला ॥ जरासंध तोहि मारिला ॥ कंसासुर निर्दाळिला ॥ कान्हया झाला गोकुळींचा ॥ ३ ॥ ध्रुव जेणें अढळपदीं बैसविला ॥ नामें एके अजामिळ उद्धरिला ॥ उत्तरेचा गर्भ रक्षिला ॥ तैं सोडविला परीक्षिती ॥ ४ ॥ जाति कुळ न पाहसी ॥ नामें एके उद्धरिलें गणिकेसी ॥ सा गोपाळांचें उच्छिष्ट खासी ॥ गज सोडविसी पाणियाडें ॥ ५ ॥ ऐसा तूं कृपाळु गा देवा ॥ प्रसन्न झालासि पांडवा ॥ विष्णुदास नामा विनवी केशवा ॥ प्रेमभाव द्यावा मजलागीं ॥ ६ ॥

॥ ८८६ ॥ सड्या लावी कासे कुटुंबिया तरी ॥ उतरील पैल तीरीं केशिराज ॥ १ ॥ प्रेमाची ती पेटी बांधोनियां पोटीं ॥ उतरी जगजेठी पांडुरंग ॥ २ ॥ अंगें घाली उडी बुडतिया काढी ॥ ऐसे कल्पकोडी तारियले ॥ ३ ॥ तारीयले सत्य हाचि पैं निर्धार ॥ नामा पैल तीर उतरिला ॥ ४ ॥

॥ ८८७ ॥ व्रत तप नलगे करणें सर्वथा ॥ नलगे तुह्मां तीर्था जाणें तया ॥ १ ॥ आपुलेचि ठायीं असा सावधान ॥ करा हरिकीर्तन सर्वकाळ ॥ २ ॥ नलगे तें कांहीं वर्जावें अन्न जीवन ॥ लावा अनुसंधान हरीचे पायीं ॥ ३ ॥ नलगे योग याग नलगे संग त्याग ॥ असों द्या अनुराग हरीचे पायीं ॥ ४ ॥ नलगे निरंजनीं करणें वास तुह्मां ॥ दृढ धरा प्रेमा हरीचे नामीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे नाम दृढ धरा कंठीं ॥ तेणें देईल भेटी पांडुरंग ॥ ६ ॥

॥ ८८८ ॥ काय चाड आह्मां बाहेरल्या वेषें ॥ सुखाचें कारण असे अंतरीं तें ॥ १ ॥ भीतरी पालट जंव नाहीं झाला ॥ तोंवरी न बोला जाणपणें ॥ २ ॥ चंदनाचे संगतीं नीच महत्वा पावलीं ॥ नांवें परि उरलीं पालट देहीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगा मज कोणी ॥ जेणें केशव येऊनि हृदयीं राहे ॥ ४ ॥

॥ ८८९ ॥ दुर्लभ नरदेह झाला तुह्मां आह्मां ॥ येणें साधूं प्रेमा राघोबाचा ॥ १ ॥ अवघे हातोहातीं तरों भवसिंधु ॥ आवडी गोविंदु गाऊं गीतीं ॥ २ ॥ हिताचिया गोष्टी सांगूं एकमेकां ॥ शोक मोह दुःखा निरसूं तेणें ॥ ३ ॥ एकमेकां करूं सदा सावधान ॥ नामीं अनुसंधान तुटो नेदूं ॥ ४ ॥ घेऊं सर्व भावें रामनाम दीक्षा ॥ विश्वासें सकळिकां हेंचि सांगों ॥ ५ ॥ नामा ह्मणे शरण रिघों पंढरिनाथा ॥ नुपेक्षी सर्वथा दीनबंधु ॥ ६ ॥

॥ ८९० ॥ नामामृत सरिता चरणामृत माता ॥ पवित्र हरिकथा मुगुट मणि ॥ १ ॥ तेथें माझें मन हो कां क्षेत्रवासी ॥ राहे संतांपाशीं सुख घेतां ॥ २ ॥ अहिक्य परत्रें समतीरें साजिरीं ॥ परमानंद लहरी हेलावत ॥ ३ ॥ मुक्तीची माउली मोक्षाची गाउली ॥ शीणलीया साउली विषयताप ॥ ४ ॥ तेथें सनकादिक प्रेमळ सकळ ॥ राहिले निश्चळ करोनी चित्त ॥ ५ ॥ नामा ह्मणे माझे सखे हरीजन ॥ तारू त्याचे चरण दृढ धरा ॥ ६ ॥

॥ ८९१ ॥ पाप्या नावडे संतसंगति ॥ लोभिया नावडे उदारवृत्ति ॥ व्यभिचारिणी नावडे पति ॥ नावडे ज्योति उजियेडा ॥ १ ॥ चांदणें नावडे तया चोरां ॥ सावधान नावडे तया हेरां ॥ सत्‌बुद्धि नावडे रांडपोरां ॥ सख कुचरां आवडेना ॥ २ ॥ तीर्थ नावडे तया दुष्टां ॥ न्याय नावडे सत्य नष्टां ॥ कणव नावडे तया पापिष्टां ॥ अभिमान नष्टां न सांडवे ॥ ३ ॥ भक्ति नावडे तया खळां ॥ पुण्य नावडे तया चांडाळां ॥ देखत देखत जन आंधळा ॥ कां रे घननीळा विसरलेती ॥ ४ ॥ पारखी नावडे तया खोट्यांला ॥ स्नान नावडे तया विटाळां ॥ सुसंग नावडे नाठाळां ॥ न्याय तंटाला नावडे ॥ ५ ॥ धर्म नावडे तया कृपणां ॥ शुद्धि नावडे दुर्जनां ॥ कर्म नावडे अब्राह्मणां ॥ ऐसी दुष्ट वासना पापियांतें ॥ ६ ॥ नाम नावडेतया नष्ट भक्तां ॥ वृत्त नावडे तयां सर्वथा ॥ नावडे भजन कैंची कथा ॥ नाहीं पतिव्रता कलियुगीं ॥ ७ ॥ ऐसा झाला कलीचा प्रवेश ॥ धरा नामाचा विश्वास ॥ जीवीं धरा हृषीकेश ॥ विष्णुदास नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ ८९२ ॥ योग याग यज्ञ इच्छिसी कामना ॥ परि केशव निधाना विसरसी ॥ १ ॥ नेणेची हें मन भुललें अज्ञानें ॥ यातायाति पतनें भोगूं पाहे ॥ २ ॥ ज्याचेनि जाहलें तुझें हें शरीर ॥ त्याचा नामोच्चार नये वाचे ॥ ३ ॥ नामा ह्मणे कां रे नेणसी अज्ञुनी ॥ केशवचरणीं अनुसरे कां ॥ ४ ॥

॥ ८९३ ॥ केशवापरता देव आणिक आहेती ॥ ऐसें श्रुति स्मृति बोलतील ॥ तरी ते शब्द झणीं कानीं हो पडती ॥ पाखांडी ह्मणती सहावें तें ॥ १ ॥ इंद्रियासि तुह्मीकरा रे जतन ॥ भजावा निधान श्रीविठ्ठल ॥ धृ० ॥ छेदावया शिर हस्त सहस्रांचे ॥ जरी बहुतांचे उगारिले ॥ परि तूतें नाम आन न देवाचें ॥ केशवापरतें कैंचें असे ब्रह्म ॥ २ ॥ अंगें चतुरानना झालिया हो भेटी ॥ तोहि जरी गोष्टी ऐसी करी ॥ तरी तो चव्हला पोटीं

ऐसें जाण ॥ एकीं दुजेपण दावी तरी ॥ ३ ॥ ब्रह्मकटाह एक उल्लंघों शके ऐसा ॥ वर्तोनि दाही दिशा वर्ते जरी ॥ केशव नव्हे तो हो कां अनारिसा ॥ ह्मणोनियां वासा पाहों नका ॥ ४ ॥ व्यसन भक्ति विरक्ति मौढी पुरुषार्थ पांचवा ॥ जीवाचिया जीवा सेवा ना कां ॥ सर्वा भूतीं आहे केशव परमात्मा ॥ न विसंबावें वर्मा नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ ८९४ ॥ देव दयानिधि भक्तांचा कैवारी ॥ नाममात्रें तारी सर्वांलागीं ॥ १ ॥ तया देवराया गावें हो आवडी ॥ लागे मनीं गोडी सर्वकाळ ॥ २ ॥ नाहीं यातिकुळ उंच नीच भेद ॥ भाव एक शुद्ध पाहातसे ॥ ३ ॥ नामा ह्मणे काय सांगावें नवल ॥ अखंड दंडलें व्योमाकार ॥ ४ ॥

॥ ८९५ ॥ भक्तांची आवडी मोठी त्या देवासी ॥ सद्भक्तिप्रेमासी लांचावला ॥ १ ॥ काय सांगूं आतां तयाचें कौतुक ॥ जेथें ब्रह्मादिक स्तब्ध ठेले ॥ २ ॥ गज आणि गणिका भिल्लिणी कुंठिणी ॥ नेल्या सा विमानीं बैसोनियां ॥ ३ ॥ अजामीळ खळ कोळी तो वाल्मीक ॥ तारिले अनेक एकसरां ॥ ४ ॥ धर्माचिये घरीं उच्छिष्टें काढी ॥ जाहाला वराडी देवराव ॥ ५ ॥ नामा ह्मणे कांहीं मागेना तो देव ॥ मुख्य पाहे भाव दृढ साचा ॥ ६ ॥

॥ ८९६ ॥ जंव हंस काया नव जाय सांडोनी ॥ तंव घेई ठाकोनि रामनाम ॥ अंतःकाळवेळीं तुझे नव्हे कोण्ही ॥ मी माझें ह्मणवूनि भुललासी ॥ १ ॥ राहे निरंतर राघवाचे द्वारीं ॥ तेणें भवसागरीं तरसी बापा ॥ धृ० ॥ नवमास माये वाहिलासि उदरीं ॥ आस केली थोरी होसी ह्मणोनी ॥ स्तनपान देऊनि मोहें प्रतिपाळी ॥ तेहि अंतःकाळीं दूर ठाके ॥ २ ॥ सर्वस्व स्वामिणी ह्मणवीतसे कांता ॥ तोहि केश देतां रडतसे ॥ ह्मणे म्यां मेल्याचें सुख नाहीं देखिलें ॥ तेणें तंव पाळिलें अर्थें प्राणें ॥ ३ ॥ गाई घोडे ह्मैसी आणिक सा दासी ॥ धन त्वां सायासीं मेळविलें ॥ तुझिया धनाला नाहीं पार लेखा ॥ एकलाचि मूर्खा जासी अंतीं ॥ ४ ॥ हातींच्या मुद्रिका कानींचे ते नग ॥ करोनि लगबग काढिती वेगीं ॥ अंगींचीं लुगडीं फेडोनियां घेतीं ॥ तुज बांधोनियां नेती यमदूत ॥ ५ ॥ भूमिभार झाला ह्मणती वेग करा ॥ नातळती शरीरा इष्ट मित्र ॥ स्मशाना नेऊनि भडाग्नि देऊनि ॥ येती परतोनी सकळ जन ॥ ६ ॥ एकलेचि येणें एकलेचि जाणें ॥ पहा दृढ ज्ञानें विचारोनी ॥ पापपुण्य दोन्हीं अंतींचीं सांगाती ॥ येरें तीं राहती जेथिचीं तेथें

॥ ७ ॥ ऐसा हा संसार माया वेष्टियला ॥ ह्मणोनि दुऱ्हाविला योगीजनीं ॥ विष्णुदास नामा विनवीतसे तुह्मां ॥ ह्मणीं परब्रह्म विसरूंनका ॥ ८ ॥

॥ ८९७ ॥ बहुरूप्या ब्राह्मणा पडियेलें मित्र ॥ दोहींचें तें गोत्र एक झालें ॥ १ ॥ वेश्या पतिव्रते पडियला शेजार ॥ दोहींचा आचार एक झाला ॥ २ ॥ संग तोचि बाधी संग तोचि बाधी ॥ कुसंग तो बाधी नारायणा ॥ ३ ॥ नामा विष्णुदास सत्संगति बोधला ॥ आत्मा हा लाधला पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ८९८ ॥ जायांचें सोंवळें जायांची ही चोळी ॥ जायाची गरसोळी तीहि जाय ॥ १ ॥ जीणें हें जायाचें जीणें तें जायाचें ॥ तें पैल कोणाचें देणें आहे ॥ २ ॥ जायाचा आचार जायाचा विचार ॥ जायाचा भ्रतार क्षणभरी ॥ ३ ॥ नामा ह्मणे अवघें जीणें तें जायाचें ॥ संतसंगतीचें सुख घ्यावें ॥ ४ ॥

॥ ८९९ ॥ परदारा परधन परनिंदा परपीडण ॥ सांडोनियां भजन हरिचें करा ॥ १ ॥ सर्वांभूतीं कृपा संतांची संगति ॥ मग नाहीं पुनरावृत्ति जन्ममरण ॥ २ ॥ शास्त्रांचें हें सार वेदांचें गव्हार ॥ तें नाम परिकर विठोबाचें ॥ ३ ॥ नामा ह्मणे नलगे साधन आणिक ॥ दिधली मज भाक पांडुरंगें ॥ ४ ॥

॥ ९०० ॥ तुळसीचें हसार ॥ वृंदावन दुर्ग थोर ॥ १ ॥ तुळसीच्या दळीं ॥ यम जिंकिला महाबळी ॥ २ ॥ नामा ह्मणे बळि रे बळी ॥ विठ्ठल आमचा भुजबळी ॥ ३ ॥

॥ ९०१ ॥ काळवेळ नसे नामसंकीर्तनीं ॥ उंच नीच योनी हेंही नसे ॥ १ ॥ धरा नाम कंठीं सदा सर्वकाळ ॥ मग तो गोपाळ सांभाळील ॥ २ ॥ कृपाळू कोंवसा सुखाचा सागर ॥ करील उद्धार भाविकांसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे फार सोपें हें साधन ॥ वाचे नाम घेणें इतुकेंची ॥ ४ ॥

॥ ९०२ ॥ आह्मां संगती नावडे कांहीं ॥ ह्मणोनि झालों बा विदेही ॥ दुःखमूळ संगतीचें ॥ आह्मी नव्हों त्या गांवींचे ॥ १ ॥ आह्मां नाहीं रूप नांव ॥ वस्तीसी नाहीं एक ठाव ॥ मग घ्या इच्छेसि धांव ॥ आह्मी नव्हों त्या गांवींचे ॥ २ ॥ स्नान केलें गंगातीरीं ॥ गंध लाविलें पंढरपुरीं ॥ संध्या केली कृष्णातिरीं ॥ आह्मी नव्हों त्या गांवींचे ॥ ३ ॥ भिक्षा केली कोल्हा-

पुरीं ॥ भोजन केलें महाद्वारीं ॥ निद्रा केली माहुरीं ॥ आह्मी नव्हों त्या गांवींचे ॥ ४ ॥ ऐसीयाची संगत करी ॥ त्याचे चरण हृदयीं धरी ॥ नामा ह्मणे या संसारीं ॥ आह्मी नव्हों त्या गांवींचे ॥ ५ ॥

॥ ९०३ ॥ संग खोटा परनारीचा ॥ नाश होईल या देहाचा ॥ १ ॥ रावण प्राणासी मुकला ॥ भस्मासुर भस्म झाला ॥ २ ॥ गुरुपत्नीशीं रतला ॥ क्षयरोग त्या चंद्राला ॥ ३ ॥ इंद्रा अंगीं सहस्र भगें ॥ नामा ह्मणे विषयासंगें ॥ ४ ॥

॥ ९०४ ॥ विष्णूचें सेवन जये गांवीं पूजा ॥ नित्य तया द्विजा समारंभु ॥ १ ॥ घरीं वृंदावन नित्य अन्नदान ॥ श्रीकृष्ण आपण तेथें असे ॥ २ ॥ ऐसी ध्यानगती विष्णूचें पूजन ॥ तयासि पतन नाहीं नाहीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे करा विष्णुकथा नित्य ॥ रामनाम सत्य वचन धरा ॥ ४ ॥

॥ ९०५ ॥ धरूनि मांझी वृत्ति पाहें माझें मुख ॥ मी सांगतों ऐक जननीये ॥ १ ॥ काया वाचा मनें जें ममत्व माझे ठायीं ॥ तें तूं ठेवी पायीं विठोबाच्या ॥ २ ॥ मग हा कृपासिंधु न विसंबे तुज ॥ अनाथांची लाज हाचि राखी ॥ ३ ॥ पाहे पशु गज जळचरें गांजिला ॥ सकळिकीं सांडिला जिवलगीं ॥ ४ ॥ पीतांबरासहित घालूनियां उडी ॥ सोडविला पान्हेडी अनाथ ह्मणोनी ॥ ५ ॥ पांडवांचें करी काज न मनीं लाज ॥ ह्मणे हे शरण मज सर्वभावें ॥ ६ ॥ पाडसा लागूनि जैसी कुरंगिणी ॥ तैसा रानीं वनीं सांभाळीत ॥ ७ ॥ प्रल्हादाकारणें झाला पै पिसाट ॥ देवें रूप विकट धरीयलें ॥ ८ ॥ विदारिला दैत्य आवेशें बहुत ॥ ह्मणे माझा भक्त गांजीयेला ॥ ९ ॥ जन्मोनी माझे बहु लळे केले ॥ अडचणीं सांभाळिलें अनाथ ह्मणोनी ॥ १० ॥ नामा ह्मगे याचे दृढ धरिले चरण ॥ कळिकाळापासोन सोडविलें ॥ ११ ॥

॥ ९०६ ॥ निर्विकल्प ब्रह्म कशानें आंतुडे ॥ जंववरी न मोडे मीतूंपण ॥ १ ॥ शब्द चित्रकथा सांगती पाल्हाळ ॥ मन नाहीं निश्चळ हरिच्या पायीं ॥ २ ॥ अणूच्या प्रमाण होतां दुजेपण ॥ मेरूच्या समान भार देवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे ब्रह्म सर्वांभूतीं पाही ॥ तरीच ठायींच्या ठायीं निवसी बापा ॥ ४ ॥

॥ ९०७ ॥ ह्मणसी बिभीषण शाहणा ॥ परि तो महा मूर्ख जाणा

॥ १ ॥ काय तो रामासी भेटला ॥ भेटून रामचि नाहीं झाला ॥ २ ॥ राम दृष्टी देखतांची ॥ पदवी न घेववेचि त्याची ॥ ३ ॥ कोण हित केलें तेणें ॥ राम नकळी चिंतनें ॥ ४ ॥ जरी तो झाला लंकापती ॥ नाश पावेल कल्पांतीं ॥ ५ ॥ नामया स्वामीतें जाणोन ॥ अवघा रामचि होईन ॥ ६ ॥

॥ ९०८ ॥ चांदणें नावडे चोरा ॥ सद्बुद्धि नावडे रांडेच्या पोरा ॥ वृक्ष नावडे कुंजरा ॥ सत्य कुचरा नावडे ॥ १ ॥ चंदन जाणावा सुगंधाची धृति ॥ कर्पूर जाणावा उत्तम याति ॥ हंस जाणावा चालतिये गति ॥ कोकिळ श्रुति ओळखावी ॥ २ ॥ लांव जाणावी उफराटिये दृष्टी ॥ क्रोधी जाणावा भोंवयांसीं गांठी ॥ लटिक्या जाणा बहुता गोष्टी ॥ नष्ट कुचेष्टी ओळखावा ॥ ३ ॥ नारी जाणावी भ्रतारभक्ति ॥ आचारें जाणावी महा सति ॥ धनुर्धर जाणावा संधान युक्ति ॥ संत तापसी ओळखावा ॥ ४ ॥ जयीं घातलिया निघे खरा ॥ ज्ञान जाणे तोचि चतुरा ॥ शिंदळी जाणावी नीच उत्तरा ॥ कुसळी घरोघरा फिरतसे ॥ ५ ॥ इतुकिया बोलाची न मानावी खंति ॥ विठ्ठलचरणीं ठेवूनियां मति ॥ प्रसन्न होईल लक्ष्मीपति ॥ ह्मणे विष्णुदास नामा ॥ ६ ॥

॥ ९०९ ॥ आलेनों संसारा सोडवणें करा ॥ शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १ ॥ प्रपंच न सरे कदा कल्पकोडी ॥ वासनेची बेडी पडे पायीं ॥ २ ॥ व्यर्थ मायादेवी गर्भवास गोवी ॥ नश्वर भोगवी नाना योनी ॥ ३ ॥ नामा ह्मणे पहा विचारूनि मनीं ॥ स्मरावा निर्वाणीं पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ९१० ॥ नामावीण मंत्र नाहीं त्रिभूवनीं ॥ ऐसी बोले वाणी वेदशास्त्रीं ॥ १ ॥ पहा विचारूनि अनुभव तो मनीं ॥ नका आड रानीं झणीं भरूं ॥ २ ॥ भक्तीविण कोण तरले ह्मणती ॥ तें आधी बुडती भवाब्धींत ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाम ओंकाराचें मूळ ॥ परब्रह्म तें केवळ रामनाम ॥ ४ ॥

॥ ९११ ॥ मूषक हव्यासें चालूनी भूमीतें ॥ मांजर तयातें टपतसे ॥ १ ॥ तसा तुज काळ टपे वेळोवेळां ॥ वेगीं त्या गोपाळा भजावें बापा ॥ २ ॥ भानूचेनि माप आयुष्य तो सरे ॥ अवचितां कांरे डोळा झांकी ॥ ३ ॥ नामा ह्मणे अरे निश्चिती हे मूढा ॥ हरी नाम दृढा सर्वासीना ॥ ४ ॥

॥ ९१२ ॥ केशवासी पाहे केशवासी ध्याये ॥ केशवासी गाये सर्व काळ ॥ १ ॥ केशव हाचि वृत्तिसह मन ॥ केशवासी ध्यान सर्व काळ ॥ २ ॥

सबाह्य अंतरीं सांडिना कोणासी ॥ जाणों अंतरासी साक्षभूत ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मी केशव होउनी ॥ पंढरीं वाटणी नांद बापा ॥ ४ ॥

॥ ९१३ ॥ नाचतां उडतां रडतां पडतां ॥ नाम्या अवचितां हातां आला ॥ १ ॥ येतां जातां हरि हरि वाटे ॥ नाम तें चोखटें स्मरा मुखीं ॥ २ ॥ हांसतां खेळतां घरीं दारीं पारीं ॥ मुखीं हरि हरि ह्मणे कां रे ॥ ३ ॥ खातां जेवितां अन्नतृप्ति सारी ॥ सांडी मांडी हरि सर्वकाळ ॥ ४ ॥ नामा ह्मणे नामीं आस्ति नास्ति ठसा ॥ केशव हरि सन्मुख तुह्मा दिसे ॥ ५ ॥

॥ ९१४ ॥ सोंगाचें वैराग्य अनर्थ हें मूळ ॥ आशा तें केवळ मिथ्या जाण ॥ १ ॥ अंतरापासूनी नसतां विवेक ॥ निभ्रांत चकट आशावरी ॥ २ ॥ राजस तामस करूनियां गोळे ॥ होताति आंधळे दाटोनियां ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐशा उदंड उपायें ॥ विठोबाचे पाय अंतरीती ॥ ४ ॥

॥ ९१५ ॥ सुखाचा सोहळा वाटतसे जीवा ॥ भेटणें केशवालागीं आजी ॥ १ ॥ पाऊलां पाऊलीं याचिया वाटे ॥ पताकांचे थाट दिसताती ॥ २ ॥ पैल तो कळसु पाहे पा साजणी ॥ नामघोष कानीं पडतसे ॥ ३ ॥ नामा ह्मणे नामीं पारणें जो करी ॥ तयासि श्रीहरि उपेक्षीना ॥ ४ ॥

॥ ९१६ ॥ समुद्राचें पाणी मुंगी मुखांतूनी ॥ काढाया लागोनि श्रम थोडे ॥ १ ॥ केशवाची भक्ति कठीण त्याहूनि ॥ वार्या दंभपणीं नोहे नोहे ॥ २ ॥ आकाश अंगुळें माप सुयेमान ॥ भूमीचें वजन पालडेनी ॥ ३ ॥ नामा ह्मणे वारा वळूंये कदापि ॥ केशवाचे रूपीं नव्हे बुद्धि ॥ ४ ॥

॥ ९१७ ॥ भुलले हे लोक काळाचें कौतुक ॥ सुरशक्रादिक पाहताती ॥ १ ॥ देवा तुझी माया अगम्य अगाध ॥ प्रपंचाचा वेध सुटों नेदी ॥ २ ॥ माझें घरदार माझा संसार ॥ मी मोठा चतुर ह्मणोनियां ॥ ३ ॥ आपणा देखतां जाती तें पाहती ॥ मीपणाची भ्रांति मूळीं नेणे ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां काय म्यां बोलावें ॥ भोंवत असावें चौऱ्यांशींला ॥ ५ ॥

॥ ९१८ ॥ जड हेंचि खळे आयुष्याची रासी ॥ काळ माप रसी मवीतसे ॥ १ ॥ माप तें लागलें माप तें लागलें ॥ माप तें लागलें झडाझडा ॥ २ ॥ मनोमय साक्ष माणिकाप्रमाणें ॥ तूंचि नारायण काळ खंडी ॥ ३ ॥ नामा ह्मणे जावें शरण केशवा ॥ सळेचा जो ठेवा न पवसी ॥ ४ ॥

॥ ९१९ ॥ वासेनेचा त्याग करारे सर्वथा ॥ या भावें अनंता शरण जावें ॥ १ ॥ कृपेचा सागर तुपेक्षी निर्वाणीं ॥ कलिकाळाहुनि सोडविलें ॥ २ ॥ भक्ताचा पाळक अनाथाचा कैवारी ॥ ब्रिदें चराचरीं वर्णिताती ॥ ३ ॥ शरीरसंपत्तीचा सोडा अभिमान ॥ मन करा लीन कृष्णरूपीं ॥ ४ ॥ आसनीं शयनीं चिंतितां गोविंदु ॥ तेणें तुटे कंदु भवव्याधि ॥ ५ ॥ परदारा परदासांचें पीडन ॥ सांडुनि भजन करा त्याचें ॥ ६ ॥ करा सर्व भावें संतांचि संगति ॥ नाहीं अर्थाअर्थीं जन्मा येणें ॥ ७ ॥ शुकसनकादिक मल्हाद जनक ॥ परीक्षिती मुख्य बिभीषण ॥ ८ ॥ भीष्म रुक्मांगद नारद उद्धव ॥ शिबि कवि देव इत्यादिक ॥ ९ ॥ शास्त्रांचें हें सार वेदां गव्हार नाम परिकर कलियुगीं ॥ १० ॥ नामा ह्मणे नको साधन आणिक ॥ दिल्ही मज भाक पुंडलीकें ॥ ११ ॥

॥ ९२० ॥ क्षणक्षणा देहीं आयुष्य हें काटे ॥ वासना हे वाटे नित्य नवी ॥ १ ॥ माझें मी ह्मणतां गेले नेणों किती ॥ रंक चक्रवर्ति असंख्यात ॥ २ ॥ देह जाय तोंवरी अभिमान ॥ न करी अज्ञान आत्महित ॥ ३ ॥ मोहाचीं सोयरीं मिळोनि चोरटीं ॥ खाऊनि करंटीं घेती घर ॥ ४ ॥ जोंवरी संपत्ति तोंवरी हा निके ॥ धनासवें भूंके तयांमागें ॥ ५ ॥ नामा ह्मणे झालों केशवाचा दास ॥ दाखवी वोरस तुझ्या नामीं ॥ ६ ॥

॥ ९२१ ॥ आलें रे आलें रे हांकीत ठाकीत ॥ मूढा गिवसीत काळ-चक्र ॥ १ ॥ मिथ्या मायाजाळ मृगजळबाधा ॥ गुगलासि धंदा संसारीं या ॥ २ ॥ बंधनापासूनि बांधलासि पायीं ॥ बुडतोसि डोहीं निर्जळापें ॥ ३ ॥ कोण भरवंसा धरिलासे जीवीं ॥ बळिया सोडवी कदांकाळीं ॥ ४ ॥ पुत्र पत्नी बंधु ह्मणशील क्षणीं ॥ धांवोनि निर्वाणीं पाव आतां ॥ ५ ॥ नामा ह्मणे वेगीं सावधान व्हावें ॥ शरणाहि जावें पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ ९२२ ॥ निरंतर तुह्मीं करावा विचार ॥ भवाब्धीचा पार होय कैसा ॥ १ ॥ जन्म गेलें वायां विषयाचे संगें ॥ भुलले वाउगे मायामोहें ॥ २ ॥ अवघा करितां संसाराचा धंदा ॥ वाचे वदा सदां हरिनाम ॥ ३ ॥ सर्वभावें एका विठोबातें भजा ॥ आर्ते करा पूजा हरिभक्त ॥ ४ ॥ सर्व सुख होई तुह्मांला आपैतें ॥ न याल मागुते गर्भवासा ॥ ५ ॥ नामा ह्मणे तुह्मीं विचारूनि पहा ॥ सर्वकाळ रहा संतसंगें ॥ ६ ॥

॥ ९२३ ॥ भक्तिप्रतापें मीं पावलों सुपंथ ॥ सफळ निश्चित परमार्थ ॥ १ ॥ देव सर्वांभूतीं असतां प्रगट ॥ निर्वाणीं चोखट भक्ति जाण ॥ २ ॥ धरूनियां मनीं जपसील नाम ॥ तेणें निज धाम पावसील ॥ ३ ॥ जप तप ध्यान नलगे साधन ॥ भक्ति ते कारण नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ ९२४ ॥ तेरा माजी तीन सात साक्षात्कार ॥ आठवा निर्धार असीपद ॥ १ ॥ नवमा पासूनी दशमाचे अंतीं ॥ बारावा निश्चिती योग जाणा ॥ २ ॥ प्रथम अक्षरीं मध्यमा सूचना ॥ नाम नारायणा अंतःकाळीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मी नाम स्मरा मनीं ॥ वैकुंठ भुवनीं वास होय ॥ ४ ॥

॥ ९२५ ॥ व्यर्थ कां हव्यासीं करिसी परोपरी ॥ नाम निरंतरीं न ह्मणा कां रे ॥ १ ॥ आयुष्य जाईल क्षणांत सरोन ॥ पावसी पतन कुंभिपाकीं ॥ २ ॥ नाम संकीर्तन नाइके स्वभावें ॥ प्रत्यक्ष तें शव जगामाजीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे गेले बहुतेक ॥ सांगें सकळिका हेंचि आतां ॥ ४ ॥

॥ ९२६ ॥ हरिविण देह मळीन सर्वथा ॥ मंगळाची कथा रामकृष्ण ॥ १ ॥ कथा करी कोणी ऐकती जे जन ॥ वैकुंठभुवन हातां आलें ॥ २ ॥ वेदशास्त्रां सार नामाचा उच्चार ॥ अंतीं पैल पार पाववितो ॥ ३ ॥ जन्मोनियां जगीं अलिप्त असावें ॥ नाम तें स्मरावें ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ ९२७ ॥ पांडुरंगें प्राप्त होईल सकळ ॥ चरणकमळ ध्या रे मनीं ॥ १ ॥ मनीं मानसिक न करावा कधीं ॥ नाम घ्या रे आधीं केशवाचें ॥ २ ॥ केशवाचें नाम पावन पवित्र ॥ महाभाष्यसूत्र हेंचि सांगे ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मीं करावें कीर्तन ॥ पंढरीचें ध्यान चुकों नको ॥ ४ ॥

॥ ९२८ ॥ स्वयें घरदार प्रपंच मांडिला ॥ जोडूनियां दिला बाळाहातीं ॥ १ ॥ तैसें सर्वांभूतीं असावें संसारीं ॥ प्राचीनाची दोरी साक्ष आहे ॥ २ ॥ वाटसरू वस्ती येऊनि राहिला ॥ प्रातःकाळीं गेला उठोनियां ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मां नाहीं प्रापंचिक ॥ पंढरिनायक साह्य झाला ॥ ४ ॥

॥ ९२९ ॥ चंद्र तारांगण नैऋति भास्कर ॥ तटस्थ निर्धार ब्रह्मादिक ॥ १ ॥ ब्रह्मादि सकळ भजनीं तत्पर ॥ तेव्हां हरिहर नाचतसे ॥ २ ॥ कृष्णा विष्णु नाम अच्युत अनंत ॥ सगुण निश्चित स्मरा वेगीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे नको उदंड सायास ॥ तोडी भवपाश रामनामें ॥ ४ ॥

॥ ९३० ॥ लांब लांब काय सांगशील गोष्टी ॥ करा उठाउठी निराभिमान ॥ १ ॥ मी तूं पण जंव दंभ गेला नाहीं ॥ साधिलें त्वां न कांहीं तत्वसार ॥ २ ॥ अहंभाव देहीं प्रपंचाचे दृष्टी ॥ काय चाले गोष्टी रोकडी ते ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें नेणती विचार ॥ जाती निरंतर यमपंथें ॥ ४ ॥

॥ ९३१ ॥ दावी जडबुद्धि जारण मारण ॥ नागवें हिंडणें काय काज ॥ १ ॥ दावी उग्र तप केले उपवास ॥ फिरतांहि देश काय काज ॥ २ ॥ काय काज तरी होसील फजीत ॥ स्मरारे अनंत सर्वकाळ ॥ ३ ॥ नामा ह्मणे नव्हे उदंड उपाय ॥ धरीं आधीं पाय विठोबाचे ॥ ४ ॥

॥ ९३२ ॥ भक्तीविणें जिणें जळो लाजिरवाणें ॥ संसार भोगणें दुःखरूप ॥ १ ॥ वीसलक्ष योनि वृक्षामध्यें घ्याव्या ॥ जळचरीं भोगाव्या नव लक्ष ॥ २ ॥ अकरा लक्ष योनि किरडामध्यें घ्याव्या ॥ दश लक्ष भोगाव्या पक्षांमध्यें ॥ ३ ॥ तीस लक्ष योनि पशूंचिये घरीं ॥ मानवाभीतरीं चारीं लक्ष ॥ ४ ॥ एक एक योनि कोटि कोटि फेरा ॥ मनुष्य देहवारा मग लागे ॥ ५ ॥ नामा ह्मणे तेव्हां संसार या नरा ॥ तयानें मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

॥ ९३३ ॥ तुह्मां हित करणें आहे ॥ सेवा राघोबाचे पाय ॥ १ ॥ दुष्ट बुद्धि दूरी करा ॥ तोडा अविद्येचा थारा ॥ २ ॥ शुद्ध करा तुमचें मन ॥ तुह्मां जवळी नारायण ॥ ३ ॥ नामा ह्मणे दृढ धरा ॥ तारी निर्वाणीं चाकरां ॥ ४ ॥

॥ ९३४ ॥ एके हातीं टाळ एके हातीं दिंडी ॥ ह्मणे वाचा उदंडीं रामनाम ॥ १ ॥ श्रीहरीसारिखा गोसांवी पैं चांगु ॥ फेडिला पैं पांगु जन्मांतरींचा ॥ २ ॥ ऐसें नृत्य करी वेडियें बागडें ॥ वदन वाकुडें करूनियां ॥ ३ ॥ चुकलें पाडस कुरंगिणी गिवसिती ॥ तैसा हृषीकेशि न्याहाळी तुतें ॥ ४ ॥ धेनु पान्हाय हुंबरे वत्सातें ॥ तैसा वोरस तूं तें केशिराज ॥ ५ ॥ नामा ह्मणे इतुकें न करवे निर्दैवा ॥ तरीं वाचेसि केशवा उच्चारी पां ॥ ६ ॥

॥ ९३५ ॥ भूमदानें होसी भूमिपाळु ॥ कनकदानें कांति निर्मळु ॥ चंदनदानें सदां शीतळु ॥ जन्मोजन्मीं प्राणिया ॥ १ ॥ अन्नदानें दृढायुषी उदकदानें सदासुखी ॥ मंदिरदानें भुवनपालखी ॥ सुपरिमळु उपचारां ॥ २ ॥

वस्त्रदानें सुंदरपण ॥ तांबूलदानें मनुष्यपण ॥ गोपीचंदनें ब्राह्मणपण ॥ अतिलावण्य सुंदरता ॥ ३ ॥ जे वृक्ष लाविती सर्वकाळ ॥ तयावरी छत्रांचें झल्लाळ ॥ जे ईश्वरीं अर्पिती फळ ॥ नानाविध निर्मळ ॥ ४ ॥ ऐशा दानाचिया पंक्ति ॥ वेगळाल्या सांगों किती ॥ एका ध्यारे लक्ष्मीपति ॥ विष्णुदास ह्मणे नामा ॥ ५ ॥

॥ ९३६ ॥ हरिकथाश्रवण श्रवणाचेनि द्वारें ॥ माझिया दातारें केशवें दिल्हें ॥ १ ॥ रूपाचें सुख नयनाचेनि द्वारें ॥ माझिया दातारें केशवें दिल्हें ॥२॥ तीर्थाचें सुख चरणाचेनि द्वारें ॥ माझिया दातारें केशवें दिल्हें ॥ ३ ॥ पूजनाचें सुख कराचेनि द्वारें ॥ माझिया दातारें केशवें दिल्हें ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसे जयाचे उपकार ॥ तो विठ्ठल दातार विसरले ॥ ५ ॥

॥ ९३७ ॥ मार्गीं चालतां उगले न चालावे ॥ वाचेसी ह्मणावें रामकृष्ण ॥ १ ॥ हरिबा हरि हरि मुकुंद मुरारि ॥ माधव नरहरि केशिराज ॥ २ ॥ ऐसा छंद वाचे सर्वकाळ जयां ॥ नामा ह्मणे तयां दोष कैंचे ॥ ३ ॥

॥ ९३८ ॥ एक तत्व त्रिभुवनीं ॥ दुसरें न धरी तूं मनीं ॥ १ ॥ ह्मणे कां नरहरि नारायण ॥ मग तुज गांजील कोण ॥ २ ॥ दोन मनीं जरी तूं धरिसी ॥ तरी वायां दंडिला जासी ॥ ३ ॥ त्रिविध भक्ति चराचरीं ॥ तयामाजिल एक तूं करी ॥ ४ ॥ चहुंवेदीं जें बोलिलें ॥ तें तूं करी बा उगलें ॥ ५ ॥ पंच इंद्रियांचा संग ॥ त्यांचा नको करूं पांग ॥ ६ ॥ साहि चक्रीं मन पवन ॥ तेथें नव्हे आत्मनिधान ॥ ७ ॥ सप्तस्वरीं करी कीर्तन ॥ आणिक नलगे रे साधन ॥ ८ ॥ अष्टहि गुणीं सात्विक पूजा ॥ भावें भजा गरुडध्वजा ॥ ९ ॥ नवहि द्वारें दंडिती ॥ पुनरपि कोठें कैंचि भक्ती ॥ १० ॥ दाही दिशा अवलोकितां ॥ दिवस गेले मोजितां ॥ ११ ॥ अकरा रुद्र जाले जरी ॥ तरी एकचि श्रीहरि ॥ १२ ॥ बारा मास आणि पक्ष ॥ व्यर्थ जाती दे तूं लक्ष ॥ १३ ॥ तेरा गुणांचे तांबूल ॥ समर्पावें पूगीफळ ॥ १४ ॥ चौदा भुवनें ज्याचे पोटीं ॥ त्याचें नाम विचरा कंठीं ॥ १५ ॥ पंधरा दिवसां एकादशी ॥ करा जागर उपवासी ॥ १६ ॥ षोडश उपचारें पूजा ॥ भावें भजा गरुडध्वजा ॥ १७ ॥ सत्रावी जीवनकळा ॥ तिचा घे कां रे सोहळा ॥ १८ ॥ अठरा पुराणें वाणिती ॥ निरंतर कृष्ण कीर्ति ॥ १९ ॥ ह्मणे विष्णूदास नामा ॥ शरण जावें पुरुषोत्तमा ॥ २० ॥

॥ ९३९ ॥ सर्व जीवां करी कारुण्य ॥ वाचे सत्य उच्चारण ॥ नित्य नामस्मरण ॥ तोचि दास भगवंताचा ॥ १ ॥ धन्य धन्य भूमंडळीं ॥ धन्य धन्य साधुवचन पाळी ॥ वेदमर्यादा वेगळी ॥ कार्यें न करी सर्वथा ॥ २ ॥ प्रातः-काळीं उठूनी ॥ नरहरिनाम उच्चारूनी ॥ उभा राहूनि कीर्तनीं ॥ जय जय नामें गर्जतसे ॥ ३ ॥ देवभक्ति आवडे ज्यासी ॥ पुण्यप्रारब्ध ह्मणती त्या-सी ॥ जो उपजोनि आपुले वंशीं ॥ पूर्वजांसि उद्धरितो ॥ ४ ॥ तीर्थें एक भावभजन ॥ नित्य सत्य तें पिंडदान ॥ भूतदया तें भागीरथीस्नान ॥ तेथ जनार्दन उभा असे ॥ ५ ॥ देखिलिया ब्राह्मण ॥ वेदांसमान देत मान ॥ यथाशक्ति करूनि दान ॥ अतिथिपूजन जो करी ॥ ६ ॥ नामा ह्मणे तोचि तरे ॥ वैकुंठ तेथें उतरे ॥ तीर्थें ह्मणती तो त्वरें ॥ पाहों दृष्टी एकवेळ ॥ ७ ॥

॥ ९४० ॥ नाम ह्मणावया तूं कां रे करंटा ॥ काय तुझे अदृष्टां लि-हिलें असे ॥ १ ॥ यमाचे यमपाश पडतील गळां ॥ जाशील सगळा काळा मुखीं ॥ २ ॥ शरीराची आशा बाळ हें तारुण्य ॥ अवचित वृद्धपण येईल मूढा ॥ ३ ॥ लक्ष्मी धन मद पुत्र स्त्री घरदार ॥ नेतां यमकिंकर न सो-डिती ॥ ४ ॥ मायबाप सखी न येती सांगातें ॥ जंव शरीरीं पुरतें बळ आहे ॥ ५ ॥ न येती सांगातें सज्जन सोयरीं ॥ वानप्रस्थ ब्रह्मचारी श्रेष्ठ जाले ॥ ६ ॥ घेशील तूं सोंग सन्यास आश्रम ॥ सांडूनि घराश्रम न सु-टसी ॥ ७ ॥ नामा ह्मणे नाम नित्य नरहरि ॥ ह्मणतां श्रीहरि तरशील ॥ ८ ॥

॥ ९४१ ॥ बोलवरी बोलती ॥ श्रुति वाखाणिती ॥ हरि पाविजे ती गति ॥ वेगळी असे ॥ १ ॥ तुज न पवे गा तें स्वप्न ॥ हरिशब्द एकची ब्रह्म ॥ पा-विजे तें वर्म ॥ वेगळें असे ॥ २ ॥ एक जाणीव खटपट ॥ करिती ते सैराट ॥ हरि पाविजे ती वाट ॥ वेगळी असे ॥ ३ ॥ एक आहेत तार्किक ॥ चार्वाकादी वादक ॥ हरि पाविजे तें सुख ॥ वेगळें असे ॥ ४ ॥ एक चातुर्यवक्ते ॥ व्युत्पन्न कवित्वें ॥ संत रंजविते ॥ लोकाचारी ॥ ५ ॥ जिहीं तुज जाणितलें ॥ तिहीं मौन धरिलें ॥ नामा ह्मणे तें पावले ॥ भक्तियोगें ॥ ६ ॥

॥ ९४२ ॥ त्यागेंवीण विरक्ति ॥ प्रेमावाचुनि भक्ति ॥ शांति नसतां ज्ञप्ति ॥ शोभा न पवे ॥ १ ॥ दमनेंवांचूनि यति ॥ मानाविण भूमिपति ॥ योगि नसतां युक्ति ॥ शोभा न पवे ॥ २ ॥ बहिर्मुख लाविमति ॥ नेमावांचू-नियां वृत्ति ॥ बोधेंवीण महंती ॥ शोभा नपवे ॥ ३ ॥ अनधिकारीं व्युत्पत्ति ॥

गुरु तो कनिष्ठ याति ॥ माता नीच शिश्न वृत्ति ॥ शोभा न पवे ॥ ४ ॥ हेतुवांचूनि प्रीति ॥ गुणरहित स्तुति ॥ करणीवांचूनि कीर्ति ॥ शोभा न पवे ॥ ५ ॥ सत्समागमसंगति ॥ बाणली नसतां चित्तीं ॥ नामा ह्मणे क्षिति ॥ शोभा न पवे सर्वथा ॥ ६ ॥

॥ ९४३ ॥ अतिथि आलिया द्यावें अन्नदान ॥ अर्पी जीव प्राण परमार्थीं ॥ १ ॥ तोचि एक नर श्रीहरिसमान ॥ करी दुजा कोण नाहीं ऐसा ॥ २ ॥ दीनासीं समान करितां आदर ॥ त्याच्या उपकारा पार नाहीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे असे खूण हे भाविकां ॥ सर्वांभूतीं देखा पाहे ऐक्य ॥ ४ ॥

॥ ९४४ ॥ साठी घडीमाजीं ॥ एक वेची देवकाजीं ॥ १ ॥ आराणूक सारूनि काजीं ॥ सर्वभावें केशव पूजी ॥ २ ॥ हेंचि भक्तीचें लक्षण ॥ संतोषला नारायण ॥ ३ ॥ कोटिकुळें पावन तुझीं ॥ नामा ह्मणे भाक माझी ॥ ४ ॥

॥ ९४५ ॥ जन्मा येऊनियां काय पुण्य केलें ॥ बाळपण गेलें वायांविण ॥ १ ॥ संतसंगें सुख हुंडारलें जाणा ॥ नामसंकीर्तना ओळखतां ॥ २ ॥ तरुणपणेंहि नाठवेचि देवा ॥ वृद्धपणीं सेवा अंतरली ॥ ३ ॥ यापरी जन्मुनि गेलासिरे वायां ॥ पंढरीच्या राया नोळखतां ॥ ४ ॥ आलों मी संसारीं गुंतलों व्यापारीं ॥ आझूनि कां श्रीहरि नोळखसी ॥ ५ ॥ सहस्र अपराध जरी म्यां रे केले ॥ तारिलें विठ्ठलें ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ ९४६ ॥ पावावया ब्रह्मपूर्ण ॥ सांडुनि देई दोषगुण ॥ १ ॥ सर्वांभूतीं समदृष्टि ॥ हेची भक्ति गोड मोटी ॥ २ ॥ यावेगळें थोर नाहीं ॥ बरवें शोधुनीया पाही ॥ ३ ॥ येणें संसार सुखाचा ॥ ह्मणे नामा शिंपीयाचा ॥ ४ ॥

॥ ९४७ ॥ शेवटिली पाळी तेव्हां मनुष्य जन्म ॥ चुकलीया वर्म फेरा पडे ॥ १ ॥ एक जन्मीं ओळखी करा आत्माराम ॥ संसार सुगम भोगूं नका ॥ २ ॥ संसारीं असावें असोनि नसावें ॥ कीर्तन करावें वेळोवेळां ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठो भक्ताचिये द्वारीं ॥ घेऊनिया करीं सुदर्शन ॥ ४ ॥

॥ ९४८ ॥ वाचे ह्मणतां गंगा गंगा ॥ सकळ पापें जाति भंगा ॥ १ ॥ दृष्टी पडतां ब्रह्मगिरि ॥ त्यासि नाहीं यमपुरी ॥ २ ॥ कुशावर्तीं करितां

स्नान ॥ साचें वैकुंठीं राहणें ॥ ३ ॥ नामा ह्मणे प्रदक्षिणा ॥ त्यासी जन्म नाहीं पुन्हा ॥ ४ ॥

॥ ९४९ ॥ उठोनि वेगेसीं ॥ चला जाऊं राऊळासी ॥ जळतील पातकांच्या राशी ॥ कांकडआरति देखिल्या ॥ १ ॥ उठा उठा साधु संत ॥ साधा आपुलें हें हित ॥ मग कैंचा भगवंत ॥ नरदेह गेलिया ॥ २ ॥ जागें करा रुक्मिणीवरा ॥ द्वैत अद्वैत निजसुरा ॥ जीवीं निंबलोण करा ॥ दृष्टि होईल तुह्मांसी ॥ ३ ॥ उठोनि पहांटे ॥ उभा विठ्ठल पहा विटे ॥ चरण तयाचे गोमटे ॥ अमृतदृष्टि अवलोका ॥ ४ ॥ पुढें वाजंत्रे वाजती ॥ ढोल दमामे गर्जती ॥ होती कांकडआरति ॥ पांडुरंग रायाची ॥ ५ ॥ सिंहनाद शंख भेरी ॥ आनंद होतो महाद्वारीं ॥ केशवराज विटेवरी ॥ नामा चरण वंदीत ॥ ६ ॥

॥ ९५० ॥ भवसागर तोडितां कां रे करितसां चिंता ॥ पैल उभा दाता पांडुरंग ॥ १ ॥ निजाचें जें पीठ सोडूनि वैकुंठ ॥ येथें वाळवंट आवडलें ॥ २ ॥ देव गुज सांगे पंढरीसि या रे ॥ प्रेमसुख घ्या रे नाम माझें ॥ ३ ॥ तारीन भवसिंधु घ्या रे माझी भाक ॥ साक्ष पुंडलीक करूनि सांगे ॥ ४ ॥ काया वाचा मनें दृढ धरा जीवीं ॥ मी साचा चालवीं भार सर्व ॥ ५ ॥ हें जरी लटिकें नामयासि पुसा ॥ आहे त्या भरंवसा नामीं माझे ॥ ६ ॥

॥ ९५१ ॥ न पढावे वेद नको शास्त्रबोध ॥ नामाचे प्रबंध पाठ करा ॥ १ ॥ नव्हे ब्रह्मज्ञान न होय वैराग्य ॥ साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ २ ॥ येर क्रियाकर्म करितां हो कळीं ॥ माजि कोण बळि तरले सांगा ॥ ३ ॥ नामा ह्मणे गुज सांगितलें संतीं ॥ यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥ ४ ॥

॥ ९५२ ॥ राम ह्मणतां रामचि होसी ॥ भाक घेई मजपाशीं ॥ १ ॥ लवण समुद्रीं जागा मागे ॥ तेंहि समुद्र झालें अंगें ॥ २ ॥ वात दीपासंगें गेली ॥ तेहि दीप अंगें झाली ॥ ३ ॥ नामा सांगे भाविक लोकां ॥ नाम घेतां राहूं नका ॥ ४ ॥

॥ ९५३ ॥ जळीं बुडबुडे देखतां देखतां ॥ क्षण न लागतां दिसेनाती ॥ १ ॥ तैसा हा संसार पाहतां पाहतां ॥ अंतःकाळीं हाता काय नाहीं ॥ २ ॥

गारुड्याचा खेळ दिसे क्षणभर ॥ तैसा हा संसार दिसे खरा ॥ ३ ॥ नामा ह्मणे येथें कांहीं नसे बरें ॥ क्षणाचें हें खरें सर्व आहे ॥ ४ ॥

॥ ९५४ ॥ विषयांचें कोड कां करिसी गोड ॥ होईल तुज जोड इंद्रियबाधा ॥ १ ॥ सर्व हें लटिकें जाणूनि तूं निकें ॥ रामेविण एके न सुटिजे ॥ २ ॥ मायाजाळमोहो इंद्रियांचा रोहो ॥ परि न धरिसी भावो भजनपंथें ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा करी तूं लवलाहो ॥ मयूराचा टाहो घन गर्जे ॥ ४ ॥

॥ ९५५ ॥ रामनाम वाचे बोल ॥ तया पुरुषा नाहीं मोल ॥ १ ॥ धन्य तयाचें शरीर ॥ बरे जना उपकार ॥ २ ॥ ऋणिया तो तारी ॥ विश्वव्यापक तो हरि ॥ ३ ॥ नामा ह्मणे स्वामि ॥ सुखें वसे अंतर्यामीं ॥ ४ ॥

॥ ९५६ ॥ आतां पांडुरंग स्मरा ॥ जन्ममृत्यु चुकवी फेरा ॥ १ ॥ ऐसा कांहीं करा नेम ॥ मुखीं स्मरा कृष्णराम ॥ २ ॥ चिंता ऐसें ध्यान ॥ तेणें असा समाधान ॥ ३ ॥ नामा ह्मणे हरिदास ॥ त्यासि असावा अभ्यास ॥ ४ ॥

॥ ९५७ ॥ सांडूनि पंढरीची वारी ॥ मोक्ष मागती ते भिकारी ॥ १ ॥ ताट वोगरिलें निकें ॥ सांडूनि कवण जाय भिके ॥ २ ॥ जो नेणें नामगोडी ॥ तोचि मुक्तितें चरफडी ॥ ३ ॥ आह्मी पंढरीचे लाटे ॥ नवजों वैकुंठींचे वाटे ॥ ४ ॥ झणीं भ्याल गर्भवासा ॥ नामा ह्मणे विष्णुदासा ॥ ५ ॥

॥ ९५८ ॥ एकवेळ नयनीं पहावा ॥ मग जाईजे भलत्या गांवा ॥ १ ॥ आठवाल वेळोवेळां ॥ विठोबा आहे रे जवळां ॥ २ ॥ हृदयीं मांडूनियां ठसा ॥ नामा ह्मणे केशव असा ॥ ३ ॥

॥ ९५९ ॥ न लगती डोंगर चढावे ॥ हळुचि पाऊल धरावें ॥ १ ॥ विठ्ठलाचे पाय बरवे ॥ गंगा विनविते स्वभावें ॥ २ ॥ नामा ह्मणे तीर्थ बरवें ॥ मुकुटीं धरिलें सदाशिवें ॥ ३ ॥

॥ ९६० ॥ तुळसीची सेवा घडे ॥ रंगमाळा घालूं सडे ॥ १ ॥ दूत न येती तयाकडे ॥ हरिनामाची घरटी पडे ॥ २ ॥ नामा ह्मणे हरि एवढें ॥ ब्रह्म वृंदावनीं सांपडे ॥ ३ ॥

॥ ९६१ ॥ फुकाचिया तुळसी वहा रे ॥ ध्रुवासारिखें पद मागा रे

॥ १ ॥ एका विठ्ठला शरण जा रे ॥ जन्म वायां कां दवडा रे ॥ २ ॥ नामा ह्मणे हा देवो पहा रे ॥ विठ्ठल भक्तांचा ऋणिया रे ॥ ३ ॥

॥ ९६२ ॥ काय करूनि तीर्थाटणें ॥ मन भरिलें अवगुणें ॥ १ ॥ काय करावें तें तप ॥ चित्तीं नाहीं अनुताप ॥ २ ॥ मनःसंकल्पाचीं पापें ॥ नजाती तीर्थांचेनि वापें ॥ ३ ॥ नामा ह्मणे सर्व सोपें ॥ पाप जाय अनुतापें ॥ ४ ॥

॥ ९६३ ॥ हरिकथा ऐकतां अनन्य पैं गोष्टी ॥ निधान सां दृष्टी अंतरलें ॥ १ ॥ घडी घडी प्रेम अंतरूं न द्यावें ॥ सावधान व्हावें रामनामीं ॥ २ ॥ यापरी स्वहितीं ठेवियलें लक्ष ॥ ते पावती मोक्ष ह्मणे नामा ॥ ३ ॥

॥ ९६४ ॥ पिता शिकवी पुत्रासीं ॥ नको जाऊं बापा हरिकथेसी ॥ तेथें पांचा तोंडांची विवशी ॥ ते वैष्णवें आणिली आहे ॥ १ ॥ तिचिया गळां रुंडमाळा ॥ अंगीं स्मशानींचा उधळा ॥ कंठीं सर्पाचें हळाहळ ॥ गजचर्म पांघुरलें ॥ २ ॥ नको जाऊं बापा तेथें ॥ मागुता न येशी रे येथें ॥ जे जे पाहूं गेले तियेतें ॥ ते आले नाहीं मागुते ॥ ३ ॥ चंद्र पाहों गेला तियेसी ॥ ओढूनि बांधिला भाळेसी ॥ तैसा पडसी अभरंवशीं ॥ मग मुकशी संसारासी बापा ॥ ४ ॥ वारितां वारितां ध्रुव गेला ॥ तो नेऊनि अढळपदीं घातला ॥ बळीस देशवटा दिधला ॥ तो घातला पाताळीं ॥ ५ ॥ नारदा दिधली कांसवटी ॥ हनुमान केला हिंपुटी ॥ रुक्मांगदाची वैकुंठीं ॥ नगरी नेऊनि घातली ॥ ६ ॥ तिचें वैष्णव लहाणें ॥ कळों नेदिती आपुलीं विंदानें ॥ हरिकथारंगीं नाचणें ॥ नामकल्लोळीं ॥ ७ ॥ तीस दहा हात अकरा डोळे ॥ ती किती काळाची न कळे ॥ भयानक श्रीमुख कमळें ॥ हातीं घेऊनी हिंडतसें ॥ ८ ॥ भस्म डौर त्रिशूळ हातीं ॥ ते न वर्णवे वेदश्रुतीं ॥ तीसी नाहीं कुळ याती ॥ आपपर ते कैचें ॥ ९ ॥ ते वेद शास्त्रां अगोचर ॥ ती सवें असे एक ढोर ॥ कोठें न मिळेचि विढार ॥ ह्मणोनि स्मशानीं वसतसे ॥ १० ॥ ऐसी ती थोर लाव ॥ तिसी गांव ना शीव ॥ कोठेंचि न मिळे ठाव ॥ ह्मणोनि समुद्रीं ॥ ११ ॥ तेथें सर्पाचें अंथरूण करी ॥ निद्रा उदका भीतरीं ॥ तया वैष्णवा माझारीं ॥ निरंतरीं वर्ततसे ॥ १२ ॥ सांगेन ते परियेसी ॥ आहे ती संत महंतापाशीं ॥ आणि हरिकथेसी ॥ बैसली असे ॥ १३ ॥ ह्मणवोनी विश्वासें तूं जासी ॥ मुकसी आपल्या संसारासी ॥ नामा विनवी श्रोतयांसी ॥ हें बोलणें वेदांचें ॥ १४ ॥

॥ ९६५ ॥ तोंवरी रे तोंवरी वैराग्याचें ठाण ॥ जंव कामिनी कटाक्ष बाण लागले नाहीं ॥ १ ॥ तोंवरी रे तोंवरी आत्मज्ञान बोध ॥ जोंवरी अंतरीं कामक्रोध उठले नाहीं ॥ २ ॥ तोंवरी रे तोंवरी निराभिमान ॥ जंव देहीं अपमान झाला नाहीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे अवघी बचबच गाळी ॥ विरळा तो जाळी द्वैत बुद्धि ॥ ४ ॥

॥ ९६६ ॥ शरीर काळाचें भातुकें ॥ तुह्मी नेणा कां इतुकें ॥ १ ॥ माझा जन्म गेला वायां ॥ तुजविण पंढरिराया ॥ २ ॥ अझूनि तूं कां रे निचिंत ॥ काळ जवळीं हटकीत ॥ ३ ॥ नामा ह्मणे अवघे चोर ॥ शेवीं हरिनाम सोयरे ॥ ४ ॥

॥ ९६७ ॥ वेदाध्ययन करिसी तरी वैदिकचि होसी ॥ परी वैष्णव न होसी अरे जना ॥ १ ॥ पुराण सांगसी तरी पुराणीकचि होसी ॥ परी वैष्णव न होसी अरे जना ॥ २ ॥ गायन करिसी तरी गुणिजन होसी ॥ परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ३ ॥ कर्म आचरसी तरी कर्मठचि होसी ॥ परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ४ ॥ यज्ञ करिसी तरि याज्ञिकचि होसी ॥ परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ५ ॥ तीर्थ करिसी तरी कापडीच होसी ॥ परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ६ ॥ नामा ह्मणे नाम केशवाचें घेसी ॥ तरीच वैष्णव होसी अरे जना ॥ ७ ॥

॥ ९६८ ॥ आप तेज वायु पृथ्वी आणि गगन ॥ त्यांचें बा केलें शरीर-निधान ॥ १ ॥ त्यामाजीं घातलें मन पवन ॥ पिंडब्रह्मांड केली रचना ॥ २ ॥ काय सांगों तुझी करणी नारायणा ॥ वेदपारायणा केशिराजा ॥ ३ ॥ पृथ्वीवरी तीर्थें आहेत अपार ॥ परि पंढरीची सर एका नाहीं ॥ ४ ॥ जन्मोजन्मींच्या पातका दरारा ॥ चुके येरझारा एके खेपे ॥ ५ ॥ ब्रह्मज्ञानें-वीण मोक्ष आहे भूतीं ॥ वाचेसि ह्मणती विठ्ठलनाम ॥ ६ ॥ बेताळीसांसहित जातील वैकुंठा ॥ नामा ह्मणे भेटा विठ्ठलदेवा ॥ ७ ॥

॥ ९६९ ॥ अनंत हे कळा अनंत हे लीळा ॥ अनंत जयाला वेद गाती ॥ १ ॥ तोचि पांडुरंग पंढरीचा राजा ॥ धणी झाला वोजा भावबळें ॥ २ ॥ अनंत जयाच्या सेवा वोजोवणी ॥ नामरूप गुणीं नामातीत ॥ ३ ॥ नामा ह्मणे अंत असेना जो कांहीं ॥ सांपडतो पाहीं पंढरीये ॥ ४ ॥

॥ ९७० ॥ साराचेंही सार भक्तीचें भांडार ॥ नाम निरंतर गातां वाचे

॥ १ ॥ कासया करावें आणिक साधन ॥ नामावीण क्षण जाऊं नेदी ॥ २ ॥ दया शांति क्षमा हेंचि पैं भूषण ॥ नामसंकीर्तन अहर्निशीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे जप अखंड नामाचा ॥ काळ हा सुखाचा सदोदित ॥ ४ ॥

॥ ९७१ ॥ हरीवीण जीणें व्यर्थचि संसारीं ॥ जग अलंकारीं मिरवीत ॥ १ ॥ देवावीण शब्द लटके करणें ॥ भांडा रंजविणें सभेमाजीं ॥ २ ॥ आचार करणें देवावीण जो गा ॥ सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ ३ ॥ नामा ह्मणे काय बहु बोलों फार ॥ भक्तीवीण नर अभागी तो ॥ ४ ॥

॥ ९७२ ॥ मनाचें मनपण सांडीतां रोकडें ॥ अंतरींच जोडे परब्रह्म ॥ १ ॥ नाथिला प्रपंच धरोनियां जीवीं ॥ सत्य तें नाठवी कदाकाळीं ॥ २ ॥ अझूनि तरी सांडी नाथिलें लटिकें ॥ तरसील कवतुकें ह्मणे नामा ॥ ३ ॥

॥ ९७३ ॥ हरि गातां बरवा ऐकतां बरवा ॥ हृदयीं ध्यातां बरवा बाइयांनो ॥ १ ॥ चंद्रबिंबाची कुरवंडी ओवाळूं श्रीमुखावरी ॥ मदन हा जिव्हारीं लाजिन्नला ॥ २ ॥ नामा ह्मणे निववीलें सकळ इंद्रियांतें ॥ ह्मणोन सा केशवातें शरण जा रे ॥ ३ ॥

॥ ९७४ ॥ बाळपणीं हीचीं वर्षें गेलीं बारा ॥ खेळतां दे पोरा नाना मतें ॥ १ ॥ विटु दांडू चेंडू लगोऱ्या बाघोडे ॥ चपे पेडखडे एकीबेकी ॥ २ ॥ सेलदोरे खेळी आणि सलवडी ॥ उचलिती धोंडी अंगबळें ॥ ३ ॥ कोंबडा कोंबडी आणि पाणबुडी ॥ आणि सेलडी लिंबुटिंबु ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें गेलें बाळपण ॥ मग आलें जाण तारुण्य तें ॥ ५ ॥

॥ ९७५ ॥ ऐसा संत विरळा भेटे भाग्ययोगें ॥ आथिला वैराग्यें सप्रेमळ ॥ १ ॥ सर्व भावें करूनि सर्वभूतीं करुणा ॥ जेथें मीतूंपणा ठाव नाहीं ॥ २ ॥ भजन तया नांव निर्विकार निकें ॥ विश्वीं माझ्या देखे विठोबासी ॥ ३ ॥ अखंड हृदयीं तेचि आठवण ॥ साजिरे समचरण विटेवरी ॥ ४ ॥ नादलुब्ध जैसा आसक्त हरिण ॥ जाय विसरोन देहभव ॥ ५ ॥ यापरी तल्लीन दृढ राखे मन ॥ तयापरी श्रवण आवडीचें ॥ ६ ॥ व्यवसायीं मन ठेवूनि कृपण ॥ लाभाचें चिंतन सर्वकाळ ॥ ७ ॥ यापरी स्वहित अखंड विचारणें ॥ करी तें मनन सत्वशील ॥ ८ ॥ परपुरुषीं आसक्त जैसी व्यभिचारिणी ॥ नलगे तिच्या मनीं घराचार ॥ ९ ॥ कीटकीं भृंग जैंवि ऐसें अनुसंधान ॥ निकें निजध्यासन दृढ होय ॥ १० ॥ सर्वभावें एक विठ्ठलचि

ध्यायी ॥ सर्व भूतीं पाही रूप त्याचें ॥ ११ ॥ सर्वांहूनि निराळा रजतमाहूनि वेगळा ॥ भोगी प्रेमकळा तोचि भक्त ॥ १२ ॥ सत्वाचा सुभट निःसंगें एकट ॥ वैराग्य उद्भट एकनिष्ट ॥ १३ ॥ प्रारब्धाचे भागीं नेणें देहस्फुर्ति ॥ अखंड ते धृति निरुपम ॥ १४ ॥ निर्वासना मन निर्लोभ संपूर्ण ॥ नेणें स्वरूपज्ञान संकल्पाचें ॥ १५ ॥ अनुरागीं गोविंद गाईजे एकांतीं ॥ यापरी विश्रांति आणिक नाहीं ॥ १६ ॥ काया वाचा मन हा माझा अनुभव ॥ सांगितला सर्व आवडीचा ॥ १७ ॥ नामा ह्मणे हेंहीं बोलविलें जेणें ॥ उदार सर्वज्ञ पांडुरंग ॥ १८ ॥

॥ ९७६ ॥ सगुण समान भजती अंतरीं ॥ सर्व भूतांतरीं असे एक ॥ १ ॥ पहा कोळियाची काय सांगों कीर्ति ॥ विद्या अभ्यासिती मूर्ती पुढें ॥ २ ॥ द्रौपदीचे घरीं होते उपवासी ॥ देंठहि लावीसी अकस्मात ॥ ३ ॥ नामा ह्मणे जाण प्रारब्ध कारण ॥ पांडुरंगावीण गति नाहीं ॥ ४ ॥

॥ ९७७ ॥ दुष्ट तो दुर्जन दूरीच धरावा ॥ संग न करावा पापियाचा ॥ १ ॥ सर्पाचें पिलें सानें ह्मणऊनि पोशिलें ॥ त्यासीं पान दिधलें अमृताचें ॥ २ ॥ नव्हे तें निर्विष न संडी स्वभावगुण ॥ घेऊं पाहे प्राण पोसित्याचे ॥ ३ ॥ विष्णुदास नामा सांगतसे युक्ति ॥ विवेक हा चित्तीं दृढ धरा ॥ ४ ॥

॥ ९७८ ॥ तेहतीस कोटींची केली सोडवण ॥ तो हा राम जतून धरा मनीं ॥ १ ॥ राघवाचें नाम वाचेसी उच्चारा ॥ निजाचा सोयरा रामचंद्र ॥ २ ॥ सागरीं ह्या शिळा तारिल्या अवलीळा ॥ ब्रह्मयाची बाळा उद्धरिली ॥ ३ ॥ रावण कुंभकर्ण विदारिले बाणीं ॥ दिधली राजधानी शरणांगता ॥ ४ ॥ वाल्मिक भविष्य कथूनियां गेला ॥ रामें पवाडा केला तिहीं लोकीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे रामनाम हें दुर्लभ ॥ शिव स्वयंभ हेंचि जपे ॥ ६ ॥

॥ ९७९ ॥ अंतींचा लाभु आधींच साधिजे ॥ देह असतां कीजे हरिभक्ति ॥ १ ॥ आदि मध्य अंतु तोचि हा व्यापकु ॥ विश्वप्रतिपाळकु नारायण ॥ २ ॥ विषय महापुरीं पतीत जीव भारी ॥ तैशापरीहि हरिनाम ध्यावें ॥ ३ ॥ नामा ह्मणे हा दुर्लभ नरजन्मु ॥ केशव मेघश्यामु अनुसरा वेगीं ॥ ४ ॥

॥ ९८० ॥ औट हात घर जायाचें कोपट ॥ दोन दिवस फुकट भोगा कां रे ॥ १ ॥ कवणाचें घर कवणाचें दार ॥ भावें नरहरि ओळंगा रे ॥ २ ॥ आडें मोडलें घर झांजर झालें ॥ वारा आला तेणें मोडोनि गेलें ॥ ३ ॥ खचला पाया पडली भिंती ॥ नामा ह्मणे घर नलगे चित्तीं ॥ ४ ॥

॥ ९८१ ॥ धनमानबळें नाठविसि देवा ॥ मृत्युकाळीं तेव्हां कोण आहे ॥ १ ॥ यमाचे यमदंड बैसतील माथां ॥ तेव्हां तुज रक्षिता कोण आहे ॥ २ ॥ मायबापबंधु तोंवरी सोयरीं ॥ इंद्रियें जोंवरी वाहताती ॥ ३ ॥ सर्वस्व स्वामिनी ह्मणविसी कांता ॥ तेहि केश देतां रडतसे ॥ ४ ॥ विष्णुदास नामा जातांचि शरण ॥ स्वप्नीं जन्ममरण नाहीं नाहीं ॥ ५ ॥

॥ ९८२ ॥ नागवे कळिकाळां ब्रिदावळी पाही ॥ तोचि लवलाहीं ध्यायिजेसु ॥ १ ॥ स्मरण विठ्ठल चित्त पांडुरंग ॥ नाहीं तया मग जन्ममरण ॥ २ ॥ आपणचि नांदे भक्तांचिया घरीं ॥ आपणचि करी सर्व कृत्य ॥ ३ ॥ नामा ह्मणे तो देव पंढरीनिवास ॥ कळिकाळासी वास पाहों नेदी ॥ ४ ॥

॥ ९८३ ॥ केशव पैं मुक्ति केशव पैं भक्ति ॥ केशव विश्रांति पंढरीये ॥ १ ॥ केशव पैं देणें केशव पैं घेणें ॥ केशव करणें धंदा आह्मी ॥ २ ॥ केशव लौकिकीं केशव व्यवहारीं ॥ केशव निर्धारीं नाम तुझें ॥ ३ ॥ नामा ह्मणे अगा केशव वोळला ॥ भावासि भूलला वाळवंटीं ॥ ४ ॥

॥ ९८४ ॥ सहस्रनामाची घालितां लाखोली ॥ तरला हा कोळी वाल्मिक तो ॥ १ ॥ पुराणप्रसिद्ध गोष्टी ह्या ऐकाव्या ॥ प्रत्यक्ष देखाव्या कोणें ठायीं ॥ २ ॥ अंगअनुभवा आपण आणाव्या ॥ तरीच वाणाव्या संतांपुढें ॥ ३ ॥ नाहींतरी मज वाटे कां न कोडें ॥ सुधा ह्मणे तोंड चवी नेणें ॥ ४ ॥ नामा ह्मणे असे पोटामध्यें भूक ॥ तृप्तिचें तें सुख बोलों कैसें ॥ ५ ॥

॥ ९८५ ॥ भिष्मासी आपण पाडियलें रणीं ॥ गोविंदें निर्वाणीं भेटी दिल्ही ॥ १ ॥ हरिश्चंद्र वाहे डोंबाघरीं पाणी ॥ गोविंदें निर्वाणीं भेटी दिल्ही ॥ २ ॥ परीक्षिती बैसे मरण आसनीं ॥ गोविंदें निर्वाणीं भेटी दिल्ही ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मी देव धरा मनीं ॥ गोविंद निर्वाणीं भेटे तुह्मां ॥ ४ ॥

॥ ९८६ ॥ संसाराबंधन केलें जेणें शून्य ॥ तयासी अनन्य शरण रिघा ॥ १ ॥ मायबाप सखा विठ्ठल विसांवा ॥ साचे पायीं ठेवा सदा मन ॥ २ ॥ निजरूपबोध तोचि ज्ञानदीप ॥ आनंदस्वरूप बाप माझा ॥ ३ ॥ नामा ह्मणे साच्या संगतीचा वारा ॥ पावे पैल पारा हेळामात्रें ॥ ४ ॥

॥ ९८७ ॥ ज्याचे मुखीं नाम तोचि एक धन्य ॥ त्याचें शुद्ध पुण्य इयेजनीं ॥ १ ॥ नामसंकीर्तन नित्य नाम वाचे ॥ दहन पापाचें एका नामें ॥ २ ॥ ऐसा जो अखंड जपे रामनाम ॥ नाहीं तयासम दुजें कोणी ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाम विठ्ठलाचें जपा ॥ हाचि मार्ग सोपा परब्रह्मीं ॥ ४ ॥

॥ ९८८ ॥ अवघे ते दैवाचे विठ्ठल ह्मणती वाचे ॥ अवघें कुळ सांचें पुण्यवंत ॥ १ ॥ अवघेचि संसारीं जाणावे ते धन्य ॥ ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं ॥ २ ॥ अवघा विठ्ठल भोगिती दिनराती ॥ बोळगे किंकरवृत्ति नामा सांतें ॥ ३ ॥

॥ ९८९ ॥ पंढरीची वारी असे ज्याचे घरीं ॥ विठ्ठल साचे घरीं बाळरूप ॥ १ ॥ विठ्ठलाचें नाम ज्या माउलिचे ओठीं ॥ विठ्ठल तिचे पोटीं गर्भवासीं ॥ २ ॥ नामा ह्मणे माझी जिव्हा देईल रवा ॥ असत्य केशवा होतां वचन ॥ ३ ॥

॥ ९९० ॥ जिव्हे केशवाचें करितां कीर्तन ॥ मिथ्या वदूं नको एक रामाविण ॥१॥ ह्मणऊनि हरिरंगीं रंगा ॥ नाम घेतां महा पातकें जाती भंगा ॥ २ ॥ चित्तीं चिंतितां होई तद्रूप ॥ मिथ्या विषयीं लुब्ध झालिया काय सुख ॥ ३ ॥ पूजन करा तुह्मी अच्युताचें ॥ नामा ह्मणे एकचित्तें साचें ॥ ४ ॥

॥ ९९१ ॥ हरिस श्रवणीं घ्या वो नित्य तुह्मी ॥ ठसावेल ध्यानीं अवघा राम जनींवनीं ॥ १ ॥ नयनीं सखा पहा कृष्ण न्याहाळुनी ॥ प्रकाशलें तेज रवि गेला लपोनी ॥ २ ॥ हरिचरणीं लावी मन दर्शन ॥ झालीया जाती त्रिविधताप हरपोन ॥ ३ ॥ तुळसीचा सुगंध मस्तकीं धरा ॥ नामा ह्मणे चरण दृढ धरा ॥ ४ ॥

॥ ९९२ ॥ एकी एकादशी करितां काय वेंचे ॥ उपवासी राहतां काय वेंचे ॥ १ ॥ एक तुळसीदळ वाहतां, काय वेंचे ॥ पाउलीं वंदितां

काय वेंचे ॥ २ ॥ तुज जागरणा जातां काय वेंचे ॥ हरि हरि ह्मणतां काय वेंचे ॥ ३ ॥ संतसमागमा जातां काय वेंचे ॥ चरणरज वंदितां काय वेंचे ॥ ४ ॥ एक दंडवत करितां काय वेंचे ॥ अपराधी ह्मणवितां काय वेंचे ॥ ५ ॥ एक प्रदक्षिणा करितां काय वेंचे ॥ तीर्थयात्रेसी जातां काय वेंचे ॥ ६ ॥ ऐसी निमाली भक्ति कां न करिसी निर्दैवा ॥ नामा ह्मणे केशवा अनुसर पां ॥ ७ ॥

॥ ९९३ ॥ एक ह्मणती आह्मी देवची जालों ॥ तरी असे नका बोलों पडाल पतनीं ॥ १ ॥ एक ह्मणती आह्मी देवा समान ॥ तरी घासील वदन यमराम ॥ २ ॥ एक ह्मणती आह्मी देवाचींच रूपें ॥ तुमच्यानि बापें संसार न तुटे ॥ ३ ॥ देवें वधियेलें दानवां दैत्यां ॥ आह्मां आड जातां तृण न मोडे ॥ ४ ॥ देवें उचलिल्या शिळा मेदिनी ॥ तुमचेनी एक गोणी नुचले देखा ॥ ५ ॥ विठ्ठलाचे पद जो कोणी अभिलाषी ॥ तो महा पातकी ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ ९९४ ॥ आगमीं नाम निगमीं नाम ॥ पुराणीं नाम केशवाचें ॥ १ ॥ अर्थीं नाम पदीं नाम ॥ धृपदीं नाम त्या केशवाचें ॥ २ ॥ अनुभवें भावें कपटें प्रपंचें ॥ परि हरीचें नाम येऊं दे वाचे ॥ ३ ॥ नाम व्हावें नाम व्हावें ॥ नाम व्हावें त्या केशवाचें ॥ ४ ॥ ऐसें नाम बहु सुंदर ॥ नामीं तरले लहान थोर ॥ ५ ॥ नामा ह्मणे अंतर ॥ पडों नेदीं याउपर ॥ ६ ॥

॥ ९९५ ॥ उदरास भरण खळ बुद्धीसि कारण ॥ त्याचें परिहरण रामनाम ॥ १ ॥ कामसंदीपन दोषआचरण ॥ त्याचें परिहरण रामनाम ॥ २ ॥ दुर्वासना गहन दुर्बुद्धि आचरण ॥ त्याचें परिहरण रामनाम ॥ ३ ॥ नामा ह्मणे कारण संसारतारण ॥ जरी मनीं निधान रामनाम ॥ ४ ॥

॥ ९९६ ॥ उभें वृंदावन जयाचिये द्वारीं ॥ होय तो श्रीहरि प्रसन्न त्या ॥ १ ॥ तुळसीचें रोप लावील जो आणोनी ॥ तया चक्रपाणी न विसंबे ॥ २ ॥ तुळसीचें काष्ठ जपमाळ करी ॥ तयासि श्रीहरि प्रसन्न तो ॥ ॥ ३ ॥ तुळसीची कीर्ति अगाध पैं आहे ॥ पंढरीसि पाहे ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ ९९७ ॥ ऐसा आज्ञापी भक्तांसी आपण ॥ त्यागा अभिमान तुम्हीं जाणा ॥ १ ॥ जाणावें प्रत्यक्ष स्वरूप सगुण ॥ सर्व नारायण तोचि

दिसे ॥ २ ॥ दिसे गोपाळांसी गोपिकांसहित ॥ आनंदें डुल्लत ह्मणे नामा ॥ ३ ॥

॥ ९९८ ॥ केशव ह्मणतां जासी केशवपंथें ॥ त्याहुनी सरतें आणिक नाहीं ॥ १ ॥ वेद कां पढसी शास्त्र कां सांगसी ॥ उंदड वाचसी हरी ह्मणतां ॥ २ ॥ पहा याहुनियां आन नाहीं दुसरें ॥ भीष्में युधिष्ठिर उपदेशिला ॥ ३ ॥ नामा ह्मणे धरी केशवीं विश्वास ॥ तरसी गर्भवास नामें एका ॥ ४ ॥

॥ ९९९ ॥ कल्मष हरती जयाचेनि नामें ॥ तें विसरोनी काय करावें ॥ १ ॥ संसारतारक विसांवा हरि ॥ गर्भवास चुकवील तो मुरारि ॥ २ ॥ बाह्या उभारोनि घेतां राम नामा ॥ वैकुंठींचा देव केशव परमात्मा ॥ ३ ॥

॥ १००० ॥ कांडितांचि कोंडा न निघे तांदूळ ॥ शेरा कैंचें फळ अमृताचें ॥ १ ॥ कण्हेरीच्या मूळा सुगंध तो नाहीं ॥ कसावाची गाई जिणें कैचें ॥ २ ॥ रुईदूध जरी येईल भोजना ॥ लोभियाच्या धना वेंच नाहीं ॥ ३ ॥ निर्फळ हें जिणें भक्तिविण मन ॥ नामा ह्मणे जाण नये कामा ॥ ४ ॥

॥ १००१ ॥ करीना साधन जीवासी बंधन ॥ कोणे काळीं मन नोहे शुद्ध ॥ १ ॥ करूं जातां तप अभिमानरूप ॥ त्रिविधादि ताप कैसा निवे ॥ २ ॥ नित्यानित्य करी विवेक आपण ॥ तेणें अभिमान वाढतसे ॥ ३ ॥ नामा ह्मणे जन्म विसरोनियां गेलों ॥ मरोनि राहिलों देहातीत ॥ ४ ॥

॥ १००२ ॥ गुळ गोड नलगे ह्मणावा ॥ तैसा देव नलगे वानावा ॥ १ ॥ सेवी तोचि चवी जाणें ॥ येरा सांगतां लाजिरवाणें ॥ २ ॥ नामा ह्मणे या खुणा ॥ तुह्मीं ओळखा पंढरिराणा ॥ ३ ॥

॥ १००३ ॥ चंद्रभागेतीरीं उभा राहिलासी ॥ भक्तांचे मानसीं भावमात्र ॥ १ ॥ काय पुंडलीकें केल्या तपराशी ॥ जाणोनी मानसीं भावमात्रें ॥ २ ॥ भावेंविण देव सर्वथा नातुडे ॥ नेणती बापुडे बद्धजन ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझें माहेर पंढरी ॥ भेटती महाद्वारीं संतजन ॥ ४ ॥

॥ १००४ ॥ धीर धरी सत्य हेंतो नारायणा ॥ शुद्ध आचरणां न सांडावें ॥ १ ॥ लौकिकाची कांहीं न धरावी लाज ॥ हेंचि नीज काज साधावें तें ॥ २ ॥ दंभ अभिमान सर्व त्यजोनीयां ॥ शरण त्या सखीया जावें

आतां ॥ ३ ॥ निंदा करिती तो मानावा आदर ॥ स्तुति तें उत्तर नायकावें ॥ ४ ॥ न धरावी चाड मानासन्मानाची ॥ आवडी भक्तीची रूढवावी ॥ ५ ॥ नामा ह्मणे हेंचि रूढवावें मानसीं ॥ क्षण एक नामासी विसंबूं नये ॥ ६ ॥

॥ १००५ ॥ पूर्ण परिपूर्ण पंढरी हे पेंठ ॥ आपण वैकुंठ समचरण ॥ १ ॥ ऐसें कांहीं करा नाम हेंचि धरा ॥ विठ्ठल अपारा जप करा ॥ २ ॥ करितां साधन नागवी अहंकार ॥ विठ्ठल उच्चार पुण्य ओघें ॥ ३ ॥ नामा ह्मणे घेई विठ्ठल कुळदेवो ॥ सर्व हाचि भावो केशव ऐसा ॥ ४ ॥

॥ १००६ ॥ पहा परदारा जननिये समान ॥ परद्रव्य पाषाण ह्मणोनि मानी ॥ १ ॥ निंदेसी तूं मुका होऊनि तत्वतां ॥ परद्रेषीं निरुतां न घालीं दृष्टि ॥ २ ॥ ऐसें दृढ मनीं धरूनि राहसी ॥ तरी माझें पावसी निजपद ॥ ३ ॥ पराकारणें प्राण वेंची जो सर्वथा ॥ जाणे परव्यथा कळवळोनी ॥ ४ ॥ परसुख संतोष धरी जो मानसीं ॥ जरी परलोकासी जाणें आहे ॥ ५ ॥ देहाचा अभिमान न धरावा चित्तीं ॥ धरावी उपरति उपशमु ॥ ६ ॥ सर्वकाळ प्रीति संतांची संगति ॥ गावीं अनुरागें प्रीति नामें माझीं ॥ ७ ॥ सर्वांभूतीं सर्वदा ऐसी समबुद्धि ॥ सांडावी उपाधि प्रपंचाची ॥ ८ ॥ सर्वकाळ परमात्मा आहे सर्वदेशीं ॥ हे भावना अहर्निशीं दृढ धरी ॥ ९ ॥ संतसमुदाय मिळती जेथें जेथें ॥ जावें तेथें तेथें लोटांगणीं ॥ १० ॥ चिंता न करी नाम्या येणें तरसी जाण ॥ तुज सांगितली खूण निर्वाणींची ॥ ११ ॥

॥ १००७ ॥ लव निमिष ह्मणतां आहे नाहीं पाहतां ॥ क्षण एक संपादितां विषयो हा ॥ १ ॥ स्वहित तें आचरा हित तें विचारा ॥ नामीं भाव धरा जाणतेंनो ॥ २ ॥ संपत्तीचे बळें एक जाहले आंधळे ॥ वेढिलें कळिकाळें स्मरण नाहीं ॥ ३ ॥ एक विद्यावंत जातीचा अभिमान ॥ ते नेले तमोगुणें रसातळां ॥ ४ ॥ मिथ्या माया मोह करूनि हव्यास ॥ वेंचिलें आयुष्य वायां वीण ॥ ५ ॥ नामा ह्मणे कृपा करूनि ऐशा जीवा ॥ सोडवी केशवा मायबापा ॥ ६ ॥

॥ १००८ ॥ सर्व पाप पुण्य हींचि दोन्हीं भांडीं ॥ विवेक न सांडी येतां जातां ॥ १ ॥ तुझें नाम तारू तुझें नाम तारू ॥ तुझें नाम तारू

श्रीविठ्ठला ॥ २ ॥ विष्णुदास नाम्यानें उभारिली शिडी ॥ ठाकावया पेढी वैकुंठीची ॥ ३ ॥

॥ १००९ ॥ स्वप्नींचिया परी देखसी अभ्यास ॥ न धरीच विश्वास चित्त तुझें ॥ १ ॥ वांझेचिया स्तनीं अमृताची धणी ॥ मृगजळ पाणी तान्हा बोले ॥ २ ॥ तरी प्रेमावीण फळती क्रियाकर्म ॥ हातां येतीं वर्में विठोबाचीं ॥ ३ ॥ दृष्टीतें देखणें श्रवणीं ऐकणें ॥ मनाचें बैसणें एक होय ॥ ४ ॥ नामा ह्मणे तरीच विठो येऊन भेटे ॥ कावळ पालटे कैवल्य होय ॥ ५ ॥

॥ १०१० ॥ जय विठ्ठल श्रीविठ्ठल ॥ जय जय विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥ परब्रह्म विठ्ठल मूर्ति विठ्ठल ॥ निरंजन विठ्ठल ॥ २ ॥ जोचि नाम तोचि देवो ॥ ऐसें ह्मणों तरी नाहीं संदेहो ॥ ३ ॥ ह्मणे विष्णुदास नामा ॥ तो नेईल परत गामा ॥ ४ ॥

॥ १०११ ॥ तप थोर देखिले संसारीं ॥ जो अखंड कीर्तन करी ॥ त्याच्या तपा पुढारिलें हरि ॥ हें निर्धारें जाणा हो ॥ १ ॥ धन्य धन्य विष्णुदास ॥ ऐसा हरिनामीं सौरस ॥ ते पितरासहित वैकुंठ ॥ सर्वकाळ क्रमिती ॥ २ ॥ जप तप ज्ञान विठ्ठल ॥ तयासी नाहीं काळवेळ ॥ टाळी वाजवितांचि निर्मळ ॥ महादोष हरतील ॥ ३ ॥ जेथें रामकृष्ण उच्चार ॥ सकळ मंत्रांत मंत्रसार ॥ पांचांही वदनीं शंकर ॥ नित्य रामनाम जपतसे ॥ ४ ॥ तो हा पुंडलीकें उभा केला ॥ आपण दृष्टि समोर बैसला ॥ कीर्तनें त्रैलोक्य तारिला ॥ स्नानदानें पितरांसहित ॥ ५ ॥ नलगे करावे यज्ञयाग ॥ नलगे आणिक मंत्रलाग ॥ एक सेविलिया पांडुरंग ॥ अनंत तीर्थें घडतील ॥ ६ ॥ पंचक्रोषी प्रदक्षिणा ॥ नित्य नमस्कारी विठ्ठलचरणा ॥ तरी घडेल पृथ्वीप्रदक्षिणा ॥ कोटिच्या कोटि अनंत ॥ ७ ॥ सप्तपुरीं द्वादश लिंगें ॥ कीर्तनें डोलती लाग वेगें ॥ ऐसे भक्त तारिले पांडुरंगें ॥ विटेवरी उभा नीट राहोनी ॥ ८ ॥ नामा सांगे गुह्य गोष्टी ॥ विठ्ठल एक तारक सृष्टी ॥ पंढरी देखिलिया दृष्टी ॥ वैकुंठपद पाविजे ॥ ९ ॥

॥ १०१२ ॥ तप न करिसी जप हृषीकेशी ॥ नाम अहर्निशी राघोबाचें ॥ १ ॥ तीर्थाचें हें तीर्थ नाम हें समर्थ ॥ होईल कृतार्थ रामनामीं ॥ २ ॥ साधेल साधन तुटेल बंधन ॥ वाचे नारायण सुफळ सदां ॥ ३ ॥ नामा ह्मणे हरिनाम तें उच्चारी ॥ तरीच उद्धारी इह लोकीं ॥ ४ ॥

॥ १०१३ ॥ ताकहि पांढरें दूधहि पांढरें ॥ चवी जेवणारे जाणवीते ॥ १ ॥ केळाच्या पाठीवर ठेविला दोडका ॥ तोहि ह्मणे विका तेणें मोलें ॥ २ ॥ ढोर ह्मणती आह्मा हाकारे लास ॥ वारुवा सरसे खाऊं द्या घांस ॥ ३ ॥ मंदल्याजेती घरोघरीं गाती ॥ धृपदासाठीं ताक मागती ॥ ४ ॥ नामा ह्मणे सोपीं कवित्वें झालीं फुका ॥ हरि हरि ह्मणा आपुलिया सुखा ॥ ५ ॥

॥ १०१४ ॥ परब्रह्ममूर्ति सांवळें सगुण ॥ पंढरी निधान वाळुवंटीं ॥ १ ॥ आनंद अमृत बोळला दरुशनें ॥ तुटेल बंधन हेळामात्रें ॥ २ ॥ नामा ह्मणे नको नामीं सदां मन ॥ उभा नारायण भेटी पुरे ॥ ३ ॥

॥ १०१५ ॥ पंढरी ज्ञानिया ध्यातां लक्षा नये ॥ आह्मां वाट पाहे अनाथांची ॥ १ ॥ जपकांचे जाप्य नानामंत्रमय ॥ आह्मां भक्ति प्रिय भावें-सारी ॥ २ ॥ पुंडलीकासाठीं बोलली वोरसें ॥ नेणों काय कैसें प्रेम त्याचें ॥ ३ ॥ नामा ह्मणे जीवें करूं निंबलोण ॥ झणीं नारायण दिठावसी ॥ ४ ॥

॥ १०१६ ॥ भुक्ति मुक्ति सिद्धि यावया कारणें ॥ सेवकासी देणें पांडुरंगा ॥ १ ॥ ऐसिया तुज सांगणें आपणातें ह्मणविती ॥ तया अधो-गति कल्पकोडी ॥ २ ॥ देहो सरल्या मिळे ज्योतीस ज्योति ॥ ऐसें ह्मणतां किती सितरिले ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें नाशिवंत शरीर ॥ पूजा हरिहर एक वेळां ॥ ४ ॥

॥ १०१७ ॥ बाळपणीं वर्षें बारा ॥ तें तुझीं गेलीं रे अवधारा ॥ तैं तूं धांवसी सैरा ॥ खेळाचेनि विनोदें ॥ १ ॥ ह्मणवोनि आहेस नागर तरुणा ॥ तंव वोळगे रामराणा ॥ आलिया ह्मातारपण ॥ मग तुज कैंची आठवण ॥ २ ॥ तुज भरलीं अठरा ॥ मग तूं होसी निमासुरा ॥ पहिले पंचवी-सीच्या भरा ॥ झणें गव्हारा भुलसी ॥ ३ ॥ आणिक भरलिया सात पांचा ॥ मग होसी महिमेचा ॥ गर्वें खिळेल तुझी वाचा ॥ देवा ब्राह्मणातें न भजसी ॥ ४ ॥ त्वचा मांस शिरा जाळी ॥ बांधोनि हाडांची मोळी ॥ लेखितोसि सदां काळीं ॥ देहचि रत्न आहे माझें ॥ ५ ॥ बहु श्रम या शिराचा रे ॥ ह्मणे मी मी तारुण्याच्या भरें ॥ ऐसा संशय मनाचा रे ॥ तूं संडी रे अज्ञाना ॥ ६ ॥ माथवीय पडे मासोळी ॥ ते ह्मणे मी आहें प्रबळ जळीं ॥ तैसी विषयाच्या पाल्हाळीं ॥ भूललासिरे गव्हारा ॥ ७ ॥ तुज भरलिया साठीं ॥ मग तुझ्या हातीं येईल काठीं ॥ मग ती अडोरे लागती ॥ ह्मणती बागूल आला रे ॥ ८ ॥

ह्मणती थोररे म्हातारा ॥ कानीं झालासि बहिरा ॥ कैसें न ऐकसी परिकरा ॥ नाम हरिहरांचें ॥ ९ ॥ दांतांची पाथी उठी ॥ मग चाववेना भाकर रोटी ॥ नाक लागलें हनुवटी ॥ नाम होटीं न उच्चारवे ॥ १० ॥ बैसोनी उंवरवटिया तळवटी ॥ आया बाया सांगती गोष्टी ॥ ह्मणती म्हातारा बैल दृष्टी ॥ कैसा अक्षयीं झाला गे ॥ ११ ॥ खोकलिया येतसे खंकारा ॥ ह्मणती रांडेचा म्हातारा ॥ अझूनि न जाय मरण द्वारां ॥ किती दिवस चालेल ॥ १२ ॥ ऐसा जाणोनि अवसर ॥ वोळगा वेगें सारंगधर ॥ विष्णुदास नामया दातार ॥ वर विठ्ठल पंढरीये ॥ १३ ॥

॥ १०१८ ॥ पंढरीची वारी करील जो कोणी ॥ त्याच्या चक्रपाणी मागें पुढें ॥ १ ॥ लोखंड असतां सोनें झालें कैसें ॥ समागम मिषें गुणें त्याचा ॥ २ ॥ तैसें एक वेळ करी मायबापा ॥ चुकवी या खेपा चौऱ्यांशीं-च्या ॥ ३ ॥ नामा ह्मणे असो प्रारब्ध सरे ॥ होई कृपण नीकुरे चरणाचे ॥ ४ ॥

॥ १०१९ ॥ प्रपंच स्वार्थासि साधावया चांग ॥ वैराग्याचें अंग दाविसी जना ॥ १ ॥ अनुताप नित्य नाहीं कदांकाळीं ॥ मग संचिताची होळी कैसी होय ॥ २ ॥ पवित्र ते वाचा कां रे गमाविसी ॥ रामनाम न ह्मणसी अरे मूढा ॥ ३ ॥ नामा ह्मणे जीव कासया ठेवावा ॥ न भजतां केशवा मायाबापा ॥ ४ ॥

॥ १०२० ॥ संताचे घरीं जाइला पाहुणेर ॥ नामाचा वोगर वाढि-यला ॥ १ ॥ घ्यारे ताट भरी घ्यारे ताट भरी ॥ जेवा पोटभरी रामनाम ॥ २ ॥ पायरव होईल दुर्जना न सांगावें ॥ एकांतीं सेवावें ह्मणे नामा ॥ ३ ॥

॥ १०२१ ॥ जाखाई जोखाई उदंड दैवतें ॥ वाउगेचि व्यर्थ श्रम-तोसी ॥ १ ॥ अंतकाळीं तुज सोडविना कोणी ॥ एक्या चक्रपाणी वांचो-नियां ॥ २ ॥ मागें थोर थोर कोणें केलें तप ॥ उद्धरीलें अमूप नारायणें ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे बहु झालें भांड ॥ न उच्चारी लंड नाम वाचे ॥ ४ ॥

॥ १०२२ ॥ संसारसागर भरला दुस्तर ॥ विवेकी पोहणार विरला संत ॥ १ ॥ कामाचीया लाटा अंगीं आदळती ॥ नेणो गेले कीती पाहोनियां ॥ धृ० ॥ भ्रम हा भोंवरा फिरवी गरगरा ॥ एक पडिले धरा चौऱ्यांशींच्या ॥ २ ॥ नावाड्या विठ्ठल भवसिंधुतारूं ॥ भक्ता पैलपारू उतरीतो ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाम स्मरा श्रीरामाचें ॥ भय कळीकाळाचें नाहीं तुह्मां ॥ ४ ॥

॥ १०२३ ॥ कासवीचे दृष्टी जैं येईजे भेटी ॥ ते अमृताची वृष्टि घडे त्यासी ॥ १ ॥ तैसें हें भजन श्रीरामाचें ध्यान ॥ वाचे नारायण अमृतमय ॥ २ ॥ धन्य त्याचें कुळ सदां पैं सुफळ ॥ दिननिशीं पळ रामनाम ॥ ३ ॥ नामा ह्मणे चोखट भक्त तो उत्तमु ॥ वाचेसी सुगमु रामनाम ॥ ४ ॥

॥ १०२४ ॥ कृष्णकथा सांग जेणें तुटे पांग ॥ नलगे तुज उद्वेग करणें कांहीं ॥ १ ॥ समर्थ सोयरा राम हा निधान ॥ जनीं जनार्दन एक ध्याई ॥ २ ॥ नाम हेंचि सार नाम हेंचि सार ॥ तराल निर्धार श्रुति सांगे ॥ ३ ॥ नामा ह्मणे उच्चार रामकृष्ण सार ॥ तुटेल येरझार भवाब्धीची ॥ ४ ॥

॥ १०२५ ॥ निर्वाणींची हे सांगितली खूण ॥ कैवल्य चरण विठोबाचे ॥ १ ॥ वेद शास्त्र स्मृति वदती पुराणें ॥ पाहूनि जाणणें हेंचि सत्य ॥ २ ॥ क्रिया कर्म धर्म ज्यालागिं करणें ॥ ते खूण निर्वाण हेंचि असे ॥ ३ ॥ जप तप अनुष्ठान कां करिजे साधन ॥ तेंचि प्रत्यक्ष निधान हेंचि असे ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज कळलें अनुभवें ॥ न सोडी हे जीवें चरण तुझे ॥ ५ ॥

॥ १०२६ ॥ देह पडे तंव देहाचा अभिमान ॥ परि न करी अज्ञान आत्महित ॥ १ ॥ मी माझें ह्मणतां गेले नेणों किती ॥ रंक चक्रवर्ति असंख्यात ॥ २ ॥ क्षणक्षणा देह आयुष्य पैं काटे ॥ वासना ते वाढे नित्य नवी ॥ ३ ॥ मोहाचीं सोयरीं मिळालीं चोरटीं ॥ खाऊनि शेवटीं घर घेती ॥ ४ ॥ जोंवरी संपत्ति तंववरी हे सखे ॥ गेलीया तें भुंके सुणें जैसें ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशवा मी तों तुझा दास ॥ मज आहे विश्वास तुझ्या नामीं ॥ ६ ॥

॥ १०२७ ॥ गौळियाचे घरीं कैवल्याचे दानी ॥ परब्रह्म अंगणीं क्रीडतसे ॥ १ ॥ ऐसें कांहीं करा आलेनो संसारां ॥ जेणें जोडे सोईरा पांडुरंग ॥ २ ॥ करितां त्याचें काज मनीं न धरी लाज ॥ ह्मणे हे शरण मज सर्व भावें ॥ ३ ॥ राखे बळिचें द्वार पाहे त्याची वास ॥ ह्मणे हा माझा दास अंतरंगु ॥ ४ ॥ गौळियांचें उच्छिष्ट मनीं न धरि वीट ॥ आवडी निकट गोपाळांची ॥ ५ ॥ तरी क्रिया कर्म केलें होय सफळ ॥ जरी हृदयीं गोपाळ येऊनि राहे ॥ ६ ॥ येरी ते मायावी जग भुलवणी ॥ नित्य विभांडणी सर्व भावें ॥ ७ ॥ नामा ह्मणे ऐसे संतांचिये सोई ॥ विठोबाचे पायीं मन ठेवीं ॥ ८ ॥

॥ १०२८ ॥ संसाराचें दुःखसुख ह्मणो नये ॥ पुढें दुःख पाहे अनिवार ॥ १ ॥ तया दुःखा नाहीं अंतपार जाणा ॥ काळाची यातना बहुतां परी ॥ २ ॥ संसाराची चिंता वाहतां जन्म गेला ॥ सोस हा वाढला बहुतांपरी ॥ ३ ॥ हित ही बुडालें परत्र दुणावलें ॥ नरदेह बुडविले भजनावीण ॥ ४ ॥ भजनाचा प्रताप दुःख दूरी जाय ॥ जैसें अभ्र होय देशधडी ॥ ५ ॥ वायूच्या झुंझाटें वृक्ष उन्मळती ॥ परि माना गति तैसें दुःख ॥ ६ ॥ नामा ह्मणे नाम दुःखाचा परिहार ॥ सुखाचा अनिवार पार नाहीं ॥ ७ ॥

॥ १०२९ ॥ किती करिसी तीर्थाटणें ॥ मन भरलें अवगुणें ॥ १ ॥ काय करावें तें तप ॥ चित्तीं नाहीं अनुताप ॥ २ ॥ मनें संकल्पाचीं पापें ॥ न जाती तीर्थाचिया बापें ॥ ३ ॥ नामा ह्मणे वर्म सोपें ॥ पाप जाय अनुतापें ॥ ४ ॥

॥ १०३० ॥ आलेनो संसारा उठा वेगें चला ॥ जिवलग विठ्ठला भेटीलागीं ॥ १ ॥ दुर्लभ मनुष्य जन्म नलभे रे मागुता ॥ लाहो घ्या सर्वथा पंढरीचा ॥ २ ॥ भावें लोटांगण घाला महाद्वारीं ॥ होईल बोहरी त्रिविध तापा ॥ ३ ॥ श्रीमुखाची वास पहा धणीवरी ॥ आठवी अंतरीं घडिये घडिये ॥ ४ ॥ शुद्ध सुमनें कंठीं घाला तुळशीमाळा ॥ तनमन ओवाळा चरणांवरुनी ॥ ५ ॥ नामा ह्मणे विठो अनाथां कोवसा ॥ पुढती गर्भवासा येऊं नेदी ॥ ६ ॥

॥ १०३१ ॥ विषयासंगें रात्रीं जागे ॥ हरिकीर्तनीं झोंप लागे ॥ १ ॥ काय करूं या मनासी ॥ नाठवेचि हृषीकेशी ॥ २ ॥ दिवसा व्यापार चावटी ॥ रात्रीं कुटुंबचिंता मोठी ॥ ३ ॥ नामा ह्मणे कां आलासी ॥ भूमिभार जन्मलासी ॥ ४ ॥

॥ १०३२ ॥ एक अर्बुद शाण्णवकोटी माप ॥ तीन लक्ष दहासहस्र लेखा ॥ सातशें तीन मास पहा पहा तया ॥ हिरण्यकश्यपा काय झालें ॥ १ ॥ चौदा चौकडीया लंकानाथा ॥ नव्याण्णव सहस्र राया दशरथा ॥ येवढे गेले रे सिद्धपंथा ॥ येर सर्वथा नुरेची ॥ २ ॥ चौदा कल्प मार्कंडेय उपडे ॥ तैं एक रोमहर्षाचा रोम झडे ॥ बकदाल्भ्याचे निमिष मोडे ॥ येवढे गेलेरे जना ॥ ३ ॥ बकदाल्भ्याचे वेंचे आयुष्य ॥ तैं एक वटहंसाचा उपडे पीस ॥ वटहंसाचा मृत्युप्रवेश ॥ तैं एक श्वास भृशुंडीचा ॥ ४ ॥ मरणांतक

होय भृशुंडीचा ॥ तैं एक दिवस कूर्माचा ॥ नामा ह्मणे केशवाचा ॥ वेगी देवाचा पंथ धरा ॥ ५ ॥

॥ १०३३ ॥ गुरूच्या वचनें होईल पैं ज्ञान ॥ नकळे प्रेम खूण विठोबाची ॥ १ ॥ वेदीं हें विचारा पुराणातें पुसा ॥ विठोबाचा कैसा प्रेम भाव ॥ २ ॥ साधकासी सिद्धि होईल पै प्राप्ति ॥ नकळे निरुति प्रेम खूण ॥ ३ ॥ नामा ह्मणे सोडा जाणीवेचा सीण ॥ संताची हे खूण जाणे संत ॥ ४ ॥

॥ १०३४ ॥ घुबड बैसले किर्तनीं ॥ हरिगुण नाईकती कानीं ॥ १ ॥ घुबड पाहे भलतेकडे ॥ नाईके हरीचे पवाडे ॥ २ ॥ भवताल्या नर नारी ॥ तयांवरी दृष्टि करी ॥ ३ ॥ नामा ह्मणे सांगूं किती ॥ बेताळीस नरका जाती ॥ ४ ॥

॥ १०३५ ॥ पोटीं अहंतेसी ठाव ॥ जिव्हे सकळ शास्त्राचा सराव ॥ १ ॥ भजन चालिलें उफराटें ॥ कोण जाणें खरें खोटें ॥ २ ॥ सजिवासी हाणी लाथा ॥ निर्जीवपायीं ठेवी माथा ॥ ३ ॥ सजीव तुळसी तोडा ॥ पुजा निर्जीव दगडा ॥ ४ ॥ बेला करी तोडातोडी ॥ शिवा लाखोली रोकडी ॥ ५ ॥ तोंड धरून मेंढा मारा ॥ ह्मणति सोमयाग करा ॥ ६ ॥ सिंदुर माखूनिया धोंडा ॥ त्यासि भजती पोरें रांडा ॥ ७ ॥ अग्निहोत्राचा सुकाळ ॥ कुश पिंपळाचा काळ ॥ ८ ॥ मृत्तिकेची पूजा नागा ॥ जित्या नागा घेति डांगा ॥ ९ ॥ नामा ह्मणे अवघे खोटें ॥ एक हरिनाम गोमटें ॥ १० ॥

॥ १०३६ ॥ पलंगीं नारी बैसवुनी ॥ मायें हातीं वाहे पाणी ॥ १ ॥ ऐसा कलियुगीं आचार ॥ क्रियाभ्रष्ट झाले नर ॥ २ ॥ स्त्रीसी पाटावाची चोळी ॥ माता सिवती सोंवळीं ॥ ३ ॥ स्त्रियेचा कैवार वोढी ॥ मातेसी ह्मणे रांड वेढी ॥ ४ ॥ स्त्रीचें ऐकोनि उत्तर ॥ सख्या बंधूसि पाडी वैर ॥ ५ ॥ ह्मणे विष्णुदास नामा ॥ ऐसा कलियुगाचा महिमा ॥ ६ ॥

॥ १०३७ ॥ मुखीं नाम हातीं टाळी ॥ दया नुपजे कोणे काळीं ॥ १ ॥ काय करावें तें गाणें ॥ धिक् धिक् तें लाजिरवाणें ॥ धृ० ॥ हरिदास ह्मणोनि हालवी मान ॥ कवडीसाठीं घेतो प्राण ॥ २ ॥ हरिदासाचे पायीं लोळे ॥ केशीं धरोनि कापी गळे ॥ ३ ॥ नामा ह्मणे अवघे चोर ॥ एक हरिनाम हें थोर ॥ ४ ॥

॥ १०३८ ॥ सिबुर दावूनि बैसलें हातीं ॥ सांगतांहे गोष्टी जाणीवेच्या ॥ १ ॥ कापियेलें नाक झाले ते निःशंक ॥ वारे भुरभुरां देख वाजतसे ॥ धृ० ॥ दवडा दवडा परतें करील निंदा ॥ घ्यावा कां कांदा मुळींहुनी ॥ २ ॥ नामा विनवीतसे केशवातें सत्ता ॥ उरले सुरले आर्ता अवघे तासा ॥ ३ ॥

॥ १०३९ ॥ आपलें हित आपण नेणती ॥ पुढिलांतें सांगती बहु ज्ञान ॥ १ ॥ नेणोनि परब्रह्म जाणते झाले ॥ अभावीं गुंतले मायाजाळीं ॥ धृ० ॥ जीव आणि शीव एकरूप ह्मणती ॥ सेवेसी अंतरती केशवाचे ॥ २ ॥ नामा ह्मणे तोचि केशवातें जाणतां ॥ केशव ह्मणतां मुक्त होय ॥ ३ ॥

॥ १०४० ॥ हरिभक्ति आथिले तेचि उत्तम ॥ येर ते अधम अधमांहुनी ॥ १ ॥ हरिभक्तीं सप्रेम तेंचि तैसें नाम ॥ येर ते अधम अनामिक ॥ २ ॥ नामा ह्मणे जया नाहीं हरिसेवा ॥ ते जितची केशवा प्रेत जाण ॥ ३ ॥

॥ १०४१ ॥ कथे बैसोनि उठोनी जाती ॥ खर होऊनि फिरती ॥ १ ॥ नाम नावडे नावडे ॥ संग वैष्णवांचा न घडे ॥ २ ॥ नामा ह्मणे सांगों किती ॥ पूर्वजांसहित नरका जाती ॥ ३ ॥

॥ १०४२ ॥ देवीं धर्मीं नाहीं चाड ॥ त्यासि पुढें आली नाड ॥ १ ॥ जैसे डोंगरींचें झाड ॥ त्याचें जन्म झालें वाड ॥ २ ॥ नामा ह्मणे भक्ति गोड ॥ स्वानंद नेणती ते मूढ ॥ ३ ॥

॥ १०४३ ॥ अर्चन विष्णूचें नाहीं पूजन ॥ तये गांवीचे अनामिक जन ॥ भूतप्रेताचें करिती भजन ॥ तयासि दंडन करी यम ॥ १ ॥ हरीचे वांचोनि सुकृत करी ॥ तयां नांव पुण्य ठेविजे जरी ॥ तुटोनि पडो त्यांची वैखरी ॥ अंतीं महा अघोरीं वास तया ॥ २ ॥ समारंभ करिती आणिक देवाचा ॥ ह्मणती येणें विष्णु तृप्त होय साचा ॥ धिग धिग आचार जळो त्याचा ॥ वायावीण वाचा विटाळली ॥ ३ ॥ पहा हो नवही द्वारें एकचि देहीं ॥ रसस्वाद कान देतील कांहीं ॥ जयाचा मान तयाच्या ठायीं ॥ येतसे पाही सेवितां ॥ ४ ॥ जो देवदेवां शिरोमणि ॥ असुर रुळती जयाच्या चरणीं ॥ तो सांडिती चक्रपाणी ॥ भजना हातीं होईल तुझिया

॥ ५ ॥ विष्णुदास नामा विनवी जगा ॥ अझुनि तरी हरीसि शरण रिघा ॥ जे जे अपराध केले असतील मागा ॥ ते ते नेईल भंगा स्वामि माझा ॥ ६ ॥

॥ १०४४ ॥ हरिदासपणें उभवीला ध्वज ॥ परि तें वर्मबीज नकळेची ॥ १ ॥ काय करूं देवा जळो याची बुद्धि ॥ जोंवरी नाहीं शुद्धि परलोकाची ॥ २ ॥ मुद्रा धरूनि गळां घाली तुळसीमाळा ॥ परि नाहीं जिव्हाळा स्वहिताचा ॥ ३ ॥ धरी बहु वेष वृथा करी दोष ॥ नाम ब्रह्मरस अंगीं नाहीं ॥ ४ ॥ दुसरा हरिदास देखूनियां रंगीं ॥ धांवोनियां वेगीं ग्रासों पाहे ॥ ५ ॥ दुसरियाचे पद ऐकोनियां कानीं ॥ क्रोधें पेटे वन्हि पर्वतींचा ॥ ६ ॥ दुर्जनाचे भयें पळती साधुवृंदें ॥ जैसीं तीं श्वापदें व्याघ्रा भेणें ॥ ७ ॥ बोले नानायुक्ति वश करी सभा ॥ दुसरा रंगीं उभा राहों नेदी ॥ ८ ॥ राजमानें श्रेष्ठ मोठे अधिकारी ॥ त्यांपुढें कुसरी करिताती ॥ ९ ॥ घातमात करी नटे नानापरी ॥ चंचळ परनारी भुलवितो ॥ १० ॥ ऐसें नाम विटंबूनि करील जो हरिकथा ॥ तेणें परमार्था विघ्न केलें ॥ ११ ॥ जाई जुई उत्तम सुगंध कस्तुरी ॥ विष्टेच्या दाथरीं आंथुरिला ॥ १२ ॥ साडेपंधरा सोनें होतें पालवण्या ॥ परि झालें हीण डांक लागें ॥ १३ ॥ द्यावें दिव्यौषध रोगियाचें हित ॥ केलिया कुपथ्य वांया जाय ॥ १४ ॥ चतुर्विध अन्न षड्रस पक्वान्नें ॥ विटाळलें जाण श्वानमुखें ॥ १५ ॥ ऐसें ह्मणतां माझी मळेल पैं वाचा ॥ परि या वैष्णवांचा धर्म नव्हे ॥ १६ ॥ संसारसागरु हरिकथा तारूं ॥ तरिजे तो विचारू दूरी ठेला ॥ १७ ॥ जे कथा ऐकती पसरोनि बाह्या ॥ शांति क्षमा दया येती तेथें ॥ १८ ॥ शांति क्षमा दया येती भेटावया ॥ तेथें मोक्ष व्हावया विलंब काय ॥ १९ ॥ आनंद नामाचा ऐकूनि गजर ॥ ब्रह्मादिक हरिहर येती तेथें ॥ २० ॥ खुंटला अनुवाद मावळला शब्द ॥ अनिर्वाच्य बोध प्रगटला ॥ २१ ॥ वैकुंठ सांडून धांवे चक्रपाणि ॥ कीर्तनाचा ध्वनि ऐकूनियां ॥ २२ ॥ तेथें श्रोते वक्ते होतील निःशाप ॥ ऐशी पुण्यरूप हरिकथा ॥ २३ ॥ शून्याचें निःशून्य जेथें हरपलें ॥ एकाग्र मन झालें ध्यान तेथें ॥ २४ ॥ नामा ह्मणे माझी हरिकथा माउली ॥ मोक्षपान्हा घाली भक्तांलागीं ॥ २५ ॥

॥ १०४५ ॥ अवचट देह लाधला प्राणिया ॥ भक्तिवीण वायां गेला जाण ॥ १ ॥ धिक् त्याचें जिणें जन्मला कासया ॥ जरी पंढरिराया विसरला ॥ २ ॥ रामनामीं रत नव्हेचि बापुडें ॥ जननिये सांकडें घातलें

तेणें ॥ ३ ॥ ऐसा जन्म नको नको गा श्रीरामा ॥ ह्मणे तुझा नामा विष्णुदास ॥ ४ ॥

॥ १०४६ ॥ आपुली करणी न विचारी मनीं ॥ वायां काय ठेवूनि बोल जिवा ॥ १ ॥ खाटकी जो चेपी पशूची नरडी ॥ अवचिता करंगळी सांपडली ॥ २ ॥ मेलों मेलों ह्मणूनि गडबडां लोळे ॥ परि कापी गळे आठवीना ॥ ३ ॥ आपुलें ह्मणवुनि विव्हळतसे ॥ खदखदां हांसे दुसऱ्यासीं ॥ ४ ॥ वाटपाड्यानें घर खाणोनि घेतलें ॥ जितुकें मेळविलें तितुकें नेलें ॥ ५ ॥ आपुलें नेलें ह्मणऊनि खळखळां रडे ॥ परि घेतां दरवडे आठवीना ॥ ६ ॥ सोनाराचे घरीं पडिलेसें खाण ॥ चोरिलें सुवर्ण तेंहि नेलें ॥ ७ ॥ आपुलें नेलें ह्मणऊनि मोकलितो धाया ॥ ठकविल्या आयाबाया तें आठवीना ॥ ८ ॥ तराळाचे घरीं आला असे जेव्हां ॥ ह्मणतसे देवा काय करूं ॥ ९ ॥ दुसऱ्यासी मागतां परम सुख वाटे ॥ आपण देतां फुटे काळीज तें ॥ १० ॥ जन्मवरी पोशिलें लेंकुराचे परि ॥ हातीं घेऊनि सुरी उभा राहे ॥ ११ ॥ गर्दन सुळी देतां ह्मणे काय केलें ॥ पुढिल्यासि मारिलें आठवीना ॥ १२ ॥ नामा ह्मणे विष्णुदास ऐसे जे निर्लज्ज ॥ त्यांसी पंढरिराज केंवि भेटे ॥ १३ ॥

॥ १०४७ ॥ भक्त विठोबाचे भोळे ॥ त्याचे पायीं ज्ञान लोळे ॥ १ ॥ भक्तिवीण शब्दज्ञान ॥ व्यर्थ अवघें तें जाण ॥ २ ॥ नाहीं ज्याचे चित्तीं भक्ति ॥ जळो तयाची व्युत्पत्ति ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें जाण ॥ नाहीं भक्तासी बंधन ॥ ४ ॥

॥ १०४८ ॥ यज्ञादिक कर्म करूनि ब्राह्मण ॥ दंभ आचरण दावी लोकां ॥ १ ॥ लोकांसी दाविती मीच कर्मनिष्ठ ॥ अभिमान खोटा वागविती ॥ २ ॥ वागविती वाक्य जाण ऋषेश्वर ॥ नको येरझार नानामतें ॥ ३ ॥ नानामतें अधोऊर्ध्वसात जावीं ॥ नको गोवागोवीं नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १०४९ ॥ खाटिकाप्रमाणें करिसी व्यापार ॥ मनीं निरंतर धरोनियां ॥ १ ॥ दुष्ट दुराचारी दुर्बळ घातकी ॥ परम नाशकी पापिष्ट तो ॥ २ ॥ अपमानीं आशा धन मेळविसी ॥ अंतीं नरकासि जासी जाण सत्य ॥ ३ ॥ नामा ह्मणे जाण करूं मोटयाळें ॥ जाऊनियां लोळे विष्टेमाजीं ॥ ४ ॥

॥ १०५० ॥ कांचनीक भक्ति सर्वकाळ करी ॥ बहुतांचे वैरी हित नेणें ॥ १ ॥ लोकांपुढें सांगे आह्मी हरिभक्त ॥ न होय विरक्त स्थिति ज्याची ॥ २ ॥ असंतोषी सदां अतितासी जाळी ॥ सुकृताची होळी स्वयें केली ॥ ३ ॥ वेदमर्यादा सांडूनि चालती ॥ हुंबतें घेती वाऱ्यासवें ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां असो याचि मात ॥ सुख नेणें हित कदां काळीं ॥ ५ ॥

॥ १०५१ ॥ अभक्ताचे स्थळीं भ्रांताचे संगती ॥ परदारा चित्तीं परनिंदा ॥ १ ॥ नेणें भूतदया शांतीचें लक्षण ॥ कार्या कारण बोलतसे ॥ २ ॥ हरीचिया दासां सर्वदां मत्सर ॥ करी निरंतर द्वेशबुद्धि ॥ ३ ॥ नामा ह्मणे व्यर्थ पेटला पर्वत ॥ नेणें अपघात स्वयें पावे ॥ ४ ॥

॥ १०५२ ॥ गोमुखी गोवूनि काय जपतोसी ॥ जपतप त्यासी विघ्न करी ॥ १ ॥ नामसंकीर्तनीं जळतील पापें ॥ चुकतील खेपा चौऱ्यांशींच्या ॥ २ ॥ उपवास करी उग्र अनुष्ठानी ॥ तया चक्रपाणी अंतरतो ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे बहुतेक प्राणी ॥ पचतील खाणी भ्रष्टलोक ॥ ४ ॥

॥ १०५३ ॥ उपाय असतां अपाय मानिती ॥ तया अधोगति न चुकती ॥ १ ॥ मनुष्या माझारी तो एक गाढव ॥ तया अनुभव काय करी ॥ २ ॥ नामा ह्मणे देव ऐसियासी कैसा ॥ काया मनें वाचा भेदवादी ॥ ३ ॥

॥ १०५४ ॥ मुखीं नाहीं नाम ॥ काय जपतो श्रीराम ॥ १ ॥ काय आसन घालून ॥ मुखीं नाहीं नारायण ॥ २ ॥ टिळे टोपी माळा दावी ॥ भोळ्या भाविकांसि गोवी ॥ ३ ॥ नामा ह्मणे त्याचा संग ॥ नको चित्ता होय भंग ॥ ४ ॥

॥ १०५५ ॥ दुर्जनाची बुद्धि वोखटी दारुण ॥ आपण मरून दुजा मारी ॥ १ ॥ माशी जातां पोटीं मेली तेचि क्षणीं ॥ प्राण्या वोकवूनि कष्टीं करी ॥ २ ॥ दीपकाची ज्योति पतंग नासला ॥ अंधार पडिला जनामध्यें ॥ ३ ॥ तैसा नैसर्गिक स्वभाव दुष्टाचा ॥ शेवीं ज्याचा त्यासी फळा येतो ॥ ४ ॥ झाली सज्जनाची संगति कदापि ॥ जाईना तथापि त्याची क्रिया ॥ ५ ॥ सहज मळले घुतां शुद्ध होय ॥ विषयाचा काय डाग जातो ॥ ६ ॥ वज्रहि फुटेल नभहि तुटेल ॥ भला तो होईल ऐसा जाणा ॥ ७ ॥ नामा ह्मणे कुंभपाकीचा तो धनी ॥ तयासीं भल्यांनीं बोलूं नये ॥ ८ ॥

॥ १०५६ ॥ युगें गेलीं जरी अपारें ॥ भूमीसि न मिळती खापरें ॥ १ ॥ ऐसीं पापियांचीं मनें ॥ स्थिर न होती कीर्तनें ॥ २ ॥ श्वान घातलें पालखीं ॥ वरतीं मान करूनि भुंकी ॥ ३ ॥ सूकर चंदनें चर्चिला ॥ पुढती गवसी चिखला ॥ ४ ॥ गाढव न्हाणियला तीर्थीं ॥ लोळे उकरांडियाप्रती ॥ ५ ॥ नामा ह्मणे युगें गेलीं ॥ खोडी नसांडिती आपुली ॥ ६ ॥

॥ १०५७ ॥ ऐका कलियुगींचा आचार ॥ अधर्मपर झाले नर ॥ १ ॥ मंचकावरी बैसे राणी ॥ माता वाहतसे पाणी ॥ २ ॥ स्त्रियेसी अलंकार भूषण ॥ माता वळीतसे शेण ॥ ३ ॥ स्त्रियेसी पाटावाची साडी ॥ माता नेसे चिंध्या लुगडीं ॥ ४ ॥ सासुसासऱ्या योग्यमान ॥ मायबापा न घाली अन्न ॥ ५ ॥ साळी सासवा आवडती ॥ बहीणभावां तोंडीं माती ॥ ६ ॥ स्त्रियेसी एकांतगोडी ॥ मातेसी ह्मणे रांड वेडी ॥ ७ ॥ ह्मणे विष्णुदास नामा ॥ ऐसा कलियुगींचा महिमा ॥ ८ ॥

॥ १०५८ ॥ वेदांवेगळें कर्म करी ॥ मनीं पाखंड धरी ॥ तो पचिजे अघोरीं ॥ चिरकाळ वरी ॥ १ ॥ तो न आणावा पैं दृष्टी ॥ तोचि दोषी एक या सृष्टीं ॥ तो होईल महा कष्टी ॥ हरीसि न भजतां ॥ २ ॥ संध्या स्नान नेणे दान ॥ नेणे हरिकथा श्रवण ॥ तोहि एक पतीत जाण ॥ महा पातकी चांडाळ ॥ ३ ॥ सांडुनि ब्राह्मणपण ॥ शूद्ररीती आचरण ॥ तो दृष्टी पडलिया जाण ॥ महादोष घडेल ॥ ४ ॥ निंदा करी जो संतांची ॥ पूजा नेणे जो देवाची ॥ तोचि राशि पापाची ॥ प्रत्यक्ष जाणावी ॥ ५ ॥ तीर्थ न करी हिंडतां ॥ व्रत न करी बोलतां ॥ पुराण नायके पाहतां ॥ तो तंव राक्षस जाणावा ॥ ६ ॥ सदां अमंगळ अशुची ॥ गुरुआज्ञा भंगी साची ॥ अखंड निंदा करी संतांची ॥ तो स्वामि द्रोही जाणावा ॥ ७ ॥ कपट शिके नानाविध ॥ गोत्रजांशी करी विरोध ॥ तो जाणावा हें प्रसिद्ध ॥ महापातकी चांडाळ ॥ ८ ॥ गृहदारावरी नाहीं चित्त ॥ परस्त्रियेची करी स्तुत ॥ तो प्रत्यक्ष महा दैत्य ॥ त्याचे मुख पाहों नये ॥ ९ ॥ नाठवी जो कां उपकार ॥ स्वामीसी न करी जो नमस्कार ॥ तो जन्मांतरीचा होय नर ॥ पतीत चांडाळ बोलिजे ॥ १० ॥ पाखांड रची कवित्व ॥ माता पितियाचे नकरी महत्व ॥ पंच पातकी जीवित्व ॥ तो पूर्वीचा बोका होता ॥ ११ ॥ नामा ह्मणे तैसे दोषी ॥ न आणावे पंढरीसी ॥ काय करावे ते पाषाण जन्मासी ॥ जे विठ्ठलनामासी मिळतीना ॥ १२ ॥

॥ १०५९ ॥ सोंवळीं पिळूनि कां घालिशी ॥ मुद्रेनें आंग कां जाळिशी ॥ १ ॥ कासया केली खोडी ॥ काया विटंबिली बापुडी ॥ २ ॥ कावळा प्रातःस्नान करी ॥ जितें मेलें तें न विचारी ॥ ३ ॥ मैंदें लावूनि द्वादश टिळे ॥ तो फांसां घालूनि निवटी गळे ॥ ४ ॥ सुसरी गंगे रहिवासु ॥ बहुतां जीवांतें करी ग्रासु ॥ ५ ॥ गंगे गेल्या ज्ञान सांगें ॥ मांजर मारिलें तें न सांगे ॥ ६ ॥ बक ध्यान लावूनि टाळी ॥ मौन धरूनियां मासा गिळी ॥ ७ ॥ नामा ह्मणे केशिराजा ॥ ऐशिया जीवा लावी वोजा ॥ ८ ॥

॥ १०६० ॥ कांहीं सांगोनि गेले वचना ॥ कृष्ण उपदेशी पंडुनंदना ॥ येथें राहतां पाविजे बंधना ॥ थोर वर्तमान कलियुगीं ॥ १ ॥ ये कलि-माझारीं ॥ पुत्र पित्याचे वैरी ॥ घरची माता होय कामारी ॥ पुरुषांतें नारी अव्हेरिती ॥ २ ॥ न येती वृक्षा फळें आटती धेनु ॥ न पिके मही न वर्षे घनु ॥ यापरी आटेल सकळ जनू ॥ ऐसें जगज्जीवनू बोलिले ॥ ३ ॥ आणिक एक वर्तेल अपवित्र ॥ ब्राह्मण सांडितील वेदमंत्र ॥ आचार सांडूनि होती शूद्र ॥ ऐसे अपवित्र कलियुगीं ॥ ४ ॥ थोर वर्तमान पडेल काळु ॥ चहूं वर्णांचा होईल एकचि मेळु ॥ कोणी कोणाचा न धरिती विटाळु ॥ मग गोपाळु निघते झाले ॥ ५ ॥ आतां वेळोवेळां सांगों किती ॥ मोडला धर्म झाली प्रवृत्ति ॥ विष्णुदास नामा येतो काकुळती ॥ कैसेनि करूं भक्ति पंढरिराया ॥ ६ ॥

॥ १०६१ ॥ गृहस्थ बैसला ओसरीवरी ॥ गृहस्वामिणी स्वयंपाक करी ॥ तंव मार्गस्थ ब्राह्मण आला द्वारीं ॥ अन्न द्यावें स्वामिया ॥ १ ॥ पडली कुऱ्हाड कपाळी ॥ रागें सूप चाटु आफळीं ॥ जळत काष्टातें हातीं कवळी ॥ जैसी आसाळी गर्जतसे ॥ २ ॥ ब्राह्मणें घेतलें धरणें ॥ तंव बाईलेसी गेला शरण ॥ ह्मणे माझ्या ग्रासांतून ग्रास देणें ॥ लज्जा राखणें आजिची ॥ ३ ॥ मग ह्मणे वो बाईल ॥ कैंचा आलासे वईल ॥ तुजसारिखा असेल ॥ बैलासि बैल सोईरे ॥ ४ ॥ गृहस्थें धांवोनि धरिली वेणी ॥ तिनें शेंडीस हात घालोनी ॥ अंगजुठ होऊनि ॥ बाईल हुमण्या मारितसे ॥ ५ ॥ साचे मागें सुटली शेंडी ॥ सर्वेचि धरिलासे अंडीं ॥ पडिली असे मुर्कुंडी ॥ तोंडिच्या तोंडीं मारीतसे ॥ ६ ॥ शेजारीं व्याही होता तो धांवला ॥ येतांचि तोंडावरी मारिला ॥ चौकीचा दांत पाडिला ॥ केला बोचिरा

व्याही तो ॥ ७ ॥ आधींच व्याही होते रोडके ॥ आणि हाणी तल्पठाण वई-च्या बुडखें ॥ निथळत निथळत बोडकें ॥ घेऊनि सुडके पुसितसे ॥ ८ ॥ तिकडूनि धांवला मेहुणा ॥ तोहि पाडिला उताणा ॥ केला तिनें घोळाणा ॥ तया मेहुण्याचा ॥ ९ ॥ ब्राह्मणाकडे दांत रगडी ॥ तंव ब्राह्मण हळु हळु पाय काढी ॥ ओल्या धोतराची घेऊनि घडी ॥ पळतां वेंगडी वळतसे ॥ १० ॥ ऐसा ओलांडिला दारवंटा ॥ तंव धाविन्नली पाठोवाटा ॥ सीण घालून हाणिल्या बरोटा ॥ कोठें थोड्या पळसील ॥ ११ ॥ ऐसा कलियुगीं स्त्रियांचा विचार ॥ एक बुडविती बेताळीस नर ॥ एक दाविती स्वर्गींचें द्वार ॥ नामा निरंतर विनवीतसे ॥ १२ ॥

॥ १०६२ ॥ तारुण्याच्या मदें न बोलें कोणासी ॥ सदां मुसमुसी रीस जैसा ॥ १ ॥ आटूनि वेंटूनि बांधितो मुंडासा ॥ फिरतसे ह्मैसा जगामाजीं ॥ २ ॥ हातीं दिंडपान लावूनियां ताठा ॥ फिरतो करंटा विषयबुद्धि ॥ ३ ॥ श्वानाचियेपरी हिंडे दारोदारीं ॥ इच्छी परनारी पापदृष्टि ॥ ४ ॥ भंगिजेल रूप पाहे आरशांत ॥ विचकोनि दांत पाहतसे ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसे तारुण्याचे संगें ॥ आलें जाण मग वृद्धपण ॥ ६ ॥

॥ १०६३ ॥ यम सांगे दूतां ॥ तुह्मीं जावें मृत्युलोका ॥ आपुलाला लोक जितुका ॥ तितुका आणावा ॥ १ ॥ तुह्मां सांगतों कुळरंग ॥ निंदा द्वेष करिती राग ॥ खरी खोटी चाहडी सांगे ॥ तें कुळ आपुलें ॥ २ ॥ ज्याचें विषयावर ध्यान ॥ परद्रव्य परस्त्रीगमन ॥ धर्मासी विन्मुखपण ॥ तें कुळ आपुलें ॥ ३ ॥ भावेवीण भक्ति करिती ॥ भक्तिवीणें भाव दाविती ॥ त्यांची तुह्मीं फजिती ॥ बहुतां प्रकारें करावी ॥ ४ ॥ मंत्रसंचारी जे लोक ॥ देव सांडुन देवताउपासक ॥ झोटिंग वेताळ खेताळ देख ॥ ते सखे बाप तुमचे ॥ ५ ॥ लटिके वासनेच्या नवसा ॥ करिती करविती पशुहिंसा ॥ त्यानें बहुत दिवस भरंवसा ॥ दिला आहे ॥ ६ ॥ घातकी पातकी गुरुद्रोही ॥ हित सांगतां गुरूसी हेडवी ॥ विष्णुदासा वेगळें करून पाहीं ॥ सांगितलें तितुके आणावे ॥ ७ ॥ नामा ह्मणे एक्या पातकीयां दंडिती ॥ नाना विपत्ति काय सांगूं किती ॥ विष्णुदासाचे वंदिती ॥ चरणरज ते यम ॥ ८ ॥

॥ १०६४ ॥ कृष्णाचें कीर्तन नावडे ज्या नरा ॥ जन्मोनि अघोर पडे नरकीं ॥ १ ॥ कृष्णश्रवण नाइके जो कानीं ॥ तयासि मेदिनीं ठाव

कैंचा ॥ २ ॥ कृष्णविष्णुकथा नावडे पैं नित्य ॥ तयासी पैं सत्य ग्रहबाधी ॥ ३ ॥ रामकृष्ण हरी न ध्याय जो मूर्ती ॥ तया यम नेती अंतीं जाणा ॥ ४ ॥ नामा ह्मणे हे नर कलियुगीं उद्दंड ॥ घरोघरीं पाखांड करिताती ॥ ५ ॥

॥ १०६५ ॥ समर्थासीं करी क्रोध हे अहंता ॥ अखंड ममता मानी सदां ॥ १ ॥ आपुली आपण व्यर्थ सांगे स्तुति ॥ वडिलांची कीर्ति भोग सांगे ॥ २ ॥ वमन झालीया सांचितसे अन्न ॥ काय तो दुर्जन भाग्यहीन ॥ ३ ॥ नामा ह्मणे जाण असतां शरिरी ॥ जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥

॥ १०६६ ॥ गेला परमहंस परिवारासहित ॥ कोल्हाळ करिती माय-बहिणी ॥ १ ॥ काय हे नगरी पांचही तराळ ॥ निद्रेनें भ्रमले व्याकुळ झाले ॥ २ ॥ गेला मागून दिसे कवणिये वाटे ॥ नवही द्वारें सपाट पडलीं ओस ॥ ३ ॥ नामा ह्मणे चोरी एके अंगणांत ॥ दिवसा रात्रीं पडत खाण तेथें ॥ ४ ॥

॥ १०६७ ॥ नाहीं परमार्थ पोटीं धनाचि आशा॥धरूनि हव्यासा धन-मान ॥ १ ॥ दंभमान दावी ज्ञानमार्ग मोठा ॥ पुढिलांसी वाटा यमपंथें ॥ २ ॥ पंथ न चुकती संतांवीण कधीं ॥ संसारसंबंधीं तया नरा ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे बहू अभाविक ॥ संतसंगसुख काय जाणे ॥ ४ ॥

॥ १०६८ ॥ गोसावीपणाचा दाखविती वेष ॥ नाहीं निदिध्यास हरिनामीं ॥ १ ॥ वरी वरी आर्त दाविती झगमग ॥ अंतरीं तो संग विषयाचा ॥ २ ॥ व्यर्थ लोकांपुढें हालविती मान ॥ विटंबन केली संसाराची ॥ ३ ॥ नामा ह्मणे मन गुंतेल पांडुरंगा ॥ आतां ऐशा सांगा कोण रीती ॥ ४ ॥

॥ १०६९ ॥ जे संतांची करिती निंदा ॥ त्यांसी दंडावें गोविंदा ॥ १ ॥ निंदक दंडावे दंडावे ॥ नेऊनि अंधारीं घालावे ॥ २ ॥ जे संतासी करिती पाखांड ॥ त्यांतें करावें शतखंड ॥ ३ ॥ नामा ह्मणे सांगेन एक ॥ निंदक श्वानाचे ते लेक ॥ ४ ॥

॥ १०७० ॥ डोई बोडून केली खोडी ॥ काया वागविली बापुडी ॥ १ ॥ ऐसा नव्हे तो सन्यास ॥ विषय देखोनि उदास॥ २ ॥ मांजराचे

गेले डोळे ॥ उंदीर देखोनि तळमळे ॥ ३ ॥ वेश्या झाली पाटाची राणी ॥ तिला आठवे मागील करणी ॥ ४ ॥ नामा ह्मणे वेष पालटे ॥ परी अंतरीचें ओसपण न तुटे ॥ ५ ॥

॥ १०७१ ॥ अंतरीं आवेश धरूनि कामाचा ॥ लटकी जल्पे वाचा शब्द ज्ञानें ॥ १ ॥ बोलाचे पै मांडे क्षीर घारी अन्न ॥ तेणें समाधान केविं होय ॥ २ ॥ बोलिल्यासारिखें न करी पामर ॥ वृथाचि कुरकुर वाढविली ॥ ३ ॥ नाहीं जीव तया प्रेता आलिंगन ॥ तैसें तें श्रवण केल्या होय ॥ ४ ॥ नामा ह्मणे त्याच्या संगें स्थिति दूषे ॥ झाला लाभ नासे तेथें आतां ॥ ५ ॥

॥ १०७२ ॥ कोळशासी दूध मर्दोनियां धूतां ॥ न पावे शुद्धता कांहीं केल्या ॥ १ ॥ दुर्जनासी तैसा बोध परमार्थ ॥ नवजायचि स्वार्थ कांहीं केल्या ॥ २ ॥ सूकराचे परी नेणती मिष्टान्न ॥ विष्टा ते भक्षण करीताती ॥ ३ ॥ मोहियले प्राणी पाहतां पाहतां ॥ काय सांगूं आतां नवलावो ॥ ४ ॥ नामा ह्मणे तया न होयचि मोक्ष ॥ येवोनि पद्माक्ष केविं भेटे ॥ ५ ॥

॥ १०७३ ॥ करंटें कपाळ नाम नये वाचे ॥ सदैव दैवाचे प्रेम नामीं ॥ १ ॥ जोडियेली जोडी हुंडारि दूरी ॥ नावडे पंढरी तया जना ॥ २ ॥ आपण नवजे दुजिया जावों नेदी ॥ ऐसा तो कुबुद्धि नागवितो ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाम गर्जे वारकरी ॥ वैकुंठ पंढरी देशोंदेशीं ॥ ४ ॥

॥ १०७४ ॥ थिल्लर तें नेणें सागराचा अंत ॥ मुंगीस अग्नींत रीघ नाहीं ॥ १ ॥ श्वान काय जाणें मेरूचें प्रमाण ॥ कोसळल्या गगन नकळे त्यास ॥ २ ॥ अंध काय जाणें कैसा उगवे दीन ॥ पाषाणा पर्जन्य नकळे जेंवी ॥ ३ ॥ देहवंत जीव काय जाणें देव ॥ नामा ह्मणे भाव काय तेथें ॥ ४ ॥

॥ १०७५ ॥ या विठोबापरतें आन दैवत ह्मणती ॥ ते शब्द नायकवती कानीं माझ्या ॥ १ ॥ पाखांडी ह्मणती उगेंचि असावें ॥ हा ब्रह्मकटाह करूं शके न अनारिसा ॥ २ ॥ तोहि जरी ह्मणेल अहंब्रह्मास ॥ तरी न पहावी वास येहीं नयनीं ॥ ३ ॥ कोटि कोटी ब्रह्मांडें एक एक्या रोमीं ॥ व्यापोनियां व्योमीं वर्ततसे ॥ ४ ॥ ऐसा माझा विठो सर्वां घटीं सम ॥ न संडावें वर्म नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १०७६ ॥ रामनाम ह्मणतां संसाराचें भय ॥ ह्मणती त्याच्या होय जिव्हे कुष्ट ॥ १ ॥ अमृत सेवितां कैंचें ये मरण ॥ जाणती हे खूण अनुभवी ॥ २ ॥ ज्याची एकवृत्ति रामनामीं प्रीति ॥ असतां कैसे होती गर्भवास ॥ ३ ॥ नामा ह्मणे नामीं दृढ भाव धरा ॥ आत्महित करा जाणते हो ॥ ४ ॥

॥ १०७७ ॥ हरिनामीं उदास तो पतीत निष्ठुर ॥ तया यमकिंकर गांजितील ॥ १ ॥ तोचि हरिचा दासु नामीं ज्या विश्वासु ॥ तया गर्भवासु नाहीं नाहीं ॥ २ ॥ मार्ग सांडोनियां आडमार्गें जाती ॥ ते व्याघ्रा वरपडे होती क्षणामाजी ॥ ३ ॥ नामा ह्मणे जिहीं नामीं आळस केला ॥ तो येवोनि गेला व्यर्थ एक ॥ ४ ॥

॥ १०७८ ॥ संसारा येऊनि काय पुण्य केलें ॥ बाळपण गेलें वायांवीण ॥ १ ॥ तरुणपणीं ह्या नाठवे श्रीहरि ॥ वृद्धपणीं सेवा कैसी हो करी ॥ २ ॥ परि हा नरजन्म गेला असे वायां ॥ पंढरीच्या राया नोळखतां ॥ ३ ॥ आलों मी संसारीं गुंतलों व्यापारीं ॥ अझूनि कां श्रीहरि नोळखसी ॥ ४ ॥ सहस्र अपराध जरी म्यां रे केले ॥ तारीं वो विठ्ठले ह्मणे नामा ॥ ५ ॥

॥ १०७९ ॥ तुमचें तीर्थ आह्मीं आदरें सेवावें ॥ तेणें तें पावावें परब्रह्म ॥ १ ॥ विश्वाकरवीं ब्रह्म ह्मणवितां तुह्मी ॥ ह्मणों जी माय आह्मी पिता तुह्मी ॥ २ ॥ जो तुमचे चरणींचा तो नाहीं आह्मां ॥ विष्णुदास नामा न तेथें ॥ ३ ॥

॥ १०८० ॥ माकड बैसलें किर्तनीं ॥ हरीचे गुण नायके श्रवणीं ॥ १ ॥ घुवड पाहे चहूंकडे ॥ नायके हरीचे पवाडे ॥ २ ॥ सभेभोंवताल्या नारी ॥ दृष्टि घाली तयावरी ॥ ३ ॥ नामा ह्मणे पंढरिनाथा ॥ कष्टलों उपदेश करितां ॥ ४ ॥

॥ १०८१ ॥ बेडूक ह्मणजे चिखलाचा भोक्ता ॥ क्षीर सांडूनि रक्ता गोचीड झोंबे ॥ १ ॥ जयाची वासना तयासीच गोड ॥ प्रेमसुखचाड नाहीं तया ॥ २ ॥ वांझ ह्मणे मी वाढवितें जौंझार ॥ उघडावया कैवाड नाहीं कोणी ॥ ३ ॥ अस्वलाचें तेल माखियलें कानीं ॥ तें ह्मणे रानीं थोर सुख ॥ ४ ॥ स्वामीचिया कानीं खोंविली लेखणी ॥ ते घेत असे धणी घरोघर ॥ ५ ॥ गाढवासि लाविली तूप पोळी डाळ ॥ भुंके आळो-

आळ लाज नाहीं ॥ ६ ॥ सूकरा कस्तुरी चंदन लाविला ॥ तो तेथोनि पळाला विष्टा खाया ॥ ७ ॥ नामा ह्मणे माझें मन हें बोललें ॥ धरिलासे गोपाळ सोडीचिना ॥ ८ ॥

॥ १०८२ ॥ बुजवणें शेतीं माणसें ह्मणती ॥ काय साचे हातीं शस्त्र शोभे ॥ १ ॥ हंसाशीं विरोध करीत कावळा ॥ नेणे त्याची कळा उंचपणें ॥ २ ॥ अनामिकासंगें पाठवितां पंडिता ॥ तो तयातें तत्वतां काय जाणे ॥ ३ ॥ नामा ह्मणे बापा करूं नको तैसें ॥ विचार कायसे पाहसील ॥ ४ ॥

॥ १०८३ ॥ परब्रह्मीची गोडी नेणती ती बापुडीं ॥ संसार सांकडीं विषयभरित ॥ १ ॥ तूतें चुकली रे जगजीवन रक्षा ॥ अनुभवावीण लक्षा नयेचि रे कोणा ॥ २ ॥ जवळीं असतांचि क्षीर नव्हेसि वरपडा ॥ रुधिर सेवितां गोचिडा जन्म गेला ॥ ३ ॥ दुर्दुरा कमळिणी एकेठायीं बिढार ॥ वास तों मधुर मधुकर घेवोनि गेला ॥ ४ ॥ मधुमक्षियां मोहळ रचितां रात्रंदिवस ॥ भाग्यवंत रस घेऊनि गेला ॥ ५ ॥ शेळीस घातली उंसांची वैरणी ॥ घेऊं नेणे धणी सा रसाची ॥ ६ ॥ नामा ह्मणे ऐसीं चुकलीं बापुडीं ॥ अमृत सेवितां पुढीं चवी नेणे ॥ ७ ॥

॥ १०८४ ॥ ओढळातें सुणें बैसे विहिरणी ॥ तेथें काय गुणी प्रगटेल ॥ १ ॥ देव खादलें ते काय करी जाणा ॥ सर्व अवगुण तयापासीं ॥ २ ॥ अवघीं संतति कावळे पोशिले ॥ जावोनि बैसले विष्टेवरी ॥ ३ ॥ भुजंगाचे मुखीं अमृत घातलें ॥ फिरोनि पाहिलें विषमय ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसे अभक्त निर्लज्ज ॥ त्यांसि केशिराज उपेक्षील ॥ ५ ॥

॥ १०८५ ॥ जाळें टाकिलें सागरीं ॥ उदक नयेची चूळभरी ॥ १ ॥ तैसें पापियाचें मन ॥ ज्या नावडे हरिकीर्तन ॥ २ ॥ सावजीं केला कोल्हा राव ॥ तो न संडी आपुला भाव ॥ ३ ॥ गाढव गंगेसि न्हाणीले ॥ पुढती लोळूं ते लागले ॥ ४ ॥ श्वान बैसविलें पालखीं ॥ वरती मान करूनि भुंकी ॥ ५ ॥ नगर नावडे विखारा ॥ दर्पण नावडे नकट्या नरा ॥ ६ ॥ पति नावडे शिंदळी ॥ जाय परपुरुषाजवळी ॥ ७ ॥ नामा ह्मणे वा श्रीहरि ॥ कोड्या नावडे कस्तुरी ॥ ८ ॥

॥ १०८६ ॥ ज्यांलागिं जोडिसी ते न येती तुजसरसीं ॥ यम कासाविसी करी तयेवेळां ॥ १ ॥ तूं तरी अज्ञान न देखसी डोळां ॥ झालासि गोठोळा

धनगरांसी ॥ २ ॥ चिरीरी घेतो सांपडलीया हातीं ॥ अवघी त्याची पळती टाकोनियां ॥ ३ ॥ संतीं न ह्मणावें वचन निष्ठुर ॥ वेगीं ठाका द्वार केशवाचें ॥ ४ ॥ नामा ह्मणे शरण रिघा हरि पायीं ॥ तया शेषशायी न विसंबे ॥ ५ ॥

॥ १०८७ ॥ जायजणा देह जाणतां नेणसी ॥ तो लोकीं मिरवसी लाजिरवाणें ॥ १ ॥ हें माझें हें माझें मानिसी निभ्रांत ॥ करिसी आघात रात्रंदिवस ॥ २ ॥ सांग तूं कवणाचा आलासि कोठोनी ॥ दृढ बुद्धि मनीं विचारी पां ॥ ३ ॥ धन संपत्ति करूनि मदें मातलासी ॥ पुढत पुढती पडसी गर्भवासा ॥ ४ ॥ पुत्रकलत्रदारा त्यांचा झालासि ह्मणियारा ॥ यांच्या पातकांचा भारा वाहसील ॥ ५ ॥ अंतीं यमापाशीं तुज बांधोनियां नेती ॥ कौतुक पाहती सकळ जन ॥ ६ ॥ विषयाचें विष भुलशील झणीं ॥ भोगिसी पतन रात्रंदिवस ॥ ७ ॥ नामा ह्मणे एक ध्यायी कमळापति ॥ निखाचा सांगाती विठ्ठल माझा ॥ ८ ॥

---

## संत संगती.

॥ १०८८ ॥ एक भानु अवघा सृष्टीचा सोहळा ॥ व्यापूनि सकळां आकाशासी ॥ १ ॥ पवनसिंधुवरी मन वेगें पाखरी ॥ मार्गु षट्चक्री वैकुंठासी ॥ २ ॥ तोचि भोगी सुख चिदानंदीं वासु ॥ संतसंगें प्रकाशु सफळ मग ॥ ३ ॥ नामा ह्मणे यासी गुरुकृपा पाहिजे ॥ संतसंगें पाविजे केशवचरण ॥ ४ ॥

॥ १०८९ ॥ धन्य नरदेहीं संतसंग करी ॥ त्रैलोक्य उद्धरी हेळामात्रें ॥ १ ॥ नेणे सुख दुःख शरीराचें भान ॥ अखंड भजन केशवाचें ॥ २ ॥ कर्म करूनियां होय शुचिष्मंत ॥ नामामृतीं प्रीत सर्वकाळ ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे वर्ते देहभावीं ॥ मूढजना दावी भक्तिमार्ग ॥ ४ ॥

॥ १०९० ॥ धन्य तोचि देश जेथें संतवास ॥ तापत्रयदोष जाती सत्य ॥ १ ॥ धन्य मातापिता उभयकुळशुद्धता ॥ तोचि भजे संतां निर्धारेंसी ॥ २ ॥ तीर्थरूपीं जळ विलंबें करी निर्मळ ॥ संतदर्शनें तत्काळ शुद्ध होती ॥ ३ ॥ धातुमय मूर्ति चिरकाळें फळती ॥ संतांचे संगतीं निजस्वार्थ ॥ ४ ॥ नामा ह्मणे मुक्ति जे नर इच्छिती ॥ संतांचे संगती धरती भाव ॥ ५ ॥

॥ १०९१ ॥ उतरोनि वैतरणी वैकुंठा जाऊं येईल ॥ परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥ १ ॥ रविरश्मि धरोनि स्वर्गा जाऊं येईल ॥ परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥ २ ॥ स्वामींचा ठेवा साच पैं होईल ॥ परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥ ३ ॥ मायबाप बंधु मिळती नाना योनीं ॥ परि साधुची मिळणी भाग्ययोगें ॥ ४ ॥ तप व्रतें दानें गोविंद भेटेल ॥ परि साधु न भेटेल भाग्येंवीण ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा बरवा साधुसंग ॥ यावेगळा भवरोग न तुटे न तुटे ॥ ६ ॥

॥ १०९२ ॥ कपटाचें कुपथ्य झालें तुझे पोटीं ॥ स्मरावा जगजेठि कृपालु तो ॥ १ ॥ नाम औषध घ्यावें नाम औषध घ्यावें ॥ संताचे लागावें समागमीं ॥ २ ॥ त्यापाशीं औषध आहे नानाविध ॥ रामकृष्ण गोविंद ह्मणती वाचे ॥ ३ ॥ पुत्रस्नेहें कैसा अजामेळ स्मरला ॥ तेणें तो उद्धरला क्षणमात्रें ॥ ४ ॥ राम राम ह्मणतां तारिली कुंटिणी ॥ वैकुंठभुवनीं तये वासु ॥ ५ ॥ तेंचि हें औषध प्रल्हादें घेतलें ॥ तें तूं घे ऊगेलें ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ १०९३ ॥ येता जातां थोर कष्टलों गर्भवासीं ॥ पडिलों गा उपवासी प्रेमेवीण ॥ १ ॥ बहुतांचा सेवकु झाला काकूळती ॥ न पावे विश्रांति कधी काळीं ॥ २ ॥ ऐसें माझें मन शिणलें नाना परी ॥ घालीन आभारी संताचीया ॥ ३ ॥ वियोगें संताच्या व्याकुळ चिंतातुर ॥ हिंडे दारोदार दीन रूपें ॥ ४ ॥ परि कोणी संताच्या न घालिती चरणीं ॥ तळमळी अनुदिनीं श्रांत सदां ॥ ५ ॥ माझें माझें ह्मणवुनि जया घाली मिठी ॥ दिसे तेंचि दिठी नाहीं होय ॥ ६ ॥ तया शोकानळे संतप्त अंदोळ ॥ गेले तें नमिळे कदां काळीं ॥ ७ ॥ न देखत ठायीं देखावया धांवें ॥ भ्रांति भुले भावें नानामार्गीं ॥ ८ ॥ तुझा स्वरूपानंदू नाहीं ओळखिला ॥ जाहली विठ्ठला हानि थोर ॥ ९ ॥ लोहाचा कवळू लागल्या परिसातें ॥ पढिये सर्वांते होय जेंवि ॥ १० ॥ नामा ह्मणे तैसी भेटी संतचरणीं ॥ करूनि त्रिभुवनीं होईन सरता ॥ ११ ॥

॥ १०९४ ॥ संतपायीं माथा धरितां सद्भावें ॥ तेणें भेटे देव आपेआप ॥ १ ॥ ह्मणवुनि संतां अखंड भजावें ॥ तेणें भेटे देव आपेआप ॥ २ ॥ साधुपाशीं देव कामधंदा करी ॥ पीतांबर धरी वरी छाया ॥ ३ ॥ नामा ह्मणे देव इच्छी संतसंग ॥ आह्मां जीवलग जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

॥ १०९५ ॥ संतसंगतीचें काय सांगूं सुख ॥ आपणपारिखें नाहीं तेथें ॥ १ ॥ साधु थोर जाणा साधु थोर जाणा ॥ साधु थोर जाणा कलियुगीं ॥ २ ॥ इहलोकीं तोचि सर्वांभूतीं सम ॥ शरीराचा भ्रम नेणे कदां ॥ ३ ॥ नामा ह्मणे गाय दूध एक सरे ॥ साधु निरंतर वर्ते तैसा ॥ ४ ॥

॥ १०९६ ॥ भोळ्या भाविकांचें वचन नुल्लंघी ॥ फिरतसे संगें तया मार्गें ॥ १ ॥ मी एक अभक्त मी एक अभक्त ॥ मी एक अभक्त पापराशी ॥ २ ॥ नाम माळा दृढ न करी जतन ॥ परि जाणे वर्म ख्रूण संतसंगें ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाहीं तुह्मांसी उपमा ॥ आमुचे स्वधर्म शुद्ध नाही ॥ ४ ॥

॥ १०९७ ॥ परिसाचेनि संगें लोह होय सुवर्ण ॥ तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ १ ॥ कीटकी ध्यातां भृंगी झाला तोचि वर्ण ॥ तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ २ ॥ वनस्पति परिमळु चंदन झाला जाण ॥ तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ३ ॥ अग्नीस मिळे तें नये परतोन ॥ तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ४ ॥ सरिताओघ जाय सिंधूसि मिळून ॥ तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशवा मज देई संतसंग ॥ आणिक कांहीं तुज न मागें बापा ॥ ६ ॥

---

## नामाचा महिमा.

॥ १०९८ ॥ अग्नी जाळी तरी न जळती पांडव ॥ हृदयीं माधव धरीला ह्मणोनी ॥ १ ॥ अग्नी जाळी तरी न जळती गोपाळ ॥ हृदयीं देवबोल धरीला ह्मणोनी ॥ ध्रु० ॥ अग्नी जाळी तरी न जळे हनुमंत ॥ हृदयीं सीताकांत ह्मणोनीया ॥ २ ॥ अग्नी जाळी तरी न जळे प्लहाद ॥ हृदयीं गोविंद ह्मणोनीया ॥ ३ ॥ अग्नी जाळी तरी न जळे पैं सीता ॥ हृदयीं रघुनाथा धरीलें ह्मणोनी ॥ ४ ॥ लंकेसी उरलें विभीषणाचें घर ॥ हृदयीं सीतावर धरीला ह्मणोनी ॥ ५ ॥ नामा ह्मणे स्वामी स्मरावें गोविंदा ॥ चुके भवबाधा संसाराची ॥ ६ ॥

॥ १०९९ ॥ देवाचें हें गुज सकळ मंत्रमय ॥ जें कां नीरा ध्येय शंकराचें ॥ १ ॥ तें हें रामनाम सेवितां सर्वभावें ॥ रामरूप व्हावें निश्चयेंसी ॥ २ ॥ नष्ट आजामेळाचें पतित्व गेलें ॥ दिव्य रूप झालें वाल्मिकाचें ॥ ३ ॥

शरीरसंपत्ति बळीनें देउनी सकळ ॥ केला द्वारपाळ नारायण ॥ ४ ॥ कृष्णावीण दुजे नेणती कायावाचा ॥ झाला पांडवांचा साहाकारी ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशव भावाचा लंपट ॥ भक्तासी निकट रतलासे ॥ ६ ॥

॥ ११०० ॥ ज्यासी विन्मुख संसार ॥ तो करी मोक्षाचा विचार ॥ १ ॥ आह्मी पंढरीचे लाठे ॥ नजावो वैकुंठींचे वाटे ॥ धृ० ॥ सांडोनी पंढरीची वारी ॥ मोक्ष मागतो भीकारी ॥ २ ॥ जन्मोजन्मींचा आळसी ॥ तो मुक्तीतें अभिलाषी ॥ ३ ॥ ताट वोगरीलें नीकें ॥ सांडोनी कोण जाय भीके ॥ ४ ॥ जो कां नेणे नाम गोडी ॥ तो मुक्तीतें चरफडी ॥ ५ ॥ नामा ह्मणे विष्णुदासां ॥ झणीं भ्याला गर्भवास ॥ ६ ॥

॥ ११०१ ॥ आह्मीं वीठोबाचे दूत ॥ यम आणूं शरणांगत ॥ १ ॥ मुखें नाम हातें टाळी ॥ महापापा करूं होळी ॥ धृ० ॥ करूं हरीनामाचा घोष ॥ कुंभपाक पाडूं वोस ॥ २ ॥ करूं हरीकथा कीर्तन ॥ तोडूं यमाचें बंधन ॥ ३ ॥ एवढा प्रताप नामाचा ॥ रीघ नव्हे कळीकाळाचा ॥ ४ ॥ ऐसा नामा यशवंत ॥ वीठोबाचा शरणांगत ॥ ५ ॥

॥ ११०२ ॥ तरले तरती हा भरंवसा ॥ पुढती न येती गर्भवासां ॥ १ ॥ वाट सांपडली नीकी ॥ विठ्ठल नाम ज्याचें मुखीं ॥ धृ० ॥ तीर्थें इच्छिती चरणीचें ॥ रजनाम धारकाचे ॥ २ ॥ प्रायश्चित्त सांडोनी प्रौढी ॥ झाली दीन रूपें बापुडीं ॥ ३ ॥ रिद्धी सिद्धी महाद्वारीं ॥ मोक्ष वोळंगण करी ॥ ४ ॥ नामा ह्मणे सुख निधान ॥ नाम पतीत पावन ॥ ५ ॥

॥ ११०३ ॥ नामाचा महीमा कोण करी सीमा ॥ जपा श्रीरामा एक्या भावें ॥ १ ॥ नलगती स्तोत्र नाना मंत्रतंत्रें ॥ वर्णीजे वक्त्रें श्रीरामनाम ॥ धृ० ॥ अनंत पुण्यरासी घडे ज्या प्राण्यासी ॥ तरीच मुखासी नाम येत ॥ २ ॥ नामा ह्मणे राम हा जप परम ॥ तो देह उत्तम मृत्युलोकीं ॥ ३ ॥

॥ ११०४ ॥ जन्माचें कारण रामनाम पाठे ॥ जाईजे वैकुंठें एका वेळा ॥ १ ॥ रामनाम ऐसा जीव्हें उमटे ठसा ॥ तो उद्धरेल अपैसा इहलोकीं ॥ धृ० ॥ दोअक्षरी राम हा जप परम ॥ नलगे तुज नेम नानापंथ ॥ २ ॥ नामा ह्मणे पवित्र श्रीरामाचें चरित्र ॥ उद्धरीसी गोत्र पूर्वजेसी ॥ ३ ॥

॥ ११०५ ॥ कांसवीचे दृष्टी जैं येईजे भेटी ॥ तैं अमृताची सृष्टी घडे त्यासी ॥ १ ॥ तैसें हें भजन श्रीरामाचें ध्यान ॥ वाचे नारायण अमृत-

मय ॥ धृ० ॥ धन्य त्याचें कुळ सदां पैं सफळ ॥ दीननिशीं पळ रामनाम ॥ २ ॥ नामा ह्मणे चोखडा भक्त तो उत्तम ॥ वाचेसी सुगम रामनाम ॥ ३ ॥

॥ ११०६ ॥ सदां फळ सुफळ वाचेसी गोपाळ ॥ वंदि कळीकाळ शास्त्र सांगे ॥ १ ॥ ब्रह्मांड नायक ऐसें जें कवतुक ॥ तेंची नाम एक श्रीकृष्ण ऐसें ॥ धृ० ॥ आदी अंत पहातां नाहीं पैं सर्वथा ॥ परिपूर्ण सरीता अमृताची ॥ २ ॥ नामा ह्मणे अनंत कां करीसी संकेत ॥ उद्धरीले पतीत युगायुगीं ॥ ३ ॥

॥ ११०७ ॥ गोविंद गोपाळ वाचेसी निखळ ॥ तो उद्धरे तात्काळ कलीमाजीं ॥ १ ॥ नारायण नारायण हेंची पारायण ॥ उद्धरले जन इहलोकीं ॥ धृ० ॥ तुटती यातना कर्माच्या भावना ॥ जड जीव उद्धरणा नाम स्मरा ॥ २ ॥ नामा ह्मणे राम हा जप परम ॥ नळगती नेम नानाकोटी ॥ ३ ॥

॥ ११०८ ॥ तीर्थ तपरासी जप हृषीकेशी ॥ नाम अहर्निशी रामराम ॥ १ ॥ तीर्थाचें पै तीर्थ नाम हें समर्थ ॥ होईल कृतार्थ रामनामें ॥ धृ० ॥ साधेल साधन तुटेल बंधन ॥ वाचे जनार्दन सुफळ सदां ॥ २ ॥ नामा ह्मणे हरी उच्चार तूं करी ॥ उद्धरसी निर्धारी इहलोकीं ॥ ३ ॥

॥ ११०९ ॥ पाहतां ये परीपाठीं आणीक नाहीं सृष्टी ॥ नामेवीण दृष्टीं नदिसे माझे ॥ १ ॥ नामची समर्थ नामची मथीत ॥ शंकरासी हेत रामनामीं ॥ धृ० ॥ पुरती सर्व काम वाचे रामनाम ॥ नळगती ते नेम कर्मजाळ ॥ २ ॥ नामा ह्मणे उच्चार न करी तूं विचार ॥ तुटेल येरझार नानायोनी ॥ ३ ॥

॥ १११० ॥ तपांचें पैं तप राम हें अमुप ॥ करी कां रे जप रामनामीं ॥ १ ॥ रामकृष्ण ह्मणे वाचें नारायण ॥ तुटेल बंधन यमपाश ॥ धृ० ॥ साधेल साधन होती कोटी यज्ञ ॥ नाम जनार्दन जप करी ॥ २ ॥ नामा ह्मणे जिव्हे नाम स्मरण करी ॥ ह्मणे नरहरी एक भावें ॥ ३ ॥

॥ ११११ ॥ हाची नेम सारी साधेल तो हरी ॥ नाम हे मुरारी अच्युताचें ॥ १ ॥ गोविंद हरे गोविंद हरे ॥ यादव मुरारे रामनाम ॥ धृ० ॥ नळगती कथा नाना विकलता ॥ नामची स्मरता नाम वाचे ॥ २ ॥ नामा ह्मणे राम आह्मा हाची नेम ॥ नित्य तो सप्रेम जप आह्मा ॥ ३ ॥

॥ ११९२ ॥ करूं हें कीर्तन राम नारायण ॥ जनीं जनार्दन हेंची देखें ॥ १ ॥ जगाचा जनक रामकृष्ण एक ॥ नकरीतां अविवेक स्मरे राम ॥ धृ० ॥ तुटेल भवजाळ कां करीसी पाल्हाळ ॥ सर्व मायाजाळ इंद्रीय बाधा ॥ २ ॥ नामा ह्मणे गोविंद स्मरे तूं सावध ॥ नव्हे तुज बाध नानाविघ्नें ॥ ३ ॥

॥ ११९३ ॥ मायेचें भूचर रजतम सात्वीक ॥ रामनाम एक सोडवणें ॥ १ ॥ राम हेंची स्नान राम हेंची ध्यान ॥ नामें घडे यज्ञ कोटी देखा ॥ धृ० ॥ नलगती साधन नाना मंत्र विवेक ॥ रामनामीं सुख रंगी कांरे ॥ २ ॥ नामा ह्मणे श्रीराम हेंची वचन आह्मां ॥ नित्य ते पौर्णिमा सोळा कळी ॥ ३ ॥

॥ ११९४ ॥ माझें मी करीतां गेले हे दीवस ॥ न धरीच विश्वास रामनामीं ॥ १ ॥ अंतीं तुज उद्धरती रामनाम हरी ॥ राम पंचाक्षरी मंत्रसार ॥ धृ० ॥ कां करशील सांठा प्रपंच विस्तार ॥ न तुटे येरझार नामेंवीण ॥ २ ॥ नामा ह्मणे कैसें रामनामीं पीसें ॥ तो उद्धरेल अपैसे इहलोकीं ॥ ३ ॥

॥ ११९५ ॥ नको नको माया सांडी लवलाह्या ॥ पुढील उपाया झोंबे कांरे ॥ १ ॥ रामनाम ह्मणे तुटेल बंधन ॥ भवबंध मोचन एकानामें ॥ धृ० ॥ स्मरतां पतीत उद्धरले यथार्थ ॥ नाम हाची स्वार्थ तया झाला ॥ २ ॥ नामा ह्मणे हा जप करी तूं अमूप ॥ रामनामें खेप जाय जनीं ॥ ३ ॥

॥ ११९६ ॥ स्मरण करीतां रामनाम ध्वनी ॥ ऐकतांची कर्णीं पळती यम ॥ १ ॥ ऐसें पाठ करी रामनाम हरी ॥ होतील कामारी रिद्धीसिद्धी ॥ धृ० ॥ साध्य तेंची साधी नकरी उपाधि ॥ जन्मांतरीच्या व्याधि हरती नामें ॥ २ ॥ नामा ह्मणे सर्व राम हाचि भाव ॥ नाहीं आणिक देव रामेंवीण ॥ ३ ॥

॥ ११९७ ॥ रामकृष्ण माळ घाली कां अढळ ॥ तुटेल भवजाळ मायामोह ॥ १ ॥ होशील तूं साधु न पवसी बाध ॥ पूर्ण ब्रह्मानंद पावेल तुज ॥ ध्रु० ॥ जपतां रामनाम पुरती सर्व काम ॥ आदि अंतीं नेम साधेल तुज ॥ २ ॥ नामा ह्मणे कृतार्थ पूर्ण मनोरथ ॥ नलगती ते अर्थ मायाफांसे ॥ ३ ॥

॥ ११९८ ॥ शरीर संपत्ती मायेचे ख्याळ ॥ वायांची पाल्हाळ मिरवितोसी ॥ १ ॥ नाम हेंची तारी विठ्ठल निर्धारी ॥ ह्मणे हरी हरी एकी

हेळा ॥ धृ० ॥ स्मरतां गोपाळनाम वंदील काळयम ॥ न लगती नेम मंत्रबाधा ॥ २ ॥ नामा ह्मणे सार मंत्र तो उत्तम ॥ राम हेंची नाम स्मरे कारे ॥ ३ ॥

॥ ११९९ ॥ नाम वाचें उच्चारितां ॥ हरे संसाराची व्यथा ॥ जाती दोषाचीया चळथा ॥ रामकृष्ण उच्चारणीं ॥ १ ॥ हरी माधव गोविंद ॥ याची नामाचा जया छंद ॥ तोचि पावेल परमपद ॥ नीजभुवन वैकुंठीं ॥ धृ० ॥ जन्मजन्माची तपरासी ॥ तेणें नाम आलें मुखासीं ॥ स्मरता हरी हृषीकेशी ॥ सकळ पूर्वजा उद्धार ॥ २ ॥ नामा जपे ध्यानीं मनीं ॥ अखंड विठ्ठल हरी कीर्तनीं ॥ तेणें जपे ये मेदीनीं ॥ कोटी यज्ञ घडले ॥ ३ ॥

॥ ११२० ॥ नाम एकची तारक ॥ रामनामें शुद्ध मुख ॥ येणें उद्धरती तिन्ही लोक ॥ कुळांसहीत वैकुंठीं ॥ १ ॥ धन्य धन्य तें कुळ ॥ रामनामें नित्य निर्मळ ॥ जो उच्चारी सर्वकाळ ॥ धन्य जन्म तयाचा ॥ धृ० ॥ एक हरी एक तत्व ॥ तेथें धरोनीया शुद्ध सत्व ॥ नाना काय करीसी कवित्व ॥ राम नाम उच्चारी ॥ २ ॥ नामा जपे नाम मंत्र ॥ हातीं न घे आणीक शस्त्र ॥ रामकृष्ण हें वक्रें उच्चार ॥ इतुकेंची पुरे आह्मां ॥ ३ ॥

॥ ११२१ ॥ राम मंत्राचिया आवृत्ति ॥ घडती जयासी पुढतोपुढती ॥ त्याचा धन्य जन्म ये क्षितीं ॥ सर्व कुळाशीं तारक ॥ १ ॥ राम मंत्र आवडे जीवा ॥ हाची उद्धार सर्व जीवा ॥ शीवासही विसांवा ॥ पार्वती सहीत ॥ धृ० ॥ रामकृष्ण उच्चारें ॥ तरती जड पामरें ॥ ऐसें हें व्यासें निर्धारें ॥ नानाग्रंथीं सांगितलें ॥ २ ॥ नामा जपे नाम मंत्र ॥ आणिक नेणे नाना शास्त्र ॥ रामनामें नित्य वक्र ॥ हरी रंगें रंगलें ॥ ३ ॥

॥ ११२२ ॥ अखंड मुखीं रामनाम ॥ धन्य तयाचाचि जन्म ॥ स्नानसंध्येसी नेम ॥ तो पुरुष महापवित्र ॥ १ ॥ धन्य धन्य तयाचा जन्म ॥ रामार्पण अवघें कर्म ॥ तोची तरला हाची नेम ॥ रामकृष्ण उच्चारणीं ॥ धृ० ॥ अनंत जन्मांचें सांकडें ॥ तेणेंचि उगविलें कोडें ॥ जपतप येणें नावडे ॥ रामकृष्ण उच्चारणीं ॥ २ ॥ नामा ह्मणे नाम मात्रें ॥ अवघीं निवारलीं शस्त्रें ॥ रामकृष्ण नाम वक्रें ॥ उच्चारी तो धन्य ॥ ३ ॥

॥ ११२३ ॥ नाम जींही उच्चारण केलें ॥ तींहीं वैकुंठ साधिलीं ॥ भवसागर पार पावले ॥ उद्धरले हरिभक्त ॥ १ ॥ नाम दुर्लभ दुर्लभ ॥ तारील

हा पद्मनाभ ॥ पुंडलीकें करोनिया स्वयंभ ॥ केशव मूर्ती केली उभी ॥ धृ०॥ ऐसें अगाध हरी रूपडें ॥ प्रत्यक्ष पुंडलीकापुढें ॥ भक्ती काज कैवाडें ॥ भीमातीरीं उभा असे ॥ २ ॥ वर्णावया न पुरे शेष ॥ वेदां न घालवे कास ॥ तेथें शास्त्र काय घेती भास ॥ रूप वर्णावया हरीचें ॥ ३ ॥ उद्धव अक्रुर द्वापारीं ॥ त्यासवें खेळले हरी ॥ मग ते उद्धरीले अवधारी ॥ ज्ञान देउनी श्रीकृष्णें ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें नाम ॥ हरीकथेसी धरी प्रेम ॥ तरी तुझा धन्य होईल जन्म ॥ मनुष्य जन्मीं असतां ॥ ५ ॥

॥ ११२४ ॥ अवघिया आचार निष्ठा ॥ चित्त जरी जाय वैकुंठा ॥ तरीच निस्तारीलें कष्टां ॥ भवपाशा पासोनी ॥ १ ॥ धन्य धन्य चित्तवृत्ती ॥ विठ्ठल भक्तीसी पुढत पुढती ॥ त्याचे पुर्वज उद्धरती ॥ गीत गाती रामकृष्ण ॥ धृ० ॥ हेंची जपतप ध्यान ॥ हरी चरणीं ठेवुनी मन ॥ साधलें कार्याचें कारण ॥ रामकृष्ण उच्चारणीं ॥ २ ॥ नामा जपे ठेउनि चित्त ॥ अखंडचरणीं झाला रत ॥ पुरले आमचे मनोरथ ॥ सर्व कृतार्थ पैं झालों ॥ ३ ॥

॥ ११२५ ॥ हरीनाम पाठ हाची भाव ॥ हरी हरी हाची देव ॥ हरीवीण न फिटे संदेह ॥ सर्व जिवाचा जाण पां ॥ १ ॥ हरीतत्व ज्याचें देहीं ॥ तोची तरला येथें पाही ॥ हरीवीण या डोहीं ॥ भवसागर कैसा तरेल ॥ धृ० ॥ रामकृष्ण वासुदेव ॥ हाची सर्व जिवाचा विसांवा ॥ येथें पोकारूणीयां धांवा ॥ विठ्ठलनाम उच्चारी ॥ २ ॥ नामा जपे हृदयीं सदां ॥ रामकृष्ण हाची धंदा ॥ हरीराम परमानंदा ॥ हाची जप जपतसे ॥ ३ ॥

॥ ११२६ ॥ सर्वकाळ हरी जप ॥ हेंची तपामाजीं तप ॥ नलगती घालावे संकल्प ॥ नानामंत्राचे परीयेसां ॥ १ ॥ मंत्रामाजीं मंत्रसार ॥ रामकृष्ण हा उच्चार ॥ नित्यानित्य निर्विकार ॥ हरी जोडेल साचारें ॥ धृ० ॥ मागें कृतायुगीं सांगों ॥ त्रेतायुगीं काय ओळगों ॥ द्वापारीं कृष्ण रंगें रंगों ॥ परी कलीमाजीं नामतारक ॥ २ ॥ नामा ह्मणे ग्रंथीं ॥ पाहे पा यथानिगुती ॥ नाम जपतांची तरती ॥ हें व्यासाचें वचन ऐसें ॥ ३ ॥

॥ ११२७ ॥ असत्याचे मळ बैसले ये वाचे ॥ ते न फिटती साचे तीर्थोदकें ॥ १ ॥ हरी नामामृत प्रक्षाळी जीव्हेतें ॥ पाणीये वहुते काय करिती ॥ धृ० ॥ गंगासागरादी तीर्थें कोडीवरी ॥ हरीनामाची सरी न

पवती ॥ २ ॥ हरीनामगंगे सुस्नात पै झाला ॥ नाम्या जवळी आला केशीराज ॥ ३ ॥

॥ ११२८ ॥ साधावया स्वरुपसिद्धी ॥ सिद्ध साधक समाधीं ॥ बैसोनी ध्यान बुद्धीं ॥ परी तो हरी न सांपडे ॥ १ ॥ धन्य धन्य वैष्णव संग ॥ अखंड तेथें पांडुरंग ॥ कीर्तनीं नाचतसे अभंग ॥ अखंड काळ सर्वदां ॥ धृ० ॥ नाम घेतां धांवे विठ्ठल ॥ नलगे तप नलगे मोल ॥ कष्ट नलगती बहुसाल ॥ हा कृपाळु दीनाचा ॥ २ ॥ नामा ह्मणे भक्तीचें कारण ॥ भक्तीसी तुष्टे नारायण ॥ याचें करितां कीर्तन ॥ आपेआप तुष्टेल ॥ ३ ॥

॥ ११२९ ॥ देहीं धर्मीं हीत करी ॥ द्वैतभाव चित्तीं न धरी ॥ सर्वांभूतीं नमस्कारी ॥ एक आत्मा ह्मणोनीयां ॥ १ ॥ एक तत्व एक हरी ॥ एक चित्तें नमस्कारी ॥ आदि अंतींचा नरहरी ॥ सकळ कुळासी तारील ॥ धृ० ॥ पवित्र त्याचें हें कुळ ॥ आचार त्याचाचि सुशिळ ॥ अखंड जप सर्वकाळ ॥ रामकृष्ण नरहरी ॥ २ ॥ नामा जपे नाममंत्र ॥ अखंड हरीनाम सहस्र ॥ हाची आमुचा निजमंत्र ॥ रामकृष्ण गोविंद ॥ ३ ॥

॥ ११३० ॥ सर्वकाळ पुण्याच्या रासी ॥ हरीनाम आलिया जिव्हेसी ॥ नित्य तप अनुष्ठानाच्या रासी ॥ कोटी यज्ञासी लाभ झाला ॥ १ ॥ धन्य धन्य त्यांचा वंश ॥ जे जे रतले नामास ॥ रामनामीं नित्य सौरस ॥ ते विष्णुदास पवित्र ॥ धृ० ॥ पवित्र ते स्वधर्मीं ॥ ज्यांसी सर्वकाळ नामीं ॥ तयाचें नाम पूर्ण कामी ॥ मनोरथ पुरतील ॥ २ ॥ नामा जपे नाम हरीचें ॥ सार्थक केलें संसाराचें ॥ ओझें फेडिलें पूर्वजन्माचें ॥ हरी स्मरण केलीया ॥ ३ ॥

॥ ११३१ ॥ व्रत तप दान हवन पूजन ॥ नलगे साधन नाम ह्मणतां ॥ १ ॥ रामकृष्ण हरी मुकुंदा मुरारी ॥ जिव्हें क्षणभरी न विसंबे ॥ धृ० ॥ कळीकाळ दारुण करीतसे विघ्न ॥ परजी नारायण नाम जिव्हें ॥ २ ॥ शरण आलों जिव्हे तुवां नुपेक्षावें ॥ नामा ह्मणे गावें हरीनाम ॥ ३ ॥

॥ ११३२ ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणा उघडा मंत्र जाणा ॥ कळीकाळ अंकणा होइल तुह्मां ॥ १ ॥ वेदाचें हें सार शास्त्राचें गव्हार ॥ तें जाणा अक्षर विठ्ठलनाम ॥ ध्रु० ॥ न करावें खंडण अखंड उच्चारण ॥ देशकाळ




वर्तमान नाहीं येथें ॥ २ ॥ जिवीचें निजगुज मुक्तीचें तें बीज ॥ नामा ह्मणे मज सांपडलें ॥ ३ ॥

॥ ११३३ ॥ रसने रंगे या राघवाचे नामीं ॥ मिथ्या चाळा तूं कां करिसी रिकामी ॥ रघुपती स्मरतां तूं निवसील अंतर्यामीं ॥ १ ॥ सुंदरनामें सुखधामा श्रीरामाची ॥ शंकर राजा हा गोडी जाणे त्याची ॥ टळेल पीडा पापीया यमदुताची ॥ २ ॥ जीव्हे किती विषयांचा करीसील सोस ॥ नामें तरले दृढ धर नामीं विश्वास ॥ रंगीं रंगला नामया विष्णुदास ॥ ३ ॥

॥ ११३४ ॥ केशव नाम गाय केशव नाम गाय ॥ केशव नाम गाय कामधेनु ॥ १ ॥ वेणुनादीं चरे पाणी पी भींवरें ॥ ती गाय हंबरे भक्तालागी ॥ ध्रु० ॥ भक्ती सुखें धाय प्रेमें ते पान्हाय ॥ भुकेलीया खाय पातकांसी ॥ २ ॥ नामा ह्मणे गाय तें पंढरीस आहे ॥ पापीया न साहे पाठीलागे ॥ ३ ॥

॥ ११३५ ॥ नामीं जे जे रतले ॥ ते ते केशवें तारीले ॥ १ ॥ नाम घेतां केशवाचें ॥ पाश तुटती जन्माचे ॥ ध्रु० ॥ महा पापी अजामेळ ॥ तोही तारीला चांडाळ ॥ २ ॥ नामें गजेंद्र तारीला ॥ देवें मोक्षपदा नेला ॥ ३ ॥ नाम घेतां ते पांचाळी ॥ बाप उभा वनमाळी ॥ ४ ॥ नामा ह्मणे भाविकांसी ॥ नाम घ्यावें अहर्निशीं ॥ ५ ॥

॥ ११३६ ॥ सर्वा माजीं सार नाम श्रीहरीचें ॥ अखंडीत वाचे जप करी ॥ १ ॥ निशिंदीनीं हृदयीं ध्यातो शूळपाणि ॥ पाविजे निर्वाणी मोक्षपद ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसें स्मरे कां निधान ॥ पावेल साधन वैकुंठीचें ॥ ३ ॥

॥ ११३७ ॥ सकळ साधनाचें सार ॥ रामकृष्ण हा उच्चार ॥ १ ॥ ह्मणा गोविंद नरहरी ॥ सकळ जीवा तोचि तारी ॥ ध्रु० ॥ नाम घेतां हरी माधव ॥ तरताती सकळ जीव ॥ २ ॥ नामा ह्मणे केशवाचे ॥ धन्य जीवीत वैष्णवांचे ॥ ३ ॥

॥ ११३८ ॥ हडबडलीं पातकें ॥ घेतां रामनाम एक ॥ १ ॥ नाम घेतां तत्क्षणीं ॥ चित्रगुप्तें सांडिली लेखणी ॥ २ ॥ घेउनी पूजेचा संभार ॥ ब्रह्मा येतसे समोर ॥ ३ ॥ नामा ह्मणे जरी हें लटके ॥ तरी माझें छेदावें मस्तक ॥ ४ ॥

॥ ११३९ ॥ सहस्र दळांमधून अनुहात ध्वनि उटी ॥ नामाचेनि गजरें पातकें रिघालीं कपाटीं ॥ १ ॥ जागारे गोपाळांनो रामनामीं जागा ॥ कळीकाळ एका नामें महा दोष जाती भंगा ॥ २ ॥ दशमी एक व्रत दिंडीचें करा दर्शन ॥ एकादशी उपवास तुह्मी करा जागरण ॥ ३ ॥ द्वादशी साधनें जळती पातकांच्या कोटी ॥ नामा ह्मणे केशव ठाव देईल वैकुंठीं ॥ ४ ॥

॥ ११४० ॥ अष्टमादि सिद्धि द्वारीं ओळंगती ॥ विषें अमृतें होतीं ॥ वैरी दास्य करिती ॥ तो श्रीपति अनुकूल झालिया ॥ १ ॥ धन्य ते संसारीं ॥ पुरुष हो कां ते नारी ॥ दरिद्र नाहीं त्यांचे घरीं ॥ तो श्रीहरी अनुकुल झालिया ॥ २ ॥ येथून नेशील परतें ॥ नामा ह्मणे वैकुंठा वरतें ॥ लक्षुं नये रे चवदा वरतें ॥ नाम नानामतें धांडोळितां ॥ ३ ॥

॥ ११४१ ॥ शिव हलाहलें तापला ॥ तोही नामें शीतळ झाला ॥१॥ नाम पावन पावन ॥ याहुनी पवित्र आहे कोण ॥ २ ॥ शिवासी नामाचा आधार ॥ केला कळीकाळ किंकर ॥ ३ ॥ मरण झालें काशीपुरीं ॥ तेथें नामचि उद्धरी ॥ ४ ॥ अठरा पुराणांची पोथी ॥ नामावीण नाहीं रीती ॥ ५ ॥ नामा ह्मणे अवघीं चोरें ॥ एक हरिनाम सोईरे ॥ ६ ॥

॥ ११४२ ॥ ह्मणा श्रीराम जयराम ॥ भवसिंधु तारक नाम ॥ १ ॥ नाम पतीत पावन ॥ नाम जिवाचें साधन ॥ २ ॥ नाम शिवाचें ध्यान ॥ नाम-नारदा गायन ॥ ३ ॥ नामा ह्मणे हरीचें नाम ॥ नाम तारका परब्रह्म ॥ ४ ॥

॥ ११४३ ॥ तप तीर्थ दान हें सर्व कुवाडें ॥ नाम एक वाड केशवाचें ॥ १ ॥ मुमुक्ष साधकीं सदां नाम गावें ॥ तेणेंचि या व्हावें अखंडीत ॥ २ ॥ विपत्तीचे बळें न होतां विन्मुख ॥ नाममात्र एक धरा वाचें ॥ ३ ॥ जीव-न्मुक्त शुकमुनि ध्रुवादिक ॥ तयासी आणिक ध्यास नाही ॥ ४ ॥ नाम-याची वाणी अमृताची खाणी ॥ ध्यावी आतां धणी सर्वत्रांहीं ॥ ५ ॥

॥ ११४४ ॥ साधनांत सोपें नाम हें केवळ ॥ यावीण सकळ शीण वांया ॥ १ ॥ धरारे धरा नाम विठोबाचें ॥ तेणें अज्ञानाचें मूळ नासे ॥ २ ॥ नाम तारी फार पुराणीं वर्णिलें ॥ नामचि केवळ आत्मसत्ता ॥ ३ ॥ नामा ह्मणे नामीं रंगला सुरंग ॥ अंगें स्वयंमेव पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ११४५ ॥ नामाचा प्रताप काय सांगूं वाचें ॥ अक्षय सुखाचें स्थान दावी ॥ १ ॥ नामाविण कांहीं नाहीं नाहीं सार ॥ साधावें सत्वर भलेनो हें ॥ २ ॥ अजामेळ पाहा आजन्म पातकीं ॥ नामें गेला सेखी वैकुंठासी ॥ ३ ॥ कुंटीणी जारणी शूकामिसे गाय ॥ वैकुंठासी जाय तत्क्षणीं ॥ ४ ॥ पाहा वाल्या कोळी उफराट्या नामें ॥ भविष्य संभ्रमें वाखाणिलें ॥ ५ ॥ नामा ह्मणे किती सांगावा निर्धार ॥ साधन सोपारें नाम एक ॥ ६ ॥

॥ ११४६ ॥ जयासी लागली रामनामीं गोडी ॥ त्याणें केली प्रौढी परमार्थाची ॥ १ ॥ कलि माजि नाम सुलभ सोपेंरे ॥ यालागीं आदर नामीं धरा ॥ २ ॥ आणिक साधनें आहेती उदंड ॥ साधितां वितंड कष्ट तेथें ॥ ३ ॥ सोंवळें ओवळें उंचनीच वर्ण ॥ नाहीं येथें गुण-दोष कांहीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे सर्व सिद्धांताचा भाव ॥ प्राणियांचें दैव कोण जाणें ॥ ५ ॥

॥ ११४७ ॥ भक्ति करूनियां कोण वायां गेला ॥ सांगा हो विठ्ठला निवडूनि ॥ १ ॥ द्वापाराचे अंतीं नामची सुकृत ॥ अद्यापि निश्चित चालतसे ॥ २ ॥ नाम ऐकतां तरती निर्धारी ॥ व्याख्यान श्रीधरी टिकाकार ॥ ३ ॥ नामा ह्मणे राम नाहीं त्रिभुवनीं ॥ नाम तें निधान कलियुगीं ॥ ४ ॥

॥ ११४८ ॥ नित्य सर्वगत अखंड सगुण ॥ केशवाचें ध्यान करी ब्रह्मा ॥ १ ॥ ब्रह्मा सर्वकाळ सांगे साधूपासी ॥ आणिक हें शषी तेंची मानी ॥ २ ॥ मनीं जो मानसीं नामामृत सार ॥ सेविती सादर नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ ११४९ ॥ आदरें जपतां केशवाचें नाम ॥ वैकुंठ तें धाम पायां पडे ॥ १ ॥ आणिक सायास करूनी कदापि ॥ चौऱ्यांशीच्या सिंपीं गुंफो नका ॥ २ ॥ याजसाठीं हरीनाम निरंतरी ॥ तारील निर्धारी भाक माझी ॥ ३ ॥ भावभक्ति क्रिया नलगे आणिक ॥ कीर्तन तारक ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ ११५० ॥ सर्वांमाजीं सार नाम हें देवाचें ॥ सर्व साधनाचें सार जें कां ॥ १ ॥ चार साहा आणिक अठरा वर्णिती ॥ नामें निज प्राप्ति

अर्धक्षणीं ॥ २ ॥ व्यासादिक नाम साधियेलें दृढ ॥ प्रपंच कावाड नीरसले ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे निजनाम ब्रह्म ॥ घेतां नेम धर्म सर्व साधे ॥ ४ ॥

॥ ११५१ ॥ अनंत ब्रह्मांडें व्यापक तें नाम ॥ अनादि निष्काम विश्वंभर ॥ १ ॥ तोचि कृष्ण परब्रम्ह द्वारकेसी ॥ पांडवा मानसीं ठसावला ॥ २ ॥ ठसावला तोचि पाहावा अनुभव ॥ पांचालागीं ठाव मग कैंचा ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे संपूर्ण आघवा ॥ नामाचिया गांवा सींव नाहीं ॥ ४ ॥

॥ ११५२ ॥ जीव शीव ग्रामीं मी तूं पण पाही ॥ हा गौरव कांहीं नाहीं नामीं ॥ १ ॥ नाहीं चतुर देह तुर्या हे उन्मनीं ॥ स्वयंभु ते खाणी निजनामाची ॥ २ ॥ नामीं जडे चित्त तेथें काय उणें ॥ लज्जित साधनें नाना जाहालीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे नामीं मीतूंपण ॥ नाहीं कांहीं आन सर्व तेंची ॥ ४ ॥

॥ ११५३ ॥ करितां वेदाध्ययन ज्योतिष ॥ नामाचा तो लेश नये हाता ॥ १ ॥ बहुत व्युत्पत्ति पुराण ॥ व्यर्थ तें स्मरण नाम नव्हें ॥ २ ॥ अनंत हें नाम जयांतुनी आलें ॥ सांतचि जिरालें जळीं जळ ॥ ३ ॥ सद्गुरु तें नाम सद्गुरुकृपेवीण कोणा ॥ साधन साधेना जपें तपें ॥ ४ ॥ नामदेव ह्मणे स्वतःसिद्ध नाम ॥ गुरुवीण वर्म हातां नये ॥ ५ ॥

॥ ११५४ ॥ ज्ञान ध्यान जप तप साधन ॥ तें नाम प्रत्ययातें नये कोणा ॥ १ ॥ गुरुपदीं जावें आधीं हो शरण ॥ मी हें माझें ओळखुन घ्यावें नाम ॥ २ ॥ तयाचें तें मूळ पाहोनियां त्यांतें ॥ मिळवावें द्वैत अद्वैतींतें ॥ ३ ॥ द्वैत द्वैतातीत तें स्वयंभू संचलें ॥ तेंचि नाम आलें त्रिभुवनीं ॥ ४ ॥ नामदेव ह्मणे परब्रह्म तें नाम ॥ द्वैत क्रियाकर्म नाहीं तेथें ॥ ५ ॥

॥ ११५५ ॥ ज्ञान व्हावें आधीं ओळखावें नांवा ॥ मग जावें गांवा तयाचीया ॥ १ ॥ या नामाचें मूळ त्या माजीं जो धाला ॥ प्रपंच्याचा घाला मग नाहीं ॥ २ ॥ नाम गावें प्रपंच सर्व आहे नाम ॥ ब्रह्मानंदें प्रेम घनदाट ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे नंदाचिया घरीं ॥ होता एक हरि दुजें नाम ॥ ४ ॥

॥ ११५६ ॥ नामामृत गोडी आहे वैष्णवांसी ॥ येरा प्राकृतांसी कळेनाचि ॥ १ ॥ प्राकृत हे जन भुललें विषयीं ॥ नामाचिया गांवीं कैसे

जाती ॥ २ ॥ नामीं चित्त व्हावें जावें तेव्हां गांवा ॥ मग नाम गोत्रा तेथें कैंचा ॥ ३ ॥ नाम तेंचि जाहालें वर्ण रूपातीत ॥ अनाम स्वतंत्र स्वयंभ तो ॥ ४ ॥ नामदेव ह्मणे नाम हें सुलभ ॥ अभक्तां दुर्लभ नाना परी ॥ ५ ॥

॥ ११५७ ॥ नाहीं भक्ती नामीं तो चांडाळ पातकी ॥ तोचि जाणा लोकीं दुष्टनष्ट ॥ १ ॥ प्रपंचीं कुकर्मीं गढोनियां ठेलें ॥ न निघती बोलें संताचीया ॥ २ ॥ कादितां त्या वाटे प्रपंच्याचें दुःख ॥ विषयाचें सुख हर्ष बहू ॥ ३ ॥ पुत्र वित्त कांता मानी भरंवसा ॥ पडे मोह फांसा जन्मवरी ॥ ४ ॥ नामदेव ह्मणे अंतीं आहे कोण ॥ कळा नामावीण नाना परी ॥ ५ ॥

॥ ११५८ ॥ देवाचे हे आत्मे ते हे जाणावे संत ॥ त्यांचे पदीं व्हावे रत सदां दृढ ॥ १ ॥ श्री हरीची भेटी सहजचि होय ॥ श्रम लया जाय झाला आधीं ॥ २ ॥ पापाचे पर्वत भस्म नामाग्नीनें ॥ अभक्तांसी हाण नामावीण ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे नामाग्नीच्या पोटीं ॥ नाना पाप कोटीं दग्ध होती ॥ ४ ॥

॥ ११५९ ॥ दग्धही होतसे आलें जें आकारा ॥ असोनी निर्धारा नाम नाहीं ॥ १ ॥ नाम अनुभवे प्रपंचचि ब्रह्म ॥ जाहाला सर्वोत्तम संतकृपें ॥ २ ॥ ह्मणोनियां संता जाउनि शरण ॥ साधावें निधान नामब्रह्म ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे संताचिया कृपे ॥ माजी नाम सोपें नांदतसे ॥ ४ ॥

॥ ११६० ॥ नांदतसे नाम आकाश पाताळीं ॥ सर्व भूमंडळीं घनदाट ॥ १ ॥ पाताळ फोडोनि किती आहे पुड ॥ नाहीं आंत वाड नभ वरी ॥ २ ॥ चौऱ्यांसी भोगीती दुर्मति पामर ॥ नाहीं सारा सारजाणत तें ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे नाम अविनाश ॥ तेथें नाना वेष नाम सर्व ॥ ४ ॥

॥ ११६१ ॥ नामचि हें आहे पंचतत्वां ठाव ॥ नाहीं दुजा भाव देखावया ॥ १ ॥ देखणारा जाहाली कर्पुराची वाती ॥ नामाग्नि विश्रांती ठाई जाहाली ॥ २ ॥ द्वैताद्वैत तेथें नेणें जाणपण ॥ गेलें हरपोन नामें सर्व ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे अनाम तें नाम ॥ नाना नामभ्रम तेथें दुजा ॥ ४ ॥

॥ ११६२ ॥ तपें दानें व्रतें यज्ञाचीया कोडी ॥ तुकितां झालीं थोकडीं हरिनामें ॥ १ ॥ न पुरे त्यांसी घातलीं त्रिभुवनींचीं तीर्थं ॥ नयेची पुरतें रामनामेंसी ॥ २ ॥ नाहीं या जीवाचें बोलणें शीवाचें ॥ उपदेशीलें वाचें शक्तीप्रती ॥ ३ ॥ नाम नाहीं वाचे हाचि पै निषधु ॥ विधि हा गोविंदु स्मरलीया ॥ ४ ॥ श्रेष्ठ सर्व नाम शिवाचें बोलणें ॥ युक्ति अनुमानें न बोले कांहीं ॥ ५ ॥ नामेंची भक्त ते पावले अपार ॥ नामें पतित नर उद्धरले ॥ ६ ॥ नामें पशु गजेंद्राचा तो उद्धार ॥ वाल्मीकें विचार हाची केला ॥ ७ ॥ गगनींधुरु केला अढळ नामें देखा ॥ नामेंची गणिका उद्धरली ॥ ८ ॥ नामें तें आपदा न बांधी प्रल्हादा ॥ मुखीं नाम सदां उच्चारितां ॥ ९ ॥ कृपाळु नाम पै मेघ हाची सार ॥ भीष्में युधिष्ठीरा उपदेशीलें ॥ १० ॥ हरिनामा परते नाहीं विचारितां ॥ नवमाध्यायीं गीता कृष्ण सांगे ॥ ११ ॥ सकल अमृत श्रीहरिचें नाम ॥ त्यामाजीं उत्तम रामनाम ॥ १२ ॥ ह्मणोनि सदाशिवें धरिलें मानसीं ॥ हेंचि गीरजेसी उपदेशीलें ॥ १३ ॥ तारक ब्रह्ममंत्र रामनाम जाण ॥ विश्वनाथ श्रवण करीतसे ॥ १४ ॥ कितर्न श्रवण हेंचि पै हो काशी ॥ ह्मणोनि मानसीं राम जपा ॥ १५ ॥ विरंची सकल शास्त्र विचारीतां ॥ हरिनाम परता मंत्र नाहीं ॥ १६ ॥ कळीकाळा त्रास हरिनाम कीर्तनें ॥ पतीतपावन प्राणी होय ॥ १७ ॥ कलियुगीं धर्म हरीचें हें नाम ॥ शुकदेवें ह्मणोन वाखाणिलें ॥ १८ ॥ नामयाचा स्वामी पंढरीचा रावो ॥ रुक्माईचा नाहो गाऊं गीतीं ॥ १९ ॥

॥ ११६३ ॥ नाम न ह्मणे आवडी ॥ व्यर्थ वाचे बडबडी ॥ १ ॥ जिव्हा नव्हे ती वाचक ॥ भोगीं आळसें नरक ॥ २ ॥ करी आरालिया निंदा ॥ परी न ह्मणे गोविंदा ॥ ३ ॥ असत्या आवडी ॥ सदां वाचेसी रोकडी ॥ ४ ॥ निंदेवांचुनी पातक ॥ सत्य जाणा माझी भाक ॥ ५ ॥ गर्जे नामाचे पवाडे ॥ पायां कळीकाळ पडे ॥ ६ ॥ निज सहज चैतन्य ॥ नामा ह्मणे नाम जाणे ॥ ७ ॥

॥ ११६४ ॥ नामाचें चरित्र सदां अतिगोड ॥ तीर्थें काय चाड नाममात्रें ॥ १ ॥ ऐसा दृढ मनीं करावा विचार ॥ नाम परिकर कलियुगीं ॥ २ ॥ नामा ह्मणे नाम ॥ अनादि अक्षर ॥ उभा कटीं कर ॥ भक्तासाटीं ॥ ३ ॥

॥ ११६५ ॥ गाणें गातीरे सुगड ॥ तयां हांसति दुवड ॥ १ ॥ नाम गोड नाम गोड ॥ होय जन्माचा निवाड ॥ २ ॥ हांसे त्यासी हांसूं द्यावें ॥ गात आपण असावें ॥ ३ ॥ नामा ह्मणे जे हांसती ॥ त्यांचीं कुळें नर्का जाति ॥ ४ ॥

॥ ११६६ ॥ विठ्ठलाचें नाम जे माउलिचे ओंठीं ॥ विठो तिचे पोटीं गर्भवासी ॥ १ ॥ जयाचिये कुळीं पंढरीची वारी ॥ विठो त्याचे घरीं बाळलीळा ॥ २ ॥ नामा ह्मणे जिव्हे काढीन मी रवा ॥ असत्य केशवा वचन होता ॥ ३ ॥

॥ ११६७ ॥ ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म ॥ गवसे परब्रह्म नामें एका ॥ १ ॥ लहान थोरांसी करितो प्रार्थना ॥ दृढ नारायणा मनीं धरा ॥ २ ॥ सर्वांप्रति माझी हेचि पै विनंति ॥ आठवा श्रीपति आपुले मनीं ॥ ३ ॥ केशव नारायण करावें आचमन ॥ तेंची संध्या स्नान कर्म तया ॥ ४ ॥ नामा ह्मणे हेंची करा नित्य भजन ॥ ब्रह्मार्पण साधन याचे पायीं ॥ ५ ॥

॥ ११६८ ॥ नामाचा महिमा नेणेंची पै ब्रह्मा ॥ ह्मणोनियां कर्मा अनुसरला ॥ १ ॥ नाम हेंची कर्म नाम हेंची धर्म ॥ केशव हेंची वर्म सांगितलें ॥ २ ॥ नाम शुद्ध स्नान नाम शुद्ध संध्या ॥ नामावीणें वेद आणिक नाहीं ॥ ३ ॥ करितां आचमन केशव नारायण ॥ करिती उच्चारण आधीं हेंची ॥ ४ ॥ लग्नाचिये काळीं म्हणती सावधान ॥ लक्ष्मीनारायण चिंतन करा ॥ ५ ॥ देहाचिये अंतीं प्रायश्चित्त देती ॥ शेवटीं वदविती रामनाम ॥ ६ ॥ ऐसीया नामा परतें नाहीं सार ॥ गिरिजेसी शंकर उपदेशी ॥ ७ ॥ करिती पितृश्राद्ध कर्म आचरती ॥ शेवटीं ह्मणती एकोविष्णु ॥ ८ ॥ नामें होय गति नामें होय मुक्ति ॥ नामयाचें चित्तीं रामनाम ॥ ९ ॥

॥ ११६९ ॥ शेतीं बीज नेतां थोडें ॥ मोटें आणितातो गाडे ॥ १ ॥ एक्या नामें हरि जोडे ॥ फिटे जन्माचें सांकडें ॥ २ ॥ बाळे भोळे जन ॥ सर्व तरती कीर्तनें ॥ ३ ॥ नामा ह्मणे नेणें मूढ ॥ नाम स्मरावें सावडें ॥ ४ ॥

॥ ११७० ॥ शंभु उपदेशी भवानिसी ॥ रामनाम जपे मानसीं ॥ १ ॥ दोन्हीं अक्षरें रसाळें ॥ महा पातकां करी निराळें ॥ २ ॥ बीजमंत्र राम-

नाम ॥ फळ शतकोटी रामायण ॥ ३ ॥ नामा विनवितो रघुनंदना ॥ विनंति परिसा दशरथनंदना ॥ ४ ॥

॥ ११७१ ॥ नाम फुकाचें चोखट ॥ नाम घेतां नलगे कष्ट ॥ १ ॥ पडशील ज्या सागरीं ॥ रामनामें आत्मा तारी ॥ २ ॥ पुत्रभावें स्मरण केलें ॥ तया वैकुंठासीं नेलें ॥ ३ ॥ नामा हें महिमान जाणे ॥ घेतो विठ्ठलाची आण ॥ ४ ॥

॥ ११७२ ॥ कृष्णनाम श्रेष्ठ गाती देव ऋषी ॥ नाम अहर्निशीं गोपाळाचें ॥ १ ॥ हरी हरी हरी तूंचि बा श्रीहरि ॥ वसे चराचरीं जनार्दन ॥ २ ॥ आदि ब्रह्माहारि आळवी त्रिपुरारि ॥ उमेप्रति करि उपदेश ॥ ३ ॥ नामा ह्मणे ब्रह्म हा जप उत्तम ॥ शंकराशी नेम दिननीशीं ॥ ४ ॥

॥ ११७३ ॥ जन्मजन्मांतरीं असेल सामोग्री ॥ तरिच नाम जिव्हाग्रीं येईल राम ॥ १ ॥ कर जोडुनि दोन्ही मोक्ष पाहे वास ॥ ह्मणे होईन दास हरिदासांचा ॥ २ ॥ तरि हें तुच्छ करूनि न पाहती दृष्टी ॥ आपंगीलें शेवटीं ब्रह्मज्ञानीं ॥ ३ ॥ नामाचेनि बळें उडविलीं साधनें ॥ तोडिलीं बंधनें संसाराचीं ॥ ४ ॥ मुक्तिपद कोणी न घेती फुकासाठीं ॥ हिंडे वाळवंटी दिनरूपें ॥ ५ ॥ योगीयांचे घर रीघे काकुलती ॥ अव्हेरिलें संतीं ह्मणोनियां ॥ ६ ॥ रिद्धीसीद्धी ह्मणती आमुची कवण गती ॥ यावे काकुलती कवणा आह्मीं ॥ ७ ॥ मोक्षमुक्ती जिहीं हाणितल्या लाथीं ॥ ते काय धरिती आमुची सोय ॥ ८ ॥ ऐसें सर्व देवांसी श्रीदेव ते पुज्य ॥ केलें एक राज्य पुंडलिकें ॥ ९ ॥ हर्वें निर्भर नामा नाचे महाद्वारीं ॥ मुखीं निरंतरीं नामघोष ॥ १० ॥

॥ ११७४ ॥ नामें तो सरता नामें तो परता ॥ नामें पंढरिनाथा भेटविलें ॥ १ ॥ नाम हेंचि तारि नाम भवसागरीं ॥ उतरी पैलतिरीं नाम तुझें ॥ २ ॥ नाम तें अंजन नामें बोधे मन ॥ नामेंचि निधान चांगया झाला ॥ ३ ॥ मार्गीं जातां तुह्मी उगेंचि नसावें ॥ वाचेसी ह्मणावें रामकृष्ण ॥ ४ ॥ रामकृष्ण हरि मुकुंदमुरारि ॥ केशव नरहरि नारायण ॥ ५ ॥ ऐसा हा सतत आठव नामाचा ॥ नामा ह्मणे कैचा दोष तया ॥ ६ ॥

॥ ११७५ ॥ रकार मकार बांधी कांरे तुळी ॥ तापत्रय होळी होऊनी जाय ॥ १ ॥ गोविंद मुकुंद हरि परमानंद ॥ कृष्ण केशव छंद नित्य वाचे ॥ २ ॥

जपे जगद्‌बंधु हरिकथा छंदु ॥ विघडे भवबंधु येणें मात्रें ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशव नकरी निर्वाण ॥ माझा अभिमान आहे त्यासी ॥ ४ ॥

॥ ११७६ ॥ करीं घेउनी ब्रह्मवीणा ॥ नारद बोळगे नारायणा ॥ १ ॥ हेंचि हेंचि तत्वसार ॥ नाम ह्मणे निरंतर ॥ २ ॥ आपण शिव आणि शक्ति ॥ रामनाम ते जपती ॥ ३ ॥ गात नाचत प्रल्हाद वीर ॥ खांबीं केलासें अवतार ॥ ४ ॥ कुंटिणी पक्षिया ह्मणे रामा ॥ तिसीं नेलें निजधामा ॥ ५ ॥ अहल्येसी लागतां चरण ॥ तिसीं आलें मनुष्यपण ॥ ६ ॥ अजामेळ पातकी अपार ॥ नामें पावला पैलपार ॥ ७ ॥ गजेंद्रें केलें स्मरण ॥ याचें तोडीलें बंधन ॥ ८ ॥ द्रौपदी स्मरे हृषीकेशी ॥ वस्त्रें पुरविलीं तियेसी ॥ ९ ॥ परिक्षितीसी घडलें स्मरण ॥ त्यासी झालें सुलभ चरण ॥ १० ॥ नामा ह्मणे निरंतरू ॥ गगनीं अढळ केला धुरू ॥ ११ ॥

---

## नामस्मरण.

॥ ११७७ ॥ भवसिंधूचा पार तरे तो पोहणार ॥ बळीया परम धीर धन्य तोची ॥ १ ॥ नामाची सांगडी लावूनि अभ्यास ॥ हृदयीं प्रेमरस वोसंडती ॥ धृ० ॥ सत्वाचा सुभट असंग एकट ॥ वैराग्य उद्भट निर्वासिन ॥ २ ॥ कामक्रोध जेणें घातलें तोरडीं ॥ निर्दाळीले वैरी लोभदंभ ॥ ३ ॥ रजतमाचे जेणें तोडीले अंकुर ॥ केला अहंकार देशधडी ॥ ४ ॥ नामा ह्मणे जया नामीं अनुसंधान ॥ तोची परम धन्य त्रिभुवनीं ॥ ५ ॥

॥ ११७८ ॥ शास्त्राचें जें सार वेदाचें गव्हर ॥ उतराया पार आणिक नाहीं ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणा उघडा मंत्र जाणा ॥ कळीकाळ अंकणा होईल तुह्मा ॥ धृ० ॥ न करावे खंडन अखंड उच्चारण ॥ तप अनुष्ठान नलगे तुह्मा ॥ २ ॥ सिद्धीचें हें सार मुक्तीचें माहेर ॥ उतरावया पार दुजें नाहीं ॥ ३ ॥ विठ्ठला परतें काय करिसी दैवत ॥ परब्रह्म निरुतें पंढरीये ॥ ४ ॥ सिद्धीचें सहज भक्तीचें हें बीज ॥ केशवीं दिल्हें मज ह्मणे नामा ॥ ५ ॥

॥ ११७९ ॥ सोयरा सुखाचा वीसांवा भक्तांचा ॥ विठोबा निजाचा मायबाप ॥ १ ॥ कृपाळु दीनाचा पडिभर नामाचा ॥ तोडर ब्रीदाचा

साच तया ॥ धृ० ॥ काया मनें याचा संग करा त्याचा ॥ अनंत जन्माचा हरेल शीण ॥ २ ॥ नामा ह्मणे आह्मां दीनांचें माहेर ॥ हरी निरंतर न विसंबे ॥ ३ ॥

॥ ११८० ॥ मुक्तिप्रद आहे एक विठ्ठल नाम ॥ आतां क्रिया कर्म कवणालागीं ॥ १ ॥ राहे राहे राहे तूं मना निवांत ॥ ध्याई अखंडित नारायणा ॥ धृ० ॥ संत समागम साधी हें साधन ॥ पावसी निर्वाण नित्य सुख ॥ २ ॥ नामा ह्मणे भज श्रीगुरूच्या पायीं ॥ तरी वर्म ठायीं पडेल जाण ॥ ३ ॥

॥ ११८१ ॥ भवसिंधूचा पार तरावयालागीं ॥ साधन कलियुगीं आणिक नाहीं ॥ १ ॥ अहर्निशीं नाम जपा श्रीरामाचें ॥ जें सकळ धर्माचें मुगुटमणि ॥ धृ० ॥ नचले वर्णाश्रमधर्म आचरण ॥ न घडे व्रत दान तप कोणा ॥ २ ॥ नव्हें तिर्थाटण पुराण श्रवण ॥ नव्हें ब्रह्मज्ञान शास्त्रबोध ॥ ३ ॥ नव्हें ध्यान स्थिति भावेंवीण वोजा ॥ न घडे देवपूजा एकनिष्ठ ॥ ४ ॥ नामा ह्मणे नाम राघोबाचें गातां ॥ ब्रह्म सायोज्यता घर रीघे ॥ ५ ॥

॥ ११८२ ॥ नामा परता मंत्र नाहीं त्रिभुवनीं ॥ ऐसी बोले वाणी वेदशास्त्रीं ॥ १ ॥ पहा विचारोनी अनुभव मनीं ॥ नका आडरानीं झणीं भरों ॥ धृ० ॥ नामावांचोनी तरले जे ह्मणती ॥ ते आधी बुडती भवसागरीं ॥ २ ॥ नामा ह्मणे नाम ॐकाराचें मूळ ॥ ब्रह्म तें केवळ विटेवरी ॥ ३ ॥

॥ ११८३ ॥ आपुली पदवी सेवकासी द्यावी ॥ तो एक गोसावी पांडुरंग ॥ १ ॥ भावाचा आळुका भुलला भक्तिसुखा ॥ सांपडला फुका नामासाठीं ॥ धृ० ॥ प्रेमाचा जीव्हाळा नामाची आवडी ॥ क्षणएक न सोडी संग त्याचा ॥ २ ॥ नामा ह्मणे आह्मा दीनाचें माहेर ॥ तो एक उदार पांडुरंग ॥ ३ ॥

॥ ११८४ ॥ ब्रह्मांडनायक विश्वाचा गोसावी ॥ तो केला पांडवीं ह्मणियारा ॥ १ ॥ भावाचा लंपट भक्तां पराधीन ॥ सोडोनी अभिमान दास्य करी ॥ धृ० ॥ भाजीचिया पाना संतोषला हरी ॥ जयाचे उदरीं चौदा भुवनें ॥ २ ॥ जनक श्रुतिदेवें धरीयेला करीं ॥ दोघाचीये घरीं

घेतों पूजा ॥ ३ ॥ पुंडलीकें बैसो टाकीयेली वीट ॥ तेथेंचि वैकुंठ वसवीलें ॥ ४ ॥ नामा ह्मणे तुह्मीं विठ्ठलची धरा ॥ चरणीं तुह्मां थारा देईल देवा ॥ ५ ॥

॥ ११८५ ॥ धिग् धिग् तो ग्राम धिग् धिग् तो आश्रम ॥ संतसमागम नाहीं जेथें ॥ १ ॥ धिग् धिग् ते संपत्ति धिग् धिग् ते संतति ॥ भजन सर्वांभूतीं नाहीं जेथें ॥ धृ० ॥ धीग् तो आचार धीग् तो विचार ॥ वाचे सर्वेश्वर नाहीं जेथें ॥ २ ॥ धीग् तो वक्ता धीग् तो श्रोता ॥ पांडुरंग कथा नाहीं जेथें ॥ ३ ॥ धीग् तें गाणें धीग् तें पढणें ॥ विठ्ठल नाम वाणें नाहीं जेथें ॥ ४ ॥ नामा ह्मणे धीग् धीग् त्याचें जीणें ॥ एका नारायणें वांचूनीयां ॥ ५ ॥

॥ ११८६ ॥ देह आहे तंव करारे धांवणी ॥ शरण चक्रपाणी रीघा वेगीं ॥ १ ॥ येर तें लटीकें इष्टमित्र सखे ॥ हें तंव पारीखे सर्व चोर ॥ धृ० ॥ लावूनी मोहातें दास्यत्व करवीती ॥ अंतकाळीं होती पाठिमोरीं ॥ २ ॥ मायेचे भुलीनें भुलली सकळें ॥ हें तुज नकळे कटकट ॥ ३ ॥ यापरी आयुष्य वेंचेलरे जना ॥ पुढें यमयातना न चुकती ॥ ४ ॥ धोतरा देऊनी चोर सर्व हरीती ॥ नामा ह्मणे गति तेची झाली ॥ ५ ॥

॥ ११८७ ॥ विठोबाचे पाय जन्मोनी जोडावे ॥ संबंधी तोडावे कामक्रोध ॥ १ ॥ ऐक्य सुख घ्यावें एकवीध भावें ॥ प्रेम न संडावें आवडीचें ॥ धृ० ॥ अनंत जन्मा यावें ऐसें भाग्य व्हावें ॥ एक वेळा जावें पंढरीसी ॥ २ ॥ वृत्तिसहीत मन पायींच ठेवावें ॥ अद्वैत भोगावें प्रेमसुख ॥ ३ ॥ देहीं देहभाव प्रकृति दंडावे ॥ सांडणें सांडावें ओंवाळुनी ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें घेतलें माझ्या जीवें ॥ विठोबा पुरवावें आर्त माझें ॥ ५ ॥

॥ ११८८ ॥ आतां आहे नाहीं पहातां क्षण एक ॥ संपत्तीचें सुख विषय हा ॥ १ ॥ हीत तें आचरा हीत तें विचारा ॥ नामीं भाव धरा जाणतेनो ॥ धृ० ॥ संपत्तीच्या बळें एक झाले आंधळे ॥ वेढीलें कळीकाळें स्मरण नाहीं ॥ २ ॥ एक विद्यावंत जातीच्या अभिमानें ॥ नेलें तमोगुणें रसातळां ॥ ३ ॥ मिथ्या माया मोह करोनी हव्यास ॥ वेंचीलें आयुष्य वायावीण ॥ ४ ॥ नामा ह्मणे कृपा करूनी ऐशा जीवा ॥ सोडवी केशवा मायबापा ॥ ५ ॥

॥ ११८९ ॥ सुख ते आपुलें चोरांशीं वांटीलें ॥ पालटें घेतलें दुःख त्याचें ॥ नित्य नवी त्याची सोसीतां सोसणी ॥ नयेची अझोनी वीट मना ॥ १ ॥ ऐसा तूं निर्लज्ज पाहे आत्मघातीं ॥ कैसी तुझी खंती न वाटे तुज ॥ धृ० ॥ लक्ष या चौऱ्यांशी सोसीतां यातना ॥ भोगीसी पतना ज्यांच्यासंगें ॥ त्यांतें भजसी सांग पुढती कोण्या मोहें ॥ विचारूनी पाहे तुझा तूंची ॥ २ ॥ सदां चिंतातुर होऊनी दीनरूप ॥ संकल्प विकल्प करिसी किती ॥ नाथीलाची छंदु नाहीं त्या दुराशा ॥ भोंवसी दाही दिशा तळमळीत ॥ ३ ॥ इंद्रियें बापुडीं दीसती केविलवाणी ॥ विषयालागोनी लोलिंगत ॥ त्यांची तूं हे आशा करिसी निरंतरी ॥ झालासी भिकारी कृपणाचा ॥ ४ ॥ आलें काळभय हाकीत टाकीत ॥ मूढा तुझें हीत कोण करी ॥ त्रिभुवनीं समर्थ बळी या जगजेठी ॥ रिघे त्याचे पाठीं ह्मणे नामा ॥ ५ ॥

॥ ११९० ॥ भजन करारे हरीहरा ॥ नारायण शिवशंकरा ॥ माझें बोलणें अवधारा ॥ भेद न करा दोघांचा ॥ १ ॥ तुह्मांसी सांगेन सत्य वृत्तांत ॥ पाहे पा तेथींचा दृष्टांत ॥ नारायणें सेवीलें अमृत ॥ झाला श्वेत महादेव ॥ २ ॥ शंभूनें गिळीलें हलहला ॥ ह्मणोनी विष्णु झाला निळा ॥ देखत देखत आंधळा ॥ झणीं होसी गव्हारा ॥ ३ ॥ लक्ष्मी रूपें आपण हरू ॥ देवें वरिला शारंगधरू ॥ गरूडरूपें महेश्वरू ॥ वहन झाला विष्णूचें ॥ ४ ॥ शक्तिरूपें शारंगपाणी ॥ नारायण झाला भवानी ॥ शारंगधर नंदी होऊनी ॥ सन्मुखासनीं बैसला ॥ ५ ॥ एक तो एका वेगळा नाहीं ॥ दृष्टांत तूं आगमीं पाहीं ॥ नामा ह्मणे एक केशव ध्यायी ॥ हरीहर पाही ज्याचे अवतार ॥ ६ ॥

॥ ११९१ ॥ मी माझें भावीतां न फिटे हें ओझें ॥ कर्मकांड दुजें आड येत ॥ १ ॥ न तुटे हें कर्म नचले हा धर्म ॥ सर्वत्र हें ब्रह्म न कळें तया ॥ धृ० ॥ मी माझें हें ओझें अहंताची वाहें ॥ परतोनी न पाहें मी कवण ॥ २ ॥

॥ ११९२ ॥ तुझाची अहंकार तुजची नाडील ॥ मागुता मांडील संसारू हा ॥ १ ॥ सांडी सांडी मोहो विषय टवाळ ॥ वाचेसी गोपाळ उच्चारी रे ॥ धृ० ॥ सर्व हें भुल मायेचें घरकुलें ॥ अहंकारें नाथीलें नाना-

योनीं ॥ २ ॥ नामा ह्मणे भजन हरीचें करीन ॥ नित्य ते सेवीन चरण-रज ॥ ३ ॥

॥ ११९३ ॥ एकांत एकला सर्व आहे हरी ॥ ऐसेंची अहर्निशीं ध्याइ-जे तूं ॥ १ ॥ सर्वांभूतीं विठ्ठल आहे आहे साचें ॥ हें तंव वेदीचें वचन जाण ॥ धृ० ॥ मार्ग हाची सोपा गेले मुनिजन ॥ जनीं जनार्दन हाची भावो ॥ २ ॥ नामा ह्मणे नाम प्रेम उच्चारण ॥ सर्वही कारण होईल तुझें ॥ ३ ॥

॥ ११९४ ॥ मंत्राचा पैं मंत्र हरी हरी उच्चार ॥ नलगे तो विचार करणें कांहीं ॥ १ ॥ सुफळ नाम गाढें वाचेसी उच्चारूं ॥ केशव हाची करूं सर्वांभूतीं ॥ धृ० ॥ नाहीं यासी पतन न होईल बंधन ॥ नित्य हेंची स्नान रामनामें ॥२ ॥ नामा ह्मणे भाव सर्वांभूतीं करा ॥ आणिक पसारा घालूं नको ॥ ३ ॥

॥ ११९५ ॥ प्रसन्न वदन सदां वीळ आहे ॥ कां करीसी उपाय कर्म जाड ॥ १ ॥ मंत्राचा पैं मंत्र बीज नाम हरीचें ॥ तेंची हें शिवाचें रामनाम ॥ धृ० ॥ तुटेल भवकंद जासील निजपंथें ॥ झणी तूं दुश्चीतें करीसी चित्त ॥ २ ॥ नामा ह्मणे भजन सर्व हरीचें करी ॥ होईल बोहरी प्रपं-चाची ॥ ३ ॥

॥ ११९६ ॥ दया हेची दाता मन करी उदार ॥ सर्व हा श्रीधर ऐसें भावी ॥ १ ॥ तुटेल यातना होईल वैकुंठ ॥ पंढरी मूळपीठ सेवी कां रे ॥ धृ०॥ इच्छिती अमर नित्य काळ नेमें ॥ दाटताति प्रेमें सनकादिक ॥ २ ॥ तें हें विठ्ठलनाम पवित्र चोखडें ॥ अंतरा माजीं चढे नित्य करी ॥ ३ ॥ होतील कामारि रिद्धिसिद्धि अपार ॥ आपण श्रीधर कुरवाळील ॥ ४ ॥ नामा ह्मणे येथें नलगेची मोल ॥ विठ्ठल नीमोल सर्वांभूतीं ॥ ५ ॥

॥ ११९७ ॥ ह्मणतां नाम वाचें वैकुंठ जवळी ॥ नित्य वनमाळी भक्ता संगें ॥ १ ॥ होईल साधन विठ्ठलीं परिपूर्ण ॥ निवती नयन मूर्ति पाहातां ॥ धृ० ॥ शंखचक्रांकित आयुधें शोभतीं ॥ भाग्योदयीं दिसती भाव शीळा ॥ २ ॥ नामा ह्मणे तें रूप पंढरीस आहे ॥ न सांडी ते सोय केशवाची ॥ ३ ॥



॥ ११९८ ॥ विसांवा विश्वाचा जो प्राण जीवाचा ॥ तोचि नित्य वाचा जपों आह्मीं ॥ १ ॥ गोविंद वामन भावयुक्त भजन ॥ सर्व जनार्दन हाचि भाव ॥ धृ० ॥ चैतन्य अचेतन नाम हेंचि सत्य ॥ निसता कृतार्थ विठ्ठल नामें ॥ २ ॥ नामा ह्मणे उद्धरण आणिक नाठवे ॥ केशवची सवें पुरे आह्मां ॥ ३ ॥

॥ ११९९ ॥ रूपासीं रूपसनाम हृषिकेश ॥ पंढरीं निवास जप करी ॥ ॥ १ ॥ विठ्ठल श्रीहरी मुकुंद श्रीहरी ॥ नामेंचि बोहरी प्रपंचाची ॥ धृ० ॥ विठ्ठल नामामृत हेंची जीवन होत ॥ नाम हें मुखांत केशवाचें ॥ २ ॥ नामा ह्मणे देव अमृताचा लाटा ॥ मुखामाजीं पैठा होत नामें ॥ ३ ॥

॥ १२०० ॥ चिंतातुर देहीं न साहे काजळी ॥ मनाची पाजळी उभय दिवीं ॥ १ ॥ प्रकाश पडेल ब्रह्म हें दिसेल ॥ वैकुंठ जोडेल भजन-भक्तीं ॥ धृ० ॥ नाहीं यातीवर्ण नाहीं या वेदोक्ति ॥ नामेंची संतृप्ति होती जीवा ॥ २ ॥ नामा ह्मणे नाम हेंची बीजसार ॥ तुटेल येरझार भव-बंधाची ॥ ३ ॥

॥ १२०१ ॥ सार पैं नाम विठ्ठलाचें आहे ॥ दिननिशीं सोय मना लावी ॥ १ ॥ गुंपेजेल मन जोडती पाउलें ॥ तुटती घेतले मायाजाळ ॥ धृ०॥ नामची कारण जप पैं सफळ ॥ उद्धार निर्मळ सकळ जीवां ॥ २ ॥ नामा ह्मणे तो हा विठ्ठल पंढरिये ॥ नाम अमृतमय चराचरीं ॥ ३ ॥

॥ १२०२ ॥ नीसुगा नीदसुरा झणीं तूं बा होसी ॥ नाम हृषीकेशी घाली मुखीं ॥ १ ॥ गोविंद हरे कृष्ण विष्णु हरे ॥ अच्युत मुरारे जनार्दन ॥ धृ० ॥ करितां नामपाठ चुकती भवजाळ ॥ तुटतील ते वेळ मायामोह ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसा उपाव सुगम ॥ दिननिशीं नेम राम ह्मणे ॥ ३ ॥

॥ १२०३ ॥ सर्वभूतीं हरी आहे आहे साच ॥ मायाजाळ न छळें भावीकांसी ॥ १ ॥ सर्व ब्रह्म ऐसें बोलें वेद गाढा ॥ ब्रह्मींचा पवाडा अगम्य तो ॥ धृ० ॥ जाणतां नेणतां हरीनाम उच्चार ॥ मार्ग तो साचार सुफळ सदां ॥ २ ॥ नामा ह्मणे कारण जिव्हा होय स्मरण ॥ सर्व नारायण हरी दिसे ॥ ३ ॥

॥ १२०४ ॥ नलगती कथा व्युत्पति उलथा ॥ वाउग्या चळथा ग्रंथांचिया ॥ १ ॥ हरि हरि भजन जनीं जनार्दन ॥ सर्वत्रीं समान भूतदया

॥ धृ० ॥ भावेंचि भजावें हरीतें पुजावें ॥ नित्य हें सेवावें रामनाम ॥ २ ॥ नामा ह्मणे गोड नको तें हे वाड ॥ विठ्ठलाचें वेड इतुकें पुरे ॥ ३ ॥

॥ १२०५ ॥ भावेंची भजन जनीं जनार्धन ॥ नित्य हें वचन रामनाम ॥ १ ॥ खुंटतील योनी तुटेल यातना ॥ भक्ति नारायणा पावेल तुझी ॥ धृ० ॥ स्मरे सदां कांरे नलगती पाल्हाळ ॥ वसीजे गोपाळ सर्वांभूतीं ॥ ॥ २ ॥ नामा ह्मणे ब्रह्म सर्व हरी ॥ येकु चराचरीं जनार्दन ॥ ३ ॥

॥ १२०६ ॥ वेदाचें महिमान जनीं जनार्दन ॥ आणिक वचन तेथें नाहीं ॥ १ ॥ भूतदया धरा भक्ति भावें करा ॥ भजन हरीहरा वेद सांगे ॥ धृ० ॥ सर्व हेंची सार ब्रह्ममय खरें ॥ आणिक दुसरें न दिसे आह्मां ॥ २ ॥ नामा ह्मणे समर्थ वेद तो आमुचा ॥ सांगे नित्य जपा रामकृष्ण ॥ ३ ॥

॥ १२०७ ॥ सार पैं सांगत उपनिषध तुह्मां ॥ वाचें रामनामा जप करा ॥ १ ॥ हेंचि पैं मथीत सांगोनियां गेले ॥ उच्चारीतां ठेले ब्रह्मरूप ॥ धृ० ॥ ज्योतीसी ते ज्योति भजन करील ॥ आपणची होईल हरी स्वयें ॥ २ ॥ नामा ह्मणे कैसें विपरीत करणें ॥ भूतदया धरणें सर्वांभूतीं ॥ ३ ॥

॥ १२०८ ॥ उपदेश विव्हळ नकळे याचा अर्थ ॥ वायांची हा स्वार्थ प्रपंचाचा ॥ १ ॥ सांडी हा प्रपंच मिथ्या लवलाहो ॥ विठ्ठल हा टाहो नित्य करी ॥ धृ० ॥ हरी हरी भजन भज दयासीळ ॥ होसील निर्मळ ब्रह्मरूप ॥ २ ॥ सर्व हा आकार हरीचें शरीर ॥ मायेचा विकार भुलों-नका ॥ ३ ॥ आप तेजीं ब्रह्म हरी माझा सम ॥ आदिअंतीं नेम विठ्ठल हरी ॥ ४ ॥ नामा ह्मणे उपमा काय द्यावी यासी ॥ नाम तारी सर्वांसीं कलिमाजीं ॥ ५ ॥

॥ १२०९ ॥ नाम हें अमृत भक्तासी लाधलें ॥ आपण घेतलें बौध्य-रूप ॥ १ ॥ नाम हें आळवा नाम हें आळवा ॥ होईल दोहावा कामधेनु ॥ धृ० ॥ न बाधेल विघ्न प्रपंच हें भान ॥ नाम हेंची खूण वैकुंठीची ॥ २ ॥ नामा ह्मणे जडजीव ब्रह्म असे सर्व ॥ हा गीतेमाजीं भाव सांगितला ॥ ३ ॥

॥ १२१० ॥ गीता हेची गंगा गुह्यभाव पैं गा ॥ नाम हेंची वेगा सोडवण ॥ १ ॥ सर्व ब्रह्म हरी सांगतसे मुरारी ॥ विश्वरूप श्रीहरी आपण

झाला ॥ धृ० ॥ उपदेश अर्जुना जनीं जनार्दना ॥ अखंड भावना भूतदया ॥ २ ॥ नामा ह्मणे सर्व आहे हाचि देव ॥ उदार माधव सर्वांभूतीं ॥ ३ ॥

॥ १२११ ॥ एकट येकला सर्व हें सकळा ॥ आपणची झाला विश्व हरी ॥ १ ॥ नकळे याची माव कैसा आहे भाव ॥ सर्वांभूतीं देव गीता सांगे ॥ धृ० ॥ भूतदया धरा भजावें श्रीधरा ॥ नाम एक स्मरा विठ्ठल ऐसें ॥ २ ॥ नामा ह्मणे देव पंढरीपाटणीं ॥ पावेल निर्वाणीं नाम घेतां ॥ ३ ॥

॥ १२१२ ॥ संसार पाल्हाळ सांगसी परीकर ॥ नाम तें श्रीधर न ह्मणसी ॥ १ ॥ कैसें तुज उद्धरण होईल गव्हारा ॥ भजन सा हरीहरा करी वेगीं ॥ धृ० ॥ योनी नानाविधा पावसी आपदा ॥ हाचि खेळ सदां स्मरतोसी ॥ २ ॥ नामा ह्मणे लटिकें प्रपंचासी मुके ॥ राम हेंची मुखें जप करी ॥ ३ ॥

॥ १२१३ ॥ विठ्ठलनामीं आळस नकरी गव्हारा ॥ वायांची येरझारा शीणतोसी ॥ १ ॥ हरि उच्चारण करी हा विचार॥ नामची साचार उद्धरण ॥ धृ० ॥ मी ह्मणतां अहंता वाढे हे सर्वथा ॥ परी भजना परता नाहीं मार्ग ॥ २ ॥ मायाजाळ विषय तोडी तोडी सांठा ॥ विठ्ठलनाम पाठा बोळगे जना ॥ ३ ॥ सर्व हें लटिकें मोहजाळ फिकें ॥ नामेंवीण एकें नाहीं दुजें ॥ ४ ॥ नामा ह्मणे उपदेश भजे केशवास ॥ वैकुंठनिवास बोळगे तुज ॥ ५ ॥

॥ १२१४ ॥ तोडी हें बीरडें मोह ममता आधीं ॥ विषयबाधा व्याधी गुंफो नको ॥ १ ॥ असे घराश्रमीं भजे सर्वांभूतीं ॥ मी माझें पुढती ह्मणो नको ॥ धृ० ॥ तूं तंव लटिका आलासी कोठुनी ॥ मी माझें ह्मणोनी ह्मणतोसी ॥ २ ॥ नामा ह्मणे मूळ राम परब्रह्म ॥ जगाचा विश्राम त्यासी भजे ॥ ३ ॥

॥ १२१५ ॥ सदां पैं परिपूर्ण जयाचें रूपडें ॥ तेथेंची माजीवडे मन करी ॥ १ ॥ होईल उद्धार सुटेल संसार ॥ सर्व मायापूर दरी होय ॥ धृ० ॥ कंटाळा कायेचा दुरावा मायेचा ॥ हेंची जप वाचा स्मरे राम ॥ १ ॥ नामा ह्मणे करी सर्व हरी हरी ॥ राम हें उत्तरीं वाखाणी पां ॥ ३ ॥

॥ १२१६ ॥ मन करी आपुलें वासना ते निवारी ॥ सर्व हेंची हरी भजत जाय ॥ १ ॥ ब्रह्मनाम गोविंद नाहीं भेदाभेद ॥ तुटे भवबंध हरि-

नामें ॥ धृ० ॥ सांडी लगबग नकरीं तूं आळस ॥ विठ्ठलीं विश्वास असों देणें ॥ २ ॥ नामा ह्मणे ब्रह्म हेंची निरूपण ॥ सर्व काम पूर्ण याच्या नामें ॥ ३ ॥

॥ १२१७ ॥ मी ह्मणतां अहंता होईल पूर्णता ॥ भजन सर्वथा न घडे येणें ॥ १ ॥ आपुलें आपण विचारावें धन ॥ हरि हाची पूर्ण भजे कां रे ॥ धृ० ॥ हेंची भजन थोर करी निरंतर ॥ नाम हें सधर मनें गिळी ॥ २ ॥ नामा ह्मणे अपार नाम पारावार ॥ श्रीराम सुंदर जप करी ॥ ३ ॥

॥ १२१८ ॥ ह्मणे दीनबंधु तुह्मीं सावध व्हावें ॥ संतांसीं नमन नाम वाचें जपावें ॥ १ ॥ नामावीण साधन नाहीं या कलियुगीं ॥ व्यर्थ श्रम भोगी पाहातां मत्तें ॥ धृ० ॥ मत्ताभिमान करोनि तुह्मीं जाल आडवांटा ॥ अभिमानें ठकवीलें नारदादि श्रेष्ठां ॥ २ ॥ आलीया जन्मास आतां न करी आळस ॥ नामदेवा लागीं सांगे जगन्निवास ॥ ३ ॥

॥ १२१९ ॥ विष्णूसी भजला शिव दूराविला ॥ अधःपात झाला तया नरा ॥ १ ॥ शिवपूजा करी विष्णूसी अव्हेरी ॥ तयाचीये घरीं यम नांदे ॥ धृ० ॥ विष्णुकथा ऐके शिवासी जो निंदी ॥ तयासी गोविंदीं ठाव नाहीं ॥ २ ॥ नामा ह्मणे असती शिवविष्णु एक ॥ वेदाचा विवेक आत्माराम ॥ ३ ॥

॥ १२२० ॥ निंदील हें जन सुखें निंदूं द्यावें ॥ सज्जनीं क्षोभावें नये बापा ॥ १ ॥ निंदा स्तुति ज्याला समान पैं झाली ॥ त्याची स्थिति आली समाधीला ॥ धृ० ॥ शत्रुमित्र ज्याला समसमानत्वें ॥ तोची पैं देवातें आवडला ॥ २ ॥ माती आणि सोनें ज्या भासे समान ॥ तो एक निधान योगीराज ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे भक्त जे असती ॥ तेणें पावन होती लोक तिन्हीं ॥ ४ ॥

॥ १२२१ ॥ अभ्यासीले वेद झाला शास्त्र बोध ॥ साधिल्या विविध नाना कळा ॥ प्रेमाचा जीव्हाळा जंव नाहीं अंतरीं ॥ तंव कैसा श्रीहरि करील कृपा ॥ १ ॥ हीत तें आचरा हीत तें विचारा ॥ नामीं भाव धरा जाणतेनो ॥ धृ० ॥ प्रसंगीं पुराणें ऐकीलीं श्रवणीं ॥ त्यांतील कोण मनीं धरील अर्थ ॥ काय तें सांडिलें काय तें मांडिलें ॥ काय तें दंडिलें प्रवृत्तीसी ॥ २ ॥ अनंत ह्या मूर्ति पाहिल्या लोचनीं ॥ त्यांतील कोण ध्यानीं भति-

बिंबली ॥ स्वप्नीचीया परी देखसी अभ्यास ॥ न धरीच विश्वास चित्त तुझें ॥ ३ ॥ वांझेचीये स्तनीं अमृताची धनी ॥ मृगजळ पाणी तान्हा-वोलें॥ तरी प्रेमेवीण कळती क्रियाकर्में ॥ हातीं येती वर्में विठोबाचीं ॥ ४ ॥ दृष्टीचें देखणें श्रवणीचें ऐकणें ॥ मनाचें बैसणें एक होय ॥ नामा ह्मणे तरी विठो येउनी भेटे ॥ कायाच पालटे कैवल्य होय ॥ ५ ॥

॥ १२२२ ॥ तुह्मीं आह्मीं जाऊं चला ॥ भेटूं जीवलगा विठ्ठला ॥ १ ॥ विठो सांपडला फुका ॥ जो दुर्लभ तिहीं लोकां ॥ धृ० ॥ वेदापुराणासी वाड ॥ तो हा भावीकांसी भ्याड ॥ २ ॥ नामा ह्मणे वंदूं चरण ॥ कांहीं पुसूं जिवींची खूण ॥ ३ ॥

॥ १२२३ ॥ पैल दक्षिणेचा वारा ॥ येतां देखीला समोरा ॥ १ ॥ चला चला पंढरपुरा ॥ विठोबारायाच्या नगरा ॥ धृ० ॥ पायीं संतांच्या लागत ॥ पाचारितो पंढरिनाथ ॥ २ ॥ नामा ह्मणे वेग करा ॥ विठ्ठल भक्तांचा सोइरा ॥ ३ ॥

॥ १२२४ ॥ भक्त प्रल्हादाकारणें ॥ सा वैकुंठीहुनी धांवणें ॥ १ ॥ नर-हरी पातला पातला ॥ महा दोषा पळ सुटला ॥ धृ० ॥ शंख चक्र पद्म गदा ॥ नाभी नाभीरे प्रल्हादा ॥ २ ॥ दैत्य धरी मांडीवरी ॥ नखें विदारी नरहरी ॥ ३ ॥ पावला गरुडध्वज ॥ नामया स्वामी केशवराज ॥ ४ ॥

॥ १२२५ ॥ तुटे मायाजाळ विघडे भवसिंधु ॥ जरीं लागे छंदु हरि-नामाचा ॥ १ ॥ येर कर्मधर्म करीतां या कलीं ॥ माजी कोण बळी तरला सांगा ॥ धृ० ॥ न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध ॥ नामाचे प्रबंध पाठ करा ॥ २ ॥ नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान ॥ करावी सोपान कृष्णकथा ॥ ३ ॥ न साधे हा योग न करवे वैराग्य ॥ साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ ४ ॥ नामा ह्मणे साधन नलगे आणिक ॥ दिधली मज भाक पांडुरंगें ॥ ५ ॥

॥ १२२६ ॥ देवा सन्मुख दीपमाळा ॥ कोणी भक्त हो उजळा ॥ १ ॥ तेल घालारे फारसें ॥ नामा ह्मणे रे उल्हासें ॥ २ ॥ नामा दीपमाळ पाजळी ॥ तेणें भक्ति त्यास झाली ॥ ३ ॥

॥ १२२७ ॥ कळावंताच्या कळाकुसरी ॥ सा मी नेणें गा श्रीहरी ॥ १ ॥ वारा धांवे भलत्या ठायां ॥ तैसी माझी रंग छाया ॥ धृ० ॥

प्रेमभातें भरलें अंगीं ॥ तेणें छंदें नाचे रंगीं ॥ २ ॥ घातमात नेणें देवा ॥ नामा विनवीतो केशवा ॥ ३ ॥

॥ १२२८ ॥ नाम घेतां भगवंताचें ॥ पाश तुटती भवाचे ॥ १ ॥ जे जे नामीं रत झाले ॥ ते ते केशवीं तारिले ॥ धृ० ॥ गणिका दुराचारी ॥ नामें तारिली अहिल्या नारी ॥ २ ॥ महा पापी अजामेळ ॥ तोही तारिला चांडाळ ॥ ३ ॥ नामें गजेंद्र तारिला ॥ देवें मोक्षपदासी नेला ॥ ४ ॥ नाम घेतसे पांचाळी ॥ उभा बाप वनमाळी ॥ ५ ॥ नामा सांगे भाविकांसीं ॥ नाम घ्यारे अहर्निशीं ॥ ६ ॥

॥ १२२९ ॥ वैष्णव तो बळी ॥ सदाशिव चंद्रमौळी ॥ १ ॥ साचा भक्त तो रावण ॥ मारूनी छेदीला अभिमान ॥ धृ० ॥ आणिक तो बाणासुर ॥ छेदीला शिवासमोर ॥ २ ॥ अनिरूद्धा समयीं ख्याती ॥ केली तयाची फजीती ॥ ३ ॥ भस्मासुर भस्म झाला ॥ जाळुनियां भस्म केला ॥ ४ ॥ मारुनीयां मुक्त केले ॥ परि ते भक्त नाहीं झाले ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवादि देव ॥ भजावया पंढरिराव ॥ ६ ॥

॥ १२३० ॥ पोटासाठीं जरी करी हरिकथा ॥ जन रंजवीता फिरतसे ॥ १ ॥ तेणें घात केला एकोत्तरशत कुळाचा ॥ पाहुणा यमाचा श्रेष्ठ थोर ॥ धृ० ॥ द्रव्याचिये आशें हरिकथा करी ॥ तया यमपुरीं नित्य वास ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसे होत जे रे कोणी ॥ ते नर नयनीं पाहूं नये ॥ ३ ॥

॥ १२३१ ॥ हरिभक्त ह्मणविणें आणि हरिदर्शना नाहीं जाणें ॥ बोलतां लाजिरवाणें अहोजी देवा ॥ १ ॥ पतिव्रता ह्मणविणें आणि परपुरुषीं विचारणें ॥ बोलतां लाजिरवाणें अहोजी देवा ॥ २ ॥ क्षत्रिय ह्मणविणें आणि पाठीशीं घाय साहणें ॥ बोलतां लाजिरवाणें अहोजी देवा ॥ ३ ॥ पितृभक्त ह्मणविणें आणि पितृआज्ञा न करणें ॥ बोलतां लाजिरवाणें अहोजी देवा ॥ ४ ॥ ऐसे भक्त किती गेले अधोगति ॥ नामा ह्मणे श्रीपति दास तुझा ॥ ५ ॥

॥ १२३२ ॥ सुवर्ण आणि परिमळ ॥ हिरा आणि कोमळ ॥ योगी आणि निर्मळ ॥ हें दुर्लभ जी दातारा ॥ १ ॥ देव जरी बोलता ॥ तरी कल्पतरु चालता ॥ गज जरी दुभता ॥ हें दुर्लभ जी दातारा ॥ धृ० ॥ धनवंत आणि दयाळु ॥ व्याघ्र आणि कृपाळु ॥ अग्नि आणि सीतळु ॥

हें दुर्लभ जी दातारा ॥ २ ॥ सुंदर आणि पतिव्रता ॥ सावधान होय श्रोता ॥ पुराणीक तरी ज्ञाता ॥ हें दुर्लभ जी दातारा ॥ ३ ॥ क्षत्रिय आणि शूर भला ॥ चंदन फुलीं फुलला ॥ स्वरूपीं गुण व्यापिला ॥ हें दुर्लभ जी दातारा ॥ ४ ॥ ऐसा संपूर्ण सर्व गुणीं ॥ केवी पाविजे शारंगपाणी ॥ विष्णुदासनामा करी विनवणी ॥ मुक्ति चरणीं त्याचीया ॥ ५ ॥

॥ १२३३ ॥ नानापरिचीं दैवतें ॥ बहुत असतीं असंख्यातें ॥ सेंदुर शेरणी जीं इच्छितीं ॥ तीं काय आर्त पुरविती ॥ १ ॥ अंध नको होऊं आलीया ॥ भज भज पंढरिराया ॥ सोडूं नको विष्णु त्रिपारणिया ॥ तोडी कुलुप पाठी गळ टोंचोनीयां ॥ धृ० ॥ बाळा अबळा मुकी मौळी ॥ क्षुद्र देवता जीवदान बळी ॥ तेणें न पावसी सुख कल्लोळीं ॥ एक विठ्ठला वांचूनियां ॥ २ ॥ नाना धातूची प्रतीमा केली ॥ षोडशोपचारें पूजा केली ॥ दुकळी विकुनी खादली ॥ तें काय आर्त पुरविती ॥ ३ ॥ आतां दृढ धरोनीया भाव ॥ वोळगा वोळगा पंढरिराव ॥ आपुले चरणीं देईल ठाव ॥ विष्णुदास नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १२३४ ॥ आणीक ही मंत्र मोक्षदानी खरे ॥ अशौचाचा थार असूं नये ॥ १ ॥ नाममंत्र कांहीं बाधीना कोणासी ॥ जया अहर्निशीं रामकृष्ण ॥ २ ॥ तपाची मांडणी आकाशाचे खेंव ॥ इंद्रियांची हांव राहे तरी ॥ ३ ॥ यज्ञ तो आचार धनाचें सांकडें ॥ तरी जाण द्राड स्वर्गसुख ॥ ४ ॥ नामा ह्मणे नाम साधकाची माता ॥ जैसें तैसें घेतां भक्ति जोडे ॥ ५ ॥

॥ १२३५ ॥ नामाचा प्रताप जाणवेना कोणा ॥ समुद्रीं पाषाण तारीयेले ॥ १ ॥ आवडीनें कोणी चिंतितां उल्हास ॥ काय तो तयास उपेक्षील ॥ २ ॥ कुंटिणी ते नीच राव्यासाठीं नेली ॥ वैकुंठीं ठेविली सारुप्यानें ॥ ३ ॥ अजामिळ खळ पुत्राचिया मिषें ॥ उद्धरिलें त्यास दिनानाथें ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगों आतां किती ॥ नामापाशीं मुक्ति उभी असे ॥ ५ ॥

॥ १२३६ ॥ सुलभ सोपारें नाम केशवाचें ॥ आठवितां वाचे दोष जाती ॥ १ ॥ अनाथाचा सखा उभा नामापासीं ॥ ऐसा तो प्रेमासी भुललासे ॥ २ ॥ जातीवंत आह्मी वेदाचे पाठक ॥ तरी सर्व फिकें नामावीण ॥ ३ ॥ नामा ह्मणे नामीं रंगलों सतत ॥ ह्मणोनी अनंतें दिधली भेटी ॥ ४ ॥

॥ १२३७ ॥ नामें सदां शुद्धि प्राणिया होतसे ॥ नामापाशीं असे भुक्तिमुक्ति ॥ १ ॥ नामा ऐसें सोपें नाहीं त्रिभूवनीं ॥ नाम संजीवनी साधकासी ॥ २ ॥ नामें भक्ति जोडे नामें कीर्ति वाढे ॥ नामें सदां चढे मोक्ष हातां ॥ ३ ॥ यज्ञ दान तप नामें आलीं हातां ॥ नामें सर्व सत्ता प्राप्त होय ॥ ४ ॥ नामा ह्मणे सदां नाम ज्याचे मुखीं ॥ नाहीं याच्या तुकीं दुजा कोणी ॥ ५ ॥

॥ १२३८ ॥ ब्राह्मण व शूद्र वश्यै नारी नर ॥ सर्वांसीं आधार नाम सत्य ॥ १ ॥ नामावीण गति नाहीं हो आणीक ॥ वैकुंठनायक बोले मुखें ॥ २ ॥ परी तेंची नाम पाहावें शोधुनी ॥ चौऱ्याशीं खाणी चुके तेव्हां ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे सद्गुरू पासोनी ॥ नाम घ्या शोधुनी भावमुक्त ॥ ४ ॥

॥ १२३९ ॥ आलीया संसारीं आत्माराम मुखीं ॥ घेतलीया सुखी त्रिभूवनीं ॥ १ ॥ जाणोनियां नाम आपुलेंचि आधीं ॥ मग सोमसिद्धि सर्व साधे ॥ २ ॥ सर्व हरी मग नाहीं दुजा भाव ॥ प्रपंचिक गर्व दिसेचिना ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे सर्वदां साधनें ॥ भरे जन वन नानापरी ॥ ४ ॥

॥ १२४० ॥ आकारिक नाम जिवानें ठेविलें ॥ शिवानें तें केलें निर्विकल्प ॥ १ ॥ जीव शीव दोन्ही विराले ज्यामाजीं ॥ तें नाम सहजी आद्य आहे ॥ २ ॥ तया नामावीण जावयासी ठाव ॥ नाहीं दुजा भाव तिळभरी ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे नाम घनदाट ॥ प्रपंच निघोट नानापरी ॥ ४ ॥

॥ १२४१ ॥ व्यापक तें नाम तेव्हांच होईल ॥ जेव्हां ओळखेल मीपणासी ॥ १ ॥ आपुलेंचि नाम न ओळखीलें ॥ व्यापक साधीलें जायचीना ॥ २ ॥ आपुलीच ओळख आपणासी पडे ॥ मग सर्वत्र जोडे नाम तेव्हां ॥ ३ ॥ नामावीण नाम तेंचि होय विभ्रम ॥ नामदेव ह्मणे संतां पुसा ॥ ४ ॥

॥ १२४२ ॥ सद्गुरूवांचुनी नाम नये हातां ॥ साधन साधितां कोटीगुणें ॥ १ ॥ जैसा कांतेवीण करणें संसार ॥ तैसा हा व्यापार साधनाचा ॥ २ ॥ जंव सद्गुरु नाहीं केला भ्रतार ॥ साधन विचार व्यर्थ गेला ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे सद्गुरूपासोनी ॥ नाम घ्या जाणोनी नाना कांहीं ॥ ४ ॥

॥ १२४३ ॥ राम हेंचि स्नान राम हेंची ध्यान ॥ रामें घडे यज्ञ कोटी देखा ॥ १ ॥ न लगती साधनें नाना मंत्र विवेक ॥ रामनामीं सुख रंगी

कारें ॥ २ ॥ नामा ह्मणे नाम हेंचि वचन आह्मां ॥ नित्य ती पौर्णिमा सोळा कळी ॥ ३ ॥

॥ १२४४ ॥ सदाशिवापुढें कोण अनुष्ठानी ॥ अष्टांग लावूनी नमस्कारी ॥ १ ॥ नाम यज्ञ जन ऋषेश्वर ध्याती ॥ शीतळ ते होती काळकुट ॥ २ ॥ सर्वांमाजी श्रेष्ठ नाम कलियुगीं ॥ रामकृष्ण जगीं नामनौका ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाम अखंडित स्मरा ॥ पांडुरंग धरा भजा वेगीं ॥ ४ ॥

॥ १२४५ ॥ हरी हर ब्रह्मा इंद्रादिकां देवां ॥ इच्छितातीं केशवा पायधुळी ॥ १ ॥ यावरी गोपाळ आनंदें नाचती ॥ भूषणें श्रीपति शोभायमान ॥ २ ॥ पाहोनियां सुख आले सर्व देव ॥ पंढरीचा राव पाहावया ॥ ३ ॥ नामा ह्मणे मिषें गोपाळ काल्याचें ॥ निरंतर वाचे घेत नाम ॥ ४ ॥

॥ १२४६ ॥ नामचि जो जाणें आनु कांहीं नेणें ॥ संसार नामावीणें जाईजणा ॥ १ ॥ नाम स्मरे त्यासी संसार नाहीं ॥ खुंटली ते पाही येरझार ॥ २ ॥ नाम न होय त्याचे जळों जालेपण ॥ आळसी वांयावीण संसारासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज नामींच संरसु ॥ नाम स्मरे हृषीकेशु त्यासी पावे ॥ ४ ॥

॥ १२४७ ॥ अनंत जन्में मेळवितां दुर्लभ ॥ तो प्राणवल्लभ शंकराचा ॥ १ ॥ वेदशास्त्र मंथुनी काढियेलें सार ॥ ब्रह्मादिकां पार रामनामें ॥ २ ॥ स्वर्गींचे देव चिंतितातीं मनीं ॥ एकवेळां क्षणीं भेटी देई ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवाचें नाम उच्चारितां ॥ विघ्नासी भंगितां नवल काय ॥ ४ ॥

॥ १२४८ ॥ नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम ॥ नामारूपा भिन्न नाहीं नाहीं ॥ १ ॥ आकारला देव नामारूपा आला ॥ ह्मणोनी स्थापिलें नामवेदीं ॥ २ ॥ नामा परता मंत्र नाहीं हो आणिक ॥ सांगती ते मूर्ख ज्ञानहीन ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाम केशव केवळ ॥ जाणती प्रेमळ भक्त भले ॥ ४ ॥

॥ १२४९ ॥ नामाचें सामर्थ्य नेणें वेदशास्त्र ॥ शेषाचीं वक्त्रें मौनावलीं ॥ १ ॥ गंगा गणपति सूर्य चंद्र श्रेष्ठ ॥ शंकर वरिष्ठ मौनावले ॥ २ ॥ भीष्मपाराशर उद्धव अंगद ॥ ब्रह्मा मुचकुंद मौनावले ॥ ३ ॥ नामा ह्मणे येरे काय जाणे स्तुति ॥ दाटोनी श्रीपति उभा केला ॥ ४ ॥



॥ १२५० ॥ येऊनी संसारां ॥ हितवेगीं विचारा ॥ १ ॥ स्मरा हृषी-केशी ॥ तो नेईल परलोकासी ॥ २ ॥ गणिका नाम उच्चारी वाचे ॥ जन्म मरण चुकलें तिचें ॥ ३ ॥ अजामेळ पापराशी ॥ नामें पावला मोक्षासी ॥ ४ ॥ दूध मागों गेलें लेंकरूं ॥ तया दिधला क्षीरसागरू ॥ ५ ॥ सापत्नी धुरू दवडिला ॥ तो अढळपदीं बैसविला ॥ ६ ॥ गजेंद्र स्मरत तांतडीं ॥ त्याची चुकविली सांकडीं ॥ ७ ॥ नामा ह्मणे नामबळें ॥ उद्धरती कोटी कुळें ॥ ८ ॥

॥ १२५१ ॥ काय सांगूं तुझी करणी नारायणा ॥ वेदपारायणा केशीराजा ॥ १ ॥ पृथ्वीवरी तीर्थें आहेत अपार ॥ परी पंढरिची सर एका नाहीं ॥ २ ॥ जन्मोजन्मीचीया पातकां दरारा ॥ चुके येरझारा एके खेपें ॥ ३ ॥ ब्रह्मज्ञानेंवीण मोक्ष आहे भूतीं ॥ वाचेसी ते घेती विठ्ठलनाम ॥ ४ ॥ बेताळीसासहित जातील वैकुंठा ॥ नामा ह्मणे भेटा विठ्ठल देवीं ॥ ५ ॥

॥ १२५२ ॥ केशवाचे प्रतापें गोसावी होसी ॥ दास्यत्व करोनी सर्वस्व पोशी ॥ १ ॥ अर्जुनाचा सारथी बळीचा सांगाती ॥ द्रौपदीच्या आकांतीं धांवोनी पावे ॥ २ ॥ चातका जलधरू मच्छा जीवन नीरू ॥ प्रल्हादा कैवारू दास ह्मणोनी ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मी न करा आळसु ॥ नाममंत्र दिवसु अभ्यासिजे ॥ ४ ॥

॥ १२५३ ॥ जळाचा जळबिंदु जळींच तो विरे ॥ तैसें हें विघरे पांचा ठायीं ॥ १ ॥ जीव शीव हे उच्चार राम हें मधुर ॥ जिव्हेसी उच्चार रामनाम ॥ २ ॥ रामनाम तारक शिव षडाक्षरी ॥ तैसी वाचा करी अरे मूढा ॥ ३ ॥ नामा ह्मणे ध्यान शिवाचें उत्तम ॥ मंत्र हा परम राम-नाम ॥ ४ ॥

॥ १२५४ ॥ चतुर्विंशती नामें केशव कैवल्य कृपाळ ॥ नारायणें उद्ध-रिला अजामेळ ॥ माधव मनीं धरा निश्चळ ॥ गोविंद गोपाळ गोकुळींचा ॥ १ ॥ विष्णु विश्वाचा जिव्हाळा ॥ मधुसूदन माउली सकळां ॥ त्रिविक्रमें रक्षिलें गोकुळा ॥ वामनें पाताळीं बळी नेला ॥ २ ॥ श्रीधरें सृष्टि धरिली पृष्ठीं ॥ हृषीकेश उभा भीवरेतटीं ॥ पद्मनाभ पुंडलिका साठीं ॥ दामोदरें गोष्टी पांडवांशीं ॥ ३ ॥ संकर्षणें अर्जुनासी संवाद केला ॥ वासुदेव अवचितां वाळी वधिला ॥ प्रद्युम्न समुद्रावरी कोपला ॥

अनिरुद्धें छेदिला सहस्रबाहो ॥ ४ ॥ पुरुषोत्तमें केला पुरुषार्थ ॥ अधोक्षजें हिरण्यकश्यपा मारिली लाथ ॥ नरहरि प्रल्हादा रक्षित ॥ स्मरावा अच्युत स्वामी माझा ॥ ५ ॥ जनार्दनें रावणादि वधिले ॥ उपेंद्रें अहिल्येसी उद्धरिलें ॥ हरिहरि ह्मणतां दोष जळाले ॥ कृष्णें तारिलें गणिकेसी ॥ ६ ॥ या चोवीस नामांचें करितां स्मरण ॥ जन्म मरणाचें होय दहन ॥ विष्णुदासनामा करी चिंतन ॥ चरण ध्यान मज देई ॥ ७ ॥

॥ १२५५ ॥ हरिनाम गातां पवित्र ॥ सेविती हरिहर ब्रह्मादिक ॥ १ ॥ नाम तारी नाम साहाकारी ॥ नामें उच्चारी रूपें तुझीं ॥ २ ॥ ऐसीं अनंत नामें तुझीं न वर्णवती देवा ॥ नामा ह्मणे केशवा विनवीतसे ॥ ३ ॥

॥ १२५६ ॥ नाम उत्तम उत्तम ॥ वाचे बोलूं पुरुषोत्तम ॥ १ ॥ नाम साराचें हें सार ॥ शरण येती यमकिंकर ॥ २ ॥ नाम घेतां हो पांचाळी ॥ नामें तरला हो वाल्हाकोळी ॥ ३ ॥ नामें गजेंद्र तारिला ॥ मोक्षपदीं जागा झाला ॥ ४ ॥ नामा ह्मणे भाविकाशीं ॥ नाम घ्यावें अहर्निशीं ॥ ५ ॥

॥ १२५७ ॥ कृष्णकथा सांग जेणें तुटे पांग ॥ नलगे तुज उद्वेग करणें कांहीं ॥ १ ॥ समर्थ सोइरा राम हा निधान ॥ जनीं जनार्दन एक ध्याई ॥ २ ॥ नामा ह्मणे उच्चार रामकृष्णसार ॥ तुटेल येरझार भवाब्धीची ॥ ३ ॥

॥ १२५८ ॥ भवाब्धि तारण रामकृष्ण नांव ॥ रोहीणीची माव सकळ दिसे ॥ १ ॥ नाम हेंची थोर नाम हेंची थोर ॥ वैकुंठीं बिदार रामनामें ॥ धृ० ॥ राम हे निशाणी जपताची अढळ ॥ वैकुंठ तत्काळ तया जीवा ॥ २ ॥ नामा ह्मणे वैकुंठ नामेंची जोडेल ॥ अंतीं तुज पावेल नाम एक ॥ ३ ॥

॥ १२५९ ॥ करितां हरिकथा नाम सुखरासी ॥ उद्धार जीवाशीं एका नामें ॥ १ ॥ तें हें रामनाम जपें तूं सप्रेम ॥ जप हा सुगम सुफळ सदां ॥ धृ० ॥ नामेंची तरलें नामेंची तरलें ॥ नाम ह्मणतां गेलें वैकुंठासी ॥ २ ॥ नामा ह्मणे एक नामेंसी विनटे ॥ ते वैकुंठीचे पेठें पावले देखा ॥ ३ ॥

॥ १२६० ॥ नामावांचुनी कांहीं दुजें येथें नाहीं ॥ वेगीं लवलाही राम जपा ॥ १ ॥ गोविंद गोपाळ वाचेसी रसाळ ॥ पावसी केवळ निजपद ॥ धृ० ॥ ध्रुव प्रल्हाद बळी अंबऋषि प्रबुध ॥ नामेंची विद्रद पावले देखा ॥ २ ॥ नामा ह्मणे राम वाचे जया नाम ॥ संसाराचे श्रम हरे नामें ॥ ३ ॥

॥ १२६१ ॥ ह्मणतां वाचे नाम वंदी तया यम ॥ काळादिकासम वंदी तया ॥ १ ॥ ऐसें नाम श्रेष्ठ सकळासी वरिष्ठ ॥ उच्चारितां नीट वैकुंठ गाजे ॥ धृ० ॥ तो हा नाममहिमा वाखाणीत ब्रह्मा ॥ न कळे तया उपमा आदिअंतीं ॥ २ ॥ नामा ह्मणे पाठें नामाचेनि वाटे ॥ तरी प्रत्यक्ष प्रगटे विठ्ठल हरी ॥ ३ ॥

॥ १२६२ ॥ विष्णुनाम श्रेष्ठ गाताती देवऋषि ॥ नाम अहर्निशीं गोपाळाचें ॥ १ ॥ हरि हरि हरि तूंची बा श्रीहरी ॥ वसे चराचरीं जनार्दन ॥ धृ० ॥ आदी ब्रह्म हरी आळवी त्रिपुरारि ॥ उमेप्रती करी उपदेश ॥ २ ॥ नामा ह्मणे पूर्ण ब्रह्म जप उत्तमोत्तम ॥ शंकरासी नेम दिननिशीं ॥ ३ ॥

॥ १२६३ ॥ कां करितोसी शीण वाचे नारायण ॥ जपतां समाधान होईल तुज ॥ १ ॥ कृष्णा हरी गोविंद हरे गोविंद ॥ वाचेसी हा छंद नाम पाठ ॥ धृ० ॥ वंदितील यम कळिकाळ सर्वदां ॥ नपवसी आपदा असतां देहीं ॥ २ ॥ नामा ह्मणे वोलगे सीण झाला सांगें ॥ प्रपंच वाउगे टाकी परतें ॥ ३ ॥

॥ १२६४ ॥ नामाचेनि पाठें जातील वैकुंठें ॥ तो पुंडलीक पेठें प्रगट असे ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल मंत्र सांगतसे शास्त्र ॥ आणिक नाहीं शस्त्र नामेंवीण ॥ धृ० ॥ पुराण व्युत्पत्ति न लगती त्या श्रुती ॥ हरिनाम पंथीं मुनि गेले ॥ २ ॥ नामा ह्मणे हरी नामेंची उद्धरी ॥ जन्माची येरझारी हरे नामें ॥ ३ ॥

॥ १२६५ ॥ सर्वांभूतीं भज नमन करी संता ॥ नित्य सा अच्युता स्मरण करी ॥ १ ॥ ऐसें भजनीं विनट सांपडेल वाट ॥ रामकृष्ण नीट वैकुंठीची ॥ धृ० ॥ नलगती साधनें वायांचि बंधनें ॥ एका नामें होणें चतुर्भुज ॥ २ ॥ नामा ह्मणे थोर नामेंचि सधर ॥ वैकुंठीं बिढार तया भक्तां ॥ ३ ॥

॥ १२६६ ॥ तूं तंव नेणता परी हरि जाणतां ॥ आहे तों समता सर्वांभूतीं ॥ १ ॥ सर्व ब्रह्म हरी येकची निर्धारी ॥ होसील झडकरी ब्रह्म तूंची ॥ धृ० ॥ अच्युत माधव अमृताच्या पाठें ॥ लागतांची वाटे वंदी यम ॥ २ ॥ नामा ह्मणे होसील जिवलग विष्णूचा ॥ दास त्या हरीचा आवडता ॥ ३ ॥

॥ १२६७ ॥ कां करिसी सोस मायेचा असोस ॥ नव्हे तुज सौरस नामेंवीण ॥ १ ॥ नामचि हा मंत्र नामचि हो तंत्र ॥ नामेंवीण पवित्र न होसी देखा ॥ धृ० ॥ तिहीं लोकीं पाहतां नामेंविण सर्वथा ॥ अच्युत ह्मणतां पुण्य कोटीं ॥ २ ॥ नामा ह्मणे ब्रह्म आदिअंतीं नेम ॥ तें विटेवरी सम उभें असे ॥ ३ ॥

॥ १२६८ ॥ पवित्र परिकर नाम हा उच्चार ॥ उद्धरण साचार जगा या ॥ १ ॥ गोविंद केशव उच्चार श्रीराम ॥ न लगती नेम अमुप जप ॥ धृ० ॥ तें हें विठ्ठलरूप पिकलें पंढरीं ॥ नाम चराचरीं विठ्ठल ऐसें ॥ २ ॥ नामा ह्मणे विठ्ठल सर्वांत सखोल ॥ उच्चारितां मोल नलगे तुज ॥ ३ ॥

॥ १२६९ ॥ पोसीशी शरीर इंद्रियाचा बांधा ॥ सखी ते आपदा करील तुज ॥ १ ॥ नव्हे तुझें हित विषय पोषितां ॥ हरी हरी ह्मणतां उद्धरसी ॥ धृ० ॥ वांयांच पाल्हाळ चरित्र सांगसी ॥ परी राम हें न ह्मणसी अरे मूढा ॥ २ ॥ नामा ह्मणे हेंची पंढरीये निधान ॥ उच्चारितां जन तरले ऐसे ॥ ३ ॥

॥ १२७० ॥ विषय खटपट आचार सांगसी ॥ विठ्ठलीं न भजसी अरे मूढा ॥ १ ॥ पूर्णब्रह्म हरी विठ्ठल श्रीहरी ॥ अंतीं हा निर्धारी तारील सत्य ॥ धृ० ॥ नलगे सायास करणें उपवास ॥ रामाचा विश्वास ऐसा धरी ॥ २ ॥ नामा ह्मणे प्रेम धरी तूं सप्रेम ॥ विठ्ठल हाची नेम दिननिशीं ॥ ३ ॥

॥ १२७१ ॥ नव्हे तुज हित विषय पोशीतां ॥ हरी हरी ह्मणतां तरसील ॥ १ ॥ माधव श्रीहरी कृष्ण नरहरी ॥ वेगीं हा उच्चारी लवलाही ॥ धृ० ॥ घडतील यज्ञ पापें होतील भग्न ॥ प्रपंच सर्वज्ञ होईल ब्रह्म ॥ २ ॥ नामा ह्मणे हरिकथा हरी भवव्यथा ॥ उद्धरसी सर्वथा भाक माझी ॥ ३ ॥

॥ १२७२ ॥ उपदेश सुगम आईकरे एक ॥ नाम हें सम्यक विठ्ठलाचें ॥ १ ॥ जनीं जनार्दन भावची संपन्न ॥ विठ्ठल उद्धरण कलीमाजीं ॥ धृ० ॥ साधेल निधान पुरेल मनोरथ ॥ नामेंचि कृतार्थ होसी जना ॥ २ ॥ नामा ह्मणे नाम घेई तूं झडकरी ॥ पावसी निर्धारीं वैकुंठपद ॥ ३ ॥

॥ १२७३ ॥ सर्वांग साजीरीं आहेतीं इंद्रियें ॥ तंव सावध होय हरी कथे ॥ १ ॥ कीर्तन नर्तन वाचे जनार्दन ॥ नपवसी पतन येरझारीं ॥ धृ० ॥ पूर्ण मनोरथ घडती एकानामें ॥ दाटेल सप्रेमें जीवनहेतु ॥ २ ॥ नामा ह्मणे विलास नकरी तूं आणिक ॥ सर्वां सर्वां येक नाम असे ॥ ३ ॥

॥ १२७४ ॥ सर्वां भूतीं भजन हेंची पैं चोखडें ॥ ब्रह्म माजीवडे करोनी घेई ॥ १ ॥ सफळ सर्वदां जप हा गोविंदा ॥ न पावाल आपदा नाना योनी ॥ धृ० ॥ नाम संजीवनी अमृत सरीता ॥ परिपूर्ण भरिता सिंधु ऐसा ॥ २ ॥ नामा ह्मणे चोखडें नाम हेंची गाढें ॥ चुकवील कोडें जन्ममरण ॥ ३ ॥

॥ १२७५ ॥ तुझें तुज सांकडें पडलें थोर कोडें ॥ तें करी माजीवडे ब्रह्मार्पण ॥ १ ॥ ब्रह्म हरी ध्याई मन ठेवी ठायीं ॥ विठ्ठलाच्या पायीं दिननिशीं ॥ धृ० ॥ अनुभव रहणी विठ्ठल निशाणी ॥ घडेल पर्वणी नित्यकाळ ॥ २ ॥ नामा ह्मणे सुघड मन करी वाड ॥ इंद्रियांची चाड धरूं नको ॥ ३ ॥

॥ १२७६ ॥ कां करीसी हव्यास इंद्रियांचा सोस ॥ वांया कासावीस कोण्या काजें ॥ १ ॥ सर्वहि लटिकें माया मोहबंधन ॥ सत्य हें निधान विठ्ठल एक ॥ धृ० ॥ उगवेल प्रपंच सर्व हें आहाचें ॥ रामकृष्ण वाचे वांध जिव्हे ॥ २ ॥ नामा ह्मणे करणी करावी पैं ऐसी ॥ जेणें त्या विठ्ठलासी पाविजेसा ॥ ३ ॥

॥ १२७७ ॥ सोपा हा सुगम उपावो परीस ॥ धरी तूं विश्वास नाममहीमें ॥ १ ॥ नाम हेंची गंगा नाम हेंची भीमा ॥ अंतरीं श्रीरामा जपीजेसु ॥ धृ० ॥ अमृत सुरस रामनाम एक ॥ वाचेचें वाचक मनकरी ॥ २ ॥ नामा ह्मणे सुरस सेवीं सुधारस ॥ ध्यायीं केशवास दिननिशीं ॥ ३ ॥

॥ १२७८ ॥ एकची क्षरलें एकची देखिलें ॥ ब्रह्म हें संचलें हरिनामें ॥ १ ॥ एक एकाकार सर्वही आकार ॥ राम हा साकार सर्वां घटीं ॥ धृ० ॥ असोनि निराळा सुमनाचा वास ॥ तैसा ऋषिकेश जिवां सकळा ॥ २ ॥ नामा ह्मणे सुमन कळीकाळें एक ॥ तेंची निज सुख घेई जना ॥ ३ ॥

॥ १२७९ ॥ एक तत्व हरी निर्धार तूं धरी ॥ प्रपंच बोहरी एका नामें ॥ १ ॥ अच्युत गोविंद परमानंद छंद ॥ नित्य तो आल्हाद हरिनामीं ॥ धृ० ॥ ऐसा तूं विनटे हरी नाम पाठें ॥ जासील वैकुंठें नश्वरिता ॥ २ ॥ नामा ह्मणे तत्व नाम गोविंदाचें ॥ हेंचि धरी साचें येर वृथा ॥ ३ ॥

॥ १२८० ॥ साधन साधितां होताती आपदा ॥ ह्मणोनि गोविंदा स्मरे कां रे ॥ १ ॥ कृष्णकथा सार सांगे कांसधर ॥ तुटेल येरझार जन्ममरणा ॥ धृ० ॥ निष्कळ निखळ भावीं तूं सफळ ॥ भजन केवळ सर्वांभूतीं ॥ २ ॥ नामा ह्मणे भक्ति होईल विरक्ति ॥ तुटेल यातायाती जन्ममरण ॥ ३ ॥

॥ १२८१ ॥ आसनीं शयनीं जपतां चक्रपाणी ॥ लाविली निशाणी वैकुंठींची ॥ १ ॥ कैंचें रे बंधन आह्मां जीवन्मुक्तां ॥ गाणीं गुण गातां विठोबाचे ॥ २ ॥ भवसिंधूची जिवां झाली पायवाट ॥ जे गर्जती उद्भट नामघोष ॥ ३ ॥ प्रेमें वोथरत नामें पिटूं टाळी ॥ नाम हृदयकमळीं विठोबाचें ॥ ४ ॥ नाहीं कांहीं क्लेश न करी सायास ॥ दृढ धरी विश्वास हरिनामीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे साधन नलगे अनेक ॥ दिली मज भाक पांडुरंगें ॥ ६ ॥

॥ १२८२ ॥ जप तप अनुष्टान हरी ॥ एकचि तो नमस्कारी ॥ भूतद्वेष कदां न करी ॥ तप सामोग्री हेचि तुझी ॥ १ ॥ हरी माधव यादवा ॥ कृष्णा गोविंदा केशवा ॥ येणें करोनीयां जीवा ॥ सर्वकाळ रंजवी ॥ धृ० ॥ स्मरतां हरीचें नाम ॥ पळोनि जाती काळयम ॥ तुटती नाना योनीजन्म ॥ गर्भवासा मग नये ॥ २ ॥ नामा जपे नामावळी ॥ अखंड तप हेंचि सदांकाळीं ॥ हरी नामें पिटोनि टाळी ॥ हाचि तरणोपाय सकळांचा ॥ ३ ॥

॥ १२८३ ॥ पंढरीचा राजा उभा भक्तकाजा ॥ उभारूनि भुजा वाट पाहे ॥ १ ॥ घ्यारे नाम सुखें प्रेमें अलोलिक ॥ साधनें आणिक करूं नका ॥ २ ॥ मनाचेनि मनें हृदयीं मज धरा ॥ वाचेनें उच्चारा नाम माझें ॥ ३ ॥ बोलोनियां ऐसा उभा भीमातीरीं ॥ नामा निरंतरी चरणापाशीं ॥ ४ ॥

॥ १२८४ ॥ विठ्ठलासी पाहे विठ्ठलासी ध्याये ॥ विठ्ठलासि गाये सर्वकाळ ॥ १ ॥ विठ्ठल हा वृत्ति विठ्ठल जपणें ॥ चित्त वित्त मनें सर्वकाळ

॥ २ ॥ सबाह्य विठ्ठल दाटे घनवट ॥ दशादिशा अफाट विठ्ठलचि ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मी विठ्ठल होऊन ॥ अभंग भजन करीतसा ॥ ४ ॥

॥ १२८५ ॥ केशव ह्मणतां क्लेश जाताती परतें ॥ त्याहूनी सरतें आणिक नाहीं ॥ १ ॥ वेद कां पढसी शास्त्रें कां शिणसी ॥ उदंड वाचेसी हरी ह्मणा ॥ धृ० ॥ याहुनी पै सार नाहीं हो दुसरें ॥ भीष्में युधिष्ठीर उपदेशीला ॥ २ ॥ नामा ह्मणे धरा केशवीं विश्वास ॥ तुटे गर्भवास नामें एके ॥ ३ ॥

॥ १२८६ ॥ कृष्ण भक्तिवीण तरला आहे कोण ॥ द्यावा निवडोन एक तरी ॥ १ ॥ कार्य कारण लटिकाचि श्रम ॥ नकळोनियां वर्म वायां गेले ॥ २ ॥ नामा ह्मणे माझी खेंचर माउली ॥ विठोनें दाविली वाट मज ॥ ३ ॥

॥ १२८७ ॥ कुटिल कुबुद्धि कुपात्र कठोरी ॥ अंगिकारी हरि अश्वत्थामा ॥ १ ॥ अश्वत्थामा अंबऋषि दुर्योधन ॥ शेवटीं अर्जुन हितकारी ॥ २ ॥ मानी भावभक्ति आश्चर्य सकळ ॥ शंकर शीतळ होय नामें ॥ ३ ॥ नामा ह्मणे आधीं नाममंत्र घोका ॥ नाहीं भय धोका किमपीही ॥ ४ ॥

॥ १२८८ ॥ केशव ह्मणे माझें परियेसा वचन ॥ निजगुज सांगेन अंतरींचें ॥ १ ॥ व्रत तप दान सकळ पैं क्रिया ॥ एक भूतदया जेथें वसे ॥ २ ॥ तोचि सत्य मानी भला अथवा ज्ञानी ॥ न विसंबे निर्वाणीं जीवें त्यासी ॥ ३ ॥ ज्ञानाचें सौभाग्य भक्ति आणि वैराग्य ॥ तयाचें आरोग्य प्रेमरस ॥ ४ ॥ त्यासी संजीवन सदां संतसंग ॥ त्यावरी अनुराग वज्र कवच ॥ ५ ॥ धर्मअर्थकाम मोक्ष दृष्टी नाणी ॥ ओळंगती अंगणीं मुळीं चारी ॥ ६ ॥ अनुहात गजर होतसे नामाचा ॥ दीप त्या लक्षाचा पाजळत ॥ ७ ॥ इंद्रपदादिक नाशिवंत सुखें ॥ जीं अर्ध निमिषें होतीं जातीं ॥ ८ ॥ ऐसें जाणों साच न धरा त्यांची आस ॥ अखंड माझा वास हृदयीं त्याच्या ॥ ९ ॥ तेणें साच्या उच्छिष्टा झालों पैं अधिकारी ॥ ब्रह्मरस सरी न पवे तेथें ॥ १० ॥ ह्मणऊनि संसारी धन्य शिंपी नामा ॥ जेणें माझा प्रेमा अनुभविलें ॥ ११ ॥

॥ १२८९ ॥ धांवोनियां देव गळां घाली मिठी ॥ स्फुंद स्फुंदुन गोष्टी सांगतसे ॥ १ ॥ आषाढीं कार्तिकीं विसरूं नका मज ॥ सांगतसें गुज तुह्मांलागीं ॥ २ ॥ अनाथांचा नाथ आहें मी रे खरा ॥ तुमचेनि बरा दिसतसे ॥ ३ ॥ तिहीं त्रिभुवनीं नाहीं कोणी मज ॥ नामा ह्मणे गुज सांगतसे ॥ ४ ॥

॥ १२९० ॥ सकळ संतजन देखोनि नयनीं ॥ टाळिया पिटोनि गाती नाम ॥ १ ॥ ह्मणती धन्य भक्त निधडा वैष्णव ॥ ब्रह्मादिकां माव न कळे याची ॥ २ ॥ कैसा ऋणिया येणें केला पंढरिनाथ ॥ आहे सदोदित याचे जवळीं ॥ ३ ॥ पूर्वी तो प्रल्हाद श्रवणीं ऐकिला ॥ किंवा हा देखीला संतांमधीं ॥ ४ ॥ नामा येऊनियां चरणासीं लागला ॥ हृदयीं आलिंगिला भक्तराज ॥ ५ ॥

---

## सगुण निर्गुण स्वरूप वर्णन.

॥ १२९१ ॥ वेडावली वाचा वेदाची बोलतां ॥ देवा पाहूं जातां अनिर्वाच्य ॥ १ ॥ अनिर्वाच्य वाचा बोलावया गेली ॥ जिव्हा है चिरली भूधराची ॥ २ ॥ भूधराची जिव्हा झालीसे कुंठित ॥ नामा ह्मणे अंत नलगे साचा ॥ ३ ॥

॥ १२९२ ॥ जेथें नाहीं कांहीं नामरूप गुण ॥ बोलती निर्गुण तयांलागीं ॥ १ ॥ तोचि गोकुळांत होउनी गोंवळ ॥ ह्मणवीतो बाळ यशोदेचा ॥ धृ० ॥ चिन्मय चिद्रूप अक्षय अपार ॥ परेहुनी पर ह्मणती ज्यातें ॥ २ ॥ सर्वां भूतांचे फुटकाये खोळें ॥ भरलें न गळे आत्मपणें ॥ ३ ॥ आनंदी आनंद मातला अपार ॥ वेदालाही पार नाहीं ज्याचा ॥ ४ ॥ नामा ह्मणे सर्व रूपें जें रूपस ॥ गोकुळीं विलास मांडियेला ॥ ५ ॥

॥ १२९३ ॥ अनंत ह्मणती माझीया स्वामीतें ॥ अनंत गुण सातें ह्मणोनीयां ॥ १ ॥ पतित पावन ह्मणती माझीया स्वामीतें ॥ उद्धरी पतितातें ह्मणोनीयां ॥ धृ० ॥ विश्वंभर ह्मणती माझिया स्वामीतें ॥ पोशितो विश्वातें ह्मणोनियां ॥ २ ॥ जगजीवन ह्मणती माझिया स्वामीतें ॥ जीववी जगातें ह्मणोनियां ॥ ३ ॥ हृषीकेश ह्मणती माझिया स्वामी तें ॥

चाळी इंद्रियातें ह्मणोनियां ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशव ह्मणती स्वामीतें ॥ नासीतो क्लेशातें ह्मणोनीयां ॥ ५ ॥

॥ १२९४ ॥ प्रथम अवतारीं देव मच्छ झाले सागरीं ॥ वधोनी शंखासुर वैरी आणिले वेद ॥ १ ॥ कूर्म अवतारीं सांवरीली सृष्टी ॥ वराहद्रिज नेहटी धरणीधरू ॥ धृ० ॥ प्रल्हाद कैवारा स्तंभाभितरीं ॥ बळी बंधन हरी प्रगट झाला ॥ २ ॥ रेणुका नंदन द्रिजकुळ पाळण ॥ त्रिंबक भजन रघुनाथ ॥ ३ ॥ गोकुळीं अवतारू सोळासहस्र वरू ॥ आपण योगेश्वरू बौध्य रूपीं ॥ ४ ॥ कल्की अवतारू वदतसे वरू ॥ नामया दातारू केशीराज ॥ ५ ॥

॥ १२९५ ॥ नामाचा धारक विष्णुरूप देख ॥ वैकुंठीचें सुख रुळे पायीं ॥ १ ॥ निराकार देव आकारासी आला ॥ भक्ती पैं स्थापिला नामरूपा ॥ धृ० ॥ नाममंत्र बीज जोंवरी नाहीं जया ॥ तोंवरी केशवदया नाहीं प्राप्त ॥ २ ॥ नामा ह्मणे नाम केशव केवळ ॥ जाणती प्रेमळ हरीभक्त ॥ ३ ॥

॥ १२९६ ॥ ओंवाळु गेली मी वो द्रारके ॥ जिकडे पाहें तिकडे चतुर्भुज सारिखें ॥ १ ॥ लाजीलेगे माये आतां कोणा ओंवाळु ॥ जिकडे पाहातां तिकडे चतुर्भुज गोपाळु ॥ धृ० ॥ लाजोनीयां आली सखीयां माझारीं ॥ जिकडे पाहातां तिकडे चतुर्भुज नरनारी ॥ २ ॥ श्रीवच्छलांछन हेंची ओळखण ॥ वीष्णुदास नामायानें सांगितली खूण ॥ ३ ॥

॥ १२९७ ॥ श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं ॥ तेथें माझी दृष्टी बैसलीसे ॥ १ ॥ कटावरी कर समचरण साजिरे ॥ देखावया झुरे माझें मन ॥ २ ॥ माहेरीची आस दसरा दिवाळी ॥ बाहे ठेवी निढळी वाट पाहे ॥ ३ ॥ बंदिजन नामा उभा महाद्वारीं ॥ कीर्ति चराचरीं वर्णितसे ॥ ४ ॥

॥ १२९८ ॥ सहस्रदळांत आकाशाच्या परी ॥ राहोनी शरीरीं शोभा दावी ॥ १ ॥ तेंचि नटें थाटें उभा विटेवरी ॥ कर कटावरी ठेऊनियां ॥ २ ॥ जयाचिये नाभीं जन्मला विधाता ॥ तेथोनी वाढता लोक झाला ॥ ३ ॥ श्रुतीचेये वाचे नोहें गोचर ॥ जेथें अवतार तिहीं देवा ॥ ४ ॥ नामा ह्मणे विश्वंभरू आणिक ॥ अंगुळ दशक आहे जें कां ॥ ५ ॥

॥ १२९९ ॥ काष्टीं अग्नीं असे प्रगटे नयनीं ॥ काष्टींही असोनी वेगळाची ॥ १ ॥ तैसें निर्धारितां असें पै सकळां ॥ दावितां निराळा पांडुरंग ॥ २ ॥ तरुबीजीं जैसें सर्व व्यापक असे ॥ जळाविण नसे फळ पहा कीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे बीज नासिलें तें भोग ॥ तूंचि पांडुरंग आह्मांसाठीं ॥ ४ ॥

॥ १३०० ॥ जीव विठ्ठल आत्मा विठ्ठल ॥ परमात्मा विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥ जनक विठ्ठल जननी विठ्ठल ॥ सोयरा विठ्ठल सांगाती ॥ २ ॥ अहिक्य विठ्ठल परत्र विठ्ठल ॥ निरंतर विठ्ठल तारीता ॥ ३ ॥ नाम विठ्ठल रूप विठ्ठल ॥ पतित पावन विठ्ठल विठ्ठल नामा ॥ ४ ॥

॥ १३०१ ॥ तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल ॥ देव विठ्ठल देवपूजा विठ्ठल ॥ १ ॥ माता विठ्ठल पिता विठ्ठल ॥ बंधु विठ्ठल गोत्र विठ्ठल ॥ २ ॥ गुरु विठ्ठल गुरुदेवता विठ्ठल ॥ निधान विठ्ठल निरंतर विठ्ठल ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज-विठ्ठल सांपडला ॥ ह्मणोनी कळिकाळां पाड नाहीं ॥ ४ ॥

॥ १३०२ ॥ मत्स्य कच्छ क्रोड मृग ते खुजट ॥ जेथुनी प्रगट झालीं रूपें ॥ १ ॥ तेंचि ब्रह्म उभें भिंवरेच्या तिरीं ॥ हात कटावरी ठेवूनियां ॥ २ ॥ मातृघाती हिंडे वनीं जो रडत ॥ चोर जार घात करी दुष्ट ॥ ३ ॥ दिगंबर अश्वारूढ खड्गधारी ॥ पृथ्वीचा जो करी ग्रास एक ॥ ४ ॥ नामा ह्मणे मुंगी आदि ब्रह्मवरीं ॥ नाना अवतारीं एकलाचि ॥ ५ ॥

॥ १३०३ ॥ पुष्पासी परिमळु दूध घृत मेळु ॥ ऊंस तो रसाळु बीज नाहीं ॥ १ ॥ तैसें परब्रह्म आहे तें निर्वाण ॥ वर्णितां पुराण नपडे ठायीं ॥ २ ॥ दीपाचीही दीप्ति दर्पणाची कांति ॥ तैसी ब्रह्ममति कवण जाणे ॥ ३ ॥ नामा ह्मणे जैसें सर्वां घटीं आकाश ॥ केशव परमहंस तैसा जाणे ॥ ४ ॥

॥ १३०४ ॥ ब्रह्मीं ब्रह्म एक मुळीं नाहीं जग ॥ सर्व मायायोग कल्प जाणां ॥ १ ॥ स्थावर जंगम सर्व मायोपाधि ॥ जाण पां त्रिशुद्धि आत्मज्ञानें ॥ २ ॥ रवीच्या किरणीं जैसें मृगनीर ॥ तैसें ब्रह्मीं कीर विश्व झालें ॥ ३ ॥ नामा ह्मणे वाचा ऐका निज खूण ॥ स्वरूपीं तल्लिन होऊनि राहे ॥ ४ ॥

॥ १३०५ ॥ निर्गुण सगुण नाहीं ज्या आकार ॥ होऊनि साकार तोची ठेला ॥ १ ॥ जळीं जळगार दिसे जैशा परी ॥ तैसा निराकारी

साकार हा ॥ २ ॥ सुवर्ण कीं धन धन कीं सुवर्ण ॥ निर्गुणीं सगुण ययापरी ॥ ३ ॥ ऐसा पूर्णपणें सहजीं सहज ॥ सखा केशीराज प्रगटला ॥ ४ ॥ पांडुरंगीं अंगें सर्व झालें जग ॥ निववी सर्वांग नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १३०६ ॥ वैकुंठीं पाहे तंव चतुर्भुज दिसे ॥ परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥ १ ॥ क्षीरसागरीं पाहे तों तेथें निद्रिस्त ॥ परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥ २ ॥ द्वारके पाहे तंव पाताळीं चरण ॥ परी सुंदर रूप तेथें नाहीं ॥ ३ ॥ हृदयीं पाहे तंव अव्यक्तचि दिसे ॥ परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसा सर्व गुण संपूर्ण ॥ पंढरीये उभा शोभतसे ॥ ५ ॥

॥ १३०७ ॥ अमराचें ठेवणें विश्वाचें जीवन ॥ सौभाग्य लावण्य रखुमाईचें ॥ १ ॥ धन्य गौळियां जीणें कृष्ण बाळपण ॥ यशोदा नंदन क्रीडा करी ॥ २ ॥ अंगें स्थूळपणें ब्रह्म खेळा येणें ॥ लीला सामावणें रोमरंध्रीं ॥ ३ ॥ विष्णुदास नामा दैवेंची लाहाणें ॥ ज्या घरीं खेळणें परब्रह्म ॥ ४ ॥

॥ १३०८ ॥ आपणची कर्ता आपणची मित्र ॥ आपण सर्वत्र हरि झाला ॥ १ ॥ साधन साधितां हरि दिसे पूर्ण ॥ प्रपंच हें भान न देखें डोळां ॥ २ ॥ किमर्थ हें टवाळ मायामोह जाळ ॥ वायांच पाल्हाळ कोरडे करा ॥ ३ ॥ नामा ह्मणे सखोल विठ्ठल पूर्ण बोल ॥ उच्चारितां मोल नलगे कांहीं ॥ ४ ॥

॥ १३०९ ॥ एक तत्व एकाकार सर्व देशीं ॥ एक तो नेमेसी सकल जनीं ॥ १ ॥ ऐसें ब्रह्म पहा आहे सर्व एक ॥ नलगे विवेक करणें कांहीं ॥ २ ॥ मिथ्या हें डंबर माया मथितार्थ ॥ हरि हाची स्वार्थ वेगीं करी ॥ ३ ॥ नामा ह्मणे समर्थ बोलिला तो वेद ॥ नाहीं भेदाभेद ब्रह्मपणीं ॥ ४ ॥

॥ १३१० ॥ कमळगर्भा मनीं थोर चिंता करी ॥ पद्म ठसेवरी उमटताती ॥ १ ॥ नीलोत्पल जैसे चरण वानूं कैसे ॥ सकुमार राजस विठ्ठलाचे ॥ २ ॥ लावण्यसागरु रूप पाहों ठेली ॥ दृष्टी पैं खुंटली रुक्मिणीची ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठोचे चरण सकुमार ॥ तेथें वाहे धार गंगादेवी ॥ ४ ॥

॥ १३११ ॥ काळा गे दादुला पाहतां आकळू ॥ तो झाला गोवळू नंदाचा ॥ १ ॥ काळागे दादुला काळागे दादूला ॥ पंढरीं पहा चला विठ्-

लगे ॥ १ ॥ काळा ह्मणोनी पाहों गेलों जवळां ॥ सुनीळू सांवळा दिस-तसे ॥ ३ ॥ नामा ह्मणे सर्व भक्षितो हा काळू ॥ भक्तांचा कृपाळू श्री-विठ्ठल ॥ ४ ॥

॥ १३१२ ॥ कोकिळे चित्कळा रत्नाची ते कीळा ॥ मान कीं सोज्वळा वर्णू हरीचा ॥ १ ॥ वृंदावनीं वेणू वाजे रुणुंझुणूं ॥ वेध तनमनु गोपा-ळांचा ॥ १ ॥ देहुडा पाउलीं हरि गोपाळा गोजिरीं ॥ वाहाती ते लालोरी हरि छंदें ॥ ३ ॥ वेधलीं वनचरें गोधनें अपारें ॥ पक्षीकुळें साचारें तल्लिन झालीं ॥ ४ ॥ यमुनेचें उदक जळचरें सम्यक ॥ पाताळीं पन्नग एको ठेली ॥ ५ ॥ ऐसे कृष्ण वेधें तल्लिन झाले बोधें ॥ नामा ह्मणे वेणूछंदें स्थिर झाली ॥ ६ ॥

॥ १३१३ ॥ धन्य गोकुळ महीतळीं मंडळ ॥ सुखावलें ब्रह्म जेथें झालें सगुण ॥ १ ॥ काय न कळे आवडी याचा भाव ॥ सुख नेलें रे गोवळीं ह्मणती देव ॥ २ ॥ आलें वैकुंठ भूवनीं विकृती ॥ ते हे पाहवी गौळियांची विश्रांती ॥ ३ ॥ योगीयांचे ध्यानीं उबगलें ॥ तया गौळि-यांचे अनुरागीं रंगलें ॥ ४ ॥ वेद श्रुतीसी पारू न कळे ॥ कोण सुख सर्वांहुनी आगळें ॥ ५ ॥ नामया स्वामी आमुचें कुळदैवत ॥ शरण जाऊनी गौळिया मागूं उच्चिष्ट ॥ ६ ॥

॥ १३१४ ॥ ध्यान सांवळें गोकुळींचें ॥ धांव पाव वेगीं हरि सांव-ळिया ॥ धृ० ॥ सांवळीसी आंगीं उटी ॥ सांवळी कस्तुरी लल्लाटीं ॥ सांवळीसी कांसे कांसियला कटीं ॥ गोवळिया ॥ १ ॥ सांवळीसी तनु बरवी ॥ सांवळें वृंदावन मिरवी ॥ सांवळ्याशा तुळसी कानीं ॥ मंजुरीया कोंवळिया ॥ ३ ॥ सांवळीसी माळा कंठीं ॥ सांवळें हृदयीं पदक विशाळ ॥ सांवळ्याशा गोपी केल्या ओंवळ्या ॥ गोंवळिया ॥ ३ ॥ सांवळीसी हातीं काठी ॥ सांवळासा कांबळा पाठीं ॥ नामयाचा स्वामी गायी राखी ॥ धवळ्या आणि पिंवळ्या ॥ ४ ॥

॥ १३१५ ॥ शब्दामृत मांडे येती भोजना ॥ अभ्यासी अज्ञाना तरी फळें ॥ १ ॥ मुंगीचे थडके फुटे जों आकाश ॥ ब्रह्मत्वें सायास नये हातीं ॥ २ ॥ मशका ओढी मेरू हाले बुडीं ॥ जीवाचे ते जोडी ब्रह्म मिळे ॥ ३ ॥ उदकीं जरी मासोळी सूर्यासी भेटे ॥ वारीयाचे कोठें दृष्टि पडे

॥ ४ ॥ चंद्राचें चांदणें घेती जे पालवी ॥ मिथ्या माया देवी नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १३१६ ॥ हवा हवा ह्मणताती श्रुति ॥ परि त्या नेणती भुललीया ॥ १ ॥ तुझिया रूपा नेणती अगा कमळापती ॥ बाळक ह्मणती गौळियाचें ॥ २ ॥ विष्णुदास नामयानें दावियेल्या खूणा ॥ पंढरीचा राणा श्रीविठ्ठल ॥ ३ ॥

॥ १३१७ ॥ निर्गुण गुणासी आलें ॥ परब्रह्म ठसावलें ॥ भक्त पुंडलिका लाधलें ॥ गौप्य केलें प्रगट ॥ १ ॥ सेवा सेवा ब्रह्मरस ॥ विठ्ठल पंढरीनिवास ॥ धृ० ॥ निर्गुण गुणाकार ॥ मूर्ती सांवळी सुंदर ॥ सकल ही गुणाचें माहेर ॥ मुक्ति पेंठ पंढरी ॥ २ ॥ धन्य धन्य भीमा तट ॥ चंद्रभागा हे निकट ॥ जेथें विठ्ठल वीर प्रगट ॥ नाम गर्जती हरिदास ॥ ३ ॥ धन्य धन्य पद्माळें ॥ सभरा भरित आनंद जळें ॥ स्नान केलिया निर्मळ ॥ कोटी कुळें उद्धरती ॥ ४ ॥ धन्य धन्य मान देश ॥ विठ्ठलें केला रहिवास ॥ नामा ह्मणे विष्णुदास ॥ देई उल्हास भक्तीचा ॥ ५ ॥

॥ १३१८ ॥ वंदावें ते काय निंदावे ते काय ॥ सर्वांठायीं पाहे कोंदाटलें ॥ १ ॥ आहे कवणा ठायीं नाहीं कवणा ठायीं ॥ ठायींच्या पैं ठायीं कोंदाटलें ॥ २ ॥ रविरश्मीचें तेज सर्वांठायीं असे ॥ सा परी अनायासें बुजतू जाय ॥ ३ ॥ भाव तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि कर्म ॥ जाणोनियां वर्म ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ १३१९ ॥ जागारे गोपाळांनो रामनामीं जागा ॥ कळीकाळा आकळा महादोष जाती भंगा ॥ १ ॥ सहस्रदळ समान अनुहात ध्वनी उठी ॥ नामाचेंनी बळें पातकें रिघालीं कपाटीं ॥ धृ० ॥ दशमी एक व्रत करा दिंडी दर्शन ॥ एकादशी उपवास तुह्मीं जागा जागरण ॥ २ ॥ द्वादशी साधन कोटीकुळें उद्धरती ॥ नामा ह्मणे केशव ठाव देईल वैकुंठीं ॥ ३ ॥

॥ १३२० ॥ विठ्ठल विसांवा सकळीका ॥ विठ्ठल आधार तिहीं लोकां ॥ विठ्ठल नकळे ब्रह्मादिकां ॥ विठ्ठल देखा पंढरीये ॥ १ ॥ विठ्ठल डोळस सांवळा ॥ विठ्ठल पाहाती आवळा ॥ विठ्ठल ध्यावा वेळोवेळां ॥ विठ्ठल कमलावल्लभ ॥ धृ० ॥ विठ्ठल धरारे मानसीं ॥ विठ्ठल सोडवील

अहर्निशीं ॥ विठ्ठलावीण मुक्ति कैंची ॥ कुंटणी गणिकेसी उद्धरिलें ॥ २ ॥ विठ्ठल उभा भीमातिरीं ॥ कर ठेउनी कटावरी ॥ विठ्ठल भक्तकाज कैंवारी ॥ विठ्ठल हरी महादोष ॥ ३ ॥ विठ्ठल अनाथ कोंवसा ॥ विठ्ठल नुपेक्षी भरंवसा ॥ विठ्ठलेवीण शून्य दाही दिशा ॥ विठ्ठलावीण नाहीं हे अनेक ॥ ४ ॥ श्रीविठ्ठले धन्य दिवस ॥ श्रीविठ्ठल भक्तीरस ॥ श्रीविठ्ठल परम पुरुष ॥ विष्णुदास ह्मणे नामा ॥ ५ ॥

॥ १३२१ ॥ योगीयांचें ब्रह्म शून्य व्योमाकार ॥ आमुचें साकार विटेवरी ॥ १ ॥ दाटुगें नागर कटीं ठेउनी कर ॥ सर्वस्वें उदार भक्तालागीं ॥ धृ० ॥ ज्ञानीया सिद्धांतीं लक्षापरी नये ॥ आमुची वाट पाहे अनाथाची ॥ २ ॥ पुंडलीका भावा बोळले वोरसें ॥ नेणों काय कैसें प्रेम साचें ॥ ३ ॥ जाप्यकाचें जाप्य नाम मंत्रमय ॥ आमुचें भक्ती प्रिय संसारी कां ॥ ४ ॥ नामा ह्मणे जीवें करीन ओंवाळणी ॥ क्षणीं चक्रपाणी दिठावसी ॥ ५ ॥

॥ १३२२ ॥ माझीया मनाचें बैसणें जे जे ठायीं ॥ तेथें तेथें राही पांडुरंगा ॥ १ ॥ भीमा चंद्रभागा वैकुंठ पंढरीं ॥ दावी दृष्टी भरी निरंतर ॥ धृ० ॥ पुंडलीका समोर लक्ष निरंतरी ॥ तैसाची अंतरीं येउनी राहे ॥ २ ॥ कटीं कर विटे समचरण गोमटे ॥ पाहातां अति नेटकें हेंचि ध्यान ॥ ३ ॥ पुरवी माझी आस तूं बाप माउली ॥ करी मज साउली पद्मकरें ॥ ४ ॥ नामा ह्मणे क्षणीं करीसी उदास ॥ होती कासावीस प्राण माझे ॥ ५ ॥

॥ १३२३ ॥ वावडी दुरीच्या दुरी उडतसे अंबरीं ॥ हातीं असे दोरी परि लक्ष तेथें ॥ १ ॥ दुडी वरी दुडी पाण्या निघाली गुजरी ॥ चाले मोकळ्या करीं परी लक्ष तेथें ॥ धृ० ॥ व्यभिच्यारी नारी परपुरुष जिव्हारी ॥ वर्ते घराचारीं परी लक्ष तेथें ॥ २ ॥ तस्कर नगरीं परद्रव्य जिव्हारी ॥ वर्ते घरोघरीं परी लक्ष तेथें ॥ ३ ॥ धन लोभ्यानें धन ठेवियलें दुरी ॥ वर्ते चराचरीं परी लक्ष तेथें ॥ ४ ॥ नामा ह्मणे असावें भलतीया व्यापारीं ॥ लक्ष सर्वेश्वरीं ठेउनीयां ॥ ५ ॥

॥ १३२४ ॥ देह मंदिराभीतरीं ॥ शेजे सुदला श्रीहरी ॥ निद्रा उन्मनीचे भरी ॥ तें म्यां स्वप्न देखीलें ॥ १ ॥ स्वप्नीं भुललें बाई ॥

मागील नाठवेंची कांहीं ॥ हा जीव पर वस्तूच्या ठायीं ॥ तनु मनें आटला ॥ धृ० ॥ स्वप्न सांगूं कोणासी ॥ विवेक करीती तयांसी ॥ हें कोडें अज्ञानासी ॥ संतावांचोनी नुगवे ॥ २ ॥ ध्यानीं पहुडला सांवळा ॥ जवळी नारी बारासोळा ॥ विंजणें वारिती सकळां ॥ सोहंशब्द जागरणीं ॥ ३ ॥ धिं धिं तुरें वाजती ॥ अनुहात ध्वनि गर्जती ॥ तेथें निद्रा ना शुषुप्ति ॥ चंद्र सूर्य मावळले ॥ ४ ॥ मना पवना नाहीं भेद ॥ तया ठायीं हा गोविंद ॥ तेथें खुंटला अनुवाद ॥ वेदश्रुती आटल्या ॥ ५ ॥ ह्मणे विष्णुदास नामा ॥ जन्ममरण नाहीं आह्मां ॥ कृपा केली मेघःश्यामा ॥ संतसंगें तारिलों ॥ ६ ॥

॥ १३२५ ॥ माझ्या मनें तुझ्या चरणीं दिली बुडी ॥ इंद्रियें बापुडीं वेडावलीं ॥ १ ॥ आतां विषयसुख जाणावें हें कोणें ॥ जाणोनी भोगणें कोणें स्वामी ॥ २ ॥ देह सहज स्थिति राहिले निष्काम ॥ हृदयीं सदां प्रेम वोसंडत ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशवा कृपेच्या सागरा ॥ तूं आह्मां सोयरा आदि अंतीं ॥ ४ ॥

॥ १३२६ ॥ आसनीं शयनीं आठवी अनुदिनीं ॥ नित्य समाधानीं रूप तुझें ॥ १ ॥ काम धाम कांहीं नलगे माझ्या चित्तीं ॥ न देखें विश्रांति तुजवीण ॥ २ ॥ तापत्रय वणवा लागला चहूंकडे ॥ न देखें उघडे तुजवीण ॥ ३ ॥ तुजवीण तें जिवलग दुजें कोण होईल ॥ तें माझे निवारील उद्वेग हे ॥ ४ ॥ कृपेचा सागरू त्रिभुवनीं उदारू ॥ न करी अव्हेरू अनाथाचा ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशवा आस माझी पुरवी ॥ पाउलें दाखवी एक वेळां ॥ ६ ॥

॥ १३२७ ॥ महाद्वारापासीं नामदेव आला ॥ सन्मुख देखिला पांडुरंग ॥ १ ॥ मेघःश्याम मूर्ती डोळस साजिरी ॥ हृदय मंदिरीं करी ध्यान ॥ २ ॥ धन्य नामदेव भक्त शिरोमणी ॥ ज्याच्या चक्रपाणी वेळाईत ॥ ३ ॥ सर्व अनुभव देह पारुपला ॥ अखंड विठ्ठल सुखरूप ॥ ४ ॥ मन पांगुळलें स्वरूपीं गुंतलें ॥ बोलणें खुंटलें वेदशास्त्रें ॥ ५ ॥ सबाह्य अंतरीं स्वरूप कोंदलें ॥ द्वैत निरसलें दृश्याकारें ॥ ६ ॥ रूप निर्धारितां दृश्य पूजाबळें ॥ रोमांच उठिले थर्थरीत ॥ ७ ॥ अमृताचा घन वोळला अंतरीं ॥ वर्षताति धारी संजीवन ॥ ८ ॥ तें क्षीर सेवितां झालें समा-

धान ॥ चुकलें मरण येरझार ॥ ९ ॥ चित्सुखें निवालों दुःख विसरलों ॥ विसांवा भेटलों पांडुरंग ॥ १० ॥ नामा ह्मणे मी लागे या सुखा ॥ जोडे पुंडलिका तुझ्या धर्में ॥ ११ ॥

॥ १३२८ ॥ कस्तूरी कुंकुम रेखे लाल टिळा ॥ केशराची उटि सर्वांगासी ॥ १ ॥ पाहिला पाहिला माझा पांडुरंग ॥ जीवीं जिवलग डोळे भरी ॥ २ ॥ हार शोभे गळां मंजूरीचा तुरा ॥ कर्ण रत्न फळा झळाळित ॥ ३ ॥ विटेवरी नीट गोमटीं पाउलें ॥ त्यांवरी ठेविलें मस्तक म्यां ॥ ४ ॥ नामयाची धणी भूकेली ते धाली ॥ आनंद दिवाळी आजि झाली ॥ ५ ॥

॥ १३२९ ॥ सुखाचें हें सुख श्रीहरि सुख ॥ पाहतांही भूक ताहान गेली ॥ १ ॥ भेटली भेटली विठाई माउली ॥ वासना निवाली जिवांतील ॥ १ ॥ चंद्रासी चकोर मेघासी मयूर ॥ वाटे तैसा भर आनंदाचा ॥ नामा ह्मणे पाप आणि ताप दुःख ॥ गेलें झालें सुख बोलवेना ॥ ४ ॥

॥ १३३० ॥ विठोबाचें मुख पाहातां लोचनीं ॥ पुरलिसे धणी एकसरा ॥ १ ॥ पाहावा पाहावा गोजिरा गोपाळ ॥ नंदजीचा बाळ बाईयांनो ॥ २ ॥ गोखुरीं धुरळा कुंतळी शोभला ॥ मस्तकीं खोंविला मोरपत्र ॥ ३ ॥ त्रिअंगीं देहुडा वाजवितो वेणु ॥ शोभा काय वर्णू तयाचि मी ॥ ४ ॥ आनंदाचा ठेवा नये मनासी ॥ आलिसे ध्यानांसी अखंडित ॥ ५ ॥

॥ १३३१ ॥ निर्गुण सगुण नव्हें तें समान ॥ तैसें तेंही जाण योगाभ्यासीं ॥ १ ॥ प्रल्हादासी हरी शंख चक्र गदा ॥ सगुण गोविंदा शोभतसे ॥ २ ॥ अर्जुनासी देव उभा पाचारासी ॥ सखा उद्धवासी साक्ष दावी ॥ ३ ॥ नामा ह्मणे माझा केशीराज भोळा ॥ दाविसी गोपाळां बाळलीळा ॥ ४ ॥

॥ १३३२ ॥ हात पाय सर्व मिळोनियां मेळा ॥ चला पाहूं डोळां ह्मणताती ॥ १ ॥ देखणें तें नव्हें देखतील कैसें ॥ देखण्याची असे सर्व डोळां ॥ २ ॥ चंचुभूत अंश अशांत मिळालि ॥ निर्गुणाची खोली देव जाणें ॥ ३ ॥ नामा ह्मणे तेव्हां तुज पाहों आला ॥ पाहोनि तो ठेला सर्वांभूतीं ॥ ४ ॥

॥ १३३३ ॥ ध्यानीं ध्यातां मनीं हाची येउनी बैसे ॥ गीती गातां वसे हृदयकमळीं ॥ १ ॥ बाहेरी भीतरीं वेधिलें वो येणें ॥ रुक्मिणी रमणें पांडुरंगें ॥ १ ॥ यावीण दुसरें मज कांहींच नाठवे ॥ लागलींसे सवे गोपाळाची ॥ ३ ॥ भाग्यें जात जीवा कांहींच नावडे ॥ वाचोनी पवाडे गोपाळाचे ॥ ४ ॥ निद्रां आणि जागृतीं स्वप्नीं आणि शुषुप्तीं ॥ देखे कृष्णमूर्ती सर्वगत ॥ ५ ॥ ऐसा अखंड विदेही लौकिका विरहीत ॥ नामा जिवन्मुक्त होउनी ठेला ॥ ६ ॥

॥ १३३४ ॥ अहो त्रिभुवना माझारीं ॥ भूवैकुंठ पंढरीं ॥ चंद्रभागा सरोवरीं ॥ विटेवरी नीट उभा ॥ १ ॥ उभा कैवल्य नायक ॥ दृष्टी सन्मुख पुंडलीक ॥ ज्याचे ब्रह्मादिक सेवक ॥ इतरां कोण पाड ॥ १ ॥ सुरंग रंगें चरणतळें ॥ रातलीं रातोत्पळें ॥ जिंकिलीं माणिक निळें ॥ मज पाहतां बाई ॥ ३ ॥ पद अंकुश पताका ॥ ध्वज वज्रांकित रेखा ॥ तेथें लक्ष्मी रतली देखा ॥ सिंधु तनया बाई ॥ ४ ॥ अनुपम्य गे माय अनुपम्य सार ॥ परब्रह्म वो साकार ॥ मंत्रमय त्रि अक्षर ॥ विठ्ठलनाम बाई ॥ ५ ॥ तें गा प्रत्यक्ष ध्यान ॥ सर्व सुखाचें निधान ॥ दृष्टीं पाहतांची मन ॥ माझें परतेना ॥ ६ ॥ न लागे पातयासी पातें ॥ लक्ष लागलें निरुतें ॥ सुख झालें बा मनातें ॥ तें मी काय सांगों वो माय ॥ ७ ॥ मन इंद्रियें वेधलीं ॥ घर वृत्तिचें रिघालीं ॥ काय स्वानंदा मुकलीं ॥ वेगळेपणें ॥ ८ ॥ पदद्वयाचीं ठेवणीं ॥ इंद्रनीळ गुल्फमणी ॥ गंगा मिरवत चरणीं ॥ वांकी तोडर पायीं ॥ ९ ॥ सरळ अंगोळिया वरी ॥ नखें वर्तुळ साजिरीं ॥ चंद्र देखोनी अंबरीं ॥ झाला कळाहीन ॥ १० ॥ पोटरीया जानु जंघा ॥ मर्गजमणीचे ते स्तंभ ॥ कैसें वोळलें स्वयंभ ॥ ओघ जैसें कालिंदीचे ॥ ११ ॥ पितांबर माळ गांठीं ॥ रत्नकिळा बरवंटीं ॥ विद्युल्लतेच्या थाटीं ॥ जैशा मेघमंडळीं ॥ १२ ॥ वीरकंकणें मणगटीं ॥ काडोवांडीं मुद्रिका दाटी ॥ माज सामावे जो मुठीं ॥ वरी कटी कटिसूत्र ॥ १३ ॥ नाभीं सरोज गहन ॥ ब्रह्म याचें जन्मस्थान ॥ वरी त्रिवळी लक्षण ॥ कैसें शोभे रोमराजीं ॥ १४ ॥ काय वाणूं तें उदर ॥ सांठवलें चराचर ॥ ब्रह्म गोळ निरंतर ॥ जयां रोमरंध्रीं ॥ १५ ॥ तनु मृदु शाम निर्मळ ॥ प्रभा दिसती सोज्वळ ॥ जेवीं ओंललेंसे जळ ॥ जैसें घन मंडळीं ॥ १६ ॥ शुद्ध चंदन पातळ ॥ आंगीं चर्चिला निर्मळ ॥ जेवीं इंद्रनीळ किळ ॥ गुल्फ मोतीयांचे ॥ १७ ॥ पदक बाहुभूषणें ॥ नवरत्नांचें खेवणें ॥

कैसें सर्वांगीं झालें पणें ॥ लेणें लेणियासी ॥ १८ ॥ कौस्तुभ मिरवे कंठीं ॥ माजी रत्नांचिये दाटी ॥ तेथें सुरवरांच्या दृष्टी ॥ भाळलिया ॥ १९ ॥ श्रवणीं कुंडलें झळकतीं ॥ जैशा विजुवा तळपती ॥ कंठीं माळ वैजयंती ॥ सह तुळसी दळेसीं ॥ २० ॥ विशाल नयन दृष्टी ॥ ठेऊनियां नासापुटीं ॥ दावी योग कसवटी ॥ योगीयासीं गे माये ॥ २१ ॥ लिंग स्वयंभू शीर स्थळीं ॥ रश्मी मुगुट झळाळी ॥ वेटी मोरविसातळीं ॥ मृगनाभी तिळक ॥ २२ ॥ स्मित अधर सुरेख ॥ कैसेनी मासूर मुख ॥ तेथें मदन पर्यंक ॥ कोटी कुरवंड्या ॥ २३ ॥ विष्णुदास नामा जिवें ॥ ओंवाळी सर्व भावें ॥ अनुभव अनुभवें ॥ अनुभविजें सदां ॥ २४ ॥

॥ १३३५ ॥ अव्यक्त परब्रह्म कैसें आलें वो व्यक्तीं ॥ अकळु न कळेची तो हा अमूर्त मूर्ती ॥ पुंडलिकाचे भक्ती येऊनियां वाळवंटीं ॥ उभा राहे विटेवरी कर ठेऊनि कटीं ॥ १ ॥ जिवाचा जिवनु वो मज भेटवा हरी ॥ लागलें प्रेम पिसें होऊनि दासी कामारी ॥ ध्रु० ॥ कासिला पितांबर तयावरी मेखळा ॥ उटी जी चंदनाची शोभती वनमाळा ॥ नाहीं वो बाहुवटे तें रूप गुंतलें डोळां ॥ अधर जें पोंवळियाचे दंत हिऱ्याची जोती ॥ २ ॥ विशाल नयन वो भोंवया व्यंकटा अति ॥ टिळक जो रेखिला मृगनाभीं लल्लाटीं ॥ उपमा नये व्यक्ती ॥ चंद्रा पडियली तुटी ॥ ३ ॥ माथां मुगुट जो रत्नें जडियेली वरी ॥ त्या खालीं मयूरपत्रीं वेटी साजे मुरारी ॥ माथा त्या विरगुंठी पुष्पें तुरंबिलीं वरी ॥ तेण मी भाळलिये भेटवावें झडकरी ॥ ४ ॥ इंद्रनीळ कीळ गाभा ॥ घनश्यामु हा दिसे ॥ पहा तूं एक दृष्टीं चकित केलें वो हासें ॥ तेचि ते कामबाण ॥ जिवा लागलें पिसें ॥ नामया विष्णुदासा व्यापिलें हृषीकेशें ॥ ५ ॥

॥ १३३६ ॥ श्रीराम सोयरा आला माझ्या घरां ॥ दिधला म्यां थारा हृदयीं माझ्या ॥ १ ॥ पावलों विश्रांति धालें माझें मन ॥ नलगे आतां ध्यान शिकावया ॥ २ ॥ ज्या साठीं हिंडणें जटामौन नग्न ॥ धरिलें तेणें ठाणें हृदयीं माझे ॥ ३ ॥ योगयाग तप करावें साधन ॥ तोही ओठीं जाण सदां वसे ॥ ४ ॥ तीर्थयात्रा देव ज्यासाटीं करावें ॥ तें ब्रह्म बरवें नांदे देहीं ॥ ५ ॥ ब्रह्मचर्यादिक आश्रम साधावे ॥ केली तया देवें देहीं वस्ती ॥ ६ ॥ वेदशास्त्र पुराण ज्यासाठीं पठण ॥ तो नांदे परिपूर्ण हृदयीं माझ्या ॥ ७ ॥ ऐसा तो सज्जन जिवलग सांगाती ॥ दिधली

मम विश्रांति नाम संगें ॥ ८ ॥ तैसें नव्हें ज्ञान फुटक्या हांडोरयाचें ॥ धरूनियां साचे खोखा वाजे ॥ ९ ॥ स्वधर्मीं विचार वेचाचें अन्वयें ॥ लाधले हे पाय गुरुकृपें ॥ १० ॥ अभंग भंगेना फोडीतां फुटेना ॥ गुरुकृपें जाणा प्राप्त जालें ॥ ११ ॥ चावळी वटवट बोलणें बासर ॥ हे तंव अवघे चार मर्कटाचे ॥ १२ ॥ परनिंदा परद्रोहो करणें या संताचा ॥ जाळावी ते वाचा ज्ञान साचें ॥ १३ ॥ नलगे सोंग धरणें देह ताप करणें ॥ ऐसें निजध्यान हातां आलें ॥ १४ ॥ नाम घेतां रूप हृदयीं बिंबलें ॥ सर्वत्र देखीलें तेंची डोळा ॥ १५ ॥ नाममंत्र बीज जंवरि नाहीं तयां ॥ तवरि केशव तया प्राप्त नाहीं ॥ १६ ॥ नामाचे धारक ते केशवरूप ॥ वैकुंठीचें सुख रुळे पायीं ॥ १७ ॥ नामेंवीण ज्ञान नपुंसक ऐसें ॥ नातळती कैसे साधुसंत ॥ १८ ॥ नाम तेंचीं रूप रूप तेंचीं नाम ॥ नाम रूपाभिन्न नाहीं नाहीं ॥ १९ ॥ आकारला देव नामरूपा आलें ॥ ह्मणोनी स्थापीलें नामदेवें ॥ २० ॥ नामापरता मंत्र नाहीं वो आणिक ॥ सांगती ते मूर्ख ज्ञानहीन ॥ २१ ॥ नामा ह्मणे ज्ञान केशव केवळ ॥ जाणती प्रेमळ भले भले ॥ २२ ॥

॥ १३३७ ॥ पंढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें ॥ विठ्ठला भेटावें जिवलगा ॥ १ ॥ कायावाचामन चरणीं ठेवावें ॥ प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ ॥ २ ॥ सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें ॥ जीवें उतरावें निंबलोण ॥ ३ ॥ बाहेरी भीतरीं कैवल्य आघवें ॥ वाचे न बोलावें ब्रह्मानंदु ॥ ४ ॥ चिरंजीव नामा कंठीं धरी प्राण ॥ करी तुझें ध्यान रात्रंदिवस ॥ ५ ॥

॥ १३३८ ॥ केशवाच्या नामीं लागलेंसें ध्यान ॥ देखिल्या नयन तदाकार ॥ १ ॥ जया तया ह्मणे माझा चक्रपाणी ॥ जाय लोटांगणीं सर्व भावें ॥ २ ॥ प्रेम वोथरत नामाचेनी छंदें ॥ हृदय प्रेमानंदें वोसंडत ॥ ३ ॥ धांवुनी येउनी चरणाजवळीं ॥ वंदी पायधुळी सर्व भावें ॥ ४ ॥ घनःश्याम मूर्ती सुंदर सांवळी ॥ ध्यान हृदयकमळीं नित्य राहे ॥ ५ ॥ भाग्यवंत नामा भक्तां शिरोमणी ॥ अखंड उन्मनी भोगीतसे ॥ ६ ॥

॥ १३३९ ॥ दुःखाची निवृत्ति सुखाचें तें सुख ॥ पाहतां श्रीमुख गोविंदाचें ॥ १ ॥ रंगणीं रांगत गुलगुल बोलत ॥ असुर रुळत चरणातळीं

॥ २ ॥ नामा ह्मणे हातीं लोणीयाचा उंडा ॥ गौळणी त्या तोंडा भुल-
लिया ॥ ३ ॥

॥ १३४० ॥ पंढरीचें सुख आनंदें गर्जती ॥ ध्यातसे पार्वती अखंडित ॥ १ ॥ भीमातीरीं उभा सखा पांडुरंग ॥ देई अंगसंग अखंडित ॥ २ ॥ उशीर झाला काय कामकाजां ॥ यावें अधोक्षजा अनिरुद्धा ॥ ३ ॥ नामा ह्मणे पाहा पंढरीं माझारी ॥ केशीराज तारी एकसरा ॥ ४ ॥

॥ १३४१ ॥ यमुनें पावलीं देखियेली मूर्ती ॥ तळपती दीप्ति तेजोमय ॥ १ ॥ सांवळें सुंदर ओंकार वर्तुळ ॥ मध्यें घननीळ पाचारितो ॥ २ ॥ सुरंग ओतिली प्रेम तनु छाया ॥ तेणें तुझी माया काय वाणूं ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठो चातुर्य करुणा ॥ गुणागुणीं किरणा प्रभा भासे ॥ ४ ॥

॥ १३४२ ॥ विटेवरी समचरण सुंदर ॥ बाळ सकुमार यशोदेचें ॥ १ ॥ वाळे वांकी गर्जे तोडर चरणीं ॥ नाद झणझणीं वाजताती ॥ २ ॥ कांसे कासियेला पीत पितांबर ॥ लोपे झडकर तेणें प्रभा ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाहीं तुझ्या रूपा पार ॥ तेथें मी किंकर काय वानूं ॥ ४ ॥

॥ १३४३ ॥ डोलत डोलत टकमक चाले ॥ गोजिरीं पाउलें टाकूनियां ॥ १ ॥ पायीं रुणझुण वाजताती वाळे ॥ गोपी पाहतां डोळे मन निवें ॥ २ ॥ सांवळें सगुण मानस मोहन ॥ गोपीरंजवण नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ १३४४ ॥ उपाधि निर्मळ शोभती चरण ॥ नादबिंदु पूर्ण मध्यभागीं ॥ १ ॥ कदंबावरती चढे वनमाळी ॥ शोभती निढळा ऊर्ध्वपुंड्र ॥ २ ॥ श्रवणीं कुंडलें शोभती नक्षत्र ॥ श्रीमुख पवित्र दिसों येत ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज ढापवेना डोळे ॥ करुणा कल्लोळे देखोनियां ॥ ४ ॥

॥ १३४५ ॥ कृष्ण अनुसंगें रंगली कामिनी ॥ कामधामें गेली गुणां विरोनी ॥ १ ॥ होती बहुत जन्में वियोगें शिणली ॥ आप नाठवे परसुखें मीनली ॥ २ ॥ मनें करूनियां ये विषयांचे संकल्प ॥ तंव तें अवघें होय कृष्णरूप ॥ ३ ॥ दृष्टीं देखणें जें जें आवडे ॥ वेणू वाहे तेथें उभे देहुडे ॥ ४ ॥ सुखशयनीं स्वप्नीं देखे सांवळा ॥ कंठीं कौस्तुभ रुळे वरी वनमाळा ॥ ५ ॥ जीवें धावुनी आलिंगी प्रीति ॥ तंव ते आर्ती होय कृष्णमूर्ती ॥ ६ ॥

देह परतोनी मागुते सांभाळी ॥ तंव स्वयें सिद्ध आपण वनमाळी ॥ ७ ॥ नामया स्वामी जीविचा जिवलगू ॥ कृष्णसुखाचा सुखबाध अंतरंगू ॥ ८ ॥

॥ १३४६ ॥ चिदानंद चिद्रूप चित्त चिन्मय ॥ बाळ यशोदेचें आनंद अद्वय ॥ १ ॥ सख अभिनव सुख याच्या दर्शनीं ॥ मिठी पडली पाहतां रूप नयनीं ॥ २ ॥ दृष्टीया डोळियां आड रिघोनी ॥ तनु मनासी केली भुलवणी ॥ ३ ॥ आंत बाहेरी निज सुख वावरे ॥ नित्य नूतन जीववूनी विसरे ॥ ४ ॥ आपरूपीं रूप सकळां केलें ॥ गोपी गोपाळां धेनु वत्सां भुलविलें ॥ ५ ॥ नामया स्वामी आनंद उदधि ॥ माजी बुडोनिया गेली देहबुद्धि ॥ ६ ॥

॥ १३४७ ॥ चाल सखिये वेगूं करीं वहिला ॥ दिन सरला काळ थोडा उरला ॥ १ ॥ आवडी घेऊं गे निज सुख धनीचें ॥ आर्त पुरोनी जें उरलेंसे मनींचें ॥ २ ॥ कृष्णमुख पाहे दृष्टी भरोनी ॥ चित्त सांडी कुरवंडी करोनी ॥ ३ ॥ क्षणीं विसरसी हे खूण निरुती ॥ मग अंतरलें सर्व सुख पुढती ॥ ४ ॥ हाचि निर्धार करूनिया मानसीं ॥ आंत बाहेरी हरिरूप देखसी ॥ ५ ॥ नामया स्वामी राजीव लोचनु ॥ रमारमणू तो जीवींचा जीवनू ॥ ६ ॥

॥ १३४८ ॥ चाळक माझें मन पांगुळ पैं झालें ॥ साक्षात्कारें मन हरपोनी गेलें ॥ १ ॥ मन हरपलें करूं आतां काय ॥ पहावया गेलें तंव परतोनी कांहीं नये ॥ २ ॥ भक्ति ज्ञान वैराग्य नोहे ॥ अवघेंची आहे अवघें तो आहे ॥ ३ ॥ नामा ह्मणे जनाबाई आहे वो कैसा ॥ बाबा उदकीं घट बुडोनी ठेला जैसा ॥ ४ ॥

॥ १३४९ ॥ कृष्ण डोलतु रांगतु रगणीं ॥ इडापीडा धांवोनी घेती गौळणी ॥ १ ॥ जीवापरीस हें वाल्हें बाळक ॥ शिणलिया विसांवा याचें आहे श्रीमुख ॥ २ ॥ सर्व सुख याचेनी मनोहरें ॥ तेंची खेळवितां धनी मन न पुरे ॥ ३ ॥ देह गेह नाठवे सर्वथा ॥ सुत पतीची मावळली वार्ता ॥ ४ ॥ सुख न सांगवे वैखरी कोंदली ॥ रूपीं रमतां मनें बुडी दिधली ॥ ५ ॥ नामया स्वामी सुखाचा सागरू ॥ कृष्ण खेळवितां सुफळ हा संसारू ॥ ६ ॥

॥ १३५० ॥ गोरे सांवळे घनवटे ॥ एक चालती एकापुढें ॥ १ ॥ राम निळीय पुढारी ॥ कनकदंड चौरेवरी ॥ २ ॥ राम लक्ष्मण विजयी झाले ॥ आनंदें अयोध्ये आले ॥ ३ ॥ चंद्रगिरीचे तळवटीं ॥ राम सीतेसी झाली भेटी ॥ ४ ॥ चंद्रगिरीं चला जाऊं ॥ राम दाशरथी पाहूं ॥ ५ ॥ चंद्रगिरीं केला वास ॥ ह्मणे नामा विष्णुदास ॥ ६ ॥

॥ १३५१ ॥ घाघरिया छंद चरण घवघवी ॥ अरुणा दाखवी चरणतळीं ॥ १ ॥ आरुता येई कान्हा देई आलिंगन ॥ उतरी निंबलोण मुखावरुनी ॥ २ ॥ वाघनखें कडदोरा कंठीं घालुनी सरी ॥ ह्मणीं तुज मुरारी दृष्टी लागो ॥ ३ ॥ अंबुलें लोळिया कटीं रिठे गांठी ॥ छंदें जगजेठी हालवी मान ॥ ४ ॥ भाळीं चंदन वरी मसीचा टिळकला ॥ ह्मणीं तुज गोपाळा दृष्टी लागे ॥ ५ ॥ नामयाचा स्वामी हरि माझें चिंतणें ॥ छंदें गीत गाऊं नाचूं मी सदां जाणें ॥ ६ ॥

॥ १३५२ ॥ चंद्रबिंबासरी देखों जरी मुखा ॥ कोटी चंद्रप्रभा देखा कृष्णमूर्ति ॥ १ ॥ धवळलें चांदिणें रांगतां रांगणें ॥ धन्यवो गौळणी सुखी तुझी ॥ २ ॥ कानींचीं कुंडलें गुरुशुक्र बिंबले ॥ शिरीं तें शोभलें पिंपळपान ॥ ३ ॥ कटीं वाघनखें साजिरी ते सरी ॥ कडदोरा वरी राजसासी ॥ ४ ॥ सकुमार दोंदिलें किंकिणी कटींतटीं ॥ चरणीं नाद उठी नेपुरांचा ॥ ५ ॥ श्रुति समागमें नाद ऐके कानीं ॥ संतोषोनी मनीं डुल्ले हरीं ॥ ६ ॥ देखोनिया माते होय समाधान ॥ उतरी निंबलोण मुखावरुनी ॥ ७ ॥ सच्चिदानंदघन तान्हुलें आपण ॥ विष्णुदास नामयानें वोवाळिलें ॥ ८ ॥

॥ १३५३ ॥ ध्यान धारणा नलगे टाळी ॥ विठो पाहावा उघडे डोळीं ॥ १ ॥ विठो समाधीचें सुख ॥ पाहतां हरे तहान भूक ॥ २ ॥ नामा ह्मणे न करी कांहीं ॥ चित्त रंगलें हरीचे पायीं ॥ ३ ॥

॥ १३५४ ॥ यशोदेचा बाळ अलगट ॥ रूपें राजस बरवा बरवंट ॥ १ ॥ वेधीं लावुनी वेधिलें येणें मानस ॥ आड घालुनी आपुला प्रकाश ॥ २ ॥ आपणासीच खेळे विनोदें ॥ विश्व निववी तेणें सुखें निज बोधें ॥ ३ ॥ दृष्टी याची पावे देखणीया ॥ आड रिघोनी तेज सांवळें

भरलें डोळिया ॥ ४ ॥ मन मारोनी आर्त पुरविले ॥ रूप दावुनी चित्त माझें भुलविलें ॥ ५ ॥ नामया स्वामी आसनीं शयनीं ॥ दुरी नवजे डोळ्यांपासोनी ॥ ६ ॥

॥ १३५५ ॥ चिदानंद दोंदिल बाळ सांवळें ॥ कृष्ण पाहतां नयनीं मन मावळे ॥ १ ॥ तें सुख कवणें वाचें बोलिजे ॥ चित्त चैतन्य समरसें भोगीजे ॥ २ ॥ परा परतली पश्यंति तन्मया ॥ मध्यमा वैखरी पावलीहो लया ॥ ३ ॥ आलिंगना लागुनी बाह्या स्फुरती ॥ देह न दिसे पाहतां कृष्णमूर्ति ॥ ४ ॥ तेथें आर्तीचा आनंदू गोठला ॥ तो हा कृष्णरूपें अंकूर उठिला ॥ ५ ॥ नामया स्वामी सबाह्याभ्यंतरीं ॥ गेले रसरंग गोकुळा भीतरीं ॥ ६ ॥

॥ १३५६ ॥ चिदानंद दोंदिल बाळ डोळस ॥ कृष्ण खेळवीत निवे मानस ॥ १ ॥ सये आन कांहीं या जीवा नावडे ॥ चित्त गुंतलें तया सुखी न निवडे ॥ २ ॥ देहा गेहा आठव नाहीं सर्वथा ॥ स्थिति बाणली सहज रूप पाहतां ॥ ३ ॥ तेज सांवळें दृष्टींत कोंदलें ॥ तेणें प्रकाशें सबाह्य मन माझें वेधलें ॥ ४ ॥ वृत्तिसहित इंद्रियें परतलीं ॥ कृष्णरूपीं मिळोनिया गेलीं ॥ ५ ॥ नामया स्वामी आदि परंपरा ॥ आवडता आहे तो माझा सोयरा ॥ ६ ॥

॥ १३५७ ॥ चिदानंदघन चिन्मय बाळकृष्ण ॥ खेळवितां मन होय उन्मन ॥ १ ॥ सुख अनुभवी अनुवाद खुंटला ॥ विश्वंभरीं तोची अनुवाद गोंठला ॥ २ ॥ दुजें न दिसे उपमेसी द्यावया ॥ मन न मिळे आन सुख घ्यावया ॥ ३ ॥ ज्ञाता ज्ञान हेंची अद्वय ॥ ध्याता ध्यान ध्येय हेंची निरामय ॥ ४ ॥ जन्मोजन्मींचें पुण्य संचित ॥ झालें गौळियांचें काय मूर्तिमंत ॥ ५ ॥ नामया स्वामीची अनुपम्य आवडी ॥ चित्तें दिधली प्रेमरसीं बुडी ॥ ६ ॥

॥ १३५८ ॥ रात्री काळी घागर काळी ॥ यमुनाजळें ही काळीं वो माय ॥ १ ॥ बुंथ काळी बिलगार काळी ॥ गळां मोतींय कावळी काळी वो माय ॥ २ ॥ मी काळी कांचोळी काळी ॥ कांस कांसिली ते काळी वो माय ॥ ३ ॥ एकली पाणीया नवजाय साजणी ॥ सवें पाठवा

मूर्ति सांवळी वो माय ॥ ४ ॥ विष्णुदास नाम्याची स्वामिणी काळी ॥ कृष्णमूर्ति बहु काळी वो माय ॥ ५ ॥

॥ १३५९ ॥ शांति भीमातीरीं भक्ति पंढरपुरीं ॥ प्रेम विटेवरी देखियलें ॥ १ ॥ देखिलागे माय देखिलागे माय ॥ देखिलागे माय पंढरीये ॥ २ ॥ नामा रूपातीत नित्य सदोदित ॥ जेथें विरे चित्त योगीयांचें ॥ ३ ॥ दूरी ना जवळी त्रिपुटीं वेगळा ॥ केशव भेटला नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १३६० ॥ शाममूर्ती डोळस सुंदर सांवळी ॥ तें ध्यान हृदयकमळीं धरुनी ठेला ॥ १ ॥ सकळ स्थिति सुखाचा अनुभव झाला ॥ सकळ विसरला देहभाव ॥ २ ॥ पांगुळलें मन स्वरूपीं गुंतलें ॥ बोलणें खुंटलें प्रपंचाचें ॥ ३ ॥ सबाह्याभ्यंतरीं स्वरूप कोंदलें ॥ द्वैत निरसिलें चंद्राकारें ॥ ४ ॥ निजरूप निर्धारितां नयन सोज्वळ झाले ॥ रोमांच दाटले स्वरवीत ॥ ५ ॥ नामामृताचा घन वोळला अंबरीं ॥ वर्षाव सहस्र धारी होत असे ॥ ६ ॥ तें क्षीर सेवितां झालें समाधान ॥ चुकलें जन्ममरण कल्पकोडी ॥ ७ ॥ सहज सुखें निवाला भवदुःख विसरला ॥ विसांवा भेटला पांडुरंग ॥ ८ ॥ नामा ह्मणे देवा दृष्टि लागो झणीं ॥ पुंडलिका धर्मेंकरूनि जोडलासी ॥ ९ ॥

॥ १३६१ ॥ वेणू वाहुनी चित्त दुहिलें ॥ रूप देऊनी मज मनें मोहियलें ॥ १ ॥ वेधु वेधकू गोपाळ लाघवी ॥ जीवा लावियली आवडी नित्य नवी ॥ २ ॥ दृष्टीपुढें माझें ध्यान ठेवियलें ॥ वृत्तिसहित मन तेथें माझें गोविलें ॥ ३ ॥ शुद्ध शामकमळदळ लोचनु ॥ पावा वाजवितसे देहुडा रुणझुणी ॥ ४ ॥ तया प्रभा दिसती दिशा निर्मळ ॥ कृष्ण पाहतां मन झालें व्याकुळ ॥ ५ ॥ नामया स्वामीचें अनुपम्य रूपडें ॥ पाहतां मन फिरलें माघारें ॥ ६ ॥

॥ १३६२ ॥ मल्हार महुडें गगनीं दाटलें ॥ विजु खळें गर्जिन्नलें गे माय ॥ १ ॥ गोविंद पाहा या लौकरी ॥ कैसें वरुषताहे मधु धारी गे माय ॥ २ ॥ आनंदें मयूरें नाचती आपैसे ॥ प्रेमें निळकंठ झाले ते कैसे ॥ ३ ॥ नामया स्वामी दृष्टि सोज्वळ ॥ जीव लागला गोपाळें गे माय ॥ ४ ॥

॥ १३६३ ॥ जाये जाये जाये परतोनी पाहे ॥ लाजावला जीव पर नलगे सोय गे माय ॥ १ ॥ नायक विठ्ठल पाहूं द्या साजणी ॥ न पुरे गे धणी डोळियांची ॥ २ ॥ देखिला गे माय लावण्यसागर ॥ नामया दातार केशीराज ॥ ३ ॥

॥ १३६४ ॥ देख देख देख पैल पैल ॥ पैल उभा असे वीटेवरी ॥ १ ॥ खोळे बुंथीचा आकारू झळके पीतांबरू ॥ सौभाग्य सुंदरू विठ्ठल देव ॥ २ ॥ दान दीक्षा गुरू नामया दातारू ॥ धरावया नागरू केशीराज ॥ ३ ॥

॥ १३६५ ॥ सोनियाचा दिवस अमृत लाधला ॥ रूपीं प्रगटला आठवितां ॥ १ ॥ गोपाळारे तुझें गोपाळारे तुझें ॥ गोपाळारे तुझें ध्यान लागो ॥ २ ॥ क्षण एक न विसंबे जगत्र जीवना ॥ तूंची नारायणा मायबापा ॥ ३ ॥ काया वाचा मनें विनटलों पायीं ॥ आन नेणें कांहीं ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ १३६६ ॥ बाहे क्षेत्रीं केला जुंपिलीं आउतें ॥ अठरा धान्यें तेथें पेरियलीं ॥ १ ॥ मेघःश्याम मेघ वर्षे सर्वाधारीं ॥ वीज विटेवरी सासिन्नलें ॥ २ ॥ जगाचें जीवन पंढरी पिकली ॥ चराया सोकली भूतजातें ॥ ३ ॥ घालोनियां माळा रक्षी कळिकाळा ॥ काय कलिमळा संसाराची ॥ पापनाशा कारणें भक्ति हे गोफण ॥ भूस कांडी कण वेंचिताती ॥ ५ ॥ वेद श्रुति ऐसें बोलें बोलवित ॥ गुढघे घालितां लाभ होती ॥ ६ ॥ नामा ह्मणे स्वामी विठ्ठल सुकाळ ॥ अन्न ब्रह्मफळ त्रिभूवनीं ॥ ७ ॥

॥ १३६७ ॥ सांवळी श्रीमूर्ति हृदयीं बिंबली ॥ तरी पालटली देहबुद्धि ॥ १ ॥ धन्य माझा जन्म धन्य माझा भाव ॥ ध्यानीं केशीराज नांदतसे ॥ २ ॥ आशा तृष्णा कैशा मावळल्या देहीं ॥ बुडोनियां पायीं ठेलें चित्त ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसी विश्रांति पैं झाली ॥ हृदयीं न्याहाळी केशीराज ॥ ४ ॥

॥ १३६८ ॥ विटेवरी नीट उभा कटीं ठेवुनी कर ॥ तो पुंडलिकाचे द्वारीं देखियेला ॥ १ ॥ बहुली बहुली देहुडा पाउलीं ॥ गुंजाहार गळीं देखियेला ॥ २ ॥ पुष्पवतीच्या संगमीं गोपाळ आश्रमीं ॥ काला करितां

आह्मीं देखियेला ॥ ३ ॥ वेणु पाहतां चहूंकरीं नाद उठला अंबरीं ॥ वासुरें तटस्थ हुंबरीं होउनी देखियला ॥ ४ ॥ अंगीं चंदनाची उटी मयुर पत्रांची दाटी ॥ चेंडू खेळतां यमुनेतटीं देखियेला ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशवा देखियेलें ह्रदयीं ॥ जन्मवरी राही हेंचि मागें ॥ ६ ॥

॥ १३६९ ॥ अवताराची राशी तो हा उभा विटेवरी ॥ शंख चक्रगदापद्मसहित करीं ॥ १ ॥ देखिला देखिला देवा आदिदेव बरवा ॥ समाधान जीवा पाहतां वाटे गे माये ॥ २ ॥ सगुण चतुर्भुज रूपडें तेज पुंजाळती ॥ वंदी चरणरज नामा विनवी पुढती गे माय ॥ ३ ॥

॥ १३७० ॥ प्रेम सप्रेम आरती ॥ गोविंदातें ओंवाळिती ॥ १ ॥ धन्य धन्य ते लोचन ॥ नित्य करिती अवलोकन ॥ धृ० ॥ बाळा प्रौढा आणि मुग्धा ॥ ओंवाळीती परमानंदा ॥ २ ॥ नामा ह्मणे केशवातें ॥ तटस्थ राहिली समस्तें ॥ ३ ॥

॥ १३७१ ॥ अभिन्न मध्यान्हीं येवो सेजे सुदली नारी ॥ आप विसरूनिया सुस्मित अंधारीं ॥ सामाजी चाऱ्ही भुजा शंख चक्र वो करीं ॥ पद्मगदा मंडित दिसे सर्व श्रृंगारी ॥ येउनी हंस तुळीके कैसें धरियेलें करीं ॥ देउनी आलिंगन वोसरला वो दुरी ॥ पालवीं धरीत धरीत निघाला बाहेरी ॥ सालागीं जीव जातो भेटवावो झडकरी ॥ १ ॥ कवण ते प्राणसखी भेटी करी विठोची ॥ सोडोनीयां वीरगुंटी चरण झाडीन केसीं ॥ धृ० ॥ कवण मी कैचा नेणें जाती कुळ तयाचें ॥ कवणा पासाव जाहला हें मी नेणें साचें ॥ इंद्रनीळ कीळगाभा जाण रूप तयाचें ॥ चरणीं तोडर रुळे वरी नेपुरें साचे ॥ नखें चंद्रमंडित वो जन्मस्थान गंगे असे ॥ जानुजंघा वो नीट पीतांबर वो कासे ॥ तयावरी नाग मुरडी रत्नमेखळा साजे ॥ माजुजो मुष्टीमाये मन वेधलें माझें ॥ २ ॥ नाभीं सरोवरीं दिसे ब्रह्मकमल ॥ अनुपम्य उदर ज्याचें विशाळ वक्षस्थळ ॥ कौस्तुभ वरी शोभे करितो झळफळ ॥ लोपला दीनमणि महा तेज परीबळ ॥ कुंडलाचेनी रत्नें फांकताहे वो कीळ ॥ वदन मी काय वर्णूं प्रसिद्ध निर्मळ ॥ भाळीं वो अर्धचंद्र मृगनाभीचा टीळा ॥ तें रूप देखावया जीव करी तळमळा ॥ ३ ॥ सरळ ज्या अंगोळीया नव रत्नें मंडित ॥ कंकणें मनगटीं बाहुवटे सुशोभित ॥ सावरी कीर्तिमुख भुजादंड मिरवत ॥ वैजयंती पदक

हिरे मुगुटीं झळकत ॥ मयूर पत्रें शिरीं शोभा दिसे अमित्य ॥ चंद्रमंडळें लोपलीं महा तेज अद्भुत ॥ व्यापिलें वनमाळीं लावण्य अमित ॥ तें रूप देखावया जीव माझा उल्हासित ॥ ४ ॥ ऐसी तापली विरह ज्वरें थोर होतो उबारा ॥ चंदन पोळतसे मज घालावो वींजण वारा ॥ चंद्रमा दाहातुसे तावीतो खडतरां ॥ तंव येरी जाणीतलें यदुनंद कुमरा ॥ होईल केशवराज नेईल द्वारका पुरा ॥ भक्ति हे विरहमाता तिणें आणिलें मजलागीं घरा ॥ नामया विष्णुदासा वेधु सारंगधरा ॥ तनुमनप्राणा माझ्या सुख झालें अपारा ॥ ५ ॥

॥ १३७२ ॥ नाम गाऊं नाम ध्याऊं ॥ नामें विठोबासी पाहूं ॥ १ ॥ आह्मीं दैवाचे दैवाचे ॥ दास पंढरिरायाचे ॥ धृ० ॥ टाळ दिंडी घेउनी हातीं ॥ केशवराज गाऊं प्रीतीं ॥ २ ॥ नामा ह्मणे लाखोली सदां ॥ अनंत नामें वाहूं गोविंदा ॥ ३ ॥

॥ १३७३ ॥ रूपें शामसुंदर नीलोत्पळ गाभा ॥ सखीये स्वप्नीं शोभा देखीयेली ॥ १ ॥ नेत्र विशाळ भाळ दंत हीरया ज्योती ॥ बाइये मदन मूर्ती देखीयेला ॥ धृ० ॥ शंख चक्र गदा शोभती चहूंकरीं ॥ सखीये गरुडावरी देखीयेला ॥ २ ॥ शयन शेषापृष्ठीं नाभीं परमेष्ठी ॥ गंगा वामांगुष्ठीं देखीयेला ॥ ३ ॥ पीतांबर कटीतटीं दिव्य चंदन उटी ॥ सखीये जगजेठी देखियेला ॥ ४ ॥ विचारितां मानसीं नये जो व्यक्तीसी ॥ नामा केशवेसी लुब्धोनी ठेला ॥ ५ ॥

॥ १३७४ ॥ परब्रह्म अविनाश आणि आनंदघन ॥ त्याहुनी चरण गोड तुझे ॥ १ ॥ ते जीवित्व न सोडीं अगा पंढरिनाथा ॥ जाणसी तत्वता हृदय माझें ॥ धृ० ॥ परात्पर ध्याइजे अपरांपर ॥ त्याचेही जिव्हार पाय तुझे ॥ २ ॥ सच्चिदानंदघन जेथें हरपलें मन ॥ त्याहुनी चरण गोड तुझे ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझीं पाउलें सकुमार ॥ तें माझें माहेर विटेवरी ॥ ४ ॥

॥ १३७५ ॥ येतीयां पुसे जातीयां धाडी निरोप ॥ पंढरपुरीं आहे माझा मायबाप ॥ १ ॥ येई विठाबाई आई माउलीये ॥ निढळावरी कर ठेउनी पालवीये ॥ धृ० ॥ पिवळा पीतांबर गगनीं झळकला ॥ गरुडावरी बैसोनी माझा कैवारी आला ॥ २ ॥ डोळ्यांतील वाहुली माझी विठाई झाली ॥ घनानंद मूर्ति माझ्या ध्यानासी आली ॥ ३ ॥ विठोबाचें राज्य आह्मां नित्य दिवाळी ॥ विष्णुदास नामा जीवेंभावें ओंवाळी ॥ ४ ॥

॥ १३७६ ॥ त्रिभुवनींचें सुख आलें भक्तीमुसें ॥ तें हें विठ्ठलवेषें अवतरलें ॥ १ ॥ बरव्याचें बरवें पाहतां नित्य नवें ॥ हृदयीं धरितां निवे त्रिविधताप ॥ धृ० ॥ चोवीसां वेगळें सहस्रा आगळें ॥ निर्गुण निराळें शुद्धबुद्ध ॥ २ ॥ वेदां मौन्य पडे श्रुतीसी सांकडें ॥ वर्णितां कुवाडे पुराणासी ॥ ३ ॥ भावाचें आळुकें भुलले भक्तिसुखें ॥ दिधलें पुंडलिकें साधूनियां ॥ ४ ॥ नामा ह्मणे आह्मां अनाथांलागुनी ॥ निडारला नयनीं वाट पाहे ॥ ५ ॥

॥ १३७७ ॥ सत्य नित्य युक्त शुद्ध बुद्ध मुक्त ॥ कारण रहित निरंजन ॥ १ ॥ तें आह्मीं देखीलें चर्मचक्षु दृष्टीं ॥ उभा वाळवंटी पंढरीये ॥ धृ० ॥ वेदां अगोचर तयां सहस्रमुखा ॥ तें झालें पुंडलीका लोभापर ॥ २ ॥ परतल्या श्रुती ह्मणती नेती नेती ॥ आह्मां गातां गीतीं सांपडलें ॥ ३ ॥ स्वरूपाचा निर्धार बोलती पुराणें ॥ शीणली दरूशनें वेवादतीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे यांसी भावची कारण ॥ पावावया चरण केशवाचे ॥ ५ ॥

---

## योगविषयसंबंधी.

॥ १३७८ ॥ षडचक्र भेदोनी जातां ऊर्ध्वपंथें ॥ ध्वनि अनुहात उमटे तेथें ॥ १ ॥ तये ध्वनीमाजीं मग्न होय मन ॥ योगसिद्धि जाण कैसी घडे ॥ धृ० ॥ तेहीं वोलंडितां सिद्धि आडव्या येती ॥ घेऊनियां जाती आपुल्या पंथें ॥ २ ॥ तेथें गुंतोनीयां विचरती योगीजन ॥ योगासी साधून काय होतें ॥ ३ ॥ आधि तो साधितां कष्टाचे संभार ॥ होय चकनाचूर शरीराचा ॥ ४ ॥ साधितीया पुढें ऐसीं विघ्नें येतीं ॥ ठेऊनी मागुती फिरती मागें ॥ ५ ॥ वारीयाची मोट कैसी बांधवेल ॥ भलत्यासी सांगतां वाटेल हें लटिकें ॥ ६ ॥ नामा ह्मणे तुह्मीं सोडोनीयां भक्ति ॥ करितां नाना युक्ति मूर्खजन ॥ ७ ॥

॥ १३७९ ॥ मन धांवे सैरावैरा ॥ मारुनी केलें येक मोरा ॥ १ ॥ मन केलें तैसें होय ॥ मन धाडिलें तेथें जाय ॥ २ ॥ मन लांचावलें न

राहे ॥ तत्वीं बैसलें कधीं नवजाय ॥ ३ ॥ नामा ह्मणे सोहंशब्दीं ॥ मन वेधलें गोविंदीं ॥ ४ ॥

॥ १३८० ॥ साधनाच्या माजीं एक गजराजू ॥ साधी त्यासी उजू होय पहा ॥ १ ॥ नासिकाचें वारें कोंडोनियां प्राणें ॥ उपराटें जाणें ऊर्ध्व पंथें ॥ २ ॥ गुदस्थानीं टांच देऊनिया जाण ॥ कासावीस प्राण होती पहा ॥ ३ ॥ गोल्हाट भेदिसा कोल्हाटीच नाहीं ॥ विठोबाची ग्वाही नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १३८१ ॥ त्रिकूट शिखरावरी पाहे पा नवल ॥ परी अखंडित धार वर्षे अमृताची ॥ १ ॥ त्रिवेणीसंगमीं गगन निर्मळ वाहे ॥ तेथें स्नान करूं जाय आनंदमय ॥ २ ॥ गुरुमुखें स्नान करी परब्रह्मीं लक्ष धरी ॥ अनुहात ध्वनि थोरी नाद गर्जे ॥ ३ ॥ उन्मनीं जागृति गोल्हाट मंडळा जाय ॥ तेथुनी निराळें पाहे निजतत्व ॥ ४ ॥ विष्णुदास नामा ह्मणे अनुभवी तोची जाणे ॥ आह्मी गुरुखुणें वर्ततसों ॥ ५ ॥

॥ १३८२ ॥ मायेसी रूसलें भावासी त्यागिलें ॥ जाऊनी राहिलें काकापासीं ॥ १ ॥ काकी मुख दावा काकी मुख दावा ॥ काकी मुख दावा बाईयानो ॥ २ ॥ काकीचें श्रीमुख गोरक्षा लाधलें ॥ काकीनें पुसिलें गोरक्षासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मां काकी पैं बोळली ॥ सत्रावी दिधली दोहावया ॥ ४ ॥

॥ १३८३ ॥ मुंगीस तो मार्गु सांपडे गोडीचा ॥ योगीया लक्षीचा ज्ञान ज्योती ॥ १ ॥ तरीच ओळखीजे केशवचरण ॥ त्या जन्ममरण मग कैंचें ॥ २ ॥ मत्स्य नानापरी क्रीडा खेळे जळीं ॥ आनंदकल्लोळीं योगीराय ॥ ३ ॥ नामा ह्मणे तोचि केशव जाणता ॥ तया नाहीं व्यथा गर्भवासु ॥ ४ ॥

॥ १३८४ ॥ पृथ्वी माजीं पाहातां नाहीं म्यां देखीला ॥ हस्तिसी उडवील ऐसा कोण्हीं ॥ १ ॥ शोधीतां शोधीतां आलों पंढरीसी ॥ तेथें ज्ञानोबासी देखीयेलें ॥ धृ० ॥ मोक्षमार्गीं देवें हा गजराज बांधला ॥ तो ज्ञानी उडाला गोल्हाटासी ॥ २ ॥ पृथ्वीमाजीं पाहातां ज्ञानी च कोल्हाटी ॥ ढीसाळ हे दृष्टि तृणप्राय ॥ ३ ॥ उडोनीया तेणें दर्शन घेतलें ॥ हस्तीसी जिंकिलें ज्ञानदेवें ॥ ४ ॥ याचीया इशाळे करील जो मूर्ख ॥ पाहुनीयां दुःख कष्टी होय ॥ ५ ॥ धन्य ज्ञानदेव योग साधूनिया ॥

भक्ति आचरोनीयां दावी लोकां ॥ ६ ॥ नामा ह्मणे सर्व खटपट सांडोनी ॥ पांडुरंग मनीं भावें ध्यावा ॥ ७ ॥

---

## आत्मप्राप्ति.

॥ १३८५ ॥ आत्मत्वाच्यायोगें पाहूंजातां ॥ नाहीं निरंतर भिन्न दैवता ॥ १ ॥ वर्णाश्रम याति कुळ गोत्र ॥ भक्ति सदोदित नाम्यापासी ॥ २ ॥ नामा ह्मणे भय मुळीं कांहीं नाहीं ॥ अखंडित पाही भक्तिसार ॥ ३ ॥

॥ १३८६ ॥ आह्मांसी चिंतन अवश्य श्रीरामा ॥ आवडी आणिक आह्मां नाहीं दुजी ॥ १ ॥ वोळगलों हरि भूतभावा निर्धारी ॥ दिसे चराचरीं भावरूप ॥ २ ॥ जें जें पडे दृष्टि आणिक नाहीं सृष्टि ॥ हरिरूपीं भेटी हेंचि दिसे ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठ्ठल सर्वां भूतीं आहे ॥ आणिक उपाय न लगती ॥ ४ ॥

॥ १३८७ ॥ धन्य माझा जन्म धन्य माझा वंश ॥ धन्य विष्णुदास स्वामी माझा ॥ १ ॥ कामधाम माझे केशवाचे पायीं ॥ दिननिशी पाहे हारपली ॥ २ ॥ शुक सनकादिक जेणे सुखें धाले ॥ तें सुख राहिलें माझ्या मनीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे जगीं अलभ्य लाभ झाला ॥ हरि सांपडला विटेवरी ॥ ३ ॥

॥ १३८८ ॥ तीर्थासी जाउनी काय त्यां करावें ॥ वाउगें हिंडावें पंथें तेणें ॥ १ ॥ माझें तीर्थ क्षेत्र पंढरी पैं जाणां ॥ उघडें निधान दृष्टीपुढें ॥ २ ॥ मागें थोर थोरीं हेंचि पैं साधिलें ॥ नाम्यासी दिधलें खेचर यानें ॥ ३ ॥

॥ १३८९ ॥ नामायानें बंदर घेतलें ॥ विठ्ठलासी जीत धरिलें ॥ १ ॥ नामा आला रे ह्मणती ॥ भेणें कळिकाळ कांपती ॥ २ ॥ भाव भक्ति करोनी कडी ॥ विठ्ठल पायीं जडली बेडी ॥ ३ ॥ देह करोनी बंदिखान ॥ विठ्ठल सांठविलें निधान ॥ ४ ॥ सोहं शब्दें मार केला ॥ विठ्ठल काकुळती आला ॥ ५ ॥ नामा ह्मणे विठ्ठलातें ॥ जीव गेल्या न सोडी तूतें ॥ ६ ॥

॥ १३९० ॥ आतां असो हे किती ठेवाठेवी ॥ कृपा विठ्ठलदेवीं केली मज ॥ १ ॥ अंतरींचे सुखें नाचतों मी भोजें ॥ हेंची निजगुज जाणवलें ॥ २ ॥ नामा ह्मणे आतां अंतरीचें गुज ॥ पांडुरंगें मज सांगितलें ॥ ३ ॥

॥ १३९१ ॥ कांसवींचीं पिलीं पोषिलीं कृपेनें ॥ तैसा पै आत्मज्ञानें सुखी झालों ॥ १ ॥ स्वप्नींचे संतोषें भुके जेंवि उल्हासें ॥ कीं सुखें हांसे नेणतांची ॥ २ ॥ पक्षी फळालागीं अंत्राळीं उडाला ॥ न कळे कोठें गेला माग साचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे खूण अनुभवीं जाणे ॥ ब्रह्मत्वीं पाहणें केशव चरण ॥ ४ ॥

॥ १३९२ ॥ आह्मां जतन करावया उभा विटेवरी ॥ तळवटीं पंढरी ओढवली ॥ १ ॥ तिहीं लोकीं पिकला असे जगजीवन ॥ प्राप्ति पाहून दान देत असे ॥ २ ॥ चातका चिंतनीं जळधर गगनीं ॥ पुढार देउनी पुंडलीका ॥ ३ ॥ विष्णुदास नामा विनवी वेळोवेळां ॥ विठ्ठलीं जीवनकळा मुरालीसे ॥ ४ ॥

॥ १३९३ ॥ तरावया संसार जडजीव प्राणी ॥ नाव नवखणीं नवही मुखें ॥ १ ॥ बैसा नावेवरी नाहीं भेदाभेद ॥ श्रवणाचे छंदें नाव गेली ॥ २ ॥ अठराही आवले नावेसी लागले ॥ साही रंगें भरले मिरवताती ॥ ३ ॥ चहूं मुखें जयाचा नकळे विचार ॥ सेवी अगोचर सहस्रमुखा ॥ ४ ॥ तारील तारील हाची पैं निर्धार ॥ नामा पैलपार उतरला ॥ ५ ॥

॥ १३९४ ॥ माझा भाव तुझे चरणीं ॥ तुझें रूप माझे मनीं ॥ १ ॥ सांपडलों एकमेकां ॥ जन्में नव्हेरे सुटीका ॥ धृ० ॥ त्वां मज केलेंरे विदेही ॥ म्यां तुज धरिलें हृदयीं ॥ २ ॥ त्वां तोडिली माझी माया ॥ मी जडलों तुझ्या पायां ॥ ३ ॥ नामा ह्मणेगा सुजाणा ॥ सांग ठकीलें कोणकोणा ॥ ४ ॥

॥ १३९५ ॥ मन झालें उन्मन वासना तल्लीन ॥ देखिले हरिचरण सर्वा ठायीं ॥ १ ॥ गुरुशिष्य मत हरपला दृष्टांत ॥ प्रत्यक्ष त्वरित हरि झाला ॥ २ ॥ नामा पाहे देहीं तंव उभा चहूं बाही ॥ दीशा द्रुमित दाही हरि दिसे ॥ ३ ॥

॥ १३९६ ॥ आह्मी परीट चोखट ॥ शुद्ध केलें खटवट ॥ १ ॥ बोध साबण लाऊनी ठायीं ॥ डाग उडविला पाही ॥ २ ॥ शांति शिळेवरी धुतलें ॥ ज्ञानगंगे निर्मळ झालें ॥ ३ ॥ परब्रह्म होउनी ठेलों ॥ नामा ह्मणे सुखरूप झालों ॥ ४ ॥

॥ १३९७ ॥ अट्ठावीस युगें उभा चंद्रभागें ॥ परी पालटची नेघे पांडुरंग ॥ १ ॥ उभा उगेपणें पुंडलिकाचेनी सुखें ॥ आहे तेथें लक्षें जैसा तैसा ॥ २ ॥ प्रेम रसरंगें प्रीतीचेनी पांगें ॥ सदां संतसंगें खेळ करी ॥ ३ ॥ जो नलभे योगें यागें आणि देहत्यागें ॥ तो सांपडला सर्वांगें हृदयीं धरा ॥ ४ ॥ धुंडाळितां श्रुतिस्मृति जो नुमगे ॥ तो भक्ता साहे मार्गें सांभाळित ॥ ५ ॥ योगीयांच्या ध्यानीं क्षणएक न रंगे ॥ तो सुखी गोष्टी सांगे नामयासी ॥ ६ ॥

॥ १३९८ ॥ आह्मी देह केलें दुकान ॥ तेथें सांठविलें ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ एके खेपें लाभ पैं झाला ॥ आह्मा पंढरिनाथ भेटला ॥ २ ॥ पुण्य सत्वाची केली सांगडी ॥ ब्रह्म तुकून बांधली पुडी ॥ ३ ॥ तुझा दास मी वाणिया भला ॥ नामा केशवचरणीं विनटला ॥ ४ ॥

॥ १३९९ ॥ आतां मज भय नाहीं पैं कोणाचें ॥ जन्ममरणाचें दुःख गेलें ॥ १ ॥ बद्ध मोक्षाची फिटली काजळी ॥ समाधि लागली समाधीसी ॥ २ ॥ नामा ह्मणे सर्वही साधन ॥ खेंचर चरण न विसंबें ॥ ३ ॥

॥ १४०० ॥ कोटी दिवाळ्या दसरे ॥ आह्मां हेंचि झालें पुरे ॥ १ ॥ घरोघरीं ओंवाळणी ॥ विठ्ठल देखिला नयनीं ॥ २ ॥ झाला सुखाचा शेजार ॥ करा नामाचा गजर ॥ ३ ॥ नामयाचा स्वामी आला ॥ ब्रह्मादिकां आनंद झाला ॥ ४ ॥

॥ १४०१ ॥ मी माझें उरलें बाळक माय पोटीं ॥ पाहे तंव कौतुकीं तेही नाहीं ॥ १ ॥ तेथींचें तेथें दंपत्य लोपलें ॥ कळिकाळें मंथिलें नामें थोर ॥ २ ॥ तेंचि घेउनी ठेलों मी येथें लोपलों ॥ ब्रह्मींच गुंतलों ब्रह्ममाळें ॥ ३ ॥ नामा ह्मणे चैतन्य चैतन्या मिळालें ॥ अरूप रूप ठेलें आपणामाजीं ॥ ४ ॥

॥ १४०२ ॥ मज तुज निगदलें निगदलें ॥ राहे कळिकाळा उगलें ॥ १ ॥ अरे खंडलें एके बोलें ॥ समर्थें होतां अंगिकारिलें ॥ २ ॥ नाम्यानें संसारिक जिंकिले ॥ केशवचरणीं मन ठेविलें ॥ ३ ॥

॥ १४०३ ॥ सहस्र नामाचे वाटगे ॥ खांदीं घेतले नेटगें ॥ १ ॥ देवा पाती तुझी देवा पाती तुझी ॥ सरकत माझी भक्तिभावें ॥ २ ॥ पंढरीये गेलों हाटा ॥ दुकान मांडीलें वाळुवंटा ॥ ३ ॥ वैष्णवांची भरली सात ॥ गिऱ्हाईक पातले बहुत ॥ ४ ॥ विकरा होतसे नामाचा ॥ लाभ झाला त्या विठ्ठलाचा ॥ ५ ॥ नामा देखुनी दुबळा ॥ विठ्ठलें दिधलें भांडवला ॥ ६ ॥

॥ १४०४ ॥ कोटी सूर्यप्रभादीप्ति ॥ गगनीं झळकली अवचितीं ॥ १ ॥ संत नामया सांगती ॥ पैल आला कमलापति ॥ २ ॥ वत्सालागीं जैसी धेनु ॥ तैसा धांवे जगजीवनु ॥ ३ ॥ गरुडाचे धुंदुवाती ॥ दाही दिशा आक्रंदती ॥ ४ ॥ हरिकंठींची सुमनमाळा ॥ सुटोनी आली भूमंडळा ॥ ५ ॥ सवें चाले सुदर्शन ॥ भक्त करावया रक्षण ॥ ६ ॥ उचलोनि दोहीं बाहीं ॥ नामा धरीला हृदयीं ॥ ७ ॥

॥ १४०५ ॥ द्वारावतीं येउनी जे गेलों ॥ शंखचक्र घेउनी आलों ॥ १ ॥ वाटे पानसारी धरिलो ॥ रामनामें सोडविलों ॥ २ ॥ शंखचक्र भरुनी केणें ॥ द्वारावती केलें येणें ॥ ३ ॥ नामा ह्मणे लाभ झाला ॥ फुकासाठीं हरी जोडला ॥ ४ ॥

---

## कुटाचे अभंग.

॥ १४०६ ॥ एका ब्राह्मणाचे घरीं खाण पडीलें ॥ सातां चोरीं मुसळ नेलें ॥ धांवणें निघालें ॥ वोस गांवींचें ॥ १ ॥ वोसगांवींचा हनुमंत खोटा ॥ तो घेतो दाही वाटा ॥ जन हें चोहटा ॥ नागविलें ॥ धु० ॥ नागविला चोहाटीचा वाणी ॥ आणि नेली प्रभुची गोणी ॥ गाढव बंदीखानीं ॥ बोंबलीतो ॥ २ ॥ एका संन्यासानें कुतरे खादलें ॥ गांवच्या खाटका प्रायश्चित्त दिल्हें ॥ बापुडे कुंभार नागवीले ॥ डोकें बोडिलें ह्मातारीचें ॥ ३ ॥ ऐश्या

सिद्धांतीच्या खुणा ॥ एक जाणें पंढरिराणा ॥ विष्णुदास नामा करी विज्ञापना ॥ संत प्रेमळ जाणती ॥ ४ ॥

॥ १४०७ ॥ नामासिंपी नामासिंपी ॥ रोंपें लाविलें केशवबापीं ॥ १ ॥ एक पुष्प फळा आली ॥ एक कळीच निर्फळ झाली ॥ धृ० ॥ एक उगवली आरडी दरडी ॥ एक वाळोनी झाली कोरडी ॥ २ ॥ नामा उगवला केशवद्वारीं ॥ न माये आंत ना बाहेरी ॥ ३ ॥

॥ १४०८ ॥ मुंगी उमगा ते मुंगी उमगा ॥ मुंगीचे मुखीं त्रिवेणी गंगा ॥ धृ० ॥ उदकाचें टवळें मसीची माती ॥ अंधारी मुंगीनें तेथें लाविली ज्योती ॥ १ ॥ अवघें आकाश मुंगीये मागें ॥ मुंगीये संसार सांडिला मागें ॥ २ ॥ विष्णुदास नामा मुंगीये मागें ॥ मुंगी उमगली खेचरसंगें ॥ ३ ॥

॥ १४०९ ॥ वृंदावनीं चरे पाणी पी भींवरे ॥ धेनु ते हुंबरे वत्सालागी ॥ १ ॥ केशव तें नाम कामधेनु गाये ॥ भक्ति तेचि धाये सुधारस ॥ २ ॥ सदां सर्वकाळ सप्रेम पान्हाये ॥ भुकेलिया खाये पातकांसि ॥ ३ ॥ नामा ह्मणे गाये भाविकासी माय ॥ पापीया न साहे लागे पाठी ॥ ४ ॥

॥ १४१० ॥ अकरा लोचन साचे पांच मुख ॥ आठ कान देख पुच्छ दोन ॥ १ ॥ अरत अखंड निरत प्रचंड ॥ उमाळ उदंड उभा फार ॥ २ ॥ दहा पाय चहूं चालत ते जाय ॥ नव्हेत ग माय सावज त्या ॥ ३ ॥ नामा ह्मणे त्याचा अर्थ करी चोख ॥ पूर्वज पातक लया जाय ॥ ४ ॥

॥ १४११ ॥ मुंगीनें आकाश कवळिलें बाहीं ॥ तेथें एक नवल वर्तलें पाहीं ॥ १ ॥ मुंगी उमगा मुंगी उमगा ॥ मुंगीचे माथा त्रिवेणी गंगा ॥ २ ॥ मुंगीचे गळां तुळइचा लोढणा ॥ विष्णुदास नामा बोलिला खुणा ॥ ३ ॥

॥ १४१२ ॥ परा पश्यंति मध्यमा वैखरी ॥ ते गाय दुभे वैष्णवा घरीं ॥ १ ॥ ते एके विठ्ठले पंढरी राखिली ॥ दुभावया दिधली पुंडलिका ॥ २ ॥ च्यान्ही वेद मुखीं धरूनियां राहे ॥ विठ्ठलाचे द्वारीं नामा गाये ॥ ३ ॥

॥ १४१३ ॥ गुळेंवीण शिंपी बोटें चाटी ॥ प्रेमेवीण तेली क्षेम दे लाटी ॥ १ ॥ जिताची कोष्टी घातला खाचे ॥ तुरंगेवीण कुंभार नाचे ॥ २ ॥ नामा ह्मणे यातीचे चाळे ॥ दुखणेवीण परीट विवळे ॥ ३ ॥

॥ १४१४ ॥ उडत लांवा देखिला त्याचें घागरीएवढें आंडें ॥ लटिकें न बोलों वर्तमान गाढें ॥ १ ॥ शेळी व्याली व्याघ्र जन्मला मांजरासी तीन डोळे ॥ कोहळ्याएवढें मोतीं आह्मी डोळां देखियेलें ॥ २ ॥ बाभुळीचे खोडीं माशानें केलें कोटें ॥ सशानें सिंह ग्रासीला बेडूक आलें लोटें ॥ ३ ॥ आह्मी आलों वरल्या देशा तेथें गाडग्याएवढे राळे ॥ उडत मुंगी देखिली तिचे वाटीएवढे डोळे ॥ ४ ॥ विष्णुदास नामयानें गाइली ही जती ॥ लटिकें ह्मणेल त्याच्या पूर्वजांसी अधोगती ॥ ५ ॥

॥ १४१५ ॥ आह्मां घरीं एक गाय दुभती आहे ॥ पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥ १ ॥ वाण ते सांवळी नामें ते श्रीधरा ॥ चरे वसुंधरा चवदां भुवनें ॥ २ ॥ वत्स नाहीं माय भलत्यासवें जाय ॥ कुरवाळितां लाहे भाव भरणा ॥ ३ ॥ चहूं धाराक्षीर वोळली अमूप ॥ धाले सनकादिक सिद्ध-मुनि ॥ ४ ॥ नामा ह्मणे माझी भूक पैं ते गाय ॥ जोगाविते माय तिन्ही लोकां ॥ ५ ॥

॥ १४१६ ॥ आंधळ्यानें स्वरूप देखियलें नयनीं ॥ मुकें बहिऱ्या कानीं गोष्टी सांगे ॥ १ ॥ कांसवीचें दूध दुहितां भरणा ॥ दुही त्याला जाणा हात नाहीं ॥ २ ॥ वारीयाच्या लोथा बांधोनियां माथां ॥ वांझे-चिया सुता बळिवंत ॥ ३ ॥ मुंगीनें त्रैलोक्य धरियलें तोंडीं ॥ नामा ह्मणे पिंडीं प्रचीत आहे ॥ ४ ॥

॥ १४१७ ॥ अभंगाची कळा नाहीं मी नेणत ॥ त्वरा केली प्रीत केशी-राजें ॥ १ ॥ अक्षरांची संख्या बोलिले उदंड ॥ मेरु सुप्रचंड शर आदीं ॥ २ ॥ सहा साडेतीन चरण जाणावे ॥ अक्षरें मोजावीं चौकचारी ॥ ३ ॥ पहिल्यापासोनी तिसऱ्यापर्यंत ॥ अठरा गणित मोज आलें ॥ ४ ॥ चौक-चारी आधीं बोलिलों मातृका ॥ बावीसाची संख्या शेवटील ॥ ५ ॥ दीड चरणाचें दीर्घ तें अक्षर ॥ मुमुक्ष विचार बोध केला ॥ ६ ॥ नामा ह्मणे मज स्वप्न दिलें हरि ॥ प्रीतीनें खेचरीं आज्ञा केली ॥ ७ ॥

॥ १४१८ ॥ कांट्याच्या अणिवर वसले तीन गांव ॥ एक वोस दोन भरेचिना ॥ १ ॥ वसेचिना तेथें आले तीन कुंभार ॥ दोन रुसले एक घडिचना ॥ २ ॥ घडीचना त्यानें घडलीं तीन मडकीं ॥ दोन हिरवीं एक भाजेचिना ॥ ३ ॥ भाजेचिना त्यांत टाकिले तीन तांदूळ ॥ दोन हिरवे

एक शिजेचिना ॥ ४ ॥ शिजेचिना तेथें आले तीन पाहुणे ॥ दोन रुसले एक जेवीचना ॥ ५ ॥ जेवीचना त्यानें आणल्या तीन ह्मशी ॥ दोन वांझ एक फळेचिना ॥ ६ ॥ फळेचिना तीतें झाले तीन टोणगे ॥ दोन मेले एक वांचेचिना ॥ ७ ॥ वांचेचिना त्यातें आले तीन गिऱ्हाईक ॥ दोन रुसले एक घेईचना ॥ ८ ॥ घेईचना त्यानें आणलें तीन होन ॥ दोन खोटे एक चालेचिना ॥ ९ ॥ चालेचिना तेथें आले तीन सराफ ॥ दोन आंधळे एका दिसेचिना ॥ १० ॥ दिसेचिना त्याला मारल्या तीन बुक्या ॥ दोन चुकल्या एक लागेचिना ॥ ११ ॥ लागेचिना तुम्हीं ऐसें दृढ जाणा ॥ नामा ह्मणे या खुणा कोणी जाणेचिना ॥ १२ ॥

॥ १४१९ ॥ बारा हात लुगडें एकची नारी ॥ पालऊं घातला खांदियावरी ॥ १ ॥ जाईन त्या गोकुळा पाहीन त्या गोपाळा ॥ तयालागीं उतावेळ मन माझें ॥ २ ॥ एका हातीं घातला तांबियाचा वाळा ॥ हाळदुळी वाटुनी सूदलें मी डोळां ॥ ३ ॥ एकली जातां नोळखे मातें ॥ विष्णुदास नाम्यास नेईन संगातें ॥ ४ ॥

॥ १४२० ॥ वारीवो दशवंती आपुला तूं बाळ ॥ विकटू हा खेळ खेळतसे ॥ १ ॥ धाकुटिया मुलां घेतो हा चिमोरे ॥ काय करूं धुरें भीत असों ॥ २ ॥ घरींचा ह्मातारा हाणितला येणें ॥ काय सांगूं उणें तुजपाशीं ॥ ३ ॥ मी वो लटिकी तरी नामयासी पुसा ॥ तुझा बाळू कैसा आसंदत ॥ ४ ॥

॥ १४२१ ॥ त्रिभुवनांची परी मांडिली शरीरीं ॥ गोकुळांभीतरीं उभारिलें ॥ १ ॥ शेपाचीये दृष्टी मूळ भूमिका चोखटी ॥ तेथुनी मूळ सृष्टी आरंभिली ॥ २ ॥ मन विंदानीं आणि कुंडलणी चतुर्दळांपासुनी ॥ पवनवेगीं टाकुनी पति समया स्वाधिष्ठानीं ॥ ३ ॥ मणीपूर पर्यंत तळवट शोभीवंत ॥ तेथुनी टाकितसे नीट कर्मभूमीं ॥ ४ ॥ बारा सोळा नारी श्रीपति मुरारी ॥ हृदय मंदिरीं गोपीराजु ॥ ५ ॥ कनक घाटेवरी सत्रावी सुंदरी ॥ चाले उन्मत्त भारी चंद्रकळा ॥ ६ ॥ तेथें रोवियला दारवंटा दावी त्याच्या वाटा ॥ जावया वैकुंठा गौळियांसी ॥ ७ ॥ मृत्युलोकींचीया सैंवरा आल्या ज्या चौबारा ॥ देखिल्या सा घरां चौघिजणी ॥ ८ ॥ त्या चीपोळीया वाहती मिळोनियां येती ॥ चालती मागुती पश्चिमपंथीं ॥ ९ ॥ अनुहतावरी वाट करूनी

नीट ॥ विशुद्ध नगरा येती धीट ॥ १० ॥ तेथुनी वाट असे नीट दारवंटां ॥ तेथूनी जावें ब्रह्मरंध्र कपटां ॥ ११ ॥ हेंची परब्रह्मराऊळ तेथुनी ॥ जाऊं नये पुढारीं सांडूनी राया ॥ १२ ॥ तेथें रविशशीवरी आणि ब्रह्मरष्मी स्वरूप ॥ एकांत ओवरी आहे अमुप ॥ १३ ॥ विष्णुदास नामा सांगे निर्वाणींच्या खुणा ॥ अनुभवी तोची जाणें येरा चोजवणा ॥ १४ ॥

॥ १४२२ ॥ राईयेवढें पांखरूं दादा त्रिभुवनीं याचा फेरारे ॥ नर आणि नारी तया पांखराचा चारारे ॥ आहे पिंडामध्यें त्याचा अनुभव तुह्मी करारे ॥ चौऱ्यांशी लक्ष योनी चुकविल जन्माचा फेरारे ॥ १ ॥ येऊनि संसारा याचा अनुभव तुह्मी करारे ॥ ध्रु० ॥ अठ्ठावीस योजनें तया पांखराचा फेरा रे ॥ बत्तीसा मुखांनीं तरि तें घेतसें चारा रे ॥ अहं सभेमध्यें याचा शोध तुह्मी करारे ॥ अकराही भूचर तया चोंची असती फार रे ॥ २ ॥ एकवीस सहस्र सहा शतें या पांखराची उंची रे ॥ सप्तही पाताळ तया पांखराचे चोंचीं रे ॥ नेत्रांतील बाहुली तया पांखराची चोंची रे ॥ सप्तही सागर घेऊन उडालें चोंचीं रे ॥ ३ ॥ तेव्हां तें पांखरूं दादा आहे सृष्टीवरी रे ॥ मेरु आणि मांदार तया पांखराचे उदरीं रे ॥ शिवाचें आसन दादा कवणिये घरीं रे ॥ पिंडीं आणि ब्रह्मांडीं ह्मणती दशवे द्वारीं रे ॥ ४ ॥ तेव्हां तें पांखरूं गोरक्षरायें वळखिलें रे ॥ पिंडीं आणि ब्रह्मांडीं मच्छिंद्रनाथें देखियेलें रे ॥ त्याचियेनीं अंगसंगें सद्गुरुनाथें दाखविली रे ॥ याचियानि प्रसादें नामा शिप्यानें गाईली रे ॥ ५ ॥

॥ १४२३ ॥ प्रळयाचे काळीं ब्रह्मांड जळालें ॥ कोण त्यांत उरलें सांगा मज ॥ १ ॥ प्रभाते फांकली जाती ते गुंतली ॥ सांग मज खोली स्वरूपाची ॥ २ ॥ ब्रह्मांडाची जेव्हां राख जळून झाली ॥ कोणी ती लाविली अरूपरूपीं ॥ ३ ॥ विष्णुदास ह्मणे सांगा हेंची गूढ ॥ नाहीं तरी मूढ होउनी राहे ॥ ४ ॥

॥ १४२४ ॥ मेलें जितासी सांगे गोष्टी ॥ आंधळें ओंवी सुवर्णाच्या गांठी ॥ पांगुळ लागे पवनाच्या पाठीं ॥ बाळका पोटीं माय वाढे ॥ १ ॥ थोट्यानें धवलार रचियलें ॥ मुकें पुराण सांगूं बैसलें ॥ सवेंची बहिरें ऐकों ठेलें ॥ वेडें हांसलें शहाणीयासी ॥ २ ॥ आणिक एक नवल सांगूं

काई ॥ जीत वाघ शलभानें भक्षिला पाही ॥ भुंगीनें पर्वत उचलिला बाहीं ॥ माशी करी साही सूर्यासी पै ॥ ३ ॥ मृदंगें वाहिला गुरव राणा॥ वांझेच्या स्तनीं संचरला पान्हा ॥ माथां फुलें खोऊं नाचे दवणा ॥ जाण सुजाणा न कळेची ॥ ४ ॥ मुरकुटें सगळा सागर शोषिला ॥ माशानें पारधी मारिला ॥ ससानें सिंह भोवंडिला ॥ वेदांपुराणां न कळेची ॥ ५ ॥ हें तुम्ही ह्मणाल उमानें ॥ हें तंव उफराटें दृष्टी पहाणें ॥ विष्णुदास नामा ह्मणे ॥ अनुभवी या खुणा जाणती ॥ ६ ॥

---

## हाटाचे अभंग.

॥ १४२५ ॥ ऐका दामशेटी सांगतों तुह्मासी ॥ द्रव्यही कुळासी मागुन घ्यावें ॥ १ ॥ मालधनी आलों घेऊनिया घरां ॥ तुह्मी कां दातारा गांजितसा ॥ २ ॥ नामदेव ह्मणे धोंडोबा नाईका ॥ भिती आणि पैका द्यावा वेगीं ॥ ३ ॥

॥ १४२६ ॥ ऐसें ऐकोनिया राजाई ते आली ॥ रोषें येऊनी बोली बोलतसे ॥ १ ॥ देवानें हें दिल्हें तुह्मी कां पाठवा ॥ काशाचा गणोबा बोलतसा ॥ २ ॥ ऐसें बोलोनिया हातें लोटी धोंडा ॥ तुमचिया वितंडा कोण पुसे ॥ ३ ॥ देवें मज दिल्हें तुह्मी कां मागता ॥ अलंकार आतां घडीन मी ॥ ४ ॥ नामा ह्मणे धन ज्याचें त्यासी द्यावें ॥ आपुलें तें घ्यावें आपणची ॥ ५ ॥

॥ १४२७ ॥ केशवासी नामा सांगतसे भावें ॥ व्यवसाव स्वभावें झाला तैसा ॥ १ ॥ मालिक गणोबा धोंडोबा जामीन ॥ घेतलीसे पूर्ण निशाचिठी ॥ २ ॥ आठवड्याची बोली करूनिया आलों ॥ नामा ह्मणे धालों तुज पाहतां ॥ ३ ॥

॥ १४२८ ॥ अरे नाम्या काय केलें ॥ कासया धोंड्याशीं कोंडिलें ॥ १ ॥ उदीम बरा फळा आला ॥ हारविलें भांडवलां ॥ २ ॥ संसारिक चतुर बहु ॥ माती समान घेसी गहूं ॥ ३ ॥ नामा ह्मणे दामशेटी ॥ माझी ऐकावी गोष्टी ॥ ४ ॥

॥ १४२९ ॥ जावोनियां नामदेव ॥ बोले गणोबासी भाव ॥ १ ॥ द्रव्य द्यावें हो सत्वरीं ॥ आह्मी जातों आपुल्या घरीं ॥ २ ॥ मग ह्मणे धोंडोबासी ॥ तुह्मी जामीन ऐवजासी ॥ ३ ॥ द्रव्य द्यावें हो लवकरी ॥ नाहींतरी चलावें घरीं ॥ ४ ॥ ऐसें बोलोनी धोंडोबासी ॥ पुढें लोटिलें तयासी ॥ ५ ॥ नामा पंढरीसी आला ॥ संगें धोंडोबा आणिला ॥ ६ ॥

॥ १४३० ॥ दामाशेटी ह्मणे व्यवहार कोणासी ॥ केला तो आह्मांसी सांग नाम्या ॥ १ ॥ गणोबा नाईक नाम हें जयाचें ॥ सावकार साचे पुरातन ॥ २ ॥ तयाचे दुकानीं वेंचिलें कापड ॥ आठावारीं तोड ऐवजासी ॥ ३ ॥ दामाशेटी ह्मणे नामया सुजाणा ॥ वेगीं द्रव्य आणा जाऊनियां ॥ ४ ॥

॥ १४३१ ॥ धोंडोबा नामदेवें काढिला बाहेरी ॥ अंतर्बाह्यात्कारीं सोनें झालें ॥ १ ॥ दामशेटी पाहुनी नामयासी बोले ॥ व्यर्थ म्यां छळिलें तुज बाळा ॥ २ ॥ राजाई गोणाई धांवोनियां आली ॥ विनत होऊनी बोली बोलताती ॥ ३ ॥ आह्मी कुटुंबीं द्रव्य नाहीं घरीं ॥ ह्मणोनी श्रीहरी पावलासी ॥ ४ ॥ गोणाई दामशेटी सांगे नामदेवा ॥ न बोलावें भावा जना बापा ॥ ५ ॥ जगा ऐसी मात कळलियावरी ॥ घेतील हिरोनी सारीं धोंडोबासी ॥ ६ ॥ नामदेव ह्मणे आपुलें द्रव्य घ्यावें ॥ उरलें तें धाडावें गणोबासी ॥ ७ ॥

॥ १४३२ ॥ बोले दामशेटी ॥ नाम्या ऐकावी गोष्टी ॥ १ ॥ पाहे संसाराची सोय ॥ हाटा बाजारासी जाय ॥ २ ॥ कुटुंब चालवणें तुज ॥ वृद्धपण झालें मज ॥ ३ ॥ तुजसाठीं नवस केला ॥ शेखी हाची कामा आला ॥ ४ ॥ दामा ह्मणे नामयासी ॥ किती शिकवावें तुजसी ॥ ५ ॥

॥ १४३३ ॥ सकळ समुदाय मिळोनियां आला ॥ द्रव्य देउनी नेला धोंडोबासी ॥ १ ॥ धोंडोबाशीं सकळीकें ग्रामस्थीं आणिलें ॥ पूर्ववत झाले दगडची ॥ २ ॥ नामा ह्मणे विठो पावला निर्वाणीं ॥ भक्तां चक्रपाणी रक्षितसे ॥ ३ ॥

॥ १४३४ ॥ क्षेत्रीं हा वृत्तांत कळला सर्वांशीं ॥ आले पंचक्रोशी सभोंवते ॥ १ ॥ धोंडोबा गणोबा होते ज्याचे रानीं ॥ ते आले धांवोनी

मागावया ॥ २ ॥ आपुलें द्रव्य घ्यावें धोंडोबाशीं द्यावें ॥ नाहींतरी चलावें पंचाइतीं ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे द्रव्य तुह्मी द्यावें ॥ आपुले घेवोनी जावें धोंडोबाशी ॥ ४ ॥

---

## संध्येचे अभंग.

---

॥ १४३५ ॥ येई गे केशवे मज तुझी सवें ॥ तुजवीण नुगवे दीनू माये ॥ १ ॥ तूं माय जननी कासवी कौसल्या ॥ दिन बहुसाळ मज पावे ॥ २ ॥ न मागे केवळ विषयाचें टवाळ ॥ तूं माझी कृपाळ विठ्ठल-माय ॥ ३ ॥ वोळली गगनीं केशव कामधेनु ॥ लवता लोचनु स्फुरे बाह्या ॥ ४ ॥ वाजवील वाद्य गोपाळांची मांदी ॥ आल्हाद गोविंदीं नित्य माझा ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशव येई कामधेनु ॥ तेणें माझी तनु तृप्त सदां ॥ ६ ॥

॥ १४३६ ॥ येगे नारायणी अमृत संजीवनी ॥ चिंतितां निर्वाणीं पावे वेगीं ॥ १ ॥ तूं माझें जीवन नाम नारायण ॥ नित्य अनुष्ठान तुझ्या नामें ॥ २ ॥ बाह्य अभ्यंतरीं तूंचि सर्वांठायीं ॥ तुजवीण सृष्टि शून्य दिसे ॥ ३ ॥ चाल लवलाह्या कृपाळू तूं माये ॥ मज हें न साहे मोह जंजाळ ॥ ४ ॥ तुटेल बिरडें सुटतील गांठी ॥ जंव तूं जगजेठी नये माये ॥ ५ ॥ नामा ह्मणे धन्य तुझें नाम साचें ॥ उच्चारीतां वाचें निवती अंगें ॥ ६ ॥

॥ १४३७ ॥ येई गे माधवे पाजी प्रेमपान्हा ॥ विषयाचा आंदणा नको करूं ॥ १ ॥ धांव तूं मधुकरे माधवे उदारे ॥ येई तूं सोइरे जन-नीये ॥ २ ॥ कष्टलों मी भारी शीण दूर करी ॥ येई तूं झडकरी माधवे वो ॥ ३ ॥ अनंत वो नामें पुराणें पढती ॥ पावसी आकांतीं विठ्ठले वो ॥ ४ ॥ नामा ह्मणे लाहो करावा माधवें ॥ माझेनि वो जीवें लाहे चाड ॥ ५ ॥

॥ १४३८ ॥ येई तूं गोविंदे नामामृतधारी ॥ नित्य हें उच्चारी गोविं-दातें ॥ १ ॥ गोविंद नित्य हाची छंद ॥ पावे तूं त्द्वंद्व आदिरूपें ॥ २ ॥

गोविंद हो ध्याने निवती अष्टांगें ॥ गोविंदे गे वेगें वेष धरूं ॥ ३ ॥ गोविंद गोपाळ मुकुंद केशरी ॥ येई तूं लवकरी सांवळीये ॥ ४ ॥ गोविंद हें नाम जनीं वनीं दिसे ॥ प्रत्यक्ष तें ठसे पंढरीसी ॥ ५ ॥ वेणूनादीं काला गोविंदें पै केला ॥ धांवतचि आला पेंद्यापाशीं ॥ ६ ॥ ती हीच वो माय उभी बाळमूर्ती ॥ नाम जे जपती पांडूरंग ॥ ७ ॥ नामा ह्मणे पांग गोविंद हा दवडी ॥ वेगें लवडसवडी करी माये ॥ ८ ॥

॥ १४३९ ॥ विष्णु विष्णु हरि पावे लवकरी ॥ ब्रिद चराचरी सांगे मुनी ॥ १ ॥ वैकुंठवासिनी कृष्णविष्णुदेव ॥ नामातें गौरव आह्मांलागीं ॥ २ ॥ धन्य हाचि दीनु विष्णुमाय पावे ॥ गगनीं उगवे सूर्य जैसा ॥ ३ ॥ आदि ब्रह्मा हरि विष्णुकृष्णगंगा ॥ भागीरथी वैगा पदीं पावे ॥ ४ ॥ गया तें प्रयाग काशी तें सर्वांग ॥ विश्वेश्वर लिंग चराचर ॥ ५ ॥ विष्णुगंगाधर विष्णुनाम पाठ ॥ उच्चारितां वाटे वैकुंठीची ॥ ६ ॥ नामा ह्मणे विष्णु भागीरथीमाझी ॥ पंढरीये माझी विठ्ठलमाय ॥ ७ ॥

॥ १४४० ॥ येई तूं मधुकरे मदनसुंदरे ॥ मज गे न धरे प्रेम पोटीं ॥ १ ॥ तूं माझी जननी मधुसूदन गाय ॥ कामधेनु होय कांसवीची ॥ २ ॥ आनंद निजघने जुनाट मधुसूदने ॥ शुकस्तनपान पाजी पान्हा ॥ ३ ॥ केशव कांसवी पद रानगाय ॥ आत्माराम होय निःसंदेह ॥ ४ ॥ विठ्ठलमुकुंदें स्वरूपें गोमटीं ॥ आकांतली सृष्टी मधुसूदनें ॥ ५ ॥ शंखचक्रांकित आयुधें मंडीत ॥ मुकुट शोभत तुझा शीरीं ॥ ६ ॥ भक्तवरदायनी मधुसूदनगंगा ॥ व्हावे तूं वो वेगा कामधेनु ॥ ७ ॥ नामा ह्मणे माये मधुसूदन गाय ॥ ते संजीवनी होय आह्मांलागीं ॥ ८ ॥

॥ १४४१ ॥ येई वो त्रिविक्रमें पूर्ण पान्हा देई ॥ कामधेनु होई विठ्ठलराजे ॥ १ ॥ त्रिविक्रम धरे येई तूं सांवळे ॥ मुकुंद गोपाळे केशवे वेगीं ॥ २ ॥ तूं माझें निजधन त्रिविक्रमधरे ॥ गंगानाममात्रें भंगी पाप ॥ ३ ॥ त्रिपदागायत्री त्रिविक्रममुखें ॥ जनाचीं वो दुःखें हरती नामें ॥ ४ ॥ त्रिजटा त्रिफणी भागीरथी वेणी ॥ प्रयाग वो धूनी पाप जाळी ॥ ५ ॥ त्रिस्थळीं त्रिमाये त्रिविक्रम होय ॥ विश्वेश्वर दोहे तारक ब्रह्म ॥ ६ ॥ काशीकांति माये अयोध्या द्वारका ॥ मथुरा अवंतीका तूंचि माये ॥ ७ ॥ नामा ह्मणे माझी त्रिविक्रम गाय ॥ भक्तीसी पान्हाये पंढरपुरीं ॥ ८ ॥

॥ १४४२ ॥ येई वो वामने खुजीयखुजटे ॥ पंढरीचे पेठे उभी राहे ॥ १ ॥ येई वो डोळसे सांवळे तेजसे ॥ वामने बहु वसे ब्रह्मचारी ॥ २ ॥ अनंत विद्रदे अनंत अपार ॥ कैवल्य वोसरे पद्कमळें ॥ ३ ॥ तुझें नाम धन्य वामन साजिरें ॥ रूप हें गोजीरें बळीच्या द्वारीं ॥ ४ ॥ तुझ्या चरणीं तीर्थें उद्धरती सर्व ॥ येई तूं सत्वर वामनाई ॥ ५ ॥ नामा ह्मणे पावे वामन ब्रह्मांडे ॥ स्वरूप वितंडे ब्रह्मचारें ॥ ६ ॥

॥ १४४३ ॥ येई वो श्रीधरे सर्व रूपसारे ॥ कैवल्य उत्तरे अभिनव ॥ १ ॥ श्रीधर श्रीरंगे नाम पांडुरंगे ॥ प्रगट वो सांगे पूर्णधन ॥ २ ॥ श्रीकरे श्रीधरे शोभा ते साचारे ॥ चक्रांकित करे शंख तुझा ॥ ३ ॥ सुंदर श्यामळ नाम हें अधळ ॥ मुखीं हो वेल्हाळ हस्त तुझे ॥ ४ ॥ प्रकाशे हा पूर्ण श्रीधरे पैं जाण ॥ सांगीतली खूण खेचरानें ॥ ५ ॥ नामा ह्मणे माता श्रीधर उच्चारू ॥ तरेन साचारू तिन्ही लोकीं ॥ ६ ॥

॥ १४४४ ॥ येई हृषीकेशी दिव्यरूप दिसे ॥ मन हें उल्हासे भेटीलागीं ॥ १ ॥ हृषीकेशी नामें तरले संभ्रमें ॥ निस रामनामें भवसिंधू ॥ २ ॥ आराधनें धन ऋषीसीं संपूर्ण ॥ नाम कोटी यज्ञ झाले तया ॥ ३ ॥ पावन हृषीकेशी हेंचि ध्यान मन ॥ नाम सनातन हृषीकेशी ॥ ४ ॥ विश्वाकरी कळा विश्वा जन लीळा ॥ त्राहे वेळोवेळां हृषीकेशी ॥ ५ ॥ नामा ह्मणे माय येई हृषीकेश ॥ झालों कासावीस तुजवीण ॥ ६ ॥

॥ १४४५ ॥ येई वो पद्मनाभे पंकजलोचने ॥ विश्व पूर्णघने देखे तुज ॥ १ ॥ त्राहे पद्मनाभा वाचा सिद्ध पावे ॥ मज हे नुगवे मायाजाळ ॥ २ ॥ पद्मांकित रेखा पद्म हें सुरेख ॥ पावे वो निमिष्य एकामय ॥ ३ ॥ विचरे हे पृथ्वी नाम पद्मनाभ ॥ स्वयंभावो बिंब विठ्ठलेसी ॥ ४ ॥ रिकामा मी नसे दीननिशीं निमिष्य ॥ पद्मनाभ साक्ष हृदयीं भोगी ॥ ५ ॥ नामा ह्मणे पद्मनाभ हें हो नाम ॥ जप तुझें प्रेम देई मज ॥ ६ ॥

॥ १४४६ ॥ येई वो दामोदरे पवित्र हे करे ॥ मना हो नावरे प्रेमलोट ॥ १ ॥ पाहे कृपादृष्टीं साहे जगजेठी ॥ पूर्ण पान्हा घोटी ऐसें करी ॥ २ ॥ दामोदरे नाम मदन परिकरे ॥ हाचि वो विचार मनें

केला ॥ ३ ॥ येई तूं निर्धारें पावे तूं झडकरी ॥ येई वो लवकरी दामोदरे ॥ ४ ॥ दामोदर माता पाहे वो समता ॥ पावे वो निवांतां पावे वेगीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे लोटूं प्रेमामृत निवटूं ॥ नामेंच वैकुंठू दामोदर॥ ६॥

॥ १४४७ ॥ येई तूं कृपाळे संकर्षण माते ॥ पवित्र पूर्णभरिते गुणनिधि ॥ १ ॥ त्राहेत्राहे वेगीं पावे वो झडकरी ॥ ब्रीद चराचरीं वर्णिताती ॥ २ ॥ संकर्षण गंगा सर्वांगीं तूं असे ॥ जनींवनीं दीसे रूप तुझें ॥ ३ ॥ कटावरी कर सांवळी सुंदर ॥ मनाचा विचार इच्या चरणीं ॥ ४ ॥ निर्धारु सांगतां न माये वो घेतां ॥ संकर्षण माता पाव वेगीं ॥ ५ ॥ विष्णु संकर्षण नाम हें गहन ॥ पतितपावन चरणरजें ॥ ६ ॥ नामा ह्मणे माय संकर्षण गाय ॥ हरिदासा पान्हावे पंढरीसी ॥ ७ ॥

॥ १४४८ ॥ येई तूं शारंगे वासुदेवे त्वरें ॥ वासुदेवो सारे गोपाळ वो ॥ १ ॥ त्राहे वासुदेवा पावें झडकरी ॥ त्वरें वेगूं करी आर्त भेटी ॥ २ ॥ वासुदेवनामें साधन सुगम ॥ योगिया विश्राम स्थान झालें ॥ ३ ॥ द्वादश अक्षर जपिन्नला धूरू ॥ तयासी साचारू अढळपद ॥ ४ ॥ बळी भीष्मदेवी वासुदेवीं भाव ॥ रोहिणीची माव ऐसें झालें ॥ ५ ॥ नामा ह्मणे भक्त वासुदेवीं रत ॥ सायुज्य पावे तो एक्या नामें ॥ ६ ॥

॥ १४४९ ॥ येई तूं प्रद्युम्ने ध्यान तूं धरणें ॥ माझीये कल्पने निर्धारुसा ॥ १ ॥ त्राहे झडकरी पावे वो लवकरी ॥ प्रद्युम्नें फुपकारी वेळोवेळां ॥ २ ॥ सांवळे सुंदरे वेणु वाहे करे ॥ ध्यान हें सुंदर यमुनातटीं ॥ ३ ॥ प्रवाह प्रद्युम्नें नामघोष दाट ॥ जिंकीले जुनाट पापराशी ॥ ४ ॥ नामा ह्मणे नाम धन्य हें प्रद्युम्न ॥ होईन संपन्न नाम घेतां ॥ ५ ॥

॥ १४५० ॥ येई वो अनिरुद्धे सांवळे प्रबुद्धे ॥ विराटे गोविंदे पाव वेगीं ॥ १ ॥ त्राहे माउलीये मना तुझी सोय ॥ चुकती अपाय नाम घेतां ॥ २ ॥ अनिरुद्ध पाठे जाईन वैकुंठे ॥ पुंडलीकपेठे उभा असे ॥ ३ ॥ कटावरी कर सांवळी सुंदर॥ मनाचा विचार इच्या चरणीं ॥ ४॥ अनिरुद्धसार अनु नाहीं आधार ॥ सर्वही विचार अनिरुद्धे ॥ ५ ॥ नामा ह्मणे येई अनिरुद्धे माये ॥ आणिक उपाय नलगे मज ॥ ६ ॥

॥ १४५१ ॥ येई तूं पुरुषोत्तमे संजीवनी रामे ॥ योगीया विश्रामे पुरुषश्रेष्ठा ॥ १ ॥ त्राहे मनोधर्म नाम पुरुषोत्तम ॥ साधन अगम ऐसी माये

॥ २ ॥ येई वो सांभाळी लवलाहे मन ॥ जुनाट हो जूने पुरुषोत्तमें ॥ ३ ॥ तुझें नाम धन्य पुरुष हें सौजन्य ॥ द्वैत हें अभिन्न अद्वैत हें ॥ ४ ॥ एकाक्षरी नाम पुरुष शुचिसम ॥ नाम आत्माराम पुरुषोत्तम ॥ ५ ॥ नामा ह्मणे पावे पुरुषोत्तम माते ॥ सर्वत्र अद्वैत एकरूप ॥ ६ ॥

॥ १४५२ ॥ येई वो अधोक्षजे वैकुंठ विराजे ॥ नाम गे सहजे अमृतरासी ॥ १ ॥ अधोक्षजनामें घालीन गोंधळ ॥ रिता एक पळ जाऊं नेदी ॥ २ ॥ अधर रंगीव अर्धोर्ध सोशीन ॥ सर्वत्र पाहीन अधोक्षज ॥ ३ ॥ अरिष्ट हें निरसी माये अधोक्षजे ॥ ऐसी या पाविजे संकटीं त्वां ॥ ४ ॥ अरिहे मर्दन अधोक्षज जाणें ॥ स्वीकारावें पूर्ण प्रगटतां ॥ ५ ॥ नामा ह्मणे धांवे अधोक्षज पावे ॥ दिशादम भावें तुज मग ॥ ६ ॥

॥ १४५३ ॥ येई वो केसरी नरसिंह उच्चारी ॥ पवित्र साचारी तिहीं लोकीं ॥ १ ॥ नरसिंह वामन प्रल्हाद रक्षण ॥ आमुचें तें धन नाम तुझें ॥ २ ॥ शंखचक्र करीं पावे वो लवकरी ॥ येई तूं केसरी लवलाहे ॥ ३ ॥ नरसिंह हें नाम नरसिंह हें प्रेम ॥ उत्तमोत्तम तिन्ही लोकीं ॥ ४ ॥ त्रिपुररक्षक दानवमर्दन ॥ विकटवदन पंचाक्षरी ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि नाम नरकेसरी ॥ नरसिंह उच्चारी तरती जीव ॥ ६ ॥

॥ १४५४ ॥ येई वो अच्यूते नामामृत रसे ॥ सुंदर डोळसे जान्हवीये ॥ १ ॥ अमृताची खोटी अच्युतनाम पेठीं ॥ पावे वो जगजेठी अच्युतसार ॥ २ ॥ अच्युत अच्युत नामें हेंची सस ॥ हें पीयूष त्वरित उच्चारितां ॥ ३ ॥ वैकुंठीची मूर्ति अच्युतनाम पाठे ॥ प्रत्यक्ष वो भेटे विटेवरी ॥ ४ ॥ पुंडलीक दृष्टी नयनाची भेटी ॥ निवारीतां दृष्टी न्याहाळीतां ॥ ५ ॥ नामा ह्मणे अच्युत नाम हेंचि आह्मां ॥ दिननिशीं राम जपतसे ॥ ६ ॥

॥ १४५५ ॥ येई जनार्दने जनवनसंपन्ने ॥ माझे वो चिद्‌घने पांडुरंगे ॥ १ ॥ त्राहे जनार्दने पूर्णानंदघने ॥ येई वो संपन्ने विश्वंभरे ॥ २ ॥ नाम हें दुर्लभ जनकजननी ॥ राम जनार्दनीं विनटली ॥ ३ ॥ सांवळी डोळस रवि एकासनी ॥ तेज प्रकाशनी हिरीयांची ॥ ४ ॥ जननी ते जननी निकट ते जीवनी ॥ जग प्रगटिणी हरीयाची ॥ ५ ॥ नामा ह्मणे जन नाम जनार्दन ॥ सनकादिक जाण सेवताती ॥ ६ ॥

॥ १४५६ ॥ येई तूं उपेंद्रे वैकुंठ महिंद्रे ॥ देवामाजीं भद्रे सिंहासनीं ॥ १ ॥ त्राहे वो जननी शीणलों गे माये ॥ तुजवीण आहे कवण मज ॥ २ ॥ तूं माझें कारुण्य प्रत्यक्ष सौजन्य ॥ विचारितां प्रवीण प्रबुद्ध हो ॥ ३ ॥ पावे वो तूं वेगीं उपेंद्रे गे माते ॥ पुंडलीक सांगातें पंढरीसी ॥ ४ ॥ दीपकु लाविला दीन उगवला ॥ दीपकें फळला पांडुरंग ॥ ५ ॥ नामा ह्मणे नाम उपेंद्र ऐसें शम ॥ पावेन विश्राम नाम घेतां ॥ ६ ॥

॥ १४५७ ॥ येई तूं हरीरूपें विट्ठल स्वरूपें ॥ कळिकाळ कांपे नाम घेतां ॥ १ ॥ नामें हरिहरि त्राहे वो झडकरी ॥ शीणलों मी भारी जननीये ॥ २ ॥ हरिनामधन सर्व जनार्दन ॥ हरी हें आठवण जिव्हे सदां ॥ ३ ॥ हरी हरी ह्मणतां हरीरूप संता ॥ नाम हें अनंताक्षर विलसे ॥ ४ ॥ येई तूं हरी गंगे सांवळे सुरंगे ॥ हरी हरी संगें रतलोंसे ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरी पांडुरंग माझा ॥ विठ्ठल हो भोजा राज्यधरूं ॥ ६ ॥

॥ १४५८ ॥ येई वो तूं कृष्णे हरी माझीये तृष्णे ॥ दिननिशी प्रष्णे वाट पाहे ॥ १ ॥ त्राहे कृष्णगंगे सांवळे सारंगे ॥ नामस्मरण वेगें पुरे आह्मां ॥ २ ॥ रामकृष्ण टाहो नामें लवलाहो ॥ फिटला संदेहो संसाराचा ॥ ३ ॥ उद्धव अक्रूर यादव सादर ॥ कृष्णाते अपार तयालागीं ॥ ४ ॥ अर्जुन द्रौपदी स्मरण गोविंदीं ॥ पावावें निजपदीं नामा ह्मणे ॥ ५ ॥

---

## प्रारब्ध किंवा कर्मभोग.

---

॥ १४५९ ॥ कृष्ण सहाय पांडवासी ॥ ते भोगिती नष्टचर्यासी ॥ साह्य केले हरिहरासी ॥ प्रारब्ध कोणासी टळेना ॥ १ ॥ ऐसी प्रारब्धाची ठेव ॥ झाले भिक्षुक पांडव ॥ राज्य घोडे भाग्य सर्व ॥ सांडीयेला ठाव प्रारब्धें ॥ धृ० ॥ शरीर संचीता आधीन ॥ धर्मराज हिंडे वन ॥ कर्मे बुडाला रावण ॥ आणि दुर्योधन प्रारब्धें ॥ २ ॥ आभिमानें शिशुपाळ ॥ कृष्णहस्तें झाला काळ ॥ यादव निमाले सकळ ॥ केलें निर्मूळ प्रारब्धें ॥ ३ ॥ कर्मरेखा टळेना ॥ बाण लागला जगज्जीवना ॥ कृष्णें सांडिल्या गोपांगना ॥ हें नारायणा प्रारब्ध ॥ ४ ॥ कामबुद्धीचें सुख ॥ अति

मानिती ते मूर्ख ॥ चंद्रासीं लागला कलंक ॥ इंद्रासीं दुःख प्रारब्धें ॥ ५ ॥ हरिश्चंद्र तारामती ॥ घोर जन्मांतर भोगिती ॥ नळराव पुरुषार्थी ॥ तयाच्या विपत्ति प्रारब्धें ॥ ६ ॥ पतिव्रता सुशीळ ॥ दमयंती पायें पोळे ॥ ऐसें अनिवार कपाळ ॥ भोगी दुष्काळ प्रारब्धें ॥ ७ ॥ ऐसी अनिवार जन्मांतरें ॥ राज्य सांडिलें रघुवीरें ॥ सर्वे मेळवुनी वान्नरें ॥ फिरवी दिगांतरें प्रारब्धें ॥ ८ ॥ फिरत फिरतां काय झालें ॥ पुढें प्रारब्ध ओढवलें ॥ जानकीस राक्षसें नेलें ॥ कष्ट भोगवीले प्रारब्धें ॥ ९ ॥ कर्मा आधीन शरीर ॥ पूर्ण ब्रह्म रामचंद्र ॥ रघुपति विष्णूचा अवतार ॥ पाठीं जन्मांतर ह्मणे नामा ॥ १० ॥

॥ १४६० ॥ सगुण समान भजती अंतरीं ॥ सर्व भूतांतरीं असे एक ॥ १ ॥ पाहा कोळियांची काय सांगो कीर्ति ॥ विद्या अभ्यासिती मूर्तिपुढें ॥ २ ॥ द्रौपदीचे घरीं होते उपवासी ॥ देंटही लाविती अकस्मात ॥ ३ ॥ नामा ह्मणे मुख्य प्रारब्ध कारण ॥ पांडुरंगावीण गति नाहीं ॥ ४ ॥

॥ १४६१ ॥ झाला कासावीस बाण लागलाची ॥ प्रारब्धाची गति चुकवेना ॥ १ ॥ चुकतां ते रेखा क्रियामान जाण ॥ २ ॥ बाणें पश्चात्ताप अर्जुनाचे मनीं ॥ शस्त्र चक्रपाणी धरी न मी ॥ ३ ॥ नामा ह्मणे धरूं ऐसे याचे संगा ॥ तारूं पांडुरंगा उभा असे ॥ ४ ॥

॥ १४६२ ॥ काय सांगों कर्मभोग ॥ पातलिंग शिवाचें ॥ १ ॥ याच सुखें ब्रह्मामुख ॥ उभा नख छेदिला ॥ २ ॥ सुचिष्मत पंडुपुत्र ॥ भिक्षा पात्र हिंडती ॥ ३ ॥ नामा ह्मणे कर्मरेखा ॥ देवांदिकां चुकेना ॥ ४ ॥

---

## गीतामाहात्म्य.

॥ १४६३ ॥ गीता गीता गीता त्रीवार बोलता ॥ पाप जाय तत्वता मोक्ष जोडे ॥ १ ॥ गीता महिमा बोलवेना वाचे ॥ बंधन जीवाचे दूर होती ॥ २ ॥ एके अक्षरीं कोटी अश्वमेध ॥ फळ हें प्रसिद्ध पुराणोक्त ॥ ३ ॥ एकची तो श्लोक वाचीलिया नेमें ॥ अंतीं परमधाम प्राप्त होय ॥ ४ ॥ नामा ह्मणे गीता संपूर्ण वाचीतां ॥ लाभ साचे आर्ता बोलवेना ॥ ५ ॥

॥ १४६४ ॥ गीता गीता ह्मणतां पापा होय नाश ॥ कैवल्यही त्यास प्राप्त होय ॥ १ ॥ गीतेचीं अक्षरें पडतां श्रवणीं ॥ जाय तत्क्षणीं भवभय ॥ २ ॥ एक एक श्लोकीं कोटी अश्वमेध ॥ पुण्यही अगाध ह्मणतां गीता ॥ ३ ॥ नामा ह्मणे गीता नित्य जो वाचीता ॥ तयाच्या सुकृता पार नाहीं ॥ ४ ॥

---

## रामजन्माचे अभंग.

॥ १४६५ ॥ कुळगुरु वसिष्ठ सांगे नृपवरा ॥ असती गरोदरा कांता तुझ्या ॥ १ ॥ धर्मशास्त्र सांगे डोहळे पूसावे ॥ त्यांचे पुरवावे मनोरथ ॥ २ ॥ ऐकोनीयां ऐसें आनंद मानसीं ॥ कैकई सदनासी जाता झाला ॥ ३ ॥ मंचकीं बैसली होती ते पापिणी ॥ देखतां नयनीं पहूडली ॥ ४ ॥ सुंदरपणाचा अभिमान मनीं ॥ त्यावरि गर्भिणी नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १४६६ ॥ राजा ह्मणे इच्छा तुझीये मानसीं ॥ डोहळे मजसीं सांग आतां ॥ १ ॥ येरी ह्मणे ऐसें वाटतसे जीवें ॥ कनिष्ठासीं द्यावें राज्यपद ॥ २ ॥ ज्येष्ठासीं धाडावें दूरी दिगंतरा ॥ नये समाचार त्याचा आह्मा ॥ ३ ॥ जनांत हें निंद्य वेद्बाह्य कर्म ॥ करीतां अधर्म पाप बहू ॥ ४ ॥ माझीये मस्तकीं ठेवावा हा दोष ॥ तुह्मांकडे लेश नाहीं नाहीं ॥ ५ ॥ निंदितील जन होय त्याचें सुख ॥ ऐकतांची दुःख राया झालें ॥ ६ ॥ वृश्चिकाचे पेंवीं तक्षक पडला ॥ घालीतां हें घृत अग्निमुखीं ॥ ७ ॥ ऐशी व्यथा होय नामा ह्मणे त्यासी ॥ उठीला त्वरेसी तेथूनियां ॥ ८ ॥

॥ १४६७ ॥ येतसे दशरथ सुमित्रामंदिरीं ॥ देखतां सामोरी येती झाली ॥ १ ॥ न माये आनंद तीयेचे मानसीं ॥ ठेवी मस्तकासी चरणावरी ॥ २ ॥ घालोनी आसन प्रक्षाळी चरण ॥ सर्वांगीं लेपन तीर्थोदकें ॥ ३ ॥ गंध धूप दीप पुष्पांचिया माळा ॥ अर्पुनी तांबूला उभी राहे ॥ ४ ॥ कैकयीचें दुःख विसरला राव ॥ पाहोनीयां भाव सुमित्रेचा ॥ ५ ॥ होती जे डोहळे तुझीये मानसीं ॥ सांग मजपाशीं पतिव्रते ॥ ६ ॥ प्राणनाथा ऐसी इच्छा आहे जीवा ॥ वडीलांची सेवा अहर्निशीं ॥ ७ ॥ आवडे हें एक नावडे आणिक ॥ द्यावें मज एक हेंची आतां ॥ ८ ॥

ऐकतांची ऐसें कांतेचें वचन ॥ आनंदें निमग्न मन होय ॥ ९ ॥ घेऊनियां हातीं रत्नाचें भूषण ॥ टाकी ओंवाळून नामा ह्मणे ॥ १० ॥

॥ १४६८ ॥ दशरथ राजा उठीला तेथुनी ॥ कौसल्येचे सदनीं जाता झाला ॥ १ ॥ पाहातसे दृष्टीं तेव्हां श्रावणारी ॥ न माये अंतरीं तेज तिचे ॥ २ ॥ तुझीये मानसीं होती जे डोहळे ॥ सांग वो वेल्हाळे मजपाशीं ॥ ३ ॥ उदरांत असे भक्तांचा कैवारी ॥ तेथें कैची उरी देहभावा ॥ ४ ॥ सदां समाधिस्थ रामरूपीं झाली ॥ कौसल्या माउली नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १४६९ ॥ न बोलेची कांहीं इसीं काय झालें ॥ भूतें झडपीलें निश्चयेसी ॥ १ ॥ माझीये अदृष्टीं नाहीं हा नंदन ॥ ह्मणोनीयां विघ्न ओढवलें ॥ २ ॥ निवारी हें दुःख वैकुंठनायका ॥ रक्षी या बाळका सुदर्शनें ॥ ३ ॥ तुझा मी किंकर आजी अंबुजाक्षा ॥ द्यावी मज भिक्षा हेची आतां ॥ ४ ॥ नामाचा उच्चार ऐकतांची कानीं ॥ नेत्र उघडोनी पाहती झाली ॥ ५ ॥ राजा ह्मणे कांहो ऐसी हे अवस्था ॥ कांहो भ्रम चित्ता झाला असे ॥ ६ ॥ विश्वाचा मी आत्मा स्वयें असें राम ॥ मजमाजी भ्रम कैंचा असे ॥ ७ ॥ आतां काय महिमा चारी वेद माझा ॥ सुरवरांच्या काजा नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १४७० ॥ रावणानें केलें लग्नामाजीं विघ्न ॥ असे कीं स्मरण तुजलागीं ॥ १ ॥ आणी रे धनुष्य मारीन रावणा ॥ लंका बिभीषणा देईन मी ॥ २ ॥ अंगद सुग्रीव जांबुवंत वीरा ॥ हनुमंत पाचारा लवकरी ॥ ३ ॥ टाकोनी पर्वत बुजवा रे सागरा ॥ पायवाट करा जावयासी ॥ ४ ॥ लंकेपुढें मोठें माजवीन रण ॥ तोडीन बंधन सुरवरांचें ॥ ५ ॥ विश्वामित्र याग नेईन मी सिद्धी ॥ मारीन कुबुद्धि दोघांजणा ॥ ६ ॥ खर दूषणाचा घेईन मी प्राण ॥ धनुष्य मोडीन भुजाबळें ॥ ७ ॥ ध्याती मज साची बहूत आवडी ॥ न विसंबें घडी त्यासी एक ॥ ८ ॥ बोलीला वाल्मिक तैसेंची करीन ॥ वर्तोनी दावीन नामा ह्मणे ॥ ९ ॥

॥ १४७१ ॥ परब्रह्म पूर्ण आलें माझे घरीं ॥ न कळे अंतरीं नृपाचिया ॥ १ ॥ करीती बडबड होती भूतचेष्टा ॥ पाचारा वसिष्ठा लवकरी ॥ २ ॥ येउनी वसिष्ठ पाहे कौसल्येसीं ॥ नावरती त्यासी अष्टभाव ॥ ३ ॥

राजा ह्मणे कैसें विपरीत झालें ॥ वसिष्ठा झडपिलें महाभूतें ॥ ४ ॥ श्रावण-वधाचें अघ नाहीं जळालें ॥ दूजें हें निर्मिलें प्रारब्धासीं ॥ ५ ॥ ऐकतांची हांसे सावध होउनी ॥ बोललासे झणीं नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ १४७२ ॥ विरंचीचा बाप क्षीरसागरवासी ॥ ध्याती योगी ज्यासी निरंतर ॥ १ ॥ परेहुनीपर वैखरीहुनी दूरी ॥ कौसल्येचे उदरीं तोची असे ॥ २ ॥ बोलियेलें जें जें नव्हे असत्य वाणी ॥ न येऊं दे मनीं शंका कांहीं ॥ ३ ॥ माझें हें संचित धन्यधन्य आतां ॥ पाहीन मी कांता लक्षुमीच्या ॥ ४ ॥ धन्य धन्य धन्य अयोध्येचे लोक ॥ वैकुंठनायक पाहातील ॥ ५ ॥ धन्य पशूपक्षी श्वापदें तरुवर ॥ राजा रघूवीर पाहातील ॥ ६ ॥ त्रैलोक्यांत धन्य तूंची एक नृपा ॥ नामयाच्या बापा पाहाशील ॥ ७ ॥

॥ १४७३ ॥ उत्तम हा चैत्रमास ॥ ऋतु वसंताचा दिवस ॥ १ ॥ शुक्लपक्षीं ही नवमी ॥ उभे सुरवर ते व्योमीं ॥२॥ माध्यान्हीसी दीनकर ॥ पळभरी होय स्थिर ॥ ३ ॥ धन्य मीच त्रिभुवनीं ॥ माझे वंशीं चक्रपाणी ॥ ४ ॥ सुशोभित दाही दिशा ॥ आनंद नरनारी शेषा ॥ ५ ॥ नाहीं कौसल्येसीं भान ॥ गर्भीं आले नारायण ॥ ६ ॥ अयोनीं संभव ॥ प्रगटला हा राघव ॥ ७ ॥ नामा ह्मणे डोळां ॥ पाहीन भुवनत्रयपाळा ॥ ८ ॥

॥ १४७४ ॥ सुवर्णाचा शोभे मस्तकीं मुगूट ॥ हीरे घनदाट तयावरी ॥ १ ॥ विस्तीर्ण कपाळ व्यंकटा भ्रूकुटीं ॥ टिळक ल्लाटीं केशराचा ॥ २ ॥ कमळाकार नेत्र आकर्ण शोभती ॥ कुंडलें झळकती कर्णीं ज्याच्या ॥ ३ ॥ सरळ नासिक लावण्य मुखचंद्र ॥ हनुवटी सुंदर राघवाची ॥ ४ ॥ कंठाचा आकार कंबुग्रीवा ऐसा ॥ हृदयावरी ठसा द्वीजपद ॥ ५ ॥ सुकुमार सुरेख जयाचें उदर ॥ ब्रह्मांडें अपार वसती जेथें ॥ ६ ॥ नाभीकमळींचा ब्रह्मा नेणे अंत ॥ कडदोरा शोभत कटीं ज्याच्या ॥ ७ ॥ दंडीं पेव्या करीं जडित मुद्रिका ॥ पीवळा नेटका पीतांबर ॥ ८ ॥ केंशराची उटी सरळ बाहूदंड ॥ चिमणा कोदंड हातीं ज्याच्या ॥ ९ ॥ गर्जती नेपुरें कोमळ चरणीं ॥ वज्रांकुश चिन्हें जयावरी ॥ १० ॥ कौस्तुभ मुक्तमाळा रुळे वैजयंती ॥ भ्रमर भूलती नामा ह्मणे ॥ ११ ॥

॥ १४७५ ॥ सांगताती दाया ॥ तुह्मां पुत्र झाला राया ॥ १ ॥ ऐकतांची ऐसें कानीं ॥ हर्ष न समाये मनीं ॥ २ ॥ उठा उठा हो त्वरेसी ॥ पाचा-

रावें वसीष्ठासी ॥ ३ ॥ ब्राह्मणासीं ते पाचारा ॥ सांगा सर्व नारीनरा ॥ ॥ ४ ॥ फोडा फोडारे भांडारें ॥ आणवा गाईचीं खिल्लारें ॥ ५ ॥ उभवा उभवारे गुढी ॥ सोडा वस्त्रांची गाठोडीं ॥ ६ ॥ झाडोनियां टाका खडे ॥ घाला केशराचे सडे ॥ ७ ॥ नामा ह्मणे भूमंडळा ॥ स्वामि माझा आला आला ॥ ८ ॥

॥ १४७६ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचे उदरीं ॥ ध्यातसे त्रिपुरारी अहर्निशीं ॥ १ ॥ पाहातसे मुख दशरथ त्याचें ॥ भाग्य मी तयाचें काय वर्णू ॥ २ ॥ गंध पुष्प वस्त्रें अर्पोनिया द्विजां ॥ समभावें पूजा सकळांसीं ॥ ॥ ३ ॥ साखरेच्या गोण्या घाला हत्तीवरी ॥ धाडी घरोघरीं नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १४७७ ॥ तुतारे भोंवारे वाजंत्रें वाजती ॥ अप्सरा नाचती थैथैकार ॥ १ ॥ झणण झणण झांजा गर्जताती ॥ नौबदा वाजती धोधोकारें ॥ २ ॥ सुरवर येती विमानाची दाटी ॥ करिती पुष्पवृष्टी देवावरी ॥ ३ ॥ नारद तुंबर किन्नर गंधर्व ॥ व्योमी गाती सर्व सप्तस्वरीं ॥ ४ ॥ कीर्तनाचा घोष नामाचा गजर ॥ मृदंग सुस्वर वाजताती ॥ ५ ॥ केशरी गंधाचे टिळे लावी भाळा ॥ घाली पुष्पमाळा द्वीजांकंठीं ॥ ६ ॥ घरोघरीं राजा धाडी रत्नराशी ॥ वस्त्रें सुहृदांसीं नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १४७८ ॥ करितसे स्नान अजाचा बाळक ॥ वस्त्रें अमोलिक परिधान ॥ १ ॥ लावोनियां भाळीं कस्तुरी केशर ॥ करी नमस्कार वसिष्ठासी ॥ २ ॥ पुण्याह वचनीं बैसे दशरथ ॥ त्रिभुवनीं समर्थ तूंची एक ॥ ३ ॥ वेदमंत्र घोष करिती ऋषेश्वर ॥ पुष्पें सुरवर वरुषती ॥ ४ ॥ आणिती बाहेर अयोध्येचे जन ॥ करिती गायन गायक जे ॥ ५ ॥ नाचती अप्सरा वाजती नगारे ॥ वाजंत्री तुतारे भोंवारे ही ॥ ६ ॥ गुलालाची धूम रंग वस्त्रावरी ॥ बंदीजन द्वारीं गर्जताती ॥ ७ ॥ नामा ह्मणे इंद्रें पाहोनियां सभा ॥ नाहीं ऐसी शोभा चित्तीं ह्मणे ॥ ८ ॥

॥ १४७९ ॥ कशाच्या ह्या नवबता ॥ पुत्र झाला दशरथा ॥ १ ॥ चला चला तेथें जाऊं ॥ कौसल्येचें बाळ पाहूं ॥ २ ॥ नवस बहुत ॥ तिसी पावला भगवंत ॥ ३ ॥ घ्याग घ्याग त्वरें वाण ॥ झगा फडकी पेहरण ॥ ४ ॥ करुनी शृंगारा ॥ येती राजयाच्या घरा ॥ ५ ॥ पाहतां सकुमार सांवळा ॥

लवूं विसरला डोळा ॥ ६ ॥ सार्थक जन्माचें ॥ नामा ह्मणे झालें त्यांचें ॥ ७ ॥

॥ १४८० ॥ भांडारी येउनी करिती प्रार्थना ॥ द्विजांसी दक्षणा काय द्यावी ॥ १ ॥ जया लागे जितुकें तितुकें त्यानें घ्यावें ॥ तुह्मी न रहावें उभें तेथें ॥ २ ॥ धांवताती तेव्हां विप्र सकळिक ॥ एकावरी एक पडताती ॥ ३ ॥ करूं नका घाई सर्वांसी पुरेल ॥ न राहे दुर्बळ यांत कोणी ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें धन वाटी राजा ॥ सुखी केल्या प्रजा सकळीक ॥ ५ ॥

॥ १४८१ ॥ ब्राह्मणांची इच्छा पूर्ण झाली जेव्हां ॥ आशिर्वाद तेव्हां वदताती ॥ १ ॥ कल्पकोटी यासी नाहीं नाहीं भय ॥ सकळांचें ध्येय हेंची असे ॥ २ ॥ तपाचिया राशी जाहल्या बहुत ॥ ह्मणोनियां सुत झाला तुज ॥ ३ ॥ तथास्तु ह्मणोनि जोडीत अंजुळ ॥ पायांवरी भाळ नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १४८२ ॥ बाई कौसल्येचा पुत्र ॥ दिसे सर्वांही विचित्र ॥ १ ॥ ऐसें वाटे माझ्या चित्तीं ॥ प्रगटली विष्णुमूर्त्ती ॥ २ ॥ झणीं होईल या दृष्ट ॥ मोडताती कानीं बोटें ॥ ३ ॥ तिच्या भाग्यें असों सुखीं ॥ नामा ह्मणे सर्वांमुखीं ॥ ४ ॥

---

## सीताशुद्धि.

---:o:---

॥ १४८३ ॥ हनुमंत गेला सीताशुद्धिलागीं ॥ लंका मध्यभागीं येऊनियां ॥ १ ॥ माता जानकीच्या करीत शुद्धीसी ॥ हिंडे गृहदेशीं राक्षसांच्या ॥ २ ॥ न देखे तो सती सीतादेवीमाया ॥ अकस्मात तया वनामाजीं ॥ ३ ॥ शिंसीवावृक्षाचे असे तळवटीं ॥ समीप निकटीं राक्षसींचे ॥ ४ ॥ न चले उपाय कांहीं तो बोलाया ॥ स्मरे रामराया तये काळीं ॥ ५ ॥ श्रीरामें मुद्रिका दिली होती संगें ॥ तयासी अव्यंग सोडावया ॥ ६ ॥ वृक्षाचिया माथां बैसोनियां बळी ॥ देत करकमळी सोडूनियां ॥ ७ ॥ जानकी अवलोकी श्रीरामाची मुद्रा ॥ कोठोनी कपींद्रा आणलीसे ॥ ८ ॥ सुखी रामराणा कवणिये वना ॥ माझिया तूं प्राणा बोले वेगीं ॥ ९ ॥ ऐकोनी कपींद्र चरणांसी वंदी ॥ ह्मणे रामचंद्र सुखी असे ॥ १० ॥ सहितसौमित्र वनामाजीं आहे ॥ शुद्धीलागीं पाहे पाठविलें ॥ ११ ॥

तुझेनी वियोगें रामराजा दुःखी ॥ यालागीं तुज देखीं पाठविलें ॥ १२ ॥
ऐकतांची वाणी करीत आक्रोशा ॥ ह्मणे राम कैसा सोडियेला ॥ १३ ॥
नानापरी खेद आलाप करूनी ॥ हा हा रामवाणी बोलतसे ॥ १४ ॥
समीप जे होते रक्षपाळ बळी ॥ ऐकोनी आरोळी दूर झाले ॥ १५ ॥ तये
संधीमध्यें हनुमंत खालौता ॥ येवोनियां माता वंदीतसे ॥ १६ ॥ क्षुधाक्रांत
भारी ह्मणे काय खाऊं ॥ सांगसी उपाऊ तरी येथें ॥ १७ ॥ वनामाजीं
मेवा घेऊनियां कांहीं ॥ क्षुधेसी ते पाही शांतवावी ॥ १८ ॥ ह्मणे सीता
दूता रक्षपाळ होती ॥ निरोध करिती तुजलागीं ॥ १९ ॥ ह्मणोनियां
पाही भूमीगत कांहीं ॥ घेउनी स्वदेहीं विश्रांतीसी ॥ २० ॥ पडलें तें घेई
ऐसी आज्ञा पाही ॥ वंदोनियां पायीं संतोषला ॥ २१ ॥ करोनी उड्डाण
वृक्षमाथां बैसे ॥ उपडोनी झाडास हालवीत ॥ २२ ॥ खालीं पाडी फळें
तयांचें भोजन ॥ करूनियां वन विध्वंसीलें ॥ २३ ॥ रक्षपाळ सारे मिळोनी
कपींद्रा ॥ धरावया सारा यत्न केला ॥ २४ ॥ न चढे हातांसी बहुबळ
त्यासी ॥ राक्षसां विध्वंसी हातपायीं ॥ २५ ॥ वृक्षाचेनि घायें मारिले
उपायें ॥ ऐसी बळ सोय दाखवीत ॥ २६ ॥ जंबूमाळी बागीं तया अधि-
कार ॥ धांवोनी सत्वर रायापाशीं ॥ २७ ॥ मात ते घेउनी आला तो
धांवुनी ॥ कपीराज वनीं आला एक ॥ २८ ॥ त्यानें सर्व वन पाडीलें
उपडोन ॥ कोणाचा तो कोण कळेना हो ॥ २९ ॥ राजा करी आज्ञा
धरा बांधा त्याला ॥ मारा वानराला वेगीं जारे ॥ ३० ॥ ऐकतांचि वाणी
भूपामुखींची हो ॥ उठिले लवलाहो राक्षसगण ॥ ३१ ॥ जावोनी वेढीला
कपीराज राणा ॥ धनुष्यासीं बाणां लावूनियां ॥ ३२ ॥ मारितां बाणासी
न लागे कपिसी ॥ तेव्हां युक्ति कैसी आरंभिली ॥ ३३ ॥ करूनी फांसासी
धरूं ह्मणती त्यासी ॥ नये तो फांसासी आटोपितां ॥ ३४ ॥ धरिती जरी
बाहीं निघोनियां जातां ॥ न चढे तो हातां कवणाच्या ॥ ३५ ॥ थोर जरी
फांसा होत तो लहान ॥ जाय तो निघोन फाशांतुनी ॥ ३६ ॥ लहान
जरी केला तरी होतो थोर ॥ फांशाचा विचार व्यर्थ करिती ॥ ३७ ॥ ऐशा परी
झाले श्रमातुर भारी ॥ कपि तो विचारी कार्य पुढें ॥ ३८ ॥ ह्मणोनी
फाशांत पडे तो तेधवां ॥ धरोनी वानरा नेती दूत ॥ ३९ ॥ सन्मुख रावणें
देखुनी कपीसी ॥ करी कौतुकासी अपूर्व हो ॥ ४० ॥ कधीं नाहीं ऐसें
स्वरूप देखिलें ॥ येणें फार केलें नाशालागीं ॥ ४१ ॥ पुसत तूं कोण कवण

कार्यालागीं ॥ पातलासी वेगीं याच ठायीं ॥ ४२ ॥ वानर ह्मणे आलों मूर्खा रावणा रे ॥ रामदूत खरे सीताशुद्धि ॥ ४३ ॥ ऐकोनी रावण ह्मणे यासी जाळा ॥ शेंपूट गुंडाळा अग्नि लावा ॥ ४४ ॥ कपीसी पुसिलें मरण कोणें ठायीं ॥ येरू पुच्छ दावी ह्मणोनियां ॥ ४५ ॥ समग्र लंकेचीं आणोनियां वस्त्रें ॥ कपीपुच्छ पुरें न होयची ॥ ४६ ॥ तेव्हां राजधानी आणोनी वेष्टीतां ॥ परी तो पुरतां न होयची ॥ ४७ ॥ तेव्हां तेल घाला ह्मणे तो रावण ॥ दूत ते धांवोन टाकिताती ॥ ४८ ॥ लावूनी अग्नीसी केला मोठा ज्वाळ ॥ वानर तत्काळ उडाला हो ॥ ४९ ॥ लंकेची ते केली सारी तेणें होळी ॥ सहीत मंडळी राजघरें ॥ ५० ॥ भुभुकार केला वानर उडाला ॥ लंकेमाजीं झाला प्रळय हो ॥ ५१ ॥ अग्नीचा उबाळा धुरानें दाटला ॥ देखे कपि त्याला सुखरूप ॥ ५२ ॥ मुखासी लागला पाहतांची डोळां ॥ ह्मणोनी तो झाला शामवर्ण ॥ ५३ ॥ येवोनी लवलाही श्रीरामातें पाही ॥ नमूनि सर्वही सांगितलें ॥ ५४ ॥ तेव्हां नामा ह्मणे होतों मी जवळा ॥ चरणकमळां ध्यात तेथें ॥ ५५ ॥

---

## रामचरित्र.

---

॥ १४८४ ॥ धन्य ते संसारीं पवित्र ते वाणी ॥ अखंड उच्चारणीं रामनाम ॥ १ ॥ तयाचीच एक सरली येरझार ॥ उतरले पार भवनदी ॥ २ ॥ वधोनी ताटीका सुबाहुही देख ॥ सिद्धि नेला मख कौशिकाचा ॥ ३ ॥ पहावया यावें स्वयंवर सीतेचें ॥ आलें जनकाचें पत्र तेथें ॥ ४ ॥ मारगीं चालतां ब्रह्मीयाची बाळा ॥ उद्धरली शिळा पदरजें ॥ ५ ॥ मोडील धनुष्य तया हें देईन ॥ केला होता पण जनकानें ॥ ६ ॥ रावणादि राजे आले थोर थोर ॥ त्यांचा उतरला नूर पाहतांची ॥ ७ ॥ अहर्निशीं जया ध्यानीं ध्याय भोळा ॥ तो उठला सांवळा बाप माझा ॥ ८ ॥ सुरां असुरां असाध्य ऐसें तें प्रचंड ॥ तें तींठायीं कोदंड मोडियलें ॥ ९ ॥ पाहोनी ऐसें नामा ह्मणे बळ ॥ सीता घाली माळ रघुवीरा ॥ १० ॥

॥ १४८५ ॥ संत समागमें चाले दळभारू ॥ आशा तृष्णा देशधडी अहंकारू ॥ १ ॥ दुम दुम दुम दुम भेरी वाजे ॥ आले अयोध्येसी श्रीरघुनाथ राजे ॥ २ ॥ भक्तभद्रजाती दोही बाहीं चालत ॥ विष्णुदास नामा कीर्ति वाखाणित ॥ ३ ॥

॥ १४८६ ॥ अयोध्ये आला रामराणा ॥ लंका दिली बिभीषणा ॥ १ ॥ नळनीळ जांबुवंत ॥ मधीं चाले रघुनाथ ॥ २ ॥ पुढें गर्जताती भाट ॥ पाठीं वानरांचे थाट ॥ ३ ॥ केला अयोध्येमध्यें प्रवेश ॥ ह्मणे नामा विष्णुदास ॥ ४ ॥

---

## कृष्णचरित्र—बाळक्रीडा.

---

॥ १४८७ ॥ लंबोदरा तुझा शोभे शुंडादंड ॥ करीतसे खंड दुश्चिन्हांचा ॥ १ ॥ चतुर्भुज आयुधें शोभताती हातीं ॥ भक्ताला रक्षिती निरंतर ॥ २ ॥ भव्यरूप तुझें उंदीरवाहना ॥ नमन चरणा करीतसे ॥ ३ ॥ नाम घेतां तुझें दोष जळताती ॥ कळिकाळ कांपती तुझ्या नामें ॥ ४ ॥ चौदा विद्या तुझे कृपेनें येतील ॥ मुके बोलतील वेदघोष ॥ ५ ॥ रूणझुण पायीं वाजताती वाळे ॥ देखोनी भुललें मन माझें ॥ ६ ॥ भक्तवत्सला तूं पार्वतीनंदना ॥ मस्तक चरणां ठेवीतसें ॥ ७ ॥ नामा ह्मणे आतां देई मज स्फूर्ती ॥ वर्णितसे कीर्ति कृष्णजीची ॥ ८ ॥

॥ १४८८ ॥ सरस्वती माते द्यावी मज स्फुर्ती ॥ येतों काकूळती तुजलागीं ॥ १ ॥ लाडकें लडिवाळ मागतसें तूज ॥ वंदीतसें रज चरणाचे ॥ २ ॥ त्वरें येवोनीयां मस्तकीं ठेवी हात ॥ जाईल ही भ्रांत तेव्हां माझी ॥ ३ ॥ आपुल्या बाळासीं धरी आतां हातीं ॥ न करी फजिती जनामध्यें ॥ ४ ॥ विश्वात्मा जो हरि त्याची वर्णी कीर्ती ॥ आवडीचा ओती रस माये ॥ ५ ॥ ऐकोनीया स्तव झालीसे प्रसन्न ॥ नाम्या तव अभिमान मजलागीं ॥ ६ ॥

॥ १४८९ ॥ प्ऱ्हाद नारद पराशर पुंडरीक ॥ व्यास आणि वाल्मीक नमीयेले ॥ १ ॥ दाल्भ्य तो भीष्म अंबरीष शौनक ॥ ब्रह्मनिष्ठ शूक नमीयेले ॥ २ ॥ रुक्मांगद अर्जुन वसिष्ठ बिभीषण ॥ केलेंसे नमन तया-



लागीं ॥ ३ ॥ टीकाकार श्रीधर बहिरंभट चतुर ॥ करा निरंतर कृपा मज ॥ ४ ॥ साधुसंतसिद्ध शिरीं ठेवा हात ॥ वर्णीन समस्त कृष्ण-लीला ॥ ५ ॥ नामा मनीं आठवी खेचरचरण ॥ तयाच्या कृपेनें सिद्धि-जावो ॥ ६ ॥

॥ १४९० ॥ देवा आदि देवा सर्वत्राच्या जीवा ॥ ऐक वासुदेवा दयानिधी ॥ १ ॥ ब्रह्मा आणि इंद्रा वंद्य सदाशीवा ॥ ऐक वासुदेवा दीन-बंधु ॥ २ ॥ चौदा लोकपाळ करिती तुझी सेवा ॥ ऐक वासुदेवा कृपा-सिंधु ॥ ३ ॥ योगियांचे ध्यानीं नातूडसी देवा ॥ ऐक वासुदेवा जग-द्गुरु ॥ ४ ॥ निर्गुण निराकार नाहीं तुज माया ॥ ऐक कृष्णराया कान-डिया ॥ ५ ॥ करुणेचा पर्जन्य शिंपी मज तोया ॥ ऐक कृष्णराया गोज-रीया ॥ ६ ॥ नामा ह्मणे जरी दाखविसी पाया ॥ तरी वदावया स्फुर्ती चाले ॥ ७ ॥

॥ १४९१ ॥ क्षीरसागरांत अससी बैसला ॥ धांवोनी मजला भेटी देई ॥ १ ॥ कैलासींचा शीव पूजितो तुजला ॥ धांवोनी मजला भेटी देई ॥ २ ॥ शेषावरी जरी अससी निजला ॥ धांवोनी मजला भेटी देई ॥ ३ ॥ गहिंवरोनी नामा बाहात विठ्ठला ॥ धांवोनी मजला भेटी देई ॥ ४ ॥

॥ १४९२ ॥ चक्रवाक पक्षी वियोगें बाहाती ॥ झालें मजप्रती तैसें आतां ॥ १ ॥ चुकलीया माय बाळकें रडती ॥ झालें मजप्रती तैसें आतां ॥ २ ॥ वत्स न देखतां गाई हंबरती ॥ झालें मजप्रती तैसें आतां ॥ ३ ॥ जीवनावेगळे मत्स्य तळमळती ॥ झालें मजप्रती तैसें आतां ॥ ४ ॥ नामा ह्मणे मज ऐसें वाटे चित्तीं ॥ करीतसे खंती फार तुझी ॥ ५ ॥

॥ १४९३ ॥ काय माझा आतां पाहातोसी अंत ॥ येई बा धांवत देवराया ॥ १ ॥ माझ्या जीवा होय तुजवीण आकांत ॥ येई बा धांवत देवराया ॥ २ ॥ असे जरी काम भेटून जाय मातें ॥ येई बा धांवत देवराया ॥ ३ ॥ येरे येरे देवा नामा तुज बाहात ॥ येई बा धांवत देवराया ॥ ४ ॥

॥ १४९४ ॥ न वर्णवे वाचे जन्ममरण दुःख ॥ दावी आतां मुख पांडुरंगा ॥ १ ॥ कुरळ केश भाळीं शोभतो टिळक ॥ दावी आतां मुख पांडु-रंगा ॥ २ ॥ भोंवया व्यंकटा शोभती सुरेख ॥ दावी आतां मुख पांडुरंगा ॥ ३ ॥

कमळाकार नेत्र सुंदर नासीक ॥ दावी आतां मुख पांडुरंगा ॥ ४ ॥ कर्णींचीं कुंडलें न वर्णवे हाटक ॥ दावी आतां मुख पांडुरंगा ॥ ५ ॥ अधरारक्त दंत इंदूहूनी अधिक ॥ दावी आतां मुख पांडुरंगा ॥ ६ ॥ विष्णुदास नामा तुझेंचि बाळक ॥ दावी आतां मुख पांडुरंगा ॥ ७ ॥

॥ १४९५ ॥ बाहूबळें तुंवा काढिलें अमृत ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ १ ॥ जननी माझी जेव्हां ज्याकडे पाहात ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ २ ॥ देवा बैसवोनी सुधेतें वांटीत ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ ३ ॥ क्षीराचा सागर उपमन्यूशीं देत ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ ४ ॥ घेवोनीयां चक्र परिक्षिता रक्षीत ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ ५ ॥ कवटाळीलें जेव्हां ध्रुवासीं वनांत ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ ६ ॥ विदुराच्या घरीं कण्या सांभाळीत ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ ७ ॥ चिरंजीव करूनी नगरी लंका देत ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ ८ ॥ नामा ह्मणे युद्धीं रक्षीयेला पार्थ ॥ ठेवी बा तो हात शिरावरी ॥ ९ ॥

॥ १४९६ ॥ रुणझुण पायीं वाजताती वाळे ॥ दावी तीं पाउलें दयानिधी ॥ १ ॥ जनक श्रुतदेव याच्या घरीं गेलीं ॥ दावी तीं पाउलें दयानिधी ॥ २ ॥ धरियेलें नक्रा तेव्हां जीं धावलीं ॥ दावी तीं पाउलें दयानिधी ॥ ३ ॥ वस्त्रहरणीं जीं द्रौपदीनें चिंतिलीं ॥ दावी तीं पाउलें दयानिधी ॥ ४ ॥ देखोनीयां ज्यातें कौरव भ्याले ॥ दावी तीं पाउलें दयानिधी ॥ ५ ॥ धर्म आणि भीष्म विदुरादिक धाले ॥ दावी तीं पाउलें दयानिधी ॥ ६ ॥ सैंवराशीं जातां शीळे उद्धरिलें ॥ दावी तीं पाउलें दयानिधी ॥ ७ ॥ नामा ह्मणे ज्यातें बळीनें पूजिलें ॥ दावी तीं पाउलें दयानिधी ॥ ८ ॥

॥ १४९७ ॥ अडखळूनी पडसी घालूं नको जोडा ॥ धांवत दुडदुडा येई आतां ॥ १ ॥ बैसावयासाठीं घेऊं नको घोडा ॥ धांवत दुडदुडा येई आतां ॥ २ ॥ भोजना बैससी येथें घेई वीडा ॥ धांवत दुडदुडा येई आतां ॥ ३ ॥ बाहूबळें काढीला देवांचा जो खोडा ॥ धांवत दुडदुडा येई आतां ॥ ४ ॥ नामा ह्मणे सुखी लक्ष्मीचा जो चूडा ॥ धांवत दुडदुडा येई आतां ॥ ५ ॥

॥ १४९८ ॥ येरे येरे देवा देईन तुला पेढा ॥ त्याला बाहे वेडा नामदेव ॥ १॥ ज्याचे पायीं असे विरुदाचा तोडा ॥ त्याला बाहे वेडा नामदेव ॥ २ ॥ जनीं पुसे सुखी रखुमाईचा जोडा ॥ त्याला बाहे वेडा नामदेव ॥ ३ ॥ यावयासी येथें आळस तुह्मीं सोडा ॥ घेईन इडापीडा नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १४९९ ॥ वेळोवेळां तुज बाहे वेडा भक्त ॥ राहों नेदी निवांत क्षणभरी ॥ १ ॥ मागें बहुतांनीं केले रे प्रबंध ॥ पाहोनीया छंद वेडावलों ॥ २ ॥ माथां ठेवी हात विश्वाचा जो बाप ॥ वर्णिरे प्रताप नामदेव ॥ ३ ॥

॥ १५०० ॥ करील जो प्रश्न सांगेल जो कथा ॥ श्रवण करितां उद्धरती ॥ १ ॥ कथा भागीरथी स्नान जे करीती ॥ त्याचे उद्धरती पूर्वज ते ॥ २ ॥ भागीरथी स्नाना श्रम लागे फार ॥ करावें एकाग्र मन येथें ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें बोले भागवत ॥ श्रीशुका सांगत परीक्षिती ॥ ४ ॥

॥ १५०१ ॥ पापी जे अभक्त दैत्य ते माजले ॥ धरणीसी झालें ओझें सांचें ॥ १ ॥ दिधलासे त्रास ऋषि मुनि सर्वां ॥ न पूजिती देवा कोणी तेव्हां ॥ २ ॥ राहियेले यज्ञ मोडिलीं कीर्तनें ॥ पळाले ब्राह्मण दैत्यांभेणें ॥ ३ ॥ वत्सरूपी पृथ्वी ब्रह्मयापाशीं जाय ॥ नेत्रीं वाहे तोय सांगतसे ॥ ४ ॥ बुडवीला धर्म अधर्म झाला फार ॥ सोसवेना भार मज आतां ॥ ५ ॥ ब्रह्मा इंद्र आणि बरोबरी शीव ॥ चालीयेले सर्व क्षीराब्धीसीं ॥ ६ ॥ नामा ह्मणे आतां करितील स्तुती ॥ सावधान चित्तीं परीसावें ॥ ७ ॥

॥ १५०२ ॥ वासुदेवा हृषीकेशा माधवा मधुसूदना ॥ करिताती स्तवना पुरुषसूक्तें ॥ १ ॥ पद्मनाभ त्रिलोकेशा वामना शेषशायी ॥ आह्मां कोणीं नाहीं तुजवीण ॥ २ ॥ जनार्दना हरि श्रीवत्स गरुडध्वजा पाव अधोक्षजा आतां आह्मां ॥ ३ ॥ वराहा पुंडरीका नृसिंह नरांतका ॥ वैकुंठनायका देवराया ॥ ४ ॥ अच्युता शाश्वता अनंता अज अव्यया ॥ कृपेच्या अभया देई आह्मां ॥ ५ ॥ नारायणाध्यक्षा कैटभ भंजना ॥ करी रे मर्दना दुष्टाचीया ॥ ६ ॥ चक्रगदाशंखपाणी नरोत्तमा ॥ पाव पुरुषोत्तमा दासा तुझ्या ॥ ७ ॥ रामा

हयग्रीवा भीमारौद्रोद्भवा ॥ आश्रयभूतां सर्वां तुझा असे ॥ ८ ॥ श्रीधरा श्रीपति चतुर्बाहो मेघःशामा ॥ लेंकुरें आह्मीं आह्मां पाव त्वरें ॥ ९ ॥ नामा ह्मणे ऐसें करितां स्तवन ॥ तोषला भगवान क्षीराब्धींत ॥ १० ॥

॥ १५०३ ॥ आकाशीची वाणी सांगे सकळांसीं ॥ तळमळ मानसीं करूं नका ॥ १ ॥ देवकीच्या गर्भा येईल भगवान ॥ रक्षील ब्राह्मण गाई भक्तां ॥ २ ॥ उतरील भार मारील दैत्यांसी ॥ आनंद सर्वांशीं करील तो ॥ ३ ॥ रोहिणी उदरीं शेष बळिभद्र ॥ यादव समग्र व्हारे तुह्मीं ॥ ४ ॥ ऐकोनीयां ऐसें आनंद मानसीं ॥ येती स्वस्थळासीं नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १५०४ ॥ शेषाप्रती बोले लक्ष्मीचा तो वर ॥ चला अवतार घेऊं आतां ॥ १ ॥ पृथ्वीवरी दैत्य माजले ते फार ॥ गाऱ्हाणें सुरवर सांगू आले ॥ २ ॥ शेष ह्मणे मज श्रम झाले फार ॥ यालागीं अवतार मी न घेचि ॥ ३ ॥ रामअवतारीं झालों लक्षुमण ॥ सेवीलें अरण्य तुह्मांसवें ॥ ४ ॥ चौदा वर्षांवरी केलें उपोषण ॥ जाणतां आपण प्रत्यक्ष हें ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसें वदे धरणीधर ॥ हांसोनी श्रीधर काय बोले ॥ ६ ॥

॥ १५०५ ॥ पूर्वीं तूं अनुज झालासी कनिष्ट ॥ सोशीयेले कष्ट मजसवें ॥ १ ॥ आतां तूं वडील होईंगा सर्वज्ञा ॥ पाळीन मी आज्ञा तुझी बा रे ॥ २ ॥ देवकीउदरीं राहावें जावोनी ॥ मायेसी मागूनी पाठवितों ॥ ३ ॥ योगमाया तुज काढील तेथून ॥ घालील नेऊन गोकुळासीं ॥ ४ ॥ लक्ष्मीशीं सांगे तेव्हां हृषीकेशी ॥ कौंडण्यपुराशीं जावें तुह्मीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसा करुनी विचार ॥ घ्यावया अवतार सिद्ध असे ॥ ६ ॥

॥ १५०६ ॥ वसुदेवा देत देवकी बहीण ॥ लग्नामध्यें विघ्न झालें ऐका ॥ १ ॥ आकाशींची वाणी सांगतसे कंसा ॥ मानी हा भरंवसा बोलण्याचा ॥ २ ॥ आठवा जो पुत्र वधील तुजशीं ॥ ऐकोनी मानसीं क्रोधावला ॥ ३ ॥ घेउनीयां खड्ग माराया धांवला ॥ हात तो धरीला वसूदेवें ॥ ४ ॥ देईन मी पुत्र सत्य माझें मानी ॥ ठेवा बंदीखानीं दूता सांगे ॥ ५ ॥ पुण्य सारावया भेटे देवऋषी ॥ वधी बाळकांशीं ठेवूं नको ॥ ६ ॥ होतांची प्रसूत नेऊनीयां देत ॥ साहाही मारीत दुराचारी ॥ ७ ॥ धन्य त्याचें ज्ञान न करीच शोक ॥ वधितां बालक नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १५०७ ॥ सातवा जो गर्भ योगमाया नेत ॥ आश्चर्य करीत मनामाजीं ॥ १ ॥ रोहिणीउदरीं नेवोनी घातला ॥ न कळे कोणाला देवावीण ॥ २ ॥ कंसाचीया भेणें यादव पळाले ॥ ब्राह्मण राहिले अरण्यांत ॥ ३ ॥ नाहीं कोणा सुख तळमळ मानसीं ॥ वधील दुष्टांसीं कोण आतां ॥ ४ ॥ विश्वाचा जो आत्मा कळलें तयाला ॥ दावीतसे लीला संभूतीची ॥ ५ ॥ अहर्निशीं ध्यान भक्तांचे मानसीं ॥ स्थापील धर्मासी नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ १५०८ ॥ देवकीचें तेज दिसे जैसा सूर्य ॥ कंसाचें हृदय जळतसे ॥ १ ॥ हरणें पळती देखोनीयां व्याघ्र ॥ कांपे थरथर तयापरी ॥ २ ॥ अजा सर्पन्यायें कीटकभ्रमर ॥ दिसे नारीनर कृष्णरूप ॥ ३ ॥ जेवितां बोलतां शेजे शीणे निज ॥ आला आला मज मारावया ॥ ४ ॥ नाशील हा आतां दैत्याचें तें बंड ॥ फाटलीसे गांड तेव्हां त्यांची ॥ ५ ॥ नामा ह्मणे भय लागलेंसें ध्यान ॥ चराचरीं कृष्ण दिसतसे ॥ ६ ॥

॥ १५०९ ॥ विमानांची दाटी अंतरिक्षीं देव ॥ करिताती सर्व गर्भस्तुती ॥ १ ॥ सत्रा अक्षरांत असे तुझी मूर्ति ॥ यज्ञेशा तुजप्रती नमो नमो ॥ २ ॥ साहाजणें भांडती नवजणी स्थापीती ॥ न कळे कोणाप्रती अंत तुझा ॥ ३ ॥ अठरा जण तुझी वर्णिताती कीर्ति ॥ गुणातीता श्रीपति नमो तुज ॥ ४ ॥ चौघां जणां तुझा न कळेची पार ॥ श्रमसी वारंवार आह्मांसाठीं ॥ ५ ॥ अठ्यांयशीं सहस्र वर्णिताती तुज ॥ ब्रह्मांडाचें बीज तुज नमो ॥ ६ ॥ जन्ममरणाचें नाहीं तया भय ॥ आठवीती पाय तुझे जे कां ॥ ७ ॥ नवजणी तुझ्या पायीं लोळताती ॥ परब्रह्म मूर्ती तुज नमो ॥ ८ ॥ नामा ह्मणे ऐशी करिताती स्तुती ॥ पुष्पें वाहूनि जाती स्वस्थळासीं ॥ ९ ॥

॥ १५१० ॥ मयूरादि पक्षी नृत्य करीताती ॥ नद्या वाहताती दोहीं थड्या ॥ १ ॥ भूमीवरी सडे केशर कस्तुरी ॥ आनंद अंतरीं सकळांच्या ॥ २ ॥ विमानांची दाटी सुरवर येती ॥ गंधर्व गाताती सप्तस्वरें ॥ ३ ॥ मंदमंद मेघ गर्जना करीती ॥ वाद्यें वाजताती नानापरी ॥ ४ ॥ नामा ह्मणे स्वर्गीं नगारे वाजती ॥ अप्सरा नाचती आनंदानें ॥ ५ ॥

॥ १५११ ॥ दशरथें मारीला तोची होता मास ॥ वर्षाऋतु असे कृष्णपक्ष ॥ १ ॥ वसुनाम तीथी बुधवार असे ॥ शुक सांगतसे परी-

क्षीती ॥ २ ॥ रोहीणीनक्षत्र दोन प्रहररात्र ॥ माया घाली अस्त्र रक्षपाळां ॥ ३ ॥ नवग्रह अनुकूळ सर्वांचें जें मूळ ॥ वसुदेव कपाळ धन्य धन्य ॥ ४ ॥ जयाचा हा वंश तयासीं आनंद ॥ माझे कुळीं गोविंद अवतरला ॥ ५ ॥ अयोनीसंभव नोहे कांहीं श्रमीं ॥ नामयाचा स्वामी प्रगटला ॥ ६ ॥

॥ १५१२ ॥ कोटीशा आदित्य गोठे एके ठायीं ॥ तेजें दिशा दाही उजळल्या ॥ १ ॥ घाबरा होवोनी वसुदेव पाहे ॥ हृदयीं आश्चर्य करीतसे ॥ २ ॥ मुकुटावरी रत्न नक्षत्रांचा मेळा ॥ भाळीं शोभे टीळा केशराचा ॥ ३ ॥ व्यंकटा भृकूटी कमलाकार नेत्र ॥ नासीक विचित्र शुकचंचू ॥ ४ ॥ विद्युल्लते ऐसी झळकती कुंडलें ॥ अधर कोंवळें अरुणोदय ॥ ५ ॥ कंबुग्रीव कंठ हृदयीं वत्सलांच्छन ॥ ब्रह्मयासीं सीण न कळे अंत ॥ ६ ॥ चतुर्भुज शंखचक्रगदापद्म ॥ चिमणा मेघःश्याम वर्ण ज्याचा ॥ ७ ॥ कौस्तुभ निर्मळ वैजयंती माळा ॥ कासे सोनसळा हाटकवर्ण ॥ ८ ॥ रुणझुण रुणझुण वाजताती वाळे ॥ आरक्त वर्तुळ नखीं शोभा ॥ ९ ॥ ध्वजवज्रांकुश जैसीं रातोत्पळें ॥ नामा ह्मणे डोळे दीपताती ॥ १० ॥

॥ १५१३ ॥ अयुत गायी ब्राह्मणासीं ॥ सोडी संकल्प मानसीं ॥ १ ॥ ओळखीलें तुज ॥ आतां कळलासी मज ॥ २ ॥ धर्म स्थापावया ॥ येथें येसी देवराया ॥ ३ ॥ आलिंगितां दोहीं बाहीं ॥ नामा ह्मणे डोई पायीं ॥ ४ ॥

॥ १५१४ ॥ सोडी सोडी मिठी ॥ लपवा लपवा जगजेठी ॥ १ ॥ ह्मणीं कंसासीं कळेल ॥ माझ्या बाळासी मारील ॥ २ ॥ वसुदेवा चिंता मनीं ॥ तेज न माये गगनीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे आलें हासें ॥ देव तेव्हां सांगतसे ॥ ४ ॥

॥ १५१५ ॥ नंदाच्या घराला ॥ मज नेई गोकुळाला ॥ १ ॥ माया उपजली तेथें ॥ ठेवी मज आणि येथें ॥ २ ॥ ह्मणसी असे रक्षपाळ ॥ ते म्यां मोहीले सकळ ॥ ३ ॥ आच्छादित रूप ॥ नामा ह्मणे माझा बाप ॥ ४ ॥

॥ १५१६ ॥ उचलिला कमळापती ॥ पायींचीं बंधनें गळती ॥ १ ॥ त्रैलोक्यांत जो न माय ॥ त्यासी बंधन करील काय ॥ २ ॥ कवाडें

उघडती ॥ देखतांची देवाप्रती ॥ ३ ॥ मंद मंद पडे पाऊस ॥ शिरीं छाया करी शेष ॥ ४ ॥ पूर चढला अचाट ॥ त्यासी लावीला अंगुष्ट ॥ ५ ॥ त्वरें आला नंदा घरीं ॥ निद्रिस्थ सा नरनारी ॥ ६ ॥ ठेवी तेथें कृष्णजीला॥ माया घेऊनी निघाला ॥ ७ ॥ रडे माया करी आक्रांत॥ नामा ह्मणे उठवी दूत ॥ ८ ॥

॥ १५१७ ॥ पूर्णब्रह्म मानी कंसाच्या भयासी ॥ वाटेल मानसी कोणाचीया ॥ १ ॥ इच्छामात्रें करी सृष्टीचा प्रलय ॥ त्यासी असे भय कवणाचें ॥ २ ॥ नंदाचें सुकृत झालें अगणीत ॥ ह्मणोनी भगवंत आला तेथें ॥ ३ ॥ सर्वां होय सूख तरतील लोक ॥ नामा ह्मणे शुक सांगतसे ॥ ४ ॥

॥ १५१८ ॥ तांतडीनें जाती ॥ कंसा सेवक सांगती ॥ १ ॥ उपजला वैरी ॥ त्यासी तूं रे त्वरें मारी ॥ २ ॥ त्वरें धांव घाली ॥ पाहे कन्या उपजली ॥ ३ ॥ ज्याचा धाक तूज ॥ नव्हे कन्या द्यावी मज ॥ ४ ॥ मारायाशीं खड्ग घाली ॥ हातिची निष्टूनियां गली ॥ ५ ॥ तुजलागी वधी ॥ उपजला मज आधीं ॥ ६ ॥ सांगे ब्रह्मज्ञान ॥ देवकीचें समाधान ॥ ७ ॥ नामा ह्मणे तये वेळीं ॥ त्यांचीं बंधनें काढिलीं ॥ ८ ॥

॥ १५१९ ॥ बोलावूनी अवघीयातें ॥ कंस पाहे विचारातें ॥ १ ॥ कोणीएक रे बोलती ॥ आह्मां ठावी देववस्ती ॥ २ ॥ जेथें पुराण कीर्तन गाई ब्राह्मण करिती यज्ञ ॥ ३ ॥ तेथें असे नारायण ॥ वधूं तयासी जाऊन ॥ ४ ॥ वैरी सहजची मरेल ॥ ऐसे बोलताती बोल ॥ ५ ॥ कंसा मानवलें जाण ॥ करा मजसाठीं यत्न ॥ ६ ॥ नामयाच्या छंदें ॥ नंद करितो आनंद ॥ ७ ॥

॥ १५२० ॥ शुक ह्मणे राया ऐक परिक्षीती ॥ श्रवण करितां तृप्ति नाहीं तुज ॥ १ ॥ माया जातां मथुरे सावध निद्रिस्थ ॥ देखीला भगवंत यशोदेनें ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें उदरीं न कळे कोणाला ॥ वाजवीती थाळा जन्मकाळीं ॥ ३ ॥ यज्ञभोक्ता कृष्ण त्यासी देती बोळा ॥ ध्यानीं ध्याय भोळा सदाशीव ॥ ४ ॥ गौळणी बाहाती नंदालागीं तेव्हां ॥ पुत्रमुख पाहा नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १५२१ ॥ विश्वाचा जो बाप हातीं ज्याच्या सूत्र ॥ ह्मणवितो पुत्र नंदजीचा ॥ १ ॥ तीर्थं ज्याच्या चरणीं करीताती न्हाणीं ॥ यशोदा जननी ह्मणताती ॥ २ ॥ वेडावला शेष शिणले वेद चारी ॥ निजे मांडीवरी यशोदेच्या ॥ ३ ॥ शरणांगता देत क्षीरसिंधू जाण ॥ चोखीतसे स्तन आवडीनें ॥ ४ ॥ त्रैलोक्याचा राजा वर्णू काय रंक ॥ ऐकावें जातक नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १५२२ ॥ करूनीयां स्नान वस्त्रें घेतलीं नूतन ॥ १ ॥ पाचारा ब्राह्मण श्रृंगारावें देवसदन ॥ २ ॥ बाहा बाहा दशग्रंथी ॥ सांसी सांगा आणा पोथी ॥ ३ ॥ त्वरें बाहारे ज्योतिषी ॥ नंद करी जातकासी ॥ ४ ॥ केलें देवतार्चन ॥ सांगती तर्पण ॥ ५ ॥ फार साला सुख ॥ पाहे कृष्णाजीचें मुख ॥ ६ ॥ करी पुण्याहवाचन ॥ नामा ह्मणे आनंदानें ॥ ७ ॥

॥ १५२३ ॥ आला जगदोद्धार ॥ साचें भरलें भांडार ॥ १ ॥ सुशोभीत दिसे मही ॥ दोन लक्ष्य दिधल्या गायी ॥ २ ॥ तिळ तांदूळ पर्वत ॥ द्रव्यें वाटी अगणीत ॥ ३ ॥ एक जाती एक येती ॥ ओझें उचलीतां कुंथती ॥ ४ ॥ भाट वर्णिताती ॥ नामा ह्मणे ज्याची कीर्ती ॥ ५ ॥

॥ १५२४ ॥ ब्राह्मण आशिर्वाद देती ॥ नंदा पुसोनी निघती ॥ १ ॥ चलाचला ह्मणती लोक ॥ पाहूं नंदाचें बालक ॥ २ ॥ नरनारी हो अलंकार ॥ श्रृंगारील हें नगर ॥ ३ ॥ दैन्य दारिद्र अपेश ॥ पळती मानूनियां त्रास ॥ ४ ॥ आणिताति बाळा लेणें ॥ स्त्रिया पाहताती कृष्णे ॥ ५ ॥ नामा ह्मणे पाहतां मुख ॥ हारपली ताहानभूक ॥ ६ ॥

॥ १५२५ ॥ पाटावरी बैसवीती ॥ गोपी अक्षवाणें करिती ॥ १ ॥ ब्रह्मादिक न देखती माथा ॥ सासीं लावीती अक्षता ॥ २ ॥ नव्हे प्राकृत बालक ॥ परस्परें ह्मणती लोक ॥ ३ ॥ ध्वज वज्रांकुश चिन्ह ॥ आला वैकुंठीचा राणा ॥ ४ ॥ येती वेळोवेळां ॥ नामा ह्मणे पाहाती डोळां ॥ ५ ॥

॥ १५२६ ॥ द्रव्य द्यावयासी ॥ नंद गेला मथुरेसी ॥ १ ॥ तेथें भेटे वसुदेव ॥ सांगितलें गुह्य सर्व ॥ २ ॥ कंसाचे मानसीं ॥ घात इच्छी गोकुळासी ॥ ३ ॥ जाई जाई त्वरित ॥ होती गोकुळीं आघात ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगे ॥ नंद तेथुनीया निघे ॥ ५ ॥

॥ १५२७ ॥ कैसी पाठविली मायावी पूतना ॥ देवोनियां स्तना बाळें मारी ॥ १ ॥ दीन दुर्बळांचीं मारीत बाळकें ॥ करीताती शोक मायबाप ॥ २ ॥ गहिंवरोनी तेव्हां पुसे परीक्षीती ॥ भगवंताची मूर्ती बाळरूप ॥ ३ ॥ अभय देतसे बापा नको रडूं ॥ तें काय धुंगडूं मारूं शके ॥ ४ ॥ जेथें पुराणें ही वर्णिताती कृष्ण ॥ पळती तेथून असुरादी ॥ ५ ॥ नामा ह्मणे आली नंदाचीये घरीं ॥ स्वरूप सुंदरी देवांगना ॥ ६ ॥

॥ १५२८ ॥ कृष्णा लावितसे स्तनीं ॥ तिसीं मारी चक्रपाणी ॥ १ ॥ भयाभीत प्रेत ॥ जन विस्मय करीत ॥ २ ॥ रडे तेव्हां माया ॥ वांचलासी बा तान्हया ॥ ३ ॥ मिळोनियां समस्त ॥ भाळीं आंगारा लावीत ॥ ४ ॥ वसुदेवें सांगितलें ॥ नंद ह्मणे तैसें झालें ॥ ५ ॥ कुऱ्हाडी आणिती ॥ शस्त्रें करूनी तोडिती ॥ ६ ॥ नामा ह्मणे दिल्हा अग्नी ॥ वास न माये गगनीं ॥ ७ ॥

॥ १५२९ ॥ पुण्यवंता दावी बाळलीला देव ॥ पालथा केशव पडे तेव्हां ॥ १ ॥ नंदें उत्साहासीं केलें तेव्हां फार ॥ दिधलें अपार द्रव्य द्विजां ॥ २ ॥ यशोदा घेतसे देवाचें चुंबन ॥ तुजला न्हाणीन तान्ह्या माझ्या ॥ ३ ॥ चोंगड्या मुका घेताती गौळणी ॥ हांसे चक्रपाणी आनंदानें ॥ ४ ॥ नामयाचा स्वामी मंदमंद हांसे ॥ यशोदा करितसे निंबलोण ॥ ५ ॥

॥ १५३० ॥ करावया वनभोजन ॥ जाती गोकुळीचे जन ॥ १ ॥ भोजन करिती ॥ कोणी देवा खेळविती ॥ २ ॥ डोळे झांकीत श्रीपती ॥ दावी निद्रेची आकृती ॥ ३ ॥ बहुत खेळलासे खेळा ॥ आतां निजवागे बाळा ॥ ४ ॥ वस्त्रें घालूनी शकटातळीं ॥ निजविती वनमाळी ॥ ५ ॥ क्षणएक निजला देव ॥ रडे उठे वासुदेव ॥ ६ ॥ मुलालागीं ह्मणे तेव्हां ॥ माझा कान्होबा खेळवा ॥ ७ ॥ रागेंरागें झाडी लात ॥ गाडा मोडोनी पडत ॥ ८ ॥ नामा ह्मणे वाटी धन ॥ नंद वांचला नंदन ॥ ९ ॥

॥ १५३१ ॥ तूंची माझा प्राण तूं माझी माउली ॥ तूं माझी बहिणुली कान्हाबाई ॥ १ ॥ गणगोत भाऊ तूंची माझा सखा ॥ संसार लटिका तुजवीण ॥ २ ॥ मांडीवरी घेत यशोदा सुंदरी ॥ आळवीत श्रीहरि नाना युक्ती ॥ ३ ॥ तूंचि माझा धनी तूंची माझें जीवन ॥ चुंबीत

वदन वेळोवेळां ॥ ४ ॥ नामा ह्मणे भार घाली मांडीवरी ॥ ठेवी भूमीवरी कृष्णजीला ॥ ५ ॥

॥ १५३२ ॥ कौंसें पाठवीला तेव्हां तृणावर्त॥ धुळीनें समस्त व्यापियेलें ॥ १ ॥ दुष्टबुद्धि तेव्हां उचली देवासी ॥ धरीयेलें सासी कंठीं देवें ॥ २ ॥ यशोदा पाहात न दिसे श्रीकृष्ण ॥ ऊर बडवून शोक करी ॥ ३ ॥ गौळणींचा मेळा मिळाला समस्त ॥ कोणी कृष्णनाथ नेला सयें ॥ ४ ॥ न लगे घरदार बुडाला संसार ॥ दावा गे श्रीधर तान्हें माझें ॥ ५ ॥ ठावें असतें ऐसें बांधीसें पोटासीं ॥ कोठें गुंतलासी बाळा माझ्या ॥ ६ ॥ धांवा गे धांवण्या पाहा गे लेंकरूं ॥ शोक अनिवारू करीतसे ॥ ७ ॥ शिणल्या भागल्या येतों तुह्मां घरीं ॥ मुख हें उदारा दावी कृष्णा ॥ ८ ॥ सांडू पाहे प्राण यशोदा सुंदरी ॥ हंबरडा मारी कृष्णालागी ॥ ९ ॥ चेपोनी नरडें गतप्राण केला ॥ भूमीसीं मिळाला दैत्य तेव्हां ॥ १० ॥ नामा ह्मणे वरी खेळत गोविंद ॥ पाहोनी आनंद सकळांसी ॥ ११ ॥

॥ १५३३ ॥ आला गोकुळासी ॥ हर्ष न माये गगनासी ॥ १ ॥ नंदें गर्गातें देखिलें ॥ पूजा स्तवनीं तोषवीलें ॥ २ ॥ भूतभविष्यवर्तमान ॥ तुह्मां कळें हो संपूर्ण ॥ ३ ॥ पाहा सामुद्रिक लक्षण ॥ याचें काय सांगा चिन्ह ॥ ४ ॥ बोले तेव्हां गर्गऋषी ॥ झणीं कळेल कंसासी ॥ ५ ॥ रोहिणीनंदादि बैसती ॥ गर्ग घेऊनी एकांतीं ॥ ६ ॥ घालूनियां मंगलस्नान ॥ आरंभीं पुण्याहवाचन ॥ ७ ॥ ऐसी वदे शुकवाणी ॥ नामा ह्मणे ऐका कानीं ॥ ८ ॥

॥ १५३४ ॥ जन्मजन्मांतरीं झाला तुज श्रम ॥ ह्मणोनियां ब्रह्म आलें येथें ॥ १ ॥ राखतील गाई मारीतील दुष्ट ॥ न करी बोभाट जनामध्यें ॥ २ ॥ द्वादश गांव अग्नि करील प्राशन ॥ वांचवील प्राण सकळांचे ॥ ३ ॥ चोरोनीयां गायी नेईल सौंगडे ॥ लावील हा वेड ब्रह्मयासी ॥ ४ ॥ उचलील हा पर्वत हरील हा गर्व ॥ तारील हा सर्व नाममात्रें ॥ ५ ॥ समुद्रीं हा नगरी रचील क्षणांत ॥ चरित्र अद्भुत करील हा ॥ ६ ॥ सोळा सहस्र शत अष्ट नायीका ॥ करील बाईका तुझा कृष्ण ॥ ७ ॥ त्रैलोक्यांत हाची उदाराचा राणा ॥ देईल ब्राह्मणां हेमपुरी ॥ ८ ॥ सांगे ऐसें आशीर्वाद सा देऊन ॥ नामा ह्मणे मुनि जाता झाला ॥ ९ ॥

॥ १५३५ ॥ श्रीकृष्ण जन्मला वार्ता ही ऐकोनी ॥ चिंता कंसा मनीं प्रवर्तली ॥ १ ॥ उद्विग्न मानसीं कंस तो बैसला ॥ सन्मुख देखीला महाबळ ॥ २ ॥ गौरवोनी त्यासी सांगे वर्तमान ॥ शत्रूसी जाऊनी कोण मारी ॥ ३ ॥ महाबळ दैत्य प्रतिज्ञा बोलत ॥ शत्रूसी त्वरीत मारीन मी ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसा बोलुनी निघाला ॥ वेष धरीला तेणें कपट ॥ ५ ॥

॥ १५३६ ॥ विप्र वेष तेव्हां घेऊनी निघाला ॥ गोकुळासी आला लागवेगें ॥ १ ॥ पुत्रोत्साव कोठें लोकांला पुसत ॥ भावीत सांगत नंदा घरीं ॥ २ ॥ ऐकोनीयां ऐसें आला अकस्मात ॥ येशोदा देखत सन्मुख त्या ॥ ३ ॥ श्रीकृष्णासीं तेव्हां वोसांगीं घेतलें ॥ दंडवत केलें ब्राह्मणासीं ॥ ४ ॥ सन्मूख बैसोनी वर्तमान पूसे ॥ बाळाचें या कैसें चिन्ह सांगा ॥ ५ ॥ पंचांग त्यावेळीं टाकिलें कपटासी ॥ मान तुकावोनी पाहातसे ॥ ६ ॥ नामा ह्मणे मैंदें पंचांग पाहून ॥ यशोदा लाऊन बोलतसे ॥ ७ ॥

॥ १५३७ ॥ तुझीया पुत्रासी लागलेंसें मूळ ॥ करील निर्मूळ सर्वत्रांचें ॥ १ ॥ बालकाचे अंगीं अवचिन्हें बहूत ॥ नेऊनी गर्तेत टाका यासी ॥ २ ॥ लोभ धरूनीयां ठेवाल बाळाशीं ॥ ग्रासील सर्वांसीं एकदांची ॥ ३ ॥ ऐकोनी यशोदा गहिवरोनी बोले ॥ गर्गानीं कथियेले उत्तम गुण ॥ ४ ॥ अमंगळ वाणी पुनरपी बोलिला ॥ गर्ग तो चुकला गणीतासी ॥ ५ ॥ स्तनपान करीत असतां श्रीकृष्ण ॥ मांडीलें विंदान नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ १५३८ ॥ ठाईंहूनी जांतीं उखळें उडताती ॥ मस्तकीं पडताती येवोनीयां ॥ १ ॥ पाटे वरवंटे वसुपात्रालागीं ॥ जीव त्या प्रसंगीं येता झाला ॥ २ ॥ घाबरे दुर्जन पळाया पाहत ॥ आडव्या ठाकत बाजा पुढें ॥ ३ ॥ जानवें तुटलें पंचांग फाटलें ॥ धोतरही गळालें ढुंगणाचें ॥ ४ ॥ पृष्ठीवरी होती बदबदां मार ॥ तेथून सत्वर पळता झाला ॥ ५ ॥ आयुष्याची बाकी कांहीं उरली होती ॥ ह्मणोनी श्रीपति सोडी त्यातें ॥ ६ ॥ नामा ह्मणे जीव घेऊनी पळाला ॥ मथूरेसी आला कंसापाशीं ॥ ७ ॥

॥ १५३९ ॥ परिक्षीती राया सांगतसे शुक ॥ वैकुंठनायक रांगतसे ॥ १ ॥ दुडदुडा पळती मुखीं लावी माती ॥ शेणांत लोळती दोघे-

जण ॥ २ ॥ नंदाच्या पुढील ओढीताती ताट ॥ मिटक्या मटमट वाजवीती ॥ ३ ॥ कटीं कडदोरा वांकी घुंगुरवाळा ॥ पिंपळवण भाळा शोभतसे ॥ ४ ॥ देवातें झोंकीती वर्जल्या रडती ॥ घडोघडीं येती विदीमार्जीं ॥ ५ ॥ वत्साचीये पुच्छें बळें ओढीताती ॥ सोडी न सोडीती दोघेजण ॥ ६ ॥ विमानांची दाटी येताती सुरवर ॥ नाम्याचा दातार पाहावया ॥ ७ ॥

॥ १५४० ॥ मृगाचीये श्रृंगें धरोनी नाचती ॥ जन हांसताती खदखदां ॥ १ ॥ भोजना बैसती घांस घेती हातीं ॥ मांजरें देखती दुरोनीया ॥ २ ॥ गळां त्यांच्या तेव्हां धरी मेघःश्याम ॥ पुच्छ बळिराम ओढीतसे ॥ ३ ॥ यशोदा धांवत खदखदां हांसत ॥ गौळणी समस्त पाहताती ॥ ४ ॥ पुसताची मामा चोंगई दाविती ॥ मर्कटाचे धरिती दोन्ही कान ॥ ५ ॥ रोहीणीसी ह्मणे डसतील बाळा ॥ किती म्यां याजला सांभाळावें ॥ ६ ॥ पाणी उडविती प्रतिबिंब पाहाती ॥ गोरस सांडिती भूमीवरी ॥ ७ ॥ नामा ह्मणे स्वामी सर्वांचा जो साक्षी ॥ धरीतसे पक्षी चंचूवातें ॥ ८ ॥

॥ १५४१ ॥ मुतूनीयां हातें भूमी सारवीती ॥ पोटासी पुसती दोघेजण ॥ १ ॥ घेऊनिया काष्ठ घाशीताती दांत ॥ वाकुल्या दावीत नंदालागीं ॥ २ ॥ जेवितां जेवितां बाहेर पळती ॥ श्वानासी बाहाती यूयू करुनी ॥ ३ ॥ तयापुढें दोघे ठेवुनीयां वाटी ॥ घालिताती मिठी गळां त्याच्या ॥ ४ ॥ देखोनिया जन खदखदां हांसती ॥ येशोदे सांगती कौतुकानें ॥ ५ ॥ भिंती धरूनियां उभे राहाताती ॥ आधार जगतीं ज्यांचा असे ॥ ६ ॥ उभयतां जाती विदीं खेळावया ॥ कुरवंडी काया नामयाची ॥ ७ ॥

॥ १५४२ ॥ मिळवुनी सौंगडे सांगतो तयासी ॥ चला गोरसासी देतों तुह्मां ॥ १ ॥ गेली असे एक गौळीण जळाला ॥ सांगे गोपाळाला तेथें जाऊं ॥ २ ॥ न पुरेची हात दूध शिक्यावरी ॥ करावें मुरारी कैसें येथें ॥ ३ ॥ पाटावरी पाट रची वनमाळी ॥ पाडीतसे डूळी मोहोरीनें ॥ ४ ॥ बडवोनी टीरी नाचतसे पेंदा ॥ भलीले गोविंदा युक्ती केली ॥ ५ ॥ उदलाले वेते कलुं नका गडबड ॥ थांबालीलो गोला लोनीयाचा ॥ ६ ॥ कोणीं पिती दूध कोणीं

खाती दहीं ॥ आली लवलाही गौळण ते ॥ ७ ॥ अहर्निशीं धरूं जपतसे तुज ॥ जासी कैसा आज चोरटीया ॥ ८ ॥ मुखींहूनी पय टाकी तिच्या डोळां ॥ नामा ह्मणे पळा सांगतसे ॥ ९ ॥

॥ १५४३ ॥ गाऱ्हाणें सांगाया ॥ आल्या गोकुळींच्या स्त्रिया ॥ १ ॥ यशोदा ऐकत ॥ पळे बाहेरी भगवंत ॥ २ ॥ एक ह्मणे लोणी ॥ माझें भक्षी चक्रपाणी ॥ ३ ॥ फोडीतसे भांडें ॥ वर्जिल्या ह्मणे रांडे ॥ ४ ॥ गाई वांसरें सोडितो ॥ येऊन आह्मासीं सांगतो ॥ ५ ॥ अष्टदळ काढिलें अंगणीं ॥ वरी मुते चक्रपाणी ॥ ६ ॥ घेऊनियां आला अग्न ॥ तुझ्या घरासीं लावीन ॥ ७ ॥ देईन मी तोंडावर ॥ तुझ्या बापाचें हें घर ॥ ८ ॥ घेतसे वरखडे ॥ शिव्या देऊनियां रडे ॥ ९ ॥ देखूनियां गरोदर ॥ ह्मणे केवढें उदर ॥ १० ॥ सांगती गाऱ्हाणीं ॥ नामा ह्मणे ऐका कानीं ॥ ११ ॥

॥ १५४४ ॥ एक ह्मणे धरी स्तन ॥ याचे उपटील कान ॥ १ ॥ तुला येईल गे राग ॥ आपल्या पोरा कांहीं सांग ॥ २ ॥ अंधारीं लपत ॥ पोरें करिती आकांत ॥ ३ ॥ सांगतसे शिकवण ॥ खोडी नको करूं कान्हा ॥ ४ ॥ तोंड धरूनी वांकडें ॥ मुला ह्मणे येथें रडे ॥ ५ ॥ देव पोरां शिकवीत ॥ गोरस आणारे समस्त ॥ ६ ॥ आह्मीं निजलों समस्त ॥ काजळ मुखासीं लावीत ॥ ७ ॥ मेले आणूनियां सर्प ॥ माझ्या पोरा दावी दर्प ॥ ८ ॥ योगीयांचे नये लक्षा ॥ त्यासी लावूं ह्मणती शिक्षा ॥ ९ ॥ अनंत गाऱ्हाणीं ॥ नामा ह्मणे कीर्ति वर्णी ॥ १० ॥

॥ १५४५ ॥ मुलें सांगताती ॥ माती खातो गे श्रीपती ॥ १ ॥ लांकूड घेऊनि हातांत ॥ माती खातोसी पुसत ॥ २ ॥ भावा भुललासे खरा ॥ कांपतसे थरथरा ॥ ३ ॥ मुख दाखवी उघडोनी ॥ दावी तेव्हां चक्रपाणी ॥ ४ ॥ ब्रह्मांडें देखिलीं ॥ नामा ह्मणे वेडी झाली ॥ ५ ॥

॥ १५४६ ॥ यशोदा घुसळीत ॥ स्तन मागे भगवंत ॥ १ ॥ घालोनी पदर ॥ पाजीतसे जगदीश्वर ॥ २ ॥ दूध जातसे उतोन ॥ उठे कृष्णासी टाकून ॥ ३ ॥ मंथन पात्रातें फोडीत ॥ पळे तेथूनि त्वरित ॥ ४ ॥ मागें धांवली यशोदा ॥ धरावया त्या गोविंदा ॥ ५ ॥ हातीं न लागे जगजेठी ॥ नामा ह्मणे होय कष्टी ॥ ६ ॥

॥ १५४७ ॥ कृपा उपजली ॥ उभा राहे वनमाळी ॥ १ ॥ धरूनी आणीला ॥ आजीं बांधीन मी तुला ॥ २ ॥ दावें सोडूनीयां ॥ बांधितसे देवराया ॥ ३ ॥ फार करितोसी खोड्या ॥ गोपी दावीती वांकुड्या ॥ ४ ॥ दावीं अनंत लावीत ॥ दोन बोटें उणें येत ॥ ५ ॥ करिताती चोज ॥ परी नव्हेची ऊमज ॥ ६ ॥ श्रमतसे वारंवार ॥ पुरती करी जगदोद्धार ॥ ७ ॥ विष्णुदास नामा पुढें ॥ आला जेथें उभी झाडें ॥ ८ ॥

॥ १५४८ ॥ कुबेराचे पुत्र मदोन्मत्त झाले ॥ ह्मणूनी शापिलें नारदानें ॥ १ ॥ व्हाल तुह्मीं वृक्ष ऐकोनी सावध ॥ झाला अपराध ऋषिराया ॥ २ ॥ यमलार्जून वृक्ष व्हाल गोकुळांत ॥ उश्शाप वदत कृपाळूवा ॥ ३ ॥ कृष्णाचा चरण लागेल तुह्मांसीं ॥ आपुल्या स्थळासीं याल वेगीं ॥ ४ ॥ मोडीतसे तेव्हां लक्ष्मीचा पती ॥ दोघे निघताती दिव्य पुरुष ॥ ५ ॥ नामा ह्मणे तेव्हां करिताती स्तुती ॥ पापें दग्ध होती ऐकतांची ॥ ६ ॥

॥ १५४९ ॥ दामोदरा केशवा वामना देवा कृष्णा ॥ परंज्योती नारायणा तुज नमो ॥ १ ॥ विश्वव्यापका जनार्दना वासुदेवा निर्गुणा ॥ अव्यया जगजीवना तुज नमो ॥ २ ॥ अनंत अवतार घेसी भक्तांसाठीं ॥ कृपाळू जगजेठी तुज नमो ॥ ३ ॥ यज्ञेशा सर्वेशा दयानिधि हृषीकेशा ॥ पुराण पुरुषा तुज नमो ॥ ४ ॥ धन्य हा दिवस देखिले तुझे पाय ॥ कृपादृष्टी पाहे आह्मांकडे ॥ ५ ॥ जोडोनियां हात करीतो विनंती ॥ देई तुझी भक्ति जन्मोजन्मीं ॥ ६ ॥ करुनी नमस्कार हळूहळू चालती ॥ वेळोवेळां पाहाती कृष्णाकडे ॥ ७ ॥ मोडतांची वृक्ष धांवोनीयां येती ॥ मग पहाताती नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १५५० ॥ समस्ता सांगती लहानालीं मुलें ॥ नवल देखीलें आह्मीं आतां ॥ १ ॥ वृक्ष मूळीहुनी दोघे निघताती ॥ पायासीं लागती कान्होबाच्या ॥ २ ॥ यशोदेचे मनीं झालासे विवेक ॥ वैकुंठनायक येथें आला ॥ ३ ॥ नामा ह्मणे त्यासीं घालीतसे माया ॥ अपराध तया काय असे ॥ ४ ॥

॥ १५५१ ॥ नंदें सोडविलें तेव्हां त्या कृष्णासीं ॥ नासूं देगे याशी दहींदूध ॥ १ ॥ मजला लेंकरें नाहींत गे फार ॥ विश्रांतीसी थार एवढेंची ॥ २ ॥ निवारीलें विघ्न देवें हें केवढें ॥ पडती गे झाडें याजवरी

॥ ३ ॥ आजपूनी यास बोलसी कठीण ॥ देईन मी प्राण तुजवरी ॥ ४ ॥ स्फुंदस्फुंद रडे तेव्हां नारायण ॥ देई यासीं स्तन भुकेलासे ॥ ५ ॥ यशोदा बाहात नये वनमाळी ॥ धांवोनी कुरवाळी वदन त्याचें ॥ ६ ॥ समजावोनी देवा पाजीतसे स्तन ॥ घालीत भोजन नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १५५२ ॥ एक गोप तेव्हां स्त्रियेसीं सांगत ॥ सांठवी समस्त नवनीत ॥ १ ॥ देवाचा नवस आहे पुरवणें ॥ धरावें येथून अनसुट ॥ २ ॥ सांगोनीयां ऐसें राहीला तो स्वस्थ ॥ मागें स्त्रीनें कृत्य काय केलें ॥ ३ ॥ चोरोनीयां घृत भरोनी घागरीं ॥ नेवोनी शेजारीं ठेवियेल्या ॥ ४ ॥ गौळीयानें तेव्हां संकल्प सोडिला ॥ नवस फेडीला नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १५५३ ॥ गोपीनें घृतासीं चोरोनी ठेवीलें ॥ देवासीं कळलें अंतर्यामीं ॥ १ ॥ सेजे घरीं होतें ठेविलें चोरून ॥ सौंगडे घेऊन गेला तेथें ॥ २ ॥ आज्य घेऊनियां गोपाळांसीं देत ॥ आपण भक्षीत प्रेमानंदें ॥ ३ ॥ तृप्त होवोनीयां गेला क्रीडायासीं ॥ पूर्ण नवसासी केलें त्याच्या ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसा वैकुंठनायक ॥ दावीत कौतुक नानापरी ॥ ५ ॥

॥ १५५४ ॥ कांहीं एक दिवस लोटलीया वरी ॥ गोपी तीचे घरीं प्रवेशली ॥ १ ॥ ह्मणे माझा कुंभ देईवो आणून ॥ येरीनें सदन धुंडाळीलें ॥ २ ॥ ह्मणे सये येथें नाहीं माझें घृत ॥ ऐकोनियां मात क्रोधावली ॥ ३ ॥ चोरी नवनीत तुझें नाहीं गेलें ॥ माझें काय झालें पुसतसे ॥ ४ ॥ नष्टें अभिलाष केला सांग सत्य ॥ बोलोनी निवांत राहीली ते ॥ ५ ॥ कलह करावा भ्रतारा कळेल ॥ तो शिक्षा करील यथास्थीत ॥ ६ ॥ न मिळे जाणोन ह्मणे कृष्णार्पण ॥ आलीसे बोलोन मंदिरासीं ॥ ७ ॥ नामा ह्मणे शूक सांगे परीक्षिती ॥ ऐशा किती ख्याति तुज सांगों ॥ ८ ॥

॥ १५५५ ॥ एकदां श्रीकृष्ण खेळत असतां ॥ प्रवेशे अवचिता गोपीगृहीं ॥ १ ॥ दोहीं करीं तेव्हां नेत्र चोळीतसे ॥ गोपी पुसते काय झालें ॥ २ ॥ कृष्ण ह्मणे माझे दुखताती डोळे ॥ उपाय न कळे करूं काय ॥ ३ ॥ पुत्राची जननी तिचें दूध मीळे ॥ घालीतांची डोळे बरे होती ॥ ४ ॥ गोपी ह्मणे दूध देतें मी काढून ॥ तें नेमी घालून बरें करी ॥ ५ ॥ देव ह्मणे दूध तूं काढून देसी ॥ कैसा गुण त्यासीं येईल सांग ॥ ६ ॥ माझीया करानें

पिळून देसी स्तन ॥ तरी येईल गुण लवकरी ॥ ७ ॥ ऐकतांची गोपी धांवे मारावया ॥ पळे उठोनीयां नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १५५६ ॥ यशोदे भोंवत्या मिळाल्या गौळणी ॥ सांगती गाऱ्हाणीं नानापरी ॥ १ ॥ गोरस भक्षोनी फोडीतो भाजन ॥ गोकुळा सोडोनी जाऊं सये ॥ २ ॥ एक गोपी ह्मणे माझ्या घरां येसी ॥ बांधीन खांबासी तुजलागीं ॥ ३ ॥ यशोदेसी ऐसी सांगोनी गाऱ्हाणीं ॥ चालिल्या कामिनी गृहाप्रती ॥ ४ ॥ नामा ह्मणे गोपी बोलिली बांधीन ॥ तिजवरी विघ्न करी देव ॥ ५ ॥

॥ १५५७ ॥ निशी प्राप्त होतां भ्रताराचे शेजे ॥ गोपिका ती निजे आनंदानें ॥ १ ॥ संधीं पाहोनियां प्रवेशला देव ॥ करीत लाघव काय तेव्हां ॥ २ ॥ भ्रताराचे दाढी कांतेची ते वेणी ॥ एकत्र करोनी ग्रंथी देत ॥ ३ ॥ करूनी कौतूक निघोनियां गेला ॥ अरुणोदय झाला तयेवेळीं ॥ ४ ॥ गोदोहनालागीं गोपी ते उठत ॥ वेणी आंसडीत दाढीसंगें ॥ ५ ॥ भ्रतारासीं तेव्हां बोले ते कामिनी ॥ न धाय अजूनी मन कैसें ॥ ६ ॥ भ्रताराची दाढी ओढीताची जाण ॥ सक्रोध होऊन बोलतसे ॥ ७ ॥ मस्त होवोनीयां माजली धांगडी ॥ करिसी ओढाओढी मजलागी ॥ ८ ॥ नामा ह्मणे तेव्हां उठोनी बैसती ॥ आश्चर्य करिती मनामाजी ॥ ९ ॥

॥ १५५८ ॥ उभयतां तेव्हां कलह करिताती ॥ आण वाहाताती परस्परें ॥ १ ॥ सोडूं जों पाहती सत्वर ग्रंथिका ॥ न सुटे ब्रह्मादिकां कदाकाळीं ॥ २ ॥ सोडितां सुटेना जाळीतां जळेना ॥ कापीतां कापेना कांहीं केल्या ॥ ३ ॥ स्त्रियेलागीं तेव्हां भ्रतार बोलत ॥ तुजसंगें मृत्यु मज आला ॥ ४ ॥ दोघेंही रडत बिदीमाजी येती ॥ कोल्हाळ करीती तयेवेळीं ॥ ५ ॥ गोकुळींचे जन डोळां पहाताती ॥ जाऊन सांगती नंदालागीं ॥ ६ ॥ नामा ह्मणे नंद बैसला चावडी ॥ घेऊन आवडी कृष्णजीला ॥ ७ ॥

॥ १५५९ ॥ गोपीगोप तेथें पातली त्वरीत ॥ हांसती समस्त देखोनीयां ॥ १ ॥ कृष्ण ह्मणे कैसी बांधीसी मजला ॥ बांधीलें तुजला भगवंतें ॥ २ ॥ पायां पडती रडोनी बोलती ॥ सोडवा ह्मणती आह्मांलागीं ॥ ३ ॥ पाहोनी किवें सांची दया आली चित्ता ॥ कृपेनें पाहातां मुक्त झालीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे तेव्हां वंदोनी देवासीं ॥ गेलीं निजधामासीं आनंदानें ॥ ५ ॥

॥ १५६० ॥ नंदाचीये घरीं चंपाषष्ठी नेम ॥ कुळीं कुळधर्म मार्तंडाचा ॥ १ ॥ पक्वान्नेंही नाना रोटीया भरीत ॥ केलीं अपरमित यशोदेनें ॥ २ ॥ वाद्यीयामुरळी सांगितलीं दोन्हीं ॥ आला चक्रपाणी खेळतांची ॥ ३ ॥ मातेलागीं ह्मणे लागलीसे क्षुधा ॥ थांबरे गोविंदा ह्मणे माता ॥ ४ ॥ घेतलीसे आळी करी लगबग ॥ विस्तारिलें सांग नैवेद्यासीं ॥ ५ ॥ नेवोनीयां पुढें देवांच्या ठेवीले ॥ बोलवा वहीलें आमंत्रिकां ॥ ६ ॥ तोंवरी मागे तो भक्षी नारायण ॥ यशोदा आपण रागावली ॥ ७ ॥ दुरळ हा देव होय आतां कैसें ॥ मार्तंडाचें पीसें लागे तुज ॥ ८ ॥ करी क्षणामाजी वांकडेंची मूख ॥ हरी खात वीख कालवलें ॥ ९ ॥ जाणीतला भाव मायेचें अंतर ॥ करूनीयां खरें दावी देव ॥ १० ॥ वांकडिया हातें ग्रास घाली मुखें ॥ मुख तेंहि सुखें तैसें दावी ॥ ११ ॥ पिसाळल्यापरी करी वेडेचार ॥ भय वाटे फार मायेलागीं ॥ १२ ॥ पूर्वीं ग्यां सांगतां नायकसी कैसा ॥ पुढें हा वोळसा वोढावला ॥ १३ ॥ पाचारीले देवऋषि हालवीती सूपें ॥ त्याचीया न भियें देव नीघे ॥ १४ ॥ वासोनियां डोळे तयाकडे पाहे ॥ कांपे तया भयें थरथरां ॥ १५ ॥ मंत्रुनियां पाणी आणिला अंगारा ॥ तयाचा मातेरा केला देवें ॥ १६ ॥ नवसा न पावती गोकुळीच्या देवता ॥ उपाय मागूता राहीलासे ॥ १७ ॥ चिंतावली माय मूर्च्छा आली तीसीं ॥ झालीं पोरपिसीं मोहजाळें ॥ १८ ॥ जाणोनी अंतर ह्मणे कृष्णार्पण ॥ तेव्हां आलें विघ्न दूर होय ॥ १९ ॥ नामा ह्मणे देव पाहे कृपादृष्टी ॥ जाणवलें पोटीं हाचि देव ॥ २० ॥

॥ १५६१ ॥ गोपीका ह्मणती यशोदा सुंदरी ॥ करीतो मुरारी खोडी बहू ॥ १ ॥ यशोदेप्रती त्या गौळणी बोलती ॥ संकष्ट चतुर्थी व्रत घेई ॥ ॥ २ ॥ गणेश देईल यासीं उत्तम गुण ॥ वचन प्रमाण मानावें हें ॥ ३ ॥ गजवदनासी तेव्हां ह्मणत यशोदा ॥ माझीया मुकुंदा गुण देई ॥ ४ ॥ ऐसें हें वचन ऐकून कृष्णनाथें ॥ सत्य गणेशातें केलें तेव्हां ॥ ५ ॥ एक मास खोडी देवें नाहीं केली ॥ प्रचीत ते आली यशोदेसीं ॥ ६ ॥ धन्य धन्य देव गणपती पाहे ॥ यशोदा ही राहे उपवासी ॥ ७ ॥ इंदिरा बंधूचा उदय होऊं पाहात ॥ यशोदा करीत पूजनासीं ॥ ८ ॥ शर्करामिश्रित लाडू येकवीस ॥ आणीक बहुवस मोदक ते ॥ ९ ॥ ऐसा नैवेद्याचा हारा तो भरूनी ॥ देव्हारा नेऊनी ठेवी माता ॥ १० ॥ मातेसीं ह्मणत तेव्हां हृषी-

केशी ॥ लाडू केव्हां देसी मजलागीं ॥ ११ ॥ यशोदा ह्मणत पूजीन गजवदना ॥ नैवेद्य दाऊन देईन तुज ॥ १२ ॥ ऐसें ह्मणूनियां माता बाहेर गेली ॥ देव्हाऱ्याजवळी हरि होता ॥ १३ ॥ एकांत देखोनी हारा उचलीला ॥ सर्व स्वाहा केला एकदांची ॥ १४ ॥ घेऊनियां ग्रास उगाची बैसला ॥ भक्तालागीं लीला दावीतसे ॥ १५ ॥ धूप घेवोनीयां आली सदनातें ॥ रीता हारा तेथें देखीयेला ॥ १६ ॥ विस्मय बहुत मातेसीं वाटला॥ नैवेद्य हरीला पुसतसे ॥ १७ ॥ कृष्ण ह्मणे सत्यवचन मानी माते ॥ एक सहस्र उंदीर आले येथें ॥ १८ ॥ त्यांत एक थोर होता तो मूषक ॥ वरी विनायक बैसलासे ॥ १९ ॥ सकळीक लाडू सोंडेनें उचलीले ॥ सर्व आकर्षीलें एकदांची ॥ २० ॥ सर्वांगासीं त्याणें चर्चिला शेंदूर ॥ सोंड भयंकर हालवीतसे ॥ २१ ॥ उंदीर भ्यासूर भ्यालों मी देखून ॥ वळली वदनीं बोबडी ते ॥ २२ ॥ न बोलवे कांहीं माझेनी जननी ॥ क्षुधा मजलागोनी लागलीसे ॥ २३ ॥ लाडू मज देई ह्मणे जनार्दन ॥ माता क्रोधें करून बोलतसे ॥ २४ ॥ माता ह्मणे कृष्णा पाहूं तुझें वदन ॥ लाडू त्वांचि पूर्ण भक्षीयले ॥ २५ ॥ हरि ह्मणे माते लाडू ते बहूत ॥ मातील मुखांत कैसे माझ्या ॥ २६ ॥ गणपति सर्व लाडू गेलासे घेऊन ॥ आलें विहरण मजवरी ॥ २७ ॥ हरी ह्मणे मज मारूं नको माते ॥ तुज वदनातें दावीतों मी ॥ २८ ॥ कृष्णनाथें तेव्हां मुख पसरीलें ॥ ब्रह्मांडें देखीलीं मुखामाजी ॥ २९ ॥ असंख्य गणपती दिसती वदनीं ॥ पाहातसे नयनीं यशोदा ते ॥ ३० ॥ मुखांत गणपति मातेसीं बोलत ॥ पूजावें त्वरित हरीलागीं ॥ ३१ ॥ ऐसें देखोनीयां समाधिस्थ होत ॥ चहूंकडे पाहात तटस्थ ते ॥ ३२ ॥ योगमाया तेव्हां हरीनें घालून॥ मातेपुढें जाण ऊभा असे ॥ ३३ ॥ यशोदा हरी कडेवरी घेत ॥ मुखाते चुंबीत आवडीनें ॥ ३४॥ हरि घेऊनीयां घरासीं ती गेली ॥ भोजना बसली नामा ह्मणे ॥ ३५ ॥

॥ १५६२ ॥ कोणी एके दिवशीं श्रीकृष्ण अंगणीं ॥ विलोकी नयनीं प्रतिबिंब ॥ १ ॥ मातेप्रती तेव्हां ह्मणतसे हरी ॥ काढोनी झडकरी देई मज ॥ २ ॥ माता ह्मणे बाळा नये तें काढीतां ॥ आणीक अनंता माग कांहीं ॥ ३ ॥ ऐसें ऐकोनीयां मागतसे हरी ॥ त्यासीं नानापरी समजावीत ॥ ४ ॥ बहुत खेळणीं पुढें ठेवी माता ॥ परी तो रडतां न राहेची ॥ ५ ॥ पालखीं नेऊनी हरीसी निजवीत ॥ यशोदा ते जात स्वकार्यासी ॥ ६ ॥ तेच समयीं

राधा आलीसे मंदिरीं ॥ देखीला श्रीहरी रडता तीनें ॥ ७ ॥ पालखा जवळी जाऊनी सत्वर ॥ घेत कडेवर हरीलागीं ॥ ८ ॥ राधा ह्मणे कां तूं रडतोसी चाटा ॥ गोष्टी त्या अचाटा सांगतोसी ॥ ९ ॥ ऐसें ऐकोनियां उगाची राहीला ॥ खेळवी हरीला प्रेमें राधा ॥ १० ॥ मागुती नेउनी पालखां घातला ॥ रडाया लागला हरी तेव्हां ॥ ११ ॥ राधेसी ह्मणत यशोदा सुंदरी ॥ यासी क्षणभरी नेई आतां ॥ १२ ॥ आपले मंदीरा घेऊन जाय यासीं ॥ ऐकोनी मानसीं संतोषली ॥ १३ ॥ नामा ह्मणे राधा घेऊन हरीसीं ॥ गेली मंदिरासीं आपूलीया ॥ १४ ॥

॥ १५६३ ॥ मंदिरा नेवोनी पलंगीं बैसविला ॥ ह्मणत हरीला तयेवेळीं ॥ १ ॥ ऐसीया समयीं थोर तूं अससी ॥ तरी हृषीकेशी बरें होतें ॥ २ ॥ देखोनी भाव तिचा थोर झाला हरी ॥ पाहूनि सुंदरी आनंदली ॥ ३ ॥ सुखशयनीं राधा एकांतीं असतां ॥ अनया अवचिता आला तेथें ॥ ४ ॥ सक्रोध होऊनी बोलला राधेसीं ॥ कोणासी बोलसी गुजगोष्टी ॥ ५ ॥ भ्रताराचा शब्द ऐकतां श्रवणीं ॥ दचकली मनीं राधीका ते ॥ ६ ॥ हात जोडोनीयां विनवीत हरीसीं ॥ होई हृषीकेशी सान आतां ॥ ७ ॥ ऐकोनी करुणा बाळ झाला हरी ॥ दहिंभात झडकरी ठेवी पुढें ॥ ८ ॥ कवाड उघडून बोलत अनयासीं ॥ घरांत हृषीकेशी जेवीतसे ॥ ९ ॥ कावड ठेऊनी घरांत तो आला ॥ जेवीतां देखीला कृष्णनाथ ॥ १० ॥ नामा ह्मणे अनया आनंदला मनीं ॥ हृदयीं चक्रपाणी धरीयेला ॥ ११ ॥

॥ १५६४ ॥ राधेप्रती अनया बोले तयेवेळीं ॥ घरांत एकली असती तूं ॥ १ ॥ एकले हें तुज करमेना मंदिरीं ॥ खेळावया हरि आणीत जाई ॥ २ ॥ भ्रतार वचन राधेनें ऐकोनी ॥ आनंद तो मनीं थोर तिच्या ॥ ३ ॥ स्वामी तुमची आज्ञा मजलागीं प्रमाण ॥ ह्मणोनी चरण वंदीयेले ॥ ४ ॥ सुखशयनीं राधा भोगीत अनंता ॥ गोकुळांत वार्ता प्रगटली ॥ ५ ॥ राधेचीया घरीं थोर होतो हरी ॥ गोकुळीच्या नारी गुजगुजती ॥ ६ ॥ यशोदे मातेसीं सांगती सुंदरी ॥ आवरी मुरारी आपुला हा ॥ ७ ॥ तैसीच जाऊन राधेच्या गृहासीं ॥ सांगती सासूसीं तिच्या तेव्हां ॥ ८ ॥ राधेलागीं वृद्धा ह्मणे तयेवेळीं ॥ घरासीं वनमाळी आणूं नको ॥ ९ ॥ नामा ह्मणे लोकीं पडीयेली तूटी ॥ तीसीं जगजेठी अंतरला ॥ १० ॥

॥ १५६५ ॥ प्रातःकाळीं राधा उठोनिया जाण॥ नंदसदनावरून पाण्या जात ॥ १ ॥ इकडे गोदोहन करीतसे हरी ॥ पाहे उभी द्वारीं राधिका ते ॥ २ ॥ विसरे गोदोहन वृषभाखालीं बैसत ॥ कृष्णजीचें चित्त वेधीयेलें ॥ ३ ॥ भरणा रीचवोनी बाहेर आली माता ॥ वृषभ दोहतां हरि देखे ॥ ४ ॥ माता ह्मणे काय करीसी घननीळा ॥ प्रत्युत्तर त्यावेळां हरि देत ॥ ५ ॥ द्वाराकडे पाहे राधेसीं न्याहाळून ॥ मातेसी वचन बोलतसे ॥ ६ ॥ भरणा भरला आतां जाई तूं घेऊन ॥ माता क्रोधायमान झाली तेव्हां ॥ ७ ॥ कृष्णासीं यशोदा ह्मणे खालीं पाहे ॥ वृषभ कीं गाय दोहतसे ॥ ८ ॥ कृष्ण खालीं पाहे वृषभ देखीला ॥ ह्मणे यशोदेला ऐक एक ॥ ९ ॥ देवाचा नवस चुकली बहुतेक ॥ चौ थानाचे थान एक झालें ॥ १० ॥ वचन ऐकोनी हांसत यशोदा ॥ द्वारीं उभी राधा देखीयेली ॥ ११ ॥ कांगे येथें उभी घेउनी घागर ॥ जातसे सत्वर राधा तेव्हां ॥ १२ ॥ नामा ह्मणे ऐसें झालें ॥ मुख प्रक्षाळून हरि जेविले ॥ १३ ॥

॥ १५६६ ॥ मंथना आरंभ करीतसे राधा ॥ आठवी गोविंदा मनामाजीं ॥ १ ॥ मेळवोनी मुलें खेळे तिचे द्वारीं ॥ देखीला श्रीहरी राधिकेनें ॥ २ ॥ विसरोनी मंथन रीत्या डेरीयांत ॥ रवी फिरवीत गरगरां ॥ ३ ॥ डेरा खडबडां वाजतां ऐकोन ॥ वृद्धा तें धांवोन बाहेर आली ॥ ४ ॥ सासू ह्मणे काय गेले तुझे नेत्र ॥ देतसे उत्तर राधा तीसीं ॥ ५ ॥ डेरा धड किंवा फूटका ह्मणूनी ॥ रवी घुसळोनी पाहातसे ॥ ६ ॥ वृद्धा ह्मणे तुझें चित्त नाहीं स्थीर ॥ द्वारीं हो श्रीधर देखीयेला ॥ ७ ॥ रागें भरोनियां बोलत ह्मातारी ॥ येथें कांरे हरी खेळसी तूं ॥ ८ ॥ कृष्ण ह्मणे आह्मीं खेळतों बिदेशीं ॥ तूं कां दटाविसी थेरडीये ॥ ९ ॥ ऐसें बोलोनियां श्रीहरी पळाला ॥ घरासीं तो गेला नामा ह्मणे ॥ १० ॥

॥ १५६७ ॥ मध्यान्ह काळीं मग हरीसीं घेऊनी ॥ करीतसे भोजन यशोदा तें ॥ १ ॥ भोजन करूनि पलंगीं निजत ॥ श्रीकृष्णासीं घेत पुढें तेव्हां ॥ २ ॥ यशोदेसीं सुखनिद्रा हो लागली ॥ राधिका ते गेली यमूनेसीं ॥ ३ ॥ नेत्रासीं पदर लावोनी रडत ॥ अंतरीं अनंत आठवोनी ॥ ४ ॥ करुणा शब्द तिचा ऐकोनी श्रवणीं ॥ उठला चक्रपाणी तेथोनीयां ॥ ५ ॥ जावोनियां राधा धरीली पदरीं ॥ तिजलागीं हरि समजावीत ॥ ६ ॥



संसारासी माझ्या पडीयेलें पाणी ॥ ऐसें चक्रपाणी तुवां केलें ॥ ७ ॥
इकडे यशोदा ती जागी जंव होत ॥ हरीसी धुंडीत तयेवेळीं ॥ ८ ॥
एखादी हा कळी घेऊन येइल आतां ॥ पाहातसे माता चहूंकडे ॥ ९ ॥
पाऊलाचा माग चालीली काढीत ॥ पावलीं त्वरित यमुनातीरा ॥ १० ॥
राधा तयेवेळीं ह्मणे रे अनंता ॥ पैल तुझी माता येत असे ॥ ११ ॥
मातेसी देखूनी गडबडा लोळत ॥ यशोदा ते घेत कडेवरी ॥ १२ ॥
मातेसी ह्मणत चोरोनी कंदूक ॥ घेऊनियां देख आली येथें ॥ १३ ॥
माता ह्मणे कां वो यासी रडवीसी ॥ चेंडू तूं हरीसी देई वेगीं ॥ १४ ॥
मामी हा मजवरी घेई गे तुफान ॥ मजपाशीं जाण चेंडू नाहीं ॥ १५ ॥
कृष्ण ह्मणे माते झाडा घेई आतां ॥ कंदूक तत्वतां निघेल पैं ॥ १६ ॥
वस्त्र जंव झाडीत राधा तये वेळीं ॥ पाडीला भूतळीं कंदूक तो ॥ १७ ॥
ऐसें देखोनीयां लज्जित जहाली ॥ हांसत वनमाळी नामा ह्मणे ॥ १८ ॥

॥ १५६८ ॥ चेंडू देखोनीयां यशोदा कोपली ॥ ह्मणे तयेवेळीं राधिकेसी ॥ १ ॥ महा नष्ट तुह्मी अवघिया गवळणी ॥ माझा चक्रपाणी ब्रह्मचारी ॥ २ ॥ इतुकें ऐकोनी राधा ते चालीली ॥ स्वगृहासी गेली आपुलीया ॥ ३ ॥ राधेचिया मनीं समजलें पूर्ण ॥ ब्रह्मसनातन श्रीकृष्ण हा ॥ ४ ॥ इकडे यशोदा घेउनी हरीसी ॥ गेली मंदिरासी नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १५६९ ॥ गोकुळीं अनर्थ होताती बहुत ॥ मिळोनी समस्त विचारीती ॥ १ ॥ वृद्ध ते ह्मणती येतें आपुल्या मना ॥ जाऊं वृंदावनां सकळीक ॥ २ ॥ समस्तां मानला तयाचा विचार ॥ निघती नारीनर शीघ्र तेव्हां ॥ ३ ॥ अहिर्निशीं देवा करिती जतन ॥ नामा ह्मणे मन गोविंदा पैं ॥ ४ ॥

॥ १५७० ॥ विचारीत हो श्रीपती ॥ गे मी जातों वनाप्रती ॥ १ ॥ राखावया गायी ॥ भार उतरावया मही ॥ २ ॥ एके दिनीं सायंकाळीं ॥ नंदा पुसे वनमाळी ॥ ३ ॥ उद्यां जाईन मी राना ॥ वारे घेऊनी गोधना ॥ ४ ॥ बुद्धीचा चालक ॥ नामा ह्मणे हाचि एक ॥ ५ ॥

॥ १५७१ ॥ प्रातःकाळीं मुलें येताती सकळ ॥ उठवी गोपाळ ह्मणताती ॥ १ ॥ आळस देवोनी उठे देवराणा ॥ बळिराम गोधना

सोडीतसे ॥ २ ॥ देऊनियां स्तन काकूळती येत ॥ सांभाळा भगवंत वनामध्यें ॥ ३ ॥ जवळीच खेळा जाऊं नका दूरी ॥ सांभाळा मुरारि प्राण माझा ॥ ४ ॥ होताती उत्पात याजवरी मोठे ॥ मोडतील कांटे सांभाळावें ॥ ५ ॥ आसनीं शयनीं भोजनीं जतन करा ॥ नामया दातारा केशीराजा ॥ ६ ॥

॥ १५७२ ॥ चालीयेले तेव्हां गडी आणि देव ॥ खेळताती सर्व आनंदानें ॥ १ ॥ वत्साचिया रूपें वत्सासूर आला ॥ माराया कृष्णाला परीक्षिती ॥ २ ॥ पाहोनियां ऐसें तयासी मारीलें ॥ झोंकोनियां दिल्हें आकाशातें ॥ ३ ॥ चला आतां जेवूं बसूं एके ठायीं ॥ काढा लवलाहीं शिदोरीया ॥ ४ ॥ गोपाळ मिळोनी आनंदें जेविले ॥ ब्रह्मरस घाले कृष्णासंगें ॥ ५ ॥ उदक प्राशन करावया आले ॥ बकानें देखीलें कृष्णजीला ॥ ६ ॥ दुष्टबुद्धि तेव्हां देवासी गिळीत ॥ हृदय जाळीत उगाळीला ॥ ७ ॥ धरूनियां हातें उभाची चिरीला ॥ आनंद देवाला न समाये ॥ ८ ॥ नामा ह्मणे आले घरासी सकळ ॥ सांगताती सकळ वर्तमान ॥ ९ ॥

॥ १५७३ ॥ उठोनी प्रातःकाळीं गौळणी बोलती ॥ जाईल श्रीपति वना आतां ॥ १ ॥ चला जाऊं आतां पाहूं गे श्रीमुख ॥ हरेल ही भूक डोळीयांची ॥ २ ॥ तांतडीनें येती नंदाचिया घरा ॥ पाहती उदारा कृष्णराया ॥ ३ ॥ कुरळे हे केश सुहास्य वदन ॥ आकर्ण नयन शोभताती ॥ ४ ॥ अरुणोदय प्रभा अधरीं दिसती ॥ हिरे झळकती दंत तुझे ॥ ५ ॥ भोंवया व्यंकटा सरळ नासीक ॥ पाहोनीयां मुख सुख होय ॥ ६ ॥ ललाटीं शोभत केशराचा टीळा ॥ वर बिंदु रेखिला कस्तूरीचा ॥ ७ ॥ वैजयंती माळा किरीट कुंडलें ॥ नामयानें केलें निंबलोण ॥ ८ ॥

॥ १५७४ ॥ उठोनियां प्रातःकाळीं ॥ देवें मुरली वाजविली ॥ १ ॥ गडी मिळोनी समस्त ॥ घ्यारे शिदोऱ्या सांगात ॥ २ ॥ अलंकार घालिताती ॥ दिसे सुशोभित मूर्ति ॥ ३ ॥ नामा ह्मणे स्वामी माझा ॥ आला भक्ताचिये काजा ॥ ४ ॥

॥ १५७५ ॥ अनेक पुष्पांच्या साजताती माळा ॥ गुंजाहार गळां शोभताती ॥ १ ॥ रक्त पितांबर आरक्त अधर ॥ चरण सुंदर चालताती ॥ २ ॥ रक्त चंदनाची घेतलीसे उटी ॥ मयूरपत्रवेंटी शोभताहे ॥ ३ ॥

शिंगें रंगवीती देऊनियां रंग ॥ चालत श्रीरंग मागें पुढें ॥ ४ ॥ चित्तीं सर्वकाळ राहे ऐसें ध्यान ॥ नामा ह्मणे धन्य तोची एक ॥ ५ ॥

॥ १५७६ ॥ शिवादिक ज्याचे वंदी पाय वनीं ॥ पायांवरी न्हाणी यशोदा ते ॥ १ ॥ नंद पुण्य लेखा नव्हे आह्मांप्रती ॥ शुक परीक्षिती सांगतसे ॥ २ ॥ सनकादिक ज्याचे ध्यानीं झाले पीसे ॥ गायी चारीत असे गोकुळांत ॥ ३ ॥ गडीयांसी काला वांटीत श्रीधर ॥ कौतुक सुरवर पाहताती ॥ ४ ॥ नामा ह्मणे सुख देईल भक्तांसी ॥ वधील दुष्टांसी स्वामी माझा ॥ ५ ॥

॥ १५७७ ॥ कंस धाडी अघासुर ॥ मारी नंदाचा कुमर ॥ १ ॥ एक ओंठ खालीं ॥ दुजा मेघाच्या मंडळीं ॥ २ ॥ गाई गोपाळ उदरीं ॥ देवा कळलें अंतरीं ॥ ३ ॥ आंत प्रवेशला कृष्ण ॥ रूप धरीत वामन ॥ ४ ॥ क्षणार्धेंची मारी ॥ भक्तजनाचा कैवारी ॥ ५ ॥ भेणें गोपाळ पडियेले ॥ कृपा दृष्टि उठविले ॥ ६ ॥ तेज अद्भुत निघालें ॥ कृष्णमुखीं प्रवेशलें ॥ ७ ॥ भक्तासी रक्षीत ॥ नामा ह्मणे कृष्णनाथ ॥ ८ ॥

॥ १५७८ ॥ गडी आणि रमापती ॥ तेव्हां आनंदें जेविती ॥ १ ॥ कोणी मांडीताती पानें ॥ वरी ठेवीताती अन्नें ॥ २ ॥ कोणी ठेवी मांडीवरी ॥ कोणी जेवी भूमीवरी ॥ ३ ॥ कोणी पसरीती चवाळें ॥ कोणी पसरिताती जाळें ॥ ४ ॥ गोळे घेऊनियां हातीं ॥ येरयेराते हाणीती ॥ ५ ॥ पाहताती देव ॥ धन्य धन्य त्यांचा भाव ॥ ६ ॥ मिटकीया देती ॥ देवा वांकुल्या दाविती ॥ ७ ॥ माया मोही ब्रह्मादिकां ॥ नामा ह्मणे तेंची ऐका ॥ ८ ॥

॥ १५७९ ॥ गौळीयाचीं पोरें वांकुल्या दावीती ॥ क्रोधावला चित्तीं ब्रह्मदेव ॥ १ ॥ चोरोनियां नेत गोवत्स गोपाळ ॥ पाहूं याचें बळ किती आहे ॥ २ ॥ जाणोनी अंतर देव हांसतसे ॥ सामर्थ्य पाहातसे पुत्र माझा ॥ ३ ॥ तेथून आणावीं नव्हे हें उचीत ॥ ह्मणेल किंचित पराक्रम ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें विचारिलें चित्तीं ॥ करीतसे श्रीपति काय तेव्हां ॥ ५ ॥

॥ १५८० ॥ गायीवत्सगोपाळ केलींसे निर्माण ॥ न लगतां क्षण परीक्षिती ॥ १ ॥ पूर्ववत सर्व न्यून कांहीं नोहे ॥ न करी आश्चर्य मना-माजीं ॥ २ ॥ इच्छामात्रें करी ब्रह्मांडाच्या कोटी ॥ त्यासी काय गोष्टी

अपूर्व हे ॥ ३ ॥ सायंकाळीं गेले गोकुळाभीतरीं ॥ आपुलाल्या परी घरीं सर्व ॥ ४ ॥ ब्रह्मादिकां ज्याचा नकळेची पार ॥ मानवा विचार न कळे कांहीं ॥ ५ ॥ ऐसा हा समर्थ नामयाचा धनी ॥ वंदी पाय वनीं सदाशीव ॥ ६ ॥

॥ १५८१ ॥ एक संवत्सर सकळ जाहला ॥ पाहावया आला ब्रह्मदेव ॥ १ ॥ पूर्ववत गायी गोपाळ देखीले ॥ आश्चर्य वाटलें तेव्हां त्यासी ॥ २ ॥ ब्रह्मांडांत ब्रह्मा दूजा असे कोण ॥ केलेंसे उत्पन्न याजलागीं ॥ ३ ॥ घेवोनीयां गेलों तेची आले येथें ॥ जावोनियां तेथें पाहातसे ॥ ४ ॥ भ्रांतीनें व्यापीलें तयाचें तें मन ॥ देखतों मी स्वप्न किंवा सत्य ॥ ५ ॥ नामा ह्मणे एके ठायीं उभा राहे ॥ न्याहाळून पाहे सकळांसी ॥ ६ ॥

॥ १५८२ ॥ चतुर्भुज दिसे शंखचक्र हातीं ॥ मुकूट शोभती सर्वांलागीं ॥ १ ॥ कर्णीचीं कुंडलें वैजयंती माळा ॥ देखतसे डोळां ब्रह्मा तेव्हां ॥ २ ॥ कौस्तुभ हृदयीं श्रीवत्सलांछन ॥ बाहूचीं भूषणें पाहातसे ॥ ३ ॥ चरणीं तोडर पीतपीतांबर ॥ तेजें दिवाकर लोपतसे ॥ ४ ॥ अपादपर्यंत तुळसीच्या माळा ॥ मुद्रिका दशांगुळा रत्नाचीया ॥ ५ ॥ केंशराचे टीळे नेत्र कमळाकार ॥ दंती इंदुकर बैसलेती ॥ ६ ॥ कोटीशा हे मूर्ती कोटि ब्रह्में दिसती ॥ स्तवन करीती सुरवर ॥ ७ ॥ नामा ह्मणे ऐसें दावीत गोविंद ॥ झालासे सावध ब्रह्मा तेव्हां ॥ ८ ॥

॥ १५८३ ॥ ओळखे बापाला ॥ ब्रह्मा तेव्हां धाविन्नला ॥ १ ॥ नेत्रीं अश्रूचीया धारा ॥ कांपतसे थरथरा ॥ २ ॥ घालीतसे नमस्कार ॥ ह्मणे अपराधी मी थोर ॥ ३ ॥ जोडोनियां हात ॥ नामा ह्मणे स्तुति गात ॥ ४ ॥

॥ १५८४ ॥ श्रवणीं जळती पापाचे पर्वत ॥ ऐकें ब्रह्मगीत शूक ह्मणे ॥ १ ॥ धरी जो विश्वास करी जो पठण ॥ तरेल तो जाण भवसिंधू ॥ २ ॥ आपण तरेल नव्हे हें नवल ॥ कुळें उद्धरतील सकळांचीं ॥ ३ ॥ एकेक अक्षर टाळी महा पाप ॥ करा याचा जप सात्वीक हो ॥ ४ ॥ नाम घेतां धांवे अनवाणी पाय ॥ कोमळ हृदय कृष्णजीचें ॥ ५ ॥ न विचारितां याति कुळ अमंगळ ॥ न पाहे काळवेळ धांव घेई ॥ ६ ॥ शरणांगता नेदी काळाचिये हातीं ॥ नामा ह्मणे चित्तीं दृढ धरा ॥ ७ ॥

॥ १५८५ ॥ मेघःशाम वर्ण झालासी सगुण ॥ कार्य आणि कारण तुज नमों ॥ १ ॥ गुंजाहार गळां मयुरपुच्छे वेंटी ॥ कृपाळु जगजेठी तुज नमों ॥ २ ॥ वनपुष्पमाळा अपाद शोभती ॥ लक्ष्मीच्या पति तुज नमों ॥ ३ ॥ वेणू वाजवीसी गायी त्या चारीसी ॥ न कळे कोणासी तुझी लीला ॥ ४ ॥ हातीं तुझ्या कवळ शोभे पीतांबर ॥ चरण सुंदर तुज नमों ॥ ५ ॥ घेवोनी अवतार दुष्टासी मारीसी ॥ भक्तांसी राखिसी निरंतर ॥ ६ ॥ रावण कुंभकर्ण मारीसी आत्मारामा ॥ सोडवीलें आह्मां बंदीहुनी ॥ ७ ॥ तुझें मी बालक वेडें अविचारी ॥ नामा ह्मणे करी कृपा आतां ॥ ८ ॥

॥ १५८६ ॥ भवसिंधु तराया एकची उपाय ॥ ध्यावे तुझे पाय वासुदेवा ॥ १ ॥ गोविंद गोपाळ वाचेसी निखळ ॥ उद्धरे तात्काळ कलीमाजीं ॥ २ ॥ नारायण नारायण करी जो पारायण ॥ तो उद्धरे जाण इहलोकीं ॥ ३ ॥ तुटती यातना कर्माच्या भावना ॥ जडजीवा उद्धरणा नाम स्मरा ॥ ४ ॥ अहर्निशीं कीर्ती गाती भाविक भोळे ॥ त्यांनीं तुज जिंकीलें ब्रह्मा ह्मणे ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसें दावीलें सुगम ॥ न लगे तुझा नेम नाना कोटी ॥ ६ ॥

॥ १५८७ ॥ कृष्णभक्तीवीण तरला आहे कोण ॥ द्यावा हा निवडून एक तरी ॥ १ ॥ कार्य आणि कारण लटकाची क्षीण ॥ वर्म न कळोन वायां गेलें ॥ २ ॥ नामा ह्मणे माझी खेचर माउली ॥ कृपेनें दाविली वाट मज ॥ ३ ॥

॥ १५८८ ॥ धन्य त्या गोपीका धन्य त्यांच्या गायी ॥ धन्य हेची महीं ब्रह्मा ह्मणे ॥ १ ॥ विश्वात्मा जो हरी क्रीडे या वनांत ॥ तृणादि समस्त धन्य धन्य ॥ २ ॥ धन्य हें गोवर्धन धन्य वृंदावन॥ वृक्षादि पाषाण धन्य धन्य ॥ ३ ॥ धन्य हें गोकुळ धन्य हे गोपाळ ॥ व्रजवासी सकळ धन्य धन्य ॥ ४ ॥ धन्य ही यशोदा स्तन दे मुकुंदा ॥ धन्य तूंची नंदा त्रैलोक्यांत ॥ ५ ॥ ब्रह्मसनातन वेदासी नकळे ॥ गड्या संगें खेळे अरण्यांत ॥ ६ ॥ विश्वाचा जो बाप नंद त्याचा पिता ॥ यशोदेसी माता ह्मणतसे ॥ ७ ॥ सद्गदित कंठ नेत्रीं जळ वाहे ॥ नामा ह्मणे काय मागतसे ॥ ८ ॥

॥ १५८९ ॥ इतुकें मागतसें तुज ॥ वनीं जन्म देई मज ॥ १ ॥ सुखें करुनी राहीन ॥ तुझे पाहीन चरण ॥ २ ॥ बहुत शीणलों ॥ आतां तुज-

पाशीं आलों ॥ ३ ॥ न करी अव्हेर ॥ दास तुझा मी किंकर ॥ ४ ॥ येतों काकूळती ॥ नामा ह्मणे देवाप्रती ॥ ५ ॥

॥ १५९० ॥ काय देशील यांजला ॥ ब्रह्मा ह्मणे नें कळे मला ॥ १ ॥ ह्मणसी देईन मी मुक्ति ॥ तरी ऐक रमापति ॥ २ ॥ मारायासी आले ॥ त्यांसी स्वरूपीं मिळविलें ॥ ३ ॥ न फिटे याचें पुण्य ॥ तुजवरी झालें ऋण ॥ ४ ॥ येथोनियां नवजासी ॥ मज कळलें मानसीं ॥ ५ ॥ आणोनियां देत ॥ गायी गोपाळ समस्त ॥ ६ ॥ घाली पोटामध्यें डोई ॥ क्षमा करी माझे आई ॥ ७ ॥ आज्ञा घेवोनियां गेला ॥ नामा ह्मणे स्वस्थ झाला ॥ ८ ॥

॥ १५९१ ॥ आनंदें खेळत ॥ राम गडी कृष्णनाथ ॥ १ ॥ गडी ह्मणती रामा ॥ ताडफळें देई आह्मां ॥ २ ॥ सकळ मिळोनी ॥ आले धेनूकांचे वनीं ॥ ३ ॥ वृक्ष हालवोनी ॥ फळें पाडिलीं मेदिनी ॥ ४ ॥ येत धांवोनी असुर ॥ करी तयाचा संहार ॥ ५ ॥ भक्तांचा अंकित ॥ नामा ह्मणे कृष्णनाथ ॥ ६ ॥

॥ १५९२ ॥ कालिंदीचे डोहीं कालियाची वस्ती ॥ ऐक परिक्षीती चरित्र हें ॥ १ ॥ पक्षी श्वापदांनीं सोडीयेलें स्थळा ॥ निघताती ज्वाळा तया डोहीं ॥ २ ॥ विषाचियायोगें झाडें जळताती ॥ जीवन न घेती कोणी त्याचें ॥ ३ ॥ वैकुंठनायक तया वनीं आला ॥ गोपाळाचा मेळा बरोबरी ॥ ४ ॥ हुतुतु हमामा खेळ खेळताती ॥ देवासी ह्मणती लपें आतां ॥ ५ ॥ तृषाक्रांत गायी झाले ते गोपाळ ॥ पीती तेव्हां जळ कालीयाचें ॥ ६ ॥ लहानालीं मूलें नाहीं तया ज्ञान ॥ झाले गतप्राण सकळांचे ॥ ७ ॥ नामा ह्मणे तेव्हां कृपादृष्टी पाहात ॥ उठवी समस्त गायी गडी ॥ ८ ॥

॥ १५९३ ॥ जगजेठी तेव्हां क्रोधावला चित्तीं ॥ करीन मी शांति तुझी आतां ॥ १ ॥ माझिया लेंकरा दिधलासे त्रास ॥ करीन मी नाश आतां तुझा ॥ २ ॥ त्रैलोक्यांत कोण ऐसा हो समर्थ ॥ माझे शरणांगत मारील तो ॥ ३ ॥ माझिया भक्तांसी जो कां दुःखदायक ॥ करीन प्रळय प्रत्यक्ष त्याजवरी ॥ ४ ॥ स्फुरताती दंड कांपताती अधर ॥ उठला सत्वर जगदीश ॥ ५ ॥ कळंबाचे वृक्षीं देव चढतसे ॥ पीतांबर सोगे खोंवीतसे ॥ ६ ॥

जगद्गुरु तेव्हां पुष्पमाळा काढी ॥ टाकीतसे उडी जळामध्यें ॥ ७ ॥ नामा ह्मणे शोकें व्यापिलें समग्र ॥ करूनि एकाग्र मन ऐका ॥ ८ ॥

॥ १५९४ ॥ घालीतसे वेढे दिसतसे जळीं ॥ आकांत सकळीं मांडियेला ॥ १ ॥ गडी रडताती वत्स पडताती ॥ कपाळ पिटीती सकळीक ॥ २ ॥ तुजवांचोनियां रक्षी कोण आह्मां ॥ काय सांगूं रामा सकळीक ॥ ३ ॥ रुसल्या आमुचें करी समाधान ॥ तुजवीण वन ओस वाटे ॥ ४ ॥ आह्मासाठीं तुवां दुष्टासी मारिलें ॥ कोण आतां लळे पुरवील ॥ ५ ॥ तुजवांचोनिया आह्मी सर्व दीन ॥ न जाऊं येथून गोकुळासी ॥ ६ ॥ वियोगानें तेव्हां पक्षी रडताती ॥ आतां कृष्णमूर्ती कैंची आह्मां ॥ ७ ॥ बोलोनियां ऐसें निस्तेज पडती ॥ नदी वाहात होती स्थीरावली ॥ ८ ॥ नामा ह्मणे होती दुःश्चिन्हें बहुत ॥ गोकुळीं सर्वत्र विचारिती ॥ ९ ॥

॥ १५९५ ॥ यशोदा व्याकूळ जाहालीसे प्राणें ॥ सुखें असो तान्हें वनामाजीं ॥ १ ॥ उठती तिडका स्तनीं माझ्या फार ॥ लवतसे नेत्र वेळोवेळां ॥ २ ॥ जीव तळमळी दाटे माझा घसा ॥ पाहीन पाडसा केव्हां माझ्या ॥ ३ ॥ गोकुळींचे जन निघाले सकळ ॥ पाहाती गोपाळ वनामध्यें ॥ ४ ॥ कालिंदीच्या तीरीं पडले सकळ ॥ पाहोनी कोल्हाळ करीताती ॥ ५ ॥ कपाळ पीटीती यशोदा रोहिणी ॥ आतां चक्रपाणी कैंचा आह्मां ॥ ६ ॥ धांव धांव कृष्णा दावीरे वदना ॥ पाजूं आतां पान्हा कोणालागीं ॥ ७ ॥ तुझीया कौतुकें कंठीं मी संसार ॥ जळतें अंतर तुजसाठीं ॥ ८ ॥ कोणावरी आतां घालूं अलंकार ॥ बुडालें हें घर माझें आतां ॥ ९ ॥ नामा ह्मणे शोकें जाऊं पाहे प्राण ॥ संकटाचें जीवन कृष्णनाथ ॥ १० ॥

॥ १५९६ ॥ नंद ह्मणे माझें बुडालें जहाज ॥ अभाग्यासीं मज कृष्ण कैंचा ॥ १ ॥ काय माझें तप संपूर्ण सरलें ॥ ह्मणोनी बुडालें तान्हें माझें ॥ २ ॥ चिंतेनें व्याकूळ पिटी वक्षस्थळा ॥ दावरे सांवळा प्राण माझा ॥ ३ ॥ आलीया अतीता त्रासें दवडीलें ॥ ह्मणोनी बुडालें बाळ माझें ॥ ४ ॥ प्रातःकाळीं पाहूं कोणाचें मी मूख ॥ येथुनीयां सुख नाहीं नाहीं ॥ ५ ॥ समस्तांची दृष्टी करी तुज कष्टी ॥ ह्मणोनी जगजेठी टाकीयलें ॥ ६ ॥ गोकुळींचे जन देऊं पाहाती प्राण ॥ वांचाया कारण काय आतां ॥ ७ ॥ अभय देतसे बळिभद्र सर्वांसी ॥ मारून दुष्टांसी येईल आतां ॥ ८ ॥ अंतर्यामीं जाणे जन झाले वेडे ॥ नामा ह्मणे वेढे काढीतसे ॥ ९ ॥

॥ १५९७ ॥ तयाचे मस्तकीं नाचे नारायण ॥ आरंभी गायन जगदीश ॥ १ ॥ त्रैलोक्याचा भार घाली हृषीकेशी ॥ दमीत दुष्टासीं स्वामी माझा ॥ २ ॥ होता एक क्षण झाला तेव्हां क्षीण ॥ जाऊं पाहे प्राण कालीयाचा ॥ ३ ॥ तेव्हां त्याच्या स्त्रीया येती काकूळती ॥ लक्ष्मीच्या पति कृपाळूवा ॥ ४ ॥ यज्ञेशा अच्युता गोविंदा माधवा ॥ दयानिधि केशवा कृष्णनाथा ॥ ५ ॥ श्रीधरा वामना अगा वासूदेवा ॥ ऐकावी ही देवा विज्ञापना ॥ ६ ॥ आह्मालागीं आतां देई चुडेदान ॥ धरीती चरण कृष्णजीचे ॥ ७ ॥ दीनाचा दयाळ दासाचा कैवारी ॥ नामा ह्मणे हरि उतरला ॥ ८ ॥

॥ १५९८ ॥ राहूं नका येथें जावें समुद्रासीं ॥ सांगे हृषिकेशी सकळिकां ॥ १ ॥ तुझीया मस्तकीं असती चरण ॥ न भक्षीच जाण पक्षीराज ॥ २ ॥ दिव्य सुमनाच्या घालीताती माळा ॥ पूजिती सांवळा बाप माझा ॥ ३ ॥ अनर्घ्य रत्नांचे देती अलंकार ॥ श्रीमुख सुंदर पहाताती ॥ ४ ॥ जांबूनदातटीं घालीती भोजन ॥ निघती तेथून सकळिक ॥ ५ ॥ आला भगवान आनंदले गडी ॥ उभारीती गुडी जन तेव्हां ॥ ६ ॥ काळीया आख्यान स्मरे जो मानसीं ॥ न खंडी तयासी सर्पकूळ ॥७॥ अहर्निशीं याचें करी जो पठण ॥ नामा ह्मणे विघ्न नाहीं तेथें॥८॥

॥ १५९९ ॥ आला वनमाळी ॥ मग भेटती सकळी ॥ १ ॥ यशोदा रोहिणी ॥ पोटीं धरिती चक्रपाणी ॥ २ ॥ गायी धांवताती ॥ कृष्ण अंगातें चाटिती ॥ ३ ॥ उड्या मारिताती ॥ गडी आनंदें नांचती ॥ ४ ॥ न वर्णवे तो आनंद ॥ नामयाची बुद्धि मंद ॥ ५ ॥

॥ १६०० ॥ झाला अस्तमान तेथेंची रहाती ॥ ऐके परीक्षिती अद्भुत तें ॥ १ ॥ निद्रेनें व्यापीलें असे तेव्हां सर्वा ॥ लागला वणवा तया वनीं ॥ २ ॥ गायी पळताती पक्षी उडताती ॥ पिलें पळताती कृष्णापुढें ॥ ३ ॥ हाहाःकार झाला धांव धांव कृष्णा ॥ वांचवी रे प्राणा सकळांच्या ॥ ४ ॥ तुझीं आह्मी बाळें वांचवीरे आह्मां ॥ धांव धांव रामा ह्मणताती ॥ ५ ॥ आक्रोशें रडती मारिताती हांका ॥ वैकुंठनायका रक्षी आह्मां ॥ ६ ॥ दीनाचा दयाळ मनाचा कोमळ ॥ घाली अग्निज्वाळ मुखामाजीं ॥ ७ ॥ होतां प्रातःकाळ सकळ उठले ॥ नामा ह्मणे आले गोकुळांत॥८॥

॥ १६०१ ॥ दुष्ट दुराचारी ॥ गोपाळाचा वेषधारी ॥ १ ॥ दैत्य ओ-ळखीला ॥ रामें प्रलंब मारिला ॥ २ ॥ देव करिती जयजयकार ॥ पुष्पें वर्षती अपार ॥ ३ ॥ सूर्य आलासे माध्यान्हा ॥ देवा वाहाती भोजना ॥ ४ ॥ नामा ह्मणे पंचारती ॥ गडी एकत्र बैसती ॥ ५ ॥

॥ १६०२ ॥ एके ठायीं करुनी अन्न ॥ हातें वाढी नारायण ॥ १ ॥ हें पाहोनी सुरवर ॥ चित्तीं करिती विचार ॥ २ ॥ धन्य पुण्य गौळी-यांचें ॥ आह्मां अन्न मिळे कैचें ॥ ३ ॥ एक असे युक्ति ॥ हात धुवील श्रीपति ॥ ४ ॥ उच्छिष्टाचे मिषें ॥ देव जळीं होती मासे ॥ ५ ॥ हें कळलें घननीळा ॥ सांगतसे हें गोपाळा ॥ ६ ॥ चला वृंदावना जाऊं ॥ नामा ह्मणे उदक घेऊं ॥ ७ ॥

॥ १६०३ ॥ तृणाचीया लोभें गायी गेल्या दुरी ॥ पाचारी मुरारि नामें त्यांचीं ॥ १ ॥ चंद्रभागे गंगे भागीरथी यमूने ॥ येई ताम्रपर्णे धांवो-निया ॥ २ ॥ सरस्वती प्रवरे कालिंदी नर्मदे ॥ येई तुंगभद्रे धांवोनिया ॥ ३ ॥ देवाजीचा शब्द ऐकोनिया कानीं ॥ येताती धांवोनी नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६०४ ॥ त्रिभंगी देहुडे उभे वृंदावनीं ॥ वेणू चक्रपाणी वाज-वीतो ॥ १ ॥ तयावरी गायी टाकिताती माना ॥ बाळें स्तनपाना विस-रती ॥ २ ॥ सर्प आणी नाग मुंगूसें बैसती ॥ जळेंही वाहाती विसरलीं ॥ ३ ॥ हस्ती सिंह एके ठायीं बैसताती ॥ भ्रमर भूलती वेणुनादें ॥ ४ ॥ विंचरितां वेणी तेथें राहे फणी ॥ करितां भोजनीं ग्रास मुखीं ॥ ५ ॥ उदकाचे कुंभ गोपिकांचे शीरीं ॥ यमुनेचे तीरीं वेडावल्या ॥ ६ ॥ जाहाले तटस्थ त्रिलोकींचे जीव ॥ विसरला शीव देहभावा ॥ ७ ॥ नामा ह्मणे व्योमीं उभ्या देवांगना ॥ पाहोनिया कृष्णा भुलताती ॥ ८ ॥

॥ १६०५ ॥ मार्गशीर्ष मासीं व्रत कात्यायन ॥ कुमारी समस्त मिळून आचरती ॥ १ ॥ अरुणोदयीं येती कालिंदीचे तीरीं ॥ गाती त्या सुंदरी कृष्ण-जीला ॥ २ ॥ सिकतेची मूर्ती करुनी देवीची ॥ पूजाअर्चा तिची करी-ताती ॥ ३ ॥ जोडोनिया कर करिताती स्तवना ॥ ऐके विज्ञापना आदि-माये ॥ ४ ॥ नंदाचा नंदन देई आह्मां पती ॥ नामा ह्मणे येती स्वस्थ-ळासी ॥ ५ ॥

॥ १६०६ ॥ कालिंदीचे तीरीं वस्त्रें ठेविताती ॥ जळांत रीघती सकळीक ॥ १ ॥ गड्यांसमवेत आला तेथें कृष्ण ॥ करावया पूर्ण व्रत सांचें ॥ २ ॥ वस्त्रें घेवोनिया चढे वृक्षावरी ॥ घाबरल्या नारी पाहोनिया ॥ ३ ॥ वस्त्रें देयी आतां आमुचीं मुकुंदा ॥ जाउनीया नंदा सांगूं आतां ॥ ४ ॥ अच्युता अनंता कृष्णा गरुडध्वजा ॥ दासी आह्मी तुझ्या सकळिका ॥ ५ ॥ वाजतसे सीत जाऊं पाहे प्राण ॥ यशोदेची आण तुज असे ॥ ६ ॥ ऐकोनिया ऐसें नामा ह्मणे हांसे ॥ धर्म सांगतसे तयालागीं ॥ ७ ॥

॥ १६०७ ॥ नग्न होवोनिया स्नान जे करीती ॥ सांचीं व्रतें होती निरर्थक ॥ १ ॥ त्वरें करूनिया या गे मजपाशीं ॥ सांगतों तुह्मांसी प्रायश्चित्त ॥ २ ॥ एकी आड एक गुह्यस्थानीं हात ॥ आनंद बहुत मनामध्यें ॥ ३ ॥ करा नमस्कार सांगे वनमाळी ॥ एक हस्त भाळीं लावीताती ॥ ४ ॥ देवां द्विजां ऐसा करितां नमस्कार ॥ पाप याचें फार धर्मशास्त्रीं ॥ ५ ॥ ऐकोनिया ऐसें लज्जा सोडोनिया ॥ पडताती पायां आदिसाच्या ॥ ६ ॥ वस्त्रें देत तेव्हां तया जगज्जीवन ॥ मनोरथ पूर्ण करीन मी ॥ ७ ॥ नामा ह्मणे येती गोकुळासी नारी ॥ चालीला श्रीहरि तेथूनिया ॥ ८ ॥

॥ १६०८ ॥ प्रातःकाळीं सांगे सकळांसी कृष्ण ॥ नका घेऊं अन्न आज कोणी ॥ १ ॥ सोडोनिया गायी चालीले वनासी ॥ गडी हृषीकेशी खेळताती ॥ २ ॥ वर्जीयलें आह्मां नका घेऊं अन्न ॥ खावें काय कृष्णा आजी आतां ॥ ३ ॥ गडीयांसी सांगे वैकुंठीचा राणा ॥ सांगावें ब्राह्मणा जावोनिया ॥ ४ ॥ वनीं उपवासी आहे रामकृष्ण ॥ द्यावें त्यासी अन्न कृपा करोनी ॥ ५ ॥ गोपाळासी तेव्हां धाडी वासुदेव ॥ पाहावया भाव याज्ञिकांचा ॥ ६ ॥ जोडोनिया हात वंदिती द्विजांसी ॥ धाडीलें आह्मांसी कृष्णनाथें ॥ ७ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगती गोपाळ ॥ याज्ञिकांस बळ अभिमान ॥ ८ ॥

॥ १६०९ ॥ पडे प्रायश्चित्त बोलूं नका कोणी ॥ ऐकूं नये कानीं शब्द यांचा ॥ १ ॥ स्वर्गसुखासाठीं करिताती यज्ञ ॥ टाकीती अवदान अग्निमुखीं ॥ २ ॥ भोक्ता वनीं आला न कळेची त्यांला ॥ पूर्णब्रह्म याला

न जाणती ॥ ३ ॥ कृपाळू बहुत परीक्षिती राया ॥ उद्धार कराया पाठवीलें ॥ ४ ॥ इच्छामात्रें पाडी अन्नाचे पर्वत ॥ काकूळती येते अन्नासाठीं ॥ ५ ॥ गडीयांसी कळे तेथील आकार ॥ निघती सत्वर तेथूनिया ॥ ६ ॥ येवोनिया कृष्णा सांगीतलें त्यांनीं ॥ हांसे चक्रपाणी नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १६१० ॥ कृष्णा पांचा खाणी उथळ दिसती ॥ लाहानाल्या भिंती त्याजवरी ॥ १ ॥ विस्तू घालिताती गवत आंथरती ॥ बडबड करीती अवघेजण ॥ २ ॥ घालूनिया तूप हातीं घेती चाटू ॥ करीती ॐ फटू अस्कवळ ॥ ३ ॥ लांकडाचें पाळें घेउनी बैसला ॥ मिळालासे मेळा त्याजपुढें ॥ ४ ॥ एवढेंसें भांडें तांदूळ शिजवीती ॥ तुजला काय देती त्यांतूनिया ॥ ५ ॥ घडिघडी उठती घडिघडी बैसती ॥ तें काय श्रीपति आह्मां सांग ॥ ६ ॥ काय चतुराई असे त्या गोपाळा ॥ भावासी भुलला नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १६११ ॥ गडीयांसी तेव्हां सांगीतलें देवें ॥ स्त्रियांसी सांगावें जाऊनिया ॥ १ ॥ नको कृष्णा द्वीज आह्मांसी मारीती ॥ अभय श्रीपति त्यांसी देत ॥ २ ॥ त्वरें करोनिया गेले स्त्रियांपाशीं ॥ सांगीतलें त्यांसी वर्तमान ॥ ३ ॥ ऐकोनिया ऐसें उठील्या सत्वर ॥ वर्जिती भ्रतार तेव्हां त्यांचे ॥ ४ ॥ एका ब्राह्मणानें स्त्रियेसी बांधीलें ॥ प्राणासी सोडिलें परीक्षिती ॥ ५ ॥ सकुमार सांवळा राजीवलोचन ॥ पहाताती कृष्णमुख तेव्हां ॥ ६ ॥ आनंदानें नेत्रीं वाहातें जीवन ॥ पुसे वर्तमान नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १६१२ ॥ घरा जावें ऐसें सांगे पुरुषोत्तम ॥ ऐकोनिया श्रम फार होय ॥ १ ॥ दयानिधि ऐके अगा मेघश्यामा ॥ धाडूं नको आह्मां येथूनिया ॥ २ ॥ तुजसाठीं आह्मीं सोडिलें भ्रतारां ॥ चरणीं देयी थारा देवराया ॥ ३ ॥ देव ना संसार आह्मां झालें कृष्णा ॥ सांगावें हें कोणां दुःख आतां ॥ ४ ॥ तुमचे भ्रतार वंदिती आह्मांसी ॥ सांगे हृषिकेशी भिऊं नका ॥ ५ ॥ सांगताची ऐसें चालिल्या त्या सर्व ॥ पाहाती केशव वेळोवेळां ॥ ६ ॥ द्विजाचे मानसीं होय अनुताप ॥ निंदिती आपआपणातें ॥ ७ ॥ भोजन करूनी गडी रामकृष्ण ॥ निघती तेथून नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १६१३ ॥ इंद्राचा विभाग भक्षी चक्रपाणी ॥ रूप गोवर्धनी धरूनिया ॥ १ ॥ क्रोधावला इंद्र गौळियां निंदीत ॥ दावीन सामर्थ्य तुह्मां

आतां ॥ २ ॥ पोराच्या बुद्धीनें वर्तताती सर्व ॥ धरूनिया गर्व तेची करी ॥ ३ ॥ प्रलय मेघाच्या काढिल्या श्रृंखला ॥ वर्षावे गोकुळा जाऊनिया ॥ ४ ॥ आज्ञा ह्मणोनिया वंदियेला इंद्रा ॥ कोपे जैसा रुद्र प्रलयींचा ॥ ५ ॥ मुसळाच्या धारा मेघ वर्षताती ॥ गारा पडताती शिळा ऐशा ॥ ६ ॥ मरताती पक्षी श्वापदें अपार ॥ हिंवें नारीनर कांपताती ॥ ७ ॥ नामा ह्मणे गायी हंबरडी हाणीती ॥ येऊनी पडती कृष्णापुढें ॥ ८ ॥

॥ १६१४ ॥ काकुळती येती सकळिक लोक ॥ पाहासी कौतुक काय आतां ॥ १ ॥ मागें बहुतांपरी रक्षियेलें आह्मां ॥ अगा पुरुषोत्तमा दीनबंधू ॥ २ ॥ कोण तुजवीण आह्मांसी रक्षीता ॥ उदारा अनंता जगजेठी ॥ ३ ॥ शरण शरण अगा वासुदेवा ॥ अच्युता माधवा दीनबंधु ॥ ४ ॥ विलंब करितां जातील रे प्राण ॥ धरिती चरण नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १६१५ ॥ सकळीकां तेव्हां देवें अश्वासीलें ॥ इंद्रें हें मांडिलें विघ्न येथें ॥ १ ॥ महेंद्राचा रंक करीन क्षणांत ॥ पाहा पुरुषार्थ दावीन मी ॥ २ ॥ रक्षिणार यांसी आहें मी गोविंद ॥ उतरीन मद तुझा आतां ॥ ३ ॥ शरणांगता मारी ऐसा कोण थोर ॥ मशक पामर पाहूं आतां ॥ ४ ॥ यासाटीं करीन सृष्टीचा उभारा ॥ लागों नेदी वारा दुःखाचा मी ॥ ५ ॥ गोवर्धना तुह्मीं चलारे सकळ ॥ दावितों मी बळ इंद्रा आतां ॥ ६ ॥ उचलीला गिरी प्रथम अंगुळीं ॥ नामा ह्मणे बळी बाप माझा ॥ ७ ॥

॥ १६१६ ॥ राहा याचे तळीं आनंदें करूनी ॥ मानूं नका मनीं भय याचें ॥ १ ॥ पाहूं किती दिवस पडतो पाऊस ॥ धरीन निःशेष प्रलयांत ॥ २ ॥ सांगतांचि ऐसें राहाती सकळ ॥ वर्णिताती बळ परस्परें ॥ ३ ॥ सौंगडे ह्मणती पडेल अवचीत ॥ लावा कीरे हात सकळीक ॥ ४ ॥ उगेंची श्रमती बालकें अज्ञान ॥ ह्मणे नारायण काढा हात ॥ ५ ॥ सप्त दीन होती सांगतो योगींद्र ॥ पाहावया इंद्र येता झाला ॥ ६ ॥ अद्भूत चरित्र पाहून गेली भ्रांत ॥ मेघासी सांगत पुरे करा ॥ ७ ॥ नामा ह्मणे इंद्र मनीं तो शंकला ॥ अपराध घडला समर्थाचा ॥ ८ ॥

॥ १६१७ ॥ राहिला पाऊस निघावें बाहेर ॥ सांगे विश्वंभर सकळांसी ॥ १ ॥ दीनबंधू तेव्हां ठेवी पर्वतासी ॥ भेटती देवासी सकळीक ॥ २ ॥

आयुष्य बहुत तुज होवो कृष्णा ॥ वांचविले प्राणा सकळांच्या ॥ ३ ॥ विष्णुदासनामा ओंवाळून जाय ॥ येगे माझे माय भेटी देयी ॥ ४ ॥

॥ १६१८ ॥ वाहातसे नेत्रीं इंद्राचीये नीर ॥ अपराधी फार देवराया ॥ १ ॥ क्षमा करी आतां अच्युता अनंता ॥ अगा कृष्णनाथा दीनबंधू ॥ २ ॥ तुझीया दासासी दुःख म्यां दीधलें ॥ भ्रांतीनें मोहिलें मन माझें ॥ ३ ॥ दावी तुज थोरी न करीच सेवा ॥ करा दंड देवा मजलागीं ॥ ४ ॥ तूंची माझा बाप तूंची माझी आई ॥ क्षमा कृष्णाबाई करी आतां ॥ ५ ॥ दैत्य मारावया भूतळीं आलासी ॥ भक्तांला रक्षीसी निरंतर ॥ ६ ॥ जगद्गुरु माझा धनी वनमाळी ॥ जोडोनी आंजुळी उभा असे ॥ ७ ॥ चतुर्भुज गळां वैजयंती माळा ॥ पाहातसे डोळा नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १६१९ ॥ गोविंदा माधवा केशवा वामना ॥ मायातीता कृष्णा तुज नमों ॥ १ ॥ गोवर्द्धनोद्धारा देवा विश्वंभरा ॥ निर्गुण निराकारा तुज नमों ॥ २ ॥ जनार्दना हरि कृपाळू हृषिकेशा ॥ पुराणपुरुषा तुज नमों ॥ ३ ॥ अव्यक्ता क्षेत्रज्ञ अचिंता कुटस्था भुवनैकनाथा तुज नमों ॥ ४ ॥ अनंत ब्रह्मांडें तुझिये उदरीं ॥ घनश्यामा हरि तुज नमों ॥ ५ ॥ देवराया तुझें कोमळ हृदय ॥ कृपादृष्टी पाहे मजकडे ॥ ६ ॥ तुझा मी किंकर आहें वासुदेवा ॥ अभय या जीवा देयी आतां ॥ ७ ॥ नामा ह्मणे घाली चरणासी मिठी ॥ बोले जगजेठी स्वामी माझा ॥ ८ ॥

॥ १६२० ॥ तुझा मोडिला म्यां यज्ञ ॥ ऐके तयाचें कारण ॥ १ ॥ न करी मी स्मरण ॥ सुखारूढ तुझें मन ॥ २ ॥ विसरलासी मज ॥ अनुग्रह केला तुज ॥ ३ ॥ ऐसें सांगे नारायण ॥ नामा ह्मणे समाधान ॥ ४ ॥

॥ १६२१ ॥ आणूनी सुरभी करी अभिषेक ॥ येती सकळीक मरुद्गण ॥ १ ॥ सुरवरांची दाटी करिती नमस्कार ॥ होतसे अपार पुष्पवृष्टी ॥ २ ॥ वेदमंत्रघोष ऋषि करितातीं ॥ अप्सरा नाचती थयथयां ॥ ३ ॥ नारद तुंबर गंधर्व गायन ॥ वर्णितातीं गुण कृष्णजीचे ॥ ४ ॥ यथाविधि इंद्र पूजी विश्वंभरा ॥ जोडोनिया कर उभा राहे ॥ ५ ॥ आज्ञा घेवोनिया जाय स्वस्थळासी ॥ येती गोकुळासी सकळीक ॥ ६ ॥ चरित्र जो कोणी उच्चारील वाचे ॥ जळती पापाचे पर्वत तेथें ॥ ७ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगतसे शूक ॥ सूत पुराणिक शौनकासी ॥ ८ ॥

॥ १६२२ ॥ अहर्निशीं कंस बसे चिंताक्रांत ॥ विचार पुसत प्रधानासी ॥ १ ॥ प्रतिज्ञा करुनी शत्रुवधा जाती ॥ ते मागें न येती परतोनी ॥ २ ॥ आतां पुरुषार्थी कोण पाठवावा ॥ तो मज सांगावा निवडोनी ॥ ३ ॥ सांगती प्रधान धाडा असुरासुर ॥ तंव तो असूर उभा राहे ॥ ४ ॥ ह्मणे मृत्यु नसे मज कोणा हातीं ॥ द्वापारीं मारुती गुप्त झाला ॥ ५ ॥ ऐकोनिया ऐसें आनंद मानसीं ॥ गौरविलें त्यासी नानापरी ॥ ६ ॥ नामा ह्मणे काळें बोलविलें त्यासी ॥ सत्वर वनासी येता झाला ॥ ७ ॥

॥ १६२३ ॥ आनंदें वनांत खेळताती गोप ॥ गायींचे कळप चरताती ॥ १ ॥ अकस्मात दैत्य देखती दुरोनी ॥ ह्मणती विघ्न थोर आलें कृष्णीं ॥ २ ॥ लपे तूं कान्होबा ह्मणताती गडी ॥ घालितों घोंगडी तुजवरी ॥ ३ ॥ घाबरले तेव्हां समस्त गोपाळ ॥ पाहोनी घननीळ बोलतसे ॥ ४ ॥ तुह्मीं कांहीं चिंता न करा मानसीं ॥ मारितों मी यासी क्षणामाजीं ॥ ५ ॥ राहोनिया उभा पाहात अंतरीं ॥ यासी मृत्यु करीं कोणाचीया ॥ ६ ॥ वातात्मजा हातीं मरण असे यासी ॥ कळलें देवासी नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १६२४ ॥ गायी गोप तेव्हां लपवोनी क्षणेक ॥ जानकी नायक झाला देव ॥ १ ॥ आकर्ण नयन हातीं धनुष्यबाण ॥ करीतसे ध्यान मारुतीचें ॥ २ ॥ स्वामीचा तो धांवा ऐकोनिया कानीं ॥ हडबडीला मनीं कपींद्र तो ॥ ३ ॥ निघोनी त्वरीत वनामाजीं आला ॥ चरणासी लागला प्रेमभावें ॥ ४ ॥ ह्मणे स्वामी कांहीं सेवकासी आज्ञा ॥ करावी सर्वज्ञा दयानिधी ॥ ५ ॥ देव ह्मणे बारे काय सांगूं फार ॥ पैल तो असूर येत आहे ॥ ६ ॥ तुझ्या हातें आहे तयासी मरण ॥ ह्मणोनी स्मरण केलें तुझें ॥ ७ ॥ तयासी जावोनी मारी त्वां आतां ॥ चरणीं ठेवुनी माथा निघाला तो ॥ ८ ॥ दुर्जनें तेवेळीं मारुती पाहीला ॥ ह्मणे काळ आला कोठोनिया ॥ ९ ॥ धरूनिया नर्डी केला गतप्राण ॥ पुनरपी येऊन वंदीतसे ॥ १० ॥ नामा ह्मणे दोन्ही जोडोनिया कर ॥ बोलिला उत्तर काय आतां ॥ ११ ॥

॥ १६२५ ॥ त्रेतायुगीं ख्याती करोनिया थोर ॥ वधीले असूर रावणादी ॥ १ ॥ कोण्या हेतूस्तव पुन्हा आगमन ॥ सांगा कृपाकरून

दासालागीं ॥ २ ॥ ऐकोनिया वचन बोले सर्वेश्वर ॥ द्वापारीं अवतार आठवा हा ॥ ३ ॥ तुझे हे भेटीस्तव रूप हें धरीलें ॥ दावी तें वहीलें कपी ह्मणे ॥ ४ ॥ कृष्णलीला पाहूं हेत आहे चित्ता ॥ दावी सीताकांता दीनालागीं ॥ ५ ॥ चतुर्भुज रूप दाविलें प्रगट ॥ शिरीं मोरमुगुट शोभतसे ॥ ६ ॥ गुंजाहार गळां वैजयंती माळा ॥ कांसेसी पींवळा पीतांबर ॥ ७ ॥ नवलक्ष गायी गोपही तितुके ॥ खेळती कौतुकें करोनिया ॥ ८ ॥ नामा ह्मणे तेव्हां स्तुति ते करीत ॥ न कळे तुझा अंत ब्रह्मादिका ॥ ९ ॥

॥ १६२६ ॥ द्वापारींची ठेव संपूर्ण पाहून ॥ विनवी जोडून करालागीं ॥ १ ॥ रामरूप धरून मज बोळवावें ॥ तें रूप राहावें हृदयामाजीं ॥ २ ॥ मनोरथ त्याचा ऐकोनी श्रवणीं ॥ झाला चापपाणी तात्कालीक ॥ ३ ॥ पाहोनीया ध्यान करुनी नमन ॥ निघाला तेथून वायुसूत ॥ ४ ॥ घेवोनिया आज्ञा सेतुबंधा गेला ॥ ध्यानस्थ बैसला नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १६२७ ॥ गौळीं ह्मणती हृषीकेशी ॥ दावी आपुल्या स्थळासी ॥ १ ॥ सखा तूंची कृष्णा ॥ आमुची पुरवावी वासना ॥ २ ॥ दावीं वैकुंठ सकळां ॥ क्षणएक पाहूं डोळा ॥ ३ ॥ नामा ह्मणे तेथील रहिवासी ॥ आला स्थापाया भक्तासी ॥ ४ ॥

॥ १६२८ ॥ लोपतां आदित्य पडे चंद्रप्रभा ॥ वृंदावनीं उभा सुशोभित ॥ १ ॥ देहूडा पाउली उभा तयेवेळीं ॥ वेणू वेळोवेळीं वाजवीतो ॥ २ ॥ ऐकतांची नाद गोकुळींच्या नारी ॥ पाहावया हरि निघताती ॥ ३ ॥ भ्रतारसेजेसी टाकुनी उठती ॥ वाढीतां पंगती निघताती ॥ ४ ॥ स्तन देतां बाळें टाकीलीं भूमीसी ॥ मोकळीया केशी निघताती ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐशा गेल्या देवापाशीं ॥ आनंद मानसीं न समाये ॥ ६ ॥

॥ १६२९ ॥ वनामध्यें कांगे आलाती सकळ ॥ विनोदें गोपाळ ह्मणतसे ॥ १ ॥ निशींमाजीं व्याघ्र फिरताती रानीं ॥ जावें सकळांनीं घरां आतां ॥ २ ॥ ऐकोनिया ऐसें कठीण वचन ॥ चालीलें जीवन नेत्रींहूनी ॥ ३ ॥ वेणुनाद दूत धाडिला आह्मांसी ॥ आलीया ह्मणसी जावें आतां ॥ ४ ॥ शहाणा चतुर आहेसी नेटका ॥ वैकुंठनायका विचारावें ॥ ५ ॥ कामाग्नीनें कृष्णा पिडीलों सकळ ॥ मांडीयेला खेळ मन्मथाचा

॥ ६ ॥ एकएक रानीं एकएक कृष्ण ॥ करावया पूर्ण इच्छा त्यांची ॥ ७ ॥ भक्तीसी ऐसा भुलला गोविंद ॥ करीती आनंद नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १६३० ॥ झाला अभिमान धन्य आह्मीं आतां ॥ लक्षुमीच्या कांता भोगीतसों ॥ १ ॥ गुप्त झाला तेव्हां वैकुंठनायक ॥ करीताती शोक सकळीक ॥ २ ॥ निघाल्या तेथूनी फिरताती वनें ॥ यशोदेचें तान्हें धुंडावया ॥ ३ ॥ वृक्ष आदि पक्षी पुसती तयांसी ॥ तुह्मी हृषीकेशी देखीयेला ॥ ४ ॥ मृगासी पुसती देखीयेला डोळा ॥ सांगाना सांवळा कोणीतरी ॥ ५ ॥ आह्मांवरी तुह्मीं काय रे कोपतां ॥ सांगा रे भगवंता पुसतसों ॥ ६ ॥ कुरवंडी करूं सकळांचे प्राण ॥ देऊं त्या भूषण अंगावरील ॥ ७ ॥ नामा ह्मणे जेथें असे अभिमान ॥ तेथें नारायण नाहीं नाहीं ॥ ८ ॥

॥ १६३१ ॥ ऐकावें चरित्र परीक्षितीराया ॥ बरोबरी जाया एक असे ॥ १ ॥ तोडोनिया पुष्पें करी अलंकार ॥ घालीत श्रीधर तिजवरी ॥ २ ॥ नये क्षणएक योगीयांचे ध्यानीं ॥ घालितसे वेणी आवडीनें ॥ ३ ॥ वंदीयेली शीवें चरणींची गंगा ॥ करीतसे भांगा नीट तीच्या ॥ ४ ॥ गोपीकांच्या वेषें प्रगटल्या श्रुती ॥ गुह्य तुजप्रती सांगीतलें ॥ ५ ॥ घेवोनिया तिसी गेला कुंजवना ॥ वज्रांकुश चिन्हा उमटती ॥ ६ ॥ गोपीकांचा मेळा येतसे तांतडी ॥ युगा ऐसी घडी झाली तया ॥ ७ ॥ नलगेची शोध शीणले सकळ ॥ न जाती गोकुळा नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १६३२ ॥ चंद्राच्या प्रभेनें चमकती पाउलें ॥ दुरोनी देखिलें गोपीकांनीं ॥ १ ॥ कृपणाचें धन होतें तें चळलें ॥ तयांसी लाधलें अवचिता ॥ २ ॥ एकीमागें एक धांवताती नारी ॥ आहे येथें हरि ऐसें वाटे ॥ ३ ॥ घेवोनीया रज लाविताती भाळा ॥ पाहाती सकळा न्याहाळुनी ॥ ४ ॥ बरोबरी नारी कोणीतरी असे ॥ पाऊलाचे ठसे उमटले ॥ ५ ॥ पापिणीगे तुह्मी आह्मी सकळीका ॥ पुण्याची अधिका ह्मणुन भोगी ॥ ६ ॥ बरोबरी तीसी होय अभिमान ॥ झालासे स्वाधीन माझ्या देवा ॥ ७ ॥ कडे घेसी तरी येते बरोबरी ॥ चालवेना हरि मज आतां ॥ ८ ॥ जाणोनी अंतर ठकविलें भगवंतें ॥ नामा ह्मणे तेथें रडतसे ॥ ९ ॥

॥ १६३३ ॥ मागोनिया गोपी आल्या तिजपाशीं ॥ कोठें हृषीकेशी सांग आह्मा ॥ १ ॥ टाकोनिया गेला मज पूतनारी ॥ येथेंची मुरारि गुप्त

झाला ॥ २ ॥ वैकुंठनायका अगा नारायणा ॥ दावीरे वदना एक वेळा ॥ ३ ॥ कृष्णाचें चरित्र सकळ करिती ॥ मज रंजवीती नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६३४ ॥ जोडोनिया हात येतों काकूळती ॥ पाव कृपामूर्ती आह्मांलागीं ॥ १ ॥ अवतार घेसी दुष्ट वधायासी ॥ येती गोकुळासी ह्मणोनिया ॥ २ ॥ पाहोनिया तुला लक्षुमी पातली ॥ दारिद्रें पळाली येथोनीया ॥ ३ ॥ सकळांसी सुख द्यावया आलासी ॥ आह्मीं वनवासी दुःखी होतों ॥ ४ ॥ नामा ह्मणे कंठीं धरीयेला प्राण ॥ दाखवी चरण दयानिधी ॥ ५ ॥

॥ १६३५ ॥ सरोवरीं कमळें तैसे तुझे नेत्र ॥ त्याहूनी विचित्र दिसताती ॥ १ ॥ कृपाळू वा ऐके अगा हृषीकेशी ॥ आह्मी तुझ्या दासी मोलावीण ॥ २ ॥ कामरूपदैत्य मारीतो आह्मांसी ॥ भक्तांसी रक्षिसी कीर्ति जगीं ॥ ३ ॥ दीनासी रक्षिसी दुष्टांसी मारीसी ॥ धर्माला स्थापिसी निरंतर ॥ ४ ॥ घेवोनिया शस्त्र मारावें सकळां ॥ आलासे कंटाळा नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १६३६ ॥ सुकुमार सांवळे जैसीं रातोत्पळें ॥ दावी तीं पाउलें कृष्णराया ॥ १ ॥ ध्वजवज्रांकुश पद्म तें शोभलें ॥ दावीं तीं पाउलें कृष्णराया ॥ २ ॥ दमोनिया दुष्टां बाहेर काढीलें ॥ दावीं तीं पाउलें कृष्णराया ॥ ३ ॥ रांगता रांगता विमलार्जुन मोडिले ॥ दावीं तीं पाउलें कृष्णराया ॥ ४ ॥ अघासुरा हृदयीं उभे जी राहिले ॥ दावीं तीं पाउलें कृष्णराया ॥ ५ ॥ नामा ह्मणे ज्यांतें वरुणानें पूजिलें ॥ दावीं तीं पाऊलें कृष्णराया ॥ ६ ॥

॥ १६३७ ॥ सकळांचें तुझ्या हातीं असे सूत्र ॥ यशोदेचा पुत्र न होशील ॥ १ ॥ नंदाचीया ऋणा फेडाया आलासी ॥ कळलें आह्मांसी तुझ्या कृपें ॥ २ ॥ तेहेतीस कोटी देव ब्रह्मा सदाशीव ॥ प्रार्थिताती सर्व तुजलागीं ॥ ३ ॥ यादवकुळटिळका वैकुंठनायका ॥ विधीच्या जनका भेट आतां ॥ ४ ॥ नामा ह्मणे मुख दावी कृष्णनाथा ॥ हरेल ही व्यथा वियोगाची ॥ ५ ॥

॥ १६३८ ॥ शरणांगता तारी भवसिंधु त्वरीत ॥ ठेवावा तो हात शिरावरी ॥ १ ॥ अरण्यांत दुष्ट दैत्यांसी मारीत ॥ ठेवावा तो हात शिरा-

वरी ॥ २ ॥ वेणू पांवा जया हातांत शोभत ॥ ठेवावा तो हात शिरावरी ॥ ३ ॥ घेवोनी शिदोऱ्या गड्यासी वांटीत ॥ ठेवावा तो हात शिरावरी ॥ ४ ॥ रक्षावया व्रजा उचलीला पर्वत ॥ ठेवावा तो हात शिरावरी ॥ ५ ॥ सुवर्णाचीं कडीं भूषणें अमूप ॥ पाहतां निष्पाप नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ १६३९ ॥ अभिमानें घाला घातला आह्मांसी ॥ ह्मणूनी लपलासी देवराया ॥ १ ॥ तुजवांचोनीया जाऊं पाहे प्राण ॥ दाखवी वदन एक वेळा ॥ २ ॥ मुकूट कुंडलें श्रीमूख सांवळें ॥ केशरी लावीलें गंध भाळीं ॥ ३ ॥ पाहोनीया जीवीं होय फार सुख ॥ हरेल ही भूक डोळीयांची ॥ ४ ॥ तुजवांचोनीया आह्मां नाहीं कोणी ॥ तिहीं त्रिभूवनीं नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १६४० ॥ चरणासी शरण तुझीया जे येती ॥ तेची उतरती भवसिंधू ॥ १ ॥ लक्षूमीनें ज्यातें असे आराधीलें ॥ ठेवी तीं पाउलें स्तनावरी ॥ २ ॥ आवडीनें शेषीं मस्तकीं वंदीलें ॥ ठेवी तीं पाउलें स्तनावरी ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐशी करिताती स्तुती ॥ शिंपीयेली क्षिती अश्रुपातें ॥ ४ ॥

॥ १६४१ ॥ आह्मांवरी कां रे धरीयेला राग ॥ काय तुझें सांग आह्मीं केलें ॥ १ ॥ रडतसों आह्मीं मारीतसों हांका ॥ विश्वाच्या जनका नायीकसी ॥ २ ॥ कामाग्नीनें आह्मीं जळतों सकळ ॥ करावें शीतळ अधरामृतें ॥ ३ ॥ नामा ह्मणे देई एक वेळ भेटी ॥ तुजसाठीं कष्टी फार होतों ॥ ४ ॥

॥ १६४२ ॥ वाजवोनी वेणू पसरीलें जाळें ॥ आह्मांसी न कळे कपटीया तूं ॥ १ ॥ दुखवोनी सर्वां टाकीयेलें वनीं ॥ गेलासी वधुनी पारधीया ॥ २ ॥ धरूनिया धीर राहूं एक क्षण ॥ देऊं मग प्राण सकळीक ॥ ३ ॥ सकळांच्या हत्या येती तुजवरी ॥ नामा ह्मणे हरि भेट आतां ॥ ४ ॥

॥ १६४३ ॥ त्रिविधतापें जे होताती संतप्त ॥ शीतळ करीत कथामृतें ॥ १ ॥ अमृतापरीस कथा ते अधीक ॥ सांगतसे ऐक देवराया ॥ २ ॥ स्वर्गीं जे अमृत प्राशन करीती ॥ पुण्य सरल्या येती मृत्युलोकां ॥ ३ ॥ तुझी कथा देत अच्युत पदासी ॥ न विचारीसी मानसीं याती कांहीं

॥ ४ ॥ नाहीं चतुराई बोबडे हे बोल ॥ लिहीत विठ्ठल नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १६४४ ॥ गायी घेवोनीया जासी जेव्हां राना ॥ आमूचिया मना दुःख वाटे ॥ १ ॥ सुकुमार सांवळीं जैसीं रातोत्पळें ॥ साहूनी कोंवळे पाय तूझे ॥ २ ॥ खडे कांटे बहू कठिण तृण मूळें ॥ ठेवीसी पाउलें तयावरी ॥ ३ ॥ पावतोसी क्लेश अगा वासुदेवा ॥ ह्मणोनीया जीवा दुःख वाटे ॥ ४ ॥ सांगतसों आह्मीं नित्य यशोदेसी ॥ धाडूं नको यासी वनामध्यें ॥ ५ ॥ नामा ह्मणे होय सकळांचा उद्धार ॥ ह्मणोनी श्रीधर वना जाय ॥ ६ ॥

॥ १६४५ ॥ तुजवांचोनिया वैकुंठनायका ॥ आह्मांसी घटीका युग होय ॥ १ ॥ अस्तमान होतां येसी तूं गोकुळीं ॥ मुखावरी धूळी गोरजांची ॥ २ ॥ कुरळ हे केंश सुंदर नासिक ॥ पाहोनिया सुख फार होय ॥ ३ ॥ लवती पांपण्यां न सोसती आह्मां ॥ अहिर्निशीं नामा हेंची गाय ॥ ४ ॥

॥ १६४६ ॥ टाकीयेलें आह्मीं पतिबंधूसूतां ॥ आलोंत अच्युता तुजपाशीं ॥ १ ॥ आमुचीही इच्छा करिशील पूर्ण ॥ आहेसी कठीण ठावें नाहीं ॥ २ ॥ घालोनीया कूपीं कापियेला दोरा ॥ साधीयेलें वैरा आपुलीया ॥ ३ ॥ वरोनीया टाकी मोटासा पर्वत ॥ ह्मणती समस्त नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६४७ ॥ तुझे भेटीवीण ॥ जाती सकळांचे प्राण ॥ १ ॥ दया तुझिया मना ॥ कां रे नये नारायणा ॥ २ ॥ बोलवेना आतां ॥ कंठ शोकला अनंता ॥ ३ ॥ ऐसें पाहोनीया ॥ नामा ह्मणे आली दया ॥ ४ ॥

॥ १६४८ ॥ देतसे दर्शन ॥ सकळांसी नारायण ॥ १ ॥ झाला सकळां आनंद ॥ हृदयीं धरीला गोविंद ॥ २ ॥ टाकोनीया आह्मां ॥ कां गेलासी पुरुषोत्तमा ॥ ३ ॥ तुह्मां झाला अभिमान ॥ नामा ह्मणे सांगे खूण ॥ ४ ॥

॥ १६४९ ॥ सकळांची इच्छा करीतसे पूर्ण ॥ भूलला श्रीकृष्ण त्यांच्या भावा ॥ १ ॥ विमानीं बैसोनी सुरवर पाहाती ॥ गंधर्व गाताती सप्तस्वरें ॥ २ ॥ विणे वाजताती मृदंगाचे घोष ॥ वाचे तो उल्हास वर्णवेना ॥ ३ ॥ न जाय चंद्रमा न जाती नक्षत्रें ॥ पाहाती सर्वत्र रासक्रीडा ॥ ४ ॥ जलक्रीडा करी लक्ष्मीचा पती ॥ लाळ घोंटीताती देवस्त्रीया ॥ ५ ॥

धन्य त्या गोपीका धन्य त्यांचें पुण्य ॥ भोगितातीं कृष्ण पूर्णब्रह्म ॥ ६ ॥ नामा ह्मणे होय कामाची ते पूर्ती ॥ नव्हे वीर्यच्यूती गोविंदाची ॥ ७ ॥

॥ १६५० ॥ होतां प्रातःकाळ सांगतसे तया ॥ जावें येथोनिया शीघ्र आतां ॥ १ ॥ क्षणोक्षणा पाहाती देवाजीचें मुख ॥ येती सकळीक गोकुळासी ॥ २ ॥ परीक्षिती ऐके एका कौतुकासी ॥ होत्या त्यांजपाशीं त्याच्या स्त्रीया ॥ ३ ॥ ह्मणोनिया कोणी नाहीं विचारीलें ॥ अंतरीं न कळे दुजीयाला ॥ ४ ॥ यथामती रास वर्णिला देवाचा ॥ संपूर्ण हे वाचा काय करी ॥ ५ ॥ चरित्र श्रवण करील जो कोणी ॥ धन्य तोची प्राणी नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ १६५१ ॥ सरस्वती तीरीं अंबिकेचें स्थान ॥ गोकुळींचे जन जाती तेथें ॥ १ ॥ करोनी पूजन करिती प्रार्थना ॥ नंदाच्या नंदना सुखी राखी ॥ २ ॥ सारितां भोजन लपाला आदित्य ॥ नामा ह्मणे तेथें राहातातीं ॥ ३ ॥

॥ १६५२ ॥ निद्रिस्थ सकळ तये वनीं व्याळ ॥ गिळितसे बळें नंदालागीं ॥ १ ॥ कृष्णा धांव वेगीं गिळीतसे सर्प ॥ काळावरी दर्प तुझा देवा ॥ २ ॥ माझिया पाडसा येई बा धांवोन ॥ दाखवी वदन अंतकाळीं ॥ ३ ॥ आली काय तूज निद्रा रे कान्हया ॥ माझिया तान्हया ऊठ वेगीं ॥ ४ ॥ ऐकोनीया ऐसें पाहाती सकळ ॥ घालीती मूसळ सर्पावरी ॥ ५ ॥ श्रमले सकळ सोडीना नंदाला ॥ पिटी वक्षस्थळा नंदपत्नी ॥ ६ ॥ उठे जगद्गुरु काय झालें माय ॥ लावीतसे पाय तयालागीं ॥ ७ ॥ टाकीयेलें तेव्हां सर्प कलेवर ॥ पुरुष सुंदर निघतसे ॥ ८ ॥ नामा ह्मणे वाचे स्तवी विश्वंभरा ॥ करूनी नमस्कारा जाता झाला ॥ ९ ॥

॥ १६५३ ॥ करीती गायन रामकृष्णहरी ॥ गोकुळींच्या नारी जाती तेथें ॥ १ ॥ शंख नामा तेथें आलासे गुह्यक ॥ नाहीं त्या विवेक पापीयासी ॥ २ ॥ उपजला काम तयाचीया मना ॥ घालोनी विमाना स्त्रिया नेत ॥ ३ ॥ धांव धांव रामा नेतसे हा आह्मां ॥ अगा मेघश्यामा कृष्णनाथा ॥ ४ ॥ नेतो स्त्रीया काय न कळेची देवा ॥ यासी करूं द्यावा अपराध ॥ ५ ॥ हातीं वृक्ष दोघे ऐसें पाहोनीया ॥ टाकोनी तो स्त्रिया पळतसे ॥ ६ ॥ घालीतांची वृक्ष प्राणासी मुकला ॥ मणी त्याचा दिल्हा बळी-

भद्रा ॥ ७ ॥ भक्तांसाठीं मारी दुष्टां जगजेठी ॥ नामा ह्मणे तुटी विसरेना ॥ ८ ॥

॥ १६५४ ॥ गोपिकांचा मेळा आला गृहाप्रती ॥ काय त्या ह्मणती नंदालागीं ॥ १ ॥ परब्रह्म साक्षात् क्षीरसागरवासी ॥ त्या कैसा धाडसी वनामध्यें ॥ २ ॥ ब्रह्मा आणि इंद्र आले गोकुळासी ॥ वर्णिती कृष्णासी तुह्मीं देखा ॥ ३ ॥ तेहेतीस कोटी देव ज्या प्रार्थितातीं ॥ त्यासी अरण्याप्रती रूपती कांटे ॥ ४ ॥ दैत्यांचा हा भार जाहला पृथ्वीसी ॥ वधाया कंसासी आला येथें ॥ ५ ॥ त्याजसाठीं फार श्रमताती योगी ॥ कैलासाचा योगी ध्यान करी ॥ ६ ॥ भ्रांती कांरे तुज पडे वेळोवेळां ॥ पाहातोसी डोळां चरित्रास ॥ ७ ॥ नामया सुकृत झालें असे फार ॥ ह्मणोनी विचार नाठवेची ॥ ८ ॥

॥ १६५५ ॥ वृषभाच्या रूपें आला रिठासूर ॥ इंद्रादि सुरवर भीती जया ॥ १ ॥ बहू देतो त्रास गोकुळींच्या जना ॥ धांवधांव कृष्णा मारी याला ॥ २ ॥ जगजेठी तेव्हां धरीतसे शिंगें ॥ सारीतसे मागें भुजाबळें ॥ ३ ॥ पाडोनिया खालीं दिल्हा पाय वर ॥ मारिला असूर नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६५६ ॥ कंसाचीया घरा आला नारदमूनी ॥ एकांतीं बैसोनी सांगतसे ॥ १ ॥ सातवा जो गर्भ जिराला ह्मणतीं ॥ रोहिणी प्रसवे ती बळीराम ॥ २ ॥ आठवा जो पुत्र देवकीसी झाला ॥ वसुदेवें नेला नंदाघरीं ॥ ३ ॥ यशोदेची कन्या घेऊनिया येत ॥ गेली आकाशांत मारीतां जे ॥ ४ ॥ तुझीया मानसीं अशंका येईल ॥ होते रक्षपाळ माझे तेथें ॥ ५ ॥ ईश्वराची माव न कळे कोणाला ॥ कळलें मजला त्याच्या कृपें ॥ ६ ॥ घेऊनिया शस्त्र उठला त्वरीत ॥ करितों मी घात वसुदेवाचा ॥ ७ ॥ तयेवेळीं ह्मणे ब्रह्मयाचा सूत ॥ एक तुज मात सांगतों मी ॥ ८ ॥ शत्रु वधी आधीं मग मारी यासी ॥ आहे तुजपाशीं कारागृहीं ॥ ९ ॥ सांगोनिया ऐसें शांतविलें त्यासी ॥ गेला गोकुळासी नामा ह्मणे ॥ १० ॥

॥ १६५७ ॥ गोकुळा येवोनी भेटे नंदादिका ॥ वैकुंठनायका सांगतसे ॥ १ ॥ कंसानें मांडीला अधर्म बहुत ॥ मारावें त्वरीत तयालागीं ॥ २ ॥ लावोनिया आग आपण विझविली ॥ तेची परी केली नारदानें ॥ ३ ॥ सांगोनिया ऐसें विणा सांवरोन ॥ निघाला तेथून नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६५८ ॥ माराया कृष्णासी ॥ कंसें पाठविला केशी ॥ १ ॥ बहु असे तो प्रतापी ॥ आला अश्वाचिये रूपीं ॥ २ ॥ देवा डसाया धांवला॥ धरुनी पायीं झुगारिला ॥ ३ ॥ मुखीं देऊनीया हात ॥ श्वास कोंडी जगन्नाथ ॥ ४ ॥ नामा ह्मणे पडलें प्रेत ॥ हर्ष सुरवरां बहुत ॥ ५ ॥

॥ १६५९ ॥ शेळ्या मेंढीयांचा खेळ ॥ आतां खेळूं रे सकळ ॥ १ ॥ कोणी मेंढ्या होती ॥ कोणी चोर ह्मणताती ॥ २ ॥ ह्मणती रात्र झाली ॥ आतां निज वनमाळी ॥ ३ ॥ कोणी श्वान होती ॥ चोरा डसाया धांवती ॥ ४ ॥ तेथें व्योमासुर येत ॥ गोपाळाचा वेष धरित ॥ ५ ॥ करोनिया चोरी ॥ नेऊन ठेवी पर्वतदरी ॥ ६ ॥ हें तो देवासी कळलें ॥ नामा ह्मणे संहारिलें ॥ ७ ॥

॥ १६६० ॥ कंसासुर सारे करोनी विचार ॥ धाडती अक्रूर गोकुळासी ॥ १ ॥ अक्रूरा आनंद झाला असे फार ॥ पाहीन श्रीधर डोळेभरी ॥ २ ॥ आजी होईल माझ्या जन्माचें सार्थक ॥ वैकुंठनायक पाहीन मी ॥ ३ ॥ उजवे जाती काक वाम जाती मृग ॥ पाहीन श्रीरंग स्वामी माझा ॥ ४ ॥ शुभ हे शकून मार्गीं हे होताती ॥ पाहीन भूपती वैकुंठीचा ॥ ५ ॥ येथूनिया माझी सरली येरझार ॥ कंसानें उपकार केला मोठा ॥ ६ ॥ आजी माझे पितर उद्धरती सकळ ॥ पाहीन गोपाळ कृपासिंधु ॥ ७ ॥ नामा ह्मणे आला गोकुळासन्निध ॥ हृदयीं आनंद नसमाये ॥ ८ ॥

॥ १६६१ ॥ चौदाजणें ज्याच्या चरणातें पूजिती ॥ त्याची घेईन माती आपुल्या शिरीं ॥ १ ॥ एकांतीं अर्चन करिती धूर्जटी ॥ त्यांसी बोलेन गोष्टी आवडीनें ॥ २ ॥ सप्तऋषि ज्याचे वर्णिताती गुण ॥ करीतसे ध्यान ब्रह्मा ज्याचें ॥ ३ ॥ चारी वेद ज्याची वर्णिताती कीर्ती ॥ करिताती स्तुति साहीजण ॥ ४ ॥ तेहेतीस कोटी देव जयातें पूजिती ॥ श्रुति वर्णिताती गुण ज्याचे ॥ ५ ॥ लक्षुमीचा पति ध्याती सनकादिक ॥ पाहीन श्रीमुख वेळोवेळां ॥ ६ ॥ पृथ्वीचा हा भार करावया दूर ॥ ह्मणोनी अवतार घेत असे ॥ ७ ॥ नामा ह्मणे आला यमुने जवळी ॥ उतरला खालीं रथाचिया ॥ ८ ॥

॥ १६६२ ॥ धन्य ही यमुना धन्य हें गोकुळ ॥ वृक्षादि सकळ धन्यधन्य ॥ १ ॥ धन्य ह्या गोपिका धन्य हे गोपाळ ॥ यक्षादि सकळ धन्य-

धन्य ॥ २ ॥ धन्य गोवर्धन धन्य वृंदावन ॥ नंदाचा नंदन क्रीडतसे ॥ ३ ॥ धन्य ती यशोदा धन्य तिचा पति ॥ अखंड पाहाती मुख ज्याचें ॥ ४ ॥ गाया घेवोनीया देव गेला राना ॥ ध्वजवज्रांकुश चिन्हां उमटती ॥ ५ ॥ नेत्रीं अश्रुपात उतरे रथाखालीं ॥ गडबडोनी लोळे तयावरी ॥ ६ ॥ ब्रह्मादिकां दुर्लभ येथील ही माती ॥ घेवोनिया हातीं मुखीं घाली ॥ ७ ॥ नामा ह्मणे पुढें चालीला त्वरित ॥ देखे गडीयांत परब्रह्म ॥ ८ ॥

॥ १६६३ ॥ तनु हें आकाश चंद्रमा तें मुख ॥ ऐकें निष्कलंक परीक्षिती ॥ १ ॥ पूर्णिमेचा चंद्र त्याहूनी अधीक ॥ शोभत श्रीमुख कृष्णजीचें ॥ २ ॥ भोंवता हा शोभे नक्षत्रांचा मेळा ॥ खेळत सांवळा जगद्गुरु ॥ ३ ॥ वैजयंती माळा किरीट कुंडलें ॥ अक्रूरें देखिले दोघेजण ॥ ४ ॥ जोडोनिया हात घाली नमस्कार ॥ वाहतसे नीर क्षणोक्षणीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे त्वरें धांवें हृषीकेशी ॥ धरीत पोटाशी अक्रूरातें ॥ ६ ॥

॥ १६६४ ॥ भेट देई मज ह्मणे बळीराम ॥ न वर्णवे प्रेम अक्रूराचें ॥ १ ॥ पेंद्यासी पुसती अवघे गडी तेव्हां ॥ कोणरे हा बावा आला येथें ॥ २ ॥ आपुल्या कान्होबाच्या पायां कां पडतो ॥ काय हा मागतो सांग आह्मां ॥ ३ ॥ अक्रूर बळिराम घरीं आले गोपाळ ॥ नदादि सकळ भेटीयेले ॥ ४ ॥ मधुपर्कविधि करीती पूजन ॥ ह्मणे धन्य दीन आजीचा हा ॥ ५ ॥ अक्रूराबरोबरी करिती भोजन ॥ पुसे वर्तमान मग त्यासी ॥ ६ ॥ भक्त माझें दैवत जगा दावी मात ॥ कृपाळु बहुत नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १६६५ ॥ प्रातःकाळीं मात झाली गोकुळांत ॥ जातो भगवंत मथुरेसी ॥ १ ॥ गौळणींचा मेळा मिळाला सकळ ॥ पिटीती कपाळ आपुले हातें ॥ २ ॥ एकी त्या घालीती केंसामध्यें माती ॥ एक त्या लोळती भूमीवर ॥ ३ ॥ आह्मां सोडूनिया तूं रे कैसा जासी ॥ तुजवीण पीशी आह्मीं सर्व ॥ ४ ॥ कोणी रथापुढें जाउनी पडती ॥ अक्रोशें रडती सकळीक ॥ ५ ॥ अक्रूर नव्हे बाई मोठा असे क्रूर ॥ नामीं निरंतर क्रीया वसे ॥ ६ ॥ अक्रूरा आह्मी सर्व पसरीतों पदर ॥ नेऊं नको श्रीधर मथुरेसी ॥ ७ ॥ नामा ह्मणे शोक न वर्णवे आतां ॥ झाला तो हाकिता रथ त्वरें ॥ ८ ॥

॥ १६६६ ॥ ब्रह्मनिष्ठ तेव्हां स्थिरावला चित्तीं ॥ अक्रूराचे गळती दोन्ही नेत्र ॥ १ ॥ दहींदूधतूपें भरिल्या कावडी ॥ चालती तांतडी सक-

ळीक ॥ २ ॥ चिंतेनें व्यापिलें अक्रूराचें मन ॥ काय वर्तमान होईल नेणें ॥ ३ ॥ नरनारी शोक करिती सकळ ॥ दुराचारी खळ कंस आहे ॥ ४ ॥ मारगीं स्नानासी उतरे अक्रूर ॥ रथावरी किशोर नंदजीचे ॥ ५ ॥ सोडोनिया घोडीं चालिला तांतडी ॥ दिल्ही असे बुडी जळामध्यें ॥ ६ ॥ दावोनी कौतुक निरसी याचा धाक ॥ सांगतसे शुक परीक्षीती ॥ ७ ॥ जुंपोनिया घोडीं चालिला सत्वर ॥ ल्पे दीनकर नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १६६७ ॥ जोडोनिया कर विनवी विश्वंभरा ॥ चलावें मंदिरा सकळिकीं ॥ १ ॥ अनाथाच्या वरा कृपा करा कृष्णनाथा ॥ ठेवीतसे माथा पायांवरी ॥ २ ॥ मारूनिया कंस येईन तुझ्या घरा ॥ आग्रह अक्रूरा करूं नको ॥ ३ ॥ सकळ समुदाय मथुरेचे वनीं ॥ साह्य चक्रपाणी ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ १६६८ ॥ प्रातःकाळीं गडी उठे कृष्णराम ॥ पाहावया ग्राम चालीयेले ॥ १ ॥ मागती रजका देईना तो वस्त्रें ॥ वधी नख शस्त्रें पापीयासी ॥ २ ॥ ती ठायीं वांकडी नीट केली तीसी ॥ तीनें चंदनासी लावीयेले ॥ ३ ॥ जोडोनीया हात विनवी सुदामा ॥ चला मेघःश्यामा घरा माझ्या ॥ ४ ॥ वस्त्रें देती तेव्हां मथुरेचे लोक ॥ नरनारी मुख पाहाताती ॥ ५ ॥ मोडितां धनुष्य येती रक्षपाळ ॥ नामा ह्मणे खळ वधीयेले ॥ ६ ॥

॥ १६६९ ॥ इच्छामात्रें मोडी ब्रह्मांडाच्या कोटी ॥ चालिला जगजेठी कंसद्वारा ॥ १ ॥ मदोन्मत्त हस्ती देखोनीया हांसे ॥ पीतांबर कांसे खोंवीयेला ॥ २ ॥ सांवरोनी हातें केंसा देत गांठ ॥ खोंवीतसे नीट वैजयंती ॥ ३ ॥ खंब ठोकोनिया राहे पुढें उभा ॥ सांवळी सुप्रभा अंगकांती ॥ ४ ॥ पाहोनीया शूक झाला समाधिस्थ ॥ ऋषिमुनी समस्त वेडावले ॥ ५ ॥ दुष्ट पाही हत्ती घाली आंगावरी ॥ क्षणार्धेंची मारी गजालागीं ॥ ६ ॥ उपडोनिया दांत घेतसे श्रीधर ॥ जाहाला उद्धार कुवलयाचा ॥ ७ ॥ नामा ह्मणे पुढें चालिला गोविंद ॥ सावध सावध परीक्षिती ॥ ८ ॥

॥ १६७० ॥ चवदा भूवनें वसे ज्याचे पोटीं ॥ त्यासी आणी जेठी मारावया ॥ १ ॥ इंद्रादि सुरवर जयाचे किंकर ॥ त्यासी आणी पामर

झोंबीसाठीं ॥ २ ॥ अतुर्बळी तेव्हां दिसे नारायण ॥ जळताती मनें वैरियांचीं ॥ ३ ॥ कंसाचे अंगणीं उभा असे देव ॥ जैसा ज्याचा भाव तैसा भासे ॥ ४ ॥ कृष्णातें देखोनी वल्गना करिती ॥ चोळिताती माती दंडालागीं ॥ ५ ॥ बळिभद्रासी खूण दावियेली तेव्हां ॥ उशीर न लावा मारायासी ॥ ६ ॥ नामा ह्मणे एक उरला असे कंस ॥ वधती सकळांस दोघेजण ॥ ७ ॥

॥ १६७१ ॥ रमेच्या वल्लभें देखियेलें कंसा ॥ धरोनी आवेशा बैसलासे ॥ १ ॥ त्वरें जाऊनिया धरीयेला केंशीं ॥ पाडीयेला भूमिसी दुष्टबुद्धी ॥ २ ॥ वज्रप्राय मुष्टी वोपी नारायण ॥ सांडीयेला प्राण कंसें तेव्हां ॥ ३ ॥ देव वर्षताती सुमनाचे भार ॥ भक्त जयजयकार गर्जताती ॥ ४ ॥ गान्हाणीं सांगती ऋषिमुनी सर्व ॥ गाताती गंधर्व सप्तस्वरें ॥ ५ ॥ नामा ह्मणे पुढें अप्सरा नाचती ॥ वर्णिताती कीर्ति कृष्णजीची ॥ ६ ॥

॥ १६७२ ॥ राज्यीं स्थापियेला उग्रसेन तेव्हां ॥ देवकी वसुदेवा सोडवीलें ॥ १ ॥ देवकीच्या स्तनीं फुटलासे पान्हा ॥ वसुदेव दर्शना करीतसे ॥ २ ॥ वासुदेवें केलें त्याचें समाधान ॥ गायी दिल्या दान ब्राह्मणांसी ॥ ३ ॥ समस्तांची क्रिया करी उग्रसेन ॥ झालासे दिवाण देव त्याचा ॥ ४ ॥ पळोनिया गेले होते जे यादव ॥ आणियेले सर्व रामकृष्णें ॥ ५ ॥ आनंद न माये सकळ लोकांला ॥ मथुरेंत राहीला नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ १६७३ ॥ नंदालागीं तेव्हां ह्मणे चक्रपाणी ॥ जावें तुह्मीं सकळांनीं गोकुळासी ॥ १ ॥ अहर्निशीं माझें करावें चिंतना ॥ दुःख सांडी मना नंदराया ॥ २ ॥ ऐसें ऐकोनिया निराश वचन ॥ जाईल माझा प्राण तुजवीण ॥ ३ ॥ गडी ह्मणती देवा आह्मांसी टाकीलें ॥ काय आमुचें सरलें पुण्य देवा ॥ ४ ॥ कोणासवें आह्मी खेळूं यमूनेंत ॥ रक्षील आह्मांतें कोण आतां ॥ ५ ॥ ब्रह्मादिक तुझ्या वंदिताती पायां ॥ दिल्या आह्मी शिव्या क्षमा करी ॥ ६ ॥ यशोदेशी सांगा माझा नमस्कार ॥ देईन सत्वर भेटी सर्वां ॥ ७ ॥ कंठ सद्गदीत नेत्रीं अश्रुपात ॥ निघती समस्त नामा ह्मणे ॥ ८ ॥

॥ १६७४ ॥ चारी वेदा ज्याचा नयेची उमज ॥ करीतसे मुंज वसुदेव ॥ १ ॥ कर्दळीचे स्तंभें वाडे शृंगारिले ॥ गर्गासी धाडीलें आणा-

वया ॥ २ ॥ देशोदेशीं चिठ्या लिहिल्या वसुदेवें ॥ मुंजीसाठीं यावें कृष्णजीच्या ॥ ३ ॥ मथुरेचे लोक आणिती आहेर ॥ होतसे गजर वाजंत्रांचा ॥ ४ ॥ उग्रसेनें तेव्हां फोडीलें भांडार ॥ द्विजांसी अपार द्रव्य दिल्हें ॥ ५ ॥ विष्णुदास नामा वांटीतो सुपारी ॥ झाले ब्रह्मचारी रामकृष्ण ॥ ६ ॥

॥ १६७५ ॥ घालीतसे पंथ तरावया जना ॥ गेले संदीपना घरीं दोघे ॥ १ ॥ गुरुसेवा करिती वंदिती चरणा ॥ जाहली संपूर्ण विद्या तेव्हां ॥ २ ॥ जोडोनीया हात करिती प्रार्थना ॥ मागावी दक्षणा गुरुराया ॥ ३ ॥ नामा ह्मणे द्विज ह्मणत स्त्रीयेसी ॥ असे जें मानसीं इच्छा तुझ्या ॥ ४ ॥

॥ १६७६ ॥ समुद्रांत पुत्र बुडाला रे माझा ॥ पराक्रम तुझा ठावा असे ॥ १ ॥ अवश्य ह्मणोनी तेथोनी निघाले ॥ समुद्रांत आले रामकृष्ण ॥ २ ॥ करोनिया पूजा पुसे वर्तमान ॥ देई रे आणून गुरुपुत्र ॥ ३ ॥ पांचजन्य दैत्य येथें बळी राहे ॥ बंधु तेथें पाहे कृष्णनाथा ॥ ४ ॥ टाकोनीया उडी वधीलें तयासी ॥ पाहे हृषीकेशी उदरांत ॥ ५ ॥ नाहीं ऐसें कळों आलें तें ईश्वरा ॥ घेवोनी शरीरा आला वरी ॥ ६ ॥ परीक्षिती काय न कळे तयाला ॥ दावीतसे लीला नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १६७७ ॥ यमाचीया घरीं दोघेजण गेले ॥ शंखातें स्फुरीलें कृष्णनाथें ॥ १ ॥ ऐकोनीया नाद कांपतसे काळ ॥ उठीले सकळ पाहावया ॥ २ ॥ जोडोनीया हात आणी अधोक्षजा ॥ करोनिया पूजा पुसतसे ॥ ३ ॥ संदीपनपत्र आहे तुजपाशीं ॥ आणी रे तयासी शीघ्र आतां ॥ ४ ॥ तुमचा मी किंकर निरोप हो द्यावा ॥ रामा वासुदेवा पुसतसे ॥ ५ ॥ घेवोनीया पुत्र तेथोनी चालीले ॥ नामा ह्मणे आले गुरुगृहीं ॥ ६ ॥

॥ १६७८ ॥ काढीतसे दृष्टी संदीपनपत्नी ॥ न वर्णवे वाणी हर्ष तीचा ॥ १ ॥ असे कांहीं इच्छा मागावें आणीक ॥ दिल्हें हें बाळक ह्मणती दोघे ॥ २ ॥ अहर्निशीं तुह्मां असावें कल्याण ॥ आले रामकृष्ण मथुरेसी ॥ ३ ॥ कृतांतासी धाक नामा ह्मणे त्याचा ॥ आहें मी तयाचा शरणांगत ॥ ४ ॥

॥ १६७९ ॥ युगाबरोबरी जाताती घटिका ॥ गोकुळींच्या लोकां तैसें झालें ॥ १ ॥ उदास दिसती वनें दाही दिशा ॥ काय रे जगदीशा आह्मां केलें ॥ २ ॥ वेडावल्या गायी करिताती खंती ॥ वत्स न करिती स्तनपान ॥ ३ ॥ अन्नपाणी तेव्हां वर्जिती गौळणी ॥ आतां चक्रपाणी कैंचा आह्मां ॥ ४ ॥ यमुनेचे तीरीं वृक्ष ते सुकले ॥ पाषाण उरले तया दुःखें ॥ ५ ॥ प्रातःकाळीं गडी अवघेचि बोलती ॥ मारूनी श्रीपति गेला नाहीं ॥ ६ ॥ जीवनावीण मत्स्य जैसे तळमळती ॥ नामा ह्मणे चित्तीं धन्य प्रेमा ॥ ७ ॥

॥ १६८० ॥ अंतरयामीं जाणे सर्वांचा जो साक्षी ॥ रडताती पक्षी मजसाठीं ॥ १ ॥ पाहूनियां प्रेमा भुलला गोविंद ॥ रडतसे मंदमंद कृष्ण तेव्हां ॥ २ ॥ उच्चारितां नामें तरताती पापी ॥ न विसरती गोपी कांहीं केल्या ॥ ३ ॥ विश्वाचा जो आत्मा शोक तया नाहीं ॥ भुललासे तोही भक्तीप्रेमें ॥ ४ ॥ चिंतेनें व्यापीला तेव्हां ऋषिकेशी ॥ पाठवूं कोणासी गोकुळांत ॥ ५ ॥ तयेवेळीं पुढें देखीलें उद्धवा ॥ बाहातसे तेव्हां तया लागीं ॥ ६ ॥ नामा ह्मणे आतां करील एकांत ॥ सावधान चित्त अवधारा ॥ ७ ॥

॥ १६८१ ॥ शुकादिक ज्याची वर्णिताती कीर्ति ॥ तो ये काकुळती उद्धवासीं ॥ १ ॥ दयेचा सागर बोले तयेवेळा ॥ मजसाठीं गोकुळा तुवां जावें ॥ २ ॥ मजवरी त्यांनीं ठेवियेला प्राण ॥ संसाराचें भान नाहीं कोणा ॥ ३ ॥ यशोदा आणि नंद झालेती तटस्थ ॥ गडी माझे समस्त पिसे झाले ॥ ४ ॥ गाई मजवीण न घेती तृण ॥ बाळे स्तनपान विसरलीं ॥ ५ ॥ चालतांना पंथ चुकती नारीनर ॥ पक्ष्यांनीं आहार सांडीयेला ॥ ६ ॥ शाहाणा चतूर आहेशी नेटका ॥ बोधाव्या गोपिका ब्रह्मज्ञानें ॥ ७ ॥ नामा ह्मणे ठेवी चरणावरी माथा ॥ जुंपूनियां रथा निघतसे ॥ ८ ॥

॥ १६८२ ॥ सारथ्यासीं सांगे हांकी हा रथवर ॥ पाहीयेलें तीर यमुनेचें ॥ १ ॥ उभा राहोनीयां पाहे चहूंकडे ॥ बोलताती कोडें पक्षीराज ॥ २ ॥ व्याघ्र आणि गायी एकत्र बैसती ॥ कोकिळा बोलती कृष्ण कृष्ण ॥ ३ ॥ मुगुस आणि नाग निस्तेज पडती ॥ चिमण्या बोलती कृष्ण कृष्ण ॥ ४ ॥ वियोगानें तेव्हां मयूरें रडती ॥ शुक बोलताती कृष्ण कृष्ण ॥ ५ ॥ कृष्णाच्या कृपेनें कळलें उद्धवासीं ॥ धन्य धन्य

सासीं ह्मणे तेव्हां ॥ ६ ॥ ब्रह्मज्ञान सांगों देवें पाठविला ॥ तो रडूं लागला तयेवेळीं ॥ ७ ॥ नामा ह्मणे आला नंदाचिया घरा ॥ पुढले अवधारा निरोपण ॥ ८ ॥

॥ १६८३ ॥ धांवोनियां नंदें धरीले चरण ॥ घालूनि आसन बैसवीला ॥ १ ॥ सकुमार सांवळा राजीवलोचन ॥ सुखी आहे कृष्ण मथुरेंत ॥ २ ॥ रोहिणीचा पुत्र सुखी आहे राम ॥ स्मरे पुरुषोत्तम कधीं आह्मां ॥ ३ ॥ गोकुळांत गौळी आहे एक नंद ॥ आठवी गोविंद कधीं तरी ॥ ४ ॥ काय माझें पुण्य उद्धवा सरलें ॥ ह्मणोनी टाकीलें कृष्णनाथें ॥ ५ ॥ परब्रह्म पूर्ण धाडी मी वनासी ॥ ह्मणोनी हृषिकेशी कोपलासे ॥ ६ ॥ मेघःशाम मूर्ति सकुमार पाऊलें ॥ न देखती डोळे आतां माझे ॥ ७ ॥ ऊठ नंदा जेऊं कोण ह्मणे आतां ॥ दुःख माझ्या चित्ता फार वाटे ॥ ८ ॥ नेत्रीं अश्रुधारा कंठ सद्गदीत ॥ पडीला मूर्च्छित नामा ह्मणे ॥ ९ ॥

॥ १६८४ ॥ पडीयेली जेव्हां यशोदेसीं भ्रांती ॥ ऐके परीक्षीती प्रेम तीचें ॥ १ ॥ खोडी नको करूं ह्मणे दटावीलें ॥ ह्मणोनी रुसलें तान्हें माझें ॥ २ ॥ नंदासी ह्मणत पाहूं कोठें कृष्णा ॥ दाटलासे पान्हा स्तनीं माझ्या ॥ ३ ॥ उद्धव चित्तांत करीतसे खेद ॥ यशोदे सावध होई माते ॥ ४ ॥ निर्दय पापीण बांधी मी उखळासी ॥ ह्मणोनी रुसलासी देवराया ॥ ५ ॥ माती खातां वेळे तुज मी मारीलें ॥ ह्मणोनी टाकीलें मजलागी ॥ ६ ॥ नामा ह्मणे त्यांचें करी समाधान ॥ सांगे ब्रह्मज्ञान दोघांजणा ॥ ७ ॥

॥ १६८५ ॥ प्रातःकाळीं उद्धव स्नानासी चालीला ॥ मिळालासे मेळा गोपीकांचा ॥ १ ॥ परस्परें ह्मणती कोण आतां आला ॥ न्यावया नंदाला पाठवीलें ॥ २ ॥ सकळांच्या प्राणा घेऊनिया येई ॥ ह्मणोनियां पाही धाडी यासी ॥ ३ ॥ भ्रमरासी स्त्रीया कुशब्दे ताडिती ॥ आवडीनें बोलती नाना शब्द ॥ ४ ॥ धावून उद्धवाचे धरीती चरण ॥ आमुचें स्मरण करीतसे ॥ ५ ॥ स्वरूप हीन आह्मी सुंदर कंसदासी ॥ ह्मणोनी तुजसी पुसतसो ॥ ६ ॥ आह्मासाठीं तेथें जाऊनियां ह्मणे ॥ एकदां चरण दावी सर्वां ॥ ७ ॥ मेल्या त्या गोपिका त्यांची राख झाली ॥ वाजवी

मुरली तया जागा ॥ ८ ॥ नामा ह्मणे त्यांसी सांगे ब्रह्मज्ञान ॥ श्रीकृष्ण कृपेनें स्थिरावल्या ॥ ९ ॥

॥ १६८६ ॥ समस्तांचें त्यानें केलें समाधान ॥ सारिलें भोजन सकळिकीं ॥ १ ॥ यशोदा आणि नंद देती अलंकार ॥ कृपा दीनावर असों द्यावी ॥ २ ॥ गोपाळ गौळणी पुसत उद्धव ॥ मिळोनिया सर्व बोळवीती ॥ ३ ॥ पक्षी श्वापदांसी सांगत उद्धव ॥ असों द्यावा भाव कृष्णापायीं ॥ ४ ॥ आला मथुरेसी सांगे वर्तमान ॥ नामा ह्मणे धन्य श्रोते वक्ते ॥ ५ ॥

॥ १६८७ ॥ अक्रुराच्या घरा आले रामकृष्ण ॥ संतोषलें मन फार त्याचें ॥ १ ॥ घालोनी आसन प्रक्षाळी चरण ॥ ह्मणे धन्य दीन आजीचा हा ॥ २ ॥ जोडोनिया हात घाली नमस्कार ॥ जाहला उद्धार पूर्वजांचा ॥ ३ ॥ हस्तनापुरासी अक्रुरा त्वां जावें ॥ सांगितलें देवें नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६८८ ॥ अवश्य ह्मणोनी चालिला अक्रुर ॥ पाहीयेलें पूर कौरवांचें ॥ १ ॥ धृतराष्ट्रा सांगे विवेकाच्या गोष्टी ॥ फार तुझ्या पोटीं दुष्टबुद्धी ॥ २ ॥ बंधूचिया पुत्रा धरीतोसी दूर ॥ होसी लोभापर पुत्रावरी ॥ ३ ॥ करीतोसी द्वेष पंडूच्या पुत्रांचा ॥ होशील नरकाचा अधिकारी ॥ ४ ॥ स्वर्गींचे पूर्वज हांसतील तुज ॥ धरावा उमज येथोनीया ॥ ५ ॥ सांगोनिया ऐसें येथूनी उठला ॥ कुंतीसी भेटला नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ १६८९ ॥ देवकी रोहीणी बळीराम वसुदेव ॥ सुखेंसुखीं सर्व आहेत कीं ॥ १ ॥ पाहोनी तुज झालें समाधान ॥ सुखीं आहे कृष्ण मथुरेंत ॥ २ ॥ आमूची एक कुंती आहे हस्तनापुरीं ॥ स्मरे तो अंतरीं किंवा नाहीं ॥ ३ ॥ बहुता दिवसा तुज धाडिलें अक्रुरा ॥ ह्मणोनी अंतरा सुख वाटे ॥ ४ ॥ माझीया बाळासी फार देती दुःख ॥ नाहीं मज सुख क्षणभरी ॥ ५ ॥ राजा पंडु आह्मां टाकुनीया गेला ॥ रक्षी बाळकाला कोण आतां ॥ ६ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगतसे कुंती ॥ शिंपीयेली क्षिती आश्रुपातें ॥ ७ ॥

॥ १६९० ॥ निरोप हा माझा सांग रे कृष्णाला ॥ भरंवसा मजला आहे तुझा ॥ १ ॥ अच्युता अनंता श्रीधरा वामना ॥ अगा नारायणा शरण तुज ॥ २ ॥ जनार्दन हरि त्रिविक्रम केशवा ॥ अगा वासुदेवा शरण तुज ॥ ३ ॥ गोविंदा माधवा अगा मेघःशामा ॥ अगा पुरुषोत्तमा

शरण तुज ॥ ४ ॥ चक्रपाणी अगा वैकुंठनायका ॥ रक्षी या बाळका दासा तुझ्या ॥ ५ ॥ त्रिविधतापें माझी जळतसे काया ॥ दावी मज पायां एक वेळा ॥ ६ ॥ विदुर अक्रुर करिती समाधान ॥ करावें श्रवण नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ १६९१ ॥ परब्रह्मपूर्ण तुझा आहे सखा ॥ मानिसी कां दुःखा जननीये ॥ १ ॥ इंद्राचा अवतार आहे हा अर्जुन ॥ घेईल हा प्राण कौरवांचा ॥ २ ॥ करील गे युद्ध धरोनिया धीर ॥ न देखे मी वीर त्रैलोक्यांत ॥ ३ ॥ सांगूनिया ऐसें पुसोनी सर्वांसी ॥ आला मथुरेसी नामा ह्मणे ॥ ४ ॥

---

## कृष्णलीला.

---

॥ १६९२ ॥ अवतरले हरि नंदाचे मंदिरीं ॥ जाणोनिया शुरीं तोषिजेत ॥ १ ॥ आतां गेली सर्व आमची स्वचिंता ॥ भूभार सर्वथा उतरील ॥ ध्रु० ॥ यज्ञ दान तप होतील अपार ॥ आमुचा आहार आह्मांलागीं दुष्ट दुराचारी मातले राक्षस ॥ यांचा करिल नाश क्षणामाजीं ॥ २ ॥ नीति न्यायधर्म वाढेल अपार ॥ भावीकासी पार उतरील ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐशा आनंदानें सुर ॥ वर्षताती भार सुमनाचे ॥ ४ ॥

॥ १६९३ ॥ वाढों लागे हरि नंदाचे मंदिरीं ॥ नाना क्रीडा करी नित्य नवी ॥ १ ॥ देखोनिया चोज भुलल्या नरनारी ॥ देहभावें वरी वोंवाळीती ॥ ध्रु० ॥ सांवळें गोजिरें दिसे नेत्रालागीं ॥ ह्मणोनी वोसंगी सदां घेती ॥ २ ॥ नाचे उडे बोले मंजुळ बोबडे ॥ तेणें वेदां पडे मौन्य सदां ॥ ३ ॥ नित्य नवी लीळा दाखवी अपार ॥ मन तेथें स्थिर लांचावलें ॥ ४ ॥ नामा ह्मणे गोप त्यासंगें रतले ॥ प्रेमानें मातले एकसरें ॥ ५ ॥

॥ १६९४ ॥ देव सांगे तुह्मीं सामोग्री हे करा ॥ सांगेन प्रकारा जाणोनीया ॥ १ ॥ तेणें सर्व काज साधेल तुमचें ॥ ठेवीलें ठायींचे ठायीं पडे ॥ ध्रु० ॥ घ्यारे आतां बरी मृत्तिका गाळुनी ॥ सराटे वेंचुनी वोंटी भरा ॥ २ ॥ जा जा एक आणा वेंचुनीया खडे ॥ निघावें रोकडे एकसरा ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें ऐकतां गोपाळ ॥ नाचती सकळ कृष्णापुढें ॥ ४ ॥

॥ १६९५ ॥ पहुडा पहुडा जी कान्हा कमलदळलोचना ॥ श्रमलेती शयना करा वेगीं ॥ १ ॥ पहुडावें आतां दीनानाथा ॥ सुखशयना करावें जी ॥ ध्रु० ॥ लक्ष्मीसहित देवा निद्रा करावी ॥ राधीकेसहित देवा निद्रा करावी ॥ २ ॥ जाइजुई शेवती मोगरा मालती ॥ कोमाइल्या पुष्पजाती जी ॥ ३ ॥ ब्रह्मादिक उभे सनकादिक उभे ॥ आज्ञा द्यावी त्यांसी जावयासी ॥ ४ ॥ गोपाळ गेले निजमंदिरा गोविंद गेले निजमंदिरा ॥ सेवा गाणवितो नामया जी ॥ ५ ॥

॥ १६९६ ॥ दोंदील दोंदील टमकत चाले ॥ गोजिरीं पाउलें घालोनीया ॥ १ ॥ पायीं रुणझुण रुणझुणीती वाळे ॥ गोपी पाहतां डोळे मन नीवे ॥ २ ॥ सांवळे सगुण मानसमोहन ॥ गोपीमनरंजन ह्मणे नामा ॥ ३ ॥

॥ १६९७ ॥ एकेकाळीं मोठा आनंद दाटला ॥ नभीं उगवला पूर्ण चंद्र ॥ १ ॥ तेव्हां गोपाळें विनविती गोपाळा ॥ आतां जाऊं चला चोरीलागीं ॥ धृ० ॥ कोठें काय असें आह्मां ठाउकें ॥ जाऊं एकमेकें मिळोनिया ॥ २ ॥ तुझिये संगती वाटतसे आनंद ॥ दाविसी विनोद ब्रह्मादिका ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें गोपाळ बोलिले ॥ ऐकोनिया झालें देवा गोड ॥ ४ ॥

॥ १६९८ ॥ कृष्णाप्रती गोपाळ ॥ ह्मणताती सकळ ॥ न कळसी अकळ ॥ अततत ॥ १ ॥ कान्होबाची संगती ॥ ब्रह्मादिक इच्छिती ॥ धन्य आह्मां ह्मणती ॥ अललल ॥ धृ० ॥ अजगर मारीला ॥ वणवा गिळीला ॥ गिरी थोर उचलिला ॥ अबबब ॥ २ ॥ केशियासी भंगिले दैत्यकुळ मारीयेलें ॥ दोन्हीं वृक्ष उन्मळीले ॥ अममम ॥ ३ ॥ मामा मारूं गेलासी ॥ उपटिलें गजदंतासी ॥ मल्लयुद्धें खेळसी ॥ हुतुतुतु ॥ ४ ॥ सद्गुरुकृपें आपण ॥ वस्तु झाला परिपूर्ण ॥ जना होई सावधान ॥ अरेरेरे ॥ ५ ॥ सद्गुरु बोले निवाडे ॥ कृष्णा करुनि पवाडे ॥ वर्णिताती तुझे वाडेकोडे ॥ नामा ह्मणे आहाहा ॥ ६ ॥

॥ १६९९ ॥ गड्यानो राजा कीरे झाला ॥ कृष्ण सिंव्हासनी बैसला ॥ ध्रु० ॥ पांवा मोहरी घोंगडी ॥ आह्मीं खेळु यमुने थडी ॥ नाचों पाउला देहुडी ॥ कृष्ण आमुचा किरे गडी ॥ १ ॥ खेळुं हुतुतु हुंबरी ॥ थडक हाणो टीरीवरी ॥ आतां चालीला दळभारी ॥ आमचे यशोदेचा हरी ॥ २ ॥ कुस्ती खेळता कासाविसी ॥ शेंबुड खरकटें नाकासी ॥ कडे घेऊं साव-

कासी ॥ आतां बहु भितो यासी ॥ ३ ॥ आह्मी तुह्मी सर्वे जाऊं ॥ गाई वळावया जाऊं ॥ त्याचे मानेंत बुक्या देऊं ॥ जवळी जावयासी भेऊं ॥ ४ ॥ नामा ह्मणे चला जाऊं ॥ हात जोडोनी उभे राहूं ॥ पाया पडून मागून घेऊं ॥ जनींवनीं तोचि कृष्णजी ध्याऊं ॥ ५ ॥

॥ १७०० ॥ हातीं घेरोनिया काठी ॥ शिकविते श्रीपति ॥ यमुनेची माती ॥ खासी कां कां कां कां ॥ १ ॥ तूं खोडी नको करूं माझ्या बा बा बा बा ॥ ध्रु० ॥ धरिला यमुनेचे तिरीं ॥ बैसविला मांडीवरी ॥ मुख पसरोनि करी आ आ आ आ ॥ २ ॥ विष्णुदास नामा ह्मणे ॥ मरोनियां जन्मा येणें ॥ कृष्ण सनातन ॥ पाहूं या या या या ॥ ३ ॥

॥ १७०१ ॥ कृष्णातें चैतन्य गौळिया गोपाळा ॥ जिवींचा जिव्हाळा कृष्ण एक ॥ १ ॥ न गमेचि तया कृष्ण संगाविणे ॥ कृष्णीं चरणीं मन सर्वकाळ ॥ २ ॥ कृष्ण सुख जिवीं कोंदलें सर्वांसी ॥ उभे कृष्णपाशी मागेंपुढें ॥ ३ ॥ नामा ह्मणे कृष्ण भक्तांचें जीवन ॥ कृष्णीं समाधान भक्तालागीं ॥ ४ ॥

॥ १७०२ ॥ मोर पिसा कुंचे ढळताती अपार ॥ येताती कुमर यशोदेचे ॥ १ ॥ शिंगें पावे मोहऱ्या वाजती कुसरी ॥ हुंबर आखरी गगन गर्जे ॥ २ ॥ मोतियांचे घोंस चांदवे झळकती ॥ कनक दंड ढाळिती रामकृष्ण ॥ ३ ॥ गौरज डौरळा पीतांबर भिनला ॥ स्वेद जो दाटला मुखकमळीं ॥ ४ ॥ रुळती वनमाळा कंठीं गुंजाहार ॥ तरू घोंस अपार खोंविले शिरीं ॥ ५ ॥ गजगती पाऊलें ठेविती भुमीवरी ॥ धन्य ते संसारीं डोळ देती ॥ ६ ॥ कुंकुम केशर रंगलें रातोत्पळ ॥ ध्वज वज्रांकुश कमळ ऊर्ध्व रेखा ॥ ७ ॥ विमानें आकाशीं झाली पैं सकमळ ॥ धन्य तें गोकुळ ह्मणती देवा ॥ ८ ॥ देव पुष्पवृष्टि करिती कृष्णावरी ॥ अंबर जयजयकारीं गर्जतसे ॥ ९ ॥ माडिया गोपुरीं पाहती सुंदरी ॥ यशोदेच्या करीं लिंबलोण ॥ १० ॥ ओंवाळिला शिप्या नाम्याचा दातार ॥ रखुमादेवीवर श्रीविठ्ठला ॥ ११ ॥

॥ १७०३ ॥ आणा उचित उचित ॥ भाणा भात आईतें ॥ १ ॥ भात सारा भात सारा ॥ हरिहरस्मरणीं ॥ २ ॥ गाई गोपाळापें हरी ॥ आणा तरी शिदोऱ्या ॥ ३ ॥ नामा ह्मणे काळ मिसें ॥ श्री निवास स्मरावा ॥ ४ ॥

॥ १७०४ ॥ लांचावलें ब्रह्म भक्तीचे न सुखें ॥ गोकुळीं गोपाळवेशें गाई राखे ॥ १ ॥ त्रिभुवनीं नसमाये ब्रह्मादिका लक्षा नये ॥ तो दास्यत्व करिताहे गौळीयांचें ॥ २ ॥ नवलाव गे माये देखीयला ॥ तें सुख काय सांगो तुला ॥ कैसें गोवळेपणाची बुंथी घेऊनियां साजिरा ॥ परब्रह्म जालेंसे पिसें गे माये ॥ ३ ॥ निगमा निर्धारितां दुसरी अमरा दर्शनाची आस ॥ मुनिजनां ध्यानीं आभास तोही नाहीं ॥ ४ ॥ तें हें नित्य पूर्ण लाडें कोडें खेळविती गौळणी ॥ मा मुख चुंबन देऊनी गौळिणी हृदईं आळंगिती ॥ ५ ॥ क्षीरसागरीचें सुख सांडुनी अशेष ॥ रुक्मिणीं सेजेचें विलास तेही नावडती ॥ ६ ॥ तें हें गोधना गोठणीं लोळे शुद्ध चैतन्य सावळें ॥ तें सुखही नकळे साचे चतुरानना ॥ ७ ॥ भक्ती प्रेम भाव देखे आहे जेथें ॥ हरि वोरसला जाये तेथें कैचे नैश्वरत्व ॥ ८ ॥ न विचारी जातीकुळ शुची अथवा चांडाळ ॥ हृदय देखुनी निर्मळ प्रीति धरी तेथें ॥ ९ ॥ ऐसें त्रिभुवन सुखाचें सार कीं अनाथाचें माहेर ॥ अव्यक्त परि साकार जालें असें तें ॥ १० ॥ भक्ताचेनी वियोगें श्रमलें ह्मणोनी गोकुळासी आलें ॥ तेणें प्रेम सुख दिधलें नामयासी ॥ ११ ॥

॥ १७०५ ॥ गोपाळासी खेळत ब्रह्मानंदीं डुल्लत ॥ धन्य आह्मा ह्मणत आबाबाबाबा ॥ १ ॥ कान्होबाची संगाती ब्रह्मादिक वांच्छिती ॥ कृष्ण आमुचा सांगाती डोडोडोडो ॥ २ ॥ गवळयांच्या घरा जासी दहीं दुध लोणी खाशी ॥ त्यांच्या सुनासंगें जासी छी छी छी छी ॥ ३ ॥ कंसास मारिसी गजेंद्रासी उद्धरिसी ॥ मल्लयुध्यें खेळसी हुतुतुतु ॥ ४ ॥ अजगर मारिला दावाग्नि गीळिला ॥ गोवर्धन उचलिला आबाबाबाबा ॥ ५ ॥ आजामेळा उद्धरिलें गणिकेसी तारिलें ॥ नारदासी ठकविलें कुलुलुलु ॥ ६ ॥ ऐसे तुझे पवाडे वर्णितां निवाडे ॥ विष्णुदास नामा वेडें आयोयोयोयो ॥ ७ ॥

॥ १७०६ ॥ हुंबरीच्या मिषें हुतुतु खेळती ॥ गड्यांसी श्रीपति सर्वकाळ ॥ १ ॥ कळंबाचे खालीं कुंकुमाचे सडे ॥ गोपाळा पवाडे दावीतसे ॥ २ ॥ काय काय सोंग घेसी नानापरी ॥ गोपिकांचे घरीं काम सारीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसी अगाध जे कीर्ति ॥ भोळ्या भक्तांप्रति दावीतसे ॥ ४ ॥

॥ १७०७ ॥ गोवळे म्हणती कांहो आह्मा भितो ॥ ब्रह्मादि वंदिती पायधुळी ॥ १ ॥ गाई तृप्त करी कळंबाच्या तळीं ॥ सोडिल्या शिदोरी

दावितसे ॥ २ ॥ हमामा घालितां नव्हती माघारें ॥ नाहीं भीत पोरें येत संगें ॥ ३ ॥ नामा ह्मणे काय भिउनी राहिलें ॥ निवांतची ठेले ब्रह्मादिक ॥ ४ ॥

॥ १७०८ ॥ त्रिभुवनीचें जीवन कीं अमरांचें ठेवणें ॥ कैसें भाग्य लहाणें लक्ष्मीचें ॥ १ ॥ धन्य गौळियांचें धन्य धन्य जिणें ॥ ज्या घरीं खेवणें परब्रह्म ॥ २ ॥ अंगें खेळवणें परब्रह्म गोळुजणें ॥ लीला सामावणें रोमरंध्रीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे तें दैवचि कारण ॥ झालें खेळवणें परब्रह्म ॥ ४ ॥

॥ १७०९ ॥ आई मज ह्मणसील अवगुणांचें ॥ तरी मी काय करितों कोणाचें ॥ जें जें होणार जयाचें ॥ तें कां मजवरी घालिसी ॥ १ ॥ भट आलासे माभळ ॥ तेणें वर्णिला जन्मकाळ ॥ तो चुकला ग्रहमूळ ॥ तेणें त्यासी पीडिलें ॥ ध्रु० ॥ माये तीच मावशी ॥ तिनें मज घेतलें वोसंगासी ॥ तिचे अंगीं होती विवशी ॥ तिनें तिसी ग्रासिलें ॥ २ ॥ दहीं भात रत्नताटीं ॥ कालवूनी लावी माझे ओंठीं ॥ जेवितां काग घाली मिठी ॥ धरुनी मुष्टी रगडीला ॥ ३ ॥ कैसी पाठविली रिठागांठी ॥ ती घातली माझे कंठीं ॥ तेणें माझ्या गळां मिठी ॥ मग म्यां दाढे रगडिली ॥ ४ ॥ खेळत होतों यमुनेतटीं ॥ बक लागला माझे पाठी ॥ मग मी धरुनी चंचु उपटी ॥ धरणीवरी आपटिला ॥ ५ ॥ आई म्यां तुझें काय केलें ॥ त्वां मज उखळासी बांधिलें ॥ रांगत रांगत अंगणीं आलों ॥ तेणें वृक्ष उन्मळिले ॥ ६ ॥ ऐसा नाटकी हृषीकेशी ॥ परब्रह्म दावी यशोदेसी ॥ विष्णुदास नामा अहर्निशीं ॥ हृदय कमळीं पहातसे ॥ ७ ॥

॥ १७१० ॥ कृष्णराम लीला सर्वे सा गोपाळां ॥ जन्मासी सांवळा कैसा आला ॥ १ ॥ विस्तार बोलाया बैस तूं अंतरा ॥ करी तूं पामरा कृपादान ॥ २ ॥ ह्मणोनि विनवी पायां पैं निगुती ॥ ऐकावें श्रीपति नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ १७११ ॥ भूमिभार झाला चालली उदकांत ॥ धरूनिया रूप गाईचें हो ॥ १ ॥ विधीपासी गेली रडूं ते लागली ॥ समग्र वहिली कथा सांगे ॥ २ ॥ नको भिऊं ह्मणोनी अश्वासिलें विधिनें ॥ सर्वे तीस घेऊन गेला ठायां ॥ ३ ॥ नामा ह्मणे तेचि आधार सर्वांसी ॥ रूप नाम त्यासी कांहीं नाहीं ॥ ४ ॥

॥ १७१२ ॥ देव क्षिराब्धिसी आले हो सकळ ॥ करुनी निश्चळ मनामाजीं ॥ १ ॥ प्राणायाम मुद्रा लावुनी अंतरीं ॥ इंद्रादि श्रीहरि चिंतूनिया ॥ २ ॥ विराट जें पाही संस्कृतें वर्णियेलें ॥ तेंचि चिंतियेलें नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ १७१३ ॥ अकस्मात तेथें उठली ते वाणी ॥ नका भिऊं ह्मणोनी मेघरूपा ॥ १ ॥ ऐकतांचि कानीं हरुषले मनीं ॥ देवाचिया श्रेणी नामा ह्मणे ॥ २ ॥

॥ १७१४ ॥ गौळियाचे घरीं रहिवास गोकुळीं ॥ तेथें तुह्मी सकळीं वास कीजे ॥ १ ॥ वसुदेव देवकी उदरीं जन्मेन ॥ कंसभयें राहीन गोकुळीं हो ॥ २ ॥ तेथें आहे काज कळेल सकळां ॥ आनंद सोहळा पुरवीन ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें देव बोलियेले ॥ आपण ते गेले निजधामा ॥ ४ ॥

॥ १७१५ ॥ तयेकाळीं देव गोकुळीं भरले ॥ अगोचर रूप झालें ठायीं ठायीं ॥ १ ॥ सकळ संपत्ती भरूनी उरल्या ॥ दिगंतरीं गेल्या विपत्ति त्या ॥ २ ॥ नामदेवा तेव्हां आनंद तो झाला ॥ गोकुळीं भरला पांडुरंग ॥ ३ ॥

॥ १७१६ ॥ शेषशायी हरी उठोनी लवकरी ॥ ह्मणे सख्या धरी मनुष्यरूप ॥ १ ॥ तुजविण मज न गमे घटिका ॥ ह्मणोनी नेटका रूप धरी ॥ २ ॥ देवकी उदरा जाउनी रिघावें ॥ अंतरीं वसावें रोहिणीच्या ॥ ३ ॥ तुझियेचि सेवें येतों मी माघारा ॥ नामया दातारा कळों आलें ॥ ४ ॥

॥ १७१७ ॥ देवकी कवण वसुदेव कवण ॥ सांगावी हे खूण नागवळा ॥ १ ॥ ऐकोनी उत्तर देव मनीं पाही ॥ बोलतो लवलाही चित्त देईं ॥ २ ॥ सुतपा मती ते अनुष्ठानी दोघे ॥ करुनिया तपें वर मागे ॥ ३ ॥ तया दिल्हा वर पुत्र मी होईन ॥ यालागीं कारण आहे तेथें ॥ ४ ॥ तींचि दोघें झालीं वसुदेव देवकी ॥ ह्मणोनी यादवी जन्म घेणें ॥ ५ ॥ तयाचा वृत्तांत आतां कोठें आहे ॥ सांगेन लवलाहें नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ १७१८ ॥ माझें सगुण गुणाचें तान्हें ॥ मज दिसतें गोजीरवाणें ॥ काय सांगतां गाऱ्हाणें गे ॥ गोकुळीच्या नारी ॥ १ ॥ माझें पांच वर्षांचें

बाळ ॥ अंगणीं माझ्या खेळ ॥ कां लटकीच घेतां आळ ॥ ग गोकुळीच्या नारी ॥ २ ॥ सांवळा गे चिमणा माझा ॥ गवळणींमध्यें खेळतो यादवराजा ॥ तुह्मी मोठ्या ढालगजागे ॥ गोकुळीच्या नारी ॥ ३ ॥ तुह्मी खाऊन लोण्याचा गोळा ॥ आळ घेतां या गोपाळा ॥ तुह्मी ठाईच्या वोढाळा ॥ गोकुळीच्या नारी ॥ ४ ॥ तुह्मी लपवुनी याची गोटी ॥ लागतां गे याचे पाठीं ॥ ही एव्हढीच रीत खोटी गे ॥ गोकुळीच्या नारी ॥ ५ ॥ तुह्मी लपवून याचा भवरा ॥ धरूं पाहतां सारंगधरा ॥ तुह्मी बारा घरीच्या बारा गे ॥ गोकुळीच्या नारी ॥ ६ ॥ हा ब्रह्मविधीचा जनीता ॥ तुह्मी याला धरूं पाहतां ॥ हा कैसा येईल हातां गे ॥ गोकुळीच्या नारी ॥ ७ ॥ श्रीरंग माझा बछडा ॥ याला दुजा नाहीं जोडा ॥ तुह्मी याचा संग सोडागे ॥ गोकुळीच्या नारी ॥ ८ ॥ नामा ह्मणे यशोदेसी ॥ हा तुझा हृषिकेशी ॥ कां छळीतो आह्मासी गे ॥ गोकुळीच्या नारी ॥ ९ ॥

॥ १७१९ ॥ आकाश गडगडी विद्युल्लता तळपती ॥ अनिवार मेघ सणसणा वरुषती ॥ १ ॥ राखियलें येणें देवकीनंदनें ॥ गोपाळ ह्मणती आमुचें कान्हे ॥ २ ॥ गोवर्धन गिरी उचलोनी निजकरीं ॥ राखिलें यापरी नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ १७२० ॥ डोहामाजीं वास होता बहुत दिवस ॥ आतां कासावीस काय सांगूं ॥ १ ॥ विक्राळ होऊनी आला चक्रपाणी ॥ कालिया निर्वाणीं ध्यान करी ॥ २ ॥ नको करूं मज उदका बाहेरी ॥ दंडवत करी कालिया तो ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसा काढिला विखरी ॥ कीर्ति वानूं तरी किती देवा ॥ ४ ॥

॥ १७२१ ॥ बरवें बरवें बाळ कोडीसवाणेरे ॥ यशोदा ह्मणे दृष्टी होईल बारे ॥ १ ॥ बरवी बरवी डोळस सांवळी ॥ कोण उतरोनी हरीची पाउली ॥ २ ॥ चंदन पोटाळा कासें सोनसळा ॥ विष्णुदास नामा चरणाजवळी ॥ ३ ॥

॥ १७२२ ॥ ब्रह्मादिकां पाहतां ठक पिडयलें ॥ पहाहो कैवल्य गौळिया जोडलें ॥ १ ॥ कोण्या ऋणें या केला नकळे ॥ परब्रह्म आमुचें आहे सोंवळें ॥ २ ॥ या गोकुळाचेनी पाडे पाहतां ॥ सुख वैकुंठीं नदिसे सर्वथा ॥ ३ ॥ ऐसा अभिनव आनंदु जाणतो ॥ गोकुळीचे तृण तरुवर

तरी होतों ॥ ४ ॥ काम लोभ लावियेला येणें निवे ॥ तेणें सुखें शुद्ध लागलीसे सवें ॥ ५ ॥ नामया स्वामी हृदयींचा विसांवा ॥ आपुलें सर्वस्व देऊनिया जोडावा ॥ ६ ॥

॥ १७२३ ॥ श्रीमुख सुंदर वाटोळें ॥ कैसें नीलोत्पल सांवळें ॥ १ ॥ पैं सेंडी गडी धाकुटा ॥ होय घोंगडें खांदा मोठा ॥ २ ॥ थिरू वांसरें होकरी ॥ पुढें वाहती पावे मोहरी ॥ ३ ॥ हातीं घेउनी वेताटी ॥ कैसा लागे वासुरा पाठीं ॥ ४ ॥ बाळा गोपाळासहित मुरारी ॥ खेळू खेळे नानापरी ॥ ५ ॥ विष्णुदास नामयाचा दातारू ॥ ब्रह्मादिका साचा नकळे पारू ॥ ६ ॥

॥ १७२४ ॥ जन्म गेलें याचे राखतां गाई ॥ याचिया बोला विश्वासकाई ॥ १ ॥ गोधनें राखितो आपण पेंढारा ॥ तुझ्यानी मिळती पाणियाचा थारा ॥ २ ॥ हातीं डांगा खांदीं कांबळा ॥ तुझ्या गाई आह्मी राखों गोपाळा ॥ ३ ॥ आठ कोटी नव बहात्रीं गाई ॥ गोधनें बैसलीं आपुले ठायीं ॥ ४ ॥ धालीं गोधनें बैसलीं वाडां ॥ संत पाहो आले तंव झोंपा उघडा ॥ ५ ॥ गोधनें चरती बाराही रानें ॥ माझें मन तुझें वांसरूं तान्हें ॥ ६ ॥ गोधनें चारितां कृष्ण सांगाती ॥ विष्णुदास नामा देतुसे वळती ॥ ७ ॥

॥ १७२५ ॥ कंसा हातीं विडा पाहे चहुंकडा ॥ पूतना सा पुढां काय बोले ॥ १ ॥ जाईन गोकुळा वधीन सा बाळा ॥ ऐसी सा चांडाळा बोलतसे ॥ २ ॥ विष भरुनी स्तन निघाली पूतना ॥ तीतें देखुनी कान्हा दूध मागे ॥ ३ ॥ येउनी द्वारीं थोकली तंव यशोदा देखिली ॥ कृष्णा आली माउली राहे उगा ॥ ४ ॥ तंव अधिकची आळी करी वनमाळी ॥ येरी ह्मणे दे जवळी पाजीन दूध ॥ ५ ॥ पूतने वोसंगा दिधलासे कान्हा ॥ घटघट पय पाना करीतसे ॥ ६ ॥ शोषीयलें विख नधायची भूक ॥ नामया स्वामी न राखे प्राण तिचा ॥ ७ ॥

---

## सुदामचरित्र.

॥ १७२६ ॥ सुदामा ब्राह्मण होता तो दुर्बळ ॥ परि चित्तीं गोपाळ दृढ धरिला ॥ १ ॥ तयाचें चरित्र ऐका सावधान ॥ तेणें जन्ममरण दूर होती

॥ धृ० ॥ सत्वाचा सागर धैर्याचा मांदार ॥ भक्तीचा निर्धार तयापाशीं ॥ २ ॥ हालेना चालेना चळेना ढळेना ॥ आणिक कल्पीना इच्छा कांहीं ॥ ३ ॥ सदा सर्वकाळ समाधी लागला ॥ प्रपंच सांडिला छेदूनिया ॥ ४॥ नामा ह्मणे तोची योगियांचा राजा ॥ ज्ञान्याचीया पूजा पुजतसें ॥ ५ ॥

॥ १७२७ ॥ प्रारब्धाच्या बळें देहाचें वर्तनें ॥ काळचक्र भोवने जैसें कांहीं ॥ १ ॥ तैसाची तो साधु जाणावा प्रसिद्ध ॥ देहाचा संबंधु नेणें कांहीं ॥ धृ० ॥ वारे वाजुनीया जातां वृक्ष डोले ॥ मर्यादेवेगळें होत जाय ॥ २ ॥ नामा ह्मणे होणें जाणें नाहीं तयां ॥ संचिता साराया लागोनीया ॥ ३ ॥

॥ १७२८ ॥ ऐसा तो ब्राह्मण दरिद्रें पीडिला ॥ सदां स्वरुपीं झाला अखंडीत ॥ १ ॥ नकरीच खंती कांहीं तो अंतरीं ॥ वाचे तो उच्चारी रामकृष्ण ॥ धृ० ॥ नाहीं धड घर केवळ जर्जर॥ चंद्र प्रभाकर उगवती ॥ २ ॥ बाळें पांच सात बाहाती झोंबती ॥ भुकें तळमळीती सर्वकाळ ॥ ३ ॥ उष्णें पोळे वारा येतसे भरारा ॥ मेघाचिया धारा घरामाजीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे त्यानें प्रपंच सांडिला ॥ परमार्थ मांडिला अखंडीत ॥ ५ ॥

॥ १७२९ ॥ तयाची सुंदरा शांतीची बाहुली ॥ आणिक जीभली बोलो नेणें ॥ १ ॥ सेवेसी सादर होऊनिया राहे ॥ भुकची ते खाये भुकेलीया ॥ धृ० ॥ नित्य नैमितिक कांहींच न ह्मणे ॥ अंतरींची खूण जाणोनिया ॥ २ ॥ नामा ह्मणे न्यून पूर्ण सर्व हरि ॥ आणिक विचारी गुंतेचीना ॥ ३ ॥

॥ १७३० ॥ एके दिनीं भार्या भावें तें मानवी ॥ भ्रतारा विनवी नम्रतेनें ॥ १ ॥ तुमचा सोइरा आहे नारायण ॥ अखंडित ध्यान करितां त्याचें ॥ धृ० ॥ तयाचिये भेटी जावें लवकरी ॥ तो आहे कैवारी दीनालागीं ॥ २ ॥ भेटताची नासे अज्ञान दरिद्र ॥ सुखाचा समुद्र पांडुरंग ॥ ३ ॥ नामा ह्मणे देव भक्ता साहाकारी ॥ सर्व सिद्धि घरीं बोळगती ॥ ४ ॥

॥ १७३१ ॥ ऐकतां वचन मानलें तयासी ॥ पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥ १ ॥ तेथें म्यां मागावें हें कांहीं नकळें ॥ निवतील डोळे दर्शनानें ॥ धृ० ॥ परी तया भेटी न्यावें कांहींबाहीं ॥ परंतु तें नाहीं लेश घरीं ॥ २ ॥ नामा ह्मणे द्विज वांच्छी दरूशण ॥ रिकाम्या हातानें जातां लाजें ॥ ३ ॥

॥ १७३२ ॥ जाणवला भाव तया सुंदरीसी ॥ ह्मणते पतीसी नम्रतेनें ॥ १ ॥ जावें आतां तुह्मीं देवाचे भेटीसी ॥ उठली वेगेसी सन्मानानें ॥ धृ० ॥ आणितें मागुनी भक्तीचें भातुकें ॥ जेणें यदुनायक तोष पावे ॥ २ ॥ नामा ह्मणे घरीं पदार्थ तो नाहीं ॥ प्रेमच तो पाहीं उगवला ॥ ३ ॥

॥ १७३३ ॥ पाहे चहूंकडे धुंडोनी सुंदरी ॥ देखे मुष्टी च्यारी तंदुळिका ॥ १ ॥ तोची शुद्धभाव उगवला पुढें ॥ सर्वही तें कोडें देवालागीं ॥ धृ० ॥ अहं सोहं वृत्ति तेथें एक झाली ॥ दृष्टीनें देखिली पोह्याकडे ॥ २ ॥ नामा ह्मणे सर्वरूपीं नारायण ॥ बोलाया कारण नाहीं तेथें ॥ ३ ॥

॥ १७३४ ॥ तेची भक्तिभावें पतीपुढें ठेवी ॥ पाहोनी गौरवी ब्रह्मनिष्ठा ॥ १ ॥ तया योग्य नव्हेचि गे हा पदार्थ ॥ आमुचिया आर्त तुळसीदळ ॥ धृ० ॥ द्रौपदीच्यासाठीं भाजीपान खाये ॥ तेणें त्याची काय भूक गेली ॥ २ ॥ नामा ह्मणे हें तो कोड कौतुक ॥ थोडेंही अधिक देव करी ॥ ३ ॥

॥ १७३५ ॥ शुद्ध भावार्थाचे पाहोनिया पोहे ॥ आनंदला भाव योगियाचा ॥ १ ॥ ह्मणे आतां भेटू बाळमित्र हरि ॥ भक्ताचा कैवारी कृष्णनाथ ॥ धृ० ॥ बांधावया वस्त्र केवळ जर्जर ॥ त्यामाजीं न थरे गुंडाळीतां ॥ २ ॥ नामा ह्मणे द्वीज आनंद पावला ॥ मुहूर्त नेमियेला प्रयाणासी ॥ ३ ॥

॥ १७३६ ॥ वाचे नाम गात चालिला तो द्वीज ॥ एकाचें तें चोज शुद्ध भावें ॥ १ ॥ जीवशीव एकाकार झाली वृत्ति ॥ नाहीं कांहीं चित्तीं शमदम ॥ धृ० ॥ हात पाय नळ्या वळती फेंगड्या ॥ भावार्थाच्या गुड्या उभारीत ॥ २ ॥ नामा ह्मणे वाट चालतां समाधि ॥ सोहं स्वरुपीं बुद्धि ठसावली ॥ ३ ॥

॥ १७३७ ॥ शुभसूचाचिन्हें होताती शकुन ॥ तेणें तो ब्राह्मण आनंदला ॥ १ ॥ ह्मणे थोर लाभ आजिचा दिसतो ॥ आनंद वाटतो मनामाजीं ॥ धृ० ॥ उडती उजवे काग ते जोड्यानें ॥ भरल्यां कुंभानें नारी देखे ॥ २ ॥ तास भारद्वाज वामभागीं जाती ॥ मयूर नाचती उत्साहानें ॥ ३ ॥ नामा ह्मणे सर्व प्रश्नांचाही प्रश्न ॥ वाचे नारायण नाम गातो ॥ ४ ॥

॥ १७३८ ॥ द्विज ह्मणे जातां मनीं ॥ कैसा भेटे चक्रपाणी ॥ १ ॥ काय होईल नकळे ॥ ह्मणोनि हृदयीं कळवळे ॥ धृ० ॥ येवढा ज्याचा राज्यभार ॥ मी तो केवळ फकीर ॥ २ ॥ कोठें तयाला आठव ॥ बाळपणीचें माझें नांव ॥ ३ ॥ तैं तो होता गौळ्याघरीं ॥ आतां त्रैलोक्याधिकारी ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें ॥ करितची निजध्यास ॥ ५ ॥

॥ १७३९ ॥ दुरोनी देखिलें द्वारकानगर ॥ आवघे कनकाकार वोतियेले ॥ १ ॥ जेथें देवराणा नांदतो तो ठाव ॥ काय म्यां वर्णावें मंद-मति ॥ धृ० ॥ हिरे चिरे रत्न झगमग दिसती ॥ घोंस ते लोंबती मोतीयांचे ॥ २ ॥ वैकुंठीचें सर्व वैभव आणिलें ॥ शोभेसी शोभले आपेआप ॥ ३ ॥ गुडीया गोपुरें झळकती पताका ॥ वाजताहे डंका चौवेदांचा ॥ ४ ॥ साहाजण भाट उभे महाद्वारीं ॥ अठरा वारकरी मोकाशांचे ॥ ५ ॥ नामा ह्मणे रिद्धिसिद्धीचे भांडार ॥ देखिलें नगर ब्राह्मणानें ॥ ६ ॥

॥ १७४० ॥ झांकावले डोळे शंका करी मनीं ॥ दिवस किं यामिनी हें नकळे ॥ १ ॥ महा तेजःपुंज फांकती सकळ ॥ सिंधूचा झळाळ भोंवताला ॥ धृ० ॥ गोमती ते नदी निर्मळ वाहात ॥ बहु घुमघुमीत सुमनें भार ॥ २ ॥ जाईजुई आणि कमल कल्हारी ॥ भ्रमर झुंकारी गुंजारव ॥ ३ ॥ नामा ह्मणे मुनि पातला पूर्वद्वारा ॥ पुढील्या विचारा चित्तधावें ॥ ४ ॥

॥ १७४१ ॥ चहूंकडे स्वर गाताती गायनें ॥ आणिक पुराणें ठाईंठाईं ॥ १ ॥ गीतनृत्य नाना करिती तनाना ॥ होतसे झणाणा टाळघोळ ॥ २ ॥ श्रवणाचें सुख घेतसे ब्राह्मण ॥ नामाही गर्जना करीतसे ॥ ३ ॥

॥ १७४२ ॥ नारायण नाम तारक सर्वांसी ॥ तें मुनी मानसीं धरिलें असें ॥ १ ॥ कापुराची राशी अग्नीचाहो कण ॥ तैसें नाम जाण पातकासी ॥ धृ० ॥ अंतरी ते क्षुधा लागली द्विजासी ॥ पाहीना नगरासी सावचीत ॥ २ ॥ नामा ह्मणे द्विज उभा महाद्वारीं ॥ केवळ भीकारी राजयोगी ॥ ३ ॥

॥ १७४३ ॥ नाहीं देवाचिये द्वारीं आडकाठी ॥ हे तो आहे गोष्टी सिद्धांताची ॥ १ ॥ भावाविरहीत मार्गची न फुटे ॥ फुटल्या न सुटे मागुता तो ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐसा लौकिक वेव्हार ॥ तेथें तों निर्धार कांहीं नाहीं ॥ ३ ॥

॥ १७४४ ॥ चालिला देवाचे भेटीला सन्मुख ॥ ब्राह्मणाचा हरिख नसमाये ॥ १ ॥ पाहातां लोचनं राजीव लोचन ॥ भावाचे मोचन तेची काळीं ॥ धृ० ॥ सभा ते साजिरी रत्न सिंहासनीं ॥ देव चूडामणी शोभतसे ॥ २ ॥ राईरखुमाई चामरें ढाळिती ॥ राधा उभी हातीं घेउनी छत्र ॥ ३ ॥ समारंभें पुढें गरुड तो उभा ॥ शोभतसे शोभा दीव्य कांहीं ॥ ४ ॥ यादवांची सभा दाटलीसे भारी ॥ नाना उपच्यारी रिद्धी सिद्धी ॥ ५ ॥ उद्धव अक्रूर उभें पायांपासीं ॥ देवादिदेवासी विडे देत ॥ ६ ॥ नामदेव तेथें उभा होता निका ॥ घेउनी पादुका दोन्हीं हातीं ॥ ७ ॥

॥ १७४५ ॥ पुढें तो भिकारी जातां झाला वेगें ॥ आपुलीया रंगें रंगुनिया ॥ १ ॥ येकाकार करी चित्त आणि वृत्ति ॥ पाहे लक्ष्मिपति दुरोनियां ॥ धृ० ॥ तटस्थ जाहाला चालला त्वरित ॥ मुखीं नाम गात गोविंदाचें ॥ २ ॥ नामा ह्मणे नीर पाझरे लोचनीं ॥ समाधी लागुनी मुनी ठेला ॥ ३ ॥

॥ १७४६ ॥ देखिला सांवळा राजा द्वारकेचा ॥ सर्व ही सुखाचा ठेवा दिसे ॥ १ ॥ माथां तो मुगुट कुंडलें श्रवणीं ॥ प्रभा दिनमणि तुच्छ जेथें ॥ धृ० ॥ कोटी मन्मथांची झाडणी करावी ॥ ऐसी ते बरवी अंगकांती ॥ २ ॥ श्रीमुख शोभलें पूर्ण चंद्रा ऐसे ॥ देखतांची दोष सर्व जाती ॥ ३ ॥ केशराची उटी कस्तुरी मळवटी ॥ माळ रुळे कंठीं वैजयंती ॥ ४ ॥ श्रीवच्छलांछन मुद्रिका भूषण ॥ झळकती आन भुजादंड ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसा देखियेला देव ॥ तयाचा अनुभव काय वानु ॥ ६ ॥

॥ १७४७ ॥ देखिला सुदामा आपुल्या नयनीं ॥ मग चक्रपाणी उठे त्वरें ॥ १ ॥ सिंहासना खाली टाकोनियां उडी ॥ कर द्वय जोडी नमना लागीं ॥ धृ० ॥ भेटूनियां तेव्हां धरिला हस्तकीं ॥ बैसवी मंचकीं वैडुर्याच्या ॥ २ ॥ ह्मणे रुक्मिणीसी आणी उदकाला ॥ पुजूं या द्वीजाला सन्मानेसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवें चरण प्रक्षाळीले ॥ आंचळीं पुसीले आपुलीया ॥ ४ ॥

॥ १७४८ ॥ स्नानालागीं उठा ह्मणे नारायण ॥ आणवीलें उष्ण पाणी तेव्हां ॥ १ ॥ सोळा सहस्र स्त्रिया उटणीं लावीती ॥ अक्षवाण आरती करिताती ॥ धृ० ॥ करविलें स्नान पीतांबर परिधान ॥ अलंकार

भूषणें दिल्हीं त्यासीं ॥ २ ॥ स्वइच्छा भोजन वाढीलें तयासी ॥ नामाही पंक्तिसी बैसवीला ॥ ३ ॥

॥ १७४९ ॥ सोळा सहस्र तार्टे द्विजालागीं आलीं ॥ अमृताची गेली चवी तेव्हां ॥ १ ॥ पक्वान्नांचा तरी वाढवूं विस्तार ॥ होईल उशीर कथेलागीं ॥ धृ० ॥ हरिरुचि जेवण सुदामा जेवीला ॥ वेगीं आंचवला संसारासी ॥ २ ॥ नामा ह्मणे त्यासी देवें दिल्हा वीडा ॥ रंगला तो जोडा वैराग्याचा ॥ ३ ॥

॥ १७५० ॥ काय वहीनीनें दीधलें आह्मांसी ॥ दाखवा वेगेसी कृष्ण ह्मणे ॥ १ ॥ सोडीयेली तेव्हां मुष्टी तंदुळीका ॥ रुक्मीणी नाइका पुढें ठेवी ॥ धृ० ॥ घेउनी ते पोहे मुखामाजीं टाकी ॥ मागे ते भीमकी धरोनी हात ॥ २ ॥ ब्रह्मादिक देव उभे पोह्यासाठीं ॥ नाहीं त्या लल्लाटीं नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ १७५१ ॥ भक्षुनीयां पोहे संतुष्ट जाहला ॥ मग आनंदला नारायण ॥ १ ॥ विश्वकर्म्यालागीं तेव्हां आज्ञा केली ॥ क्षणांत रचिली सुदामपुरी ॥ धृ० ॥ सर्व सुवर्णाची द्वारकेप्रमाणें ॥ ब्राह्मणासी दान गुप्त दिल्हें ॥ २ ॥ नामा ह्मणे दुजा नाहीं देवावीण ॥ देतांघेतां जाण पांडुरंग ॥ ३ ॥

॥ १७५२ ॥ सुदामा ह्मणे अनंता ॥ आह्मां आज्ञा द्यावी आतां ॥ १ ॥ जाऊं घरासीं सत्वर ॥ येउनी दीवस झाले चार ॥ ध्रु० ॥ सर्व ठेउनी जातां बरें ॥ वाटें मारीती तस्कर ॥ २ ॥ ऐसी ऐकोनी वचनें ॥ सर्व काढीलीं भूषणें ॥ ३ ॥ आज्ञा घेउनी चालिला ॥ देव बोळवीत आला ॥ ४ ॥ नामा ह्मणे चोर ॥ याचा उफाराटा व्यापार ॥ ५ ॥

॥ १७५३ ॥ नाहीं आमुचे दैवीं त्याणें कोठोनी द्यावें ॥ व्यर्थ कां रुसावें देवावरी ॥ १ ॥ नकरितां खेद पुढें वाट चाले ॥ गौरक्षक भेटले तयालागीं ॥ ध्रु० ॥ पुसतसे त्यासीं कोणाचें नगर ॥ ते ह्मणती घर सुदाम्याचें ॥ २ ॥ सुदाम्याची तुह्मी हेळणा करीता ॥ तयाच्या संचीता प्राप्त कैंचें ॥ ३ ॥ मानुनी असार नगरद्वारा गेला ॥ प्रचीती तयाला नयेचि ते ॥ ४ ॥ जेव्हां यंत्रधारी मुजरा करीती ॥ चरणासी लागती सुदाम्याच्या ॥ ५ ॥ सुदामदेव तेव्हां मंदिरासी गेला ॥ मग ओंवाळीला सुंदरीनें ॥ ६ ॥ समाधानी झाला सुदामा ब्राह्मण ॥ करारे कीर्तन नामा ह्मणे ॥ ७ ॥

---

## उपमन्युचें चरित्र.

---

### ओव्या.

॥ १७५४ ॥ ऐका श्रोते सावधानता ॥ सांगेन उपमन्युची कथा ॥ एक्या भावें परिसतां ॥ सायुज्यता पाविजे ॥ १ ॥ बाळ तो लडिवाळ तान्हा ॥ वाढे मातेचिया स्तन पान्हा ॥ परि ते असे दुर्बळपणा ॥ उपमन्यु नांव तयेचें ॥ २ ॥ उपमन्यें मागीतलें ॥ कृष्णें तयासी काय दिधलें ॥ तें सांगेन वहिलें ॥ चित्त देउनी परियेसा ॥ ३ ॥ ब्राह्मणासी एक पुत्र झाला ॥ पितयानें संतोष मानिला ॥ थोर कष्टें वाढविला ॥ तयाचें पुत्रपण फिटलें ॥ ४ ॥ बाळ जाहला जाणता ॥ पितयासी उपजली दूधाची चिंता ॥ दूधच ऐकिलें बोलतां ॥ तेंचि मातेसी मागत ॥ ५ ॥ मग कर्डी कांडोनी जनकजननी ॥ त्याचें केलें शुभ्रपाणी ॥ बाहेर दूध ह्मणउनी ॥ वाटींत भात कालविला ॥ ६ ॥ तंव शेजारी ब्राह्मणानें श्राद्ध केलें ॥ त्यानें त्या बाळकास जेवावयास नेलें ॥ षड्रस पक्वान्ना वाढिलें ॥ दूध क्षीर नाना परीचे ॥ ७ ॥ तयासी वाढिली दूध क्षीरी ॥ बाळक जेविलें पोटभरी ॥ पुसोनियां तये घरीं ॥ माते मागूं जेवावया ॥ ८ ॥ गेला आपुलिया घरा प्रती ॥ बाळ तो निद्रा करी रातीं ॥ प्रातःकाळीं भूक लागे मागुती ॥ मागे दूधभात जेवावया ॥ ९ ॥ पुढती कर्डी वाटुनी जननी ॥ त्याचें काढिलें शुभ्र पाणी ॥ येरें टाकिलें थुंकोनी ॥ माते दूध कालचें नव्हे ॥ १० ॥ बारे त्या समर्थाचे घरीं ॥ देवें दिधलें दूध क्षीरी ॥ आह्मां दुर्बळांचे घरीं ॥ तें दूध कोठुनी मिळेल ॥ ११ ॥ कोठें आहे तो श्रीहरी ॥ तो मज दावी वो झडकरी ॥ दूध मागेन निर्धारी ॥ क्षुधा अंतरीं बहु पीडी ॥ १२ ॥ देव्हारा श्रीहरिची मूर्ती ॥ नेउनी दाखविली बाळाप्रती ॥ बारे हा लक्ष्मीपति ॥ दूध या प्रती मागावें ॥ १३ ॥ बाळ खळ घेऊनी बैसला तेथें ॥ देवा दूध पोटभर दे मातें ॥ मी कोठें जाऊं नेदी तूतें ॥ दूध घेतल्यावांचोनी ॥ १४ ॥ ऐसें तिघां तीन उपवास पडती ॥ माता पिता चिंता करिती ॥ लोकीं मिळोनी बहुतीं ॥ उठवूं पाहती बाळकातें ॥ १५ ॥ बाळा तुज कारणें ॥ एक गाय देतों आणून ॥ येरु न मानी त्यांचें वचन ॥ ह्मणे देईल लक्ष्मीरमण मजलागी ॥ १६ ॥ माता समजावी बहुता वचनीं ॥ त्या ब्राह्मणाचें दूध देते आणुनी ॥ हें पाहे पा चाखोनी ॥ दूध कालचें होय कीं नव्हे

॥ १७ ॥ दूध आणिलें भीक मागुनी ॥ संतोष न वाटे माझे मनीं ॥ देव देईल मज लागुनी ॥ री दूध वीन ॥ १८ ॥ देवें धुरुसी अढळ पद दिलें ॥ तैसेंच दूध देई मज संचलें ॥ न देतां अव्हेरिलें ॥ तरी प्राण देईन निर्धारी ॥ १९ ॥ देवा दुधाची शिधोरी ॥ कां मज न देसी श्रीहरी ॥ आळ पुरवी बा मुरारी ॥ दूध पोटभरी मज देई ॥ २० ॥ मज बहू लागलीसे क्षुधा ॥ अझु ी कां न पावसी गोविंदा ॥ तुज मागत नाहीं धनसंपदा ॥ एका दूधा वांचोनी ॥ २१ ॥ देवा नको पाहूं निर्वाण ॥ देह करवतीं घालीन ॥ प्राण तुज समर्पीन ॥ सत्य वचन पाहे माझें ॥ २२ ॥ देखोनी बाळकाचें अंतःकरण ॥ कळवळिला नारायण ॥ सांडोनी क्षीरसागर शेषशयन ॥ येत धांवून बाळकाप्रती ॥ २३ ॥ सुदर्शन घेऊनी हातीं ॥ पावला उपमन्यु आकांतीं ॥ प्रगट झाली विष्णुमूर्ती ॥ निजरूप दाविलें ॥ २४ ॥ बाळ येऊनी लागला चरणीं ॥ देवें हृदयीं धरिला आलिंगुनी ॥ वरदहस्तें कुरवाळुनी ॥ कृपादृष्टी अवलोकी ॥ २५ ॥ सांग बाळा प्रसन्न झालों तूंतें ॥ काय संकल्प तो माग मातें ॥ येरू ह्मणे दूध द्यावें कृपावंतें ॥ जें कल्पांतींही न सरेची ॥ २६ ॥ हांसून बोले वैकुंठरमण ॥ पहावो बाळ केवळ अज्ञान ॥ ह्मणे मी झालों आतां प्रसन्न ॥ काय दूध तुंवा मागावें ॥ २७ ॥ देवा या दुधाचि कारणें ॥ एवढें केलें म्यां निर्वाण ॥ सहित माता पिता तिघेजण ॥ क्षीर भोजन मज द्यावें ॥ २८ ॥ मातापिता उपमन्य ॥ तिघे गरूड पृष्ठीं वाहवून ॥ क्षीरसागरीं ठेवी नेऊन ॥ दूध प्राशन सुखें करा ॥ २९ ॥ राज्य देऊनी क्षीरसागरीचें ॥ अमर शरीर केलें त्यांचें ॥ अखंड दर्शन श्रीहरीचें ॥ सायुज्यपद त्या दीधलें ॥ ३० ॥ यालागीं काया वाचा मनें ॥ जावें विठोबासी शरण ॥ आर्त मनोरथ पूर्ण ॥ निजभक्ताचें करीतसे ॥ ३१ ॥ विष्णुदास नाम्याचा स्वामी ॥ तो श्रीहरि वोळगा तुह्मी ॥ जें जें इच्छिलें अंतर्यामीं ॥ इच्छा दानीं पुरवील ॥ ३२ ॥

---

## प्रल्हाद चरित्र.

—:o:—

॥ १७५५ ॥ दैत्य राजा थोर महा बळिवंत ॥ जगीं तो विख्यात हिरण्यकश्यप ॥ १ ॥ करूनियां तप तोषवी ब्रह्मया ॥ मागे वर तया दैत्यराव ॥ २ ॥ वरदान मागे नसावा तो मृत्यु ॥ कवणाचे हातु देवसुरां ॥ ३ ॥

गंधर्व मानव सकळांचें भय ॥ नसावें तिळभाय कवणे काळीं ॥ ४ ॥ दिव सां ना रात्रीं तिथी हो नक्षत्रीं ॥ अंतरिक्ष क्षिती मरण नसो ॥ ५ ॥ घरीं राजधानीं चोहाटा मंदिरीं ॥ कवणे ते स्थळीं मृत्यु नसो ॥ ६ ॥ ऐसा वर मागे दिला ब्रह्म देवें ॥ तपाचे स्वभावें तयेकाळीं ॥ ७ ॥ वर मागूनियां हरियलें पद ॥ देवांसहित इंद्र स्थानभ्रष्ट ॥ ८ ॥ तयेकाळीं देव लपोनियां हरी ॥ स्तविती अंतरीं पाहि पाही ॥ ९ ॥ देवराया आली कृपा ते समयीं ॥ ह्मणे सर्व होई काळयोगें ॥ १० ॥ तयाचे उदरीं भक्तराजराणा ॥ प्रल्हाद सुजाणा होईल तो ॥ ११ ॥ तयासी छळितां पावेल शासन ॥ हाचि भरवसेन नेम आहे ॥ १२ ॥ नामा ह्मणे देवें केलें समाधान ॥ आनंदें निमग्न आले स्थाना ॥ १३ ॥

॥ १७५६ ॥ ऐसें हो असतां देव खेळे मेळा ॥ सहित गोपाळा चाल केली ॥ १ ॥ भय तें मानुनी स्त्री पाठवी माहेरा ॥ होता तो उदरा भक्तराज ॥ २ ॥ अकस्मात वाटें नारद भेटला ॥ उपदेश केला दैत्यपत्नी ॥ ३ ॥ हरिमंत्र शुद्ध पडतां श्रवणीं ॥ गर्भस्थ ते क्षणीं स्वहित मानी ॥ ४ ॥ आठवीत नाम हृदय गुंफेंत ॥ काळें तो प्रसूत होता झाला ॥ ५ ॥ आनंदें भरित मेदिनी भरली ॥ राजा मात आली पुत्र झाला ॥ ६ ॥ भिकाऱ्यासी दान सभाग्यें करूनी ॥ संतोषला मनीं दैत्यभूप ॥ ७ ॥ देव होते करीत अनुष्ठान सिद्धी ॥ झाला भक्तनिधी महाराज ॥ ८ ॥ स्वर्गीं ध्वज केलें उभें देवें सर्व ॥ आनंद वैभव संतोषोनी ॥ ९ ॥ ऐशापरी बाळ पावतां वृद्धीसी ॥ पंच कर्म त्यासी संस्कार ॥ १० ॥ मग करवी त्याला विद्या अभ्यासाला ॥ गुरु शुक्र झाला सांगावया ॥ ११ ॥ शंडामर्क नामें शिक्षेसी ठेविला ॥ पढूं तो घातला कुमरवर ॥ १२ ॥ समस्त ते बाळ पढती जें कांहीं ॥ गुरूचे ते ठायीं भावयुक्त ॥ १३ ॥ प्रल्हादासी पूर्वी गर्भवास झाला ॥ उपदेश फळला नारदाचा ॥ १४ ॥ त्याचि छंदें गात हरिनाम अंतरीं ॥ वाचे माजी हरि आठवीत ॥ १५ ॥ गुरु वैरभाव सांगत हरीचा ॥ न मानी तयाचा उपदेश ॥ १६ ॥ समस्तां बाळकां सांगे हरिनाम ॥ प्रेमें तो आपण वाखाणीतो ॥ १७ ॥ तेणें तीं लेंकुरें हरिरूप जपतांची ॥ हरिरूप साचीं झालीं पाहा हो ॥ १८ ॥ गुरु करी चिंता काय रायाप्रती ॥ जाउनी निगुती सांगों आतां ॥ १९ ॥ आपण तो कांहीं न शिकें बोलिलें ॥ समस्त लेंकुरें नाशियेलीं ॥ २० ॥ जाउनी हे मात रायासी

निवेदी ॥ कोप करुनी आधीं राजा बोले ॥ २१ ॥ मग ह्मणे आणा अधमासी येथें ॥ गुरुराज पंथें नेत जात ॥ २२ ॥ नाहीं कांहीं भय चिंतनीं हरीचे ॥ आनंद करीत साचें चालिला तो ॥ २३ ॥ नामा ह्मणे ऐसा भक्तराज बळी ॥ स्मरें वनमाळी हृदयांत ॥ २४ ॥

॥ १७८७ ॥ घेऊनियां गुरु आले राजसभे ॥ वंदुनीयां उभे सन्मुख तो ॥ १ ॥ राजा ह्मणे काय पढसी तूं सांग ॥ ह्मणे लाग वेगें हरी हरी ॥ २ ॥ ऐकतां वचन बोले क्रोधावोनी ॥ पापीयासी झणीं नका येथें ॥ ३ ॥ माझा जो वैरी तया आठवितो ॥ कुळाघात होतो ऐशानेंचि ॥ ४ ॥ ह्मणुनी समुद्रीं नेउनीयां टाका ॥ अग्नींत लोटा कां दुराचारी ॥ ५ ॥ शस्त्र-घाय वरी मारारे अधम ॥ काळाग्नीते सम विष पाजा ॥ ६ ॥ पर्वतावरी नेउनियां टाका ॥ प्राण याचा घ्याका अवघे दूत ॥ ७ ॥ राजआज्ञा होतां संकोचित दूत ॥ राजा बोले त्यांतें काय पाहतां ॥ ८ ॥ दूतीं राजाज्ञेनें धरूनी हो नेतां ॥ मुखीं सा अनंता आठवितो ॥ ९ ॥ तयेकाळीं भक्त उभा निर्भय चित्त ॥ काय हो करीत हरि माझा ॥ १० ॥ नेउनीयां तीरा समु-द्राचे पाहीं ॥ ह्मणती आतांही ऐक बापा ॥ ११ ॥ येरू ह्मणे हरि असे नारायण ॥ तो मजलागून तारील हो ॥ १२ ॥ टाकितां उदकीं वरतीच राहे ॥ ह्मणती हा पाहे पोहतसे ॥ १३ ॥ तेथुनी काढितां अग्नींत टाकीला ॥ शीतळ हो झाला अग्नी स्पर्शें ॥ १४ ॥ हरिदासा काय शक्ति हो जाळाया ॥ ह्मणोनियां पायां वंदितसे ॥ १५ ॥ मुखीं हरि हरि उच्चार नामाचा ॥ गर्जे भक्त साचा सर्वां ठायीं ॥ १६ ॥ अग्नि तो शीतळ होतां मात राया ॥ ह्मणे जादु केली या दुर्जनानें ॥ १७ ॥ विष हळाहळ करुनीयां वाटी ॥ नेऊ-नियां होटीं लाविताती ॥ १८ ॥ भोक्ता नारायण ह्मणोनियां प्याला ॥ अमृत तो झाला प्रल्हादासी ॥ १९ ॥ पर्वत शिखरीं बैसउनी खालें ॥ लोटीतां हो बोले सर्व सत्ता ॥ २० ॥ जळीं स्थळीं व्यापि आहे नारायण ॥ तेथें काय होणें भय दुःख ॥ २१ ॥ पडतांचि खालीं उठोनियां उभा ॥ पाहतां हो सभा भय मानी ॥ २२ ॥ ह्मणे मारा याला शस्त्रघाय वरी ॥ धांवो-नियां चिरी महाबळें ॥ २३ ॥ हाणितां शस्त्रानें न लागती कांहीं ॥ मुखीं हरि पाही आठवीत ॥ २४ ॥ ह्मणे गजपायीं बांधोनियां मारा ॥ कुंजर ते आणा बोले राजा ॥ २५ ॥ आणोनियां हत्ती घालीत हो वर ॥ पाहे तो समोर विक्राळ सिंह ॥ २६ ॥ दाहि दिगंतर उलंघुनी गेलें ॥ उपाय न चाले

कांहीं त्यासी ॥ २७ ॥ श्रमयुक्त झाला राजा कांहीं केल्या ॥ भक्तराजा भला न ढळेचि ॥ २८ ॥ नामा ह्मणे भक्त निर्भय सर्वांसी ॥ काय हो तयासी उपेक्षी हरी ॥ २९ ॥

॥ १७५८ ॥ आघात नचले आणवी जवळीं ॥ ह्मणे कोण बळी साह्यकर्ता ॥ १ ॥ कोठें राहतो कैसा कोण सांग ॥ येरू ह्मणे वेग नाहीं कोठें ॥ २ ॥ सर्वां ठायीं आहे व्यापुनी सकळा ॥ नाहीं तो निराळा कोठें पहातां ॥ ३ ॥ जळीं काष्टीं आहे माझें अंतरंग ॥ सखा पांडुरंग मायबाप ॥ ४ ॥ ऐकतांची बोल राजा कोपावत ॥ ह्मणे तो निश्चीत काष्टीं आहे ॥ ५ ॥ सभास्तंभीं आहे संदेह तो काय ॥ ऐकतां स्वयमेव उठीयला ॥ ६ ॥ काढूनि खड्गासी मारीत स्तंभासी ॥ करीत नादासी हरिरूप ॥ ७ ॥ भक्ताच्यावचना कोरडिया काष्टीं ॥ सत्य करी गोष्टी नारायण ॥ ८ ॥ महानाद झाला त्रिभुवन भ्याला ॥ गर्भपात झाला स्वर्गलोकीं ॥ ९ ॥ फुटो पाहे अंड बुडो पाहे क्षिती ॥ ऐसी होती गति तये काळीं ॥ १० ॥ स्तंभ तो चिरला नरहरी देखिला ॥ भयाभीत झाला राजा तेव्हां ॥ ११ ॥ परी शूर क्षेत्रीं न टाकी धैर्यासी ॥ घेउनी खड्गासी धांवियला ॥ १२ ॥ धांवोनियां जातां धरिला तात्काळ ॥ चिरीतां ते वेळ मांडीवरीं ॥ १३ ॥ नखें घाय केला हृदयीं चिरीला ॥ काढी अंत्रमाळा पोटांतुनी ॥ १४ ॥ रुधिर जिव्हेनें चाटी करी शोष ॥ भय बहु त्रासें उग्ररुपी ॥ १५ ॥ मानव शरीर सिंहवदन हरी ॥ गुरगुर तो करी देवराव ॥ १६ ॥ अवतार वेळा वैशाख मासीं ॥ चतुर्दशी संधीसी अर्धबिंबीं ॥ १७ ॥ दिवा रात्रीं स्वाती नक्षत्रासी ॥ प्रगटला ज्योतीसी दैत्यहर्ता ॥ १८ ॥ घरीं ना मंदिरीं सभे ना बाहेरी ॥ उंबरीयावरीं मारीयेला ॥ १९ ॥ शस्त्रानें न मरे ऐसा वर होता ॥ ह्मणोनी नखें त्याचा अंत केला असे ॥ २० ॥ वर राखोनियां केला वध पाही ॥ दासाची नवाई वाढवीत ॥ २१ ॥ शब्द जो कां झाला प्रकटतां रूप ॥ तेणें अंतराळीं अमुप नाद भरे ॥ २२ ॥ नक्षत्रें पडती भूमीं रिचवती ॥ भयेंचि खालती आघात ते ॥ २३ ॥ ब्रह्मादिकां भय त्रास उपजला ॥ धांउनीयां आला दर्शनासी ॥ २४ ॥ सहित देवगण करीत स्तुतीसी ॥ न होय शांतीसी कांहीं केल्या ॥ २५ ॥ रमा पूर्ण माये आली ते समयीं ॥ तिसी ते वैभवी साहवेना ॥ २६ ॥ तये काळीं देवीं प्रल्हाद प्रार्थीला ॥ सन्मुख गेला उग्ररूप ॥ २७ ॥ प्रेत टाकि-

येलें शांतरूप झाला ॥ प्रल्हाद पावला आनंदातें ॥ २८ ॥ पाहतांचि बाळ वोसंगा घेतला ॥ हातें कुर्वाळीला भक्तराज ॥ २९ ॥ देव सुर राज्यीं बैसउनी हरी ॥ स्वरूप संहरी उग्रभाव ॥ ३० ॥ राज्यीं बैसविला प्रल्हाद निजभक्त ॥ केली जगीं ख्यात नामा ह्मणे ॥ ३१ ॥

॥ १७५९ ॥ वर्णावया रूप कांहीं स्फुर्ती देई ॥ नरसिंह तूं होई साह्यभूत ॥ १ ॥ मुख तें सिंहाचें शरीर मानवाचें ॥ भयंकर देवाचें रूप असे ॥ २ ॥ अनंत भूषणें जडित बाहूचीं ॥ गळां पदकाची थाटी बहू ॥ ३ ॥ केशर चंदन लावियले अंगा ॥ अखंड श्रीरंगा देवाजीचे ॥ ४ ॥ नवनीत तुळशीचीं सुगंधित फुलें ॥ माळा गुंफियले चंपकानें ॥ ५ ॥ कासे पीतांबर जडित सुंदर ॥ कडदोरा अपार शोभिवंत ॥ ६ ॥ तोडर ब्रीदाचा विराजत भारी ॥ आनंदला हरि नामा ह्मणे ॥ ७ ॥

---

## ध्रुवचरित्र.

॥ १७६० ॥ राजयासी सर्व वृत्तांत ठाउका ॥ असोनी बाळका पाहीनातो ॥ १ ॥ कामीक जनासी कामची आवडे ॥ स्त्रीमोहानें वेडे झाले बहु ॥ धृ० ॥ रावणानें वेदां ऋचा पदें केलीं ॥ सीते लागीं आली भ्रांती कैसी ॥ २ ॥ पाराशरा ऐसा दासीसी शमन ॥ हें नव्हे बोलणें आश्चर्याचें ॥ ३ ॥ विश्वामित्र झाला रंभेपाठी श्वान ॥ सांडोनी अभिमान तपाचाही ॥ ४ ॥ नामा ह्मणे कोण तयासी टाळील ॥ प्रारब्ध करील तेंची खरें ॥ ५ ॥

॥ १७६१ ॥ पतीव्रता मोठी सुमती सुंदरी ॥ वाचेनें उच्चारी गुणदोष ॥ १ ॥ संचित क्रियमान वाहोनीयां सकळ ॥ प्रारब्ध केवळ सारीतसें ॥ धृ० ॥ गातें हरिनाम अखंड अंतरीं ॥ प्राणेश्वरावरी भाव निका ॥ २ ॥ बाळकाची कळा ठाउकी तियेसी ॥ जीवें प्राण पोसी निरंतरा ॥ ३ ॥ नामा ह्मणे काळ कल्याणाचा तिला ॥ ह्मणोनी जाहला हरिभक्त ॥ ४ ॥

॥ १७६२ ॥ लागलें वरुष पांचवें बाळासी ॥ खेळेतो मुलांसी नेटें पाटें ॥ १ ॥ पाहाती ते लोक विस्मय पावती ॥ त्याची अंगकांती कोण वाणी ॥ धृ० ॥ चंद्रा ऐसें मुख पंकजलोचन ॥ धैर्यासी मंडण तोचि एक ॥ २ ॥

सांवळा सुकुमार उद्धर गोजिरा ॥ बुद्धीचा अंतरा बोधवीत ॥ ३ ॥ वीर्य-धैर्य पाइक जयाचा ॥ नामा ह्मणे वाचा वर्णवेना ॥ ४ ॥

॥ १७६३ ॥ मातेलागी पुसे पिता माझा कोण ॥ ते ह्मणे वचन ऐक बाळा ॥ १ ॥ क्षिराब्धीपासोनी चंद्रमा कां जैसा ॥ होसी तूंही तैसा राजपुत्र ॥ धृ० ॥ तरी कां आह्मां त्यानें टाकीलें निवडोन ॥ संचित ते ह्मणे पूर्वकर्म ॥ २ ॥ जाऊं भेटूं त्याला बोलवूं कां मागें ॥ नको बा तुज काय उणें असे ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसा दोघांचा संवाद ॥ झाला मनीं खेद सुमतीसी ॥ ४ ॥

॥ १७६४ ॥ कोणे एके दिवशीं खेळत खेळत ॥ गेला सभेआंत राजयाच्या ॥ १ ॥ पाहीलें राजानें ओळखीला पुत्र ॥ झळंबलें गात्र आवडीनें ॥ धृ० ॥ गोजीरा गोमटा शाहाणा चपळ ॥ नेत्र ते विशाळ पुंजाळले ॥ २ ॥ नामा ह्मणे चंद्र पूर्णमेचा पाहातें ॥ समुद्रा ये भरतें तैसें झाले ॥ ३ ॥

॥ १७६५ ॥ पाचारीलें ध्रुवा जवळी सा रायानें ॥ जाणोनी सन्मानें आला पाशीं ॥ १ ॥ संतोष तो कांहीं बोलवेना वाचे ॥ उदार प्रेमाचें झळंबती ॥ धृ० ॥ अंकीं बैसवितां कैसा तो शोभला ॥ कोंदण रत्नाला जयापरी ॥ २ ॥ चुंबोनिया मुख पुसतो मंजुळ ॥ मी कोण तें नकळे तुज कांहीं ॥ ३ ॥ तो ह्मणे आहेसी तात तूं निष्ठुर ॥ आह्मांसी बाहेर ठेवीयेलें ॥ ४ ॥ राजा ह्मणे काय जाहालें तयासी ॥ होसी तूं राज्यासी अधिकारी ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसा दोघांचा उद्गार ॥ लोटो आला पूर आनंदाचा ॥ ६ ॥

॥ १७६६ ॥ सापत्न माउली होती वोंवरींत ॥ ऐकीला भावार्थ दोघांचाही ॥ १ ॥ बुद्धीचा कांतर बुब्दुदला मोठा ॥ चावीतसे ओंठा निष्ठुर ते ॥ धृ० ॥ साहवेना ऐसा कोप उपजला ॥ चित्तासी वाटला खेद बहु ॥ २ ॥ निघुनी ते वेगी आली रायापाशीं ॥ ह्मणे या पोरासी कां घेतलें ॥ ३ ॥ मांडी बैसवीसी लाडानें बोलवीसी ॥ पाहूं आतां कैसी लोचनीं मी ॥ ४ ॥ शरीर त्यागावें कीं त्यासी मारावें ॥ हेंची जीवेंभावें वाटे मना ॥ ५ ॥ मागेंपुढें कांहीं न पाहे दृष्टीस ॥ लोटीलें बाळक पायें तिनें ॥ ६ ॥ नामा ह्मणे राजा तियेचा अंकिला ॥ झाला चाकाटला आपुल्या ठायीं ॥ ७ ॥

॥ १७६७ ॥ बाईल आधीन होती जे कां नर ॥ ते ह्मणो पामर श्वान-रूपें ॥ १ ॥ नेणती स्वहित कामाचिया वृत्ती ॥ प्रवृत्ति निवृत्ति सोडोनिया ॥ धृ० ॥ इष्ट मित्र गुरु ऐसा कैसा भाव ॥ सर्वही निर्वाह तेची एक ॥ २ ॥ नाचविले तिणें तैसे ते नाचती ॥ माकडाच्या गति गारुड्याच्या ॥ ३ ॥ नामा ह्मणे राजा गुंतला तियेसी ॥ शेंबुडातें माशी हालूं नेणें ॥ ४ ॥

॥ १७६८ ॥ उठवितां बाळ आक्रंदलें पोटीं ॥ निघे उठाउठी चमत्कारें ॥ १ ॥ आवसेंचा शशी तैसा राजा झाला ॥ येरु हा निघाला कळावंत ॥ धृ० ॥ आळवावा तरी धाक बाईलेचा ॥ तेणें त्याची वाचा चाकाटली ॥ २ ॥ हृदय फुटलें प्रेमही दाटलें ॥ तरी काय चाले तियेपुढें ॥ ३ ॥ सूर्यासी पडेल निधनासी भूत ॥ तैसी झाली मात राजयासी ॥ ४ ॥ नामा ह्मणे मोह खोटा हा दुर्धर ॥ त्यागावा निर्धार वेदांतीच्या ॥ ५ ॥

॥ १७६९ ॥ चालीलें बाळक रुदन करीत ॥ देखोनी गांवांत हाहाःकार ॥ १ ॥ पाहा हें रायानें मांडीलें अनुचित ॥ कासया तो भ्रांत झाला नेणों ॥ धृ० ॥ देवोनीया रत्न घेतला चिंचोका ॥ दिल्हा कवडी एका चिंतामणी ॥ २ ॥ कामधेनु नेघे पोशिले बोकड ॥ अस्पदे माकड पाळावया ॥ ३ ॥ कल्पतरु मोडी शेतां कुंपण करी ॥ तैसी झाली परी आजीची हे ॥ ४ ॥ नामा ह्मणे तिचा मोह हा दारुण ॥ राजा ती आधीन झाला तैसा ॥ ५ ॥

॥ १७७० ॥ घरा येतां बाळ देखीलें मातेनें ॥ दाटली दुःखानें बोलवेना ॥ १ ॥ आक्रंदोनी पुढें मोकळोनी धाये ॥ नेणों कैसें काय झालें यासी ॥ धृ० ॥ घालोनीयां कव घेतां कडेवरी ॥ दोन्ही नेत्र करीं पुसीतसे ॥ २ ॥ काय झालें बाळा सांग बा वृत्तांत ॥ बा कोण तूतें पाहो नेणें ॥ ३ ॥ नामा ह्मणे असो प्रेमा तो अपार ॥ पुढील विचार बोलीजेला ॥ ४ ॥

॥ १७७१ ॥ नकळतां मुलांसंगें मी खेळत ॥ गेलों सभेआंत राजयाच्या ॥ १ ॥ काय सांगो माये जाहला अपमान ॥ तेणें माझें मन दुखावलें ॥ धृ० ॥ मातें प्रेमभावें रायें आळवीलें ॥ मांडी बैसवीलें सन्मानेशीं ॥ २ ॥ आली अकस्मात दुर्धर कोपोन ॥ लांस कीं ते कोण मी तों नेणें ॥ ३ ॥ ताडोनीयां पायीं मज उठविलें ॥ निघालों मी सहजे तत्क्षणीं ॥ ४ ॥

कोणी नुठवी ऐशा ठायीं म्यां बैसावें ॥ तें कोणा मागावें सांग माये ॥ ५ ॥ नामा ह्मणे दीसे पाहातां बाळक ॥ ज्ञानची निष्टंक मुसावलें ॥ ६ ॥

॥ १७७२ ॥ ऐकोनीया वाणी पातली ते रमा ॥ बोलली विश्रामा जीवाचीया ॥ १ ॥ दुर्जनाचा भाव ऐसाची वोखटा ॥ दर्प त्याचा मोठा आवरेना ॥ धृ० ॥ दुसऱ्याचें बरें तें कैसें सोशीती ॥ बळें निखंदीती साटोपानें ॥ २ ॥ दीपाचा प्रकाश सोसीना पतंग ॥ जळताही अंग झेंप घाली ॥ ३ ॥ चंद्रोदया आधी फुटतील डोळे ॥ ते काय कावळे पाहतील चंद्र ॥ ४ ॥ आधींच सावत्र संबंधी पापीण ॥ राजाही आधीन जिच्या झाला ॥ ५ ॥ सिंहासनीं याच्या मांडीये बैससी ॥ हें ते कैसें सोसी निसंगळ ॥ ६ ॥ दैवहीन आह्मीं देवची कोपला ॥ आपुला तो झाला परावा कीं ॥ ७ ॥ देवें द्यावें तेव्हां भोगावें सकळ ॥ नचले कदां बळ दुसऱ्याचें ॥ ८ ॥ कासया तूं बाळा स्फुंदसी दुःखानें ॥ देवाहून कोण सखे आह्मां ॥ ९ ॥ नामा ह्मणे हित ऐकतां मायेचें ॥ चित्त त्या बाळाचें उठावलें ॥ १० ॥

॥ १७७३ ॥ पूर्वजन्मीं त्यानें साधियेला योग ॥ कांहींसा वियोग झाला होता ॥ १ ॥ केसा नेटे पाटे उन्मेख फुटला ॥ बाळपणीं त्याला ज्ञान झालें ॥ धृ० ॥ विरक्ती वोळगे पाइक होउनी ॥ शांती पुढारानी माळ घाली ॥ २ ॥ शमदम अंकित पुढारले बळें ॥ योग तो अढळ सदां तेथें ॥ ३ ॥ मान गर्व मनाचा खुटला विचार ॥ थिता अहंकार तोही गेला ॥ ४ ॥ नामा ह्मणे बाळ बोलिलें जाणोनी ॥ माउली हांसोनी काय बोले ॥ ५ ॥

॥ १७७४ ॥ संकल्पाचा मळु नेत्रीं नीडारला ॥ त्यालागीं तो डोळा काय दिसे ॥ १ ॥ जेथें देखों तेथें तोचि तो कोंदला ॥ विश्वामाजीं भरला विश्वंभर ॥ धृ० ॥ मोठे थार थोर तापसी नाडीले ॥ कामानें वोढिले मायेतेची ॥ २ ॥ वेदाचें पुनीत यज्ञशीळ सारें ॥ झकवती बारे वास नेणें ॥ ३ ॥ दांभीक मगरी गीळिले सर्वांसीही ॥ त्यालागीं तो नाहीं ऐसा भासे ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसी बोलली जननी ॥ बाळ मोठा ज्ञानी जाणवला ॥ ५ ॥

॥ १७७५ ॥ केला नमस्कार मातेला उठोनी ॥ निघाला तेथुनी लागवेगें ॥ १ ॥ वनीं बैसोनीया धरोनी विश्वास ॥ आळवावा ईश ऐसें

चित्तीं ॥ धृ० ॥ हाक मारीत मागें माउली चालली ॥ तियेसवें बोली करीना ते ॥ २ ॥ एकाकी तो नीट चालीला त्वरेनें ॥ पाहोनिया जन स्तब्ध झाले ॥ ३ ॥ बोलवीतां कांहीं बोलेना कोणासी ॥ अघोर स्थळासी प्रवेशला ॥ ४ ॥ मातेसी ठाऊकें तयाचें अंतर ॥ ह्मणोनी ते स्थिर झाली ठाई ॥ ५ ॥ नामा ह्मणे पूर्व पुण्याचिया बळें ॥ मन त्याचें झालें स्थीर तेथें ॥ ६ ॥

॥ १७७६ ॥ नगरीं नरनारी समस्तही ॥ ह्मणती झालें कांहीं राजयाला ॥ १ ॥ बाळ तें केवढें धाडीलें वनासी ॥ याचीया धैर्यासी दुजा नाहीं ॥ धृ० ॥ मागें बहु झालें नाहीं हें देखीलें ॥ हें तों नव्हें भलें विचारीतां ॥ २ ॥ सर्वांदिकीं त्यासीं सांगितली वृत्त ॥ कांरे तूं निवांत बैसलासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे राजा ध्रुवापाठीं गेला ॥ काय तो बोलीला ऐका सासी ॥ ४ ॥

॥ १७७७ ॥ ह्मणे बा आतां करिशील कायी ॥ एकला ये ठायीं येउनीया ॥ १ ॥ वय हें केवढें बुद्धि हे केवढी ॥ वायां काढाकाढी तपाचीकां ॥ धृ० ॥ व्याघ्र आणि सिंह जंबुक विखार ॥ नांदती या घोर वनामाजीं ॥ २ ॥ म्हैषा मसको भूतें वसती रानीं ॥ तुज माये रानीं झोंबतील ॥ ३ ॥ नकोबा या ठाईं राहूं चाल घराप्रती ॥ जाऊं जोकां प्रीति तेची देऊं ॥ ४ ॥ नामा ह्मणे ध्रुव पाहेना बोलेना ॥ आपुलीया ध्यानामाजीं मग्न ॥ ५ ॥

॥ १७७८ ॥ मधुवन चांगलें लोचनीं देखीलें ॥ तेथें मन रंगलें बाळकाचें ॥ १ ॥ राहूं येथें करूं देवाची प्रार्थना ॥ ह्मणोनीया मना बोधवीत ॥ धृ० ॥ सरोवर दिव्य त्यामाजीं कल्हारें ॥ भोंवताले मयुर नाचताती ॥ २ ॥ साउली सुंदर सुमनें मनोहर ॥ देवाचा विहार तयेठायीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसा निश्चय नेमून ॥ ध्रुव तये वनीं स्थिरावला ॥ ४ ॥

॥ १७७९ ॥ राजा ह्मणे बाळा देतों पंच ग्राम ॥ तो ह्मणे आत्माराम देता आहे ॥ १ ॥ आशा सांडोनीया निराश जाहला ॥ शरण देवाला जावयासी ॥ धृ० ॥ चतुर्थ भागानें राज्य घे वांटोनी ॥ ह्मणे चक्रपाणि देता आहे ॥ २ ॥ अर्धं भूमंडळ घेईरे उदारा ॥ ह्मणे विश्वंभरा लाज माझी ॥ ३ ॥ संपूर्ण हे महि तुजची वोपीन ॥ ह्मणे नारायण सांभा-

ळील ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसा गणीना भूपातें ॥ निश्चय चित्तांत एक झाला ॥ ५ ॥

॥ १७८० ॥ बाळकाच्या बोला राजा भांबावला ॥ ह्मणे झालें याला ज्ञान गम्य ॥ १ ॥ शांती याचे अंगीं बाणलीसे नीट ॥ तेणें नेटेपाटे पुढारला ॥ धृ० ॥ मी तों झालों वाया कामाचा किंकर ॥ केला म्यां अव्हेर बाळकाचा ॥ २ ॥ कीर्ति हे त्यागोनी दुर्दशा आणिली ॥ ऐसी होऊं सरली बुद्धि फिकी ॥ ३ ॥ नामा ह्मणे राजा लाजला चित्तांत ॥ प्राणावीण प्रेत तयापरी ॥ ४ ॥

॥ १७८१ ॥ ठेवुनी भोंवताले रक्षणाला दूत ॥ सांगतो तयातें सत्ता-रूपें ॥ १ ॥ तुह्मी आतां याचें करावें रक्षण ॥ व्याघ्र सिंह येणें बाधा नव्हे ॥ धृ० ॥ क्षणक्षणा मातें सांगावा वृत्तांत ॥ वनीं भूत प्रेत हिंडताती ॥ २ ॥ चोर हेर खळ रात्रिचीये वेळे ॥ रहावें भोंवताले सावधान ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगे त्या दूतांसी ॥ आपण घरासी येता झाला ॥ ४ ॥

॥ १७८२ ॥ येरु तो निवांत होउनी त्याठायीं ॥ राहोनीया कांहीं करिता झाला ॥ १ ॥ नकळे भक्तिभाव ध्यावें कैसें त्यासी ॥ देव कोण त्यासी ठावें नाहीं ॥ धृ० ॥ भावार्थानें सर्व इंद्रियें खुटलीं ॥ प्रारब्धानें दिल्ही वाट तया ॥ २ ॥ साध्यसाधनाचा उपाव कळेना ॥ ध्यानतो धारणा कैंची तेथें ॥ ३ ॥ नामा ह्मणे गुरु करावा तें नेणें ॥ अद्भुत विंदान मांडीयेलें ॥ ४ ॥

॥ १७८३ ॥ वाचितां अध्यात्म जाणीतांही अर्थ ॥ गुरुवीण व्यर्थ सर्व कांहीं ॥ १ ॥ करावा तो आधीं सद्गुरु प्रसन्न ॥ त्याचीये कृपेनें सर्व साधे ॥ धृ० ॥ योग याग तपें चित्त शुद्ध होय ॥ गुरुवीण नये मोक्ष हातां ॥ २ ॥ निर्मळ जीवन तीर्थावीण पावन ॥ तैसा गुरु जाण साधकांसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे गुरु कृपेचीया बळें ॥ मूर्खही तरेल भाक माझी ॥ ४ ॥

॥ १७८४ ॥ एकाएकीं दैव उदेलें ध्रुवाचें ॥ येणें नारदाचें झालें तेथें ॥ १ ॥ देखीयेलें पोर टाकलेसें वनीं ॥ भावना धरोनी अपसया ॥ धृ० ॥ साधूचा भाव उदकाचीया परी ॥ लव तेथें भरी उणें नाही ॥ २ ॥ आर्तीचा हे आर्त पुरवावा हा नेम ॥ साधूचा निःसीम स्वभाव कीं ॥ ३ ॥

गिरी देखे मेघ मग तो कैसा थोर ॥ तैसे ते उदार साधुसंत ॥ ४ ॥ आतां या बाळाचा योग क्षेम कैसा ॥ पुसावया धींवसा नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ १७८५ ॥ धन्य धन्य साधु वर्तति भूतळीं ॥ जे कां भाळीभोळी तारावया ॥ १ ॥ जयाच्या दर्शनें पातकाची धुणी ॥ होय तो सज्जनीं मान्य सदां ॥ धृ० ॥ विश्वीं विश्वंभर दाखवीती पूर्ण ॥ भवाचें बंधन तोडोनीया ॥ २ ॥ जाती विजाती व्हावया मज्ञानहो ॥ एक मग मोहो सोडवीती ॥ ३ ॥ नामा ह्मणे सदां साधुसी वाणीतां ॥ वाचे पवित्रता अखंडित ॥ ४ ॥

॥ १७८६ ॥ नारदें पाहीली बाळकाची स्थिती ॥ त्याच्या चित्तीं शांती भरली दीसे ॥ १ ॥ कल्पनेचा दाणा ह्मणे तयालागीं ॥ बाळा कवणालागीं आठवीसी ॥ धृ० ॥ वय तरी थोडें भावना उदंड ॥ काय तुज चाड सांग आतां ॥ २ ॥ न बोलसी तरी साधेना हें काज ॥ अंतरींचें नीज मन कळे ॥ ३ ॥ आला लाभ काळ फळलीसे भावना ॥ उघडोनी लोचना पाहीं मज ॥ ४ ॥ ऐकोनी ध्रुवानें सज्जनाची वाणी ॥ नेत्र विकासोनी पाहे तदां ॥ ५ ॥ पुढें उभा मुनि लावण्याचा गाभा ॥ आपुलीया लाभालागी नाचे ॥ ६ ॥ नामा ह्मणे ध्रुवें वंदीले चरण ॥ बोलीलें वचन ऐका आतां ॥ ७ ॥

॥ १७८७ ॥ बैसायासी गेलों पितीयाचे अंकीं ॥ उठवीलें एकी माउलीनें ॥ १ ॥ सरेना सरेना कोणी उठवीना ॥ ऐसा ठाव जाणा वांछीतसे ॥ धृ० ॥ उपाय नकळे मागावें कोणासी ॥ भावना आपैसी उठावली ॥ २ ॥ नामा ह्मणे शब्द ऐके देवऋषी ॥ मग त्या बाळकासी आश्वासीते ॥ ३ ॥

॥ १७८८ ॥ ब्रह्मांड जयाच्या पोटीं सांठवलें ॥ तेंची साकारलें ध्रुवापाशीं ॥ १ ॥ कैसें तें बोलावें कैसें तें वानावें ॥ वेदासही ठावें नोहे जेकां ॥ धृ० ॥ निलोत्पल रवि गगनाही हिनावी ॥ ऐसी शोभा दावी इंद्रनीळ ॥ २ ॥ मरगजालागीं जोडलें सौरभ्यें ॥ आनंदाचे कोंब चारी भुजा ॥ ३ ॥ मुगुट कुंडलें सर्वांगीं भूषण ॥ लेणीयासी लेणें अंगाचीया ॥ ४ ॥ इंद्रधनुष्याची मांडणी मेघाची ॥ माळ वैजयंतीची गळा रुळे

॥ ५ ॥ कस्तुरी कपाळीं रेखलीसे भाळीं ॥ उटी ते पिंवळी सर्वांगासी ॥ ६ ॥ सायुध सुंदर शोभताती कर ॥ प्रभा ते अपार कोंदाटली ॥ ७ ॥ अभय हस्त एक पुढें तुकावला ॥ आपुल्या भक्ताला सांभाळाया ॥ ८ ॥ गोजिरी गोमटी ध्यानीं उभी ठेली ॥ नामया पाउली माथा ठेवी ॥ ९ ॥

॥ १७८९ ॥ ऐसें कांहीं एक अपूर्व देखीलें ॥ हृदयीं कोंदाटलें मूर्तिरूप ॥ १ ॥ परी तें कांहीं तैसें न राहे निश्चळ ॥ चित्त तें चंचळ माघारलें ॥ धृ० ॥ पुढती सायास करी नानापरी ॥ न राहे अंतरीं साचोकारें ॥ २ ॥ आवडीनें जीव झाला कासावीस ॥ तंव त्या परेशास कृपा आली ॥ ३ ॥ ब्राह्मणाचें रूप उभा ठेला पुढें ॥ निज भक्तांचें कोडें पुरवावया ॥ ४ ॥ कपोलासी शंख लावीला स्वहातें ॥ तेव्हांची तयातें ज्ञान झालें ॥ ५ ॥ वैकुंठ पीठीचें अधिष्ठान साचें ॥ तें रूप तयाचें दृष्टी पडे ॥ ६ ॥ नामा ह्मणे काय सांगावा नवलावो ॥ भक्तांलागीं देवो साहकारी ॥ ७ ॥

॥ १७९० ॥ स्तवीतसे वाचें जोडोनीया कर ॥ वेदा अगोचर ऐसें कांहीं ॥ १ ॥ धन्य धन्य आतां उद्धरलों स्वभावें ॥ माझें मज ठावें झालें निज ॥ धृ० ॥ विश्वाच्या विसांव्या जीवाचीया जीवा ॥ देवाचीया देवा दीनानाथा ॥ २ ॥ तूंची सर्वां आदीमायेची अवधी ॥ तुजवीण कधीं दुजे नाहीं ॥ ३ ॥ एक तूं अनेक अनेकी तूं एक ॥ येणेंही साशंक बोलवेना ॥ ४ ॥ दातृत्वाची आदी कल्याणाची निधी ॥ चित्त मन बुद्धि सर्व तूंची ॥ ५ ॥ तुझीये कृपेनें गेले भावाभाव ॥ आणीक मागावें ऐसें नाहीं ॥ ६ ॥ कधींही कोणता चळेना ढळेना ॥ मातें ऐशा स्थाना बैसवावें ॥ ७ ॥ नामा ह्मणे ऐसी करीत प्रार्थना ॥ घाली लोटांगणा पायांवरी ॥ ८ ॥

॥ १७९१ ॥ आश्वासोनी देव बोलिले ध्रुवासी ॥ इच्छा तुझी जैशी तैसें करूं ॥ १ ॥ सहज सत्तेनें ऐसें कांहीं जहालें ॥ अढळ दिधलें बैसावया ॥ धृ० ॥ चंद्र सूर्य तारा शशि ऋषी थोर ॥ हे ज्या आधारें हिंडताती ॥ २ ॥ ब्रह्मलोक साचे परी ते न नासे ॥ ऐशा परी त्यास बैसवीलें ॥ ३ ॥ क्षतेचा दिवस योजनें उन्नती ॥ बैसवी श्रीपति ध्रुवालागीं ॥ ४ ॥ सर्वां सर्वत्रांच्या लोचना गोचर ॥ रमणीये अपार वर्णवेना ॥ ५ ॥ नामा ह्मणे दुजें वैकुंठ केवळ ॥ भक्तालागीं केलें देवरायें ॥ ६ ॥

॥ १७९२ ॥ ऐसें झालें पूर्ण ध्रुवाचें आख्यान ॥ ऐकती जर जन एका भावें ॥ १ ॥ तयावरी कृपा देवाची होईल ॥ केलें तें लाभेल सर्व काज ॥ धृ० ॥ पुत्राभिष्ट पुत्र धनाभिष्ट धन ॥ जैसें ज्याचें मन तैसें होय ॥ २ ॥ नामा ह्मणे तया कल्याण सर्वदां ॥ चिंतितां गोविंदा काम पुरे ॥ ३ ॥

---

## मिराबाई चरित्र.

॥ १७९३ ॥ राजियाची कन्या नाम मिराबाई ॥ विठोबाचे पायीं रत सदां ॥ १ ॥ मायबाप तिचे करिती कृष्णसेवा ॥ आवडीनें देवा पूजिताती ॥ २ ॥ सवें मिराबाई जात असे नित्य ॥ वेधलेसें चित्त कृष्णपायीं ॥ ३ ॥ मिरा गुणवंती लावण्याची खाणी ॥ आवडे ती मनीं मायबापां ॥ ४ ॥ ह्मणती देवा इचा करावा सांभाळ ॥ हांसे ते वेल्हाळ मिराबाई ॥ ५ ॥ मायबापें मज केलें कृष्णार्पण ॥ हरूषलें मन फार तिचें ॥ ६ ॥ वरिला म्यां आतां द्वारकेचा नाथ ॥ समाधान चित्त झालें माझें ॥ ७ ॥ आनंदानें करी देवाचें पूजन ॥ नाचे उल्हासानें प्रेमें डोले ॥ ८ ॥ संत आणि साधु येती कीर्त्तनासी ॥ आनंद मानसीं होय तिच्या ॥ ९ ॥ संताचिया पायीं मिरा असे लीन ॥ अहोरात्र ध्यान देवाजीचें ॥ १० ॥ समारंभ ऐसा होतां नित्यानित्य ॥ आनंदभरित मायबाप ॥ ११ ॥ धन्य मिराबाई भक्तीची आवडी ॥ लागलीसे गोडी देवाजीची ॥ १२ ॥ सज्जन अंतरीं संतोष मानिती ॥ निंदक निंदिती तिजलागीं ॥ १३ ॥ राजियानें कन्या देखोनी उपवर ॥ द्यावें इशी घर करोनियां ॥ १४ ॥ बोले मिराबाई ऐका तुह्मी ताता ॥ वरिला म्यां आतां चक्रपाणी ॥ १५ ॥ उभयतां तुह्मीं केलें कृष्णार्पण ॥ तें कां हो स्मरण विसरले ॥ १६ ॥ त्यानें केला असे माझा अंगिकार ॥ नका पाहूं वर दुजा आतां ॥ १७ ॥ देवावीण मज नावडे आणीक ॥ मोठें आहे सुख देवापायीं ॥ १८ ॥ फार गोडी त्यांतें वर्णितांचि नये ॥ बोलूं आतां काय एक मुखें ॥ १९ ॥ तेव्हां मातापिता करिती उत्तर ॥ बौद्ध अवतार देव झाले ॥ २० ॥ नामीं रूपीं त्याच्या असों द्यावें चित्त ॥ असे सर्व हित प्रपंचाचें ॥ २१ ॥ ओळखूनी रूप करावा संसार ॥ सर्व व्यवहार असे त्याचा ॥ २२ ॥ ऐकोनीयां ऐसें स्वहिताचे ठायीं ॥ बोले मिराबाई पितयासी ॥ २३ ॥ आधीं ज्यानें केलें

अमृत प्राशन ॥ नावडे त्या धुण कदां काळीं ॥ २४ ॥ मुंगिये लागली साखरेची गोडी ॥ आवडीनें उडी घालीतसे ॥ २५ ॥ राजहंस पक्षी मोतियांचा चारा ॥ आणिक इतरा न सेविती ॥ २६ ॥ तैसा म्यां वरिला असे हा गोविंद ॥ नका करूं शोध आणिकांचा ॥ २७ ॥ हरिविणें कांहीं नेणें मी आणीक ॥ सर्वही जन लोक माझे बाप ॥ २८ ॥ तुह्मी ह्मणा बौद्ध झाले चक्रपाणी ॥ संशय हा मनीं न धरावा ॥ २९ ॥ भाविकासी दृश्य अभाविका बौद्ध ॥ मोठा हा सावध नारायण ॥ ३० ॥ लक्ष असे ज्याचें देवाजीचे पायीं ॥ येउनीया राही हृदयांत ॥ ३१ ॥ त्याचा सर्व धंदा करी चक्रपाणी ॥ बोलिले पुराणीं व्यासादिक ॥ ३२ ॥ संशय चित्तांत नका धरूं आतां ॥ सर्वहा जाणता पांडुरंग ॥ ३३ ॥ नाम्यासंगें जेवी आवडी हा जाणा ॥ कैसें त्या ह्मणा बौद्ध आतां ॥ ३४ ॥ एकनाथा घरीं वाहातसे पाणी ॥ कैसा चक्रपाणी बौद्ध झाला ॥ ३५ ॥ कबीराचे मागीं विणितसे शेले ॥ जाटाचें राखिलें शेत तेणें ॥ ३६ ॥ आणिकही कामें भक्ताघरीं करी ॥ काय त्याची थोरी वर्णू आतां ॥ ३७ ॥ राजा ह्मणे मिरा समजली पूर्ण ॥ परी जग दूषण ठेविताती ॥ ३८ ॥ ह्मणोनिया त्यानें केली बंदोबस्ती ॥ प्रवेश तो संतीं न होयची ॥ ३९ ॥ मिराबाई ह्मणे अहो पांडुरंगा ॥ कांहो संतसंगा अंतरलें ॥ ४० ॥ संताचे संगतीं आनंद सोहळा ॥ दाखवाल डोळा केव्हां देवा ॥ ४१ ॥ कनवाळु मोठी सांवळी विठाई ॥ नेइ मिराबाई कीर्त्तनासी ॥ ४२ ॥ श्रुत झाली वार्त्ता तेव्हां राजियासी ॥ जाते कीर्त्तनासी मिराबाई ॥ ४३ ॥ क्रोधावून नृप बोले त्या कांतेला ॥ देई विष प्याला मिरालागीं ॥ ४४ ॥ लौकिकाची लाज सांडियेली तिणें ॥ उपाय करणें हाचि आतां ॥ ४५ ॥ तेचि वेळीं प्याला भरोनिया विष ॥ आली मंदिरास तेव्हां तिच्या ॥ ४६ ॥ येई मिराबाई लाविलें दूषण ॥ ऐसें सर्व जन बोलताती ॥ ४७ ॥ ह्मणोनियां नृपें दिला विषप्याला ॥ कुळासी लाविला डाग तुवां ॥ ४८ ॥ बोले मिराबाई सांवळ्या अनंता ॥ तूं एक जाणता पांडुरंगा ॥ ४९ ॥ गेला तरी जावो सुखें माझा प्राण ॥ निवारी दूषण राजियाचें ॥ ५० ॥ ह्मणोनिया नृपें दिला विषप्याला ॥ ही लाज तुजला देवराया ॥ ५१ ॥ मिरा त्याचे पोटीं झाली अपवित्र ॥ बोलती सर्वत्र जग ऐसें ॥ ५२ ॥ कळेल हो तैशी राखी याची लाज ॥ वारंवार तुज काय सांगूं ॥ ५३ ॥ करूनिया तेव्हां कृष्णाचें चिंतन ॥ प्याली आवडीनें

विषप्याला ॥ ५४ ॥ नाहीं बाधा झाली तयाची तेवेळीं ॥ मूर्ति झाली काळी देवाजीची ॥ ५५ ॥ येउनीया नृपें विलोकिलें डोळां ॥ आणिक सकळा जनानीं ते ॥ ५६ ॥ धन्य मिराबाई वंदिती चरण ॥ जन्मलें निधान वंशामाजीं ॥ ५७ ॥ मिरा वनमाळी नव्हेची वेगळी ॥ निश्चय सकळीं संतीं केला ॥ ५८ ॥ बोले मिराबाई अहो चक्रपाणी ॥ कां तुह्मी जाचणी सोसितसा ॥ ५९ ॥ प्रेमें अश्रुनीर वाहे तिचे डोळां ॥ माझा कळवळा तुह्मां आला ॥ ६० ॥ सांवळे सकुमार गोजिरे चरण ॥ इच्छितसे मन पहावया ॥ ६१ ॥ भक्तांची आवडी पुरवी केशव ॥ पूर्ववत देव झाला तेव्हां ॥ ६२ ॥ निळी रेषा असे अद्याप ते कंठीं ॥ देतां प्रीति मिठी पाहती लोक ॥ ६३ ॥ धन्य मिराबाई धन्य तिची भक्ति ॥ करिताती स्तुति साधुसंत ॥ ६४ ॥ संताचा तो दास बोले शिपिनामा ॥ त्यानें दिला प्रेमा सदां मज ॥ ६५ ॥

---

## श्रीकबीरभक्त चरित्र.

:o:

### ओव्या.

॥ १७९४ ॥ आतां ऐका कवित कबीरा ॥ राम सेवेसी तत्परा ॥ संत साधु आलिया घरा ॥ कदां पाठमोरा नव्हेची ॥ १ ॥ कोणी एके अवसरीं ॥ आहे जी माध्यान रात्रीं ॥ मिळोनी संतमांदी बरी ॥ आले घरीं कबीराचे ॥ २ ॥ तंव स्त्रीसहित उठोनी लागे संताचे चरणीं ॥ आमुचें परम भाग्य ह्मणोनी ॥ जाली भेटी स्वामींची ॥ ३ ॥ मोडकें खोपट जर्जर ॥ तेथें कैचें भिंती आवार ॥ वरुविण उपवासी पोर ॥ नांदणुक थोर कबीराची ॥ ४ ॥ तंव बैसावया करण ॥ संतांसी घातलें आसन ॥ कढिला बोऱ्या मुलें उठवून ॥ सर्वेचि आपण उभा ठेला ॥ ५ ॥ कबीर ह्मणे स्त्रियेसी ॥ कांहीं नैवेद्य करावा देवासी ॥ अवश्य ह्मणोनी त्वरेसी ॥ अंगिकारिती पैं जाली ॥ ६ ॥ बहुत संकट पडलें नारी ॥ पाहातां धन न दिसे घरीं ॥ दोन प्रहर लोटली रात्री ॥ बाजारीं कोणी असेना ॥ ७ ॥ मेघ वर्षती दारुण ॥ काळोखी पडली अति कठीण ॥ अंतरीं स्मरे राम निधान ॥ मग झडकरी जाण निघाली ॥ ८ ॥ सत्वर येउनी वाणीया आळीसी ॥ तंव कुलुपें जालीं दुकानांसी ॥ कोणी न बोलती कोणासी ॥ जन निद्रेसी प्रवर्तले ॥ ९ ॥ मग झाली हृदयीं चिंताक्रांत ॥ नामस्मरण करीत ॥ एका दुकाना आंत ॥

काय ह्मणत परीयेसा ॥ १० ॥ मग जाउनी दुकानाजवळी ॥ उघडी होती एक फळी ॥ वाणी जागत तये वेळीं ॥ अकस्मात बाळी तेथें आली ॥ ११ ॥ वाणी पुसे तूं कवणाची कवण ॥ कां आलीस रात्र करून ॥ कवण कृत्य असे तें निरोपण ॥ श्रृत करणें आह्मालागीं ॥ १२ ॥ ऐक वाणीया देउनी चित्त ॥ कबीर जाणिजे माझा कांत ॥ घरीं पाहुणे आले साधुसंत ॥ ह्मणोनी त्वरित पाठवीलें ॥ १३ ॥ पाहिजे सामुग्री आह्मांसी ॥ विलंब न करावा द्यावयासी ॥ लेख होईल ते आह्मांसी ॥ तंव दुकानासी नेलें तें ॥ १४ ॥ तंव तो नष्ट दुराचारी ॥ जाला असे कामातुर भारी ॥ कुवासना धरिली अंतरीं ॥ ह्मणे ऐक सुंदरी वचन माझें ॥ १५ ॥ जें सांगेन तें अंगिकारावें ॥ मग लागेल तितुकें न्यावें ॥ मनीं कांहीं न धरावें ॥ नाहीं तरी जावें आले वाटे ॥ १६ ॥ तंव ते सत्वधैर्याची पेटी ॥ देखुनी त्याची चंचळ दृष्टी ॥ मग ह्मणे बरवेगा सेटी ॥ वेगीं उठी देई सवदा ॥ १७ ॥ आधीं सामग्री देई आह्मांसीं ॥ कार्य संपादुन येईन त्वरेसी ॥ हें बोलणें माझें सत्य परियेसी ॥ या वचनासी नटळे गा ॥ १८ ॥ तंव तो अविश्वासी नर ॥ तयास कैसी बुद्धि विचार ॥ ह्मणे मज भाक देई वो सत्वर ॥ तरीच खरें वाटे गे आह्मालागीं ॥ १९ ॥ मग भाक देऊनिया नारी ॥ सर्व सामग्री घेतली पदरीं ॥ तेथून निघाली झडकरी ॥ आली घरीं तात्काळ ॥ २० ॥ मग उभय वर्ग मिळून ॥ केलें संतचरण क्षाळण ॥ घेतलीं तीर्थें समाधान ॥ पूजाविधान आरंभिलें ॥ २१ ॥ केल्या गंधाक्षता समस्तासी ॥ धूप दीप ओवाळिले संतांसी ॥ झाला नैवेद्य अवघीयासी ॥ मग नमस्कारासी प्रवर्तले ॥ २२ ॥ केले नमस्कार एकंदर ॥ मनीं आनंदला कबीर ॥ ह्मणे धन्य भाग्य आजी थोर ॥ करून नमस्कार प्रवर्तले ॥ २३ ॥ सर्व सांग विधी झाली ॥ आनंदाची घडी लोटली ॥ संतवृंदें संतोषलीं ॥ समाधिस्थ झालीं सुखें ॥ २४ ॥ ऐसा संत सत्कार सांभाळिला ॥ मग कबीर स्त्रियेनें खुणविला ॥ आतां पाहिजे निरोप दिधला ॥ शब्द गुंतला आजी माझा ॥ २५ ॥ तुह्मी आसीजे संतांपासीं ॥ मज सत्य करणें वचनासी ॥ भाक देऊनिया वाणीयासी ॥ सामुग्रीसी आणिलें ॥ २६ ॥ त्याचे मनोरथ पूर्ण करणें ॥ ह्मणोनी लागे मज जाणें ॥ उशीर होतां उगवेल दिन ॥ शिणतील नयन वाणीयाचे ॥ २७ ॥ कबीर ह्मणे वो कांते ॥ मी येईन तुज संगातें ॥ मेघ वर्षती अपरमित ॥ निशी बहुत झाली असे ॥ २८ ॥ त्या वाणीयाचा उपकार ॥ आह्मांवरी झाला थोर ॥

मग स्कंदीं वाहोन सुंदर ॥ वेगें सत्वर निघाला ॥ २९ ॥ उभयतां करताती स्मरण ॥ हृदयीं आठविला रघुनंदन ॥ घरीं समाचार न घेतां जाण ॥ कोपती सज्जन आह्मांवरी ॥ ३० ॥ मग येऊनि दुकानापासी ॥ आणोनी सोडिलें स्त्रियेसी ॥ ह्मणे सत्य करावें भाकेसी ॥ वाणीयासी सुख द्यावें ॥ ३१ ॥ वाणी पाहात होता वाट ॥ ह्मणे रात्रीं येऊनिया धीट ॥ कैसी ठकून गेली नष्ट ॥ तंव अवचट आली पुढें ॥ ३२ ॥ मग हर्ष झाला वाणीयासी ॥ भीतरीं येई वो गुणरासी ॥ तंव आशंका झाली मानसीं ॥ नवल तुजपासी दिसतसे ॥ ३३ ॥ बैसली स्वस्थानीं दोघेजणें ॥ उपरी आरंभिलें बोलणें ॥ कोरडी आलीस कवण्या गुणें ॥ मृत्तिका चरणीं न लागेची ॥ ३४ ॥ वरुनी वर्षताती मेघ ॥ जाला कर्दम वाहाती वोघ ॥ कैसें कौतुक झालें तें सांग ॥ आतां वेगें करूनिया ॥ ३५ ॥ ऐकगा शेटीया धर्मवंता ॥ बोलती झालीगा कबीर कांता ॥ तुझा उपकार नये सांगतां ॥ साधुसंता तृप्त केलें ॥ ३६ ॥ झालें संतसमाधान ॥ हें तव तुझेंची पुण्य ॥ मी नव्हें उपकारा उत्तीर्ण ॥ सत्वरक्षण तुझेनी ॥ ३७ ॥ कबीर जीवाचा जीवलग ॥ मज स्कंधीं वाहुनी चांग ॥ वरुनी झांकिलें सर्वांग ॥ आणिलें वेगें तुजपासी ॥ ३८ ॥ आपण गेले हो त्वरित ॥ घरीं एकले साधुसंत ॥ आतां सांडीगा चित्ताची भ्रांत ॥ पुरवी मनोरथ आपले ॥ ३९ ॥ ऐसें बोलतांच सुंदरा ॥ तंव वाणी कांपतसे थरथरा ॥ धिक् माझें जन्म दातारा ॥ विषय व्यभिचारा प्रवर्तलें ॥ ४० ॥ मी मतीहीन अज्ञान भारी ॥ कुबुद्धि अमंगल शरीरीं ॥ व्यर्थ भूमीभार संसारीं ॥ मग अंतरीं पस्तावला ॥ ४१ ॥ होतांविषयभाव मनीं ॥ तो गळीत झाला तत्क्षणीं ॥ मग धावुनी लागला चरणीं ॥ मजलागुनी उद्धरावें ॥ ४२ ॥ अन्याय झाला माते ॥ सर्व शब्द क्षमा करी वो दुरिते ॥ हे माते पुण्य पवित्रे धैर्यवंते ॥ मी मोहीत मूढमति ह्मणोनिया ॥ ४३ ॥ आतां मज आणि कबीरासी ॥ भेट करवी दोघांसी ॥ मज उद्धरावें त्वरेसी ॥ ह्मणोनी चरणामिठी घाली ॥ ४४ ॥ मग ह्मणे भला भला गा शेटी ॥ बरवा भाव धरिला पोटीं ॥ आतां चला उठाउठी ॥ करीन भेटी कबीरासी ॥ ४५ ॥ मग उठोनी दोघेजण ॥ त्वरें आटोपिलें दुकान ॥ वेगें चालिले टाकिलें भुवन ॥ देखिले चरण कबीराचे ॥ ४६ ॥ घातले दिर्घ दंडवत नमस्कार ॥ ह्मणे मी अपराधी थोर ॥ माझा करावा जी उद्धार ॥ अभयकर ठेवुनीया ॥ ४७ ॥ कबीर अंतरज्ञानी पूर्ण ॥ ओळखिलें तयाचें

चिन्ह ॥ मग स्वकरें कुरवाळून ॥ दिधलें दान अक्षयीं ॥ ४८ ॥ कबीरभक्त ज्ञान विश्वासी ॥ सदां संतुष्ट आणि उदासी ॥ झाला रूप स्वयंप्रकाशी ॥ उडाला भाव द्वैताचा ॥ ४९ ॥ येथूनी कथा रसाळ पुढती ॥ एकाग्र होवोनी परिसिजे श्रोतीं ॥ नामा सांगे भक्तांची विभूति ॥ होय सुखप्राप्ति स्वानंदें ॥ ५० ॥ इती श्री ग्रंथ नामावळी ॥ जे प्रार्थना करती प्रातःकाळीं ॥ तयाच्या पापाची होय होळी ॥ होय अक्षयीं दास रामाचा ॥ ५१ ॥

---

## कमाल चरित्र.

---

॥ १७९५ ॥ कबीराचे घरीं आले संतजन ॥ रात्र झाली जाण प्रहर एक ॥ १ ॥ उठोनी कबीर संतां नमन केलें ॥ बैसावया दिलें तृणासन ॥ २ ॥ कांतेसी ह्मणत संत उपवासी ॥ यांसी भोजनासी घालावें हो ॥ ३ ॥ अवश्य ह्मणे कांता एक युक्ति करा ॥ कमाल दुसरा घेउनी संगें ॥ ४ ॥ ऐशा समयांत वाणी ते निद्रिस्थ ॥ जाऊं चला तेथें चोरीलागीं ॥ ५ ॥ चोरूनिया धान्य घेउनीया यावें ॥ संतांसी घालावें भोजनासी ॥ ६ ॥ घेऊनिया शस्त्र उभयतां निघाले ॥ घर तें फोडिलें वाणियाचें ॥ ७ ॥ प्रथम देखिली द्रव्याची ते रासी ॥ नये उपयोगासी आमुचिया ॥ ८ ॥ पुढें तें देखिलें डाळ आणि पीठ ॥ आनंदलें मोठें मन त्यांचें ॥ ९ ॥ सर्वही साहित्य होतें वाण्या घरीं ॥ कमाल अंतरीं संतोषला ॥ १० ॥ संतांचे पुरती सामोग्री घेतली ॥ मोट ते बांधिली बरी तेणें ॥ ११ ॥ घेउनिया मोट गवाक्षद्वारें ॥ कबीराचे करें दिली तेणें ॥ १२ ॥ मोकळ्या पडल्या द्रव्याचिया रासी ॥ सावध वाण्यासी करुनी येतों ॥ १३ ॥ येवोनी कमाल वाणियासी बोले ॥ सांभाळ आपुलें द्रव्य आतां ॥ १४ ॥ आइकोनी शब्द वाणी जागा झाला ॥ कमाल चालिला तेथूनिया ॥ १५ ॥ तांतडीनें निघतां गवाक्षाचे द्वारें ॥ अर्ध तें शरीर गुंतलेंसें ॥ १६ ॥ त्वरें करोनिया वाणी तो धांवला ॥ कमाल धरिला पायीं तेणें ॥ १७ ॥ तेव्हां तो कमाल ह्मणे कबीरासी ॥ न सोडी मजसी वाणी आतां ॥ १८ ॥ आतां तात तुह्मी कापा माझें शीर ॥ जावें हो सत्वर धांवोनिया ॥ १९ ॥ न कापितां शीर होईल फजिती ॥ घरासी न येती संत कोणी ॥ २० ॥

खरें मानूनिया काढियेलें शस्त्र ॥ कापियेलें शीर कमालाचें ॥ २१ ॥ त्वरें करोनिया कबीर चालिला ॥ आश्रमासी गेला आपुलिया ॥ २२ ॥ झाला जो वृत्तांत सांगे कांतेलागीं ॥ येरी ह्मणे वागीं बरें केलें ॥ २३ ॥ धन्य तो कमाल धन्य त्याची भक्ति ॥ देह संताप्रती अर्पियेला ॥ २४ ॥ याचा खेद स्वामी न धरावा चित्ता ॥ सामोग्री हे संतां अर्पा तुह्मी ॥ २५ ॥ देवोनी सामोग्री संतांसी तो ह्मणे ॥ करावें भोजन स्वामी आतां ॥ २६ ॥ घेवोनी सामोग्री केलेंसे भोजन ॥ करिती कीर्तन नामघोष ॥ २७ ॥ इकडे वाणीयानें केलासे गलबला ॥ चोर धरियेला धांवा धांवा ॥ २८ ॥ धांवोनिया आले नगरीचे लोक ॥ पाहती अनेक तयालागीं ॥ २९ ॥ रुंड असे तेथें त्यासी नाहीं शीर ॥ करिती विचार एकमेक ॥ ३० ॥ ह्मणती वाण्यासी काय तुझें नेलें ॥ शोधोनी पाहिलें मग त्यानें ॥ ३१ ॥ सर्वस्वही आहे नेलें डाळ पीठ ॥ साहित्य तें मिष्ट भोजनाचें ॥ ३२ ॥ श्रुत झाली वार्ता गांवीच्या राजाला ॥ ह्मणे त्या चोराला शूळीं घाला ॥ ३३ ॥ राजदूत तेव्हां आले धांवोनिया ॥ रुंड घेवोनिया चालीले ते ॥ ३४ ॥ शूळ तो रोंविला भागीरथी तीरीं ॥ रुंड तयावरी घातलें तें ॥ ३५ ॥ पाहाती ते जन सर्व नागरीक ॥ करील कवतुक पांडुरंग ॥ ३६ ॥ कबीरासी संत आशीर्वाद देत ॥ कृपा सदोदित असो द्यावी ॥ ३७ ॥ वैष्णवांचा मेळा पुसोनी चालिला ॥ कबीर निघाला बोळवीत ॥ ३८ ॥ करिती गजर हरीच्या नामाचा ॥ पंथ भागिरथीचा धरिला त्यांनीं ॥ ३९ ॥ भागिरथी तीरीं रोंविलासे शूळ ॥ नयनीं सकळ पाहाती संत ॥ ४० ॥ शूळावरी रुंड देखिलें नयनीं ॥ हात जोडुनी दोन्ही नमस्कारी ॥ ४१ ॥ सर्वत्रीं देखिलें आपुलिया डोळां ॥ जीव निर्जिवाला आला कैसा ॥ ४२ ॥ वैष्णव पुसती कबीरालागोनी ॥ विपरीत करणी कैसी झाली ॥ ४३ ॥ तेव्हां तो कबीर बोलतसे संतां ॥ चोर हा देखीला हरिभक्त ॥ ४४ ॥ तुह्मांपाशीं याचें गुंतलें संचित ॥ ह्मणुनी दंडवत केलें यानें ॥ ४५ ॥ तंव त्या संतांनीं घेतलीसे आळी ॥ उठवी वनमाळी यासी आतां ॥ ४६ ॥ तंव या कबीरें श्रुत केली वार्ता ॥ तेव्हां त्या हो संतां समजलें ॥ ४७ ॥ तेव्हां ते वैष्णव बोलती सकळ ॥ आणा शिरकमळ तुह्मी येथें ॥ ४८ ॥ इकडे मातेनें कमालाचें शीर ॥ घेवोनी धणीवर पाहे दृष्टीं ॥ ४९ ॥ ह्मणे धन्य बाळा येउनी पोटाशी ॥ उभय कुळांसी उद्धरिलें ॥ ५० ॥ संतांचिया काजा वेंचिलासी प्राण ॥ जगीं तूंचि धन्य ह्मणविलें ॥ ५१ ॥

वैकुंठींचा वासी झालासी मिराशी ॥ आह्मा पतितांसी सोडियेलें ॥ ५२ ॥ तुजसवें मज जावें बा घेवोनी ॥ करी विनवणी पांडुरंगा ॥ ५३ ॥ तुजविण मज न गमे सखया ॥ येई तूं तान्हया धांवोनिया ॥ ५४ ॥ हरणी चुकली जैसी कां पाडसा ॥ दश दिशा ओसा तिजलागीं ॥ ५५ ॥ तैसें मज झालें न गमेचि कांहीं ॥ भेट माझे आई कमाला तूं ॥ ५६ ॥ काय तुझे गुण आठवूं मी आतां ॥ सत्वधारी सुता कबीराच्या ॥ ५७ ॥ नाशवंत देह त्याचा केला त्याग ॥ धन्य हें वैराग्य तुझें बापा ॥ ५८ ॥ ऐसी तेही माया करितसे शोक ॥ अकस्मात देखे कबीराला ॥ ५९ ॥ झालें वर्तमान सांगितलें तिसी ॥ चिंता हे मानसीं करूं नको ॥ ६० ॥ वेगीं देई शीर उठला कमाल ॥ संतांचा हा बोल सत्य असे ॥ ६१ ॥ सभळित शीर घेउनी कबीर ॥ संतांचिया करें दिलें तेव्हां ॥ ६२ ॥ उतरुनी रुंड वैष्णवांनीं शीर ॥ ठेविलें झडकरी नामघोषें ॥ ६३ ॥ भावाचा तो देव भक्तीचा अंकिला ॥ कमाल उठीला तेचि वेळीं ॥ ६४ ॥ हरि नामघोष करुनी गजर ॥ संतां नमस्कार केला तेणें ॥ ६५ ॥ ऐसें सकळ जनीं पाहिलें कौतुक ॥ संतांचा अधिक महिमा असे ॥ ६१ ॥ नामा ह्मणे त्याचा होईन मी दास ॥ शरण तयांस वारंवार ॥ ६७ ॥

---

## नरसी मेहताचें चरित्र.

॥ १७९६ ॥ नरसी मेहता होता सावकार॥ जुनागडीं घर महा भक्त ॥ १ ॥ वडील तयाचे करिती व्यापार ॥ गजी सावकार द्रव्य धान्यीं ॥ २ ॥ तया कुळीं झाला भक्तराज पाही ॥ धन तें सर्वही धर्म केलें ॥ ३ ॥ अकस्मात नगरींत यात्रेकरी आले ॥ द्वारके चालिले देवकाजा ॥ ४ ॥ मार्गी बहु कष्ट चोरीव आगळी ॥ ह्मणोनी मंडळी भयाभीत ॥ ५ ॥ समागमें द्रव्य निभावे कैसेनी ॥ यालागीं चिंतनीं हुंडियेचे ॥ ६ ॥ ग्रामाचे भीतरीं हिंडती घरोघरीं ॥ हुंडी द्यावी बरी द्रव्य घेई ॥ ७ ॥ ऐसें ऐकतां ते लबाड छळक ॥ उत्तर हो देख देते झाले ॥ ८ ॥ नरसी मेहता परम भक्त थोर ॥ अहे सावकार हुंडीवाला ॥ ९ ॥ तयाचे निकटी जावें बहू त्वरें ॥ तुह्मासी तो खरे वाटे लावी ॥ १० ॥ ह्मणोनी प्रेमाचे यात्रेकरी सात्रे ॥ पुसत मेहताचे घरा आले ॥ ११ ॥ देखताचि मेहता समोरा

उठोन ॥ येउनी नमन करिता झाला ॥ १२ ॥ करूनी पूजन धूपदीप सारे ॥ समर्पण बरे उपचार ॥ १३ ॥ मग करी प्रश्न काय काज बोला ॥ आज्ञा योगें भला असे तोचि ॥ १४ ॥ यात्रेकरी ह्मणे जाणें द्वारकेसी ॥ ह्मणोनी हुंडीसी करणें असे ॥ १५ ॥ तीन शतें साठ रुपये टाकीले ॥ येरु ह्मणे भलें देई हुंडी ॥ १६ ॥ तयेकाळीं हुंडी लिहिली द्वारकेसी ॥ नामा ह्मणे साची पेठ खरी ॥ १७ ॥

॥ १७९७ ॥ स्वस्ति श्रीनगर द्वारकापुरीचे ॥ श्रीरणछोडजीचे सेवेमध्यें ॥ १ ॥ दासानुदास चरणरज साचार ॥ विनंती अपार लिहितसे ॥ २ ॥ यात्रेकरी यानें राखिले रुपये ॥ तीनशतें साठ द्यावे यासी ॥ ३ ॥ ऐसें पत्र दिलें हुंडी ते लिहून ॥ नगरींचे ब्राह्मण पाचारिले ॥ ४ ॥ बोलावुनी त्यांसी वांटी दक्षणेसी ॥ यात्रेकरी यासी विस्मय वाटे ॥ ५ ॥ ह्मणती धर्मात्मा सुशील मेहता ॥ दानशूर दाता जगीं खरा ॥ ६ ॥ घेवोनी द्रव्यातें दिलें ब्राह्मणासी ॥ लिहुनी हुंडीसी दिधलें तेणें ॥ ७ ॥ नामा ह्मणे धन्य नरसी मेहता ॥ ऋणी देव होता हुंडी भरी ॥ ८ ॥

॥ १७९८ ॥ चालली ते यात्रा गेली द्वारकेसी ॥ करूनी स्नानासी नगरामध्यें ॥ १ ॥ पहावया घर दुकान हुंडीचें ॥ न दिसे हो साचें तत्क्षणी ॥ २ ॥ सायंकाळ पडला सांपडेना कोठें ॥ प्राणासी संकट देणें आलें ॥ ३ ॥ देश दूर झाला नसे खर्ची कांहीं ॥ देहपात पाहीं करीन आतां ॥ ४ ॥ करूनी नेमासी प्राण ते द्यायासी ॥ समीप तीर्थासी केलें असे ॥ ५ ॥ ऐसा भाव देव पाहुनी त्वरित ॥ आला हुडकीत तीर्थाजवळीं ॥ ६ ॥ हुंडी कोठें आहे नरसी मेहत्याची ॥ रुपये साठींची तीनशें वरी ॥ ७ ॥ रणछोड आहे नाम माझें पाहीं ॥ रुपये ते घेई देतों तुज ॥ ८ ॥ ऐकतां वचन संतोषला मनीं ॥ धरिले चरणीं प्रेमभावें ॥ ९ ॥ धन्य धन्य तूं रे पाहतां मजला ॥ घेउनी द्रव्याला आलासी रे ॥ १० ॥ देउनी रुपये दर्शन दाविलें ॥ जगविख्यात केलें मेहत्यासी ॥ ११ ॥ करूनि यात्रेसी जुनागडा आला ॥ भावें हो वंदिला मेहता तो ॥ १२ ॥ ह्मणे तुजयोगें झालें मज पाहीं ॥ दर्शन तें ठायीं रणछोडा ॥ १३ ॥ ऐकतांच वाणी प्रेम मनीं भरे ॥ धरिले चरण त्वरें तयाचे हो ॥ १४ ॥ नामा ऐसा देव ऋणी भक्तां पुरवित होता सर्व ठायीं ॥ १५ ॥

---

## जनाबाईचें चरित्र.

---

॥ १७९९ ॥ नामयाचे घरीं असे दासी जनी ॥ तिनें चक्रपाणी वश केला ॥ १ ॥ करितां कामधंदा ध्यानीं नारायण ॥ करीत चिंतन अहोरात्र ॥ २ ॥ देखोनीया भाव तिचा पांडुरंग ॥ काम करूं लागे जनीलागीं ॥ ३ ॥ रात्रीं येउनीया जनीचिया घरीं ॥ दळूं लागे हरी तिजलागीं ॥ ४ ॥ दळीतां काढिली माळ वैजयंती ॥ ठेविली परती शालजोडी ॥ ५ ॥ जनीचें आवडे देवाजीस नाणें ॥ झालासे तल्लिन पांडुरंग ॥ ६ ॥ प्रातःकाळ झाला तेव्हां त्या समयासी ॥ जात हृषीकेशी तातडीनें ॥ ७ ॥ घेऊनिया गेले जनीची वाकळ ॥ विसरले माळ शालजोडी ॥ ८ ॥ तेव्हां पुजाऱ्यानें उघडिलें द्वार ॥ पाहिला तो वर रुक्मिणीचा ॥ ९ ॥ देवाच्या अंगावर देखिली वाकळ ॥ नाहीं गळां माळ शालजोडी ॥ १० ॥ एकमेकां तेव्हां पुसती पुजारी ॥ कोणें केली चोरी देवाजीची ॥ ११ ॥ शोध करितांना जनीची वाकळ ॥ आले ते सकळ तिच्या घरीं ॥ १२ ॥ शालजोडी माळ होती तिचे घरीं ॥ दाविती पुजारी सर्वांलागीं ॥ १३ ॥ बांधियेली तेव्हां त्यांनीं दासी जनी ॥ नामया लागुनी श्रुत केलें ॥ १४ ॥ नामा ह्मणे जने कांगे केली चोरी ॥ बोलतसे खरें जनी त्यासी ॥ १५ ॥ रात्रीं माझ्या घरां आले पांडुरंग ॥ दळीतां श्रीरंगा घाम आला ॥ १६ ॥ काढियेली माळ तेव्हां शालजोडी ॥ गातसे आवडी मजसवें ॥ १७ ॥ प्रातःकाळीं देव गेले ते उठोनी ॥ नकळे करणी कैसी केली ॥ १८ ॥ बाबा मी सांगतें हेंचि हो प्रमाण ॥ पुसावें जाऊन पांडुरंगा ॥ १९ ॥ नामा ह्मणे तुह्मा कळेल तैसें करा ॥ नका या विचारा पुसों मज ॥ २० ॥ नामा ह्मणे जने केलें असें कर्म ॥ जाणे एक वर्म पांडुरंग ॥ २१ ॥ धमकावुनी नेली त्यांणीं दासी जनी ॥ सकळ ब्राह्मणीं मिळोनिया ॥ २२ ॥ श्रुत केली वार्ता गांवींच्या राजाला ॥ ते ह्मणे जनीला शूळीं द्यावें ॥ २३ ॥ शूळ तो रोंविला चंद्रभागेतीरीं ॥ पाहती नरनारी दृष्टी तेव्हां ॥ २४ ॥ जनी आठवीत तेव्हां पांडुरंगा ॥ कांगा तूं श्रीरंगा मोकलिसी ॥ २५ ॥ घडी घडी येत होतासी तूं देवा ॥ आज कां केशवा निद्रा आली ॥ २६ ॥ कोठें गुंतलासी भक्तीचिया काजा ॥ धांवें महाराजा येई आतां ॥ २७ ॥ प्रल्हादाकारणें नृसिंह झालासी ॥ स्तंभीं प्रकटसी क्षणमात्रें ॥ २८ ॥ दीनांचा दयाळू तुझें नांव बापा ॥ कांहो अवकृपा केली

मज ॥ २९ ॥ द्रौपदीनें केला जेव्हां तुझा धांवा ॥ आलासी केशवा क्षणामाजीं ॥ ३० ॥ माझा तुज देवा आला हो कंटाळा ॥ आळ हा घातला मजवरी ॥ ३१ ॥ समजलें मज होतें तुझे मनीं ॥ नसावी हे जनी पांडुरंगा ॥ ३२ ॥ करितां कामधंदा तुज आला शीण ॥ कंटाळलें मन देवा तुझें ॥ ३३ ॥ कासयासी बोल ठेवूं तुज देवा ॥ प्रारब्धाचा ठेवा फळा आला ॥ ३४ ॥ आतां ऐक माझी हेच विनवणी ॥ भेट चक्रपाणी एक वेळां ॥ ३५ ॥ न मागें मी कांहीं देवा तुज आतां ॥ पायांपैं अनंता ठाव देई ॥ ३६ ॥ ऐकुनीया ऐसी जनीची विनवणी ॥ आले चक्रपाणी धांवोनिया ॥ ३७ ॥ जनीच्या सांगातें होते राजदूत ॥ नेली गे त्वरित शूळापाशीं ॥ ३८ ॥ जनीनें तो शूळ पाहतां नयनीं ॥ अकस्मात पाणी झालें साचें ॥ ३९ ॥ शस्त्रें जीं कां होतीं राजदूतां करीं ॥ विरालीं तीं सारीं पाणी झालें ॥ ४० ॥ विठोबानें तेव्हां आलिंगिली जनी ॥ ह्मणे माय बहिणी अस्लीसी ॥ ४१ ॥ जनी ह्मणे देवा तूं पाठीसी असतां ॥ नाहीं भय चिंता आह्मालागीं ॥ ४२ ॥ श्रुत झाली वार्ता राजया लागोनी ॥ शूळासुद्धां पाणी शस्त्रें झालीं ॥ ४३ ॥ समजलें तेव्हां तयाचे अंतरीं ॥ जनीला श्रीहरि सांभाळीतो ॥ ४४ ॥ चला जाऊं आतां जनीच्या दर्शना ॥ सिद्ध झाली सेना पाय चाली ॥ ४५ ॥ क्षमा करी माते आमुचे अन्याय ॥ कृपा दृष्टी पाहे आह्मांकडे ॥ ४६ ॥ देऊनिया वस्त्रें भूषणें जनीसी ॥ गेला आश्रमासी राजा तेव्हां ॥ ४७ ॥ समजलें तेव्हां पंढरीच्या लोकां ॥ जनीचा हा सखा पांडुरंग ॥ ४८ ॥ जनींचे अभंग लिहीत नारायण ॥ करिती श्रवण साधुसंत ॥ ४९ ॥ धन्य तेचि जनी धन्य तिची भक्ति ॥ नामदेव स्तुति करीतसे ॥ ५० ॥

---

## चोखामेळ्याचें चरित्र.

---

॥ १८०० ॥ चोखामेळियानें पाजियेलें दहीं ॥ पडों दिलें नाहीं उणें साचें ॥ १ ॥ तयाचें चरित्र परिसावें सादर ॥ करितों नमस्कार संतजना ॥ २ ॥ तयाची जे कांता तयाच सारिखी ॥ भावार्थ नेटकी आवडीची ॥ ३ ॥ साधन द्वादशी आली एके काळीं ॥ उठोनी प्रातःकाळीं काय बोले ॥ ४ ॥ उठी उठी कांते स्वयंपाक करी ॥ आतां येतील हरि

पारण्यासी ॥ ५ ॥ तंव एक्या ब्राह्मणें आइकिली मात ॥ तेणें दिवाणांत सांगितलें ॥ ६ ॥ दिवाणानें दूत पाठविले त्यासी ॥ चोखामेळियासी धरुनी आणा ॥ ७ ॥ दूतीं जाऊनिया धरुनी आणिलें ॥ ह्मणे काय झालें चोखामेळा ॥ ८ ॥ विठोबासी दहीं पाजीत असतां ॥ कांहो माझ्या हाता आसडीलें ॥ ९ ॥ रडतो हा कां रे सभेसी पुसती ॥ तो ह्मणे वृत्तांत ऐसा झाला ॥ १० ॥ रुसूनिया विठो गेला ह्मणउनी ॥ रडे दीर्घध्वनी करूनिया ॥ ११ ॥ ह्मणती या महारानें देव बाटविला ॥ जिवें मारायाला बैल जुंपा ॥ १२ ॥ बांधोनिया पाय हांकियले बैल ॥ धरुनी शिवळ विठो उभा ॥ १३ ॥ उडती आसुड बइलांचे पाठी ॥ मारितां हिंपुटी थोर झाली ॥ १४ ॥ तयाची ते कांता उभी राहूनिया ॥ ह्मणे देवराया हात काढी ॥ १५ ॥ खाइलें जेविलें त्याचा हा उपकार ॥ दुबळीचा भ्रतार मारूं पाहसी ॥ १६ ॥ पाळिलें पोसिलें माझिया धन्याशी ॥ उतराई झालासी ओढावया ॥ १७ ॥ अन्नाची त्वां क्रिया नाहीं रे राखिली ॥ रांडकी त्वां केली चोखियाची ॥ १८ ॥ काढी हात आतां जाय परता उसण्या ॥ जाय पोट पोसण्या येथूनिया ॥ १९ ॥ चोखा ह्मणे रांडे विश्वाचा पोसणा ॥ संतांचा देखणा विठो माझा ॥ २० ॥ जन लोक पुसती कोणा बोलतीस ॥ ते ह्मणे तुह्मास काय दिसे ॥ २१ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचे उदरीं ॥ त्यानें चहुंकरीं धरियलें ॥ २२ ॥ पीतांबरधारी घनःशाम मूर्ती ॥ रखुमाईचा पति विट्ठल हा ॥ २३ ॥ समस्तांसी तेव्हां दिलें दरुशन ॥ केलें समाधान नामा ह्मणे ॥ २४ ॥

---

## चोखोबाचे स्त्रीचें बाळंतपण.

:o:

॥ १८०१ ॥ चोखोबाची कांता असे ती गर्भिण ॥ झाले तीस पूर्ण नव मास ॥ १ ॥ करुनी विनंति पतिसी बोलत ॥ असावें साहित्य घरामाजीं ॥ २ ॥ ऐकुनीया चोखा करीत विचार ॥ कोणें ऐसा घोर वागवावा ॥ ३ ॥ न पुसतां गेला बहिणीच्या गांवा ॥ आनंदें केशवा आळवीत ॥ ४ ॥ दोन प्रहर झाले न येती भोजना ॥ कांता विचारणा करीतसे ॥ ५ ॥ शोध करितांना संध्याकाळ झाला ॥ पति माझा गेला कोणीकडे

॥ ६ ॥ विरक्तासी मी तो सांगितलें काम ॥ कैसा झाला भ्रम माझे बुद्धि ॥ ७ ॥ अहो पांडुरंगा आणा त्यासी आतां ॥ न सांगें मी वार्ता संसाराची ॥ ८ ॥ झाली तेव्हां श्रमी प्रसूत वेळ आली ॥ विठाई धांवली तेचिवेळां ॥ ९ ॥ चोखोबाची बहिण झाला सारंगधर ॥ वहिनी उघडा द्वार हाका मारी ॥ १० ॥ दोघीही भेटल्या तेव्हां आनंदानें ॥ आलें तें रुदन चोख्या-कांते ॥ ११ ॥ बरें बाई तुह्मां देवानें धाडिलें ॥ पती माझा गेला कोणीकडे ॥ १२ ॥ चाणाक्ष बायका तुह्मी अनिवार ॥ अज्ञान भ्रतार तुमचे गांवीं ॥ १३ ॥ ह्मणोनियां तुह्मी सांगतां या काम ॥ विरक्तासी श्रम वाटतसे ॥ १४ ॥ दादा माझा सुज्ञ आधींच हें श्रुत ॥ होयाचें तें होत आपणची ॥ १५ ॥ केली त्वां सूचना आला माझ्या घरा ॥ त्यानें केली त्वरा मजलागीं ॥ १६ ॥ सर्वही साहित्य दिलें ह्मणे आतां ॥ नका करूं चिंता वहिनी कांहीं ॥ १७ ॥ सर्वही साहित्य होतें तिजपाशीं ॥ रिद्धीसिद्धि दासी तयाचिया ॥ १८ ॥ प्रसूत ते झाली पुत्र झाला तिला ॥ आनंद वाटला पांडुरंगा ॥ १९ ॥ वाटिली शर्करा सर्वत्र यातीसी ॥ माझ्या चोखोबासी पुत्र झाला ॥ २० ॥ लावूनी उटणें न्हाणियेलें तिला ॥ श्रम तिचा गेला सर्वांगाचा ॥ २१ ॥ पांचवीही केली तिनें आनंदानें ॥ घातलें भोजन यातीलागीं ॥ २२ ॥ तेरावे दिवशी बाळ तें पाळणा ॥ घालितसे राणा वैकुंठींचा ॥ २३ ॥ साडी आणि चोळी आंगडें टोपरें ॥ आणीयलें कोणें रखमाईनें ॥ २४ ॥ बोलावूनी सुवासिनी पाळणा घातलें ॥ नाम तें ठेविलें कर्ममेळा ॥ २५ ॥ बारसेंही केलें तिनें आनंदानें ॥ घातलें भोजन सर्व याती ॥ २६ ॥ चोखो-बासी मास झाला बहिणी घरीं ॥ विचारी अंतरीं चोखा तेव्हां ॥ २७ ॥ सोडोनिया आलों प्रपंचाचे भयें ॥ अंतरले पाय देवाजीचे ॥ २८ ॥ सद्ग-दित झालें तयाचें अंतर ॥ प्रेम अश्रुनीर वाहे डोळां ॥ २९ ॥ येतों बाई आतां कृपा असों द्यावी ॥ सांगोन पाठवी आपल्या हातें ॥ ३० ॥ आतां जातें वहिनी आपुल्या गांवाला ॥ रागें भरतील मला धनी माझे ॥ ३१ ॥ ऐकुनीया बोले चोखोबाची कांता ॥ नका जाऊं आतां बाई तुह्मी ॥ ३२ ॥ येऊंद्या घरधनी करतील बोळवण ॥ काय मी उत्तीर्ण होऊं आतां ॥ ३३ ॥ काय काय आठवूं तुमचे उपकार ॥ न पडे विसर जन्मोजन्मीं ॥ ३४ ॥ दादा माझा असे पांडुरंग भक्त ॥ सदां त्याचें चित्त देवावरी ॥ ३५ ॥ मान्य करी वहिनी तयाचें वचन ॥ तेणेंचि कल्याण असे तुमचें ॥ ३६ ॥ सद्गदित झालें दोघींचें अंतर ॥ प्रेम अश्रुनीर वाहे डोळां ॥ ३७ ॥

सांभाळी हा आतां माझा कर्ममेळा ॥ येईल चोखामेळा घरीं आतां ॥ ३८ ॥ थांबा बाई आतां शिवितें मी चोळी ॥ नलगे वनमाळी बोलतसे ॥ ३९ ॥ पुसोनी सर्वांसी गेला तो सांवळा ॥ आला चोखामेळा घरालागीं ॥ ४० ॥ येवोनिया कांता वंदीत चरण ॥ दिलें उचलोन बाळ हातीं ॥ ४१ ॥ बाई आतां गेल्या भेटल्या वाटेसी ॥ खंती या जिवासी वाटे त्याची ॥ ४२ ॥ सांगीतला त्यासी सकळ वृत्तांत ॥ सद्गदित चित्त चोखा झाला ॥ ४३ ॥ कैंची बाई येथें आले पांडुरंग ॥ धन्य तुझें भाग्य भेटी झाली ॥ ४४ ॥ सद्गदित झालें दोघांचें अंतर ॥ प्रेम अश्रुनीर वाहे डोळां ॥ ४५ ॥ भक्तांसी संकट पडों नेदी देव ॥ घालीतसे धांव त्यांच्या काजा ॥ ४६ ॥ विष्णुदास नामा वंदी त्याचे चरण ॥ वर्णितसे गुण वारंवार ॥ ४७ ॥

---

## जनजसवंत याचें चरित्र.

॥ १८०२ ॥ जनजसवंत भला ॥ देव त्याचे घरा गेला ॥ १ ॥ येऊन राहातो चाकरी ॥ पोटा मागतो भाकरी ॥ २ ॥ स्त्री वाढावया गेली ॥ वरचेवर विठ्ठल झेली ॥ ३ ॥ काम सांगा सहज कांहीं ॥ करितो मी लवलाहीं ॥ ४ ॥ मागें उरो नेदी कांहीं ॥ कशाला गे माणुस बाई ॥ ५ ॥ दुबळ्याचे घरची नागवण ॥ भाग्याघरची सांठवण ॥ ६ ॥ शेतांतील काम करी ॥ विठो माझा नांगर धरी ॥ ७ ॥ खुटें पालख्या तोडी ॥ साठ चाहुर पाणी झोडी ॥ ८ ॥ देव लाकडासी गेला ॥ परत घेवुनीया आला ॥ ९ ॥ पांचा साता गांवा गेला ॥ लेंकी सुना घेऊन आला ॥ १० ॥ खांद्यावरी आणिल्या पाहीं ॥ नवल याचें सांगो काई ॥ ११ ॥ मायलेंकी केल्या भेटी ॥ ऐशा विठोबाच्या गोष्टी ॥ १२ ॥ कैसा प्रगट रे झाला ॥ विठो माझा निघोन गेला ॥ १३ ॥ आठवा आठवा माझा सखा ॥ नामा सांगे सर्व लोका ॥ १४ ॥

---

## श्रीज्ञानदेवाची आदि.

॥ १८०३ ॥ जगत्रय जीवन अंतरनिष्ठ ज्ञान ॥ तरी संतांसी शरण रिघीजे भावें ॥ १ ॥ हेंचि भक्तिज्ञान वैराग्याची निधि ॥ विवेकेसी बुद्धि नांदे माझी ॥ २ ॥ श्रवणाचें श्रवण मननाचें मनन ॥ हेंचि निजध्यासन वैराग्याचें ॥ ३ ॥ ह्मणोनी बैसलों संतांचे संगती ॥ गोविंदा विश्रांति गहिनीनाथ ॥ ४ ॥

॥ १८०४ ॥ बैसोनि एकांतीं गुरुगम्य गोष्टी ॥ वेदांत परिपाठी शास्त्रबोध ॥ १ ॥ नित्य शुद्धबुद्ध निर्विकार पूर्ण ॥ उमेसी जें ज्ञान शिव सांगे ॥ २ ॥ तेंचि सच्चिदानंद साकार जीव प्राण ॥ शरीर जाय क्षीण जयपारी ॥ ३ ॥ तेंचि हें सर्वत्र विठोबाचें नाम ॥ निराईस प्रेम गहिनीनाथीं ॥ ४ ॥

॥ १८०५ ॥ बैसलीं दोघें भ्रतार वल्लभें ॥ उदरींच्या गर्भें सेवी ध्यान ॥ १ ॥ भक्ति नवमास भरले पूर्ण दिवस ॥ आलें वैराग्य डोळस मूर्तिमंत ॥ २ ॥ विठ्ठल आवडी ठेवियेलें नाम ॥ निराईस प्रेम गहिनीनाथीं ॥ ३ ॥

॥ १८०६ ॥ व्रतबंध दीक्षा उपदेश गायत्री ॥ ॐ कोर मूळ मंत्री स्वर सोळा ॥ १ ॥ केलें वेदपठण काव्य आणि व्याकरण ॥ झालासे निपुण शास्त्रवक्ता ॥ २ ॥ मग पुष्करादि तीर्थें पाहावीं समस्तें ॥ अनुताप चित्तें धरियेला ॥ ३ ॥ वैराग्य पुतळा ज्ञानगम्य मूर्ति ॥ निघालासे भक्ति तीर्थाटणा ॥ ४ ॥ विठ्ठल वंदूनी मातापिता दोन्ही ॥ संग तीर्थाटणीं मुहूर्त केला ॥ ५ ॥

॥ १८०७ ॥ आला द्वारावती पाहिली कृष्णमूर्ती ॥ जे मोक्ष विश्रांति मुमुक्षूंची ॥ १ ॥ धरी मत्स्यावतार केला शंखोद्धार ॥ देव मुक्त माहेर पांथिकाचें ॥ २ ॥ तेथून सत्वर आला पिंडारका ॥ मंगळवेढ्याहुनी द्वारका देखीयेली ॥ ३ ॥ सुवर्णाची नगरी ब्राह्मणा दिधली ॥ ते पुरी पाहिली सुदामयाची ॥ ४ ॥ मंडपाकार तो माधव ॥ रुक्मिणी विवाह झाला जेथें ॥ ५ ॥ संपादुनी गेला अवतारकृत्य ॥ तें भालुका तीर्थ देखियेलें ॥ ६ ॥ पश्चिमे प्रभास तीर्थ देखियेलें ॥ सोरटी देखिलें सोमनाथ ॥ ७ ॥ मुचकुंदादि गुंफा काळयवन उभा ॥ विश्रांती पद्मनाभा धवलपुरी ॥ ८ ॥ मार्गींचीं तीर्थें करुनी समस्तें ॥ आला शक्ति जेथें सप्तश्रृंगा ॥ ९ ॥ अरुणा वरुणा प्राची गोदावरी ॥ ते कपाळेश्वरी पूजा केली ॥ १० ॥ पुढें ज्योतिर्लिंग देखिलें त्र्यंबक ॥ कुशावर्ती उदक स्विकारिलें ॥ ११ ॥ वंदुनीया गंगाद्वार सव्य ब्रह्मगिरी ॥ मग भीमाशंकरीं आनंदला ॥ १२ ॥ देखोनिया भीमा आठवे पंढरी ॥ विठ्ठला अंतरीं पांडुरंग ॥ १३ ॥

॥ १८०८ ॥ ऐसा निसानिस चालतां सुपंथीं ॥ पदोपदीं कीर्ति नाम घाये ॥ १ ॥ आला अलकापुरीं इंद्रायणी तीरीं ॥ स्नानसंध्या करी आणि देवपूजा ॥ २ ॥ देखोनी सुब्राह्मण केलेंसे नमन ॥ वंदिले चरण शिदोपंतीं

॥ ३ ॥ कोण तुमचा गांव आलेति कोठुनी ॥ काय अभिधानी गमन कोठें ॥ ४ ॥ विठ्ठलाचें नाम रामेश्वरीं भाव ॥ वृत्ति आपेगांव गोदातीरीं ॥ ५ ॥ मातापिता वृद्धें वसताती तेथें ॥ द्वारकादि तीर्थें करूनी आलों ॥ ६ ॥ आजि धन्य भाग्य स्वामीचें आगमन ॥ आश्रय पावन कीजे माझा ॥ ७ ॥ आणुनी मंदिरीं सारूनी भोजन ॥ निद्रा करविली पूर्ण तया हातीं ॥ ८ ॥ तंव स्वप्नावस्थेमाजीं येउनी पंढरिनाथें ॥ ह्मणे कन्या सालंकृत द्यावी यासी ॥९॥ प्रातःकाळ झाला नित्य नेम सारिला ॥ मग नमस्कार केला शिदोपंतीं ॥ १० ॥ वंदोनिया चरणा सांगितलें स्वप्न ॥ कन्या पाणिग्रहण कीजे तुह्मी ॥ ११ ॥ हांसोनी उत्तरें बोले सारांश ॥ आज्ञा श्रीनिवासें केली नाहीं ॥१२॥ आजिचा सुदीन स्वस्थ करुनी मन ॥ वंदिले चरण शिदोपंती ॥१३॥ संकल्प हेलावती मनीं ॥ तुळसी वृंदावनीं निद्रा केली ॥ १४ ॥ मग विश्वीं विश्वंभरें व्यापुनीया स्थानीं ॥ येऊनिया स्वप्नीं काय बोले ॥ १५ ॥ भक्ति आणि ज्ञान वैराग्य आवडी ॥ वसती उघडी तुझ्या अंगीं ॥ १६ ॥ मूर्तिमंत चारी जन्म इच्या उदरीं ॥ ह्मणोनी स्विकारी आज्ञा माझी ॥ १७ ॥ उठोनी विठ्ठलें स्वप्न सांगितलें ॥ हरुषें वंदिलें शिदोपंतीं ॥ १८ ॥ पाचारोनी जोशी घटितार्थ पाहिला ॥ गुण उतरला छत्तीस ही ॥ १९ ॥ निर्धारिलें लग्न मिळाले ब्राह्मण ॥ निर्विघ्न पूजन केलें आधीं ॥ २० ॥ देवकप्रतिष्ठा ब्राह्मण भोजन ॥ घटिका झाली पूर्ण ह्मणती द्विज ॥ २१ ॥ कुळदेवस्मरण ह्मणती सावधान ॥ उभयतांचें मन पांडुरंगीं ॥ २२ ॥ झालें पाणिग्रहण विधीसी अर्पण ॥ वंदिले चरण शिदोपंती ॥ २३ ॥ पंढरिये क्षेत्रा मिळालीसे यात्रा ॥ आले पंढरपुरा भक्तराज ॥२४॥ गरुडटके पताका मृदंग वाजती ॥ वैष्णव गर्जती जयजयकारें ॥ २५ ॥ गरुडपारीं उभे दाटी वैष्णवांची ॥ उपमा वैकुंठींची पंढरीये ॥ २६ ॥ राउळाभीतरीं प्रवेशलीं दोघें ॥ देखीयेले उभे पांडुरंग ॥ २७ ॥ कायावाचामनीं पारूशले नयनीं ॥ मस्तक चरणीं ठेवियेला ॥ २८ ॥ विठ्ठलासी ध्यान रामकृष्ण माळा ॥ हृदयीं जिव्हाळा श्रीमूर्ति राया ॥ २९ ॥

॥ १८०९ ॥ आश्रमविधि करावें पालन ॥ परी विठ्ठलाचें मन तीर्थाटणीं ॥ १ ॥ जाणोनी अंतर ह्मणे शिदोपंत ॥ आपुले मनींचा हा हेत पुरता कीजे ॥ २ ॥ जावें हो सत्वर यावें स्वस्ति क्षेम ॥ पावलें आश्रम शिदोपंत ॥ ३ ॥ गमन केलें तेणें तीर्थाटणा ॥ मुख्य मुख्य स्थाना अनुक्रमें ॥ ४ ॥

॥ १८१० ॥ पाहिलें श्रीशैल्य निवृत्ती संगम ॥ पापराशी भस्म देख-तांच ॥ १ ॥ चालतां सुपंथीं हृदयीं विठ्ठलमूर्ती ॥ मुखीं नाम कीर्ति गात चाले ॥ २ ॥ अभोळ नरसिंह श्रीवासुदेव ॥ सकळदेव राव व्यंकटाद्री ॥ ३ ॥ गेला अरुणाचळा करुनी नमन ॥ चिदांबरा दक्षिणमथुरा कावेरी ॥ ४ ॥ वंदुनी जनार्दन गेला रामेश्वरा ॥ हेत झाला पुरा विठ्ठलाचा ॥ ५ ॥

॥ १८११ ॥ जानकीची शुद्धी करावया गेला ॥ हनुमंत उडाला जेथु-निया ॥ १ ॥ आनंद भरीत चालतसे मार्गी ॥ हृदयीं अनुरागी आवडीचा ॥ २ ॥ तें स्थान वंदुनी पावला गोकर्ण ॥ हटकेश्वरीं स्नान करूनिया ॥ ३ ॥ आला कोल्हापुरीं लक्ष्मी दर्शन ॥ पंचगंगे स्नान करूनिया ॥ ४ ॥ प्रीतीचा संगम देखिला कऱ्हाटकी ॥ थोर झाला सुखी अंतरींच ॥ ५ ॥ कृष्णेचिया स्नानें कृतकृत्य झाला ॥ माहुली देखिला संगम डोळां ॥ ६ ॥ आला अळकावती हर्षयुक्त चित्तीं ॥ दिधलें शिदोपंतीं आलिंगन ॥ ७ ॥ विठ्ठल अंतरीं मातापिता पाहावीं ॥ आज्ञा ह्मणे द्यावी शिदो-पंता ॥ ८ ॥

॥ १८१२ ॥ कुटुंबासहित जावें जी दर्शना ॥ केलीसे प्रार्थना शिदो-पंतीं ॥ १ ॥ सहज बोळवण संतांचें दर्शन ॥ ह्मणे केलें मान्य शीघ्र चला ॥ २ ॥ मग विठ्ठलानें मातापिता वंदिलीं ॥ स्थिति सांगितली शिदोपंतीं ॥ ३ ॥ चिरंजीव नांदा ह्मणती मातापिता ॥ सुख आमुच्या चित्ता थोर झालें ॥ ४ ॥ वस्त्रें अलंकार शिदोपंता दिधले ॥ मग नमन केलें शिदो-पंतीं ॥ ५ ॥

॥ १८१३ ॥ असतां सुखरूप मातापिता वृद्ध ॥ वैकुंठा स्वानंदें निघोनी गेलीं ॥ १ ॥ संसाराची चिंता नाहीं विठ्ठलासी ॥ अखंड वृत्तीसी समाधान ॥ २ ॥ झालें वर्तमान ऐकिलें शिदोपंती ॥ परम तेणें चित्तीं खेद केला ॥ ३ ॥ येउनी परामर्ष घेतला दोघांचा ॥ ह्मणे सांभाळ तुमचा करितो देव ॥ ४ ॥ उदासीन वृत्ती तुमची सर्वकाळ ॥ पदार्थ सकळ पाहिजे तो ॥ ५ ॥ दया करोनी मज आतां सांभाळावें ॥ अळकापुरीं राहावें सुख-रूप ॥ ६ ॥ पुत्रसंतती कांहीं होईल तुह्मासी ॥ मग येईल चित्तासी तें करा सुखें ॥ ७ ॥ मानुनी विठ्ठलें वचन तयाचें ॥ ह्मणे हें देवाचें करणें हो ॥ ८ ॥

॥ १८१४ ॥ येउनी अळंकावती केला क्षेत्रवास ॥ देउनी चित्तास समाधान ॥ १ ॥ नित्य हरिकथा नामसंकीर्तन ॥ संतांचें दरुशन सर्वकाळ ॥ २ ॥ पंढरीची वारी आषाढी कार्तिकी ॥ विठ्ठल एकाएकी सुखरूप ॥ ३ ॥ ऐसा बहुत काळ क्रमिलियावरी ॥ पुत्र अपत्य उदरीं होतां न दिसे ॥ ४ ॥ मग विठ्ठल ह्मणे ऐकतेसी कांते ॥ मज ऐसें वाटतें सन्यास घ्यावा ॥ ५ ॥ देसी आज्ञा तरी जाईन वाराणसी ॥ ऐसें रखुमाईसी ह्मणितलें ॥ ६ ॥

॥ १८१५ ॥ रखुमाई ह्मणे ऐकतांजी ताता ॥ सन्यास घ्यावा आतां ह्मणताती ॥ १ ॥ संतती वाचुनी न घ्यावा हा सन्यास ॥ ऐसें सांगा त्यांस ह्मणितलें ॥ २ ॥ निरोपाची वाट पाहे भलत्या मिषें ॥ रखुमाई असें साव-धान ॥ ३ ॥ असतां दुश्चितपणें निरोप पुसीला ॥ जाजा ह्मणे दिधला अवसरू ॥ ४ ॥ जाउनी विठ्ठलें घेतला सन्यास ॥ चिंता रखुमाईस पडली भारी ॥ ५ ॥

॥ १८१६ ॥ करावें सार्थक रखुमाईनें तेव्हां ॥ आरंभिली सेवा अश्व-त्थाची ॥ १ ॥ उग्र अनुष्ठान जाणोनी देवें ॥ तेथें झालें येणें श्रीपादाचें ॥ २ ॥ देखोनी सत्पात्र केला नमस्कार ॥ सारांश उत्तर बोलियेलें ॥ ३ ॥ पुत्रवंती होई दिधला आशिर्वाद ॥ रखुमाइसी विनोद वाटिन्नला ॥ ४ ॥ माते तूं हांससी श्रीपाद पुसती ॥ स्वामी पुत्र कैसे होती पतीवीण ॥ ५ ॥ भ्रतारें जाउनी घेतला सन्यास ॥ स्वामीच्या वचनास नलगे बोल ॥ ६ ॥ पुसतां खाणखूण निश्चय बाणला ॥ श्रीपाद बोलिला सत्य सत्य ॥ ७ ॥ रखुमाइसी पुसे असे तुझें कोणी ॥ येरी कर जोडुनी बोलियेली ॥ ८ ॥

॥ १८१७ ॥ मातापिता घरीं आहेती समस्तें ॥ वर्तमान तयातें श्रुत केलें ॥ १ ॥ कृपा करुनी यावें तुह्मी आश्रमासी ॥ सनाथ कराव-यासी कृपादृष्टी ॥ २ ॥ नेउनी आश्रमा दिधलें आसन ॥ केलें श्रुत वर्तमान शिदोपंतीं ॥ ३ ॥ अर्घ्यपाद्यपूजा भोजन सारीलें ॥ मग वर्तमान पुसीलें शिदोपंतीं ॥ ४ ॥ श्रीपाद ह्मणती रामेश्वरीं भाव ॥ येथें हा अभि-प्राय झाला ऐसा ॥ ५ ॥ आतां फिरोनिया जाणें वाराणसी ॥ घेउनी रखुमाईसी तुह्मी यावें ॥ ६ ॥

॥ १८१८ ॥ श्रीपाद ह्मणती इच्या दोषास्तव ॥ माझें पुण्य सर्व लया जातें ॥ १ ॥ शिदोपंत ह्मणे तुह्मी दयावंत ॥ शीघ्र गमनार्थ कीजे स्वामी

॥ २ ॥ जाउनी वाराणसी मठीं प्रवेशले ॥ मग पाचारिलें चैतन्यासी ॥ ३ ॥ तुझे कोणी होते सत्य सांग आतां ॥ अन्यत्र बोलतां उरी नाहीं ॥ ४ ॥ चैतन्यें चरणीं ठेवियेला माथा ॥ ह्मणे त्यागुनी कांता आलों स्वामी ॥ ५ ॥ उठवुनी श्रीपादें दिधलें अश्वासन ॥ ह्मणती करी ग्रहण इचें आतां ॥ ६ ॥ अविधी कर्माचें न धरावें भय ॥ यासी आहे साह्य जगदीश ॥ ७ ॥ स्वदेशा जाउनी करावा आश्रम ॥ सुखरूप स्वधर्म चालवावा ॥ ८ ॥ श्रीपादें मस्तकीं हात ठेवियेला ॥ निरोप दिधला चैतन्यासी ॥ ९ ॥

॥ १८१९ ॥ चैतन्याश्रम सन्यासी झाले गृहवासी ॥ मुळींच्या प्रकृतीसी ऐक्य केलें ॥ १ ॥ हासिन्नले लोक बरवा हा सन्यास ॥ करिती उपहास दर्शनाचा ॥ २ ॥ द्विजीं वाळियेलें जगीं सांडियेलें ॥ शेखीं उपेक्षिलें आप्तवर्गीं ॥ ३ ॥ ऐसीं बारा वर्षें क्रमिलीं निगुती ॥ झालीसे संतती चौघे जण ॥ ४ ॥ निवृत्ती ज्ञानेश्वर सोपान मुक्ताबाई ॥ हांसती सकळही ऐकुनी नांवें ॥ ५ ॥ झालीं उपवर व्रतबंधा योग्य ॥ उभयतां उद्वेग चिंतातुरें ॥ ६ ॥ जाती कुळावेगळीं पडियेलीं निराळीं ॥ माझी वंशावळी प्रायश्चित्त ॥ ७ ॥ मेळविले द्विज केली ब्रह्मसभा ॥ क्षमा अपराधा करा दीना ॥ ८ ॥ निबंधीं निर्णय पाहती धर्मशास्त्रीं ॥ तुह्मी अति श्रोतीं पारायण ॥ ९ ॥ सांगाल तें मान्य ह्मणती साहीजणें ॥ शुची हें करणें पतितांसी ॥ १० ॥ निवृत्ति ह्मणे तुह्मी भूदेव प्रत्यक्ष ॥ दर्शनेंची मोक्ष जडमूढां ॥ ११ ॥

॥ १८२० ॥ पाहतील ग्रंथ सभाश्रेष्ठ महाजन ॥ वैदिक शास्त्रज्ञ पुण्यश्लोक ॥ १ ॥ देहांत प्रायश्चित्त असे या बोलीलें ॥ विचारुनी भलें हित करा ॥ २ ॥ ह्मणती द्विजवर आणीक नाहीं उपाव ॥ संस्कारें वैश्वदेव केला शुद्ध ॥ ३ ॥ श्रीपाद ह्मणती अवश्य करीन ॥ देह हे दंडीन अनुतापें ॥ ४ ॥ त्रिवेणी संगमीं घालीन कवंती ॥ गेला पूर्वस्थिति वीतरागें ॥ ५ ॥ दारा पुत्र गृह त्यजुनी निघाला ॥ नमस्कार केला द्विजवृंदा ॥ ६ ॥ झडझडा जाती परतोनी न पाहती ॥ नाहीं पुनरावृत्ति ह्मणती द्विज ॥ ७ ॥ त्याग आणि वैराग्य हेंचि प्रायश्चित्त ॥ झाला शुचिर्भूत गुरुकृपें ॥ ८ ॥ निवृत्ती ह्मणती आह्मा कवण गती ॥ सांगावें श्रीमतीं विचारुनी ॥ ९ ॥

॥ १८२१ ॥ ह्मणती सकळ द्विज जावें प्रतिष्ठाना ॥ तेथुनी पत्र आणा तें वंद्य करूं ॥ १ ॥ नाहीं जाति कुळ वर्ण अधिकार ॥ क्षेत्रीं वैश्य

शूद्र द्विज नव्हे ॥ २ ॥ नव्हों देवगण यक्ष ना किन्नर ॥ ऋषि निशाचर तेही नव्हें ॥ ३ ॥ ते आह्मी अविनाश अव्यक्त जुनाट ॥ निजबोधें इष्ट स्वरूप माझें ॥ ४ ॥ नव्हें आप तेज वायु व्योम मही ॥ महतत्व तेंही विराट नव्हें ॥ ५ ॥ नव्हें मी निर्गुण ॥ अनुभूतीं भजन होउनी नव्हें ॥ ६ ॥ निवृत्ती ह्मणतसे ऐक ज्ञानेश्वरा ॥ माझी परंपरा ऐसी आहे ॥ ७ ॥

॥ १८२२ ॥ विधि वेद विरुद्ध संपर्क संबंध ॥ नाहीं भेदाभेद स्वस्वरूपीं ॥ १ ॥ अविधि आचरण परम दूषण ॥ वेदोनारायण बोलियेला ॥ २ ॥ स्वधर्म अधिकार जाती परत्व भेद ॥ उचित तें शुद्ध ज्याचें तया ॥ ३ ॥ ह्मणोनिया संतीं अवश्य आचरावें ॥ जना दाखवावें वर्तोनिया ॥ ४ ॥ कुळींचा कुळधर्म अवश्य पाळावा ॥ सर्वथा न करावा अनाचार ॥ ५ ॥ प्रत्यवाय आहे अशास्त्रीं चालतां ॥ पावन अवस्था जरी झाली ॥ ६ ॥ ज्ञानदेव ह्मणे ऐकाजी निवृत्ती ॥ बोलिली पद्धती धर्मशास्त्रीं ॥ ७ ॥

॥ १८२३ ॥ हेंचि आह्मा श्रेष्ठ बोलिले परमनिष्ठ ॥ असतां दुर्घट परी सेव्य ॥ १ ॥ पांडवांचें कुळ शोधितां निर्मूळ ॥ कुंडजार गोळ बुद्धिकासी ॥ २ ॥ भक्ति हे सरती जाती न सरती ॥ ऐसी आत्मस्थिति स्वसंवेद्य ॥ ३ ॥ दुर्वास वसिष्ठ अगस्ति गौतम ॥ हे ऋषि उत्तम कुळींचे कैसे ॥ ४ ॥ व्यास आणि वाल्मीकि कोण कुळ तयांचें ॥ तैसेंचि आमुचें सोपान ह्मणे ॥ ५ ॥

॥ १८२४ ॥ घेऊनिया पत्र निघाले सत्वर ॥ करुनी नमस्कार सकळांसी ॥ १ ॥ जाउनी राहिले भोगावती तीरीं ॥ तीर्थयात्रा विधि संपादिली ॥ २ ॥ अनाथें पतीतें शरणांगत दीनें ॥ सनाथ करणें कृपादृष्टी ॥ ३ ॥ केली ब्रह्मसभा बैसले वरिष्ठ ॥ होतें तैसें स्पष्ट निवेदिलें ॥ ४ ॥ पत्र वाचूनिया सकळां झालें श्रुत ॥ सन्याशाचे पुत्र कळों आले ॥ ५ ॥ नाहीं प्रायश्चित्त उभयतां कुळभ्रष्ट ॥ बोलियले श्रेष्ठ पूर्वापर ॥ ६ ॥ या एक उपायें असे शास्त्रमतें ॥ अनन्य भक्तीतें अनुसरावें ॥ ७ ॥ तीव्र अनुतापें करावें भजन ॥ गो खर आणि श्वान वंदूनिया ॥ ८ ॥ वंदावे अंत्यज ब्रह्मभावनेसी ॥ ऐसें पद्धतीसी बोलीयले ॥ ९ ॥ ऐकोनी निवृत्ती संतोषला चित्तीं ॥ धन्य तुमची वदती तीर्थरूप ॥ १० ॥ ज्ञानदेव ह्मणे सांगाल तें मान्य ॥ मुक्ताई सोपान आनंदलीं ॥ ११ ॥

॥ १८२५ ॥ ऐकोनी ऐसीं नांवें हासिन्नले ब्राह्मण ॥ नामाचें अभिधान सांगा आह्मा ॥ १ ॥ एक ह्मणती नामापाशीं काय आहे ॥ ज्ञान वाहत आहे पखालीसी ॥ २ ॥ ज्ञानदेव ह्मणे तोही माझा आत्मा ॥ वेगळीक आह्मां तया नाहीं ॥ ३ ॥ मारिती आसूड ह्मैशियाचे पाठीं ॥ तोंचि वळ उठी ज्ञानदेवा ॥ ४ ॥ ह्मणती द्विजवर अहो ज्ञानदेवा ॥ यापासोनी उच्चारावा वेदध्वनी ॥ ५ ॥ तरीच तुमची सत्ता आह्मां येईल कळों ॥ नाहीं तरी बोलों नका कांहीं ॥ ६ ॥ ज्ञानदेव ह्मणे बोलेरे ऋग्वेद ॥ ओंकार मूळ शब्द प्रणवाचा ॥ ७ ॥ वेदाचा आरंभ करिता झाला पशू ॥ विधि उपन्यासु सांग पुढें ॥ ८ ॥ करिती आश्चर्य सकळ द्विजवर ॥ हे तिन्ही अवतार तीन देवाचे ॥ ९ ॥ आदिमाता मुक्ताई मुक्तपणें अवतरली ॥ आह्मांपासुनी झाली थोर चुकी ॥ १० ॥ कर्मठ अभिमानें ठकलों देहबुद्धि ॥ गोंवियेली विधि निःसंदेह ॥ ११ ॥ नेणों भक्तिज्ञान वैराग्याचा लेश ॥ कुटुंबाचे दास होउनी ठेलों ॥ १२ ॥ आणीकांसी सांगों आपण नाचरों ॥ लटिकेंच हुंबरों प्रतिष्ठेसी ॥ १३ ॥ धन्य याचा वंश धन्य याचें कुळ ॥ धन्य पुण्यशीळ अवतार हे ॥ १४ ॥ सकळ द्विजवर करिती नमस्कार ॥ आनंदें जयजयकार करिताती ॥ १५ ॥ ज्ञानदेव ह्मणे तुमच्या चरणांचा महिमा ॥ सामर्थ्य हें आह्मां अंगीं नाहीं ॥ १६ ॥ तुह्मी वेदरूप भूदेव प्रत्यक्ष ॥ दर्शनेंचि मोक्ष जडमूढां ॥ १७ ॥ सकळही तीर्थें तुमच्या वसतील पायीं ॥ तेथें आमुचे कायी उरती दोष ॥ १८ ॥ धन्य दिवस आजी झालों कृतकृत्य ॥ भेटलिया संतवृंदें आह्मां ॥ १९ ॥ ज्ञानदेवा ध्यान ब्राह्मणाचे चरणीं ॥ कळीमळ छेदन निवृत्ति ह्मणे ॥ २० ॥

॥ १८२६ ॥ जयांचें दर्शन होतांचि दुरुनी ॥ सर्व जाय पळोनी पापताप ॥ १ ॥ तीर्थासी पावन कळीमळ छेदन ॥ देवाचें कल्याण जयाचेनी ॥ २ ॥ ते पाय सादृश्य देखिले आजि दृष्टी ॥ याग सहस्र कोटी न तुकती ॥ ३ ॥ जयाच्या हृदयीं वेदाचा निवास ॥ शास्त्रें रहिवास केला होय ॥ ४ ॥ जयांच्या वचनें देवपितर तृप्त ॥ स्वाहा स्वधा होत ज्यांच्या मुखें ॥ ५ ॥ जोडूनिया कर विनवितो सोपान ॥ निश्चयेंसी वचन द्यावें आह्मा ॥ ६ ॥ शेष उच्चिष्टा करावें विभागी ॥ बंधुपणालागीं अधिकारी ॥ ७ ॥ अध्यात्म ग्रंथ पाहती पैठणी ॥ गीता संबोधनी जवळी असे ॥ ८ ॥ भोगावती स्नान कालीका दरुशन ॥ वेदांत व्याख्यान

परिसीती ॥ ९ ॥ धन्य हा सोपान धन्य ज्ञानदेव ॥ धन्य निवृत्तिराव ब्रह्मरूप ॥ १० ॥ सांगती पुराण त्रीं हरिकीर्तन ॥ पैठणीचे जन वेधियेले ॥ ११ ॥ तंत्र कव्ययज्ञ झाल गृहस्थाचे घरीं ॥ पितर मंत्रोच्चारीं आव्हानीले ॥ १२ ॥ अवघे द्वि र ह्मणती धन्य धन्य ॥ यासारिखे ब्राह्मण नाहीं कोणी ॥ १३ ॥ ानिषद्भाग पढिलों वेदांत ॥ परी हें सामर्थ्य नाहीं आह्मां ॥ १४ ॥ नाहीं आइकिलें ना कोठें वर्तलें ॥ ये सृष्टि देखिलें आजीं दृष्टी ॥ १५ ॥ पशुमुखें वेद दृश्य पितरलोक ॥ थोर हें कवतुक दाखविलें ॥ १६ ॥ मिळोनी समस्त सोडियेलीं शास्त्रें ॥ विचारोनी पत्र लिहियेलें ॥ १७ ॥ हे परलोकींचे तारू देवत्रयासी ॥ प्रायश्चित्त काय यासी द्यावें कोणा ॥ १८ ॥ लिहोनीया पत्र दिधलें तया हातीं ॥ समस्तांसी निवृत्ती नमस्कारिलें ॥ १९ ॥

॥ १८२७ ॥ घेउनीया पत्र केली प्रदक्षणा ॥ साष्टांगीं ब्राह्मणां नमन केलें ॥ १ ॥ मागोनीया ह्मशा नेवाशासी आले ॥ प्राकृत ते केली देवीगीता ॥ २ ॥ निवृत्ती ह्मणती ऐक ज्ञानदेवा ॥ अनुभव करावा अमृताऐसा ॥ ३ ॥ आदि शक्ति माता वंदूनियां ह्माळसा ॥ मग तेथुनी सरिसा चालियेले ॥ ४ ॥ क्रमिताती मार्ग अनुभव कुशळ ॥ हरिनाम सरळ कवित्वकळा ॥ ५ ॥ येउनी उतरली आळाचिये वनीं ॥ पशु तये स्थानीं शांत झाला ॥ ६ ॥ करुनी तया पूजन सेंदूर तेलें लेपून ॥ आळंकावती निजस्थान प्रवेशलीं ॥ ७ ॥ सान थोर सकळ तेथील निवासी ॥ निवृत्ति तयांसी नमस्कारिलें ॥ ८ ॥ तिन्ही देव जैसे परब्रह्मींचे ठसे ॥ जगीं सूर्य जैसे उगवले ॥ ९ ॥ धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान ॥ धन्य तो निधान ज्ञानदेव ॥ १० ॥ उपजतांचि ज्ञानी हें वर्म जाणोनी ॥ आले लोटांगणीं चांगदेव ॥ ११ ॥ प्रत्यक्ष पैठणीं भट्टीं केला वाद ॥ बोलविला वेद ह्मशीपुत्रा ॥ १२ ॥ सोहं सुक्तताच्या सोडूनिया गांठी ॥ केलीसे मराठी गीता देवी ॥ १३ ॥ नामा ह्मणे जेणें सर्व सुख लाहिजे ॥ एक वेळा जाइजे आळंकावती ॥ १४ ॥ पंढरीहुनी सोपें ॥ जनाचीं हरावया पापें ॥ १५ ॥ कळिकाळ कोपलिया कोपें ॥ त्याचें न चले आळंकापुरासी ॥ १६ ॥

---



## बोधलेब[illegible]वाचें चरित्र.

॥ १८२८ ॥ धामणगांवाम[illegible] [illegible]णकोजी बोधला ॥ आवडे देवाला प्राणाहुनी ॥ १ ॥ विठोबाचे [illegible] रंगलें हें मन ॥ मिळालें जीवन सिंधुमाजीं ॥ २ ॥ आवडीनें केला त्य[illegible] अंगिकार ॥ कृपेचा सागर पांडुरंग ॥ ३ ॥ गुणदोष त्याचे न पाहे चक्रपाणी ॥ बोलिले पुराणीं व्यासादिक ॥ ४ ॥ सत्य हेंचि असे सांगतो प्रमाण ॥ भावें करा ध्यान विठोबाचें ॥ ५ ॥ तैसा बोधराज प्रेमळ हा भक्त ॥ भावें आठवीत देवाजीसी ॥ ६ ॥ रात्रीं शेतामाजीं करीत रक्षण ॥ गात नारायण आवडीनें ॥ ७ ॥ राळरास त्याच्या सासऱ्याचा गांव ॥ त्याची याची सींव एक असे ॥ ८ ॥ तयाचिया घरीं हांसी कुणबीण ॥ करीत रक्षण शेतामाजीं ॥ ९ ॥ बोधराज भावें आळवीत देव ॥ हांसीचे[illegible]या जीवा सुख वाटे ॥ १० ॥ विठोबाचे नामीं वेधलेसें मन ॥ आली ती शरण बोधराजा ॥ ११ ॥ ह्मणे बापा मज द्यावा उपदेश ॥ तोडावा हा फांस संसाराचा ॥ १२ ॥ हांसीचा तो भाव जाणुनी पवित्र ॥ सांगीतला मंत्र त्रिअक्षरीं ॥ १३ ॥ विठ्ठल हें नाम अहोरात्र ध्याई ॥ मग तुला नाहीं भय चिंता ॥ १४ ॥ हरिदिनीं व्रत करी एकादशी ॥ जागर कथेसी करीत जावा ॥ १५ ॥ हांसीचीया मना झाला तो आनंद ॥ भावें हा गोविंद आळवी ती ॥ १६ ॥ चालवीत व्रत नेम एकादशी ॥ जागर कथेसी धामणगांवीं ॥ १७ ॥ बोधराज भक्त भावीक प्रेमळ ॥ कीर्तन रसाळ आवडीचें ॥ १८ ॥ श्रवणासी ते येती गांवीचे ते लोक ॥ वाटतसें सुख तयालागीं ॥ १९ ॥ भवर गांवींचे किर्तनास आले ॥ त्यांत काय झालें एक ऐका ॥ २० ॥ मार्गीं चालतांना सर्पदंश झाला ॥ तेंचि वेळा गेला प्राण त्याचा ॥ २१ ॥ सांगात्यांनीं तेव्हां विचार करूनी ॥ आणियेला त्वरें कथेमाजीं ॥ २२ ॥ बैसविलें त्यासी भिंतीसी टेकुनी ॥ करिती श्रवण हरिकथा ॥ २३ ॥ नामामृत भावें वाढीत बोधला ॥ ध्यारे सर्वत्रांला सांगतसे ॥ २४ ॥ करावी पुरती तुह्मी सांठवण ॥ जगीं हें [illegible] पुंढें उरलेंसे ॥ २५ ॥ स्वर्ग मृत्युलोकीं असे तो पाताळीं ॥ आणिले ज[illegible] ते ॥ [illegible]ळीकें ॥ २६ ॥ समपदीं कटी ठेउनिया कर ॥ उभे विटेवर रा[illegible] तुह्मांपु[illegible] ॥ २७ ॥ तयाची हे गोडी बोधल्या सांपडली ॥ तेंचि त्यां वा[illegible]ांत २८ ॥ श्रवण

द्वारें तुह्मी जेवा सावकाश ॥ होईल उल्हास माझे जीवा ॥ २९ ॥ नामघोष तुह्मी वाजवावी टाळी ॥ होईल हे होळी पातकांची ॥ ३० ॥ श्रोते बोलताती तेव्हां बोधल्यास ॥ करा उपदेश या गृहस्थासी ॥ ३१ ॥ वाजवीना टाळी करीना भजन ॥ कांहो यानें मौन्य धरियेलें ॥ ३२ ॥ बोधराज करी त्यासी विनवणी ॥ बोला चक्रपाणी आवडीनें ॥ ३३ ॥ कथेलागीं तेव्हां येती आनंदानें ॥ कांपे तया भेणें कळीकाळ ॥ ३४ ॥ सांडुनि अहंता यावें कीर्तनासी ॥ तेणें हृषिकेशी संतोषतो ॥ ३५ ॥ ह्मणोनिया कोणी न करावा आळस ॥ बोलावा उल्हासें पांडुरंग ॥ ३६ ॥ ऐकोनीया ऐसें तेव्हां नारायण ॥ परतविला प्राण तेचि वेळां ॥ ३७ ॥ कथेमाजीं जेकां बैसाविलें प्रेत ॥ ते आनंदें नाचत नामघोषें ॥ ३८ ॥ समजलें तेव्हां श्रोत्या त्यां सकळां ॥ महिमा आगळा हरिनामाचा ॥ ३९ ॥ बोधल्यासी तेव्हां श्रुत झाली मात ॥ उठविलें प्रेत पांडुरंगें ॥ ४० ॥ प्रेमअश्रु बोधल्याचे डोळां ॥ पाळिसी तूं लळा पांडुरंगा ॥ ४१ ॥ जाणुनि अंतर होसी साहाकारी ॥ लज्जा त्वां श्रीहरि राखियेली ॥ ४२ ॥ बाळकाचे बोल मातेसी आवड ॥ पुरवीत कोड आनंदानें ॥ ४३ ॥ समजलें मज आतां विठाबाई ॥ काय उतराई होऊं तुज ॥ ४४ ॥ बोधल्यासी बोले विठोबा सांवळा ॥ आवडी प्रेमळा तुझी मज ॥ ४५ ॥ आनंदें जागर होत एकादशी ॥ किर्तनांत हांसी होती तेव्हां ॥ ४६ ॥ हांसीचे ते धनी विभक्त ते झाले ॥ विकरा घातिले हांसीलागीं ॥ ४७ ॥ हांसीलागीं तेव्हां श्रुत झाली वार्ता ॥ खेद करी चित्ता आपुलीया ॥ ४८ ॥ काय जन्मांतर कैसें हें प्राक्तन ॥ स्वामीचे चरण अंतरती ॥ ४९ ॥ बोधराज माझी पांडुरंग मूर्ती ॥ वाटेलही खंती त्याची मज ॥ ५० ॥ होऊनिया श्रमी धामणगांवा गेली ॥ वार्ता सांगितली बोधराजा ॥ ५१ ॥ बाबा तुह्मी आतां घ्यावें मज मोल ॥ श्रुत तेव्हां केलें ममताईसी ॥ ५२ ॥ जाणुनि अंतर राळेरास आला ॥ मेहुण्यास बोले बोधराज ॥ ५३ ॥ हांसिसी विकितां ह्मणुनी ऐकीलें ॥ सांगा इचें मोल काय आतां ॥ ५४ ॥ येरु ह्मणे हांसी देऊं आणिकांसी ॥ देऊं ना तुह्मांसी बोलूं नका ॥ ५५ ॥ हांसीलागीं तेव्हां श्रुत झाली वार्ता ॥ खेद करी चित्ता आपुलिया ॥ ५६ ॥ बोधराज तेव्हां समजावी तीसी ॥ सांगतो देवासी नेतील तुज ॥ ५७ ॥ सांगुनीया ऐसें धामणगांवा गेले ॥ तों हांसीलागीं आलें गिऱ्हाईक ॥ ५८ ॥ पंचवीस होन केलें तिचें मोल ॥ लिहून घेतलें खरिद-

खत ॥ ५९ ॥ द्रव्य घातियेलें तयाच्या पदरांत ॥ तों आले अकस्मात पांडुरंग ॥ ६० ॥ हांसे तुजलागीं बोलावी बोधला ॥ शब्द हा ऐकिला सर्वत्रांनीं ॥ ६१ ॥ हांसी आणि मूल तेव्हां जालें गुप्त ॥ केला हा वृत्तांत पांडुरंगें ॥ ६२ ॥ बोलावितां हांसी न दिसे तयाला ॥ कज्जा तो लागला दोघांजणा ॥ ६३ ॥ भांडत हे गेले तेव्हां दिवाणांत ॥ सांगती वृत्तांत दोघेजण ॥ ६४ ॥ फजीत होऊनी तेव्हां दरबारीं ॥ दिल्हें तें माघारी द्रव्य त्याचें ॥ ६५ ॥ संताचें नायके नाडला तो खर ॥ दोहींकडे थार नाहीं त्यासी ॥ ६६ ॥ संतासी शरण असे दास नामा ॥ अखंडित प्रेमा त्याचे नामीं ॥ ६७ ॥

---

## राकाकुंभाराचें चरित्र.

॥ १८२९ ॥ कुंभार तो राका कांता त्याची बंका ॥ कन्या नामरंका तिघेजण ॥ १ ॥ पंढरींक्षेत्रांत राहतां आनंदें ॥ वाचे गोविंद आळविती ॥ २ ॥ करिती आपुला स्वकर्म व्यवहार ॥ वाचे निरंतर रामनाम ॥ ३ ॥ घडोनी भाजणें ठेविलीं घरांत ॥ व्याली डेरियांत मांजर ते ॥ ४ ॥ न करितां त्यानें आवा तो रचिला ॥ अग्नि तो लाविला तेचिवेळां ॥ ५ ॥ फिरूनि मांजर घरासी ते आली ॥ नाहींत तीं पिल्लीं डेरा तोही ॥ ६ ॥ आव्यापाशीं तेव्हां आली ती धांवत ॥ ओरडत फिरत भउताली ॥ ७ ॥ पाहुनि राका समजला मनीं ॥ आहा चक्रपाणी काय केलें ॥ ८ ॥ जळोजळो माझा प्रपंच व्यवहार ॥ नाहीं म्यां विचार केला देवा ॥ ९ ॥ करावया गेला प्रपंच्याचें हीत ॥ पापाचे पर्वत झाले माथां ॥ १० ॥ अज्ञान हीं बाळें जळतील आतां ॥ धांव पंढरिनाथा येचिवेळां ॥ ११ ॥ पांडव ते रक्षिले लाक्षाते जोहरि ॥ तैसी करी परी पिल्लीयांसी ॥ १२ ॥ आगिमाजीं तुंवा प्रल्हाद रक्षिला ॥ अगाध हे तुला काय झालें ॥ १३ ॥ रक्षीयासी आतां येउनीया अंगें ॥ घेईन वैराग्य नवस हाची ॥ १४ ॥ तिघाजणीं तेव्हां सजीलें अन्नपाणी ॥ धांव चक्रपाणी लवलाहीं ॥ १५ ॥ तीन रोज झाले शांत झाला अग्नी ॥ पाहती उकलुनि आवा तेव्हां ॥ १६ ॥ सर्वस्व भोजणें भाजुनिया गेलीं ॥ खेळताती पिल्लीं डेरीयांत ॥ १७ ॥ कच्चा

असे डेरा नसे आंच साला ॥ माझे नवसास पावला पांडुरंग ॥ १८ ॥ पाहती सकळ पंढरीचे लोक ॥ अगाध कवतुक देवाजीचें ॥ १९ ॥ आनंदोनी राका बोलवी ब्राह्मण ॥ दिलें तें लुटून घर तेव्हां ॥ २० ॥ वेंचुनीया चिंध्या लाविती ढुंगासी ॥ भावें हृषीकेशी आळविती ॥ २१ ॥ जाउनिया वनीं वेंचिताती काष्टें ॥ उदरापुरतें विकिताती ॥ २२ ॥ अखंड करिती नामाचा गजर ॥ ध्यानीं मनीं वर रखुमाईचा ॥ २३ ॥ बंका गेली असे चंद्रभागे स्नाना ॥ नामयाची कन्या धुया आली ॥ २४ ॥ बंका बोले बाई सितोडे येतील ॥ ऐकुनीया बोले येरी तिसी ॥ २५ ॥ जातीची कुंभार कामीक वैराग्य ॥ घेतलेसें सोंग कासीयासी ॥ २६ ॥ ऐकुनीया बंका करीत उत्तर ॥ बौध अवतार पांडुरंग ॥ २७ ॥ रडका हा नामा घेतलीसे आळी ॥ सानें वनमाळी बोलविला ॥ २८ ॥ अबोल हा देव बोलविला यानें ॥ काय थोरपण आलें यासी ॥ २९ ॥ वाढविली कीर्ति जगांत डांगोरा ॥ बोलविला खरा पांडुरंग ॥ ३० ॥ चंद्रभागे तीरीं झाला वृत्तांत ॥ श्रुत झाली मात नामयासी ॥ ३१ ॥ नामदेव तेव्हां आले राउळासी ॥ विनंती देवासी करुनी बोले ॥ ३२ ॥ राका-कुंभारानें घेतलेसें वैराग्य ॥ कांहो केला त्याग संसारीचा ॥ ३३ ॥ बोले पांडुरंग निष्काम हे भक्ती ॥ दावितो प्रचिती तुजलागी ॥ ३४ ॥ विठ्ठल रखुमाई नामा असे संगें ॥ आलीं तेव्हां तिघें वनाप्रती ॥ ३५ ॥ रुक्मिणीनें तेव्हां काढुनी कंकण ॥ ठेविलें झांकून काष्ठामाजीं ॥ ३६ ॥ राका बंका वंका वेंचिताती काष्ठ ॥ आली अवचित तया ठायां ॥ ३७ ॥ उचलितां काष्ठ देखिलें कंकण ॥ दिलें तें टाकून तेचि वेळा ॥ ३८ ॥ ह्मणती याजलागीं विटाळ जाहला ॥ न घेती तयाला ह्मणोनिया ॥ ३९ ॥ पाहुनी रुक्मिणी विस्मय करीत ॥ निष्काम हे भक्त देखीयेले ॥ ४० ॥ बोले रखुमाबाई अहो पांडुरंगा ॥ भेटावें श्रीरंगा याजलागीं ॥ ४१ ॥ नामा ह्मणे देवा वंदितों मी चरण ॥ धरा आलिंगून तिघांजणा ॥ ४२ ॥ होती हे आवडी देवाजीचे चित्तीं ॥ आलिंगिलीं प्रीतीं तिघेजण ॥ ४३ ॥ राका बंका वंका वंदिती चरण ॥ कांहो येणें केलें देवराया ॥ ४४ ॥ उष्ण-काळ दिन श्रमली माझी आई ॥ बैसा रखुमाबाई छायेखालीं ॥ ४५ ॥ ऐसी असे ज्याची देवावरी माया ॥ करी सासी दया पांडुरंग ॥ ४६ ॥ नामदेव बोले साचा मी हा दास ॥ शरण तयास वारंवार ॥ ४७ ॥

---

# संताजी पवाराचें चरित्र.

---

॥ १८३० ॥ रांजण गांवामध्यें संताजी पवार ॥ असे तो सरदार नामांकित ॥ १ ॥ स्वामी काजामध्यें असे तो सावध ॥ भावें हा गोविंद आळवीत ॥ २ ॥ शास्त्र भागवत करितां श्रवण ॥ समजलें पूर्ण मनामाजीं ॥ ३ ॥ नाशवंत सर्व आहे हा संसार ॥ नाम एक सार विठोबाचें ॥ ४ ॥ ऐसें कांहीं आतां करावें साधन ॥ रामनामीं मन लागेल तें ॥ ५ ॥ कासियासी आतां हा पाहिजे उद्योग ॥ घेतलें वैराग्य तेचि वेळा ॥ ६ ॥ मातेलागीं तेव्हां केला नमस्कार ॥ निघाले हे त्वरें तेथुनीया ॥ ७ ॥ बाबा संतराजा कांबा केला त्याग ॥ घेतलें वैराग्य कासयास ॥ ८ ॥ काय जड भारी पडियेलें तुज ॥ सांग कैसें गुज मजलागीं ॥ ९ ॥ नको नको माते या संसाराची वेडी ॥ फारच आहे गोडी हरिनामांत ॥ १० ॥ नामामृत पान करीन हें आतां ॥ समाधान चित्ता होय माझ्या ॥ ११ ॥ करूं दे सार्थक आलिया देहास ॥ नको भव फांस घालूं आतां ॥ १२ ॥ वारंवार तुज हेचि विज्ञापना ॥ पाहूं दे चरणा देवाजीच्या ॥ १३ ॥ कृपा करूनिया देई आशिर्वाद ॥ सखा हा गोविंद करी माझा ॥ १४ ॥ करुनी प्रार्थना निघाले तेथुनी ॥ चालिले ते वनीं अरण्यांत ॥ १५ ॥ धांविन्नली कांता तेव्हां त्याचे मागें ॥ न्यावें स्वामी संगें मजलागीं ॥ १६ ॥ नकोनको मज भव हा संसार ॥ उतरावें पार मजलागीं॥ १७ ॥ गंगेचा हा ओघ सागरासी गेला ॥ नाहीं परतला मागुता तो ॥ १८ ॥ ऐसे महाराज तुह्मी कृपावंत ॥ समाधान चित्त करा माझें ॥ १९ ॥ येईन सांगातें करीन हे सेवा ॥ मान्य हें केशवालागीं असे ॥ २० ॥ पहा महाराजा तुह्मी कृपादृष्टी ॥ कां मज हिंपुटी करीतसा ॥ २१ ॥ जळा तो वेगळा कैसा राहे मीन ॥ जाईल हा प्राण तेचि वेळा ॥ २२ ॥ तुमचे चरणीं बहू आहे सुख ॥ नको भवदुःख संसार हा ॥ २३ ॥ सार रामनाम फार आहे गोड ॥ पुरवा आवड माझी आतां ॥ २४ ॥ आवडीचें लेणें द्यावें मज आतां ॥ तुह्मी प्राणनाथा कृपासिंधु ॥ २५ ॥ रामनाम अंगीं लेववा भूषण ॥ तेणें समाधान होय माझें ॥ २६ ॥ दीपकहि प्रभा नव्हेचि वेगळी ॥ पाहूं वनमाळी संगें दोघे ॥ २७ ॥ तेव्हां संतराज करिती उत्तर ॥

न धरवे धीर तुजलागीं ॥ २८ ॥ न सोसवे तुज कठीण वैराग्य ॥ नको येऊं मागें माझ्या आतां ॥ २९ ॥ सांडोनिया द्यावी देहाची हे आस ॥ तेव्हां तुटेल फांस संसाराचा ॥ ३० ॥ कामक्रोध यांसी देऊं नये थार ॥ लीन व्हावें फार संतांपायीं ॥ ३१ ॥ वस्त्रें भूषणाची धरूं नये चाड ॥ घ्यावें नाम गोड गोविंदाचें ॥ ३२ ॥ लौकिकाची कांहीं धरूं नये लाज ॥ बोलावें हें गुज देवाजीसीं ॥ ३३ ॥ द्वैत कल्पनेचा नसे जेथें ठाव ॥ तोची झाला देव स्वयें अंगें ॥ ३४ ॥ ऐकोनीया ऐसें बोले कांता त्यासी ॥ आनंद मानसीं हाचि माझ्या ॥ ३५ ॥ तेची वेळां केला भूषणाचा त्याग ॥ घेतलें वैराग्य पतिसंगें ॥ ३६ ॥ पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं ॥ राहती ते वनीं आनंदानें ॥ ३७ ॥ तेव्हां संतराज बोले कांतेलागीं ॥ भिक्षेलागीं वेगीं जावें आतां ॥ ३८ ॥ पारगांव असे भीमे पैलीकडे ॥ कोणासी सांकडे न घालावें ॥ ३९ ॥ संतोषानें जेकां देतील पदरीं ॥ ह्मणावें श्रीहरी अर्पण तें ॥ ४० ॥ आनंदानें तेव्हां निघाली तेथुनी ॥ वाचे नारायण गात असे ॥ ४१ ॥ भिक्षा मागतांना नणंद भेटली ॥ तिणें ओळखिली भाउजई ॥ ४२ ॥ कासयासी बाई घेतलें वैराग्य ॥ कांगे केला त्याग संसाराचा ॥ ४३ ॥ सांडोनीया सर्व हें राज्य संपत्ती ॥ उदास कां चित्तीं झालां तुह्मी ॥ ४४ ॥ ऐकोनीया येरी करीत उत्तर ॥ सांपडलें सार संसारींचें ॥ ४५ ॥ सार नामामृत गोड आहे फार ॥ प्राशन चतुर करिताती ॥ ४६ ॥ सद्गुरु कृपेचा वर्षाव जाहला ॥ प्रसाद लाधला भ्रतारासी ॥ ४७ ॥ त्यांतील हें शेष त्यापात्रीं राहिलें ॥ आवडी सेविलें माझ्या मनें ॥ ४८ ॥ गोडी त्याची फार सांगतां हे नये ॥ वर्णूं आतां काय एक्या मुखें ॥ ४९ ॥ अखंड सेविती नित्य साधुसंत ॥ भाग्या नाहीं अंत त्याचीया तो ॥ ५० ॥ येरी ह्मणे बाई करावें भोजन ॥ भिक्षा जा घेऊन येथुनीया ॥ ५१ ॥ आग्रह करून दोन पोळया आतां ॥ घातल्या झोळींत न कळतां ॥ ५२ ॥ आज्ञा घेऊनिया निघाली ते त्वरें ॥ पोंहचली तीर भीवरेचें ॥ ५३ ॥ भीवरे उगमीं पर्जन्य पडीला ॥ पुर तेथें आला अकस्मात ॥ ५४ ॥ पलीकडे जावया न दिसे उतार ॥ झाली चिंतातुर मनामाजीं ॥ ५५ ॥ स्वामी माझा तेथें असे उपवासी ॥ काय हृषीकेशी करूं आतां ॥ ५६ ॥ ऐकोनीया कोळी झाला नारायण ॥ नेलें उतरून पार तीतें ॥ ५७ ॥ पतीलागीं तिनें नमस्कार केला ॥ ठेविली समोर भिक्षा त्याचे ॥ ५८ ॥ येरु ह्मणे कैसी आलीस तूं पार ॥ कोळीयानें त्वरें उतरीली ॥ ५९ ॥

कैंचा कोळी तेथें आले पांडुरंग ॥ धन्य तुझें भाग्य भेट झाली ॥ ६० ॥
प्रेमअश्रु डोळां वाहे त्याचे नीर ॥ भेट द्यावी त्वरें पांडुरंगा ॥ ६१ ॥
भेटी वाचूनिया न करी भोजन ॥ करीतसे ध्यान देवाजीचें ॥ ६२ ॥
वाणी एक होता रांजणगांवांत ॥ झाला दृष्टांत त्याजलागीं ॥ ६३ ॥
बोले पांडुरंग करुनी पक्वान्न ॥ घालावें भोजन संतराजा ॥ ६४ ॥
करुनी पाकसिद्धि वाणी गेला तेथें ॥ सांगे तो वृत्तांत त्याजलागीं ॥ ६५॥
येरु ह्मणे तुज देवाजी भेटले ॥ निष्ठुर कां झाले मजविसी ॥ ६६ ॥
करीन भोजन देवा तुझ्या हातें ॥ कांहो माझें चित्त पाहातसा ॥ ६७ ॥
पतीत मी पापी तुझा शरणांगत ॥ समाधान चित्त करा माझें ॥ ६८ ॥
न मागें मी कांहीं देवा तुज आतां ॥ भेट तूं अनंता एक वेळा ॥ ६९ ॥
भाकीतां करुणा आले नारायण ॥ करी बा भोजन संतराजा ॥ ७० ॥
आलिंगुनीं दोघां धरिलें हृदयीं ॥ झाली विठाबाई कृपावंत ॥ ७१ ॥
काय इच्छा असे मागा तुह्मी आतां ॥ नामीं हे अनंता प्रीत देई ॥ ७२ ॥
भिक्षेचें पवित्र भक्षिताती अन्न ॥ अहोरात्र ध्यान देवाजीचें ॥ ७३ ॥
आषाढाची यात्रा जात पंढरीसी ॥ आनंद मानसीं जाहाला साचे ॥७४॥
भेटतील आतां माझे दिनानाथ ॥ आणीकही संत साधुजन ॥ ७५ ॥
समारंभें जाती करीत गजर ॥ पोहोंचले तीर भीवरेचें ॥ ७६ ॥ व्रत एकादशी होती तेचि दिनीं ॥ भीवरा भरोनी चाललीसे ॥ ७७ ॥ नामाचे-नी छंदें जाहला ब्रह्मानंद ॥ चालिलें आनंदें साची पंथें ॥ ७८ ॥ कूर्मरूप तेव्हां जाहला नारायण ॥ नेलें उतरून पार सातें ॥ ७९ ॥ स्वर्गीं सुरवर बैसोनी विमानीं ॥ पाहती नयनीं कवतुक ॥ ८० ॥ धन्य साधुसंत भाग्या नाहीं पार ॥ वाहे पृष्ठी भार देव सांचा ॥ ८१ ॥ भीमा उतरुनी आले पंढरिसी ॥ आनंद मनासीं सर्वत्रांचे ॥ ८२ ॥ आणीकही भार यात्रेचा तो आला ॥ त्याणें हा देखिला नवलावो ॥ ८३ ॥ ह्मणती संतराजा नेई आह्मा पार ॥ भेटवी हा वर रखुमाईचा ॥ ८४ ॥ कृपावंत साधु आले धांउनीया ॥ ह्मणती पंढरिराया सांभाळावें ॥ ८५ ॥ भावाची ही पेठ बांधा बळकट ॥ मार्ग धरा नीट भक्तीचा हा ॥ ८६ ॥ संतांचा हा संग धरावा सप्रेम ॥ न बाधा हा श्रम तुह्मालागीं ॥ ८७ ॥ रामनाम संगें धरावें भांडवल ॥ वस्तु हे अमोल येईल हाता ॥ ८८ ॥ सभाग्य हे साधु त्यांनीं केला सांठा ॥ देतील ते वाटा तुह्मालागीं ॥ ८९ ॥ नामाचें तें रूप असे सर्व सृष्टी ॥ दाविती ते दृष्टी ज्ञानाची हे ॥ ९० ॥ तेव्हां तुझ्या मना होईल

आनंद ॥ तोचि ब्रह्मानंद ओळखावा ॥ ९१ ॥ द्वैत कल्पनेसी नसे जेथें ठाव ॥ आला तोचि देव स्वयें अंगें ॥ ९२ ॥ सद्गुरु कृपेनें हरेल हा भ्रम ॥ दिसेल हें ब्रह्म जग सारें ॥ ९३ ॥ त्याजवीण कोठें रिता नाहीं ठाव ॥ धरा नामीं भाव विठोबाच्या ॥ ९४ ॥ उतरुनी भीमा गेले पैल तीरा ॥ भेटावया वरा रखुमाईच्या ॥ ९५ ॥ ब्रह्मानंद झाला सर्वांचे अंतरीं ॥ आनंदें श्रीहरि आठविती ॥ ९६ ॥ पंढरीच्या सुखा भाग्या नाहीं अंत ॥ जाणताती संत साधुजन ॥ ९७ ॥ नित्यानित्य घडे चंद्रभागे स्नान ॥ अखंड दरूशन देवाजीचें ॥ ९८ ॥ तयाचीया भाग्या अंत नाहीं पार ॥ राहिला सार संतोबा तो ॥ ९९ ॥ नामदेव तेथें याचक भिकारी ॥ हाका त्यासी मारी वारंवार ॥ १०० ॥ कांहीं मज द्यावें तुमचें उचिष्ठ ॥ भरेल हें पोट तेणें माझें ॥ १०१ ॥ कृपावंत साधु आली त्या करुणा ॥ वंदितो चरणा नामदेव ॥ १०२ ॥

---

## परसोबा नामदेवाचा संवाद.

---:०:---

॥ १८३१ ॥ भूवैकुंठ जागा क्षेत्र हे पंढरी ॥ नांदे तेथें हरि द्वारकेचा ॥ १ ॥ तेंची गांवीं असे परसा भागवत ॥ करीतसे भक्ति रुक्मिणीची ॥ २ ॥ आदिमाया जाहली ती प्रसन्न ॥ दिला त्या कारणें परिस एक ॥ ३ ॥ लोहासी लावुनी सुवर्ण तो करी ॥ सुखें हा संसारीं राहतसे ॥ ४ ॥ नित्य महाद्वारीं वाची रामायण ॥ करिती श्रवण साधुसंत ॥ ५ ॥ भजन करूनि नामा येत तेथें ॥ पुसतसे अर्थ त्याजलागीं ॥ ६ ॥ सांगा कैसी आहे लंकेची रचना ॥ कोण कोणत्या स्थाना राहताती ॥ ७ ॥ बाबा तेंची सांगा मजलागीं खूण ॥ बोलत प्रमाण नामा त्यासी ॥ ८ ॥ शास्त्र पाहोनीया करितो उत्तर ॥ आणीक विचार पुसे त्यासी ॥ ९ ॥ दोघांचा संवाद होतां महाद्वारीं ॥ विस्मय अंतरीं करिती संत ॥ १० ॥ परसोबा सांगत रुक्मिणीलागून ॥ करितो अपमान नामा माझा ॥ ११ ॥ ऐक माते माझी हेचि विज्ञापना ॥ दावी तूं रचना लंकेची हे ॥ १२ ॥ पाहोनीया लंका येईन मी माये ॥ समाधान होय नामयाचें ॥ १३ ॥ सांगेन तयासी सकळ वृत्तांत ॥ पुरवी हा हेत आतां माझा ॥ १४ ॥ लेंकुराचे कोण पुरवील लळे ॥ घेतली म्यां आळ तुजपाशी ॥ १५ ॥ करी माते माझें आतां

समाधान ॥ वंदीत चरण परसा तेव्हां ॥ १६ ॥ अवश्य ह्मणोनीया दिल्हें तें वचन ॥ आनंदला पूर्ण भागवत ॥ १७ ॥ बैसवीलें तिणें त्यासी हाता-वरी ॥ दाविली नगरी बिभिषणाची ॥ १८ ॥ पाहे बापा आतां होउनीया स्वस्थ ॥ पुरवी हा हेत आपुला तूं ॥ १९ ॥ पाहोनीया लंका आनंदला मनीं ॥ धन्य हे करणी करत्याची ॥ २० ॥ रम्य स्थळ जागा अपूर्व ते फार ॥ होतसे गजर नामघोष ॥ २१ ॥ घरोघरीं होय वेद पारायण ॥ रामनामीं मन सर्वत्रांचें ॥ २२ ॥ सर्व पाहोनीया लंकेची रचना ॥ आला तो सदना बिभिषणाच्या॥ २३ ॥ पाहातो तों नामा उभा कीर्तनास॥ गुण गात असे देवाजीचे ॥ २४ ॥ शरण जे गेले माझ्या पंढरिनाथा ॥ नाहीं भय चिंता त्यांस कांहीं ॥ २५ ॥ विस्मय तो करी परसोबा अंतरीं ॥ फिरला माघारीं तेथु-नीया ॥ २६ ॥ बैसविला तेव्हां रुक्मिणीनें करीं ॥ आणिला पंढरीक्षेत्रामाजीं ॥ २७ ॥ समजलें तेव्हां नामयालागुनि ॥ पुसतसे खूण तुजलागीं ॥ २८ ॥ परसोबा सांगत त्यासी सविस्तर ॥ बिभीषण मंदिर कैसें असे ॥ २९ ॥ ऐकोनीया ऐसें न करी उत्तर ॥ कां रे अहंकार धरिलासी ॥ ३० ॥ हातीं तुझ्या आला होता चिंतामणी ॥ कैसा तो गोफणीं लाविलासी ॥ ३१ ॥ कल्प-वृक्ष तुझ्या आंगणीं लाविला ॥ कैसा उपडिला अभागिया ॥ ३२ ॥ अमृताचा घड हातासी लाधला ॥ कैसा उलंडिला वेडिया तूं ॥ ३३ ॥ तैसा महाराज तोचि बिभिषण ॥ कां नाहीं नमन केलें त्यासीं ॥ ३४ ॥ सदोदित ज्याचें हृदयीं रामचंद्र ॥ दुजा कां विचार धरीला तेथें ॥ ३५ ॥ अहंकारें मोठे मोठे नाडलेती ॥ सांगसी त्या तूं युक्ती शास्त्राच्या ते ॥ ३६ ॥ तोचि अहंकार धरिलासी अझून ॥ होई आतां लीन संतांपायीं ॥ ३७ ॥ तेणें हा झडेल अंतरींचा मळ ॥ दिसेल सकळ ब्रह्मरूप ॥ ३८ ॥ समजला तेव्हां परसोबा तो मनीं ॥ नकळे करणी नामा तुझी ॥ ३९ ॥ गळोनीया गेला त्याचा अभिमान ॥ झाला तेव्हां लीन संतांपायीं ॥ ४० ॥ संताची करणी असे अघटित ॥ करी दंवडत नामदेव ॥ ४१ ॥

---

## गोरोबा कुंभाराचें चरित्र.

---

॥ १८३२ ॥ प्रेम अंगीं सदां वाचे भगवंत ॥ प्रेमळ तो भक्त कुंभार तो गोरा ॥ १ ॥ असे घराश्रमी करीत व्यवहार ॥ न पडे विसर विठोबाचा

॥ २ ॥ कालवुनी माती तुडवीत गोरा ॥ आठवीत वरा रखुमाईच्या ॥ ३ ॥ प्रेम आंगीं असे झांकुनी नयन ॥ करीत भजन विठोबाचें ॥ ४ ॥ तयाचीये कांता आणूं गेली जळ ॥ खेळतसे बाळ आंगणांत ॥ ५ ॥ रांगत लेंकरूं गेलें असे तेथें ॥ तुडविलें त्यातें नकळतां ॥ ६ ॥ तत्क्षणीं त्याचा गेला तेव्हां प्राण ॥ घेउनी जीवन आली कांता ॥ ७ ॥ पाहती तो चिखलांत दिसे रक्तमांस ॥ केला तो आक्रोश मोठा तिनें ॥ ८ ॥ पिटीयेलें तेव्हां आपुलें वदन ॥ जळो हें भजन तुझें आतां ॥ ९ ॥ डोळे असोनिया जाहलासी आंधळा ॥ कोठोनी कपाळा पडलासी ॥ १० ॥ कसाबासी तरी कांहीं येती दया ॥ कांरे बाळराया तुडविलें ॥ ११ ॥ विठोबानें कैसें लावियेलें वेड ॥ नाहीं मागेंपुढें पाहिलेंसी ॥ १२ ॥ निर्दयाची तुज लागली संगती ॥ अधर्मी श्रीपति देखियेला ॥ १३ ॥ काय तुझा यानें केला असे अन्याय ॥ दूर परता होय चांडाळा तूं ॥ १४ ॥ हातीं लोटोनिया केला तो परता ॥ आग लाव आतां विठोबासी ॥ १५ ॥ ऐकुनीया शब्द सावध तो जाहला ॥ कांगे भंग केला भजनाचा ॥ १६ ॥ विठोबासी माझ्या कांगे त्वां गांजिलें ॥ कर्म ओढवलें बाळकाचें ॥ १७ ॥ सांग मन ऐसें कोणाचें तें जालें ॥ पुण्य फळा आलें लेंकुराचें ॥ १८ ॥ याजसाठीं माझ्या गांजिलेंसे देवा ॥ पाठी लागे तेव्हां मारावया ॥ १९ ॥ हात बोट मज लावशील आतां ॥ आण तुज सर्वथा विठोबाची ॥ २० ॥ ऐकतांची ऐसें ठेवि-येली काठी ॥ राहिला उगाची गोरा तेव्हां ॥ २१ ॥ न करी तो कांहीं तयेसी भाषण ॥ वर्जियेली तेणें कांता तेचि ॥ २२ ॥ विनवीते कांता गोरिया लागुनी ॥ न मोडी मी आण विठोबाची ॥ २३ ॥ जाली तेव्हां श्रमी वंश बुडविला ॥ विठोबा कोपला मजवरी ॥ २४ ॥ मनामाजीं तेणें केला तो विचार ॥ करावें दुसरें लग्न याचें ॥ २५ ॥ बोलाविला तिनें आपुला तो पिता ॥ सांगितली वार्ता याजलागीं ॥ २६ ॥ कनिष्ठ हे कन्या दे माझ्या भ्रतारा ॥ नको या विचारा पाहूं आतां ॥ २७ ॥ अवश्य ह्मणूनिया विनविला गोरा ॥ लग्नाची हे त्वरा केली तेव्हां ॥ २८ ॥ लग्न झाल्यावरी घाली वोसंगळा ॥ दोघींसही पाळा समानची ॥ २९ ॥ न पाळितां आण तुह्मा विठोबाची ॥ धरा या शब्दाची आठवण ॥ ३० ॥ अवश्य ह्मणोनीयां निघाला तो गोरा ॥ आला असे घरां आपूलिया ॥ ३१ ॥ कनिष्ठ स्त्रियेसी आलें असे न्हाण ॥ नकरी भाषण तिसी कांहीं ॥ ३२ ॥ येरु ह्मणे बाई कसा हा भ्रतार ॥ करूं मी विचार कैसा आतां ॥ ३३ ॥ पहिली ती कांता विनवी गोरि-

याते ॥ आंगिकारा इते स्वामी आतां ॥ ३४ ॥ मामानें ही मज घातलीसे आण ॥ दोघींचें पाळण समान करा ॥ ३५ ॥ गेला तरी आतां जावो माझा प्राण ॥ न मोडी मी आण विठोबाची ॥ ३६ ॥ जाहल्या दोघी श्रमी कपाळ पिटिती ॥ पुरविली पाठी विठोबानें ॥ ३७ ॥ वंश बुडविला ह्या मेल्या काळयानें ॥ जळो थोरपण याचें आतां ॥ ३८ ॥ वेडे मेले लोक घेती दरूशन ॥ नसावें भाषण यासीं कांहीं ॥ ३९ ॥ होवोनियां श्रमी बैसल्या घरांत ॥ काढियेली युक्ति कनिष्ठेनें ॥ ४० ॥ ह्मणे बाई आतां मोडूं याची आण ॥ करील भाषण आपणची ॥ ४१ ॥ निजतो हा जेथें तेथें हो जाऊन ॥ करावें शयन दोघीनीं तें ॥ ४२ ॥ निद्रेमाजीं उरस्थळीं याचे हात ॥ ठेऊं अवचित आपूलिया ॥ ४३ ॥ मग हा करील सहजची भाषण ॥ नलगे सांगणें कोणासी तें ॥ ४४ ॥ निद्रेमाजी गोरा जाहला तो निमग्न ॥ दोघींनीं शयन केलें तेथें ॥ ४५ ॥ उचलोनियां कर ठेविलें शरीरीं ॥ नाहीं देहावरी गोरा तेथें ॥ ४६ ॥ सावध होवोनी पाहियेले तेणें ॥ अन्याय हातानें केला माझ्या ॥ ४७ ॥ विठोबाची माझ्या मोडीयेली आण ॥ टाकावे तोडून हातचिही ॥ ४८ ॥ घेऊनिया शस्त्रें तोडियेले कर ॥ आनंदला फार गोरा तेव्हां ॥ ४९ ॥ समजलें तेव्हां लोकां त्या सकळां ॥ भक्त हा आगळा देखियेला ॥ ५० ॥ कैसा बाई आतां करावा विचार ॥ बुडाला संसार सर्वस्व हा ॥ ५१ ॥ आतां शरण जाऊं तया पांडुरंगा ॥ करील तो चिंता आमुचीये ॥ ५२ ॥ सांगूं वर्तमान रुक्मिणीजवळी ॥ विनवी वनमाळी आह्मांविसी ॥ ५३ ॥ शरणांगता हरि नेदीच अंतर ॥ वर्णितातीं शास्त्रें मोठींमोठीं ॥ ५४ ॥ संत हें गातातीं बाई सदोदीत ॥ पाहूं तो अनंत कैसा असे ॥ ५५ ॥ दोघी तेव्हां गेल्या रुक्मिणीजवळी ॥ विनविली बाळी रुक्मिणी ॥ ५६ ॥ सांगितला तिसी सकळ वृत्तांत ॥ विनवी हा कांत आह्माविसी ॥ ५७ ॥ ऐकेलग बाई तुझें तो वचन ॥ समजलें पूर्ण आह्मांलागीं ॥ ५८ ॥ करी माते आह्मा येवढा उपकार ॥ न पडे विसर जन्मोजन्मीं ॥ ५९ ॥ करूनी प्रार्थना आल्या त्या आश्रमा ॥ उभा होता नामा कीर्तनासी ॥ ६० ॥ आवडीनें गोरा करीत श्रवण ॥ आणीक सज्जन हरिभक्त ॥ ६१ ॥ नामयानें टाळी पिटीली गजरें ॥ गोरियासी कर फुटले ते ॥ ६२ ॥ रांगत लेंकरूं आलें तयावेळीं ॥ मातेच्या जवळी आनंदानें ॥ ६३ ॥ आलिंगुनी तिणें धरिलें ह्रदयीं ॥ झाली विठाबाई कृपावंत ॥ ६४ ॥ आलिंगुनी गोरा बोले मेघः-

शाम ॥ करी घराश्रम सुखें आतां ॥ ६५ ॥ संशयाची जात नको धरूं चित्ता ॥ आण तुज आतां माझी असे ॥ ६६ ॥ ऐकोनीया गोरा वर्ते घराश्रमी ॥ लक्ष असे नामीं विठोबाच्या ॥ ६७ ॥ ऐसीया संताचे आठवितां गुण ॥ जाती हे जळोन सर्व दोष ॥ ६८ ॥ नामदेव त्यासी करी विनवणी ॥ ठाव ह्या चरणीं तुमचीया ॥ ६९ ॥ हेंचि तुह्मी आतां मज द्यावें दान ॥ आठवीन गुण वारंवार ॥ ७० ॥

---

## हरिश्चंद्र राजाचें चरित्र.

---

॥ १८३३ ॥ सत्वाचा सागर राजा हरिश्चंद्र ॥ स्वप्नीं हें समग्र दिलें राज्य ॥ १ ॥ ब्राह्मणासी सुवर्ण औटभार ॥ संकल्प हा त्वरें सोडियला ॥ २ ॥ जागृतीमाजीं येउनी ब्राह्मण ॥ मागती सुवर्ण राजयासी ॥ ३ ॥ वंदुनि चरण राजा बोले त्यासी ॥ चला आश्रमासी स्वामी आतां ॥ ४ ॥ समारंभें रूपें घेउनी ब्राह्मण ॥ अयोध्येकारणें आले तेव्हां ॥ ५ ॥ राजद्वारापाशीं येउनी ब्राह्मण ॥ मागत सुवर्ण राजियासी ॥ ६ ॥ भांडारियासी आज्ञा करी हरिश्चंद्र ॥ आणा वेगीं त्वरें सुवर्ण हें ॥ ७ ॥ ऐकुनीया शब्द क्रोधें तो ब्राह्मण ॥ करीत ताडण राजियासी ॥ ८ ॥ माझें मज देसी काय समजोनी ॥ विचार हा मनीं कैसा केला ॥ ९ ॥ वंदुनी चरण बोले हरिश्चंद्र ॥ कृपेचे सागर स्वामी तुह्मी ॥ १० ॥ कृपा करूनिया केलें हें सावध ॥ करा अपराध क्षमा माझे ॥ ११ ॥ तारामती त्यासी करी विनवणी ॥ धरूनिया वेणी मारी तिसी ॥ १२ ॥ रोहिदास बोले वंदुनी चरण ॥ ऐका विज्ञापना एक माझी ॥ १३ ॥ स्वामीपाशीं मी तो राहतों गहाण ॥ देउनी सुवर्ण जाऊं आह्मी ॥ १४ ॥ राजा बोले स्वामी द्यावी जी अवधि ॥ तुह्मी कृपानीधि महाराजा ॥ १५ ॥ नवखंडा वेगळी असे वाराणसी ॥ विकुनी देहासी देऊं आह्मी ॥ १६ ॥ बोलावुनी मंत्री सांगे हरिश्चंद्र ॥ करा कारभार स्वामीपाशीं ॥ १७ ॥ स्वामी सांगतील तेंचि करा मान्य ॥ कार्य विचारुनी करित जावें ॥ १८ ॥ आह्मी जातों आतां कृपा असों द्यावी ॥ सकळा सांगावी विनंति माझी ॥ १९ ॥ ठेवुनीया सर्व अलंकार भूषण ॥ झालीं तिघेजण मार्गस्थही

॥ २० ॥ राजा हरिश्चंद्र मागें तारामती ॥ चिमणीही मूर्ति रोहिदास ॥ २१ ॥ पाहुनिया लोक करिताती शोक ॥ पशुपक्षादिक सर्व तेही ॥ २२ ॥ कृपेच्या सागरा राजा हरिश्चंद्रा ॥ कां आह्मां सर्वत्रां मोकलीसी ॥ २३ ॥ लेंकुराचेपरी केलासे सांभाळ ॥ मातेवीण बाळ राहे कैसें ॥ २४ ॥ लागेल तें द्रव्य घेई आह्मापाशीं ॥ देई या विप्रासी महाराजा ॥ २५ ॥ येती काकुळती करिती नमस्कार ॥ नको तूं अंतर देऊं आह्मां ॥ २६ ॥ विप्रासी लोक येती काकुळती ॥ देई हा नृपति आह्मां-लागीं ॥ २७ ॥ द्विगुणी सुवर्ण देतों तुज आतां ॥ सोडी कृपावंता हरि-श्चंद्रा ॥ २८ ॥ स्वामी तुह्मी करा राज्यकारभार ॥ ठेवा हरिश्चंद्र आह्मापाशीं ॥ २९ ॥ नका करूं गाईवत्सा ताडातोडी ॥ येती घडो-घडी काकुळती ॥ ३० ॥ ऐकोनीया बोले क्रोधें तो ब्राह्मण ॥ जा राजा त्वरेनें येथुनीया ॥ ३१ ॥ राजियानें केली सर्वां विनवणी ॥ निघाला तेथुनी हरिश्चंद्र ॥ ३२ ॥ अदित्यासी तेव्हां सांगे विश्वामित्र ॥ तपा तुह्मी तीव्र सोळा कळा ॥ ३३ ॥ वरुणासी सांगे आटवावें पाणी ॥ जळशोष मेदिनी पाडियेला ॥ ३४ ॥ वायुलागीं सांगे नका येऊं येथें ॥ जात तया पंथें हरिश्चंद्र ॥ ३५ ॥ वृक्ष हे जळाले पाषाण उल्ले ॥ त्या पंथें चालिलीं तिघेजण ॥ ३६ ॥ शरीरें तिघांचीं करपोनीया गेलीं ॥ तृषा ते लागली रोहिदासा ॥ ३७ ॥ रोहिदास बोले माते दे जीवन ॥ कासावीस प्राण होतो माझा ॥ ३८ ॥ तशामध्यें वृद्ध ब्राह्मण होउनी ॥ आला तया वनीं विश्वामित्र ॥ ३९ ॥ येउनी राजास आशिर्वाद केला ॥ सत्वधीर भला राजया तूं ॥ ४० ॥ आह्मी तिघेजण पुत्र आणि दारा ॥ जात हरिश्चंद्रा भिक्षेलागीं ॥ ४१ ॥ उष्णकाळदीन पायां आले फोड ॥ देई चर्मजोडे तिघांजणा ॥ ४२ ॥ ऐकतांचि ऐसें केलें त्या अर्पण ॥ झालीं तिघेजण मार्गस्थही ॥ ४३ ॥ पायां आले फोड वाहती रुधिर ॥ राजा हरिश्चंद्र चालतांना ॥ ४४ ॥ रोहिदास बोले ताता पाजी पाणी ॥ बोलतां वदनीं शब्द नये ॥ ४५ ॥ कडे घेउनीया रोहिदासबाळ ॥ धुंडितसे जळ वना-माजीं ॥ ४६ ॥ विश्वामित्रें वनीं लाविला वणवा ॥ चुकली हे तेव्हां तारामती ॥ ४७ ॥ घाबरी ते झाली पाहे वेड्यावाणी ॥ न दिसे नयनीं हरि-श्चंद्र ॥ ४८ ॥ कृपेच्या सागरा राजा हरिश्चंद्रा ॥ कां मज उदारा मोकलीलें ॥ ४९ ॥ रोहिदास बाळ घेउनी सांगातें ॥ गेलां कोण्या पंथें महाराजा ॥ ५० ॥ तृषाक्रांत झालें होतें माझें तान्हें ॥ पाजीलें जीवन कोठें त्यासी

॥ ५१ ॥ तारामती शोक करी त्या वनांत ॥ आले अकस्मात विश्वामित्र
॥ ५२ ॥ कोणाची तूं कांता फिरसी या वनीं ॥ बोले त्यालागुनी तारामती
॥ ५३ ॥ भ्रतार हरिश्चंद्र रोहिदास बाळ ॥ चुकले भूपाळ वनामाजीं
॥ ५४ ॥ येरु बोले दोघे मेले आहाळोनी ॥ प्रेतें तिसी दोन्ही दाखविलीं
॥ ५५ ॥ पाहुनीया प्रेतें पिटीलें वदन ॥ आक्रोशें रुदन करी तेव्हां
॥ ५६ ॥ कां हो स्वामी मज सांडियेलें येथें ॥ धरीयला पंथ वैकुंठींचा
॥ ५७ ॥ रोहिदास बाळ सांगातें घेउनी ॥ मजला कां वनीं सांडियेलें
॥ ५८ ॥ सकुमार शरीर पंथीं झाले क्लेश ॥ ह्मणोनी उदास झालां तुह्मी
॥ ५९ ॥ तशामध्यें तुह्मां साह्य झाला अग्नि ॥ माझें कां स्मरण विसरलां
॥ ६० ॥ सवें असे बाळ हळू चाला पंथ ॥ येतें मी धांवत मागें आतां
॥ ६१ ॥ रोहिदास बाळ घेतला ओसंगा ॥ कांहो पांडुरंगा ऐसें केलें
॥ ६२ ॥ कांहो चुकविलें माझिया पाडसा ॥ पाहूं राजहंसा कोठें आतां
॥ ६३ ॥ तृषाक्रांत झालें होतें माझें तान्हें ॥ मिळालें जीवन नाहीं त्यासी
॥ ६४ ॥ पतिपुत्र दोघे गेले निजधामा ॥ भेट मेघःशामा करी माझी
॥ ६५ ॥ वनीं ऐसा शोक करी तारामती ॥ गेला तो गभस्ती अस्तमाना
॥ ६६ ॥ विश्वामित्र ह्मणे ऐक आतां बाई ॥ होणार तें कांहीं न चुकेची
॥६७॥ देई यांसी अग्नी झालीसे यामिनी ॥भय या काननीं श्वापदाचें ॥६८॥
बोले तारामती ऐका तुह्मी ताता ॥ पतिसवें आतां अग्नि द्यावा ॥ ६९ ॥
येरु ह्मणे तुझा पति आहे ऋणी ॥ ऐकिलें श्रवणीं आह्मीं ऐसें ॥ ७० ॥
पतीचें जें ऋण फेडी पतिव्रता ॥ गोष्ट हे अनंता मानतां हे ॥ ७१ ॥
बोले तारामती ऋणी तिघेजण ॥ मागुती हें येणें जन्मालागीं ॥ ७२ ॥
ताता तुह्मी आतां अग्नि द्यावा त्वरें ॥ करुनी अव्हेर गेला तेव्हां ॥ ७३ ॥
दोन प्रहर रात्र झालीसे यामिनी ॥ व्याघ्र हा होउनी आला तेथें ॥ ७४ ॥
ओढी रोहिदासा करुनी गर्जना ॥ आली ते मूर्च्छना सतीलागी ॥ ७५ ॥
गेली ती यामिनी अरुणोदय झाला ॥ अकस्मात आला हरिश्चंद्र ॥ ७६ ॥
सवें असे त्याच्या रोहिदास बाळ ॥ भेटला वेल्हाळ मातेलागीं ॥ ७७ ॥
तिघांसही तेव्हां झालें समाधान ॥ वसिष्ठ चरण आठविती ॥ ७८ ॥
एकामागें एक चालताती पंथ ॥ देखीयलें तेथें अन्नछत्र ॥ ७९ ॥
रम्य स्थळ जागा अपूर्व ते फार ॥ सुगंध तरुवर डोलताती ॥ ८० ॥
विश्वामित्रें तेथें केलेंसे निर्माण ॥ होताती भोजन ब्राह्मणाचे ॥ ८१ ॥
त्याची पंथें जाण राजा हरिश्चंद्र ॥ येउनीया विप्र बोले त्यासी ॥ ८२ ॥

चला महाराजा माझ्या आश्रमासी ॥ करी भोजनासी आवडीनें ॥ ८३ ॥
राजा ह्मणे नव्हे आमुचा हा धर्म ॥ नका करूं श्रम तुह्मी आतां ॥ ८४ ॥
वंदुनी चरण पुढें चाले पंथ ॥ आली अकस्मात तारामती ॥ ८५ ॥
विश्वामित्रें तेथें केलेसें विचित्र ॥ मायेचा हरिश्चंद्र निर्मियेला ॥ ८६ ॥
आणिक प्रकारें विलास भोगीत ॥ असे हर्षयुक्त आनंदानें ॥ ८७ ॥
येउनीया विप्र बोले सतीलागीं ॥ चला बाई वेगीं आश्रमासी ॥ ८८ ॥
अन्नोदक सेवी रुचेल हें तूतें ॥ असे तुझा कांत तेथें बाई ॥ ८९ ॥
बोलावितो तुज पाहे विलोकुनी ॥ देखे सा नयनीं तारामती ॥ ९० ॥
स्मरुनीया तेव्हां वसिष्ठचरणा ॥ कां गा नारायणा ऐसें झालें ॥ ९१ ॥
पूर्वेचा हा सूर्य पश्चिमे उगवेल ॥ समुद्र सांडील मर्यादेसी ॥ ९२ ॥ ऐसेंही घडेल कळे कोणेकाळें ॥ परी सत्वासी न ढळे हरिश्चंद्र ॥ ९३ ॥ दीपक हा कैसा अंधारीं पडला ॥ वायुसुत भ्याला भुतालागीं ॥ ९४ ॥ ऐसें सांगा कोठें झालें विपरीत ॥ तैसा नव्हे सुत शीबीचा हा ॥ ९५ ॥ तैसा हरिश्चंद्र नोहे हा निश्चित ॥ चाले पुढें पंथ तारामती ॥ ९६ ॥ ताता तुह्मी आतां नका करूं श्रम ॥ नोहे ऐसा धर्म आमुचा हा ॥ ९७ ॥ रोहिदास बाळ आला तयेवेळीं ॥ ऋषी सा जवळीं पातलासे ॥ ९८ ॥ हातीं घेऊनिया उदकाची झारी ॥ प्राशन तूं करी बाळा आतां ॥ ९९ ॥ तुझी मातापिता असे अन्नछत्रीं ॥ बोलाविती नेत्रीं पाहे आतां ॥ १०० ॥ पाहुनीया सानें विस्मय तो केला ॥ अगस्ती ग्रासिला समुद्रानें ॥ १०१ ॥ ऐसें कोठें नाहीं झालें विपरीत ॥ दोघेंही निश्चित नोहेतीं हे ॥ १०२ ॥ आमुचा हा धर्म नोहे ऐसा स्वामी ॥ कृपा आतां तुह्मी असो द्यावी ॥ १०३ ॥ विस्मय तो ऋषि करीतो मनांत ॥ नाहीं सिद्धि जात पण माझा ॥ १०४ ॥ मार्ग हा क्रमितां तिघां भेट झाली ॥ वार्ता सांगितली एकमेकां ॥ १०५ ॥ हरिश्चंद्र बोले नेणें मी हें कांहीं ॥ लक्ष असे पायीं वसिष्ठाच्या ॥ १०६ ॥ पुढें देखियलें वोस तें नगर ॥ असे भयंकर पिशाच्य तें ॥ १०७ ॥ तेथें स्मरुनीया वसिष्ठ चरण ॥ ध्यानीं नारायण आठविती ॥ १०८ ॥ पुढें देखियली नगर वाराणसी ॥ वंद्य सर्वांसी ते देवादिकां ॥ १०९ ॥ भूमिवरी शिवें आणिलें कैलास ॥ करिताती वास पुण्यप्राणी ॥ ११० ॥ काळबहिरवाची तेथें कोतवाली ॥ भय नाहीं बोली यमाची ते ॥ १११ ॥ पवित्र हे वाहे भागिरथीचें जल ॥ हरती सकळ दोष सर्व ॥ ११२ ॥ देखोनी हरिश्चंद्रें केला नमस्कार ॥ पोहोंचले तें तीर भागिरथीचें ॥ ११३ ॥ तिघांजणीं

तेव्हां केलें तेथें स्नान ॥ आला तो ब्राह्मण तेची वेळां ॥ ११४ ॥ धुंडितांना तुह्मां मोठा झाला श्रम ॥ कासयासी धर्म केला ऐसा ॥ ११५ ॥ हरिश्चंद्रें केलें त्यासी दंडवत ॥ असावें सांगात स्वामी आतां ॥ ११६ ॥ तिघांजणीं माथां बांधोनीया तृण ॥ बैसलीं जाउन हाटवटीं ॥ ११७ ॥ पाहती सकळ नगरीचे लोक ॥ अयोध्येचा नृप हरिश्चंद्र ॥ ११८ ॥ सकुमार त्याची कांता तारामती ॥ सगुणही मूर्ति रोहिदास ॥ ११९ ॥ ब्राह्मणासी यानें राज्य दिलें दान ॥ राहिलें सुवर्ण याचें कांहीं ॥ १२० ॥ ह्मणोनिया उभीं केलीं हीं बाजारीं ॥ प्रारब्धाची दोरी पाहे कैसी ॥ १२१ ॥ विकावया आणिली लावण्य वनिता ॥ समजली वार्ता वेश्येलागीं ॥ १२२ ॥ येउनी ब्राह्मणा पुसे तिचें मोल ॥ सुवर्ण एक तुळ घेऊं इचें ॥१२३ ॥ मानली हे गोष्टी वेश्येचिया चित्ता ॥ घेतली हे आतां तारामती ॥ १२४ ॥ चाल बाई आतां माझिये सदनीं ॥ होशील स्वामिनी सर्वस्वीं तूं ॥१२५॥ आवडे तितुके लेई अलंकार ॥ विलास समग्र भोगी आतां ॥ १२६ ॥ देखुनी लावण्य आतां तुझें रूप ॥ वश्य होईल भूप नगरीचा ॥ १२७ ॥ हरलें हें दैन्य आतां तुझें बाई ॥ नाहीं तुज कांहीं भय चिंता ॥ १२८ ॥ ऐकोनीया शब्द तेव्हां तारामती ॥ येती काकुळती विप्रालागीं ॥ १२९ ॥ नका इसी देऊं मज महाराजा ॥ नोहे धर्म माझा ऐसा ताता ॥ १३० ॥ तथापिही तुह्मी दिलें इचे हातीं ॥ प्राण हा निगुती देईन मी ॥ १३१ ॥ करा उपकार विकावें आणिका ॥ तुह्मी मायबापा कृपावंता ॥ १३२ ॥ वेश्येचें हें द्रव्य दिलें तें माघारें ॥ आला एक विप्र घ्यावयासी ॥ १३३ ॥ दशग्रंथी निपुण षडशास्त्रीं प्रवीण ॥ धर्म परायण महाराज ॥ १३४ ॥ काळ हें कौशिक नाम तयाप्रती ॥ त्यानें तारामती घेतली हे ॥१३५॥ पाकशाळेमाजीं करावया अन्न ॥ घेतली अन्नपूर्णा ब्राह्मणानें ॥ १३६ ॥ धर्माची तूं कन्या माझिये तूं बाई ॥ सुखें आतां राही अन्नछत्रीं ॥ १३७ ॥ तारामती करी दोघां नमस्कार ॥ कृपा दिनावर असो द्यावी ॥ १३८ ॥ विलोकिलें तेव्हां नृपाचें वदन ॥ कधीं हे चरण पाहीन आतां ॥ १३९ ॥ मुक्ताफळ झालें समुद्राचे पोटीं ॥ परी झाली तुटी भाक्तनानें ॥ १४० ॥ विचित्र हा असे प्रारब्धाचा खेळ ॥ काय तळमळ करुनीया ॥ १४१ ॥ येतें स्वामी आतां कृपा असो द्यावी ॥ सांड न करावी पुन्हा माझी ॥ १४२ ॥ दीपक प्रकाश नोहे हा वेगळा ॥ तैसी मी दयाळा जडलें अंगीं ॥ १४३ ॥ हेंची जन्मोजन्मीं देगा चक्रपाणी ॥ चालिली तेथुनी तारामती ॥ १४४ ॥

रोहिदास बाळ धांवे तिचे मागें ॥ आवरीत अंगें राजा त्यासी ॥१४५॥ घेउनीया येतों मातेचें दरुशन ॥ विलोकी वदन तारामती ॥ १४६ ॥ प्रेमपान्हा तेव्हां आला तिचे स्तनीं ॥ पाजी त्यालागुनी बैसुनीया ॥ १४७ ॥ पाहुनी सर्वांचें सद्गद अंतर ॥ बोलतां उत्तर नये वाचे ॥ १४८ ॥ नको करूं देवा माय-बाळा तुटी ॥ पाहावेना दृष्टी कोणासी हे ॥ १४९ ॥ काळ कौशिकासी बोले तारामती ॥ ऐकावी विनंति एक ताता ॥ १५० ॥ घ्यावा रोहिदास करील हा सेवा ॥ तुह्मी कृपार्णवा महाराजा ॥ १५१ ॥ ऐकोनीया ऐसें विप्रासी तो बोले ॥ काय याचें मोल सांगा स्वामी ॥ १५२ ॥ अर्ध तुक हेम घेऊं येची क्षणीं ॥ दिलें त्यालागुनी कौशिकानें ॥ १५३ ॥ तारामती आणि रोहिदास बाळ ॥ घेउनी दयाळ गेला तेव्हां ॥ १५४ ॥ हाटवटीं उभा असे हरिश्चंद्र ॥ आला तो महार वीरबाहू ॥ १५५ ॥ ब्राह्मणासी पुसे काय याचें मोल ॥ हेम दोन मोल घेऊं याचें ॥ १५६ ॥ मानली हे गोष्टी डोंबाचिये चित्ता ॥ घेतला हा आतां हरिश्चंद्र ॥ १५७ ॥ विप्राचे चरणीं नृप ठेवी माथा ॥ कृपा दयावंता असो द्यावी ॥ १५८ ॥ घेउनी हरिश्चंद्र गेला आश्रमासी ॥ सांगतो कांतेसी वीरबाहु ॥ १५९ ॥ सांगा यासी काम आणिला चाकर ॥ पाहुनी उत्तर करी कांता ॥ १६० ॥ कृश सकुमार आणिला कासया ॥ काय द्रव्य वायां जात होतें ॥ १६१ ॥ सांगती त्या काम डोंबाच्या कामिनी ॥ जाय आणि पाणी हरिश्चंद्रा ॥ १६२ ॥ त्वरें करूनिया भरी हे रांजण ॥ दिला उचलुनी कुंभ हातीं ॥१६३॥ जळ आणा-वया गेला हरिश्चंद्र ॥ मागें विश्वामित्रें काय केलें ॥ १६४ ॥ छिद्र पाडीयेलें रांजणाचे तळीं ॥ कुंभ तयेवेळीं फुटिन्नला ॥१६५ ॥ ताडण करिती डोंबा-च्या कामिनी ॥ दिला उचलोनी दुजा कुंभ ॥१६६॥ दोन प्रहर त्यानें वाहिलें उदक ॥ नसे थेंब एक रांजणांत ॥ १६७ ॥ वीरबाहुनें त्या केलेंसे ताडण ॥ दिलें तेव्हां धान्य कोरडें तें ॥ १६८ ॥ दळु कांडु लागे करी सर्व धंदा ॥ ध्यानीं त्या गोविंदा आठवीत ॥ १६९ ॥ भागिरथीचे तीरीं करीत स्वयंपाक ॥ आला तेव्हां एक विप्र तेथें ॥ १७० ॥ घाली महाराजा मज आतां अन्न ॥ बैसला येऊन त्याजपाशीं ॥ १७१ ॥ हरिश्चंद्रें त्यासी केला नमस्कार ॥ बैसा क्षणभर स्वामी येथें ॥ १७२ ॥ हरिश्चंद्रें केले दोन भाग अन्न ॥ ब्राह्मणा कारणें दिला एक ॥ १७३ ॥ खाउनीया अन्न पाहे दुजाकडे ॥ ठेवी तयापुढें हरिश्चंद्र ॥ १७४ ॥ नित्यानित्य तेथें जेवीतसे विप्र ॥ घडे निराहार हरिश्चंद्रा ॥ १७५ ॥ शरीर झालें कृश अंगीं नसे

शक्ति ॥ तयासी बोलती वीरबाहू ॥ १७६ ॥ स्मशानीं रक्षण करी तूं हें आतां ॥ अवश्य ह्मणे ताता हरिश्चंद्र ॥ १७७ ॥ ह्मसणखांबा नाम ठेविलें तयासी ॥ राहे दिवसनिशीं स्मशानीं तो ॥ १७८ ॥ द्रव्यावाचोनीया जाळो न देई प्रेत ॥ अहोरात्र ध्यात देवाजीशीं ॥ १७९ ॥ काळकौशिकाचे घरीं तारामती ॥ वाढीतसे पंक्ती ब्राह्मणांच्या ॥ १८० ॥ उत्तम स्वादिष्ट पवित्र तें अन्न ॥ जेविती ब्राह्मण आवडी प्रेमें ॥ १८१ ॥ रोहिदास करी कौशिकाची सेवा ॥ तुळसी पुष्पें दुर्वा आणीतसे ॥ १८२ ॥ फुलें तोडीतसे रोहिदास बाळ ॥ दंश केला व्याळें त्याजलागीं ॥ १८३ ॥ सांगातीयांस तेव्हां बोले रोहिदास ॥ सांगावा मातेस नमस्कार ॥ १८४ ॥ नाशिवंत देह गेलासे विलया ॥ नको शोक वाया करूं याचा ॥ १८५ ॥ वारंवार तिच्या संबोखावें मना ॥ तुह्मासी प्रार्थना हेची माझी ॥ १८६ ॥ ऐकोनी सांगाती करिती रूदन ॥ सोडियेला प्राण रोहिदासें ॥ १८७ ॥ पाकशाळेमाजीं होती त्याची माता ॥ श्रुत केली वार्ता सांगात्यांनीं ॥ १८८ ॥ ऐकोनीया ऐसें चिंतावली मनीं ॥ कांहो चक्रपाणी ऐसें केलें ॥ १८९ ॥ आटोपोनी सर्व तेथील हा धंदा ॥ निघाली हे शोधा बाळकाच्या ॥ १९० ॥ झालीसे यामिनी कांहीं न दिसे वाट ॥ मोडताती कांटे पायालागीं ॥ १९१ ॥ नाहीं त्याची शुद्धि चालली धांवता ॥ लागलें तें प्रेत पाया तिच्या ॥ १९२ ॥ ओळखुनी तिनें पिटीलें कपाळ ॥ आलंगिला बाळ हृदयीं तिनें ॥ १९३ ॥ दर्दरुनी तिचे स्तनीं आला पान्हा ॥ पाजूं आतां कोणा रोहिदासा ॥ १९४ ॥ सखया रोहिदासा कां बा रुसलासी ॥ टाकुनी गेलासी मजलागीं ॥ १९५ ॥ पाहात मी होतें नित्य तुझें मुख ॥ विसरलें दुःख भ्रताराचें ॥ १९६ ॥ घडीघडी माझा हरिसी तूं श्रम ॥ फुटकें हें कर्म माझें देवा ॥ १९७ ॥ काय घडले दोष कीं दैवाची मी हीन ॥ हरपलीं रत्नें दोन माझीं ॥ १९८ ॥ कंठूं आतां काळ कवणाचीये बळें ॥ जाहलें हें निर्मूळ वंशाचें कीं ॥ १९९ ॥ आक्रोशें करुनी हृदय पिटीत ॥ आले अकस्मात विश्वामित्र ॥ २०० ॥ सांगा बाई कैसें जाहलें वर्तमान ॥ केलें हें श्रवण त्याजलागीं ॥ २०१ ॥ नको करूं बाई शोक कांहीं आतां ॥ ही समजेल वार्ता आतां डोंबा ॥ २०२ ॥ द्रव्यावीण तो हा जाळूं नेदी प्रेत ॥ नको करूं मात प्रगट ही ॥ २०३ ॥ आणितों साहित्य अग्नि दे झडकरी ॥ आली तेव्हां तिरीं भागिरथीच्या ॥ २०४ ॥ पेटवुनी अग्नि करीते रूदन ॥ आला तो धांवून ह्मसणखांबा ॥ २०५ ॥ न देताना द्रव्य जाळिसी तूं प्रेत ॥

मारीतसे हातें तिजलागीं ॥ २०६ ॥ विखरुनी त्यानें दिला तेव्हां अग्नि ॥ घालुनी जीवन विझविला ॥ २०७ ॥ प्रेत घेउनीया रडे तारामती ॥ प्रालब्धाची गती कैसी देवा ॥ २०८॥ सत्वाचा सागर राजा हरिश्चंद्र ॥ त्याचा कीं हा पुत्र रोहिदास ॥ २०९ ॥ अंतकाळीं यास ठाव अग्नि नेदी ॥ स्पर्शला येऊन अनामीक ॥ २१० ॥ काय ऐसें कर्मीं लिहिलें विधीनें ॥ झाल्या तिघा तीन वाटा देवा॥२११॥भ्रतार हरिश्चंद्र गेला कोणीकडे॥ दुःख कोणापुढें सांगूं आतां ॥ २१२ ॥ ऐकोनी हरिश्चंद्र खोंचला तो मनीं ॥ आला तो धांवुनी तिजपाशीं ॥२१३॥सांगे वर्तमान बोले गहिंवरून ॥ करी निवेदन तारामती ॥ २१४ ॥ सांगितला त्यासी सकळ वृत्तांत ॥ हृदय पिटीत हरिश्चंद्र ॥ २१५ ॥ येरी ह्मणे कोण सांग तूं हें आतां ॥ श्रुत केली वार्ता मुळीहुनी ॥ २१६ ॥ तुह्मां दोघां दिल्हें कौशिकाचे घरीं ॥ दास्यत्व मी करी डोंबाचें हें ॥ २१७ ॥ ह्मसणखांबा नांव ठेविलें हें त्यानें ॥ करितों रक्षण ह्मसणामाजीं ॥ २१८ ॥ अद्याप सेविलें नाहीं म्यां हें अन्न ॥ शरीर कृश्य तेणें झालें माझें ॥ २१९ ॥ ऐकोनीया दुःख पडली विकळ ॥ घेतला तो बाळ हरिश्चंद्रें ॥ २२० ॥ सख्या रोहिदासा कां बा रुसलासी ॥ टाकुनी गेलासी मजलागीं ॥ २२१ ॥ मजपाशीं तुझें गुंतलेसें मन ॥ ह्मणुनी धांवून आलासी तूं ॥ २२२ ॥ अंतकाळीं केल्या तिघांसही भेटी ॥ दैवाची करंटीं आह्मी दोघें ॥ २२३ ॥ कैसें झालें माझें हृदय पाषाण ॥ दिलें म्यां लोटून तुजलागीं ॥ २२४ ॥ जळोत हे हात जावो माझा प्राण ॥ व्यर्थ हा वांचून काय आतां ॥ २२५ ॥ आक्रोशें करुनी हृदय पिटीत ॥ त्यासी संबोखीत तारामती ॥ २२६ ॥ नका स्वामी शोक करूं कांहीं आतां ॥ होतें जें संचिता झालें माझें ॥ २२७ ॥ धन्यापाशीं आतां आज्ञा घ्या मागून ॥ द्यावयासी अग्नि महाराजा ॥ २२८ ॥ आज्ञा मागावया गेला हरिश्चंद्र ॥ मागें विश्वामित्र काय करी ॥ २२९ ॥ एकली तूं येथें लावीचें हें भय ॥ देउळांत राहे क्षणभरी ॥ २३० ॥ ऐकोनी देउळीं गेली तारामती ॥ निद्रा तये प्रती लागलीसे॥२३१॥ विश्वामित्र तेव्हां आले देउळांत ॥ काढोनीया आर्त बाळकाची ॥ २३२ ॥ रक्त मांस तीच्या लाविलें मुखासी सांगत लोकांसी लाव आली ॥ २३३॥ बाळ भक्षीतसे देउळांभीतरीं ॥ देखोनीया दुरी पळालों मी ॥ २३४ ॥ धीट धीट लोक आंत प्रवेशोनी ॥ बांधिली तेक्षणीं तारामती ॥ २३५ ॥ श्रुतकेली वार्ता गांवीच्या राजाला ॥ तो ह्मणे लावेला जीवें मारा ॥ २३६ ॥ बोलाविला त्याणें वीरबाहु डोंब ॥ सांगतसे

अंगें राजा त्यासी ॥ २३७ ॥ चालविली तेव्हां भागिर्थीचें तीरीं ॥ पाहती नरनारी दृष्टीं तेव्हां ॥ २३८ ॥ काळकौशिकाचें घरीं हे देखियेली ॥ नाहीं समजली तेव्हां कोणा ॥ २३९ ॥ एकमेका ऐसें करिती उत्तर ॥ आला तो महार वीरबाहु ॥ २४० ॥ ह्मसणखांबा त्यानें बोलाविला त्वरें ॥ छेदी इचें शिर आज्ञा केली ॥ २४१ ॥ ओळखिली त्यानें तेव्हां तारामती ॥ प्रारब्धाची गति कैसी देवा ॥ २४२ ॥ घालियेलें तिसी भागिर्थीचें स्नान ॥ करी तूं स्मरण देवाजीचें ॥ २४३ ॥ काय इच्छा असेल माग तुझे मनीं ॥ पुरवील चक्रपाणी तुझी आशा ॥ २४४ ॥ स्वर्गीं सुरवर बैसोनी विमानीं ॥ पाहती नयनीं कवतुक ॥ २४५ ॥ भ्रतार हरिश्चंद्र रोहिदास बाळ ॥ मागतां स्नेहाळ विश्वामित्र ॥ २४६ ॥ श्रीगुरु वसिष्ठ कृपेचा सागर ॥ असो त्याचा कर मस्तकीं हा ॥ २४७ ॥ हेंचि जन्मोजन्मीं देगा नारायणा ॥ नाहीं हे वासना आणिकांची ॥ २४८ ॥ तारामती ह्मणे एक्या घायें हाणी ॥ लक्ष हें चरणीं वसिष्ठाच्या ॥ २४९ ॥ उचलितां कर आले नारायण ॥ धरी आलिंगून हरिश्चंद्रा ॥ २५० ॥ पितांबरधारी सगुण मेघःशाम ॥ योग्याचा विश्राम तोचि बाप ॥ २५१ ॥ त्यानें कृपादृष्टि विलोकिलें तिघां ॥ पुढें असे उभा रोहिदास ॥ २५२ ॥ विश्वामित्र तेव्हां संतोषले चित्तीं ॥ आलिंगिलें प्रीति तिघांजणा ॥ २५३ ॥ पुष्पवृष्टी केली स्वर्गीं सुरवरांनीं ॥ धन्य त्रिभुवनीं कीर्ति ज्याची ॥ २५४ ॥ श्रीगुरुवसिष्ठ आले तयेवेळां ॥ सवें असे मेळा ऋषींचा तो ॥ २५५ ॥ त्यानें आलिंगिलें तिघां कृपादृष्टि ॥ धेनुवत्सा भेटी झाली जैसी ॥ २५६ ॥ तिघांजणीं केला तेव्हां नमस्कार ॥ प्रेम अश्रु नीर वाहे डोळां ॥ २५७ ॥ हृदयीं धरुनी आलिंगिली त्यानें ॥ मायबाळ तान्हें न विसंबे ॥ २५८ ॥ काळ तो कौशिक वीरबाहु डोंब ॥ विमानीं श्रीरंगें बैसविलें ॥ २५९ ॥ कोटी वरुषें तप विश्वामित्रें केलें ॥ तें समग्र अर्पिलें हरिश्चंद्रा ॥ २६० ॥ समारंभें नेली अयोध्येसी तिघें ॥ बैसविलीं अंगें राज्यासनीं ॥ २६१ ॥ साठसहस्र वरुषें राज्य करा सुखें ॥ दिला हा स्वमुखें आशिर्वाद ॥ २६२ ॥ सत्वधीर राजा सत्वाच्या ह्या कीर्ति ॥ ऐकतांचि जाती दोष भंगा ॥ २६३ ॥ नामदेव यासी लागली ती गोडी ॥ वर्णितो आवडी गुण त्यांचे ॥ २६४ ॥

---

## भानुदासाचें चरित्र.

——:o:——

॥ १८३४ ॥ पंढरीसी यात्रा मिळाली अपार ॥ नाहीं तो सुंदर पांडुरंग ॥ १ ॥ ह्मणती संतजन काय झाला देव ॥ पडलासे संदेह सकळांसी ॥ २ ॥ कांहो उपेक्षिलें कृपाळु अनंता ॥ भेट देई संता आपुलीया ॥ ३ ॥ अयोध्या नगरासी नेला पंढरिराव ॥ कळला अभिप्राय सकळांसी ॥ ४ ॥ असा कोणी भक्त आहे पराक्रमी ॥ रुक्मिणीचा स्वामी आणी येथें ॥५॥ ऐकोनीया मात कोणीच न बोले ॥ ह्मणोन उपेक्षिलें पांडुरंगा ॥ ६ ॥ बोले भानुदास आणितों मी देव ॥ कैसा पंढरिराव गेला पाहों ॥ ७ ॥ भानुदासें केलें सकळिकां नमन ॥ मग आज्ञा घेऊन चालिला तो ॥ ८ ॥ अयोध्या नगरासी गेला भानुदास ॥ पंढरीनिवास पाहावया ॥ ९ ॥ दुंदुभी वाजती वाजंत्रांची ध्वनि ॥ परी चक्रपाणी दृष्टी नये ॥ १० ॥ प्रातःकाळीं पूजा केली रामरायें ॥ आणिकां न होय दर्शनची ॥ ११ ॥ कवाडें अर्गळा कुलुपें असती द्वारा ॥ करूनिया भीतरीं पांडुरंगा ॥ १२ ॥ देखोनी कवतुक बोले भानुदास ॥ भला बसलास देवा येथें ॥ १३ ॥ भाग्यवंत देव झालासी तूं आतां ॥ दुर्बळ अनाथा कोण पुसे ॥ १४ ॥ तेव्हां झाली रात्र पडिला अधकार ॥ जोडोनिया कर विनवीतसे ॥१५॥ आतां देवा तुह्मी चलावें येथोनी ॥ नाहीं तरी आह्मी भले नाही ॥१६॥ आह्मासी टाकुनी येथें बैसलासी ॥ पोटच्या पोरासी कोण पोसी ॥ १७॥ आह्मा वाचोनीया नाहीं तुह्मा गती ॥ न करी फजिती जगामधीं ॥ १८ ॥ करुणा वचन भाकोनिया येथें ॥ केलासे उपाय भानुदासें ॥ १९ ॥ कुलुपें कवाडा बंधन उघडती ॥ देखिली श्रीमूर्ति भानुदासें ॥ २० ॥ राउळाभीतरी गेला भानुदास ॥ साष्टांगीं चरणांस नमन केलें ॥ २१ ॥ सद्गदीत कंठ झाल्या दोघां भेटी ॥ आनंद तो पोटीं समायेना ॥ २२ ॥ देवा तुह्मी कांहो सोडिली पंढरी ॥ लागलीसे गोडी वैभवाची ॥ २३ ॥ ह्मणे पांडुरंग बंदीं मी पडिलों ॥ भिमा अंतरलों चंद्रभागा ॥ २४ ॥ नवरत्नाची माळा घालुनिया कंठीं ॥ ह्मणे द्यावी भेटी प्रातःकाळीं ॥ २५ ॥ देउळा बाहेरी गेला भानुदास ॥ कुलुपें कवाडास बंधन झालें ॥ २६ ॥ प्रातःकाळीं दर्शन भानुदास करी ॥ आठवी श्रीहरि हृदयामधीं ॥ २७ ॥ घालुनी आसन बैसला ध्यानस्थ ॥ ठेवोनिया चित्त पांडुरंगा ॥ २८ ॥ प्रातःकाळीं

पूजा करावया आला ॥ रामराय न देखे माळा रत्नाचि ते ॥ २९ ॥ कोणी नेली माळा झालासे बोभाट ॥ ताडिलें सत्वर पुजाऱ्यासी ॥ ३० ॥ चोर पहावयासी सेवक धांवती ॥ माळा दिसे कंठीं भानुदासा ॥ ३१ ॥ त्यासी देखुनि ताडिती प्रसिद्ध ॥ ह्मणती हाचि पक्का मैंद चोर असे ॥ ३२ ॥ चोर धरूनिया रायापाशीं नेला ॥ ह्मणती यासी घाला सुळावरी ॥ ३३ ॥ शूळ तासोनीया खांदीं जो दिधला ॥ मागें चालविला भानुदास ॥ ३४ ॥ भानुदास ह्मणे ऐकावें वचन ॥ भेट मी घेईन विठोबाची ॥ ३५ ॥ आला भानुदास देवा नमन केलें ॥ शिक्षेसी लाविलें ह्मणे आह्मा ॥ ३६ ॥ अगा तुह्मी देवा लोभ असों द्यावा ॥ आठव धरावा हृदयांमधें ॥ ३७ ॥ तुजमज वियोग कैंवी होय देवा ॥ न सोडूं केशवा चरण तुझे ॥ ३८ ॥ सुळ नेवोनिया वेसिबाहेर रोंविला ॥ ह्मणती आतां याला वर घाला ॥ ३९ ॥ तेव्हां भानुदास आठवी विठ्ठला ॥ ह्मणती लवकर घाला सुळावरी ॥ ४० ॥ भक्ताचा कळवळा पांडुरंगा आला ॥ कंठ तो फुगला सद्गदीत ॥ ४१ ॥ नेत्रीं अश्रुधारा कांपतो थरथरा ॥ भक्तांचा कैवारी धांविन्नला ॥ ४२ ॥ शूळा अकस्मात पाला तो फुटला ॥ फळें पुष्पें तो झाला घवघवीत ॥ ४३ ॥ शूळ वृक्ष झाला सांगती रायाला ॥ विस्मय वाटला सकळिकांसी ॥ ४४ ॥ भानुदासा नमन केलें रामरायें ॥ ह्मणे हा अन्याय घडिला आह्मा ॥ ४५ ॥ पांडुरंगापाशीं आले दोघे भक्त ॥ प्रेमें सद्गदित झाला कंठ ॥ ४६ ॥ पांडुरंग ह्मणे कोणी गांजिलें माझ्या भक्ता ॥ सांग भानुदासा काय झालें ॥ ४७ ॥ आमचा कैवारी कृपाळु श्रीहरि ॥ असतां साहाकारी कोण गांजी ॥ ४८ ॥ आतां तुह्मी देवा बसावें खांदेसी ॥ नेईन मी तुह्मासी पंढरीसी ॥ ४९ ॥ रामराय ह्मणे मज उपेक्षिलें ॥ येथोनीया वहिलें तुह्मी जातां ॥ ५० ॥ आपुलें वचन सत्य केलें देवा ॥ लोभ आह्मावरी असों द्यावा ॥ ५१ ॥ घेवोनी खांदेसी देव बैसवीला ॥ पंढरीसी आला भानुदास ॥ ५२ ॥ झालीसे दाटणी करती नमस्कार ॥ मोठा संतभार जमला तेथें ॥ ५३ ॥ नामदेव ह्मणे संताचे संगती ॥ अधम ही होती संतजन ॥ ५४ ॥

---

## श्रीयाळ चरित्र.

---

॥ १८३५ ॥ सूर्यवंशीं राजा असे तो श्रीयाळ ॥ पंच वरुषीं बाळ चिलया त्यासी ॥ १ ॥ पतिव्रता कांता नाम तें चांगुणा ॥ अतिता भोजन

घाली निस ॥ २ ॥ कैलासीं नारद वर्णी यांची कीर्ति ॥ सत्व पाह्यावप्रति आले शिव ॥ ३ ॥ जाहलासे अतित रूप तें कुश्चळ॥ रक्त पू हा गळे सर्वांगासी ॥ ४ ॥ आला तो अतित श्रीयाळाचे घरीं ॥ नमस्कार करी राजा त्यासी ॥ ५ ॥ येऊनि चांगुणा वंदिती चरण ॥ बहुत सन्मान केला त्याचा ॥ ६ ॥ उष्णोदकें त्यासी घातीयेलें स्नान ॥ केलेसें पूजन अतिताचें ॥ ७ ॥ ह्मणे महाराजा करावें भोजन ॥ पतीता पावन करा तुह्मी ॥ ८ ॥ येरु ह्मणे माझें शरीर हें रोगी ॥ नरमांस वेगीं देई मज ॥ ९ ॥ चांगुणा ती ह्मणे देतें माझें मांस ॥ नये उपयोगास आमूचिया ॥ १० ॥ राजा ह्मणे माझें मांस मान्य करा ॥ नलगे उदारा तुझें मज ॥ ११ ॥ पंच वरुषीं बाळ तुझा हा चिल्हाळ ॥ मांस हें सकळ देई त्याचें ॥ १२ ॥ पाक हा करुनी घाली मज आतां ॥ खेद काय चिंता करूं नये ॥ १३ ॥ करितां हा खेद जाईन उठोनी ॥ सत्वाची हे हानी करूनिया ॥ १४ ॥ तेव्हां ते चांगुणा ह्मणे अतितातें ॥ करितें पाकातें सिद्ध आतां ॥ १५ ॥ बोलविला तेव्हां तिनें तो चिल्हाळ ॥ वचन कोमळ बोले त्यासी ॥ १६ ॥ तुज हा अतित आलासे पाहून ॥ मागतो भोजन तुजलागीं ॥ १७ ॥ होई वा उदार अर्पी हें शरीर ॥ संतोषला वर पार्वतीचा ॥ १८ ॥ ऐकोनी चिलया बोले मातेप्रती ॥ संतोष हा चित्तीं माझे असे ॥ १९ ॥ नाशवंत देह नाहीं राहणार ॥ सार्थक समग्र करी याचें ॥ २० ॥ सांडी हे ममता होई तूं उदार ॥ कैलासी शंकर संतोषेल ॥ २१ ॥ घेऊनि चिलया गेली पाकशाळे ॥ कापियेलें बाळ चांगुणेनें ॥ २२ ॥ शीर साचें तेव्हां ठेविलें झांकोन ॥ शरिराचा तिनें पाक केला ॥ २३ ॥ तेव्हां तो अतित बोले चांगुणेसी ॥ वस्तु हे कार्याची ठेवियेली ॥ २४ ॥ मीही आतां जातों आपुल्या आश्रमा ॥ कासयासी श्रम करितेसी ॥ २५ ॥ तुज हे ममता झालीसे उत्पन्न ॥ वाहतसे आण चांगुणा ते ॥ २६ ॥ ह्मणे महाराजा सांगाल तें मान्य ॥ वंदित चरण चांगुणा ते ॥ २७ ॥ पाकामाजीं घाली शीर हें कांडोनी ॥ रसिक गाय गाणीं आवडीनें ॥ २८ ॥ चांगुणेनें शीर घातीलें उखळीं ॥ ओंव्या ते वेल्हाळी गात असे ॥ २९ ॥ सत्वधीर राजा स्वामी हा श्रीयाळ ॥ धन्य साचा बाळ चिलया तूं ॥ ३० ॥ अतिताच्या वेशें आला असे शिव ॥ देखोनीया भाव दृढ तुझा ॥ ३१ ॥ आवडीनें तुज ठेवितो उदरीं ॥ पुण्याची सामोग्री मोठी तुझी ॥ ३२ ॥ माझे पोटीं तुंवा घेवला अवतार ॥ दाविलें चरित्र जगामाजीं ॥ ३३ ॥ येऊनि वंशाचा केला

त्वां उद्धार ॥ मित्र केला वर पार्वतीचा ॥ ३४ ॥ तुझी माता मज ह्मणती हे जन ॥ पूर्वीचें हें पुण्य फळा आलें ॥ ३५ ॥ तुज हा प्रसन्न जाहला सदाशिव ॥ मागसी वैभव देईल तो ॥ ३६ ॥ मज बाळा तुंवा सांडियेलें येथें ॥ कैलासीचा पंथ धरीयेला ॥ ३७ ॥ अतित गेलीया सांडीन मी प्राण ॥ येईन धांवोन तुजमागें ॥ ३८ ॥ तुझी माझी भेटी होईल कैलासीं ॥ सांग शिवापाशीं नमस्कार ॥ ३९ ॥ धैर्याचें उखळ वैराग्य मुसळ ॥ घेतलें सबळ चांगुणेनें ॥ ४० ॥ कांडुनिया शीर केला पाक तिनें ॥ अतिताकारणें भोजनासी ॥ ४१ ॥ ह्मणे महाराजा करावें भोजन ॥ वंदित चरण चांगुणा ते ॥ ४२ ॥ येरु ह्मणे बाई पात्रें वाढी तीन ॥ पंक्ति यजमान बैसा तुह्मी ॥ ४३ ॥ ऐकोनी श्रीयाळ सद्गद अंतरीं ॥ जाला असे भारी मोठा तेव्हां ॥ ४४ ॥ तेव्हां ते चांगुणा ह्मणे श्रीयाळासी ॥ बैसावें पंक्तीसी स्वामी आतां ॥ ४५ ॥ नवमास बाळ ठेविला उदरीं ॥ एक दिन भारी काय झाला ॥ ४६ ॥ अतिता संतोष होय ऐसें करा ॥ मान्य गिरिजावर होईल तो ॥ ४७ ॥ सिद्ध झाली तेव्हां दोघें भोजनासी ॥ अतित तयासी पुसतसे ॥ ४८ ॥ काय तुह्मां आतां असे हो संतान ॥ केलें शिवार्पण ह्मणती ते ॥ ४९ ॥ निपुत्रिकाचे घरीं न घे मी हें अन्न ॥ चालिला उठोन अतित हा ॥ ५० ॥ श्रीयाळ चांगुणा वंदिती चरण ॥ फुटकें प्राक्तन आमुचेंची ॥ ५१ ॥ चिलयासारिखा गेला तोही सुत ॥ विन्मुख अतित जातो तोही ॥ ५२ ॥ आतां कासयासी ठेवावा हा प्राण ॥ करावा अर्पण शंकरासी ॥ ५३ ॥ ऐकोनीया ऐसें अतित तो भ्याला ॥ चांगुणे पुत्राला बाहे आतां ॥ ५४ ॥ येईबा चिलया धांव तूं त्वरीत ॥ न जेवी अतित तुजवीण ॥ ५५ ॥ राखी आतां सत्व येई तूं धांवोनी ॥ तेव्हां शूळपाणी प्रगटले ॥ ५६ ॥ पंचमुख अंगीं विभूत चर्चित ॥ अर्धांगीं शोभत पार्वती ते ॥ ५७ ॥ मुगुटीं जयाचे शोभतसे गंगा ॥ कोण वर्णी शोभा स्वरूपाची ॥ ५८ ॥ धांवतचि आला तेव्हां तो चिल्हाळ ॥ आलंगी स्नेहाळ सांभ सासी ॥ ५९ ॥ श्रीयाळ चांगुणा बैसवी विमानीं ॥ बाळ राजस्थानीं स्थापीयेला ॥ ६० ॥ अखंड कैलासीं असे सांचा वास ॥ धन्य तेचि दास सांभवाचे ॥ ६१ ॥ नामदेव साचे आठवीत गुण ॥ करीत कीर्तन प्रेमभावें ॥ ६२ ॥

---

## जगमित्र नागा याचें चरित्र.



॥ १८३६ ॥ परळी वैजनाथीं जगमित्र नागा ॥ ध्यानीं पांडुरंगा आठवीत ॥ १ ॥ सर्वांभूतीं त्यासी दिसे वासुदेव ॥ नाहीं दुजाभाव त्याचे मनीं ॥ २ ॥ निंद्य आणि वंद्य लेखितो सारिखे ॥ पाहे ब्रह्मरूप सर्वत्रांसी ॥ ३ ॥ रात्रंदिन करी हरीचें भजन ॥ सुखें आनंदानें राहतसे ॥ ४ ॥ सज्जन हे त्यासी बहुत मानिती ॥ दुर्जन द्वेषिती त्याजलागीं ॥ ५ ॥ परि त्याचे चित्तीं वाटेना हें दुःख ॥ मानी प्रेमसुख आनंदानें ॥ ६ ॥ दुर्जनांनीं त्याच्या घरासी तो अग्नि ॥ लाविला येऊनी रात्रीमध्यें ॥ ७ ॥ अग्नि मोठा तेव्हां प्रदिप्त तो झाला ॥ वृत्तांत कळला सज्जनासी ॥ ८ ॥ धांवुनी ते आले पाहती नयनीं ॥ कांहो चक्रपाणी ऐसें केलें ॥ ९ ॥ तुजवीण कोण राखे यासी आतां ॥ धांव तूं अनंता येचि वेळां ॥ १० ॥ पांडव राखिले लाक्षांतून जो हरी ॥ तैसी करी परी नागयासी ॥ ११ ॥ येथें नाहीं देवा कोणाचा उपाय ॥ घाली आतां धाय पांडुरंगा ॥ १२ ॥ प्रल्हाद रक्षिला अग्नि तो माझारी ॥ तैसी करी परी त्यासी आतां ॥ १३ ॥ ब्रीद हें सांभाळी आपुलें अनंता ॥ राखी आतां भक्ता आपुलिया ॥ १४ ॥ ऐकोनिया स्तुस्ति आले नारायण ॥ शांत झाला अग्नि तेचि वेळां ॥ १५ ॥ स्वस्त असे नागा आनंदानें सुखें ॥ पाहती सर्वलोक परळीचे ॥ १६ ॥ सज्जन संतोष अंतरीं मानिती ॥ धांवण्या श्रीपति धाविन्नला ॥ १७ ॥ दुर्जनांचीं तेव्हां तोंडें जाहलीं काळीं ॥ साह्य वनमाळी भक्तालागीं ॥ १९ ॥ चाहुर एक भूमी इनाम त्या दिली ॥ पत्रिका लिहिली त्याच्या नांवें ॥ २० ॥ ग्रामवासी त्यासी पिकवुनी धान्य ॥ देती ते नेऊन नाग्या घरीं ॥ २१ ॥ वारसीक नेम चालविती लोक ॥ आला नवा एक अमलदार ॥ २२ ॥ करोनी पाहणी मागतसे सारा ॥ नायके विचारा कोणाचिया ॥ २३ ॥ तयासी उत्तर करिती ग्रामवासी ॥ नवसिलें देवासी सर्वत्रांनीं ॥ २४ ॥ जगमित्र नागा हरिचा तो भक्त ॥ सांगती वृत्तांत त्याजलागीं ॥ २५ ॥ याचे मनीं नाहीं कांहीं दुजा भाव ॥ सर्वांभूतीं देव पाहतसे ॥ २६ ॥ कृपावंत असे यासी चक्रपाणी ॥ नका तुह्मी मनीं आणूं दुजें ॥ २७ ॥ मनामाजीं त्यानें केला तो विचार ॥ पाहूं चमत्कार याचा आतां ॥ २८ ॥ जगमित्र नागा त्यानें बोलाविला ॥ बोलता त्या झाला सुभेदार ॥ २९ ॥ आमुचीया

घरीं मुलीचें तें लग्न ॥ व्याघ्राचें कारण असे आह्मां ॥ ३० ॥ घेऊनिया आतां यावा तुम्ही व्याघ्र ॥ ह्मणवितां जगमित्र पाहूं कैसें ॥ ३१॥ व्याघ्र-रूप असे माझा नारायण ॥ येतों मी घेउनी आतांची हा ॥ ३२ ॥ आनं-दानें नागा निघाला तेथुनी ॥ आला असे वनीं अरण्यांत ॥ ३३ ॥ धांवू-निया तेथें आले पांडुरंग ॥ पुसतसे अंगें त्याजलागीं ॥ ३४॥ कोठें जासी बापा घोर अरण्यांत ॥ भय असे तेथें श्वापदाचें ॥ ३५ ॥ मारतील तुज फिर तूं माघारी ॥ येरु ह्मणे हरि रक्षी आह्मा ॥ ३६ ॥ सुभेदार माझा असे परम मित्र ॥ पाहिजे हा व्याघ्र त्याजलागीं ॥ ३७॥ येरु ह्मणे सुभे-दार आहे नष्ट ॥ काय साची गोष्ट ऐकसी तूं ॥ ३८ ॥ तया चांडाळासी वधितों मी आतां ॥ झाला तो बोलता जगन्मित्रा ॥३९॥ तूंचि हा चांडाळ बोलसी या गोष्टी ॥ नको करूं कष्टी मित्र माझा ॥ ४० ॥ जाय तूं वाटेनें आपुल्या या आतां ॥ होतसे बोलतां उशीर मज ॥ ४१ ॥ व्याघ्र तेचि वेळा जाहले नारायण ॥ धरी आलिंगुनी नागा त्यासी ॥ ४२ ॥ गळां साचे तेव्हां बांधिलें अंगवस्त्र ॥ घेऊनिया व्याघ्र आला नागा ॥४३॥ भयाभीत झाले तेव्हां ग्रामवासी ॥ लावियेल्या वेसी गांवीचिया ॥ ४४ ॥ ग्रामवासी यांनीं लावियेलें द्वार ॥ करी सुभेदार विचार तेव्हां ॥ ४५ ॥ करीत गर्जना भयानक व्याघ्र ॥ कांपती थरथर सकळ लोक ॥ ४६ ॥ जगमित्र नागा आला वेसीपाशीं ॥ उघडा द्वारासी हाका मारी ॥ ४७ ॥ ऐकोनीया कोणी न देती उत्तर ॥ मोडियेलें द्वार व्याघ्रानें तें ॥ ४८ ॥ प्रवेशला नागा सुभेदारा घरीं ॥ हाका त्यासी मारी यावें आतां ॥ ४९ ॥ करा कार्य सिद्धि घेऊनिया व्याघ्र ॥ हाका वारंवार मारीतसे ॥ ५० ॥ द्वारपाळ त्याचे नुघडिती द्वार ॥ मोडोनिया व्याघ्र शिरे आंत ॥ ५१ ॥ करीत गर्जना आपटूनि पुच्छ ॥ जाहले भयाभीत सकळ लोक ॥ ५२ ॥ सुभेदार होता जया मंदिरांत ॥ व्याघ्र नागा आंत गेले दोघे ॥ ५३ ॥ सुभेदार बोले द्वाराचे आंतून ॥ देई जीवदान मज आतां ॥ ५४ ॥ पतीत मी पापी तुझा शरणांगत ॥ होई कृपावंत जगमित्रा ॥ ५५ ॥ कर जोडोनीया करितो विनंती ॥ अज्ञानाची भ्रांति झाली मज ॥ ५६ ॥ वारंवार तुज घेतो लोटांगणी ॥ देई बा सोडोनी वनीं व्याघ्र ॥ ५७ ॥ कृपावंत साधु वर्णिताती वेद ॥ करी अपराध क्षमा माझा ॥ ५८ ॥ ऐकोनीया व्याघ्र गर्जना करीत ॥ भक्षावया धांवत त्याजलागीं ॥ ५९ ॥ जगमित्र नागा आवरीत त्यासी ॥ चाल तूं वनासी मायबापा ॥ ६० ॥ घेउनीया व्याघ्र

चालिला जगमित्र ॥ पाहती सर्वत्र लोक तेव्हां ॥ ६१ ॥ भक्तांनीं जिंकिला भाव बळें देव ॥ घालीतसे धांव संकटीं तो ॥ ६२ ॥ संताचा महिमा न वर्णवे कांहीं ॥ जाहला लीन पायीं नामदेव ॥ ६३ ॥

---

## शुकाख्यान.

॥ १८३७ ॥ ॐ नमोजी ब्रह्म अवतारू ॥ शिष्य अभय करू ॥ तो वंदिला श्रीगुरु ॥ श्रीरामकृष्ण ॥ १ ॥ ह्मणतां वाचेसी श्रीराम ॥ रसनेसी न पडे श्रम ॥ राम नाम उत्तमोत्तम ॥ सर्व नामांमध्यें ॥ २ ॥ पाहतां दोन अक्षरें ॥ वेदशास्त्रें पुराण सारें ॥ श्रीराम नामें उतरे ॥ भवसागर ॥ ३ ॥ तारावया संसार आयती ॥ नौका श्रीरामगुरु उपदेशिती ॥ श्रीकृष्ण उपदेश शुकाप्रति ॥ शास्त्रें असती प्रमाण ॥ ४ ॥ ऐसी नमिली श्रीगुरु देवता ॥ तेणें प्रसन्न जाहली वाग्देवता ॥ मग ठेवी माझिये माथां ॥ अभय करु ॥ ५ ॥ गुरुवचन लाधलें ॥ तेणें ज्ञान प्रकाशलें ॥ मन माझें समरसलें ॥ श्रीरामचरणीं ॥ ६ ॥ आतां श्रोते हो समस्त ॥ तुह्मी व्हावें एकचित्त ॥ ऐकावें हरिचरित्र ॥ धर्मकथा ॥ ७ ॥ वरि एक असे जी बोलणें ॥ तुह्मी संभाळुनि घेणें ॥ माझें वेडेंवाकडें बोलणें ॥ क्षमा करणें अपत्या ॥ ८ ॥ इक्षुदंड असे वांकुडा ॥ परि शुद्ध जाणिजे चोखडा ॥ तैसा शब्द माझा बोबडा ॥ परि कथा गोड असे ॥ ९ ॥ ही कथा जे ऐकती ॥ ते मुक्तपदातें पावतीं ॥ ऐसी माझी विनंती ॥ भाविक साधुसंतां ॥ १० ॥ जे कर्मी परिपूर्ण ॥ वेद शास्त्रीं निपुण ॥ त्यांसी ही माझें नमन ॥ ब्रह्म मुहूर्तां ॥ ११ ॥ आतां शुकदेव आख्यान ॥ श्रीगुरु कृपेनें करी कथन ॥ जे जन्मेजयाप्रति वैशंपायन ॥ सांगता झाला ॥ १२ ॥ व्यास ऋषीची कांता ॥ सुळजा नामें पतिव्रता ॥ जे धरूं जाणे चित्ता ॥ वचन भ्रताराचें ॥ १३ ॥ जें कांहीं बोले पति ॥ तेचि धरी चित्तीं ॥ सुळजा नामें सति ॥ जगीं कीर्ति तियेची ॥ १४ ॥ पति बोले उत्तर ॥ तें मानी साचार ॥ भ्रतार सेवेसी तत्पर ॥ अंतर पडो नेदी सर्वथा ॥ १५ ॥ आतां सति या असत कलियुगीं ॥ आपुलिया स्वार्थालागीं ॥ डंभाई करिती वाउगी ॥ उतावळया ॥ १६ ॥ न करिती भ्रताराची भक्ति ॥ पतीचें उत्तर नाहीं चित्तीं ॥ लटकीच करिती भक्ति ॥ अभावेंची जाणावी ॥ १७ ॥ एक डोळे मोडिती ॥ बोल

मंजुळ बोलती ॥ ह्मणती तुमचेनी सर्व तृप्ति ॥ प्राणेश्वरा ॥ १८ ॥ एक ह्मणती प्राणेश्वरा ॥ घरीं वरी नाहीं अवधारा ॥ काय खातीं निष्ठुरा ॥ बाळकें माझीं ॥ १९ ॥ एकी तेल मीठाकारणें ॥ करिती पतिप्रति भांडणें ॥ ह्मणती तुझेनी भ्रतारपणें ॥ काय काज ॥ २० ॥ वरी आपलें आपण चोरिती ॥ रांधितां उभ्याच खाती ॥ जारणिसी गुज बोलती ॥ पतीचें आपुले ॥ २१ ॥ रात्रंदिवस भांडण ॥ पतीसी करिती जाण ॥ ह्मणती तुमचें शाहाणपण ॥ पुरे आतां ॥ २२ ॥ घरीचीं वडिलें न साहती ॥ उगाची लेंकरासी मारिती ॥ त्या परपुरुषा अभिलाषती ॥ रात्रंदिवस ॥ २३ ॥ भ्रतारा देखुनि पृष्ठि देती ॥ तयातें देखुन वस्तू खाती ॥ बाळकातें अंतर देती ॥ महा पापिणी त्या ॥ २४ ॥ ऐशा अधर्मी नारी ॥ असती कलियुगाभीतरीं ॥ तैसे ते नव्हे सुंदरी ॥ सुळजा पतिव्रता ॥ २५ ॥ बोलो जाणें बरवें ॥ सेवा करी मनोभावें ॥ सुळजा सति नांवें ॥ जगीं विख्यात ॥ २६ ॥ ते पतिव्रता सुंदरी ॥ व्यास ऋषीची स्त्री ॥ ते झाली गरोदरी ॥ शुक माता ॥ २७ ॥ प्रसूत न होय अवधारा ॥ जाहलीं वरुषें बारा ॥ शुकदेव कुमार ॥ ज्ञानीं असे ॥ २८ ॥ ऐसी ते गरोदरी ॥ थोर व्यथा होतसे उदरीं ॥ काय कवणीये परी ॥ आथिचना ॥ २९ ॥ कष्ट देखतां तियेचे ॥ लोक ह्मणती हिचा जीव न वाचे ॥ आह्मां देखतां बहुतांचे ॥ जीव गेले ॥ ३० ॥ ऐसें पुत्रवत्या नारी बोलती ॥ करुणा वचनें भाकिती ॥ आणि वांझा करिती ॥ हास्य तियेचें ॥ ३१ ॥ एक ह्मणती वो निसुगे सुंदरे ॥ काय करावी कन्या कुमरें ॥ सर्व इच्छा भ्रतार भोगी पुरे ॥ मरण आदरें तुज आलें ॥ ३२ ॥ एवढी जोडिली जोडी ॥ सासुसासरा वृद्ध बापुडीं ॥ त्यांसी आभाची आवडी ॥ पडसी तूं ॥ ३३ ॥ वृद्ध जाहला ऋषीश्वर ॥ परी त्यासी पुत्राचा शोक फार ॥ हा गर्भ दुर्धर ॥ कवणें निस्तारावा ॥ ३४ ॥ ऐसें बोलती नरनारी ॥ सुळजेते व्यथा होतसे भारी ॥ आकांत होतो ऋषीच्या मंदिरीं ॥ ते समयीं परियेसा ॥ ३५ ॥ ज्ञानि ह्मणती पाचारा अनंत ॥ तो सांगेल याचा वृत्तांत ॥ मग ऋषि मनामाजीं विचारीत ॥ मग स्मरे अनंता ॥ ३६ ॥ व्यास हृदयीं चिंतितां झाला ॥ श्रीहरि त्वरित पावला ॥ मग पुसता झाला ॥ श्रीकृष्ण व्यासाप्रति ॥ ३७ ॥ श्रीकृष्णाचें आगमन ॥ उत्साव झाला सर्वजना ॥ झालें देवदर्शन ॥ विघ्नें दारुण नासती ॥ ३८ ॥ श्रीहरि व्यासगृहासी

आले ॥ साधुसंतां मानवलें ॥ मग बैसों घातलें ॥ आंथरीय ॥ ३९ ॥ ऋषि ह्मणती श्रीहरि ॥ द्वादश वर्षें जाहलीं पुरीं ॥ प्रसूत न होय स्त्री ॥ काय तें उदरीं कळेना ॥ ४० ॥ मग देव ह्मणती ऐका ॥ आड धरा जमनिका ॥ विचारूनि गर्भ बाळका ॥ काय आवांका तयाचा ॥ ४१ ॥ श्रीकृष्ण वचन पडतां कानीं ॥ वाचा झाली गर्भालागुनी ॥ मग करसंपुष्ट गर्भ जोडोनी ॥ विनविता जाहला ॥ ४२ ॥ ह्मणे देवाधिदेवा दंडवत ॥ देव चिरंजीव ह्मणत ॥ बारे शिणलासी बहुत ॥ गर्भवासीं ॥ ४३ ॥ बाळा आतां रिघे बाहेरी ॥ माता शिणली भारी ॥ सुखें असे संसारीं ॥ क्रीडा करी तूं ॥ ४४ ॥ मातेची सेवा कीजे ॥ पितृवचन पाळिजे ॥ पात्र-लासी सहजें ॥ मनुष्य देहो ॥ ४५ ॥ अद्यापि तरी ज्ञान धरी ॥ आप-णातें उद्धरीं ॥ किती दिवस अघोरीं ॥ क्रमिसी बाळा ॥ ४६ ॥ सांडी हें अघोरपण ॥ बाळा भोगी सुख संपन्न ॥ जन्मा येउनी सुख जाण ॥ आणिक नाहीं ॥ ४७ ॥ मज बाळपणीं गोरस खातां ॥ खेळवी यशोदा माता ॥ नंदाचें सुख सांगतां ॥ आनंद मज वाटे ॥ ४८ ॥ आणि मातेचोनि हातें ॥ षड्रसी तृप्ति होय मातें ॥ खेळवी मज सांगातें ॥ पाळण्यांत निजवी ॥ ४९ ॥ यावरी तारुण्य आलें जीवीं ॥ गोपी गोवळ्यांमाजीं खेळवी ॥ माता दधिभात जेववी ॥ आपुलेनि हातें ॥ ५० ॥ मी खेळलों गोकुळीं ॥ गोवळ्यांचे खेळीं मेळीं ॥ प्रणिली भीमकरायाची बाळी ॥ राज्य केलें द्वारकेचें ॥ ५१ ॥ सोळा सहस्र अंतःपुरें ॥ साठी सहस्र कन्याकुमरें ॥ रथ गज सैन्य अपारें ॥ गणीत नाहीं वैभवा ॥ ५२ ॥ दैत्यांचें निर्दाळण केलें ॥ इंद्रादि देव स्वस्थानीं बैसविले ॥ एकछत्रीं राज्य केलें ॥ राज्यीं स्थापिलें धर्मराया ॥ ५३ ॥ या उपरी तूं राज्य करी ॥ निघे उदरा बाहेरी ॥ सुख अपार संसारीं ॥ ऋषि नंदना ॥ ५४ ॥ कांहीं नको धरूं भय ॥ लवकरी बाहेरी ये ॥ हें ऐकोनी शुकदेव राये ॥ बोलता जाहला ॥ ५५ ॥ देवा तुह्मी बोलिलें ॥ म्यां बहुत जन्म भोगिले ॥ आतां फार जर्जर जाहलें ॥ देह माझे ॥ ५६ ॥ आतां विनंति परियेसी ॥ जगज्जीवना हृषि-केशी ॥ सुख दुःख तुजपाशीं ॥ निवेदितों ॥ ५७ ॥ मागें जन्म जन्मांतरीं ॥ कष्ट भोगिले शरीरीं ॥ तें दुःख मुरारी ॥ काय सांगों ॥ ५८ ॥ येथुनि परिसे परिकरू ॥ नावेक सांगेन मनहरू ॥ तेथें होता ऋषीश्वरू ॥ व्यासऋषि ॥ ५९ ॥ तेहीं ग्रंथ केले अनेक ॥ अठरा पर्व भारत देख ॥ वेदादी

पुराणें देख ॥ वेदांत सुत्रें ॥ ६० ॥ प्रथम जन्म ब्राह्मण कुळीं ॥ तेणें संध्यास्नान त्रिकाळीं ॥ आतिथ्य कवणे काळीं ॥ आथीचना ॥ ६१ ॥ जेथें देवधर्म चुकलों ॥ आशा मोहपरि गुंतलों ॥ कर्म करों लागलों ॥ अनेकांचें ॥ ६२ ॥ दोघी स्त्रिया होत्या घरीं ॥ त्यांतें सोडोनी परद्वार करी ॥ मन माझें कवणे परी ॥ स्थीर नोहे ॥ ६३ ॥ प्रीति असे एकीवरी ॥ दुसरी ते दूर धरी ॥ वस्त्रें अलंकारीं भेद करी ॥ ऐसीपरी घडली ॥ ६४ ॥ एकी आवडी जीवाहुनि ॥ दुजेची गोष्ट नायके कानीं ॥ तिनें पतिसुख स्वप्नीं ॥ देखिलें नाहीं ॥ ६५ ॥ ते काय करील अबळा ॥ माझी मति चंडाळ ॥ सदा करि तीसी कळ ॥ सुख तिळभर न जाणें ॥ ६६ ॥ दिवस क्रमी ती ऐसीया रीति ॥ रात्रीं रुतु नेदी तिजप्रति ॥ तेणें उलथो पाहे क्षिती ॥ तियेचे दुःखास्तव ॥ ६७ ॥ मासाचे सोळा रुतु ॥ तयाते चुकवी अवचितु ॥ तरी बारा ब्रह्महत्या पडतु ॥ पुरुषावरी ॥ ६८ ॥ ऐशा हत्या नित्य बारा ॥ जन्मावरि पडिल्या शारंगधरा ॥ त्या पापाचे डोंगर ॥ जाले देवा ॥ ६९ ॥ ऐसिया पापास्तव देवा ॥ हीनयाति जन्मलों केशवा ॥ पुनरपि जन्म माधवा ॥ पावलों मी ॥ ७० ॥ शूद्रयाति मी जन्मलों ॥ ऋषिकर्म आचरों लागलों ॥ देवा तुज चुकलों ॥ खळीं झाडितां ॥ ७१ ॥ त्या पापास्तव श्रीपति ॥ जन्म पावलों मातंग जाति ॥ मांतगी जननी रमापति ॥ झाली माझी ॥ ७२ ॥ ते नगरीचा राजा ॥ प्रतिपाळ करी माझा ॥ तयाचे स्वामिकाजा ॥ तेथें पुरुवनी अनुसरलों ॥ ७३ ॥ कवण एके अवसरी ॥ परचक्र आलें राज्यावरी ॥ राजा निघाला बाहेरी ॥ युद्धालागीं ॥ ७४ ॥ तेथें म्यां सैन्य मारिलें ॥ रायें मज वेतन केलें ॥ वैरियातें निर्दाळिलें ॥ अर्धपळ न होतां ॥ ७५ ॥ तें युद्ध दारुण ॥ सर्वांगीं खोंचले बाण ॥ मग म्यां सोडिला प्राण ॥ स्वामिकार्या ॥ ७६ ॥ तेथें सुकृत लाधलें ॥ शिव शंभु प्रसन्न झाले ॥ स्वामिकाज तप आगळें ॥ संपादिलें म्यां ॥ ७७ ॥ मग जन्मलों राजकुळीं ॥ प्रजाजनातें पीडा केली ॥ राजसभा कोणेकाळीं ॥ जाणेचिना ॥ ७८ ॥ ऐसे कित्येक संवत्सर लोटले ॥ द्रव्य अपार मिळविलें ॥ परी नाहीं कार्य केलें ॥ न पूजिलें शिवलिंग ॥ ७९ ॥ पवित्र ब्राह्मणावरी कोपता ॥ मागें पुढें न पाहिलें सर्वथा ॥ वृत्तिभूमि हिरोनि घेतां ॥ वेळ न लागे मजलागीं ॥ ८० ॥ ऐशा पातकांच्या राशी ॥ पर्वत झाले आकाशीं ॥ पुनरपि हृषिकेशी ॥ जन्म पावलों मी ॥ ८१ ॥ जन्मोनी झालों मी वैश्य ॥ द्रव्याचा ह-

व्यास ॥ द्रव्य जोडावयाचा सोस ॥ कमी तोळें म्यां केलीं ॥ ८२॥ नाणें खरें खोटें ॥ दांडी पारडें लहान मोठें ॥ झोंक मारी नेहटें ॥ अभिलाष बुद्धि ॥ ८३ ॥ वैश्य जन्म सरला ॥ पापाचा संचितार्थ जाहला ॥ पुढती जन्म पावलों ॥ मनुष्य देह ॥ ८४ ॥ मग जन्म पांचाळ वंशीं ॥ निरंतर चोरी धातुसी ॥ सोनार धर्म हृषिकेशी ॥ करीत होतों ॥ ८५ ॥ निस सुवर्ण चोरणें ॥ रात्रंदिवस डांक लावणें ॥ बहु असत्य बोलणें ॥ आणिक द्यूतकर्म खेळणें ॥ ८६ ॥ ऐशापरी मेळविलें ॥ वेश्या जारिणीतें वेंचिलें ॥ खोटें नाणें केलें ॥ राजमुद्रेचें ॥ ८७ ॥ तें नाणें वावरे बाजारां ॥ मग धरून नेती राजद्वारा ॥ शिक्षा लाविती सुवर्ण चोरा ॥ तें दुःख मी काय सांगों ॥ ८८ ॥ ऐसिया पापें अगणती ॥ ह्मणोनी येतो काकुळती ॥ पुनरपि गा श्रीपति ॥ जन्म झाला ॥ ८९ ॥ ऐसें जन्म सांगतां ॥ तरी विस्तारें जाईल कथा ॥ पुढें ऐकावी श्रोतां ॥ रसाळ कथा शुकवाणी ॥ ९० ॥ प्रथमोध्याय गोड हा ॥

---

## अध्याय दुसरा.

॥ श्रीगणेशायनमः ॥ शुक ह्मणे गा श्रीहरि ॥ एका मनुष्य अवतारा माझारीं ॥ अनंत जन्म पावलों मुरारी ॥ अठरा पगड याति पाहिल्या ॥ १ ॥ रजक आणि चर्मक ॥ कुलाल आणि नापिक ॥ चांडाळ आणि अनामिक ॥ जन्म पावलों दयाळा ॥ २ ॥ तेली तांबोळी सुतार ॥ गुरव साळी वीणकर ॥ शिंपी खाटिक धनगर ॥ बुधले ऐसें जन्म पावलों ॥ ३ ॥ परि नचुके येरझार ॥ सुख दुःख करकर ॥ जन्म आलिया व्यापार ॥ कांहीं केला पाहिजे ॥ ४ ॥ घरीं स्त्री पुत्र कलत्र ॥ मातापिता कुटुंब गोत्र ॥ कर्माचा अधिकार ॥ दुःखदाता हा जन्म ॥ ५ ॥ ऐसे कष्ट भोगितां ॥ कर्म न सरे गा अनंता ॥ रोगावीण कष्ट पावतां ॥ वेळ नलगे ॥ ६ ॥ ऐसीया दुःखाचे सागरीं ॥ पडिलों येरझारीं ॥ मन स्थिर करूं कवणीये परी ॥ कृपावंता बापा ॥ ७ ॥ ऐशीं कर्मे करितां ॥ पालट न पडे माझिया चित्ता ॥ पापाचा संग्रह मागुता ॥ न करी मी देवा ॥ ८ ॥ एका पोटा कारणें ॥ नाना प्रकारीं जोडणें ॥ मागें पुढें न पाहणें ॥ कर्म करितां

॥ ९ ॥ ऐसे जन्म लोटले ॥ पापाचे डोंगर जाहले ॥ दिवसेंदिवस उणे होत चालले ॥ पुण्य देखा ॥ १० ॥ अंडज आणि जारज ॥ स्वेदज आणि उद्भिज ॥ ऐसें जन्म केशवराज ॥ पावलों मी ॥ ११ ॥ श्वापद तृणचरें ॥ तरुवर शिळा शिखरें ॥ कूपें पुष्करणीं सरोवरें ॥ आणि सरिता नदिया ॥ १२ ॥ ऐसे पावतां जन्म अपार ॥ क्षिण झालें माझें शरीर ॥ व्यथा ती मुकुंद गा भ्रती अपार ॥ पक्षि याति ॥ १३ ॥ ऐसीया परी संसारीं दुःख अती या शरिरीं ॥ व्यर्थ तुज वीण श्रीहरि ॥ जन्म घेणे घडे ॥ १४ ॥ सदा अपारदुःख भोगिजे ॥ तें सर्व सुख मानिजे ॥ गोड करूनिया जेविजे ॥ संसारू हा ॥ १५ ॥ पूर्वकर्म करोनी ॥ पाविजे हीन योनी ॥ तेंचि सुखदुःख मानी ॥ जनलोक ॥ १६ ॥ तें वाटे बरवें ॥ आतां वीट घेतला जिवें ॥ हें ऐकुनी केशवें ॥ काय बोलिले ॥ १७ ॥ अगा तूं आपलें दुःख सांगसी ॥ पुढलाची व्यथा नेणसी ॥ बारा वर्षे मातेसी ॥ कां कष्टविलें ॥ १८ ॥ प्रसूत समईचे कुहाडे ॥ तूं नेणसी गा बापुडें ॥ मातेचें दुःख धडफुडे ॥ नवल बाळका ॥ १९ ॥ तंव शुक बोलिले ॥ ऐसेंच मागें भोगिलें ॥ मृगजन्म जाहलें ॥ मज देवा ॥ २० ॥ व्याधें बाण लावुनी कानाडी ॥ श्वानें लाविलीं पाठमोरीं ॥ मी त्रासानें पळालों परी न सोडी ॥ मारिले कांटे ॥ २१ ॥ तो संधान करी निष्ठुर हातें ॥ न पळवे भुललों दिशातें ॥ दुष्टासी वारी ऐसें सांगाते ॥ नाहीं कोणी ॥ २२ ॥ तेथें आकांत जाहला ॥ व्याधें वणवा लाविला ॥ धुरें निर्बुजला ॥ प्राण माझा ॥ २३ ॥ तेथें काकुळती येत थोरी ॥ प्रसूत माता न होय झडकरी ॥ मग दोघे मेलों ते अवसरीं ॥ ऐसी गर्भाची परी गा केशवा ॥ २४ ॥ आणिक कष्ट झाले देवा ॥ ते परियसी गा केशवा ॥ ऐशा ऐशा योनी जीवा ॥ जन्म माझा ॥ २५ ॥ तेथें स्त्रियांची नाहीं गणती ॥ कन्या कुमर जन्मती मरती ॥ देखत देखत संपत्ति ॥ गेली माझी ॥ २६ ॥ मज देखतां माझीं बाळें ॥ गांजिलें धिवरें जाळें ॥ उदर आपुलें भरलें ॥ ऐशापरीं ॥ २७ ॥ ऐसें किसेक वेळीं ॥ समयो पुरला मीनकुळीं ॥ गाजिलें धिवरें जाळीं ॥ शिक्षावती ॥ २८ ॥ प्रतिदिनी होतसे आकांत ॥ माझे बाळकाचा घात ॥ स्त्रिया माझ्या गळ्या झोंबत ॥ सा दुःखास्तव ॥ २९ ॥ ते अवस्था सांगतां ॥ न पुरे गा कृष्णनाथा ॥ मज बाहेर येतां ॥ लाज वाटे ॥ ३० ॥ आणिक जन्म निष्ठुर ॥ आपलिया अपत्याचा संहार ॥ रूपें धरिलीं रानमांजर ॥ आणि सर्प विंचू ॥ ३१ ॥ व्याघ्र होवोनि मारी गाय ॥ तेथें पातक होय ॥

मांस त्याचें खाय ॥ ऐसीं दुष्टकर्मे ॥ ३२ ॥ पशूयोनी अघोर ॥ येर-येरासी वैर ॥ ऐसा दुर्घट संसार ॥ जन्म माझा ॥ ३३ ॥ एकमेकांचा धाक वनीं ॥ सदां भ्रमणें घोर वनीं ॥ तिळ एक सुख लोचनीं ॥ देखिलें नाहीं ॥ ३४ ॥ आणिक जन्म माझा देवा ॥ तो परियसी गा केशवा ॥ थोर कष्ट माझिया जीवा ॥ झाले ऐसे ॥ ३५ ॥ नीच योनीं जन्मलों ॥ कोळ्याचे घरीं वाढलों ॥ शिरीं काष्टें वाहतां भागलों ॥ तें काय सांगों अनंता ॥ ३६ ॥ शिरीं काष्टांचा भारा ॥ जात होतों नगरशहरा ॥ उष्णकाळीं श्रम शरीरा ॥ ते दातारा काय सांगों ॥ ३७ ॥ मार्गीं चालतां घामेलों ॥ मस्तक पुसों लागलों ॥ तेणें प्राण व्याकुळ झालों ॥ उदक मागें भलतया ॥ ३८ ॥ डोईत ऊ सांपडली ॥ तेणें माझी तनु गांजिली ॥ ते बोटीं रगडिली ॥ कांहीं केल्या न सोडी ॥ ३९ ॥ ऐसे जन्मजन्मां-तरीं ॥ कष्ट झाले फार या शरीरीं ॥ ते किती सांगों केसरी ॥ तुजप्रति ॥ ४० ॥ ऐसे कष्ट फार साचे ॥ ते न बोलवती वाचे ॥ मार्गीं चिंतिले चरण तुमचे ॥ देवाधिदेवा ॥ ४१ ॥ मग कित्येक काळा ॥ बैल जन्म पावलों गोपाळा ॥ गोधनामार्जीं सकळां ॥ चरत होतों ॥ ४२ ॥ मग नांगरीं जुंपिलें ॥ खांदीं किडे पडले ॥ तेथें कागें बगें टोंचिलें ॥ तें दुःख न सांगवे ॥ ४३ ॥ तेथें प्रजाजनाचीं झोडी ॥ मग लागली वांकुडी ॥ मग हिंडलों झाडी ॥ वेळुवाचे ॥ ४४ ॥ रात्र समयीं भुकेलों ॥ मग पिंडीवरील बेल-पत्री भक्षूं लागलों ॥ हिवानें फार कष्टलों ॥ मग रिघालों देउळीं ॥ ४५ ॥ ऐसी हिंडतां वनस्थळीं ॥ विश्रामलों देउळीं ॥ तेथें होतें चंद्रमौळी ॥ जोति-लिंग ॥ ४६ ॥ अंगीं भरला वारा ॥ बसों जातां परभारा ॥ झोक न साहवे शरिरा ॥ मग पडलों दातारा शिवलिंगीं ॥ ४७ ॥ मज निद्रा लागली ॥ मुखींची पत्री गळाली ॥ शंभूनें पूजा मानिली ॥ नंदी ह्मणोनी ॥ ४८ ॥ तें सुकृत मज लाधलें ॥ शिवशंभु प्रसन्न झाले ॥ तेणें पुन्हां जन्म पावलों ॥ मनुष्य देह ॥ ४९ ॥ पहा मनुष्य देहाभीतरीं ॥ प्राणी आपली सोय न धरी ॥ तरी आणिके शरीरीं ॥ सिद्धि नाहीं ॥ ५० ॥ गर्भीं प्राणि असतां ॥ तुझें स्मरण गा आनंता ॥ गर्भा बाहेर पडतां ॥ भुली पडे ॥ ५१ ॥ धरणी वायु लागतां ॥ स्मरण विसरे तत्वता ॥ वोळखूं लागे माता पिता ॥ आणि कोहं कोहं रडे ॥ ५२ ॥ बहुत जन्म येरझारीं ॥ क्रमिलें बहुतां प्रकारीं ॥ तितकीच सखीसोयरीं ॥ काय झालीं माझीं ॥ ५३ ॥ ह्मणोनी हें मिथ्याजाळ ॥ लटकेची पाल्हाळ ॥ वायाचि नर

व्याकुळ ॥ होती देखा ॥ ५४ ॥ क्रमिले बहुत दिवस ॥ करूनी नाना हव्यास ॥ देवा आतां सायास ॥ घालूं नको ॥ ५५ ॥ भय आणि कष्ट चिंता ॥ या वेगळा करी जी अनंता ॥ तुज शरण जी कृष्णनाथा ॥ करी मज जन्मावेगळे ॥ ५६ ॥ उपजलिया संसारीं ॥ तूंतें विसरती वरिच्यावरी ॥ संसार व्यापारीं ॥ लुब्ध होती ॥ ५७ ॥ जोडावया धनसंपत्ति ॥ सदा घोकणी चित्तीं ॥ कवण्यापरि गा श्रीपति ॥ जोडसी तूं ॥ ५८ ॥ एक संपत्तीची आशा ॥ पडती मोहफांशा ॥ मग परमपुरुषा ॥ न ओळखती ॥ ५९ ॥ पाहतां कवणाचें धन ॥ नाहीं चिरंजीव राहणें ॥ सवेंचि जन्ममरण ॥ न सरे देवा ॥ ६० ॥ वर्णितोसी आतां पुरे ॥ साठीसहस्र कन्याकुमरे ॥ ते अनंत योनी शरिरें ॥ देखिले देवा ॥ ६१ ॥ देवा हें तुज साजे ॥ आणिकासी न साजे ॥ आतां पुरे तुझे ॥ चरणीं ठाव देईं ॥ ६२ ॥ मग बोलिला श्रीहरि ॥ बा हे बंधन अवधारी ॥ आतां निघे बाहेरी ॥ योगिया ॥ ६३ ॥ तुझे मनींचें मनोरथ ॥ सिद्धी पाववीन समस्त ॥ बाहेर यावें निभ्रांत ॥ श्रीव्यास सुता शुका ॥ ६४ ॥ तुज उपदेशितों ज्ञान ॥ अनंतचरणीं होय लीन ॥ पुढती जन्ममरण ॥ तुज नाहीं ॥ ६५ ॥ सांडी आशा भेदतृष्णा ॥ न करी भेदाभेद विवंचना ॥ कामक्रोध कल्पना ॥ येऊं नेदी ॥ ६६ ॥ दंभ अहंता अहंकार ॥ तयाचा न करी अंगिकार ॥ विटंबिति संसारीं ॥ ज्ञानदृष्टि ॥ ६७ ॥ कांहीं चिंता न धरी मनीं ॥ पापगोष्टी नायके कानीं ॥ परि निंदा मुखवचनीं ॥ बोलूं नको ॥ ६८ ॥ धरावा साधुसंताचा संग ॥ सांडावा कुसंग ॥ गुरु वचनाचा भंग ॥ कदा न करी तूं ॥ ६९ ॥ ऐसा विवेक धरी मनीं ॥ तरी महापातकें जाती पळोनी ॥ हरि चरणीं दृढ मनीं ॥ चालवी संसार ॥ ७० ॥ आपआपणातें पाही ॥ सोहं संन्यासी होईं ॥ अजपा मंत्र घेईं ॥ बिजाक्षरें ॥ ७१ ॥ निराकार मूर्ति ध्यायी जे मनीं ॥ बुद्धि ठेविजे गुरुचरणीं ॥ सर्वांघटीं आत्मा जाणोनी ॥ होय सुखी ॥ ७२ ॥ आपआपणाते पाही ॥ दुजे कोणी नाहीं ॥ एकी तत्वीं राही ॥ भुलों नको ॥ ७३ ॥ सर्वांठायीं हरि ॥ ऐसा मनीं दृढ धरी ॥ भेदाभेद सारी ॥ करूं नको ॥ ७४ ॥ यावरी शुकदेव बोले ॥ राउळें ज्ञान उपदेशिलें ॥ परि स्वामी एक असें बोलणें ॥ केशवराया ॥ ७५ ॥ माझी विनंति परियेसी ॥ बारावर्षें झालीं जन्मासी ॥ नग्न आहे शरिरासी ॥ कसें यावें बाहेरी ॥ ७६ ॥ आतां

स्वयंभ कासोटी ॥ देई मज जगजेठी ॥ लाज राखे सृष्टि ॥ पै माझी ॥ ७७ ॥ इतकें शुकदेव बोलिला ॥ देवें स्वयंभ कौपीन दिला ॥ मग शुक श्रवणद्वारीं बाहेर आला ॥ योगीराज ॥ ७८ ॥ शुकयोगी ब्रह्म परिपूर्ण ॥ सुळजेसी जाहला हर्ष पूर्ण ॥ येरु स्मरे नारायण ॥ धरिले चरण कृष्णाचें ॥ ७९ ॥ देवें हस्त ठेविला माथां ॥ तैसाच निघाला तीर्था ॥ मागे न पाहे सर्वथा ॥ शुकदेव योगी ॥ ८० ॥ निघाला तो लवलाहे ॥ मागें पुढें न पाहे ॥ सुईण ह्मणे वोमाय ॥ गर्भातून कायसें भूत आलें ॥ ८१ ॥ हें अद्भुत लेंकरूं ॥ करी श्रीराम नाम उच्चार ॥ याचे नाभीचा जारू ॥ वाळला नाहीं ॥ ८२ ॥ लेंकरूं नव्हे हें सांचा ॥ राक्षस हा मायेचा ॥ न करावा गजर लेंकराचा ॥ हे अपूर्व चोज जाणा ॥ ८३ ॥ गेला तरी सुखी जावो ॥ राहतां तरी अनर्थ पै हो ॥ सुळजा वांचली हें अपूर्व ॥ माना सकळां ॥ ८४ ॥ व्यासा चंद्रबळ लाधलें ॥ किंवा सुकृत फळासी आलें ॥ येवढें विघ्न वारिलें ॥ कुळ देवतेनें ॥ ८५ ॥ एकी अबळा वाचलों ह्मणती ॥ एकी जितावण करिती ॥ एकी क्षेमा आळंगिती ॥ आप्त वर्गासी ॥ ८६ ॥ मग ह्मणे सुळजा ॥ आतां मज दावा पुत्र माझा ॥ द्वादश वरुषें कष्टली वोजा ॥ वाहिला उदरीं ॥ ८७ ॥ करुणा करी लवलाही ॥ ह्मणे पुत्रा स्तनपान घेई ॥ बारे कांटे खडे रुतती पायीं ॥ परतोनी येई लवकरी ॥ ८८ ॥ तुज लागीरे कुमरा ॥ स्तनीं लागल्या पयोधारा ॥ बारें येई सामोरा ॥ घेई स्तनपान ॥ ८९ ॥ ऐसी करुणा करी माता सती ॥ थोर येतसे काकुळती ॥ परि शुक न धरी चित्तीं ॥ दूर गेला ॥ ९० ॥ आतां काय करूं वो साजणीं ॥ शुक नये परतोनी ॥ योगी राजा कृष्ण वचनीं ॥ पुत्र माझा ॥ ९१ ॥ पोटीं वागविला वर्षें बारा ॥ थोर कष्ट झाले माझिया शरिरा ॥ शेवटीं माझिया पुत्रा ॥ निराशा जाहली ॥ ९२ ॥ बारे तूं तप तीर्थ काय जाणसी ॥ कवणें चालविलें तुजसी ॥ जवळी होता हृषिकेशी ॥ तेणें नवल काय केलें ॥ ९३ ॥ आतां न जाई तूं तपा ॥ उष्णें करोनी श्रम पावसी बापा ॥ मार्गीं चोरां सर्पां ॥ करुणा नाहीं बाळा ॥ ९४ ॥ मग विनवीत भास्करु ॥ ह्मणे माझें तान्हें लेंकरूं ॥ तूं देवा तपो नको उग्रु ॥ माझ्या बाळकावरी ॥ ९५ ॥ अगा देवा करुणा ॥ लेंकराची करावी जाणा ॥ अति कोमल चरणा ॥ न पोळवे देखा ॥ ९६ ॥ अहो वसुंदधरे माते ॥ जतन करी शुकाते ॥ वंदीन तुझ्या चरणाते ॥ विनंति सुळजेची ॥ ९७ ॥ तूं कृपाळु परियेसी ॥ उदरीं राखिले

सीतेसी ॥ बाळ तैसें माझे आपत्यासी ॥ जतन करी ॥९८॥ विनंति सिंह सर्पा ॥ रिसा अस्वला वृश्चिका ॥ तुह्मी न करावें कोपा ॥ राखा बाळ माझें ॥ ९९ ॥ ऐसी ते सुंदरी ॥ कर जोडोनि विनंति करी ॥ तो शुक गेला दुरी ॥ ध्यान करी हरीचें ॥ १०० ॥ या उपरी ह्मणे पिता व्यास ॥ पुत्र चालिला कर्मत्रासें ॥ थोर होती आस ॥ पितृगोत्र रक्षील ॥ १०१ ॥ तूं धाकुटें लेंकरूं ॥ परी मज होता आधारू ॥ तुजविण हा संसारू ॥ व्यर्थ गेला ॥ १०२ ॥ मातापिता सांडिजे ॥ योगसाधन करिजे ॥ हें कोणे शास्त्रीं बोलिजे ॥ सांग बा मज ॥ १०३ ॥ तपें होय सुकृत ॥ ऐसें मनीं धरिसी निभ्रांत ॥ मातापिता संतोषें सुकृत ॥ हे वेदशास्त्रीं बोलिलें ॥ १०४ ॥ सांडुनी जाई मातापिता ॥ त्याचा सन्यासीं व्यर्थता ॥ तीर्थें कंटाळती सर्वथा ॥ त्याचे स्नानें दर्शनें ॥ १०५ ॥ पितृवचन न पाळिजे ॥ मातेसी अंतर देती जें ॥ ते प्राणी पातकी ह्मणिजे ॥ यमदंड पावती ॥ १०६ ॥ पुंडलीक सेवा करितां ॥ पितयासी झोंप आली तत्वता ॥ तंव विष्णु आले त्वरितां ॥ चित्त पहावया तयाचें ॥ १०७ ॥ देव येउनी उभा द्वारीं ॥ परी येरू ये न बाहेरी ॥ सेवा पितयाची करी ॥ एक भावें ॥१०८॥ ऐसा पितृभक्तीचा रंग ॥ न करी देवाचा पांग ॥ पितयाची निद्रा होईल भंग ॥ ह्मणोनी न पाहे माघारा ॥ १०९ ॥ तेणें अंतरीं ओळखिलें ॥ मज देव भेटों आले ॥ पितृसेवें पुण्य जोडलें ॥ फळ लाधलें पांडुरंग ॥ ११० ॥ मग माघारी वीट झोंकिली ॥ ते चरणीं देवाचे लागली ॥ देवें पूजा मानिली ॥ समचरणीं उभा राहे ॥ १११ ॥ हात ठेवूनि कटावरी ॥ युगें अठ्ठावीस उभा हरी ॥ पुंडलिकाची भक्ति भारी ॥ हा उपदेश ह्मणे श्रीव्यास ॥ ११२ ॥ आणिक दृष्टांत ते आईका ॥ पितृवचनीं राम निका ॥ बारा वर्षे देखा ॥ वनवास क्रमिला ॥ ११३ ॥ तेणें पितृवचन पाळिलें ॥ सापत्निक माते समाधान केलें ॥ कीर्तीचें फळ जोडिलें ॥ पुराण प्रसिद्ध ॥ ११४ ॥ वृद्धें श्रावणाची पितृ जोडी ॥ ती बैसवुनी कावडीं ॥ खांदीं वाहे परवडी ॥ वाराणसी ॥ ११५ ॥ मार्गीं जातां तृषा लागली ॥ कावडी वृक्षा लाविली ॥ करीं झारी घेतली ॥ उदका कारणें ॥ ११६ ॥ श्रावण उदक भरितां ॥ झारी झाली बुडबुडतां ॥ चाउली झाली दशरथा ॥ संधान लविता तो जाहला ॥ ११७ ॥ श्वापद उदकासी पातलें ॥ ऐसें जाणुनी संधान केलें ॥ तें येउनी कंठीं लागलें ॥ श्रावणाचे ॥ ११८ ॥ जवळी येउनी पाहे ॥ तंव मनुष्य पडिलें आहे ॥ मग संकोचीत होय ॥ राजेंद्र ॥ ११९ ॥

तयासी पुसे तूं कवण ॥ येरु ह्मणे मी श्रावण ॥ वृक्षासी पितृकावडी लावून ॥ उदकासी आलों ॥ १२० ॥ तूं राजा सूर्यवंशीं ॥ उदक देई जा वृद्धांसी ॥ कावडी पैल वृक्षासी ॥ टांगली असे ॥ १२१ ॥ हृदयीं मातापित्यासी स्मरोन ॥ श्रावणें त्यजिला प्राण ॥ पावला पद निर्वाण ॥ सायुज्य-मुक्तीतें ॥ १२२ ॥ ऐसें पितृवचन पाळिलें ॥ कीर्ति मुक्तीस जोडिलें ॥ हें तपाहुनी आगळें ॥ पितृवचनें ॥ १२३ ॥ मग रायें दशरथें ॥ झारी घेउनी हातें ॥ पाणी द्यावया वृद्धांतें ॥ वृक्षाजवळी पातला ॥ १२४ ॥ उदक घ्या ह्मणत ॥ शब्द ओळखिला त्वरित ॥ श्रावण नव्हे सत्वस्थ ॥ कोण आहे ॥ १२५ ॥ मग पुसत तूं कोण ॥ येरू ह्मणे मी दशरथ जाण ॥ श्रावणाचें वर्तमान ॥ सांगता जाहला ॥ १२६ ॥ आतां उदक श्रावणा-विण ॥ आह्मी न घेऊं जाण ॥ ऐसें ह्मणोन प्राण ॥ सोडिला सांहीं ॥ १२७ ॥ पुत्राकारणें पाही ॥ शोक लागला देहीं ॥ भेटी देउनी जाई ॥ योगेश्वरा ॥ १२८ ॥ आतां पुत्रपण सत्य करी ॥ मातापिता सुखी करी ॥ पाहा सा सगरीं ॥ काय केलें ॥ १२९ ॥ साठीसहस्र संव-त्सर ॥ युद्ध केलें नृपवरें ॥ सूर्यवंशीं महावीर ॥ पवित्र राजा ॥ १३० ॥ त्यांनीं अश्वमेध मांडिला ॥ शामकर्ण वारू आणिला ॥ तो पृथ्वी-वरी सोडिला ॥ युद्धालागीं ॥ १३१ ॥ ते इंद्रें ऐकिली मात ॥ अश्वमेध करि-ती सगरसूत ॥ मग मंत्र एक त्वरित ॥ रचिता झाला ॥ १३२ ॥ सा-वरी इंद्रें घोडा चोरिला ॥ अदृश्यरूपें नेला ॥ नेउनी गुंफेमाजीं बांधिला ॥ मुनीचिया ॥ १३३ ॥ पाताळीं कपील मुनी ॥ सगरीं खणिली मेदिनी ॥ अंबरीं जाहली आकाशवाणी ॥ सांभाळा रे सांभाळा ॥ १३४ ॥ बृहस्पति सगराचा मामा ॥ तो ह्मणे रे उत्तमा ॥ कां आलासी आश्रमा ॥ या ब्राह्म-णाचिया ॥ १३५ ॥ तुह्मी खणाल मेदिनी ॥ येथें आहे कपिल मुनी ॥ तो भस्म करील शोधोनी ॥ सांडा गर्व ॥ १३६ ॥ येरुसी न आवरे कोपु ॥ मेदिनी खणिती थोर मापु ॥ प्रवेशले एकाएकु ॥ पाताळ भुवनीं ॥ १३७ ॥ ऐकोनि तयाचा गजरु ॥ डचकला तो ऋषेश्वरु ॥ येरि ह्मणती हाचि तस्करु ॥ धरा वहिला ॥ १३८ ॥ यावरी कोपला महामुनी ॥ तयासी शापिलें वचनीं ॥ सगरु जाले तेचक्षणीं ॥ भस्म देखा ॥ १३९ ॥ वडिलाचें वचन न ऐकती कानीं ॥ आपणची ह्मणती ज्ञानी ॥ तरी मूर्ख ते गांजणी ॥ जाणावें गा ॥ १४० ॥ एक सहस्र वर्षें जाहली सुमित्रा ॥ तयाचे वंशीं जाहला पुत्र ॥ अत्रिनें दिधला एक मंत्र ॥ तयाचा भगिरथ ॥ १४१ ॥ गंगा स्वर्गाहुनी आणिली

ते मंदाकिनी स्वर्गा झाली ॥ पाताळीं प्रगटली ते भोगावती ॥ १४२ ॥ हिमाचलामाजीं लपाली ॥ येतां न देखेचि वहिली ॥ मग बुद्धि विचारिली ॥ तया भगीरथें ॥ १४३ ॥ राजा इंद्र विनविला ॥ तेणें ऐरावती दिधला ॥ पर्वत फोडोनि टाकिला ॥ गंगाओघें ॥ १४४ ॥ सगरु जळत होते ॥ विझविले गंगासुतें ॥ ऐसें पुत्रपण तया भगीरथें ॥ साच केलें ॥ १४५ ॥ अरे पुत्रा आमुतें संतोशवीजे ॥ मातापिता उद्धरिजे ॥ डोळे झांकती मग जाइजे ॥ हा धर्म चोख ॥ १४६ ॥ पुत्रा कष्ट झाले गा थोर ॥ मातेचें गांजिलें बा शरीर ॥ अद्यापि कां निष्ठुर ॥ बोलसीना ॥ १४७ ॥ ऐसें ऐकतां नेटकें ॥ शुकदेव पुढें चमके ॥ यावरि दृष्टि देखे ॥ वनस्थळीं ॥ १४८ ॥ शुकदेव अदृश्य झाला ॥ व्यास त्वरित धरणीं पडला ॥ थोर दुःखें आक्रंदला ॥ व्याकुळ प्राण तयाचा ॥ १४९ ॥ पुत्राविणें संसारु ॥ तो केवळ भूमिभारु ॥ माझें उतरावयाचें तारूं ॥ दूरि गेलें ॥ १५० ॥ आतां कायसें जिणें ॥ शोक दुर्ग जाणणें ॥ व्यर्थ जिणें पुत्राविणें ॥ जाण माझें ॥ १५१ ॥ निपुत्री जन मज ह्मणती ॥ देव पितर स्वर्गीं कष्टती ॥ ऐसें काय केलें गा श्रीपती ॥ मजलागीं ॥ १५२ ॥ शुक नये काकुळती ॥ वनांत हिंडतो मोह चित्तीं ॥ पुत्रा पुत्रा हें वदती ॥ साद देती श्वापदें ॥ १५३ ॥ पूर्व जन्मींचा तूं पिता ॥ काय पाळिलें ताता ॥ कर्मावसानी आतां ॥ आह्मी वृद्ध झालों ॥ १५४ ॥ ऐसी ऐकोनि वाग्वाणी ॥ नाद न माय गगनीं ॥ मग व्यासऋषि तेथुनी ॥ परतला मागें ॥ १५५ ॥ इतुका वृत्तांत झाला ॥ व्यास आश्रमा आला ॥ शुकदेव पावला ॥ सुख सरोवरां ॥ १५६ ॥ योगेश्वरीं देखिला ॥ धांवोनिया आलंगिला ॥ आपले आश्रमासी आणिला ॥ तापसी जाणोनीया ॥ १५७ ॥ तये गुंफे भीतरीं ॥ तेज्योरूप अवघ्या नारी ॥ एकीहुनी एक सुंदरी ॥ परी विकल्प अंतरीं ॥ येऊं नदे ॥ १५८ ॥ मग निघोनिया बाहेरी ॥ वस्त्रें टाकिती सुंदरी ॥ शुक देवासी कवणीये परी ॥ मानविती ॥ १५९ ॥ मग शुकें अर्घ्यदान केलें ॥ दर्भासन घातलें ॥ सावर आपण बैसले ॥ ऋषिसुत ॥ १६० ॥ यज्ञ विभूति आणिली ॥ शुकें सर्वांगीं लाविली ॥ मग वस्त्रें घेतलीं ॥ भगवानरूपें ॥ १६१ ॥ वृक्ष चंपके वेल पत्रीं ॥ गुंफेमाजीं मिरवती ॥ विश्रांत वनीं विज्ञानवल्ली ॥ ते स्वीकारी तळभरीं ॥ १६२ ॥ शुक आसनीं बैसला ॥ ध्यानीं निश्चल राहिला ॥ आवर्ण आपण विसरला ॥ ब्रह्मयोगीं ॥ १६३ ॥ शुकदेवें मांडिलें ध्यान ॥ मुखीं धरिलें

मौन्य ॥ नासाग्रीं लोचन ॥ लक्षीत असे ॥ १६४ ॥ ब्रह्मनिष्ठ निरंतरीं ॥ वनामाजीं तप करी ॥ एक चरणांगुष्ठावरी ॥ करी निद्रा ॥ १६५ ॥ ऐसा ब्रह्मयोगी निरंतरीं ॥ वनामाजीं तप करी ॥ व्यास घरीं चिंता करी ॥ शुक देवाची ॥ १६६ ॥ यावरी प्रार्थीतो इंद्रासी ॥ येरे नाभिकार दिधला तयासी ॥ मग तप ढळावयासी ॥ इंद्रें रचिला उपाय ॥ १६७ ॥ इंद्रानें रंभेसी केला हाकार ॥ तंव ते पावली सत्वर ॥ जियेचा महा थरार ॥ तापसीयांसी ॥ १६८ ॥ तिनें नमिला इंद्रराज ॥ ह्मणे कांजी पाचारिलें मज ॥ जें असेल योजिलें काज ॥ तें सांगा स्वामिया ॥ १६९ ॥ तीतें सांगे इंद्रराव ॥ निर्भय तप करीतसे शुकदेव ॥ त्याच्या तपाचा करावा क्षय ॥ त्वां जाउनी ॥ १७० ॥ तंव बोलली ते सुंदरी॥ विडा दीजे माझे करीं ॥ आतां शुकदेव सत्वरी ॥ आणिन मी तुह्मापुढें ॥ १७१ ॥ इंद्र ह्मणे गे सुंदरी ॥ शुका आणसी जरी ॥ तरी तुज अमरपुरीं ॥ मानवती जन ॥ १७२ ॥ मग तियेसी विडा दिधला ॥ रंभेनें शिरीं वंदिला ॥ मग शृंगार केला ॥ नाना परीचा ॥ १७३ ॥ अंग तियेचें पातळ ॥ गौरवर्ण विशाळ भाळ ॥ नेत्र जैसे अंबुजदळ ॥ चंपक वर्ण तियेचा ॥ १७४ ॥ कांसे कासुनिया वीरगुंठी ॥ बरवी वेणी रुळे पृष्ठीं ॥ कटि सामावे मुष्टीं ॥ तये रंभेची ॥ १७५ ॥ बाहु दंड सरळा ॥ बरवी शोभे मेखळा ॥ कांसे कासिला पिंवळा ॥ पीतांबर ॥ १७६ ॥ आंगीं सुवास कस्तुरीची उटी ॥ मुक्तमाळा रुळे कंठीं ॥ टिळा केशराचा ललाटीं ॥ तये रंभेचे ॥ १७७ ॥ हातीं रत्नजडीत कंकणें ॥ गळा नवरत्नांचीं भूषणें ॥ व्यंकट दृष्टि पाहणें ॥ अळूमाळ ॥ १७८ ॥ कानीं तानीवडे जडीत ॥ सांखळ्या नाग मिरवत ॥ भोंवऱ्या शोभिवंत ॥ हिरे जडिले ॥ १७९ ॥ माथा मोतियाची जाळी ॥ दोहींकडे शोभे हसळी ॥ तेज झळके गंडस्थळीं ॥ मिरवे रंभा ॥ १८० ॥ सुवर्ण कनकाची झारी ॥ हातीं मिरवे सुंदरी ॥ परम चतुर मनोहरी ॥ कामरूपा ॥ १८१ ॥ नाकीं जडित मुक्ताफळ ॥ तेज मिरवे सुढाळ ॥ मुखीं शोभे तांबूल ॥ तेरा गुणांचा ॥ १८२ ॥ दंतपंक्ति तेज देखा ॥ सांचो चंद्रासारखी शुभ्रता ॥ हिरे जडिले मुखा ॥ रंभेचिया ॥ १८३ ॥ अति सुंदर पुष्प जाती ॥ चंपकें बकुलें शेवंती ॥ तयावरी मिरवे सोनकेतकी ॥ आणिक मोगरी ॥ १८४ ॥ करीं चंदनाची उटी ॥ अंगीं कंचुकी गोमटी ॥ तयावरी मिरवे पत्रवेटी ॥ चंपकाचे पानांची ॥ १८५ ॥ चरणीं वांक्या तोडरू ॥ अंदुवाचा गजरु ॥ अंगीं तारुण्याचा भरु ॥ अनुपम्य

॥१८६॥ चाले डोले हस्तिनी गति ॥ विद्युल्लतेप्रमाणें नेत्र लवती॥ तयासी देखोनी गिरजा पति॥ भूलो शके ॥ १८७ ॥ ऐसी ते महा खेचरी ॥ निघाली झडकरी ॥ सिंधु वना माझारीं ॥ प्रवेशली ॥ १८८॥ तये वनीं वृक्ष खजुरी पोफळी ॥ फणस महाळुंगी नारळी ॥ आणि द्राक्ष मंडप स्थळोस्थळीं ॥ डुल्लताती ॥१८९॥ गगनचुंबित ताड ॥ आम्रवृक्ष जांभुळी उदंड ॥ केळीं जांभ अंजिर रगड ॥ बागशाई॥१९०॥ मालती आणि शेवंती ॥ पाडाळा जाई अनंत जाती ॥ तया वनीं केतकी शोभती ॥ आणिक बहु पुष्पलता ॥ १९१ ॥ तया वनीं जाळीं ॥ रंभा वृक्ष न्याहाळी ॥ आणि सिंह शार्दूळ तये स्थळीं ॥ गर्जना करिती ॥ १९२ ॥ तेथें गाई म्हैशींचे थवे ॥ तृणें भक्षिती बरवें ॥ अवघ्याशीं शुकदेवें ॥ ज्ञान उपदेशिलें ॥ १९३ ॥ पशुपक्षी होऊनि एकरूप ॥ उदक पिती सांडुनी विकल्प ॥ परम तयातें सुख ॥ क्रीडा करितां ॥ १९४ ॥ मूषक मांजरें एकेठायीं ॥ नकुळा सर्पा वैर नाहीं ॥ अवघीयांचे ठायीं ॥ हरीचें प्रेम ॥ १९५ ॥ ऐसी ते वनस्थळीं ॥ रंभा दृष्टि न्याहाळी ॥ मग पावली जवळी ॥ शुकदेवाश्रमीं ॥ १९६ ॥ डावे घालून शुक आसनास ॥ पूर्वद्वारीं करी प्रवेश ॥ सन्मुख देखे योगिराजास ॥ ती रंभा ॥ १९७ ॥ लक्ष लाविलेंसें ऊर्ध्व दृष्टी ॥ स्वयंभ असे कासोटी ॥ सर्वांगीं शोभे उटी ॥ यज्ञ विभूतीची ॥ १९८ ॥ तंव लावण्य खेचरी ॥ आपुले मनीं विचार करी ॥ नेत्र हा उघडील जरी ॥ तरी मी थोर दैवाची ॥ १९९ ॥ आनंदें घातली कास ॥ गायन आरंभी सुरस ॥ सप्तस्वर केदारास ॥ आळवी रंभा ॥ २०० ॥ नृत्य करावया उठली ॥ नाना भाव करिती जाहली ॥ परी शुकाची नाहीं विसर्जली ॥ योगमुद्रा ॥ २०१ ॥ आलाप करी सुंदरी ॥ नाना प्रबंध कुसरी ॥ तंव योगीयाची झाली पुरी॥ ध्यानमुद्रा ॥ २०२ ॥ शुकानें नेत्र उघडिले ॥ रंभेसी पुढें देखिलें ॥ येरीनें कर जोडिले ॥ केलें नमन ॥ २०३ ॥ शुकें नमस्कारिली खेचरी ॥ बैसविली गुंफे माझारीं ॥ येरी देखोनी हास्य करी ॥ सुमनें मुखीं उपजती ॥ २०४ ॥ रंभा व्यंकट दृष्टि पाहे ॥ हावभाव दाविताहे ॥ मंजुळ स्वर गाये ॥ सानुराग ॥ २०५ ॥ तारुण्याचेनि भरें ॥ हावभाव दावी भृकुटी भारें॥ तव शुकदेव ह्मणे सुंदरे ॥ हरिचरित्र गाइजे ॥ २०६ ॥ मागें तप करितां चंद्रमौळी॥ तंव ऐसीच एक प्रवेशली॥ तयाची समाधि लागली॥ कामबुद्धि ॥ २०७ ॥ रुक्मांगद नृपवरा ॥ मोहोनी घाली मंदिरा ॥ ते मारविती जाहली कुमरा ॥ धर्मांगदा ॥ २०८ ॥ तैसी रंभा वना प्रग-

टली ॥ इंद्ररायें पाठविली ॥ काय करील हे माउली ॥ तें सुचेना ॥ २०९ ॥ इयेचेनें काय होईल ॥ शुकाचें तप अढळ ॥ कां कष्टविली अंबा केवळ ॥ वेदव्यासें ॥ २१० ॥ शुक ह्मणे विचारू ईयेसी ॥ ह्मणे तूं आससी कवणे देशीं ॥ कीं देवकन्या ह्मणविसी ॥ कीं मानवीन ॥ २११ ॥ कीं या वनीं वनदेवता ॥ कीं योगिनी तूं तत्वता ॥ तूं सिद्ध ओहेस माता ॥ खेचरीये ॥२१२॥ तुझें नाम काय ॥ कवण बापमाय ॥ कवण ठायीं आहे ॥ आश्रम तुझा ॥ २१३ ॥ येथें यावया काय कारण ॥ काय अपेक्षित तुझें मन ॥ हें सकळ वर्तमान ॥ सांगे मज ॥ २१४ ॥ मग बोलली ती खेचरी ॥ मी देवकन्या निर्धारी ॥ असे या वनाभीतरीं ॥ क्रीडा करीत ॥ २१५ ॥ आजि देखिली शुकाची मूर्ति ॥ मज आली करुणा चित्तीं ॥ तूं धाकुटा योग स्थिति ॥ कां कष्टसी ॥ २१६ ॥ तूं नेणसी तप प्रमाण ॥ कां वायांच कष्टविसी प्राण ॥ आंगीं असे तारुण्यपण ॥ सुंदर तूं ॥ २१७ ॥ तुझी मंद असे दशा ॥ दिससी लावण्य राजस ॥ मदना परिस सुरस ॥ सुकुमारा ॥ २१८ ॥ तप तुंवा आदरिलें ॥ तुज कवणें उपदेशिलें ॥ तुझें कार्य नासिलें ॥ सुखभोगाचें ॥ २१९ ॥ तप सांडी अमंगळ ॥ दोघें असों कुशळ ॥ बरवीं वस्त्रें सर्वकाळ ॥ शेजेवरी पांघरवीन ॥ २२० ॥ मस्तक तुझें विघरलें ॥ विभूतीनें आंग मळलें ॥ मी पुसीन करतळें ॥ सुकुमार वस्त्रें ॥ २२१ ॥ बरवे चंदन शीतळ ॥ सांत नाना परीमळ ॥ पुष्पांची शेज कुशळ ॥ निद्रेलागीं करीन ॥२२२॥ चापा आणि शेवंती ॥ दवणा मरवा पुष्प जाती ॥ तितुक्या अर्पिन तुजप्रति ॥ सुगंदा कारणें ॥२२३॥ याउपरि दह्याची वाटी ॥ अमृता ऐसी निकटी ॥ षड्रस पक्वान्नें गोमटीं ॥ वाढीन तुज ॥ २२४ ॥ कळीया जैशा मोगरीच्या ॥ तैसा भात उष्ण जिरेसाळीचा ॥ त्यावरी ओगर डाळीचा ॥ साजुक तूप वाढीन ॥ २२५ ॥ नाना परीचीं लोणचीं ॥ लिंबें आंवळे मिरची ॥ आणि कढी ताकाची ॥ जेवी रुचिकरें ॥ २२६ ॥ पुरीया फेणीया तेलवडे ॥ खाजीं गुरोळ्या मांडे ॥ देईन रुचिकर सांडगे ॥ मेथकुटें रायतीं ॥ २२७ ॥ उत्तम खांडवी साजिरी ॥ मृदुपणें अंतर बाहेरी ॥ घालोनी दूध साखरी ॥ अटवीन अमृता परीच ॥ २२८ ॥ सरवळे बोटवे कानवले ॥ थिजलें घृतीं तळिले ॥ माझे हातीं मिळविलें ॥ तुजकारणें सकुमारा ॥ २२९ ॥ आंब्याचे रस पिंवळे ॥ परमामृताचे घेतले ॥ मधु मिश्रित वाढिले ॥ इच्छा पूर्ण होईल ॥ २३० ॥ ऐसी आरोगणा पाविजे ॥ मग स्वस्थानीं बैसिजे ॥ कर्पूरसहित विडा घेइजे ॥ मनोहर ॥ २३१ ॥ नाना

परीची वळवटी ॥ मुखीं वोंटीं पडेल मिटी ॥ नाना पत्रशाखा सुभटी ॥ ताटाकाठीं वाढीन ॥ २३२ ॥ आलें सुरण बेलें ॥ भोंकर आणि मायमुळें ॥ दृष्टि देखिल्या जिव्हाळें ॥ अरोगणीं समयीं ॥ २३३ ॥ काकडें आणि करंदें ॥ वर भोंकरें आनंदें ॥ जेवितां वाढीन विनोदें ॥ योगीया तुज ॥ २३४ ॥ आंबे निंबुवांचीं लोणचीं ॥ राईतीं नाना परीचीं ॥ तुमचे जिव्हे रुची ॥ ग्रासोग्रासीं ॥ २३५ ॥ पापड आणि मिरंगुडे ॥ जेवितां रुचि वाढे ॥ आणिक कोल्हाळवडे ॥ ऐसी जेवण परी ॥ २३६ ॥ ऐसीं अरोगण कीजे ॥ कर्पूरविडा लवंगीं भक्षिजे ॥ कर्पुरासहित विडा घेईजे ॥ मनोहर ॥ २३७ ॥ माजघरां डोल्हारा बांधिला ॥ वरी चांदवा लाविला ॥ वर क्षीरोदक आथुरिला ॥ जरितारी ॥ २३८ ॥ तेथें सुखें निद्रा करी ॥ सेवा करिती चतुर्विध नारी ॥ मजहुनी सुंदरी ॥ लावण्यव्रतिका ॥ २३९ ॥ अंगनांसवें वसंता आतु॥ खेळ खेळे समस्तु॥ सकळ नारी सवें हेतु ॥ पूर्ण करी स्वानंदें ॥ २४० ॥ परिमळा नाहीं मिती ॥ आह्मां घरीं सर्व संपत्ती ॥ ऐसें सुख योगियाप्रती॥ नाहीं त्रिजगतीं जाणिजे ॥ २४१ ॥ आतां सांडी मनीची भ्रांती ॥ तप करोनी काय प्राप्ती ॥ संसार भोगी संपत्ती ॥ यासारिखें सुख नाहीं॥ २४२ ॥ कोण तपाचा सौरसु ॥ कवणें तुज दिधला उपदेशु ॥ जे लाविती राखेसू ॥ ते भूत पिशाच जाणावे ॥ २४३ ॥ कवण तुज भेटला गुरु ॥ त्याचे वचनीं हरविसी संसारु ॥ तो माझे चित्तीं आहे शत्रु ॥ बहुत जन्मींचा ॥ २४४ ॥ तूं नेणसी बुद्धी ॥ तुझी भांबावली शुद्धी ॥ ठाकीत आली अवधी ॥ दैवगतीची ॥ २४५ ॥ तुज ज्ञान नाहीं धडपुढें ॥ कां हिंडतोसी वनझाडें ॥ तुझें मी फेडीन सर्व सांकडें ॥ क्षणामाजीं ॥ २४६ ॥ नेणसी तुज पडिली भूलिभ्रम ॥ आतां सांडी वनाश्रम ॥ बरा करी घराश्रम ॥ भोगी निजसुखवृत्ती ॥ २४७ ॥ ऐसें तप कोण करी ॥ जो सदाचा भिकारी ॥ मायबाप नाहीं संसारीं ॥ तो आदरीत ये भिक्षा ॥ २४८ ॥ ऐसा जो एकटा एकला ॥ शीत उष्ण पर्जन्यांत बैसला ॥ तयांचिया बोला ॥ लागूं नको ॥ २४९ ॥ माझें वचन ऐक आतां ॥ मी सांगतें हिता ॥ मज रंभेतुल्य वनिता ॥ आनायासें जोडते ॥ २५० ॥ मग बोलता झाला शुकदेव ॥ श्रोतीं देउनी चित्त ऐका प्रभाव ॥ रंभेचा फिटे अहंभाव ॥ ऐसें बोले व्याससुत ॥२५१॥ मग वदला शुकदेव॥ भला सांगसी प्रभाव ॥ शाहाणी चतुर तूं हो ॥ रंभिका ॥ २५२ ॥ तुजवरी कासया कोपावें॥ आमचें दैव असेंचि बरवें ॥ जेवीं तव स्वामी भावे ॥

तें तूं बोलसी ॥ २५३ ॥ बहुत चतुर तूं होसी ॥ स्वामीकार्या झळकसी ॥ ऐसें पुनरपि कोणासी ॥ बोलूं नको ॥ २५४ ॥ येरी ह्मणे जी योगिया ॥ तुह्मी कोपलेती कवणें कार्या ॥ तें उत्तर स्वामीया ॥ जाणवीजे ॥ २५५ ॥ शुकदेवें कर जोडिले ॥ नमन करूनि बोलिले ॥ रंभे ऐक ह्मणितलें ॥ योगिरायें ॥ २५६ ॥ तूं बोलसी सुंदरी ॥ तें मज बाणांपरी ॥ खोचतसे उरीं ॥ मनीं माझे ॥ २५७ ॥ आतां परियेसी विनवणी ॥ तूं ओटोप आपली वाणी ॥ ऐसी भ्रष्ट बोलणीं ॥ मी कर्णीं नायके ॥ २५८ ॥ त्वां संसारु वाणिला ॥ तो म्यां बहुत जन्मीं भोगिला ॥ आतां क्षणीं वीट आला ॥ मज तयाचा ॥ २५९ ॥ हे शरीरीं दुःख पाहे ॥ सुटण्यास नाहीं अन्य उपाय ॥ मग मी धरिले पाय ॥ श्रीकृष्ण देवाचे ॥ २६० ॥ आतां असो सर्व स्नेहो ॥ हरिस्मरणीं भाव राहो ॥ ऐसा मनींचा हावो ॥ धरिला म्यां ॥ २६१ ॥ आतां न सोडी हा मार्ग ॥ धरिला साधूचा संग ॥ न करी मी निश्चयभंग ॥ जाण रंभे ॥ २६२ ॥ मज नाहीं वस्त्राची चाड ॥ नग्न राहावें हेंचि गोड ॥ धनादि सुखाचें कोड ॥ मनीं आथीचना ॥ २६३ ॥ मी जन्मलों ते वेळां ॥ देवें कौपीन दिधला ॥ वस्त्राचा पांग फिटला ॥ जाण रंभे ॥ २६४ ॥ पाटाउ आणि सावळें ॥ तेणें मन माझें कंटाळलें ॥ स्वयंभ दिधलें गोपाळें ॥ जें न मिळे कदापि ॥ २६५ ॥ राम सकळ परिमळाचें भांडार ॥ विभूतीहुनी नाहीं थोर ॥ अंगीं चर्चितां सुकुमार ॥ दुर्गंधी नासे ॥ २६६ ॥ विभूति अंगीं चर्चिती ॥ तयासी जन मानिती ॥ शीवरूप त्या भाविती ॥ पूजा करिती मनोभावें ॥ २६७ ॥ विभूतीनें देव जाहले ॥ विभूति नाम विष्णु बोले ॥ विभूत लावितां पिसें गेलें ॥ विभूत भैरव ॥ २६८ ॥ तूं आणितेसी पुष्पजाती ॥ त्या सर्वेची कोमती ॥ बरवें चर्म पशुपती ॥ पांघुरला आवडी ॥ २६९ ॥ अति सुरंग रातोत्पळें ॥ हरिचरणींचीं चरणकमळें ॥ तेंचि अति प्रेमळें ॥ जाण रंभे ॥ २७० ॥ ह्मणसी षड्रस भोजन ॥ तरी हरिचरणीं अमृतपान ॥ करोनी तृप्त जालें मन ॥ अमरत्व पावलें ॥ २७१ ॥ तेणें सर्व सुख लाधलें ॥ तृप्त होऊन राहिलें ॥ तें तुज अंतरलें ॥ बुद्धिमंदे ॥ २७२ ॥ आणिक लक्षी नारायण ॥ अपरमित त्याचें सदन ॥ रत्नकीलेचे मंचक पूर्ण ॥ तेथें शयन शुक योगी ॥ २७३ ॥ मुखीं रंगला श्रीरंग ॥ तो केवळ कर्पूर विडा सुरंग ॥ पिकदाणी धरिती मुख रंग ॥ तुज ऐशा वामांगीं ॥ २७४ ॥ इतुकें शुक वदला ॥ मग उगाची राहिला ॥ बोलाचा शब्द

सरला ॥ वदतसे रंभा यावरी ॥ २७५ ॥ मग ते ह्मणे रे बुद्धिहीना ॥ महा मूर्खा पुरुषत्वहीना ॥ स्त्रीसुख सोडोनी वनामरणा ॥ इच्छिलें त्वां ॥ २७६ ॥ मिथ्या तूं जन्मलासी ॥ वायां येथें कष्टसी ॥ तारुण्य व्यर्थ दवडिसी ॥ स्त्रीभोगाविणें ॥ २७७ ॥ भोगिजे द्वादश वरुषांची नारी॥ षोडश वर्षांची सुंदरी॥ गौर वर्णाचे परिकरी॥ सुगंध युवती ॥ २७८॥ एकाहुनी एक साजिऱ्या ॥ चंद्रवदनी गोजिऱ्या॥ माझियाहुनी सकुमाऱ्या ॥ मृगनयनी ॥ २७९ ॥ बोलो जाणती बरवें ॥ सेवा करिती मनोभावें ॥ जयांचा माज दृष्टि भावे ॥ पद्मिणि ऐशा ॥ २८० ॥ शुकें इतकें ऐकिलें ॥ मग प्रतिउत्तर बोलिलें ॥ तें ऐका तुह्मी वहिलें ॥ योगी जन ॥२८१॥ शुक ह्मणे सत्य सत्य ॥ आह्मी एक पत्नी वृतस्थ ॥ रंभे दुजें बोलसी व्यर्थ ॥ सत्रावी भोगितो सुंदरी ॥ २८२ ॥ नारी सत्रावी भोगिजे ॥ हें सुख गुरु-वचनीं लाहिजे ॥ तियेसंगें पाविजे ॥ मोक्ष सायुज्यता ॥ २८३ ॥ तिचे प्रसंगीं घर ॥ चुकूनी संसार येरझार॥ ते नारी सुंदर मनोहर ॥ पुरोन उरली ॥ २८४ ॥ येरी तुह्मी नाशिवंत शरिरीं ॥ दुर्गधी मळमूत्र अघोरी ॥ शरिरीं काम लक्ष सावरी॥ ते सुंदरी नावडे॥२८५॥ तव रंभा ह्मणे अवधारी॥ तुज कष्ट सदा संसारीं ॥ सुख नेणसी तिळभरी ॥ योगीया तूं ॥ २८६ ॥ कष्ट भोगी अष्टमा सिद्धी ॥ आमच्या घरीं नवनिधी ॥ हे कां नावडे तुज बुद्धी ॥ ओढवली असे ॥ २८७ ॥ सुख राज्य संपत्ति ॥ चारी पदार्थ असती ॥ धर्म-काम कर्म राज्य प्राप्ती ॥ यज्ञ भोगदान ॥ २८८ ॥ गाई ब्राह्मणांचें पाळण ॥ लोकांचें सांभाळण ॥ ये जा ह्मणती देशुगुण ॥ ऐसें न सांडी मी सांगतें ॥ २८९ ॥ उपकार करिसी लोकां ॥ ओळखी पडेल मंडळिकां ॥ राजा सारिखे सुखा ॥ नसे जाणा ॥ २९०॥ सकळ धर्म जोडिसी ॥ राया इंद्राते मानसी॥ सर्व सुखभोग लाभ तुजसी ॥ मी नाचेन गायनीं ॥२९१॥ मग शुक ह्मणे चतुरी॥ तूं बोलसी वैखरी ॥ नावडे मज अंतरीं ॥ राज्यांतीं सुख नाहीं ॥ २९२ ॥ राज्यपद करितां ॥ पाप होतसे निभ्रांता ॥ महा दोष पावता ॥ वेळू नलगे ॥ २९३ ॥ राज्य करूनि नरक प्राप्ती ॥ ऐसा कोण करूनी तरला क्षिती॥ सुकृतांच्या राशी नासती ॥ राज्य करूनी जाण पा ॥ २९४ ॥ राज्य करितां सरे धर्म ॥ राज्य करी घडे अधर्म ॥ राज्य करोनी पाविजे श्रम ॥ निभ्रांत जाणा ॥ २९५ ॥ अगे सुकृत जोडावें नानापरी ॥ तें हारवी राज्यांतरीं ॥ तें तूं नेणसी गे सुंदरी ॥ बुद्धिहीने ॥ २९६ ॥ ह्मणोनि धर्मासी जतन करावें ॥ सर्वसुख पदार्थ त्यजावे ॥ हरिचरण

सेवावे ॥ जन्मोजन्मीं ॥ २९७ ॥ जाण हरिश्चंद्ररायें आपण ॥ राज्य दिधलें ब्राह्मणां ॥ मुक्तपद निर्वाण ॥ धरिलें निरंतरीं ॥ २९८ ॥ पाहे पा राज्याभींतरीं ॥ राज्य पृथ्वीचें करी ॥ तें तुजवाचोनि सुंदरी ॥ नेणें कांहीं ॥ २९९ ॥ राज्यें नव्हे चिरंजीवित्व जाणा ॥ ऐसें आलें माझिया मना ॥ यास्तव सांडुनी या वना ॥ निघतां झालों ॥ ३०० ॥ औट पाद भूमिका ॥ दिधली ब्राह्मणा एका ॥ सत्वा नढळे देखा ॥ ह्मणोनि पृष्टी ओढली ॥ ३०१ ॥ राज्यपद नको गे सुंदरी ॥ तूं नेणसी आमुची थोरी ॥ आह्मी जाण ब्रह्मचारी ॥ सुखी असों ॥ ३०२ ॥ तेंच राज्य अढळ असे ॥ तव रंभा ऐकोनि हांसे ॥ ह्मणे लागलें पिसें ॥ वायावीण ॥ ३०३ ॥ बरवें ठिक लेणें ॥ नाना अलंकार भूषणें ॥ यावरी शुकदेव ह्मणे ॥ हे वातू नको रंभे ॥ ३०४ ॥ तूं नेणसी माझे अलंकार ॥ किती लेणें अपार ॥ शंख चक्र याहुनि थोर ॥ काय असे ॥ ३०५ ॥ शृंगारिजे येणें शरिर ॥ शंख चक्र आम्हांसी पवित्र ॥ काय करसील लेणीं फार ॥ तीं आह्मां पाषाण ॥ ३०६ ॥ शृंगार मुद्रा जाण धन ॥ शरीरीं भार होय जेणें ॥ आह्मां त्यांसी काय कारण ॥ सांग तूं अंगने ॥ ३०७ ॥ संपत्ति जोडावी ह्मणसी ॥ तरी करीन तपाच्या रासी ॥ ह्मणऊनिया सर्वांसी ॥ मज चाड नाहीं ॥ ३०८ ॥ तप धन कधींच न सरे ॥ सवेंच करितां उदंड उरे ॥ आह्मां हेंच धन पुरे ॥ लक्ष कोटी ॥ ३०९ ॥ एक मूर्ख असती ॥ अनंत द्रव्य मिळविती ॥ मग नेऊनिया पुरिती ॥ भूमिमाजीं ॥ ३१० ॥ माझें माझें ह्मणती मनीं ॥ तेच करिती घोकणी ॥ तेणें कारणें फजीत होउनी ॥ जोडिलें धन ॥ ३११ ॥ पितापुत्र भांडणें ॥ स्त्रिये बाळकासी बोलणें ॥ तें जाय क्षणामाजीं जाण ॥ हानि होतां ॥ ३१२ ॥ या धनासाठीं कैसें करिती ॥ इष्ट मित्रासी दुःख देती ॥ विश्वास न मानिती ॥ प्राणिमात्रांचा ॥ ३१३ ॥ अग्नीपासोनि वांचे जरी ठेवा ॥ तरी राज उपद्रव घडे देवा ॥ नाहींतरी चोरांपासूनि हानि व्हावा ॥ ऐसें होय ॥ ३१४ ॥ ऐसें भलत्यापरि जतन करितां ॥ परि जाईगा निभ्रांता ॥ दुःख होई त्वरितां ॥ पाहे गे तूं सुंदरी ॥ ३१५ ॥ मग मनीं धरिती संताप ॥ ह्मणती द्रव्य गेलें आपोआप ॥ बहु जोडिलें पाप ॥ तें मेळवितां ॥ ३१६ ॥ मागें धर्म जरी करितों ॥ अथवा आपंगासी देतों ॥ अथवा अपत्यवर्गासी वेंचितों ॥ तरीं बरें होतें ॥ ३१७ ॥ ऐसी करितां चिंतनी ॥ रात्रंदिवस घोकणी ॥ ह्मणोनी तपाची सांठवणी ॥ कदांचि न

सरे ॥ ३१८ ॥ आतां तूं जाय गा येथुनी ॥ आह्मी ब्राह्मण निष्ठुर ज्ञानी ॥ मग बोलिली परतोनी ॥ रंभा खासी ॥ ३१९ ॥ अगा तूं शाहणा होसी ॥ पाहेवा माझिया रूपासी ॥ आलिये तुजपासी ॥ योगिराया ॥ ३२० ॥ केलें बहुत सायास ॥ आतां पाहे माझी वास ॥ पुरवावी माझी आस ॥ तुंवा शुकदेवा ॥ ३२१ ॥ तूं आहेसी शाहणा चतुर ॥ पाहे माझें स्वरूप शृंगार ॥ आतां होई कृपासागर ॥ ऋषिनंदना ॥ ३२२ ॥ तुंवा देख देखसी ॥ देखण्या बहुत पाहसी ॥ तरी मज ऐसी सरिसी ॥ निधान न सांपडेल ॥ ३२३ ॥ बरवें माझें लावण्य ॥ देवीं पाठविलें सगुण ॥ तुज जोडलें निधान ॥ आपोआप ये ठायीं ॥ ३२४ ॥ अगा तुझे तपा आलें फळ ॥ आतां तुज घालीन मी माळ ॥ पाहे पाहा भरुनी डोळे ॥ लावण्य रूप माझें ॥ ३२५ ॥ रूप स्वरूप सुंदरी ॥ शहाणी आहे सकुमारी ॥ मजहूनि सेजे ऐसी नारी ॥ आणिक नाही ॥ ३२६ ॥ काय वानू आपआपणा ॥ तूं तरी चतुरांचा राणा ॥ ऋतुसमयींच्या खुणा ॥ जाणसी तूं ॥ ३२७ ॥ अथवा नेणसी तरी सांगेन ॥ मज असे कोक शास्त्राचें ज्ञान ॥ अनुसरलिया मन ॥ तुज ज्ञान होईल ॥ ३२८ ॥ सोडोनियां लाज ॥ करितां ध्यान सहज ॥ तप हें काय भोज ॥ जोडलें तुज ॥ ३२९ ॥ जया राग नाहीं मनीं ॥ तया बोलती महाज्ञानी ॥ जेणें काम क्रोध ह्मणीं ॥ जिंकिला असे ॥ ३३० ॥ मदन तोंडघसीं रिघाला ॥ काळ मरणें जितला ॥ तो वेळू न लागतां पातला ॥ स्वर्ग भुवनासी ॥ ३३१ ॥ देव पाहों लागले गगनीं ॥ अमर दाटले विमानीं ॥ बोलों आरंभिलें मग वचनीं ॥ योगिरायें ॥ ३३२ ॥ तूं भली वो शहाणी ॥ ह्मणत होतीसी योगिनी ॥ न डचकसी अझुनी ॥ मना माजीं ॥ ३३३ ॥ किती वाणिसी आपआपणा ॥ बोलसी ऋतुसमईच्या खुणा ॥ ऐसें अपूर्व दारुणा ॥ देखिलें असे ॥ ३३४ ॥ नवद्वारीं निरंतर ॥ सदा दुर्गंधी अपार ॥ वोखटें हे कलेवर ॥ वानूं नको रंभे ॥ ३३५ ॥ बाहेर बरवें शृंगारिजे ॥ आणि वस्त्रें अलंकार लेइजे ॥ दृष्टीं पाहतां देखिजे ॥ नर्क कोटि ॥ ३३६ ॥ शरीर मुळमूत्राचा मेळा ॥ अस्तिचर्माचा गुंडाळा ॥ मग तयासी नांवाथिला ॥ पिंड ऐसा ॥ ३३७ ॥ कृमि कीटकांचें घर ॥ सकळ दुर्गंधी अपार ॥ ऐसें हें असे शरीर ॥ नाशिवंत ॥ ३३८ ॥ घडीभरी न करितां क्षाळण ॥ तरी दुर्गंधीचा कल्होळ जाण ॥ ह्मणोनि केलें परिमळ स्नान ॥ शुद्धते लागी ॥ ३३९ ॥ ह्मणी तूं मुख वाखाणिसी ॥ तंव तें वाहात असे श्लेश्मासीं ॥ ऐसें विचारितां मानसीं ॥ पाहेपा रंभे ॥ ३४० ॥ शुकदेव ह्मणे वो सुंदरी ॥ अमृत कैसें

तव अधरीं ॥ विषय लहरीचे महापुरीं ॥ बुडालीसे कामिनी ॥ ३४१ ॥ डोळे ह्मणसी अतिरसाळ ॥ हें तों पापाचें आहे मूळ ॥ ह्मणउनीया काजळ लेईलें असे ॥ ३४२ ॥ तयाचें काळेपण न विटे ॥ कुंकुम नाहीं हो कधीं फिटे ॥ अंकितकरोनी विटे ॥ वानूं नको तूं रंभे ॥ ३४३ ॥ योगी संन्यासी निंदिजे ॥ तें बरवें नाहीं जाणिजे ॥ ह्मणून तुझें मुख लाजें ॥ काळें झालें ॥ ३४४ ॥ तपाचें बरवेंपण ॥ आह्मां नाहीं कारण ॥ ह्मणोनी कामबाण ॥ वानूं नको रंभे ॥ ३४५ ॥ मग या वचनावरी ॥ रंभा स्वदेह विदारी ॥ नखें घालुनी उदरीं ॥ चिरिती झाली ॥ ३४६ ॥ तेव्हां शुक ह्मणे तिजप्रती ॥ तूं शीण व्यर्थ करिसी ॥ कारण नाहीं मजसी ॥ तुझ्या उदराचें ॥ ३४७ ॥ पाहे पाहा ऋषिराया ॥ कैसी माझी निर्मळ काया ॥ अव्हेर केलासी वायां ॥ न विचारितां ॥ ३४८ ॥ पाहे पा उदराभीतरीं ॥ परिमळ नानापरी ॥ जवादि अंबर कस्तुरी ॥ आणि अगर चंदन ॥ ३४९ ॥ ऐसी गा मी रंभा पवित्र ॥ सुगंधाचें भांडार ॥ देवऋषि मुनेश्वर ॥ करिती आस माझी ॥ ३५० ॥ ऐसें मी जाणतों गे सुंदरी ॥ तरी येतों तुझिया उदरीं ॥ माता शिणविली येरझारीं ॥ नरदेहीं ॥ ३५१ ॥ तुझिया कुशीं जन्मतों ॥ कडेसी वो खेळतों ॥ सुखें स्तनपान करितों ॥ आनंदें करोनियां ॥ ३५२ ॥ तुज ऐसी माता ॥ केवि होय पतिव्रता ॥ पूर्व सुकृतावाचोनी सर्वथा ॥ प्राप्त नव्हे ॥ ३५३ ॥ तूं माझी वो जननी ॥ कष्टविली दुष्ट वचनीं ॥ हें वचन ऐकोनी तेचक्षणीं ॥ उठली रंभा ॥ ३५४ ॥ मग निघाली तेथुनी ॥ पावली इंद्रभुवनीं ॥ राया इंद्रासी भेटोनी ॥ बोलती जाहली ॥ ३५५ ॥ ह्मणे जी इंद्रराया ॥ गेली या ऋषीच्या ठाया ॥ बहुत प्रकारें तया ॥ बोलिलें म्यां ॥ ३५६ ॥ तपें शब्दें प्रसवे कामधेनु ॥ तृण चरे पंचाननु ॥ पश्चिमेस उगवे भानु ॥ जाण राया ॥ ३५७ ॥ ऐसें जाणगा नृपती ॥ कवणे समयीं होती ॥ परि शुकदेवाचीये चित्तीं ॥ अविनाश ॥ ३५८ ॥ ऋषि मुनि संन्यासी ॥ मज देखोनी ढळती तपासी ॥ तैसी परी शुकदेवासी ॥ नव्हे जाण ॥ ३५९ ॥ तैसा तो नव्हे जी योगिराजा ॥ मनीं भाव न धरी दुजा ॥ म्यां गेलिया ज्या काजा ॥ तें सिद्धि न पावलें ॥ ३६० ॥ शुकदेव नमस्कार करुनी ॥ अदृश्य झाला तेथुनी ॥ देव अंतरीं विमानीं ॥ पहात ठेले ॥ ३६१ ॥ सुरवर करिती पुष्प वर्षाव ॥ तपा नढळे शुकदेव ॥ देवगणांचा संदेह ॥ फिटला तेणें ॥ ३६२ ॥ तप सुरवरांसी मानलें ॥ शुकदेव अलक्ष्य जाहले ॥ तेजीं तेज

निमालें ॥ निवडेचिना ॥ ३६३ ॥ उतरला पैलपार ॥ संसारींचा भवसागर ॥ दुस्तर आणि दुर्धर ॥ लोकां तरावया ॥ ३६४ ॥ दोहों वातीचा दीपकू ॥ प्रजळला एकरूपू ॥ हरीहर स्वरूपू ॥ एक झाले ॥ ३६५ ॥ ऐसें शुकदेव चरित्र ॥ ऐकतांची पुण्य पवित्र ॥ वर्णितां जाणा विचित्र ॥ तिहीं लोकीं ॥ ३६६ ॥ जे पढती नित्य नेमीं ॥ ते होती मुक्तज्ञानी ॥ तें फळ पावता निर्वाणीं ॥ झाला शुकदेव ॥ ३६७ ॥ श्रोते जे ऐकती ॥ तया होय फळ प्राप्ती ॥ हरिहर चरित्र क्षितीं ॥ पुण्य पावन ॥ ३६८ ॥ विनवी विष्णुदास नामा ॥ शुकदेवें केली सिमा ॥ चौऱ्यांशी लक्ष योनीचे जन्मा ॥ सार्थक केलें ॥ ३६९ ॥ ऐसें शुकदेव चरित्र ॥ अगाध आणि विचित्र ॥ विष्णुदास नामा विनवित ॥ भक्तांप्रति ॥ ३७० ॥ मन्मथ संवत्सर पौष्य मासीं ॥ सोमवार अमावासेच्या दिवसीं ॥ पूर्णता आली ग्रंथासी ॥ श्रोत्रे सावकाशीं परिसीजे ॥ ३७१ ॥

---

## भीष्म प्रतिज्ञा.

॥ १८३९ ॥ मारिले ते वीर माव करी हरी ॥ मृषा ते वैखरी केली जगीं ॥ १ ॥ पण केला होता न धरी शस्त्रासी ॥ भीष्म तो तयासी स्मरणवंत ॥ २ ॥ महामारी धरी अर्जुन विरासी ॥ नये सावरासी कांहीं केल्या ॥ ३ ॥ अश्व ते मारिले रथ ते सारिले ॥ घाय वरी केले वीर पार्था ॥ ४ ॥ पार्थाचें शरीर पुष्प पळसाचा ॥ ऐसा वर्ण त्याचा जाणोनीयां ॥ ५ ॥ सावध तो नाहीं वीर रणांगणीं ॥ विचारिलें मनीं जगन्नाथें ॥ ६ ॥ नाहीं पळ एक सावध हा वीर ॥ बाणांचे ते भार भीष्म टाकी ॥ ७ ॥ देखोनी निदान प्रतोद ठेवून ॥ प्रथित हो रणचक्र होतें ॥ ८ ॥ घेऊनिया करीं उठे लागवेगें ॥ धांवतां निजांगें देखीयेलें ॥ ९ ॥ कासे पितांबर सुटला तो करें ॥ सांवरून वरें धांवतसें ॥ १० ॥ भीष्म ह्मणे देवा माझी सत्य केली ॥ प्रतिज्ञा हरली आपुली हो ॥ ११ ॥ जरी तुझे चित्तीं असे तें मारणें ॥ कवण तो रक्षण करील माझें ॥ १२ ॥ येउनी लवकरी बैसे रथावरी ॥ खड्ग तुझ्या करीं देत आहे ॥ १३ ॥ ऐकतां हा बोल झाला लज्जामान ॥ दिलें तें टाकून चक्र हातें ॥ १४ ॥ जयजयकार झाला

रणीं तो भीष्माचा ॥ पण केला साचा देवराया ॥ १५ ॥ नामा ह्मणे ऐसी भक्ताची हो चाड ॥ आपण लबाड झाले देव ॥ १६ ॥

॥ १८४० ॥ करितां तें युद्ध नव दिवस झालें ॥ संकट पडलें पांडवांसी ॥ १ ॥ एक वेळ ऐसी केली मात भारी ॥ नेम दिवस सारी एक बाकी ॥ २ ॥ संग्रामीं पांडव करितां विचार ॥ चिंतातूर फार देखोनिया ॥ ३ ॥ तेव्हां कृष्ण ह्मणे चला अवघे जन ॥ भीष्मा लागोन विचारासी ॥ ४ ॥ कृष्ण परमात्मा धर्मराजासहित ॥ भीष्म शिबिरांत जाते झाले ॥ ५ ॥ करूनि वंदन पितामहालागीं ॥ बोलती ते वेगीं कैसी परी ॥ ६ ॥ नेम दिवस दाहा त्या माजी ते नव ॥ झाले ते स्वभावें कांहीं नव्हे ॥ ७ ॥ जयाचीया कांक्षा धरूनि तें मनीं ॥ आलों समरांगणीं हेचि ठावे ॥ ८ ॥ तुजसी झुंजतां नये यश आह्मां ॥ तुझी ते महिमा अगाध हो ॥ ९ ॥ भार्गव राम बळी युद्धीं जिंकवेना ॥ तया तोषवेना युद्ध बळें ॥ १० ॥ ऐसी यासी कैसें मारावें तें रणीं ॥ न करितां हो येक्षणीं जय कैसा ॥ ११ ॥ याचि हो विचारें आलों तुझ्या घरां ॥ सांगे जय नरा प्राप्ति घडे ॥ १२ ॥ ऐकोनिया बोला मनीं आनंदला ॥ भीष्म महा भला काय बोले ॥ १३ ॥ जोंवरी जीवंत तोंवरी जयवंत ॥ आहे हें निश्चित कळों आलें ॥ १४ ॥ परंतु पुसतां विचार मजला ॥ तरी ऐका बोला सांगीजतो ॥ १५ ॥ तुमची हो दळीं शिखंडी नामक ॥ राजा नपुंसक पुरुष आहे ॥ १६ ॥ तया करा पुढें मागून अर्जुन ॥ बाणांचें संधान करावें कीं ॥ १७ ॥ माझी ते प्रतिज्ञा षंढावरी शस्त्र ॥ न धरी तें अस्त्र प्राण गेल्या ॥ १८ ॥ ऐसी युक्ति करा रणीं मज मारा ॥ यश येईल घरा आपेआप ॥ १९ ॥ ऐकोनी विचार आले निजस्थाना ॥ नामदेवी जाणा विचार केला ॥ २० ॥

---

## ज्ञानदेवाच्या भेटीसाठीं नामदेवाची आळ.

॥ १८४१ ॥ सद्गुरु सखया नाथा पंढरिराया ॥ ठेवीं डोई पायां कृपेसाठीं ॥ १ ॥ नाहीं गांठीं पुंजी तंव कृपेजोगी ॥ झालों हतभागी भक्तिवीण ॥ २ ॥ हतभाग्या कैची समर्थाची भेटी ॥ घालीं घट्ट मिठी संतांपाई ॥ ३ ॥ भक्तशिरोमणी ज्ञानदेव नामा ॥ चरित्र महिमा गाऊं सांचा ॥ ४ ॥ इच्छि परि मन ज्ञानशक्तीक्षीण ॥ धरितों चरण नाथजींचे ॥ ५ ॥

॥ १८४२ ॥ अलंकापुरीस पांडुरंग गेले ॥ समाधिस्थ केलें ज्ञानदेवा ॥ १ ॥ उरकोनी सोहळा संगें संतमेळा ॥ विठोबा राहिला अळंदीस ॥ २ ॥ पाहे चक्रपाणी नाम्या डोळ्या पाणी ॥ कंठ तो दाटुनी उगा आहे ॥ ३ ॥ पुसे रुक्मिणिकांत कांरे तूं निवांत ॥ नाम्या शोकाक्रांत कोण्या दुःखें ॥ ४ ॥

॥ १८४३ ॥ नामा ह्मणे देवा ज्ञानदेव सृष्टी ॥ पडेल कां दृष्टी पुन्हां आतां ॥ १ ॥ ज्ञानाचा वियोग जडला हृद्रोग ॥ भेटीचा प्रयोग करा देवा ॥ २ ॥ ज्ञानदेव माझा दाखवा या वेळीं ॥ जीव तळमळी त्याच्याविण ॥ ३ ॥ संत अंतरला सखा झाला दूर ॥ आतां पंढरपूर कैसें कंठूं ॥ ४ ॥ तुमचें दर्शन ज्ञान कृपादान ॥ पंढरीस येणें ह्याच साठीं ॥ ५ ॥

॥ १८४४ ॥ तरीच येईन पंढरीस ॥ दृष्टी देखेन ज्ञानेश ॥ १ ॥ ज्ञान-देवा भेटी व्हावी ॥ ऐशी सोय देवा लावी ॥ २ ॥ ऐशियाच्या कृपा-दानें ॥ तुह्मां संगती नाचणें ॥ ३ ॥ पंढरीचें जें कां सुख ॥ जाणे तो एक भावीक ॥ ४ ॥

॥ १८४५ ॥ ज्ञानदेव पहावा डोळा ॥ ऐसें वाटतें विठ्ठला ॥ १ ॥ जगजेठी जगत्पाळ ॥ माझी पुरवावी आळ ॥ २ ॥ तुह्मां काय अवघड ॥ लीळें झेला गिरिगड ॥ ३ ॥ कल्पतरु तळीं वास ॥ त्या घडे कां उपवास ॥ ४ ॥ माझ्या कृपाळु वा देवा ॥ हाकेसरसा घेशी धांवा ॥ ५ ॥

॥ १८४६ ॥ ज्ञानदेव माझें सौख्य सरोवर ॥ सांत जलचर स्वस्थ होतों ॥ १ ॥ दुर्दैव तापानें आटलें तें नीर ॥ वर्षा रघुवीर कृपामेघ ॥ २ ॥ ज्ञानदेवावीण व्याकूळ हे प्राण ॥ तूं जगज्जीवन देवा होसी ॥ ३ ॥ विठाबाई तूंग जाणसी ना जाण ॥ रक्षी मज कोण दुजें येथें ॥ ४ ॥

॥ १८४७ ॥ नामा हें वदतां डोळ्यां आलें पाणी ॥ पडिला धरणीं देवापुढें ॥ १ ॥ नामदेव स्थिति पाहून श्रीपति ॥ विस्मित ते चित्तीं स्तब्ध झाले ॥ २ ॥ कैशा रीतीं नाम्या संबोखूं मी आतां ॥ कठीण अवस्था देव ह्मणे ॥ ३ ॥ प्रेम उचंबळे ऐकतां ही आळ ॥ बुजावी गोपाळ नाम्यालागीं ॥ ४ ॥

॥ १८४८ ॥ देव ह्मणे नाम्या पाहे ॥ ज्ञानदेव मींच आहें ॥ १ ॥ तो आणि मी नाहीं दुजा ॥ ज्ञानदेव आत्मा माझा ॥ २ ॥ माझ्या ठायीं

ठेवी हेत ॥ सोड खंत खंडी द्वैत ॥ ३ ॥ नाम्या उमज मानसीं ॥ ऐसें ह्मणे हृषीकेशी ॥ ४ ॥

॥ १८४९ ॥ ज्ञानदेवा पुढें कथा ॥ करी वारील ह्या व्यथा ॥ १ ॥ आत्मरूपी ज्ञानेश्वर ॥ तोचि ज्ञानाचा सागर ॥ २ ॥ ज्ञानदेवीं धरी भाव ॥ स्वयें होय तूंचि देव ॥ ३ ॥ राम कृष्ण रे गोविंद ॥ जप ह्मणे तो मुकुंद ॥ ४ ॥

॥ १८५० ॥ प्रेमळ तूं भक्त माझ्या नामदेवा ॥ जीवीचा विसावा भक्त तूंची ॥ १ ॥ तुमचेनीं माझें देवपण सत्य ॥ चंद्रें पाझरत सोमकांत ॥ २ ॥ तुमचे भक्तीनें आणिलें रूपासी ॥ अवाच्य अविनाशी अरूप तें ॥ ३ ॥ पंढरीचा राणा सांगतो ह्या खुणा ॥ भक्तांच्या कारणा येणें मज ॥ ४ ॥

॥ १८५१ ॥ नग जों तें सोनें लेण्या जोगें होतें ॥ मुद्री कंकण तैं नामें त्यांचीं ॥ १ ॥ मुशीं माजी जेव्हां गेलें तें मुरोन ॥ झालेंसे सुवर्ण अभिन्न तें ॥ २ ॥ तैसा ज्ञानदेव भक्त तो मी देव ॥ लौकिक लाघव दासांसाठीं ॥ ३ ॥ ज्ञान समाधी हे नाशी रूप नांवा ॥ अंतिचा मिळवा मजमाजि ॥ ४ ॥

॥ १८५२ ॥ तेज स्पर्शें ज्योती कर्पुरीं निघाली ॥ दोन्ही तीं निमालीं एकदांची ॥ १ ॥ आघातानें नाद घंटेंतून उठे ॥ शेवटीं तो मिटे घंटेमाजी ॥ २ ॥ ब्रह्मि माया स्फुरे चैतन्यप्रकाशें ॥ शेवटीं तें वसे ब्रह्मरूपीं ॥ ३ ॥ पांडुरंग ह्मणे ऐक नाम्या ज्ञान ॥ वाटो समाधान तुझ्या जीवा ॥ ४ ॥

॥ १८५३ ॥ नामदेव ह्मणे देवा ॥ ब्रह्मज्ञान पोटीं ठेवा ॥ १ ॥ तुह्मी माये संगें गूढ ॥ ज्ञान जाणिवेचे आड ॥ २ ॥ आह्मां नाहीं याची चाड ॥ वाटे संत भेटी गोड ॥ ३ ॥ संत भेटी प्रेम फावे ॥ प्रेमें देवाशीं भेटावें ॥ ४ ॥ प्रेम आहे पोटभरी ॥ देव त्यासी पोटीं धरी ॥ ५ ॥ नामदेवा ठायीं प्रेम ॥ मार्गीं आडविलें ब्रह्म ॥ ६ ॥

॥ १८५४ ॥ देई भक्ति रस प्रेमा ॥ देवा घाली आह्मा जन्मा ॥ १ ॥ प्रेम येई हातां जरी ॥ जेथें नांदूं ती पंढरी ॥ २ ॥ ज्ञानदेवीं भेट व्हावी ॥ ज्ञान गोष्ट कां सांगावी ॥ ३ ॥ नामा न बुझवा जनीं ॥ कोण नाचेल किर्तनीं ॥ ४ ॥ पुरवा नामयाच्या आर्ता ॥ देवा सांगे जगन्माता ॥ ५ ॥

॥ १८५५ ॥ देव कळवळले चित्तीं ॥ त्यासी मायेची संमती ॥ १ ॥ माय बापांचा त्या लळा ॥ नामा घेईना कां आळा ॥ २ ॥ बाप जगताचा

स्वामी ॥ आई प्रत्यक्ष लक्षुमी ॥ ३ ॥ नामा थोराचें लेंकरूं ॥ छंद त्याचा अनिवारु ॥ ४ ॥ छंद नाम्याचा पुरविण्या ॥ देव वेची प्रेमनाण्या ॥ ५ ॥ हाटी उदमी भावीक ॥ विठुराजा त्या ग्राहीक ॥ ६ ॥

॥ १८५६ ॥ गरुडासी मग ह्मणे पांडुरंग ॥ साकल्य हें सांग पुंडलिका ॥ १ ॥ नामदेव कष्टी ज्ञानदेवासाठीं ॥ घेऊन या तो भेटी नामयाच्या ॥ २ ॥ संतप्रेम भेटी देव गुज गोष्टी ॥ जाणत्याच्या पोटीं सर्व वसे ॥ ३ ॥ करी पांडुरंग येई त्याच्या मना ॥ निमित्ताकारणा भक्त शोधी ॥ ४ ॥

॥ १८५७ ॥ ऐकतां निरोप पुंडलीक भक्त ॥ झाला सद्गदीत धन्य ह्मणे ॥ १ ॥ धन्य ती आळंदी धन्य विष्णुदास ॥ धन्य हा दिवस देव भेटे ॥ २ ॥ ज्ञानदेवा आलें वैकुंठीचें रूप ॥ पोचतां निरोप पुंडलिका ॥ ३ ॥ पुंडलिकें तेव्हां गरूड पूजियेला ॥ ज्ञान्या बैसविला विमानांत ॥ ४ ॥पुढें तो गरूड मागें ये विमान ॥ रुक्मिण दूरोन दावी देवा ॥ ५ ॥

॥ १८५८ ॥ आकाशीं पुष्पक शुभ्र दंड दिसे ॥ बैसोनि येतसे ज्ञानदेव ॥ १ ॥ शुद्ध भावें इच्छि ज्ञानदेवभेटी ॥ येई उठाउठीं भेटूं त्याशीं ॥ २ ॥ पहाती नवल भक्त ते प्रेमळ ॥ निश्चय निढळ आहे ज्यांचा ॥ ३ ॥ देव ह्मणे नाम्या घेई भेटीसुखा ॥ ज्ञानदेव सखा उभा येथें ॥ ४ ॥

॥ १८५९ ॥ ज्ञानदेव पहातां डोळां ॥ नामदेवा हर्ष झाला ॥ १ ॥ घट्ट धरियेले पाय ॥ तूं तो झाला सद्गुरुराय ॥ २ ॥ नको करूं रे अव्हेर ॥ मज धरूं नको दूर ॥ ३ ॥ सदां आठवत मना ॥ तुझ्या भक्तीच्या कल्पना ॥ ४ ॥

॥ १८६० ॥ नाथा नकोरे अंतरूं ॥ तुझ्या कांसेचें वांसरूं ॥ १ ॥ कळा दुभती तूं गाय ॥ तुझा वियोग असाह्य ॥ २ ॥ देह भोगितां प्राक्तन ॥ मना ठेवी तवाधीन ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं ही समाधि ॥ जडो मनोवृत्ति अवघी ॥ ४ ॥ नामा भेटे ज्ञानदेवा ॥ जना प्रसाद मिळावा ॥ ५ ॥

॥ १८६१ ॥ हरीचिया दासा नामया उदासा ॥ तुझी हृषिकेशा प्रीति बहु ॥ १ ॥ हरिदासांमाजीं होसी तूं आगळा ॥ प्रेमाचा पुतळा नामदेव ॥ २ ॥ ज्ञानदेव ह्मणे तूं विठोचा लडिवाळ ॥ नामया तूं कृपाळ आज्ञावरी ॥ ३ ॥

॥ १८६२ ॥ झालासी हरिभक्त तरी आह्मा काय ॥ आंतली ती सोय न ठाउकी ॥ १ ॥ घेउनी टाळ दिंडी हरिकथा करिसी ॥ हरिदास ह्मणविसी श्रेष्ठपणें ॥ २ ॥ गुरुविण तुज नव्हेचि गा मोक्ष ॥ होशील मुमुक्ष साधक तूं ॥ ३ ॥ आत्मतत्वीं दृष्टी नाहींच पा केली ॥ तंववरी ब्रह्मबोली बोलुनी काय ॥ ४ ॥ तुझें रूप तुवां नाहीं ओळखिलें ॥ अहंते तें धरिलें कासयासी ॥ ५ ॥ आमुचें तूं मूळ जरी पुसतोसी ॥ तुझें तूं अपैसी पाहुनी घेई ॥ ६ ॥ ऐकरे नामया होई आत्मनिष्ठ ॥ तरिच तूं श्रेष्ठ ज्ञानी ह्मणे ॥ ७ ॥

---

## ज्ञानेश्वराचे भेटीस नामदेव आले ते अभंग.

॥ १८६३ ॥ उठले निवृत्ति संतांच्या दर्शना ॥ पंढरीचा प्रेमा घरा आला ॥ १ ॥ केली प्रदक्षणा वंदिले चरण ॥ झाला अभिमान नामयासी ॥ २ ॥ देवाचे जवळी आह्मी निरंतर ॥ यासी अधिकार नमस्कारा ॥ ३ ॥ नित्य समागम हरिच्या चरणीं ॥ हे आणि आह्मी देवभक्त ॥ ४ ॥ नामा ह्मणे काय वंदूं याचे चरण ॥ अंगें परब्रह्म मजपाशीं ॥ ५ ॥

॥ १८६४ ॥ उठले ज्ञानेश्वर केलें तें वंदन ॥ मस्तकीं चरण नमस्कारिले ॥ १ ॥ नामा ह्मणे आह्मा वडिल अधिकारु ॥ यासाठीं नमस्कारु योग्य आहे ॥ २ ॥ आह्मी देवापाशीं असतों सर्वकाळ ॥ येउनी सकळ वंदिताती ॥ ३ ॥ वैष्णवांचे भार देव सुरगण ॥ येताती शरण पंढरीशी ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां पाहिली मंडळी ॥ यासाठीं वनमाळी स्फुंदूं लागे ॥ ५ ॥

॥ १८६५ ॥ आला तो सोपान वंदियेलें त्या पायीं ॥ पांडुरंगा ठायीं मानियेला ॥ १ ॥ रंजल्यागांजल्याचा घेतला समाचार ॥ संतमाय थोर अनाथाची ॥ २ ॥ आमचीं मायबापें भेटलींत आज ॥ समाधान सहज आलिंगितां ॥ ३ ॥ नामा ह्मणे मज कळलें याचें प्रेम ॥ देवें केले श्रम काय गुणें ॥ ४ ॥

॥ १८६६ ॥ अखंड जयाला देवाचा शेजार ॥ कांरे अहंकार नाहीं गेला ॥ १ ॥ मान अपमान वाढविसी हेवा ॥ दिवस असतां दिवा हातीं घेसी ॥ २ ॥ परब्रह्मासंगें नित्य तुझा खेळ ॥ आंधळ्या डोळे डोहळे कां बा

झाले ॥ ३ ॥ कल्पतरू तळवटीं इच्छिली ते गोष्टी ॥ अद्यापि नरोटी राहिली कां ॥ ४ ॥ घरीं कामधेनू ताक मागूं जाय ॥ ऐसा द्वाड आहे जगामाजीं ॥ ५ ॥ ह्मणे मुक्ताबाई जाईना दर्शना ॥ आधीं अभिमाना दूर करा ॥ ६ ॥

॥ १८६७ ॥ बोलोनिया येणें वाढविला डांगोरा ॥ अंतरींचा कोरा गुरुवीण ॥ १ ॥ संतांचा सन्मान कळेना जयासी ॥ राहुनी देवापाशीं काय केलें ॥ २ ॥ परिसा झांकण घातलें खापर ॥ नाहीं झालें अंतर बावनकस ॥ ३ ॥ खदिरांगारीं शृंगारी हिलाल ॥ अंतरींचें काळें गेलें नाहीं ॥ ४ ॥ ह्मणे मुक्ताबाई अभिमानानें नेलें ॥ सर्पा पाजियेलें विष तेंची ॥ ५ ॥

॥ १८६८ ॥ अमृत टाकून कांजीची आवडी ॥ साजेना झोंपडी काय त्याला ॥ १ ॥ खरासी अखंड गंगेचें स्नान ॥ गेलें वायावीण जिणें त्याचें ॥ २ ॥ पोंवळ्याहून अधिक दिसती रानगुंजा ॥ शृंगाराच्या काजा विटंबिल्या ॥ ३ ॥ आनारा परिस चोखट इंद्रावन ॥ चवी कडुपण हीन त्याचें ॥ ४ ॥ रंगाचीं बाहुलीं दिसती साजिरीं ॥ बेगडेची वरी नग ल्याली ॥ ५ ॥ ह्मणे मुक्ताबाई पुरे तें दर्शन ॥ गुरुवीण संतपण आहे कोठें ॥ ६ ॥

॥ १८६९ ॥ ऊंसाचे शेजारीं येरंडाचें झाड ॥ नाहीं त्याचे पाडें गोडी आली ॥ १ ॥ कर्पुरासी झाला दीपाचा शेजार ॥ काय गुणें हीर राहिल साचा ॥ २ ॥ सागरीं लवण टाकिलें नेऊन ॥ काय गुण खडेपण उरलें साचें ॥ ३ ॥ तैसा नामदेव विठोबाच्या जागा ॥ काय गुणें दादा कोरेपण ॥ ४ ॥ ह्मणे मुक्ताबाई चंदनाचें झाड ॥ अहंता सर्प वेढे गुंडाळिले ॥ ५ ॥

॥ १८७० ॥ संत पाहुणेरा सज्जनाचे घरीं ॥ पुजा करितां वरी डोई काढी ॥ १ ॥ करितां सन्मान अंगीं भरे ताठा ॥ देवापैं करंटा असुनी काय ॥ २ ॥ अहंता हा खुंट वाढविला चित्तीं ॥ न साहे संगती सज्जनाची ॥ ३ ॥ पंढरीचें भूषण सांगतों जनासी ॥ नाहीं या मनासी तिळ बोध ॥ ४ ॥ ह्मणे मुक्ताबाई चांगदेवावाणी ॥ भजावा सज्जनीं नामदेव ॥ ५ ॥

॥ १८७१ ॥ चौदाशें वरुषें शरीर केलें जतन ॥ बोधावीण शिण वाढविला ॥ १ ॥ नाहीं गुरुमंत्र नाहीं उपदेश ॥ परमार्थासी दोष लावियेला ॥ २ ॥ स्वहिताचें कारण पडियेलें जेव्हां ॥ शरण आला तेव्हां

आलंकापुरीं ॥ ३ ॥ गैनीनाथें गुज दिलें निवृत्तीला॥ निवृत्तीचा झाला ज्ञानदेव ॥ ४ ॥ ज्ञानदेवीं बीज वाढलेंसे जनीं ॥ तेंचि आह्मी तुह्मीं संपादिलें॥ ५ ॥ ह्मणे मुक्ताबाई तिहींलोकीं ठसा ॥ नामदेव ऐसा राहिला कां ॥ ६ ॥

॥ १८७२ ॥ निवृत्तिदेव ह्मणे ऐसें ह्मणों नये ॥ धन्य भाग्यें पाहे संत आले ॥ १ ॥ आपुलें स्वहित करावें आपण ॥ संतांच्या सन्माना चुकों नये ॥ २ ॥ धन्य हो ते नर राहती पंढरी ॥ श्वान त्यांचे घरीं सुखें व्हावें ॥ ३ ॥ या नामदेवासंगें देवाचा ओढा ॥ प्रेमें केला वेडा पांडुरंग ॥ ४ ॥ निवृत्तीदेव ह्मणे सासी अरे तुरे ॥ पायीं ठेवितां बरें डोई माते ॥ ५ ॥ ह्मणे मुक्ताबाई घाला लोटांगण ॥ आपणा दर्शन नलगे त्याचें ॥ ६ ॥

॥ १८७३ ॥ कुलालाचें कुंभ भाजल्याविण माती ॥ काय साहे संगती पाणियाची ॥ १ ॥ मेणाची पुतळी घेतां करीं बरी ॥ अग्नीचे शेजारीं राहे कैशी ॥ २ ॥ तैसा अधिरासी काय संतसंग ॥ मृगजळा तरंग येतिल कैसे ॥ ३ ॥ तें आजि नवल देखिलें डोळा॥ दगड जैसा जळा वेगळेपण ॥ ४ ॥ ह्मणे मुक्ताबाई जाऊं देऊं नये ॥ ऐसें सरिसें काय भांडें करा ॥ ५ ॥

॥ १८७४ ॥ कुलाल आपुल्या घरीं भाजवी भाचरी ॥ ह्मणे जै होईल हरि कृपावंत ॥ १ ॥ हरीसी वरदळ लावितो निशिदिनीं ॥ धाडिला ह्मणोनी तुह्मापाशीं ॥ २ ॥ तुह्मी संतजन उद्धराल तत्काळ ॥ नामा लडिवाळ विठोबाचा ॥ ३ ॥ राखावें तें ब्रीद करावें पावन ॥ धाडा बोलावणें गोरोबाला ॥ ४ ॥ ह्मणे मुक्ताबाई भाजलें कीं कोरें ॥ काकाचें उत्तर सत्य मानूं ॥ ५ ॥

॥ १८७५ ॥ गोरा बोलाविला जुनाट पैं जुना॥ हातीं थापटणें अनुभवाचें ॥ १ ॥ परब्रह्म ह्मातारा निवाला अंतरीं ॥ वैराग्याचे वरी पाल्हाळला ॥ २ ॥ सोहं शब्दें विरक्ति उरली अंबरीं ॥ पाति अणुभरी पाहिलें पण ॥ ३ ॥ ह्मणे मुक्ताबाई घालूं द्या लोटांगण ॥ जाऊं द्या शरण अव्यक्तासी ॥ ४ ॥

॥ १८७६ ॥ मोतियांचा चूर फेंकिला अंबरीं ॥ विजुचीया परी कीळ झालें ॥ १ ॥ जरी पितांबरें नेसविलीं नभा ॥ चैतन्याचा गाभा नीळबिंदू ॥ २ ॥ तळीपरी पसरे शून्याकार झालें ॥ सर्पाचींही पिलें नाचूं लागे ॥ ३ ॥ कडकडोनी वीज निमाली ठायींचे ठायीं ॥ भेटली मुक्ताबाई गोरोबाला ॥ ४ ॥ ज्ञानदेव ह्मणे कैसी झाली भेट ॥ ओळखिलें अविट आपुलेंपण ॥ ५ ॥

॥ १८७७ ॥ निवृत्तिदेव ह्मणे चला गुंफेमधीं ॥ अचळ हे आदी समाधी असे ॥ १ ॥ सद्गुरुप्रसादें बांधिली नेटकी ॥ गुहे गौप्य ताटी आड केली ॥ २ ॥ दंड चक्राकार बांधिली चहुंकून ॥ आंत संतजन करिती वास ॥ ३ ॥ ऐसें गुंफेमध्यें नाहीं नामदेव ॥ ह्मणुनी माझा जीव थोडा होतो ॥ ४ ॥ गैनीची मिरास घेतली प्रमाण ॥ पूर्व भूमी जतन करित आस ॥ ५ ॥ निवृत्तिदेव ह्मणे मुक्ताईच्या उत्तरें ॥ भाजलें कीं कोरें कळों नेदी ॥ ६ ॥

॥ १८७८ ॥ परस्परें गुह्य करिती भाषण ॥ ह्मणती महाधन गांवा आली ॥ १ ॥ रक्तश्वेत पीत नीळ वर्णाकार ॥ नक्षत्राचीं वर पूजा केली ॥ २ ॥ प्रकाशमय तत्व ज्योतिमय पहाणें ॥ दीप त्रिभुवनीं एक झाला ॥ ३ ॥ निवृत्तिदेव ह्मणे कुलालाचें चक्र ॥ अंतर बाहेर ऐसें झालें ॥ ४ ॥

॥ १८७९ ॥ हांसोनी सोपानें खुणाविल्या खुणा ॥ नामदेव पाहुणा आला असे ॥ १ ॥ तयासी हो पाक पाहिजे पवित्र ॥ भाजलें कीं कोरें कळों नेदी ॥ २ ॥ मुक्तिकेचे पारखी तुह्मी अहां देवा ॥ भाजुनी जीवा शिवा ब्रह्म करा ॥ ३ ॥ आनंदानें हुल्लती मारिती करावरी कर ॥ नेणो राहिलें कोरें कोण्या गुणें ॥ ४ ॥ निर्गुणापासुनी सगुणाची संगती ॥ नाहीं स्वरूपस्थिति अंगा आली ॥ ५ ॥ ह्मणे मुक्ताबाई हेरोनीया हेरा ॥ हिरा किंवा गारा नेणों बापा ॥ ६ ॥

॥ १८८० ॥ जव्हारियाचे पुढें मांडियेलें रत्न ॥ आतां मोला उणें येईल कैसें ॥ १ ॥ तैसें थापटणें पारखियाचा हात ॥ वाफ झाल्या घात वांया जाती ॥ २ ॥ प्रथम थापटणें हाणिलें निवृत्तीच्या माथा ॥ डेरा झाला निका परब्रह्म ॥ ३ ॥ तेंचि थापटणें ज्ञानेश्वरावर ॥ आतां कैचें कोरें उरे येथें ॥ ४ ॥ तेंचि थापटणें सोपानाचे डोई ॥ यांत लेश नाहीं कोरें कोठें ॥ ५ ॥ तेंचि थापटणें मुक्ताबाईला हाणी ॥ अमृत संजिवनी

उतो आली ॥ ६ ॥ तेंचि थापटणें नामदेवावर ॥ डोई चोळूं मोहरे रडों लागे ॥ ७ ॥ गोरा ह्मणे कोरा राहिला गे बाई ॥ शून्यभर नाहीं भाजिलें कोठें ॥ ८ ॥

॥ १८८१ ॥ संतसमागम फळलारे बा मला ॥ सन्मानाचा झाला लाभ मोठा ॥ १ ॥ अतीथि आदर केला मुक्ताबाई ॥ लांकडानें डोई फोडिली माझी ॥ २ ॥ देवानें गोंधळ घातला गरुडपारीं ॥ भिजली पितांबरी अश्रुपातीं ॥ ३ ॥ माझें माझें ह्मणोनी गाईलें गाऱ्हाणें ॥ कळलें संतपण हेंचि तुमचें ॥ ४ ॥ भरी भरोनिया आलों तुमचे जवळी ॥ कैकाड मंडळी ठावी नोव्हे ॥ ५ ॥ नामा ह्मणे सन्मान पावलों भरून ॥ करितां आगमन भलें दिसे ॥ ६ ॥

॥ १८८२ ॥ उद्विग्न मनीं करी दीर्घ ध्वनी ॥ नाहीं माझे कोणी सखे ऐसे ॥ १ ॥ वैराग्य कसोटी सोसवेना घाव ॥ पळावया पाव मागें काढी ॥ २ ॥ झाले चाळाचूळ मनांत चंचळ ॥ युगा ऐसें पळ वाटतसें ॥ ३ ॥ नामा ह्मणे जावें पळोनीया आतां ॥ संतसंग होतां भाजितील ॥ ४ ॥ ह्मणे मुक्ताबाई चैतन्याचा केर ॥ ब्रह्म अग्नीवर चेतवावा ॥ ५ ॥

॥ १८८३ ॥ अंतर बाहेर भाजूं आह्मी कुंभ ॥ भरूं निरालंब सगळेची ॥ १ ॥ अहं सोहं दोन्ही ऊर्ध्व लावूं फुंकणी ॥ नवद्वारें फुंकोनी जाळ करूं ॥ २ ॥ जीवित्व काढुनी शिव घडूं अंगा ॥ प्रिय पांडुरंगा आवडेल ॥ ३ ॥ ह्मणे मुक्ताबाई पळायाचा पाही ॥ आसन स्थिर नाहीं नामयाचें ॥ ४ ॥

॥ १८८४ ॥ न पुसतां संतां निघाला तेथुनी ॥ पैलपार इंद्रायणी प्राप्त झाला ॥ १ ॥ मागें पुढें पाहे पळतो तातडी ॥ आला उडाउडी पंढरीसी ॥ २ ॥ कवळोनी कंठीं विठ्ठल हे मूर्ती ॥ नको देऊं हातीं निवृत्तीच्या ॥ ३ ॥ ज्ञानदेव सोपान पाठविले कोरे ॥ जुनाट ह्मातारा जाळूं आला ॥ ४ ॥ मुक्ताबाईनें तेथें माजविली कळी ॥ हे संत मंडळी कपटी तुझी ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा आणिलें पूर्व दैवें ॥ गेलों असतों जीवें सगळाची ॥ ६ ॥

॥ १८८५ ॥ पूर्वी केली सेवा उपयोगा आली देवा ॥ दिलें असतें जीवा आहुतीलागीं ॥ १ ॥ अनंत जन्मींचें कळलें अनुष्ठान ॥ पाहिले

चरण विठोबाचे ॥ २ ॥ न जाणो माझ्या येतील पाठोपाठी ॥ घालतील मिठी भिडें तुला ॥ ३ ॥ त्यांसी घाल तुह्मी अगत्य उदारा ॥ मज कां न मारा आपुले हातें ॥ ४ ॥ नामा ह्मणे तुझें न सोडी चरण ॥ युगायुगीं धरणें घेतलें असे ॥ ५ ॥

॥ १८८६ ॥ हातांत नरोटी जीर्णांचे ते भार ॥ ह्मणसी सवदागर संत माझे ॥ १ ॥ परळ भोपळ्यांची गृहामाजीं संपत्ति ॥ तुह्मी कां श्रीपति भूषण सांगा ॥ २ ॥ भणंगाचे घरां नित्यची राजपट ॥ सांगसी अचाट ब्रीद त्यांचें ॥ ३ ॥ कैकाड्याचे वाणी करिती गुडगुड ॥ मजला हें गूढ उमजेना ॥ ४ ॥ नामा ह्मणे गाती प्रकाशाचें गाणें ॥ आह्मा अघोरवाणें दिसतसे ॥ ५ ॥

॥ १८८७ ॥ ह्मणती घेतल्या आह्मी धान्य कोडी ॥ खर्चायाला कवडी थार नसे ॥ १ ॥ हांसती रडती पडती एकमेकांवर ॥ आनंदाला पार नाहीं ह्मणती ॥ २ ॥ काय गुणें देव रिझाला त्यावरी ॥ नेसाया फटकुरी जन्म गेला ॥ ३ ॥ पाहोन दरिद्र झालों कासाविस ॥ केवळ परीस पांढऱ्याचा ॥ ४ ॥ लहानसी मुक्ताई जैसी सणकांडी ॥ केले देशोधडी महान संत ॥ ५ ॥ सगळेंची काखेसी येई ब्रह्मांड ॥ नामा ह्मणे पाखांड दिसतें मज ॥ ६ ॥

॥ १८८८ ॥ पांचा सातांचा एकाजागीं मेळ ॥ केवळ चांडाळ दुर्बुद्धि ते ॥ १ ॥ जातानाच माझी केली विटंबणा ॥ ह्मणोनि नारायणा मागें आलों ॥ २ ॥ पाहिला तयाचा मानस आदर ॥ जमा केला केर जाळावया ॥ ३ ॥ त्याच्या धाकें मागें आलों रे अनंता ॥ येत तुझ्या चित्ता बरें त्यांचें ॥ ४ ॥ नामा ह्मणे जीवें आलों वांचवोनी ॥ अझुनी तरी चक्रपाणी वांचवी मज ॥ ५ ॥

॥ १८८९ ॥ आहे त्यांचे मनीं करावें आगमन ॥ घेतील मागून तुजपाशीं ॥ १ ॥ तयेवेळीं व्हाल तुह्मी बेइमान ॥ मज घाल काढून संतापाशीं ॥ २ ॥ खादल्या पिदल्याचें राखे वा स्मरण ॥ तुला माझी आण पांडुरंगा ॥ ३ ॥ चालविला लळा पुरविली आवड ॥ आतां कां दगड जड झालों ॥ ४ ॥ कां माझी चिंता सांडिली अनंता ॥ संतांलागीं देतां हरुष

वाटे ॥ ५ ॥ नामा ह्मणे काय करिसी अमंगळ ॥ अडचण राउळामाजीं झाली ॥ ६ ॥

॥ १८९० ॥ वटारोनी डोळे पाहती आभास ॥ मज त्याचा भास कळों नेदी ॥ १ ॥ भाजा भाजा ह्मणोनी उठली एकसरां ॥ मग म्यां बाहेरां गमन केलें ॥ २ ॥ आतां आजवरी घाल त्याचे हातीं ॥ होऊं पाहती माती जीवित्वाची ॥ ३ ॥ अभयाचें दान द्यावें बा श्रीहरि ॥ दुर्बळ बाहेरी घालूं नये ॥ ४ ॥ समर्था लांच्छन लागतें नांवाचें ॥ न जाणों देवाचें असेल कांहीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे नांव पतीतपावन ॥ येया बोला उणें आणूं नये ॥ ६ ॥

॥ १८९१ ॥ संतांसी विन्मुख झाला जो गव्हार ॥ नाहीं आतां थार इहपरलोकीं ॥ १ ॥ नाहीं घेतला वेड्या संतांचा अंगवळा ॥ झोंप बैसली डोळां अज्ञानाची ॥ २ ॥ भ्रांतीनें तुझी पुरविली पाठी ॥ सज्जनाच्या गोष्टी कडू झाल्या ॥ ३ ॥ हाता आला लाभ गमाविला सारा ॥ भुललासी गव्हारा भ्रमभुली ॥ ४ ॥ मोह सर्पें तुझें व्यापियेलें अंग ॥ ह्मणे पांडुरंग काय आतां ॥ ५ ॥

---

## तीर्थावळीचे अभंग.

॥ १८९२ ॥ नामयाचे भेटी ज्ञानदेव आले ॥ लोटांगण घातलें नामदेवें ॥ १ ॥ देउनी आलिंगन प्रीतीच्या पडीभारें ॥ पूजिलें आदरें यथाविधी ॥ २ ॥ धन्य तो अवसरु संत समागमु ॥ करीतसें संभ्रमु आवडीचा ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे सफळ माझें जीणें ॥ स्वामीच्या दर्शनें धन्य जालों ॥ ४ ॥ पूर्व पुण्य माझें फळासीं हें आलें ॥ प्रत्यक्ष भेटलें पांडुरंग ॥ ५ ॥ संसारीं आसक्त मायामोहें रत ॥ तापत्रय संतप्त झाले जीव ॥ ६ ॥ ऐसीया पतीताचा करावा उद्धार ॥ यालागीं अवतार तुमचा जगीं ॥ ७ ॥ तरी मी एक दीन मूढ मतीहीन ॥ चरणाचा रज कण संतांचिया ॥ ८ ॥ ह्मणोनी पंढरीनाथ पाळीतसे मातें ॥ प्रेमजीवनभातें देवोनीयां ॥ ९ ॥ आजि हें स्वामीनी पाहिलें कृपादृष्टि ॥ केली सुखवृष्टि अनिवार ॥ १० ॥ नामा ह्मणे तुमच्या चरणाचा आधार ॥ टाकील पैलपार भवनदीच्या ॥ ११ ॥

॥ १८९३ ॥ ज्ञानदेव ह्मणे तूं भक्त शिरोमणी ॥ जोडिले जन्मोनी केशवचरण ॥ १ ॥ प्रेमसुख गोडी तुजची पावली ॥ वासना मावळली सकळ तुझी ॥ २ ॥ धन्य तुझें जन्म धन्य तुझें कूळ ॥ धन्य तुज राऊळ जवळी असे ॥ ३ ॥ भक्तिप्रेम धन्य साधिलें तुवां सार ॥ केला पै संसार देशधडी ॥ ४ ॥ क्षणएक एकांतीं बैसोनी सहज ॥ अंतरींचें गुज बोलों कांहीं ॥ ५ ॥ जीवन्मुक्त ज्ञानीं जरी जाले पावन ॥ परि देवतीर्थभजन न सांडिती ॥ ६ ॥ भक्तशिरोमणी धन्य तूं संसारीं ॥ परि एक अवधारीं वचन माझें ॥ ७ ॥ भूतळींचीं तीर्थें पाहावया नयनीं ॥ असे आर्त मनीं विष्णुदासा ॥ ८ ॥ तुझीये संगतीचें नित्य सुख घ्यावें ॥ सार्थक करावें संसाराचें ॥ ९ ॥ ऐसी ही उत्कंठा बहुत माझे मनीं ॥ भाग्यें झाली ये दिनीं भेटी तुजसीं ॥ १० ॥ ज्ञानदेव ह्मणे पुरवी मनोरथ ॥ करावे मुहूर्त प्रयाणासीं ॥ ११ ॥

॥ १८९४ ॥ ज्ञानदेव ह्मणे नामदेवाप्रती ॥ ऐकावी विनंति एक माझी ॥ १ ॥ पृथिवीचीं तीर्थें करावीं समस्त ॥ पहावे महंत साधुजन ॥ २ ॥ जीवन्मुक्ता तुज नाहीं कांहीं काज ॥ इच्छा असे मज त्वांही यावें ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुह्मी पुसावें विठ्ठला ॥ देतां आज्ञा मला मीही येतों ॥ ४ ॥

॥ १८९५ ॥ ऐसें ऐकोनियां बोल नामा विच्यारी मानसीं ॥ ह्मणे काय द्यावें यासी प्रतिवचन ॥ १ ॥ मग विठोबाचे पाय आठविले मनीं ॥ बोले अमृतवचनीं तयांप्रती ॥ २ ॥ सर्व सुख मज आहे पांडुरंगीं ॥ म्यां जावें कवणालागीं कवण्या ठायां ॥ ३ ॥ आहिक्य परत्र मज चाड नाहीं सर्वथा ॥ न लगती पुरुषार्थ मुक्ति च्यारी ॥ ४ ॥ रंक होउनियां पंढरी चोहटा ॥ राखेन दारवंटा महाद्वारीं ॥ ५ ॥ या सुखा कारणें शरीर कर्वती फोडिलें ॥ दुर्जय तोडिले मायाजाळ ॥ ६ ॥ त्रिभुवनीचें वैभव सांडोनियां दूरी ॥ जालोंसे भिकारी पंढरीचा ॥ ७ ॥ कल्पतरूची छाया कामधेनूचें दुभतें ॥ संपूर्ण आईतें सर्वकाम ॥ ८ विठोबाचे पाईं काय मज उणें ॥ वासनाची मनें गिळिली माझी ॥ ९ ॥ पाळिला पोशीला जन्मोनी जयाचा ॥ विकिला कायावाचा मनें त्यासी ॥ १० ॥ नामा ह्मणे स्वामी विठोबासी पुसा ॥ आज्ञा देईल शीरसा धरीन त्याची ॥ ११ ॥

॥ १८९६ ॥ मग ज्ञानदेव ह्मणे भला भक्तराज ॥ कळलें गौप्यगुज सर्व तुझें ॥ १ ॥ धीर आणि चतुर सर्वस्वें उदार ॥ साजे तुज अधिकार प्रेमभक्ति ॥ २ ॥ धन्य तूं संसारीं भक्तिभावशीळ ॥ साधिलें तुवां केवळ प्रेमसुख ॥ ३ ॥ देउनी आलिंगन नामा धरियेला करीं ॥ वंदियेले शिरीं चरणरज ॥ ४ ॥ राउळा भीतरीं चला जाऊं वेगें ॥ आज्ञा मागों दोघे तीर्थयात्रे ॥ ५ ॥ सत्वर उठोनी आले स्वामीजवळां ॥ मस्तक ठेविला चरणावरी ॥ ६ ॥ जीवींचा निजभावो सांगे ज्ञानदेवो ॥ ऐकोनी पंढरीरावो हांसिन्नले ॥ ७ ॥ ह्मणे तूं ज्ञानशीळ चिद्रुप केवळ ॥ सबात्ह्यनिर्मळ स्फाटिक जैसा ॥ ८ ॥ सहज तीर्थरूप तूंचि निरंतर ॥ असतां हा विचार काय करिसी ॥ ९ ॥ येरु ह्मणे स्वामी बोलिलेती बरवें ॥ परि सार्थक करावें या देहाचें ॥ १० ॥ प्रसंगें नाम्याचे संगती सुख घ्यावें ॥ ह्मणोनी ज्ञानदेवें धरिले चरण ॥ ११ ॥

॥ १८९७ ॥ मग हांसोनी पंढरिनाथ पाहे नाम्याकडे ॥ ह्मणे नवल केवढें भाग्य तुझें ॥ १ ॥ प्रत्यक्ष परब्रह्म मूर्ति ज्ञानेश्वर ॥ करीतसे आदर संगतीचा ॥ २ ॥ ऐसें भाग्य जेणें सर्वस्वें साधावें ॥ तरीच जन्मावें विष्णुदासा ॥ ३ ॥ जावें स्वस्ति क्षेम यावें शीघ्रवत ॥ करावें स्वहित कळेलतैसें ॥ ४ ॥ सर्वभावें आमुचा विसर न पडावा ॥ लोभ असों द्यावा मजवरी ॥ ५ ॥ परियेसी ज्ञानराजा बोले जगज्जीवन ॥ तूं तव सर्वज्ञ सुखमूर्ती ॥ ६ ॥ परी एक मागणें आहे तुजप्रती ॥ आठवण चित्तीं असों द्यावी ॥ ७ ॥ हें कृपेचें पोसणें माझें आवडतें ॥ क्षण जीवापरतें नकरी कदां ॥ ८ ॥ परी तुवां सांकडें घातलें सर्वथा ॥ दाटलें सर्वथा हृदय माझें ॥ ९ ॥ आरुष सावडें नामें माझे वेडें ॥ मार्गीं मागें पुढें सांभाळावें ॥ १० ॥ तान भूक तुवां जाणावी जीवींची ॥ मज चिंता याची वाटे थोर ॥ ११ ॥ मग नामयाचा हात धरोनी श्रीपती ॥ देत असे हातीं ज्ञानदेवा ॥ १२ ॥ रानीं वनीं जनीं विसंबसी झणीं ॥ धाडितों देखोनी आर्त तुझें ॥ १३ ॥ चरणीं ठेवुनी माथा निघते झाले दोघे ॥ आले चंद्रभागे केलीं स्नानें ॥ १४ ॥ पुंडलिकाचे चरण वंदुनीया नामा ॥ उतरले भीमा पैल तीरीं ॥ १५ ॥

॥ १८९८ ॥ तीर्थयात्रेप्रति बोळविला नामा ॥ आले निजधामा देवराव ॥ १ ॥ चरण प्रक्षाळावया रुक्मादेवी आली ॥ श्रीमुख न्याहाळी

भरोनी दृष्टी ॥ २ ॥ तंव ते निडारले नयन खेदें भिजलें वदन ॥ हृदय झालें पूर्ण करुणारसें ॥ ३ ॥ बाप कृपेचा सागरू सुखाचा सुखतरू ॥ आर्त लोभापरू दीनालागीं ॥ ४ ॥ चरणीं ठेवुनी माथा पुसे जगन्माता ॥ आजी कां अवस्था विपरीत देखों ॥ ५ ॥ ह्मणे वाटतें जडभारी नाम्याच्या वियोगें ॥ दाटलें उद्वेगें चित्त माझें ॥ ६ ॥ कवण्या सुखें स्थीर न राहे हें मन ॥ केव्हां डोळां देखेन प्राण माझा ॥ ७ ॥ इष्टमित्र बंधु मायबाप सखा ॥ हीं नामें मज देखा ठेविलीं तेणें ॥ ८ ॥ तो कैसा मजवीण राखिल आपुला प्राण ॥ हे चिंता दारुण वाटे मज ॥ ९ ॥ तंव ती महामाया ह्मणे जी यादवराया ॥ झणीं तुमच्या ठायां दृष्टि असे ॥ १० ॥ शोक मोहें दुःख क्षणामाजीं जळे ॥ तें नाम साजवळी आहे तुमचें ॥ ११ ॥

॥ १८९९ ॥ माझे भक्त मज अनुसरले चित्तें ॥ साहोनी पढियंते मज आणिक नाहीं ॥ १ ॥ व्यक्तीस येणें मज तयाचीये आवडी ॥ युगायुगीं प्रौढी हेचि मिरवी ॥ २ ॥ त्याचेनि कृतार्थ असें मी पूर्णकाम ॥ ते माझे परम प्राणसखे ॥ ३ ॥ ते माझे आश्रम मी त्यांचा विश्राम ॥ जींहीं रूपनाम केलीं मज ॥ ४ ॥ मीं त्यांचा सोयरा ते माझे सांगाती ॥ करी त्यांसी एकांतीं सुख गोष्टी ॥ ५ ॥ जींहीं तनुमन प्राण लाविला मजकडे ॥ मी तयां आवडे जीवाहूनी ॥ ६ ॥ ते माझे भाग्याचे अधिकारी विभागी ॥ वैकुंठ सालागीं वसतें केलें ॥ ७ ॥ त्यांचें गुज गौप्य मीची एक जाणें ॥ माझी प्रेमखूण कळली तयां ॥ ८ ॥ मनाची साउली करोनिया मातें ॥ भोगितो आतां तें सर्वसुख ॥ ९ ॥ आपुलीयाचीं किरणें विराजे गभस्ती ॥ परी किरण न होती आन जेंवी ॥ १० ॥ तैसे माझे दास मजमाजीं उदास ॥ असती समरस दुजे न वीण ॥ ११ ॥ मी तो भक्तरूप भक्त माझें स्वरूप ॥ प्रभा आणि दीप जयापरी ॥ १२ ॥ हें ऐक्यपण कण अनुभवी जाणती ते ज्ञानी ॥ ज्या नाहीं आयणी कासयाची ॥ १३ ॥ त्यांचीये चरणीचें रज आणि माझें नामें ॥ सांडिलें रजतमें भाविकांसीं ॥ १४ ॥ सांचे भेटीलागीं हृदय माझें कळवळे ॥ कैं देखेन डोळे निवती माझे ॥ १५ ॥

॥ १९०० ॥ तंव तें आवडतें भक्त अंतरंग आपुले ॥ देवें बोलाविलें एकांतासी ॥ १ ॥ ह्मणे नाम्यापरतें मज दुजें न आवडे ॥ सांगे तयापुढें

दैन्य आपुलें ॥ २ ॥ त्या देखतांची दृष्टि मन माझें नीवे ॥ वाटे त्या घालावें हृदयामाजीं ॥ ३ ॥ त्याचेनी लोभें मन माझें मोहिलें ॥ अखंड राहिलें त्याचेपाशीं ॥ ४ ॥ मजपरतें दूजें नेणे तो नामा ॥ नित्य माझा प्रेमा पढिये त्यासी ॥ ५ ॥ भक्तकाजकैवारी ह्मणवितां मज वाटे लाज ॥ परी म्यां केलें काज नाहीं त्याचें ॥ ६ ॥ धर्म अर्थ काम त्या नाहीं दिधले ॥ जन्मोनी बांधलें सेवाऋणी ॥ ७ ॥ तेणें आपुले निजपुरुषार्थें जिंकिला संसार ॥ केला मदमत्सर देशधडी ॥ ८ ॥ लोभ दंभ दूर माया मोहो वैरी ॥ घातले तोडरीं काम क्रोध ॥ ९ ॥ तो न मानी आणिका देवा न करी त्यांची सेवा ॥ मजपरता विसांवा नाहीं त्यासी ॥ १० ॥ तो मार्गीं शिणला असेल कोमाइला ॥ सुख दुःख आपुलें सांगेल कवणा ॥ ११ ॥ त्याचीया जीवीचें मीच जाणें सर्व ॥ हा माझा अनुभव आहे त्यासी ॥ १२ ॥ ते माझे दास आवडते अंतरंग ॥ त्यजिला सर्व संग मजसाठीं ॥ १३ ॥ देखोनी ते आवडी अभिन्न वाटलें ॥ सप्रेमें दाटले सकळ भक्त ॥ १४ ॥ परिसा भागवत आनंदें नाचत ॥ लोटांगणी येत गरुडापरी ॥ १५ ॥

॥ १९०१ ॥ सुखरूप दोघे चालताती मार्गीं ॥ परी चित्त पांडुरंगीं नामयाचें ॥ १ ॥ क्षणक्षणा वास परतोनी पाहे ॥ वियोग न साहे पंढरीचा ॥ २ ॥ ह्मणे कां गा केशीराजा बोळविलें मातें ॥ न येसीच सांगातें सांभाळीत ॥ ३ ॥ चिंतातुर थोर पडिलों ये परजनीं ॥ न दिसे माझें कोणी जीवलग ॥ ४ ॥ फुटोनी हृदय होती दोनी भाग ॥ बहुत उद्वेग वाटताती ॥ ५ ॥ तूं माझी जननी तूं माझा जनीता ॥ तूं बंधु चुलता पंढरिराया ॥ ६ ॥ तूंचि इष्टमित्र तूंचि गणगोत ॥ तूंचि कुळदैवत आवडतें ॥ ७ ॥ तूंचि माझें वृत्त तूंचि माझें तीर्थ ॥ तूंचि चार पुरुषार्थ कामदेवा ॥ ८ ॥ तूंचि ज्ञानचक्षु तूंचि माझा लक्षू ॥ तूंचि माझा साक्षु स्वभावासी ॥ ९ ॥ साच कीं लटिकें हें माझें बोलणें ॥ तुजवांचूनी जाणें कवण दुजा ॥ १० ॥ नामा ह्मणे आपुले अनाथा सांभाळी ॥ येउनी हृदयकमळीं राहे माझ्या ॥ ११ ॥

॥ १९०२ ॥ ज्ञानदेव ह्मणे परियेसा विष्णुदासा ॥ तूं सुखसंतोषा पात्र होसी ॥ १ ॥ प्रेमाचा जिव्हाळा तुझ्या हृदयीं आला ॥ तूं कां वेळोवेळां खंती करिसी ॥ २ ॥ विचारी सावध होऊनि भक्तराजा ॥ सुखानंद तुझा तुजची जवळी ॥ ३ ॥ मी नेणें ज्ञानगति नेणो योगयुक्ति ॥ न देखें विश्रांति एकेवीण ॥ ४ ॥ सर्वभावें मज तेंचि स्वरूप आवडे ॥

जें पुंडलीकापुढें उभें असे ॥ ५ ॥ तो माझा विठ्ठलु दावी दृष्टी-भरी ॥ आस मी नकरी आणिकाची ॥ ६ ॥ व्यापकु विठ्ठलु आहे सर्व देशीं ॥ जरी सांडोनिया पहासी भेदभ्रमू ॥ ७ ॥ तो नाहीं ऐसा ठाव उरला कवण ॥ सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ८ ॥ काया वाचा मनें मज तोची व्हावा ॥ गीत गातां जीवा सुख वाटे ॥ ९ ॥ ऐकावा श्रवणीं पाहावा तोचि नयनीं ॥ नव जावा जवळोनी दूर कोठें ॥ १० ॥ जें अक्षर अव्यक्त देश काळ रहीत ॥ ज्ञानी उपासीत सोहं भावें ॥ ११ ॥ सर्वत्र इंद्रियांसहित आवरोनी चित्त ॥ भोगिती अद्वैत नित्य सुख ॥ १२ ॥ सर्व सुख मज आहे त्याच्या पायीं ॥ आणिकाच्या वाही न पडे कदां ॥ १३ ॥ तेथें माझें मन रंगलेंसे भावें ॥ सुख येणें जीवें देखिलें डोळां ॥ १४ ॥ सर्व-गत संपूर्ण सर्वकाळ असणें ॥ होणें आणि जाणें नाहीं जया ॥ १५ ॥ ते तुज माझारी तूं तयांभीतरीं ॥ अनुभवीं निर्धारी ठेवुनी मना ॥ १६ ॥ नमनी नमनीं लटिकी हे कहाणी ॥ जळधारावांचोनी चातक जैसा ॥ १७ ॥ तैसें माझें मन स्मरे रात्रंदिवस ॥ पंढरीनिवास जीवन माझें ॥ १८ ॥ ऐसें ऐकोनी बोलणें ह्मणे ज्ञानदेव ॥ धन्य तुझा भाव एकविध ॥ १९ ॥ नामा ह्मणे माझा सुखाचा विसांवा ॥ आमचे या जीवा पंढरीराय ॥ २० ॥

॥ १९०३ ॥ भक्त भागवत बहुसाल ऐकिलें ॥ बहु होउनी गेले होती पुढें ॥ १ ॥ परी नामयाचें बोलणें नव्हे हें कवित्व ॥ हा रस अद्भुत अनुपम ॥ २ ॥ हें सुख विश्रांति नाहीं हो कल्पांतीं ॥ विचारावें संतीं दूर दृष्टि ॥ ३ ॥ हो तूं शास्त्रवेत्ते चतुर पंडित ॥ हो तूं बहुश्रुत बुद्धिवंत ॥ ४ ॥ हो तूं कर्मनिष्ठ विधीचे उद्भट ॥ हो तूं सर्वश्रेष्ठ पूज्य लोकां ॥ ५ ॥ हो तूं कळावंत कवित्व कुशळ ॥ हो तु कां वाचाळ चतुरतेचे ॥ ६ ॥ हो तूं कां पाठक हो तूं कां साधक ॥ हो तुका वाचक ग्रंथकार ॥ ७ ॥ हो तूं आत्मज्ञानी हो तूं निजध्यानी ॥ हो तूं वज्रासनी बैसकेचे ॥ ८ ॥ हो तूं योगयुक्त हो तूं जीवन्मुक्त ॥ हो तूं कां विरक्त सर्वसंगीं ॥ ९ ॥ ऐसे हो तूं कां सभाग्य संपन्न सर्वज्ञ ॥ परी मी न मनीं तुजवीण विष्णुदासा ॥ १० ॥ येर कोण जाणता एक पंढरिरावो ॥ रुक्मादेवी नाहो श्रीविठ्ठलु माझा ॥ ११ ॥

॥ १९०४ ॥ ऐसे नित्यानंद भरित क्रमिताती मार्ग ॥ हृदयीं तो अनु-राग आवडीचा ॥ १ ॥ प्रेमें वोसंडीत करित स्वहित गोष्टी ॥ दाविती कसोटी अनुभवाची ॥ २ ॥ व्यापकतें सुख वृष्टि होतसे अनिवार ॥ ब्रह्मरस

पूर वोसंडती ॥ ३ ॥ ज्ञानदेव ह्मणे परियेसी नामया ॥ अद्वैत आत्मया प्रेत मूर्ती ॥ ४ ॥ भक्तिभावें तुवां जोडिलें अविनाश ॥ सांग सेविला कैसा सुमार्ग साचा ॥ ५ ॥ कैसा तो साधावा सांगे भजनविधि ॥ कैसी मनबुद्धि सत्वशीळ ॥ ६ ॥ कैसा निर्विकार ध्यानाचा प्रकार ॥ हा सर्व विचार सांग मज ॥ ७ ॥ कैसें तें श्रवण कैसें तें मनन ॥ कैसें तें निजध्यासन दृढ होय ॥ ८ ॥ कवण ते धृति कवण ते विश्रांती ॥ दावी मजप्रती स्पष्ट करुनी ॥ ९ ॥ बहु उत्कंठित या सुखाकारणें ॥ तें मज पारणें करवी आजीं ॥ १० ॥ सांगी हा अनुभावो साधन उपायो ॥ विनवी ज्ञानदेवो नामयासी ॥ ११ ॥

॥ १९०५ ॥ परिसुनी ते गोष्टी घाली चरणांमिठी ॥ दाटलासे कंठीं सद्गदीत ॥ १ ॥ कृपेचें पोसणें मी पंढरीरायाचें ॥ येवढें भाग्य कैचें जाणीवेचें मज ॥ २ ॥ नव्हे बहुश्रुत नव्हे ज्ञानशीळ ॥ दास मी दुर्बळ वैष्णवांचा ॥ ३ ॥ नेणतें नेणतें कांहींच मी नेणतें ॥ ह्मणोनी देवें तुमतें निरवीलें ॥ ४ ॥ येतां जातां हात दिधला तुमच्या करीं ॥ घातलें अभारीं मायबापें ॥ ५ ॥ आतां साचे कृपावसे येईल वाचेसरीसें ॥ केलें कांहीं तैसें निवेदीन ॥ ६ ॥ भानूस देखणें करीजे अन्य तेजें ॥ तैसें ज्ञान माझें स्वामीप्रती ॥ ७ ॥ कल्पतरु याचक कृपणाचे द्वारीं ॥ कां दैन्य भाकी थोरी कामधेनु ॥ ८ ॥ तैसी तुमची वाचा मज दीनाप्रती ॥ नकळे काळगति समर्थांची ॥ ९ ॥ मातेचिया स्नेहें बाळक बोबडें ॥ खेळवी लाडें कोडें नेणे लाजो ॥ १० ॥ नामा ह्मणे ऐसें तुह्मीं माझें कवतुक ॥ करुनी सुखेंसुख वाढवितां ॥ ११ ॥

॥ १९०६ ॥ ज्ञानदेव ह्मणे शंका न धरिजे मनीं ॥ दृष्टि दुजेपणीं न ठेवावी ॥ १ ॥ सुखेंसुख घ्यावें अनुभवोनी अनुभवावें ॥ आहे तें अवघें ब्रह्मरूप ॥ २ ॥ या सुखाचा अनुभव करी सुखरूपा ॥ सुख वस्तूच्या दीपा नामदेवा ॥ ३ ॥ सुखाचीये ताटीं सुखची वोगरी ॥ तृप्ती होईल थोरी क्षुधातुरा ॥ ४ ॥ पंढरीरायाचा तूं प्रेम भांडारी ॥ आशा पूर्ण करीं याचकाची ॥ ५ ॥ विश्रांतीसी पात्र तूंची विष्णुदासा ॥ हा मज भरंवसा आहे तुझा ॥ ६ ॥ ह्मणोनी हा संगू धरिली थोर आशा ॥ झणीं होसी उदासा भक्तराया ॥ ७ ॥ सिंधुहुनी खोल सुरस तुझे बोल ॥ आनंदाचनी वोळ नीस नवी ॥ ८ ॥ तें मज सादर ऐकवीं सत्वर ॥ श्रवण क्षुधातु ॥

झाले माझे ॥ ९ ॥ जाणीव नेणीव तरीच शोभे सर्व ॥ जरी होय अपुर्भाव वैराग्याचा ॥ १० ॥ ज्ञानदेव ह्मणे तूं भक्त अंतरंग ॥ नलगे तुज पांग बहुज्ञतेचा ॥ ११ ॥

॥ १९०७ ॥ ऐसीं ऐकोनी उत्तरें प्रेम झाला पोटीं ॥ ह्मणे बोलावी ते गोष्टी अनुभवाची ॥ १ ॥ येर कर्मधर्म सर्वही पाल्हाळ ॥ श्रमूची केवळ जाणिवेचा ॥ २ ॥ ऐसा संत भेटी विरळा भाग्ययोगें ॥ जो आथिला वैराग्यें सप्रेमळू ॥ ३ ॥ नाम संकीर्तन वाटे मज गोड ॥ येर ते काबाड वायां वीण ॥ ४ ॥ नमन तें नम्रता न देखे गुणदोष ॥ अंतरीं प्रकाश आनंदाचा ॥ ५ ॥ येर ते दांभिक जाणावी मायावी ॥ विश्वास मी जीवीं न धरी त्यांचा ॥ ६ ॥ ध्यान तया नांव निर्विकार नीके ॥ जें विश्वीं माझ्या देखे विठोबासी ॥ ७ ॥ अखंड हृदयीं तेची आठवण ॥ साजीरे समचरण विटेवरी ॥ ८ ॥ नादीं लुब्ध जैसे आसक्त हरण ॥ जाय विसरोन देहभाव ॥ ९ ॥ यापरि तल्लीन दृढ राखे मन ॥ या नांवें श्रवण आवडीचें ॥ १० ॥ व्यवसायीं चित्त ठेवुनी कृपण ॥ लाभाचें चिंतन सर्वकाळ ॥ ११ ॥ यापरि अखंड स्वहित विचारण ॥ करिजे तें मनन सत्वशील ॥ १२ ॥ परपुरुषीं जैसी आसक्त व्यभिचारिणी ॥ नलागे तिच्या मनीं कामधाम ॥ १३ ॥ कीटकी भृकुटीये जैसें अनुसंधान ॥ नीके निजध्यासन एकविध ॥ १४ ॥ सर्वभावें एक विठ्ठलूची ध्याये ॥ सर्वांभूतीं पाहे रूप त्याचें ॥ १५ ॥ सर्वांहुनी निराळा रजतमा वेगळा ॥ भोगी प्रेमकळा तेची भक्ती ॥ १६ ॥ सत्वाचा सुभटु असंग एकटु ॥ वैराग्य उद्भटु एकनिष्ठ ॥ १७ ॥ प्रारब्धाचा भोगीं तेणें देहस्मृति ॥ अखंड ते धृति निर्विकार ॥ १८ ॥ निर्वासना मनें निजलाभें संपूर्ण ॥ नेणें स्वरूपज्ञान संकल्पाचें ॥ १९ ॥ अनुरागें गोविंदू गायीजे एकांतीं ॥ यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥ २० ॥ तरी कायावाचामनें हा माझा अनुभव ॥ सांगितला सर्व आवडीचा ॥ २१ ॥ नामा ह्मणे हेंचि बोलविलें तेणें ॥ उदार सर्वज्ञें पांडुरंगें ॥ २२ ॥

॥ १९०८ ॥ पश्चिम प्रभास आदी करोनी द्वारका ॥ पाहिल्या सकळिका मोक्षपुऱ्या ॥ १ ॥ पंथीं पावन तीर्थें करोनी सकळीकें ॥ प्रक्षाळलीं पातकें वासनेचीं ॥ २ ॥ परी पंढरीचें प्रेम नामयाचे जीवीं ॥ माउली आठवी पांडुरंग ॥ ३ ॥ जीवन्मुक्त दोन्ही भक्त आणि ज्ञानी ॥ परतोनी तेथोनी येताती मार्गीं ॥ ४ ॥ तृषाक्रांत वनीं होतसे पीडणी ॥ पडला चिंतावनीं

जिवनालागीं ॥ ५ ॥ तंव दृष्टि एक कूप देखिला अवचिता ॥ उदक तेथें पाहतां नलगे अंतु ॥ ६ ॥ कवणेपरी येथें करूं रिघवणीं ॥ प्राण संतर्पणी वांचवावे ॥ ॥ ७ ॥ मग त्या नाम्याप्रती बोले ज्ञानदेव ॥ मज एक उपाव साध्य असे ॥ ८ ॥ लघिमेचें लाघव करुनी ते अवसरीं ॥ उतरोनी भीतरीं घेतलें जीवन ॥ ९ ॥ घेउनी उदक निघाला बाहेरी ॥ मग ह्मणे अवधारी नामदेवा ॥ १० ॥ आणोनी जीवन देईन तुझ्या हातीं ॥ न दिसे अनुगति आणिक कांहीं ॥ ११ ॥ पडिल्या संकटीं विचारावें मनीं ॥ सांडावी आयनी अभिमानाची ॥ १२ ॥ आत्मा तो विठ्ठल सर्व निरंतरी ॥ निरोप दे ज्ञडकरी उशीर ज्ञाला ॥ १३ ॥ आत्मा तो विठ्ठलु असतां सर्वदेहीं ॥ माझी काय नाहीं चिंता त्यासी ॥ १४ ॥ नामा ह्मणे धीर करावा नावेक ॥ दावीन कवतुक स्वामी जवळी ॥ १५ ॥

॥ १९०९ ॥ मग लावुनीया नेत्र निर्धारु पैं केला ॥ हृदयीं आठविला केशीराज ॥ १ ॥ इष्टमित्रबंधु सोयरा जननी जनकू ॥ तेणें मी आणिकू तुजवांचोनी ॥ २ ॥ येई पंढरीराया मजलागीं धांवतु ॥ ह्मणीं पाहसी कां अंतु कृपाळुवा ॥ ३ ॥ तुझिये मूर्तीची बहु खंती वाटली ॥ आसुवें दाटलीं नेत्रकमळीं ॥ ४ ॥ धरोनी धीर जीवा मी करितो धांवा ॥ ये माझ्या केशवा मायबापा ॥ ५ ॥ कायावाचामनें लोटलों चरणासी ॥ तो मी शरण आणिकासी जाऊं कवणा ॥ ६ ॥ जन्मोनी पोसणा तुझाची ह्मणती ॥ मज मोकलितां अंतीं लाज कवणा ॥ ७ ॥ अनाथा कैवारी नामाची आयणी ॥ वर्णिजे पुराणीं कीर्ति तुझी ॥ ८ ॥ तें काय लटिकें करिशील आजी ॥ अझुनी तुज माझी करुणा नये ॥ ९ ॥ गजेंद्राकारणें ज्या वेगीं धांवणें ॥ केलें तंव स्मरण कळवळोनी ॥ १० ॥ द्रौपदीचे आकांतीं येसी सोडविणें ॥ तें मजकारणें विसरलासी ॥ ११ ॥ येता निरखिलें ज्ञानदेवाप्रती ॥ दिल्हा त्याचे हातीं हात माझा ॥ १२ ॥ तो तूं कैसा मजलागीं करिशील उदास ॥ धांव कासावीस थोर ज्ञालों ॥ १३ ॥ सर्वभावें तूं मजलागीं लोभापर ॥ मी तुझा डिंगर आवडता ॥ १४ ॥ नामा ह्मणे हांसें ज्ञालें पिसूणाचें ॥ नकरीं मज दीनाचें अव्हेरण ॥ १५ ॥

॥ १९१० ॥ तंव निजभुवनीं भूवैकुंठीं सुखें पंढरीनाथ ॥ निस जीवीं आर्त निजभक्ताचे ॥ १ ॥ कृपेचा वोरसु होता ठेवा पोटीं ॥ तेची करी गोष्टी रुक्माईसी ॥ २ ॥ ह्मणे क्षेम माझा नामा येवो एक वेळे ॥ मग मी

जीवा वेगळे जाऊं नेदीं ॥ ३ ॥ आजि माझा डावा कां लवतो लोचन ॥ करितसे स्फुरण वामबाहू ॥ ४ ॥ उद्वेग उपसर्ग वाटताती जीवा ॥ कोण्या जिवलगा झाले कष्ट ॥ ५ ॥ वाजतां वारा न लागावा राजसा ॥ माझ्या विष्णुदासा भाविकासी ॥ ६ ॥ वाटे तानभूक झाली त्या पीडणी ॥ तरीच माझ्या मनीं ऐशी दशा ॥ ७ ॥ तंव ती विश्वमाता विचारी नावेक ॥ तंव अवचिता शोक पडिला कानीं ॥ ८ ॥ ह्मणे तृषाक्रांत नामा करीतसे धांवा ॥ वेगीं जाउनी देवा सांभाळावें ॥ ९ ॥ तंव तो आर्तबंधु ऐकोनी वचन ॥ मनाचेनी मन वेगू केला ॥ १० ॥ तंव गडगडीत कूप उदकें वोसंडला ॥ कल्पांतीं खवळला सिंधु जैसा ॥ ११ ॥ ज्ञानदेव ह्मणे झालें अभिन्नव ॥ कैसा ऋणीया देव केला येणें ॥ १२ ॥ सावध करोनी दिल्हें आलिंगन ॥ जीवें निंबलोण उतरीलें ॥ १३ ॥ तंव येरें चरणावरी ठेवियेला माथा ॥ ह्मणे आहे माझी चिंता विठोबासी ॥ १४ ॥ नामा ह्मणे माझे बहु लळे पुरविले ॥ कैं देखेन पाउलें विटेवरी ॥ १५ ॥

॥ १९११ ॥ योगी परम ध्यानीं बैसलिया जाण ॥ कांहीं थोर मन विश्रांति न पूजे ॥ १ ॥ तुजवीण दुसरें कांहींच नाठवें ॥ लागली तुझी सर्वे विष्णुदासा ॥ २ ॥ कवण कुळीं तूं जन्मलासी नाम्या ॥ केशव परमात्मा तुज जवळी ॥ ३ ॥ धेनु वसे वनीं वत्स असे घरीं ॥ चित्त तयावरी ठेवुनी चरे ॥ ४ ॥ ते तया देखोनी संतोषली मनीं ॥ तैसा तुझा गुणी वोल्हावलों ॥ ५ ॥ तीर्थयात्रे जाणें नलगे कांहीं करणें ॥ ऐकोनी तुझें गाणें सुखरूप ॥ ६ ॥ वेडावल्या श्रुतिशास्त्रें आणि पुराणें ॥ योगियांचीं ध्यानें विसर्जिलीं ॥ ७ ॥ तुझें प्रेम सोडावें आणि मनें कोठें जावें ॥ जावोनिया पाहावें काय तेथें ॥ ८ ॥ समाधि सोहळा लय लक्ष वैराग्य ॥ तूं देवा आह्मालागीं आणियेलें ॥ ९ ॥ ऋषि गणगंधर्व ब्रह्मादिक सर्व ॥ लक्षिताती ठावो अरूपाचा ॥ १० ॥ तो तुवां आह्मा सन्मुख उभा केला ॥ चरणासी लागला ज्ञानदेव ॥ ११ ॥

॥ १९१२ ॥ तीर्थें करोनिया नामा पंढरीये आला ॥ जिवलगा भेटला विठोबासी ॥ १ ॥ सद्गदीत कंठ वोसंडला नयनीं ॥ घातली लोळणी चरणावरी ॥ २ ॥ ह्मणे शिणलों पंढरिराया पाहे कृपादृष्टी ॥ थोर झालों हिंपुटी तुजवीण ॥ ३ ॥ अज्ञानाचा भाग होता माझे मनीं ॥ हिंडविलें

ह्मणोनी दारोदारीं ॥ ४ ॥ परी पंढरीचें सुख पाहतां कोटि वाटे ॥ स्वप्नीही परी कोठें न देखेंची ॥ ५ ॥ उदंडा तीर्थांची ऐको जाय गौढी ॥ चित्त माझें वोढी चंद्रभागे ॥ ६ ॥ ह्मणोनी चरणांची टाकोनी साउली ॥ आलों मज सांभाळी मायबापा ॥ ७ ॥ तया देवाची वास न पाहती माझे नयन ॥ न करिती पूजन कर त्यांचें ॥ ८ ॥ तेणें पंथें माझे न चलती चरण ॥ नायकती श्रवण कीर्ति त्यांची ॥ ९ ॥ कटीं तटीं जेणें कर नाहीं ठेविले ॥ न देखें पाउलें विटेवरी ॥ १० ॥ त्यांतें ह्मणतां देव लाजे माझें मन ॥ ते कष्ट दारुण कवणा सांगूं ॥ ११ ॥ कुंचे गरुड टके न देखे पताका ॥ त्या देवाची शंका वाटे थोर ॥ १२ ॥ साचे गांवीं नाहीं वैष्णवाचा मेळु ॥ न देखें सुकाळु हरिकथेचा ॥ १३ ॥ हें जेथें न देखें तेथें खंती वाटे जीवीं ॥ ते वेळीं आठवी रूप तुझें ॥ १४ ॥ इष्टमित्रबंधु तूं कुळदेवता ॥ नामा ह्मणे आवडता प्राण माझा ॥ १५ ॥

॥ १९१३ ॥ मग केशव ह्मणे नाम्या खंती वाटे माझ्या मनीं ॥ निद्रा न लागे नयनीं पाहतां वाट ॥ १ ॥ तुजवीण उदास वाटे ही पंढरी ॥ न पडे क्षणभरीं विसर तुझा ॥ २ ॥ डोळिया वेगळा नवजे कोठें दुरी ॥ चित्त मजवरी ठेवुनी राहे ॥ ३ ॥ तुज माझी सवें मज तुझी आवडी ॥ गुळासी न सोडी गोडी जैसी ॥ ४ ॥ तैसे तुह्मी आह्मी एकमेकामाजीं ॥ विचारितां सहजीं दूजें नाहीं ॥ ५ ॥ येतया जातया पुसे तुझी गोष्टी ॥ ह्मणे माझें नामें दृष्टि पडिलें होतें ॥ ६ ॥ वाटे तानभूक पीडिल्या जाणें कोण ॥ एका मजवीण गुज साचें ॥ ७ ॥ रात्रंदिवस खेद करुनी आपुल्या जीवा ॥ असेल माझा धांवा पौकारीत ॥ ८ ॥ मजवीण कोणाचीये साउलीये बैसेल ॥ कोण त्या पुसेल शीणभागू ॥ ९ ॥ संतांपासी सांगे शिणले मजवीण ॥ कंठीं धरिला प्राण मजलागोनी ॥ १० ॥ धरुनी हनुवटी दिल्हें आलिंगन ॥ कुरवाळोनी वदन नेत्र पुशी ॥ ११ ॥ मग काढोनी कटीच्या सुमन तुळशीमाळा ॥ घातलीया गळां नामयाच्या ॥ १२ ॥ सर्वांग सुंदर पाहे कृपा-दृष्टी ॥ पुसे जीवींची गोष्टी कृपासिंधू ॥ १३ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान खेचर ॥ नरहरि सोनार आदिकरोनी ॥ १४ ॥ समस्त भक्त मिळोनी लोटांगणी येती ॥ आलिंगन देती नामयासी ॥ १५ ॥ अनिवार सुमनें वर्षती सुरवर ॥ गगनीं जयजयकार शब्द होती ॥ १६ ॥ ऋषिगणगंधर्व मिळोनी सकळिक ॥ येती दृष्टिसुख घ्यावयासी ॥ १७ ॥ तंव रुक्माई

आरती घेऊनी आली वेगें ॥ ओंवाळिले दोघे देवभक्त ॥ १८ ॥ कवतुकें नाम्याची धरिली हनुवटी ॥ पाहे कृपादृष्टी घडीये घडीये ॥ १९ ॥

॥ १९१४ ॥ मग केशव ह्मणे नाम्या धन्य तुज फावलें ॥ बरवें तुवां केलें आत्महित ॥ १ ॥ पुण्यपावन तीर्थें पाहिलीं सकळिक ॥ प्रक्षाळिलीं पातकें वासनेचीं ॥ २ ॥ धन्य तुवां केलें जन्मोनी सार्थक ॥ शोक मोह दुःख निवारिलें ॥ ३ ॥ तीर्थयात्रा फळ व्हावया संपूर्ण ॥ करी कां उद्यापन विधियुक्त ॥ ४ ॥ केलिया कष्टाचें होईल सार्थक ॥ सांगेन तें ऐक वचन माझें ॥ ५ ॥ महा मुक्तिक्षेत्र वैकुंठ भूमिवरी ॥ विख्यात पंढरी भूवैकुंठ ॥ ६ ॥ एक शीत अन्न दिलें द्विजमुखीं ॥ राहे सदा सुखी कल्पवरी ॥ ७ ॥ क्षेत्रवासी भावें पूजावे ब्राह्मण ॥ षड्रस भोजन द्यावें त्यांसीं ॥ ८ ॥ सुगंध चंदन सुमन तुळसीमाळा ॥ समर्पि तांबूला सदक्षणा तूं ॥ ९ ॥ ऐसें बोलोनियां धरीयेला करीं ॥ राउळा भीतरीं घेउनी गेले ॥ १० ॥ मग रुक्माईसी सांगे वैकुंठीचा राणा ॥ आजी आराधना नामयाची ॥ ११ ॥

॥१९१५॥ तव ते जगन्माता ह्मणे जी कृपावंता ॥ कर्ता करविता कोण याचा ॥ १ ॥ हा तुमचा दास आहे अंतरंग ॥ काय या उद्वेग करणें असे ॥ २ ॥ सर्व भार याचा लागे चालवणें ॥ ऋणेसी केलें येणें जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ तुह्मापरते यासी जीवलग सोयरे ॥ कोण आहेत दुसरे लोभापर ॥ ४ ॥ दृढ चरण धरोनी राहिला अंतरीं ॥ जालासे अधिकारी सर्वस्वाचा ॥ ५ ॥ जन्मोनियां येणें जोडिलें जें कांहीं ॥ तितुकें तुमच्या पायीं निक्षेपिलें ॥ ६ ॥ ह्मणोनी याचें कोड करावें परिपूर्ण ॥ व्हावें तूं उत्तीर्ण कृपावंता ॥ ७ ॥ मायबापें याचीं सुखें जीवलग ॥ सांडोनी तुमचा संग धरिला सुखें ॥ ८ ॥ ह्मणोनी याचें हित लागे विचारावें ॥ उचित करावें देवराया ॥ ९ ॥ आपुल्या दासाचा संभ्रम सोहोळा ॥ करावा गोपाळा ब्रीद तुमचें ॥ १० ॥ रुक्माबाई ह्मणे भाग्यवंत नामा ॥ न कळे याचा प्रेमा नित्य नवा ॥ ११ ॥

॥ १९१६ ॥ आतां जावें वेगी नामया घेउनी ॥ सांगावीं आवतणीं ब्राह्मणांसीं ॥ १ ॥ सकळकामपूर्ण असती तुमच्यापायीं ॥ विचारावें कांहीं नलगे देवा ॥ २ ॥ काय न लाभे तुमच्या कृपादृष्टी ॥ सदा सुखवृष्टि हरिच्या दासां ॥ ३ ॥ मग नामयाचा हात वा धरोनी ॥ निघाले तत्क्षणीं अक्षता द्यावया ॥ ४ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर जगमित्र सोपान ॥ सांवता

निधान घेउनी संगें ॥ ५ ॥ चोखामेळा वंका काठी कर पुढें ॥ दोही बाहीं देव्हडे सनकादिक ॥ ६ ॥ नामयाचे पाठीं चाले केशीराज ॥ लागावया रज चरणीचे ॥ ७ ॥ आपुल्या दासाचा सिद्धि न्यावा पणू ॥ ह्मणूनियां यजमानु झाला देव ॥ ८ ॥ तेणें मिसें करीतसे क्षेत्रप्रदक्षिणा ॥ प्रार्थित ब्राह्मणा परम प्रीती ॥ ९ ॥ अनाथाचा नाथ दीनाचा गोसावी ॥ आवडी नित्य नवी सेवकाची ॥ १० ॥ तो या नामयाचा सुखाचा श्रृंगारु ॥ रुक्मादेवी वरु श्रीविठ्ठलु सदां ॥ ११ ॥ तंव ते आध्यात्मीक पंडित अग्निहोत्री ॥ एक ह्मणविती श्रोत्रीं सदोदित ॥ १२ ॥ आह्मासीं हो तुमचें नाहीं स्वरूपज्ञान ॥ अपूर्व दर्शन झालें आजी ॥ १३ ॥ सुखाचें पारणें करावलें या रूपें ॥ तेणें त्रिविधताप निवारिले ॥ १४ ॥ कोण वृत्ति चालवीजे व्यापार ॥ योजिलें बिढार कवणे ठायीं ॥ १५ ॥ आजीचें निमित्त काय उपस्थित ॥ ऐकोनी पंढरिनाथ बोलते झाले ॥ १६ ॥ माझी कुळवृत्ति हरिदासां ठाउकी ॥ मजसी वोळखी तिखट असे ॥ १७ ॥ मज असंगासीं संग सर्वकाळ सांचा ॥ अनंत जन्माचा ऋणानुबंधू ॥ १८ ॥ साक्ष तुमचे चरण करुनी बोले वाचा ॥ मी मैत्र नामयाचा अंतरंगु ॥ १९ ॥ करोनियां स्नानविधि यावें शीघ्रवत ॥ करावें सनाथ कृपादृष्टी ॥ २० ॥ बिढार तरी असे राउळा भीतरीं ॥ नांव सांगों तरी अनंत जाणा ॥ २१ ॥ जीवाचें गूजगौप्य संतांसीं पुसावें ॥ निःसंदेह यावें भोजनासीं ॥ २२ ॥ ऐसी ते अमृतवाणी ऐकोनी श्रवणीं ॥ आनंदले मनीं भूदेव ते ॥ २३ ॥ आज्ञा करिती देवा जावें निजमंदिरां ॥ शीघ्रवत करा पाकसिद्धी ॥ २४ ॥ मग रुक्माईसीं सांगे सकळ विवंचना ॥ प्रार्थिलें ब्राह्मणां सकळिकांसीं ॥ २५ ॥ कर्मठ अभिमानी नोळखती मज ॥ देखोनियां चोज वाटे त्यांसीं ॥ २६ ॥ कुलवृत्ति नाम पुशिलें मज तीहीं ॥ सांगितलें म्यांही सर्व त्यांसीं ॥ २७ ॥ सांगितला संताचा मी मैत्र नामयाचा ॥ अनंत जन्माचा निकट ह्मणोनी ॥ २८ ॥ बिढार तरी असे राउळा भीतरीं ॥ सांगे खूण परी नकळे त्यांसीं ॥ २९ ॥ नाम तरी अनंत दाविला संकेत ॥ परी न घे त्यांचें चित्त आठवण ॥ ३० ॥ तंव ते विश्वमाता ह्मणे कृपानिधी ॥ सदां भेदबुद्धि त्यांच्याठायीं ॥ ३१ ॥ विद्यामद जाति कुळाचा अभिमान ॥ त्या कैचे चरण प्राप्त तुमचे ॥ ३२ ॥ उदार चक्रवर्ती भक्तांचा विसावा ॥ त्याच्या निजभावा वेळाईतु ॥ ३३ ॥ तो भाग्यें जोडला वैकुंठीचा ठेवा ॥ उजरी झाली दैवा नामयाच्या ॥ ३४ ॥

॥ १९१७ ॥ रिद्धि आणि सिद्धि उभ्या महाद्वारीं ॥ तिहीं सर्व सामोग्री सिद्ध केली ॥ १ ॥ सडेसंमार्जन गुडीया तोरणें ॥ शृंगारिलीं भुवनें परिकरें ॥ २ ॥ ह्मणती काय पुण्य केलें विष्णुदासें ॥ देवा लोभ-पीसें लावीयेलें ॥ ३ ॥ द्वारीं दिपावळी चौक रंगमाळा ॥ अभिनव सोहळा आरंभीला ॥ ४ ॥ हर्षें मंगळ तुरे वाजती विनोदें ॥ भक्त जयजय शब्दें गर्जताती ॥ ५ ॥ मंगळमार्जन नामयातें करविलें ॥ मग आरंभिलें पुण्याव-चन ॥ ६ ॥ देवें अंगवस्त्रें आपुलेनी हातें ॥ वाहिलीं अनंतें विष्णुदासा ॥ ७ ॥ सत्यभामा राई रुक्माई जननी ॥ वेगीं अक्षवाणीं घेउनी येती ॥ ८ ॥ आनंदें नरनारी कवतुक पाहती ॥ जीवें वोवाळिती नामयासी ॥ ९ ॥ आपुलिया दासाचा करी समारंभू ॥ दिनानाथ प्रभू कृपासिंधू ॥ १० ॥ धन्य हा बा नामा ह्मणती सकळ लोक ॥ नेणती याचें सुख ब्रह्मादिक ॥ ११ ॥

॥ १९१८ ॥ झाला स्वयंपाक स्नानविधि सारा ॥ सकळां हांकारा जाणवीली ॥ १ ॥ आले महाद्वारीं दिधलीं आसनें ॥ पूजा नारायणें आरंभिली ॥ २ ॥ तव ठकलों ह्मणती देव पहावो कैसें जालें ॥ सर्व सुख नेलें इहीं भक्तीं ॥ ३ ॥ रत्नजडित पाट सत्वरी आणिले ॥ वरी द्विज बैसविले पृथक्कार ॥ ४ ॥ प्रक्षाळोनी चरण पुशिले पितांबरें ॥ म-स्तकीं आदरें तीर्थ वंदी ॥ ५ ॥ कस्तुरीचे टिळे दिव्य चंदन उटी ॥ घात-लिया कंठीं तुळशी माळा ॥ ६ ॥ दशांग धूप रत्नाचा दीपक ॥ वोवाळी नायक वैकुंठीचा ॥ ७ ॥ दोही बाहीं पंक्ति मांडिल्या देव्हडीं ॥ राही रुक्माई परवडी वाढितसे ॥ ८ ॥ चतुरविध अन्नें आथिलीं बहुगुणें ॥ षड्सपक्वान्नें सर्वांठायीं ॥ ९ ॥ मग संकल्प सोडिला नामयाचे करें ॥ भक्त जयजयकारें गर्जिन्नले ॥ १० ॥ भोक्ता नारायण लक्ष्मीचा पती ॥ ह्मणोनी प्राणाहुती घेतल्या वेगीं ॥ ११ ॥ भर्ता भोक्ता कर्ता करविता आपण ॥ सहज तेथें पूर्ण सकळकाम ॥ १२ ॥ विश्वंभर मग कृपादृष्टि न्याहाळीत ॥ प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥ १३ ॥ देखोनी ते समृद्धि हरिखले द्वीज ॥ झालें नवल चोज पाहा कैसें ॥ १४ ॥ कोण हा ग्रहस्थु केव्हढा भाग्यवंतु ॥ नेणवे अद्भुत महिमा याचा ॥ १५ ॥ ऐसे जेविले आनंदें धाले परामानंदें ॥ मुख-शुद्धि गोविंदें दिधली करीं ॥ १६ ॥ कर्पूरेंसहित समर्पिले विडे ॥ कर जोडोनि पुढें विनवीतसे ॥ १७ ॥ ऐसा भक्तकाम कृपाळू दिनाचा ॥ कण-

वाळू भक्तांचा उभा असे ॥ १८ ॥ तया नामदेवें भुलवीलें लोभें ॥ वेढा-
वले उभे चिदानंद ॥ १९ ॥

॥ १९१९ ॥ सकळीकां नमस्कार करूनियां देवराव ॥ सांगे जीवी-
चा भाव तयांप्रती ॥ १ ॥ तुह्मी कृपादृष्टि करावें भोजन ॥ जेणें होईल
संपूर्ण व्रतसिद्धी ॥ २ ॥ हेचि आवडी आहे माझ्या जीवीं ॥ ते आजी
गोसावी पूर्ण कीजे ॥ ३ ॥ क्षणएक बैसावें स्वस्थ अंतःकरणें ॥ संकल्पिलें
नारायणें तुळसीदळ ॥ ४ ॥ संतुष्ट मानसें यातें अंगिकारा ॥ मग निज
मंदिरा जावें स्वामी ॥ ५ ॥ आजि तुमचा लाभू जाला भाग्ययोगें ॥
नाम्याच्या प्रसंगें घडली सेवा ॥ ६ ॥ तुह्मी ऋत्विज ब्रह्मादिकां पूज्य ॥
संभाळिलें मज कृपादृष्टी ॥ ७ ॥ मज निरालंबासी करोनी अवलंबन ॥
निष्कामासीं पूर्ण केलें काम ॥ ८ ॥ अकर्ता असंगु तुमचेनी कृतार्थ ॥ जालों
पै यथार्थ वचन माझें ॥ ९ ॥ मग ते चतुर्वेदी महामंत्रेश्वर ॥ द्विज जयजय-
कार करिताती ॥ १० ॥ बीज सर्वकाळ व्हावें पुढतो पुढती ॥ आशिर्वाद देती
मंत्राक्षता ॥ ११ ॥ पितांबराचे आचळीं घेउनी मंत्राक्षता ॥ घालीतसे माथा
नामयाच्या ॥ १२ ॥ हेंचि तुझें प्रेम असो निरंतर ॥ मुखीं नामसादर राहो सदां
॥ १३ ॥ तंव ह्मणती धरामर तुह्मी श्रमलेती थोर ॥ लागला उशीर
भोजनासीं ॥ १४ ॥ सर्वांठाई तुह्मी सर्वच होउनी एक ॥ कार्याचें सार्थक
केलें नीकें ॥ १५ ॥ स्वामीचा आदर सांगतां अभिनव ॥ नम्रता गौरव
नीरूपमू ॥ १६ ॥ आकल्पकल्प आयुष्य चिरंजीव व्हावें ॥ आह्मां सांभाळावें
पुढतापुढती ॥ १७ ॥ आतां संताचीया पंक्तीं सारावें भोजन ॥ करावें
परिपूर्ण जीवीचें कोड ॥ १८ ॥ उच्छिष्ट प्रसाद द्यावा नामयातें ॥ आस
करुनी पाहत वाट तुमची ॥ १९ ॥

॥ १९२० ॥ मग सुवर्णाचीं ताटीं पक्वान्नें भरोनी ॥ परीकर रुक्माईनीं
आणियेलें ॥ १ ॥ कनक कळस घेउनी सत्यभामा आली ॥ आपोशन
घाली देवराया ॥ २ ॥ सुखाचा सुरतरु भक्त चिंतामणी ॥ पुरवीतो
आयणी निजभक्तांची ॥ ३ ॥ तेथें उद्धव अक्रूर नारदतुंबर ॥ आणिक
अपार भक्तपंक्ती ॥ ४ ॥ महाद्वारीं होता उभा नामा ठेला ॥ तो
जवळीं बोलाविला केशीराजें ॥ ५ ॥ देवाचा वोरसु देखोनी गौरव ॥
देहीं देवभाव विसरला ॥ ६ ॥ निजबोध निवृत्ति राहिली निवांत ॥
हृदयीं वोसंडीत परमरसें ॥ ७ ॥ देखोनी पंढरीनाथ धाविन्नला वेगीं ॥

जैसी वत्सालागीं तान्हे धेनू ॥ ८ ॥ उचलोनी चहूं भुजीं दिलें आलिंगन॥ आणिलें उमजून देहावरी ॥ ९ ॥ धरोनी बाहुवटी बैसविला तातीं ॥ स्फुंदतां हिंपुटीं होत असे ॥ १० ॥ अंतरींचें गुज बोले कृपादृष्टी ॥ धरूनी हनुवटी नामयाची ॥ ११ ॥ कुर्वाळोनी माथा घास घाली मुखीं ॥ तंव लक्ष्मिपति तन्मय होतू ॥ १२ ॥ ह्मणे जिवलगा बोले सुख गोष्टी ॥ आर्त आहे पोटीं बहुत माझे ॥ १३ ॥ अंतरीचें सुख बाहेरी तूं पाहे ॥ गगना काय आहे पाठीपोटीं ॥ १४ ॥ तैसा तो आनंदू आहे पै निर्मळ ॥ चिद्रूप केवळ सदोदित ॥ १५ ॥ तुझें तेंचि माझें माझें तेंचि तुझें ॥ आहेरे सहज एकविध ॥ १६ ॥ परतोनियां दृष्टि घाली मजवरी ॥ मीचि निरंतरी तूंचि होसी ॥ १७ ॥ हा तुझा सोहाळा पाहे उघडा डोळां ॥ जव मी आहे जवळां ज्ञानदीपू ॥ १८ ॥ तुझे भेटी आर्ता आले भक्तराणे ॥ सुखाचें पारणें करवीं त्यासी ॥ १९ ॥ परमानंद मूर्ति धन्य हा निवृत्ति ॥ सुखाचा सांगाती ज्ञानदेव ॥ २० ॥ पवित्र हा सोपान परलोकीचें तारूं ॥ करी याचा आदरु भाग्यवंता ॥ २१ ॥ ह्मणोनी पंढरीनाथें आश्वासिलें करें ॥ मिठी दिल्ही त्यारें चरणकमळीं ॥ २२ ॥ नामा ह्मणे तुझे कृपेचा ओलावा ॥ विश्रांति या जिवा झाली असे ॥ २३ ॥

॥ १९२१ ॥ नामयाचे मुखीं देऊनी कवळू ॥ पुसतसे गोपाळु शिणभागू ॥ १ ॥ जें करकमळ सनकादिकांचें शिरीं ॥ नामा तिहीं करीं कुरवाळिला ॥ २ ॥ ह्मणे सोडी सर्व खंती जीवींची कोजळी ॥ विश्रांति जवळी आहे तुज ॥ ३ ॥ वियोगाचे शोकें शिणलासी मार्गीं ॥ देह मजलागीं वाळविला ॥ ४ ॥ कोमाइलें वदनीं रंजलासी नयनीं ॥ नेणें तुझी कोणी तानभूक ॥ ५ ॥ गेलासी जवळूनी ज्या दिवसापासोनी ॥ न दिसे मज कोणी आवडतें ॥ ६ ॥ धीर न धरवे जीवा पाहे दाही दिशा ॥ माझा विष्णुदास येईल केव्हां ॥ ७ ॥ पाहे मी गरुडपारीं पाहे महाद्वारीं ॥ पाहे भीमातीरीं चंद्रभागे ॥ ८ ॥ पाहे पद्मतीर्थीं पाहे वेणूनादीं ॥ नलगे तुझी शुद्धि खंती वाटे ॥ ९ ॥ अनुदिनीं भोजन करितां उदकपान ॥ तेव्हां आठवण होय तुझी ॥१०॥ ह्मणे मी धांवत येसी न कळत ॥ प्रसादाचें आर्त बहु तुज ॥ ११ ॥ धांवोनीयां येसी आलिंगन देसी ॥ पुसेन सांगसी सुखें गोष्टी ॥ १२ ॥ तेणें हर्षें निघती डोळियासीं दोंदें ॥ हृदय माझें कोंदे करुणा रसें ॥ १३ ॥ आवडतें आलुकें जननीयेचें बाळ ॥ जाणतें कृपाळ

भूक त्याची ॥ १४ ॥ तैसा पंढरीनाथ मोहें वोसरला ॥ नाम्यातें पाजिला प्रेमपान्हा ॥ १५ ॥

॥ १९२२ ॥ ऐसी ते जेवणीं ब्रह्मरसाची धणी ॥ पुरवीली आयणी निजभक्तांची ॥ १ ॥ नाम्याचें उच्छिष्ट स्वीकारिलें देवें ॥ कवतुक अवघे पाहती द्विज ॥ २ ॥ ह्मणती आह्मा येणें कैसी केली भाव ॥ बुडविलें सर्व क्रियाकर्म ॥ ३ ॥ नेणवे हा कोण दिसे तरी सुलक्षण ॥ नव्हे क्षत्रि ब्राह्मण वैश्य शूद्र ॥ ४ ॥ चहूंवर्णीं वेगळी दिसे याची लीळा ॥ विस्मृति सकळां पडिली कैसी ॥ ५ ॥ निर्धारें नाम्याचा होय मायबापू ॥ सोडविला संकल्पू याच्या हातीं ॥ ६ ॥ कायावाचामनें लोभ याचेवरी ॥ घातलिया शिरीं मंत्राक्षता ॥ ७ ॥ एक ह्मणती झाले होते ते निर्माण ॥ आतां आपुलें आपण गौप्य करा ॥ ८ ॥ लौकिकीं ही मात प्रगट करा ह्मणी ॥ न बोलावी कोणी कोणापाशीं ॥ ९ ॥ एक ह्मणती आतां यासींच वाळावें ॥ आपुलें टाळावें लोकनिंद्य ॥ १० ॥ अज्ञानासी दोष नाहीं प्रत्यवाय ॥ शास्त्रीं हा उपाय सिद्ध असे ॥ ११ ॥ आत्मशुद्धिलागीं करा विचारणा ॥ करा मंत्रस्नाना त्रिपदा जपू ॥ १२ ॥ ह्मणोनी सत्वर चालिले अघवे ॥ प्रार्थूनियां देवें बोलाविले ॥ १३ ॥ संकोचित मनें दिसतां कवण्या गुणें ॥ कोमाईलीं वदनें सकळिकांचीं ॥ १४ ॥ काय शंका वाटे तुमच्या मनीं स्वामी ॥ ते कृपा करुनी सांगा मज ॥ १५ ॥ मनाचे मवाळ तुह्मी ब्रह्मबीज ॥ गौप्य नये गूज करूं कांहीं ॥ १६ ॥ मी तुह्मां सकळांचें असें कृपापात्र ॥ सांगा जीवींचें आर्त करीन पूर्ण ॥ १७ ॥ मग संपूर्ण दक्षणासहित तुळसीदळ ॥ वरी या पुण्यजळ प्रोक्षुनीयां ॥ १८ ॥ चरणावरी नामा घालोनी निरवी ॥ ह्मणे कृपा असों द्यावी याच्यावरी ॥ १९ ॥

॥ १९२३ ॥ जातींचे हे शिंपी विश्व जाणे यातें ॥ आणि प्रत्यक्ष सांगतें जेवविलें ॥ १ ॥ उच्छिष्ट निजमुखीं स्वीकारिलें याचें ॥ उरलें तें तुह्मा कैचें क्रियाकर्म ॥ २ ॥ न कळे हा निर्धार भ्रांति वाटे आह्मा ॥ काय तुमचा नामा अंगभूत ॥ ३ ॥ नवल हें आवडी लौकिका वेगळी ॥ बुडविले सकळीं समूळ धर्म ॥ ४ ॥ कोणा लोभें तुह्मां लावियेला चाळा ॥ कृपेचा कळवळा निरोपमू ॥ ५ ॥ विचारितां तुह्मी आहां वेषधारी ॥ लीला औडुंबरी दिसे तुमची ॥ ६ ॥ वर्णाश्रमधर्म न दिसे तुमच्याठाई ॥ निर्धारुचि कांहीं न कळे आह्मां ॥ ७ ॥ वंद्य निंद्य तुह्मा न दिसेचि

कोणीही ॥ दृष्टि दुजेपणीं न पडे तुमची ॥ ८ ॥ विश्व आत्मरूप दिसे तुह्मां सर्व ॥ नेणवे हे मात्र ब्रह्मादिकां ॥ ९ ॥ आह्मीं विश्वासलों वरवेषा तुमचा ॥ परी भाव अंतरींचा न कळे कांहीं ॥ १० ॥ आपुलें स्वहित देखोनी आपण ॥ पाप अथवा पुण्य विचारावें ॥ ११ ॥ सर्वभावें करुनी विधितें पाळावें ॥ सत्य सांभाळावें वेदवचन ॥ १२ ॥ वर्णाश्रमपरत्वें बोलिले जे धर्म ॥ तें तें विहितकर्म आचरावें ॥ १३ ॥ स्वामिचें वचन स्वामिनीं पाळावें ॥ यश तें मिरवावें उभयलोकीं ॥ १४ ॥ तरी हा तुमचा जीवलग नामा ॥ निर्धारें हें आह्मां कळों आलें ॥ १५ ॥

॥ १९२४ ॥ नामायातें आह्मीं जेवविलें सांगातें ॥ हा दोष आह्मांतें ठेवा ह्मणीं ॥ १ ॥ सर्वत्र चाळक एकचि चैतन्य ॥ वंद्यनिंद्य कोण ह्मणे स्वामी ॥ २ ॥ तरी पुण्यपाप आह्मा नाहीं कदां ॥ असो शुद्धबुद्ध निरंतर ॥ ३ ॥ देह ह्मणाल जरी वोडंबर पापाचें ॥ अंबरीं अभासाचें अभ्र जेवीं ॥ ४ ॥ नामा ऐसें नाम कवणिया अवयवां ॥ सांगा तुह्मी देवा साच करोनी ॥ ५ ॥ तरी तो दोष जीवनीं कीं गगनी ॥ पवनी कीं धरणीमाजीं होता ॥ ६ ॥ तो तुह्मासी गोचरू झाला कवणें व्यक्तीं ॥ हे खूण निरुती सांगा मज ॥ ७ ॥ तुह्मी वेदवक्ते सर्वशास्त्र दृष्ट ॥ परि नाहीं आत्मदृष्ट पावलेती ॥ ८ ॥ भेद भ्रम तुमचा नाहीं मावळला ॥ श्रमुची उरला संदेहेसी ॥ ९ ॥ जे वेळीं संकल्प फेडिला पैं येणें ॥ तुह्मी आपोशनें घेतलीं कैसीं ॥ १० ॥ ते वेळां नाहीं केली ही विचारणा ॥ अधिकार अन्ना आहे कीं नाहीं ॥ ११ ॥ याचिलागीं तुह्मी प्रार्थुनी खुणा सांगा ॥ नाम्याच्या प्रसंगां घडली सेवा ॥ १२ ॥ आशिर्वाद तुह्मी दिल्हीं मंत्राक्षता ॥ त्या त्याचे माथा टाकियेल्या ॥ १३ ॥ मज निरालंबासी तुह्मी करोनी अवलंबन ॥ निष्कामासी पूर्ण केलें काम ॥ १४ ॥ हें माझें बोलणें तुह्मी ऐकोनी सकळीकीं ॥ परी अझुनी ओळखी न धरा माझी ॥ १५ ॥ निःसंदेह भोजन केलें आजि तुह्मी ॥ उरलें शेष आह्मी स्वीकारिलें ॥ १६ ॥ यासी विधियुक्त कोण प्रायश्चित्त ॥ सांगा कोण ग्रंथ साच करुनी ॥ १७ ॥ हरिदासाचे रज आणि तुमचें चरणतीर्थ ॥ येणेंचि पवित्र तनु माझी ॥ १८ ॥ येरु तुमचा भावो तोचि फळला तुह्मा ॥ नामा तरी आह्मा निष्कलंकू ॥ १९ ॥ मग केशव ह्मणे माझें परिसा वचन ॥ गुज मी सांगेन अंतरींचें ॥ २० ॥

॥ १९२५ ॥ व्रत तप दान सकळ कर्मक्रिया ॥ एक भूतदया असे जेथें ॥ १ ॥ तोचि सत्य मानी भक्त आणि ज्ञानी ॥ न विसंबे निर्वाणीं जीवें त्यासी ॥ २ ॥ ज्ञानाचें सौभाग्य भक्ति आणि वैराग्य ॥ तयाचें आरोग्य प्रेमरस ॥ ३ ॥ त्यासी संजीवनु सदा संत संगू ॥ त्यावरी अनुरागू वज्र कवच ॥ ४ ॥ धर्म अर्थ काम मोक्षदृष्टि नाणी ॥ वोळंगती आंगणी मुक्ति चारी ॥ ५ ॥ अनुहात गजरू होतसे नामाचा ॥ दीप त्या लक्षाचा पाजळी तू ॥ ६ ॥ इंद्रपदादिक नाशिवंत होती ॥ ह्मणोनी आसक्ती न धरावी त्यांची ॥ ७ ॥ हें जाणोनी साच न धरावी त्यांची आस ॥ अखंड माझा वास हृदयीं त्याच्या ॥ ८ ॥ ह्मणोनी ये संसारीं धन्य एक नामा ॥ जेणें माझा प्रेमा अनुभविला ॥ ९ ॥ काम क्रोध वैरी दुराविले दुरी ॥ मज हृदयमंदिरीं सांठविलें ॥ १० ॥ ह्मणोनी मी त्याच्या उच्छिष्टा झालोंसे अधिकारी ॥ ब्रह्मरसा सरी नपवी जेथें ॥ ११ ॥

॥ १९२६ ॥ महा मुक्ति क्षेत्र तीर्थाचें तारक ॥ उपमेसी आणीक नाहीं दुजें ॥ १ ॥ तें हें पंढरपूर प्रेमाचें भांडार ॥ नाम निरंतर गर्जतसे ॥ २ ॥ येवढें तीर्थ जवळी असतां पैं समर्थ ॥ कोण भाग्यहत दैन्य भाकी ॥ ३ ॥ जीवन्मुक्त ज्ञानी येथें पुंडलिकमुनि ॥ बैसलासे ध्यानीं पर लक्षी ॥ ४ ॥ योग्यांचे हृदयींचें निजध्यान नेटकें ॥ तें जयाचें नीकें वेडावलें ॥ ५ ॥ पुण्यपावन भीमा दक्षण वाहिनी ॥ अमृत संजीवनी पुण्यराशी ॥ ६ ॥ आनंद रस कूपीका प्रत्यक्ष चंद्रभागा ॥ दर्शनें नयागा गर्भवासा ॥ ७ ॥ स्वर्गीं मंदाकिनी लाजोनी राहिली ॥ पाताळीं प्रवेशली भागीरथी ॥ ८ ॥ सहस्र भाग भेणें होउनी भागीरथी ॥ सागरा मिळती झाली वेगें ॥ ९ ॥ ऐसे भक्तजन भाग्याचें कीं सुख आरोग्याचें ॥ जें कां वैराग्याचें जन्मभुमी ॥ १० ॥ तेथें हर्षें निर्भर नामा संतांचे संगतीं ॥ गीतीं गाय कीर्ती विठोबाची ॥ ११ ॥

॥ १९२७ ॥ सकाम निष्काम वाचे ह्मणे राम ॥ तो माझा परम प्राणसखा ॥ १ ॥ जीवाहूनि आवडता न करी जीवा परता ॥ पूजी परम देवता भावें त्यासी ॥ २ ॥ हे माझी प्रसिद्धि जगीं ब्रीदावळी ॥ हरिदासाचे कुळीं वोळंगे सदां ॥ ३ ॥ जन्मोनी ज्याचे कुळीं एक हरिदास ॥ धन्य त्याचा वंश पुण्यशीळ ॥ ४ ॥ काया वाचा मनें न विसंबे त्यासी ॥ ते माझ्या दैवासी दैव झाले ॥ ५ ॥ नामधारकाचें उच्छिष्ट जेथें पडे ॥ उभा

राहोनी पुढें झेली मुखें ॥ ६ ॥ तें मज गोमटें सेवितां सुख वाटे ॥ ह्मणोनी धाटें मोठें शरीर माझें ॥ ७ ॥ बहु कांति पुष्टि यश कीर्ति प्रभा ॥ नित्य नवी शोभा होय तेणें ॥ ८ ॥ ते संत सोयरे भेटती जे वेळीं ॥ ते माझी दिवाळी दसरा सण ॥ ९ ॥ ह्मणोनी नाम्यातें जेवविलें सांगातें ॥ बहु दिवस होते आर्त पोटीं ॥ १० ॥ झालें तें सर्वथा नव्हे पैं अन्यथा ॥ पुढती सांगा आतां काय करणें ॥ ११ ॥

॥ १९२८ ॥ तंव ह्मणती द्वीज परियेसी गुणनिधी ॥ प्रतिपादिलें वेदीं जे जे धर्म ॥ १ ॥ ते ते आचरावे विहित क्रियाकर्म ॥ जे जे वर्णाश्रम आले जया ॥ २ ॥ तोचि एक धन्य जगीं देहधारी ॥ असतां संसारीं जीवन्मुक्त ॥ ३ ॥ आचार प्रथम ब्राह्मणाचा धर्म ॥ शौच नित्यनेम सत्य वाणी ॥ ४ ॥ तप शम दम भूतदया पूर्ण ॥ अखंड अनुसंधान स्वस्वरूपीं ॥ ५ ॥ स्नानसंध्या जप होम अध्यायन विधी ॥ देवार्चनसिद्धि करुनी भावें ॥ ६ ॥ वैश्वदेव आणि अतिथी पूजन ॥ करावा ब्रह्मयज्ञ आवश्यक ॥ ७ ॥ संपादुनी हे विधि सारावें भोजन ॥ त्यावरी श्रवण पुराणांचें ॥ ८ ॥ सर्वकाळ व्हावें संतुष्ट मानस ॥ असावा विश्वास वेदवचनीं ॥ ९ ॥ तुह्मी तंव सर्वज्ञ संपन्न चतुर ॥ देखावा विचार विशुद्धीचा ॥ १० ॥ सांडोनी अभिमान व्हावें शुद्धमती ॥ जोडावी ते कीर्ति उभयलोकीं ॥ ११ ॥ जावें चंद्रभागे करावें शुद्धस्नान ॥ द्यावें होमदान सत्वशुद्धी ॥ १२ ॥ पुण्यजना एकीं क्षेत्रप्रदक्षणा ॥ करूनिया जाणा पवित्र कूळ ॥ १३ ॥ ऐकोनी पंढरीरावो बोलते झाले वाचा ॥ आज्ञा ते शिरसा स्वामीयांचीं ॥ १४ ॥ परी काया वाचा मनें मागेन तें द्यावें ॥ माझ्या सांभाळावें नामयासी ॥ १५ ॥

॥ १९२९ ॥ तुह्मी सदाचार महंत ब्रह्मवादी ॥ तुमची वाग नदी ब्रह्मरूप ॥ १ ॥ सत्य वचन जळ पवित्र तें निर्मळ ॥ कृतार्थ तेणें केवळ झालोंसें मी ॥ २ ॥ हा तुमचा विश्वास दृढ आहे मज ॥ तुह्मी माझे पूज्य परम देव ॥ ३ ॥ स्नानाचा प्रकार आहे पंचविध ॥ सांगेन विद्वद भाव साचा ॥ ४ ॥ अर्थीं ठेवुनी दृष्टि विवेक घ्यावा पोटीं ॥ प्रत्यया येईल गोष्टी अनुभवाची ॥ ५ ॥ उत्तमाहूनि उत्तम सत्य वागस्नान ॥ या परतें पावन आणिक नाहीं ॥ ६ ॥ काया वाचा मनें हें दृढ धरीजे ॥ हेळाची तरीजे भवसागरु ॥ ७ ॥ बाहेरीं भीतरीं शुद्ध सर्वकाळ ॥ हें दुजें

निर्मळ शुद्धस्नान ॥ ८ ॥ हें जया सदैवा घडे भाग्ययोगें ॥ मग तया नलगे साधन कांहीं ॥ ९ ॥ सकळ इंद्रियांचा करोनी निग्रहो ॥ दंडावा विग्रहो वासनेचा ॥ १० ॥ हें तिजें निर्मळ घडे जया स्नान ॥ नलगे अनुष्ठान करणें त्यासी ॥ ११ ॥ सर्वभूतीं करुणा हेंचि पैं चवथें स्नान ॥ साधितो सज्जन विरळा कोणी ॥ १२ ॥ त्याचेनि दर्शनें जळती पापराशी ॥ तो सर्वां तीर्थांसी तीर्थरूप ॥ १३ ॥ पांचवें स्नान काया प्रक्षाळावी जळीं ॥ करणें ते आंघोळी लौकिकाची ॥ १४ ॥ काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर ॥ हे दोष दुर्धर देहामाजीं ॥ १५ ॥ विवेक वैराग्य धरावें मानसीं ॥ राहावें संगतीसी संतांचिया ॥ १६ ॥ अनंत जन्माचें हेंचि प्रायश्चित्त ॥ ज्याचे वाचे नित्य रामकृष्ण ॥ १७ ॥ शांति क्षमा दया निजबोध निवृत्ती ॥ अखंड खेळती जयापाशीं ॥ १८ ॥ तो एक संसारीं धन्य शिंपी नामा ॥ आवडता आह्मा जीवाहोनी ॥ १९ ॥

॥ १९३० ॥ प्रार्थुनी सकळीकां बोले यादवराव ॥ फेडावा संदेह वासनेचा ॥ १ ॥ स्नानविधीलागीं जावें चंद्रभागे ॥ संताचेनि संगें आह्मीं तुह्मीं ॥ २ ॥ बाप भक्तप्रिय कैवारिये मुरारी ॥ लीला औदुंबरीं खेळ खेळू ॥ ३ ॥ नामयाचा हात धरोनी करकमळीं ॥ चाले वनमाळी समारंभें ॥ ४ ॥ नरनारी कवतुक पाहाती सकळिक ॥ स्वर्गीं ब्रह्मादिक ठकले ठेले ॥ ५ ॥ सकळ संतमेळासहीत शारंगधरू ॥ पाठिसी दळभारू ब्राह्मणांचा ॥ ६ ॥ आले चंद्रभागे हरिनाम गर्जत ॥ केला प्रणिपात पुंडलिकासी ॥ ७ ॥ प्रक्षाळोनी चरण केलें प्राणायाम ॥ बाप सकळधर्म जाणतसे ॥ ८ ॥ समस्त द्विजकुळां करोनी प्रदक्षिणा ॥ आरंभिलें स्नानविधी देवें ॥ ९ ॥ चाचर कुरळ केश शिरीं रुळती पाठीवरी ॥ पितांबरधारी शामतनू ॥ १० ॥ सुंदर कमळनयन मुख प्रभाराशी ॥ तें ध्यान मानसीं सनकादिकां ॥ ११ ॥ मग गोमयमृत्तिका आणोनियां देखा ॥ प्रक्षाळूनी उदका वेदमंत्रें ॥ १२ ॥ करूनी प्रयोग सारियेलें स्नान ॥ केला परिधान सोनसळा ॥ १३ ॥ ब्राह्मणाचें तीर्थ मस्तकीं वंदिलें ॥ अभिवंदन केलें हरिच्या दासां ॥ १४ ॥ सारोनियां संध्या नित्य नेम सर्व ॥ पूजिले भूदेव दिधलीं दानें ॥ १५ ॥ ह्मणे कृपादृष्टि मज केलें सनाथ ॥ पुरविले आर्त हृदयींचे ॥ १६ ॥ येथुनि संशयो न धरावा मानसीं ॥ मानावें आह्मासीं आत्मरूप ॥ १७ ॥ मग चालिले सत्वर आले

महाद्वारां ॥ आज्ञां द्विजवरां दिधली देवें ॥ १८ ॥ तेथें हरिखें निर्भर नामा निजबोधें ॥ नाचतो आनंदें गरुडापरी ॥ १९ ॥

॥ १९३१ ॥ मग समस्त भक्तमंडळीसहित वनमाळी ॥ प्रवेशले राऊळीं परमानंदें ॥ १ ॥ राही रखुमाई सत्यभामा वेगीं ॥ देवातें अष्टांगीं नमस्कारिती ॥ २ ॥ बाप सुखसिंधु स्वामी आर्तबंधु ॥ प्रीति परमानंदू निजभक्तां ॥ ३ ॥ सत्यभामेनें केलें प्रक्षाळण चरणां ॥ रुक्माई विंजना जाणविती ॥ ४ ॥ विडा देती राही उभी उजव्या बाहीं ॥ दृष्टि ठेवुनी पायीं कवळी मनें ॥ ५ ॥ शुक सनकादिक नारद तुंबर ॥ करती जयजयकार नामघोषें ॥ ६ ॥ आले बंदीजन पढती ब्रीदावळी ॥ ध्यान हृदयकमळीं चंद्रचूडा ॥ ७ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान सावता ॥ जवळी त्या जनमित्रा बोलाविलें ॥ ८ ॥ सकळिक संतां परमानंदें तृप्ती ॥ सारोनी श्रीपति आरोगणां ॥ ९ ॥ मग बैसोनी एकांतीं पंढरीचा राणा ॥ करीतसे विचारणा निजभक्तांसी ॥ १० ॥ सकळिक ब्राह्मण आणावे भोजना ॥ निरसावी वासना संदेहाची ॥ ११ ॥ उठोनी प्रातःकाळीं यावें शीघ्रवत ॥ द्यावया अक्षत ब्राह्मणांसी ॥ १२ ॥ निजबोधें आनंदें हर्षें खेळेमेळें ॥ भोगावे सोहळे स्वानंदाचे ॥ १३ ॥ फोडावी तयाची भेद भ्रमदृष्टी ॥ द्यावी तया भेटी निजरूपाची ॥ १४ ॥ संतसंगतीचा प्रकट व्हावा महिमा ॥ द्यावा भक्तिप्रेमा नामयासी ॥ १५ ॥

॥ १९३२ ॥ मग सुख शेजारीं देव पर्यंकीं पहुडले ॥ विश्रांति गेले सकळभक्त ॥ १ ॥ ब्रह्मवीणा करीं घेउनी ब्रह्मसूत ॥ जाणवी एकांत नारदमुनी ॥ २ ॥ बाप पंढरीनाथ सुखाचा सुखसिंधू ॥ नित्य नवा आनंदु सोहळा करी ॥ ३ ॥ विश्रांति विसांवा जें विश्व मंगळ ॥ तें नाम निर्मळ विठोबाचें ॥ ४ ॥ तो भक्तशिरोमणी वैराग्य पुतळा ॥ गातो प्रेमकळा धरुनी कंठीं ॥ ५ ॥ तेणें श्रवणामृतें हृदय कोंदाटलें ॥ प्रेमाचे सुटले पाझर नयनीं ॥ ६ ॥ हर्षें निर्भर मनीं देखे नारदमुनी ॥ प्रीति आलिंगनीं एकमेकीं ॥ ७ ॥ जाती चंपकमाळा सुमन तुळसी मिश्रित ॥ दिल्या त्या उचित तयाप्रती ॥ ८ ॥ मग नमस्कारोनी केलें विसर्जन ॥ भरलें त्रिभुवन ब्रह्मसुखें ॥ ९ ॥ मग चालिले तेथोनी ऋषी नारदमुनी ॥ हृदयीं संजीवनीं कृष्णराम ॥ १० ॥ तेणें त्या विश्रांति नित्य तृप्ती मनीं ॥ नामा जीवें चरणीं विनटला ॥ ११ ॥

॥ १९३३ ॥ जीवीचें गुज राही रुक्माईसी पुसे ॥ न धरवे मज हांसे नवल वाटे ॥ १ ॥ काय अभिश्राप आला देवराया ॥ केली आपणया आत्मशुद्धी ॥ २ ॥ हें मज बाई सत्य सांगा वाणी ॥ कवणे चक्रपाणी भुलविलें ॥ ३ ॥ सूर्य आणि अंधारु वर्तें एके ठायीं ॥ हें भूतभविष्य नाहीं वर्तमान ॥ ४ ॥ ऐसें हें अघटित जरी घडेल प्रसंगीं ॥ तरीच दोष संसर्गीं देवराया ॥ ५ ॥ अग्निमाजीं बीज पाल्वेजती सुखाडे ॥ कीं बुडालें सागरीं सांपडे लवण जरी ॥ ६ ॥ ऐसें हें अभिनव जरी घडेल प्रसंगीं ॥ तरीच संसर्गीं पडती देव ॥ ७ ॥ जोतिसी अळुमाळु मिळाल्या कर्पुरीं ॥ पुढती त्यासी उरी उरे जरी ॥ ८ ॥ ऐसें होय जरी या त्रिभुवनामाझारीं ॥ तरीच श्रीहरी वसति दोष ॥ ९ ॥ तरी हें नकळे मातें सांगावें साचार ॥ सर्वज्ञ चतुर वडील तुह्मी ॥ १० ॥ रुक्माई ह्मणे या नामयाचें चाडें ॥ अनंत पवाडे केले देवें ॥ ११ ॥

॥ १९३४ ॥ रुक्माई ह्मणे परियेसी वो आरजे ॥ सांगेन सकळ जें वर्म तुज ॥ १ ॥ अनाथ माहेर एक चक्रपाणी ॥ बहु दिनालागोनी लोभापरी ॥ २ ॥ ह्मणोनियां भुलला देव नाम्याचेनि लोभें ॥ कर्में शुभाशुभें अंगिकारिलीं ॥ ३ ॥ तरी आवडीचा वोरसु नकरी कायकाय ॥ हा प्रसिद्ध अनुभव आहे लोकां ॥ ४ ॥ विषयीं विश्राम सुख विषयाचें गळालें ॥ तयाचे सोहळे करिती लोक ॥ ५ ॥ आंधळे पांगुळे मुके अनर्गळ ॥ परी जीवापरिस बाळ पढियंते मातें ॥ ६ ॥ अंतरींच्या कळवळ्यानें खेळवी लाडें-कोडें ॥ परी विलास नावडे चोख चांग ॥ ७ ॥ प्रीतीच्या पडीभरें नेघे पैं विकृती ॥ देखोनी विश्रांति थोर मानी ॥ ८ ॥ ह्मणे माझे अळीवे दिठावेल झणीं ॥ इडापीडा घेउनी वदन चुंबी ॥ ९ ॥ तनू मन प्राणाची करुनी ओंवाळणी ॥ जावें हें माझेनी ह्मणे जीवें ॥ १० ॥ स्नेहाच्या संभ्रमें नेणें लोकलाज ॥ उचलोनी भूज घाली कंठीं ॥ ११ ॥ तैसीच परी आहे या विठ्ठलाच्या ठायीं ॥ चित्त याच्या पायीं ठेविलें जेणें ॥ १२ ॥ न पाहे तयाचें ज्ञाती कुळ कर्म ॥ वर्णाश्रमधर्म शुद्ध वाणी ॥ १३ ॥ अनंत जन्माचा काया मनें वाचा ॥ आहे या दोघांचा ऋणानुबंधू ॥ १४ ॥ तो नकळे न सुटे कोणीये कल्पांतीं ॥ जीवलग सांगती झाला नामा ॥ १५ ॥

॥ १९३५ ॥ मग नारदातें पुसे सत्यभामा देवी ॥ विस्मयो माझ्या जीवीं फार वाटे ॥ १ ॥ सांडोनियां थोरी देव मुगुटमणी ॥ नाचतो

कीर्तनीं संतांपुढें ॥ २ ॥ तरी कोणीये जन्माचें कायकाय याचें ॥ घेतलें नाम्याचें रीण देवें ॥ ३ ॥ एका पुंडलिकाचेनि पांगें येणें हो श्रीरंगें ॥ अठ्ठावीस युगें उभ्यां गेलीं ॥ ४ ॥ न पाहे परतोनी अझुनि पाठीमोरा ॥ न बोले निष्ठुरा वचन कांहीं ॥ ५ ॥ तरी कोण प्रीति देव ऋणानुबंधें ॥ राखितो आनंदें बळीचें द्वार ॥ ६ ॥ विकीला पाइकू कायामनेंवाचा ॥ झाला पांडवांचा वेळाइतु ॥ ७ ॥ जेंजें जया आवडे तेंतें धरोनी रूप ॥ पाववी संकल्प सिद्धी त्याचे ॥ ८ ॥ एकला एकटु एकलेनि जीवें ॥ भक्तांचें करावें सकळ काज ॥ ९ ॥ ऐसे भक्त अपार आहेत भूमंडळीं ॥ किती लागावळी असेल त्यांची ॥१०॥ ह्मणोनी माझ्या जीवीं वाटे थोर खंती ॥ स्वामीतें शिणविती युगायुगीं ॥ ११ ॥ भक्तांचे आवडी सजिलें वैकुंठभूवन ॥ चित्तीं अमृतपाहुन वाटे गोड ॥ १२ ॥ अखंड आवडी संतांचे संगतीं ॥ बैसोनी एकांतीं घेती सुख ॥ १३ ॥ ऐसें इहीं चालविलें वैष्णवीं ॥ आमुचें घरगोंसावी भुलवीले ॥ १४ ॥ या सकळांहूनी पढीयंता देवा एकू नामा ॥ भक्तीभावें प्रेमा दिल्हा त्यासी ॥ १५ ॥

॥ १९३६ ॥ तंव ह्मणती नारदमुनि परिसा वो मातें ॥ सांगे मी तूतें सत्य मानी ॥ १ ॥ हा निर्विकल्प देव येतसे रूपा ॥ करावया कृपा भक्तजनां ॥ २ ॥ हा शरणांगतवत्सलू अनाथा कृपाळू ॥ मिरवी दयाळु ब्रीद जगीं ॥ ३ ॥ जो शब्द ब्रह्मजनिता सकळ विधिकर्ता ॥ धर्माचा पाळिता पक्षदाती ॥ ४ ॥ ह्मणोनी जन्मकर्मे असंख्यात जगीं ॥ केलीं याचिलागीं नारायणें ॥ ५ ॥ अंबऋषीचे येणें सोसले गर्भवास ॥ राखितो उपास बळीचें द्वार ॥ ६ ॥ विकीला पाइकू कायामनेंवाचा ॥ झाला पांडवांचा मोलेवीण ॥ ७ ॥ गोकुळीं नंदाचीं राखिलीं गोधनें ॥ प्रीति उच्छिष्ट खाणें गौळियांचें ॥ ८ ॥ विघ्न पडे तेथें आपणा वोढवी ॥ संकटीं सोडवी माझीं ह्मणोनी ॥ ९ ॥ सांडोनी अभिमान नीच कामें करी ॥ झालासे अधिकारी दास त्याचा ॥ १० ॥ आज्ञा वाहे शीरीं जीवीं जतन करी ॥ मानिलीं सोयरीं वो जिवलगें ॥ ११ ॥ एक अपमानिती दावेवरी बांधिती ॥ उपहास करिती हर्ष मानी ॥ १२ ॥ केले अपराध नेघे आपुले चित्तीं ॥ दुणावितो प्रीति नित्य नवी ॥ १३ ॥ ऐसे ब्रह्मांडनायकू देव मुगुटमणी ॥ ही याची करणी ख्याती जगीं ॥ १४ ॥ आह्मीं सकळ भक्त याचे पूर्ण अंशू ॥ चरणींचा सौरसु नाम यासी ॥ १५ ॥

॥ १९३७ ॥ तंव निज गुज रुक्माई पुसे पंढरीनाथा ॥ ठेवूनियां माथा चरणावरी ॥ १ ॥ सर्वांहूनि पढीयंते ते काय स्वामियातें ॥ ते मज निरुते सांगा स्वामी ॥ २ ॥ हे माझ्या जीवींची फेडावी आशंका ॥ ब्रह्मांडनायका कृपाळूवा ॥ ३ ॥ न रंगे तुमचें चित्त योगियांचे ध्यानीं ॥ वैकुंठभुवनीं प्रीति नाहीं ॥ ४ ॥ तेथींचे सुखभोग सकळ विलास ॥ नावडती उदास कवण्या गुणें ॥ ५ ॥ सायोज्यता मुक्ति आपुली देउनी ॥ ज्ञानीते निर्गुणीं बुडविले ॥ ६ ॥ त्याहूनि जिवलग कोण तुमचे सखे ॥ जे त्याचेनि पैं सुखें वेडावलेती ॥ ७ ॥ चतुरानना ऐसा स्तवितां चतुरपणें ॥ अठराही पुराणें वेदचारी ॥ ८ ॥ परी तेही उबगले ह्मणती नेती नेती ॥ शिणली वेवादती साहीजणें ॥ ९ ॥ ऐकुनी पंढरीनाथ बोले रुक्माईसी ॥ तूं कां वो नेणसी गुज माझें ॥ १० ॥ कायावाचामन सर्व निरंतरीं ॥ आहे नाम्यावरी लोभ माझा ॥ ११ ॥

॥ १९३८ ॥ जीवींचें गुजगौप्य सांगेन वो तूतें ॥ ऐक एक चित्तें मनोधर्में ॥ १ ॥ आवडते हे माझे भक्त परम सखे ॥ जें सबाह्य सारिखे सप्रेमळ ॥ २ ॥ त्यापरिस थोर नाहीं मज दुजें ॥ मज त्याचेनि काजें नांवरूप ॥ ३ ॥ भक्त सर्वांहोनी पढीयंते माझीया हो जीवा ॥ भक्त हा विसांवा ज्ञानीयांचा ॥ ४ ॥ भक्त माझा सुखाचा होउनी शृंगारू ॥ भक्त अलंकारू वैराग्याचा ॥ ५ ॥ भक्तवो माझीया जीवींचें निजध्येय ॥ भक्त परम प्रिय कुळदैवत ॥ ६ ॥ भक्तसंगें सुखें विश्रांति विसांवा ॥ भक्त माझा ठेवा सर्व धन ॥ ७ ॥ भक्त हे माझिया भाग्याचें भूषण ॥ भक्त तें निधान निक्षेपींचें ॥ ८ ॥ भक्त यश कीर्ति भक्त सुख मूर्ती ॥ भेटे तरी पुरती सकळ काम ॥ ९ ॥ भक्त माझ्या सर्व सुखाचा अधिकारी ॥ भक्ताचिया घरीं वस्ती माझी ॥ १० ॥ मज आणि भक्तां नाहीं वेगळीक ॥ ध्यावें संगें सुख भक्त माझे ॥ ११ ॥ भक्तें मुख पहावें घडिये घडिये ॥ ऐसी त्यांचे जीवें प्रेम प्रीति ॥ १२ ॥ भक्तीं हृदयीं माझें चिंतावे चरण ॥ भक्तीं आलिंगन द्यावें मज ॥ १३ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष मुक्ति चारी ॥ देतां न घरी करीं भक्त माझा ॥ १४ ॥ भक्त न मागे कांहीं न घाली मज भार ॥ मजहूनि उदार भक्त माझा ॥ १५ ॥ पत्रपुष्प फळ जळ तें सर्वभावें ॥ भक्तांचें मज व्हावें आस करुनी ॥ १६ ॥ जीवें वाट पाहें केव्हां भक्त येती आवडते ॥ ते मज पढियंते सर्वभावें ॥ १७ ॥ तरी मी भक्तांचा कीं भक्त आमूचे ॥ सोईरे निजाचे एकमेक ॥ १८ ॥ ह्मणोनी नामयाचे आर्त थोर जीवा ॥ जवळोनी नव जावा दूर कोठें ॥ १९ ॥

॥ १९३९ ॥ तंव ते सकळिक आले शिघ्रवत ॥ आनंदें गर्जत नामघोष ॥ १ ॥ प्रेमें उचंबळत अंतरीं बावरले ॥ सप्रेमें लोटले चरणावरी ॥ २ ॥ त्या सुखाचा आनंदू न वर्णवे वाचे ॥ एवढें भाग्य कैचें बोलावया ॥ ३ ॥ आलिंगोनी देवें धरिलें हृदयकमळीं ॥ सादर सांभाळी कृपादृष्टी ॥ ४ ॥ श्रीमुखाचा वास पाहती वेळोवेळां ॥ झाला एक वेळा आनंदाचा ॥ ५ ॥ मग चक्रवर्ती उदार ज्ञानीयांचा ॥ सांगे भावो जीवींचा रुक्माईसी ॥ ६ ॥ केला चंद्रभागे संकल्प संपूर्ण ॥ तो व्हावा उत्तीर्ण सर्वभावें ॥ ७ ॥ क्षेत्रवासी द्विज सुशील सदाचार ॥ जे पुण्यसागर भूदैवत ॥ ८ ॥ ज्याचेनि दर्शनें पाप ताप जाय ॥ यश कीर्ति होय चरणतीर्थें ॥ ९ ॥ तरी ते प्रार्थुनिया आजी आणावे निजभुवना ॥ द्यावया भोजना भक्तिभावें ॥ १० ॥ तेणें सकळ काम होतील परिपूर्ण ॥ घ्यावें आशिर्वादवचन ब्राह्मणांचें ॥ ११ ॥ तंव ह्मणे रुक्माई ब्रह्मांडनायका ॥ अक्षत सकळिकां द्यावी देवा ॥ १२ ॥ सकळही सिद्धि असती जवळिक ॥ कर जोडुनी तिष्ठत सकळ काम ॥ १३ ॥ हांसोनी पंढरीनाथ बोले कवतुकें ॥ जीवलगा आईके विष्णुदासा ॥ १४ ॥ पुढती कवतुक करणें तुजलागीं ॥ नामयासी वेगीं कळली खूण ॥ १५ ॥

॥ १९४० ॥ केशव ह्मणे नाम्या सुखाचें निधान ॥ देरे आलिंगन आवडत्या ॥ १ ॥ जीवलगा जवळोनी नवजे कोठें दुरी ॥ वाटे तुज अंतरीं घालावासी ॥ २ ॥ न पुरे माझें आर्त घेतां तुझें सुख ॥ मी न होय कदां तृप्त भूखा राहे ॥ ३ ॥ उत्कंठित चित्त अखंड तुजकारणें ॥ तुज देखिल्या पारणें होय नयना ॥ ४ ॥ अनंत जन्माचा हा ऋणानुबंधू ॥ तरीच प्रीतिवादू न तुटे तुझा ॥ ५ ॥ तूं वो मजलागोनि देह कर्वती दिधले ॥ उग्र तप साधिलें जन्मोजन्मीं ॥ ६ ॥ त्यजोनी सर्व माया चित्त निरोधिलें ॥ हृदयीं मज बांधिलें वश करोनी ॥ ७ ॥ तुज काय देइजे उतराई होइजे ॥ ऐसें न देखिजे त्रिभुवनीं ॥ ८ ॥ शरीर प्राणाचें त्वां देउनी बळिदान ॥ केलें पैं निर्वाण भक्तराया ॥ ९ ॥ करावें म्यां दास्यत्व आपुलें निजांगें ॥ तुज तरी कांहीं नलगे देणें घेणें ॥ १० ॥ नामा ह्मणे देवा तुह्मी दीनाचे कैवारी ॥ ह्मणोनी मजवरी करिसी मोह ॥ ११ ॥

॥ १९४१ ॥ मग भक्तजनवत्सल सुखसिंधुराशी ॥ निर्भर मानसीं परमानंदें ॥ १ ॥ सरिसे सकळ भक्त घेउनी पंढरिनाथ ॥ भोगिया श्रीमंत

खेळु खेळे ॥ २ ॥ बाप तो कवतुकीं अनाथाचा नाथ ॥ भोगिया श्रीमंत खेळु खेळे ॥ ३ ॥ तंव ते उदित भाग्य भाग्यवंत ॥ दर्शनाचें आर्त होतें त्यासी ॥ ४ ॥ सकळही मिळोनी गेले पुंडलतीर्थी ॥ आले कमळापति दर्शनासी ॥ ५ ॥ तेथें देखोनिया सकळांचा मेळा ॥ केला द्विजा सकळां प्रणीपातु ॥ ६ ॥ ह्मणे सांडोनी देहबुद्धि निःसंदेह व्हावें ॥ कृपा करोनी यावें भोजनासी ॥ ७ ॥ पाळावें आपुल्या दिधल्या वचना ॥ करावी वासना तृप्त माझी ॥ ८ ॥ स्नान संध्याविधि सारोनी समस्त ॥ यावें शिघ्रवत नैवेद्यासी ॥ ९ ॥ ते निवाले दर्शनें तृप्त झाले मनें ॥ परिसोनी वचनें अमृतोत्तमें ॥ १० ॥ आह्मी तरी आश्रित हेंचि जाणा सत्य ॥ आशिर्वाद नित्य देतों तुह्मां ॥ ११ ॥ सर्वभावें आमुचा करावा सांभाळ ॥ स्वामी दीनदयाळ विश्व बोले ॥ १२ ॥ तुह्मी महाराज राजेश्वर ॥ पाहावें निरंतर कृपादृष्टीं ॥ १३ ॥ तुमचा हा आदर निरुपम सर्वथा ॥ दिलीसे मान्यता वेदवचनें ॥ १४ ॥ ते भाख आपुली जतन सर्वभावें ॥ साक्ष करुनी द्यावें प्रेम नाम्या ॥ १५ ॥

॥ ११४२ ॥ बाप आर्तबंधू सकळही जीव कंदू ॥ भक्ताचा सुखसिंधु पंढरीरावो ॥ १ ॥ हर्ष निर्भर चित्तीं आले निजभूवना ॥ सांगे विवंचना रुक्माईसी ॥ २ ॥ धन्य दिवस झाला आजि सोनियाचा ॥ सोहळा भक्तांचा आरंभिला ॥ ३ ॥ प्रार्थिलें ब्राह्मणां भोजनालागुनी ॥ येताती सारोनी स्नानविधी ॥ ४ ॥ आजीचें कवतुक पाहावें अभिनव ॥ हांसोनिया देव बोलते झाले ॥ ५ ॥ तंव ह्मणे रुक्माई अहो जी पूर्णकामा ॥ स्वामी मेघश्यामा कृपानिधी ॥ ६ ॥ त्यांचें पूर्ण पुण्य आजि झालें फलोन्मुख ॥ पाहिलें श्रीमुख चरण तुमचे ॥ ७ ॥ तंव ते नित्यनेम सारोनी आपुले ॥ वेगीं द्विज आले राउळांगणा ॥ ८ ॥ नमस्कारुनी देवें बैसविलें आसनीं ॥ पूजा चक्रपाणीं आरंभिली ॥ ९ ॥ चरण प्रक्षाळण गंध तुळसी माळा ॥ घातलिया गळा ब्राह्मणांच्या ॥ १० ॥ उजळोनी दीपक ओंवाळुनी प्रीति ॥ मग ते पात्रपंक्ति मांडियेल्या ॥ ११ ॥ रत्नजडित सकळां सुवर्णाचीं ताटें ॥ षड्रस वरवंटे तयामाजीं ॥ १२ ॥ विस्तारोनी वेगें लेहे पेहे चांग ॥ संकल्प श्रीरंगें सोडियेला ॥ १३ ॥ मग देउनी आपोशन अमर चूडामणी ॥ प्रार्थितो जोडोनी करकमळीं ॥ १४ ॥ ह्मणे कवळोकवळीं घ्यावें नाम अच्युताचें ॥ भोजन भक्ताचें सुखरूप

॥ १५ ॥ ऐसे जेविले आनंदें धाले परमानंदें ॥ मुखशुद्धि गोविंदें समर्पिली ॥ १६ ॥ रत्नाचे दीपक उजाळोनी आरती ॥ साष्टांग श्रीपति नमस्कारिलें ॥ १७ ॥ मग जोडोनी दोन्ही कर विनवी श्रीरंग ॥ ह्मणे आजीचा प्रसंग शुभकाळ ॥ १८ ॥ आह्मां तुह्मां भेटी झाल्या सुख गोष्टी ॥ भरली सकळ सृष्टि परमानंदें ॥ १९ ॥ अवघे संतजन आमुचे सांगाती ॥ जेवूं एकापंक्ति सरीसे आह्मीं ॥ २० ॥ ह्मणोनी सकळिकां पाचारिलें देवें ॥ कवतुक अवघे पाहाती द्विज ॥ २१ ॥ ब्रह्मादिक देव तिष्ठत पाहाती व्योमीं ॥ वंचलों आह्मी भक्तिसुखा ॥ २२ ॥ सप्रेम देउनी बुझाविला नामा ॥ ऐसें भाग्य आह्मां स्वप्नीं नाहीं ॥ २३ ॥

॥ १९४३ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान सावता ॥ जनमित्र पढीयंता जीवलगू ॥ १ ॥ आसंद सुदामा विसोबा खेचर ॥ नरहरि सोनार आदिकरुनी ॥ २ ॥ बाप आर्तबंधु कृपाळू दीनाचा ॥ अभिमान भक्तांचा न सांडी कदां ॥ ३ ॥ चोखामेळा वंका भक्तवत्सल लाडका ॥ तो बोलाविला देखा आरोगणें ॥ ४ ॥ वैराग्याचा मेरू तो गोरा कुंभारू ॥ आवडीचा डिंगरु केशवाचा ॥ ५ ॥ ऐसे थोरसानें सकळ भक्तराणे ॥ देवें आरोगणें बोलाविले ॥ ६ ॥ सुधूप आणि दीप तुळशीच्या माळा ॥ पूजिलें सकळां देवरायें ॥ ७ ॥ तंव राहीरखुमाबाई सत्यभामा सती ॥ विस्तारोनी आणिती विविध बोणीं ॥ ८ ॥ भोंवती भक्तमंडळी मध्यें वनमाळी ॥ शोभे नभमंडळीं चंद्र जैसा ॥ ९ ॥ सकळांमुखीं कवळ देतसे निजकरें ॥ उच्छिष्ट पितांबरें सांवरीतो ॥ १० ॥ त्या सुखाचा पारु देखोनी वैकुंठीं ॥ होते लोलुपमिठी सुरवरांशी ॥ ११ ॥ ऐसें तें भोजन झालें खेळेंमेळें ॥ ब्रह्मरसें धाले सकळभक्त ॥ १२ ॥ तंव विमानें आकाशीं दाटलीं सकळ ॥ करिती कल्लोळ पुष्पवृष्टी ॥ १३ ॥ ते देखोनी द्विजवर पडिले चिंतवणी ॥ ह्मणती पैं झाली हानी जीवित्वाची ॥ १४ ॥ नव्हे हा ज्ञानमार्ग नव्हे हें वैराग्य ॥ नवल भक्तिभाग्य आवडीचें ॥ १५ ॥ एक ह्मणत हा पांडुरंग साचे ॥ येवढें भाग्य कैचें मानवीयां ॥ १६ ॥ हा नव्हे गुणिवंत क्रियाकर्मातीत ॥ यासी प्रायःश्चित्त काय घडे ॥ १७ ॥ नाहीं यासी आप नाहीं यासी पर ॥ नाहीं या आचार जातीकुळ ॥ १८ ॥ षड्मार्ग संबंध नाहीं याच्या ठायीं ॥ विकल्पाचें नाहीं लवण कदां ॥ १९ ॥ कृपेचा कोंवळा सोयरा दीनांचा ॥ उदार या मनाचा लोभापर ॥ २० ॥ अनुसरे त्याचे माया-

जाळ तोडी ॥ बैसणें तो मोडी संसाराचें ॥ २१ ॥ या नामयाची माता आह्मां तुह्मां देखतां ॥ शिणली वेवादतां नानापरी ॥ २२ ॥ नेदी तिच्या हातीं घातिला पाठीसी ॥ धरिला जीवेंसी माझा ह्मणुनी ॥ २३ ॥ देहाचा विसरु याच्या रूपाच्या दर्शनें ॥ चरणाचेनि स्मरणें चित्त निवे ॥ २४ ॥ सुख गोष्टी यासी केलीया एकांत ॥ तेणें पुरतसे अंत जन्ममरणाचा ॥ २५ ॥ ऐसें याचें बोलणें ऐकोनी पंढरीनाथें ॥ दिलें सकळिकातें अभयदान ॥ २६ ॥ मग निजरूप दाविता झाला तयावेळीं ॥ नामा हृदयकमळीं आलिंगिला ॥ २७ ॥

॥ १९४४ ॥ तंव दिव्य रत्नमणी मस्तकीं कीरिटी ॥ मळवट ललाटीं कस्तुरीचा ॥ १ ॥ माथां मोरपिस कुंडलें गोमटीं ॥ पाहात कृपादृष्टि निजभक्तां ॥ २ ॥ तो पुंडलिकाचा ठेवा पूर्वपुण्यराशी ॥ वैकुंठनिवासी देवरावो ॥ ३ ॥ वदन निर्मळ बा हा सुस्मित वेल्हाळ ॥ दर्शनीं रत्न-कीर्ण तेज फांके ॥ ४ ॥ सा सुखाचे अधिकारी भक्त सप्रेमळ ॥ हृदयीं सर्वकाळ हरीचें ध्यान ॥ ५ ॥ कौस्तुभ वैजयंती पदक हृदयावरी ॥ शोभत साजिरी तुळशीमाळ ॥ ६ ॥ श्रीवत्सलांछन प्रीतीचें भूषण ॥ चर्चिलें सुंदर चंदन श्यामतनू ॥ ७ ॥ शंखचक्र करीं ते कर कटावरी ॥ पितांबर-धारी जलदनील ॥ ८ ॥ समचरण स्वयें उभा विटेवरी ॥ रूळती तोडरी दानव दैत्य ॥ ९ ॥ तेणें दिव्य तेजें ब्रह्मांड धवळलें ॥ प्रकाशें लोपलें दिग्मं-डळ ॥ १० ॥ सकळ संत द्विज देखती चतुर्भुज ॥ शंख चक्रांबुज गदा-पाणी ॥ ११ ॥ कीटकीपक्षी पशुपाषाण तरुवर ॥ देखती द्विजवर विठ्ठलरूप ॥ १२ ॥ परमानंद बोधें निवाले आनंदें ॥ भेदाभेद बोधें विस-रोनी ॥ १३ ॥ एकाविण दुजें न दिसे पैं आण ॥ नाहीं आठवण देहभावा ॥ १४ ॥ सबाह्य कोंदली अवघी विठ्ठलमूर्ती ॥ जे सुखाची विश्रांति योगियांच्या ॥ १५ ॥ प्रेमें वोसंडत सकळ भक्तजन ॥ देती आलिं-गन एकमेकां ॥ १६ ॥ हर्ष निर्भर चित्तीं आनंदें गर्जती ॥ पावले विश्रांति सकळ द्विज ॥ १७ ॥ ऐसा ब्रह्मानंद सोहळा भोगवी सकळां ॥ आपुल्या प्रेमळा निजदासां ॥ १८ ॥ करोनी सावधान वैकुंठीचा राणा ॥ नामा घाली चरणावरी त्यांच्या ॥ १९ ॥

॥ १९४५ ॥ बाप भक्तप्रीय पाहे कृपादृष्टी ॥ करितसे सुखगोष्टी ब्राह्मणांसी ॥ १ ॥ सर्वभावें शरण सर्वकाळीं मज ॥ ते हे भक्तराज सखे

माझे ॥ २ ॥ याचेनि उपकारें दाटलों संपूर्ण ॥ भक्तांपराधीन झालों तेणें ॥ ३ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर आणि हा सोपान ॥ हे मुगुटमणी जाण सुख मूर्ती ॥ ४ ॥ सर्वभूतीं भजती सर्वभावें सर्वथा ॥ केला पैं आपैता त्याचे बुद्धी ॥ ५ ॥ हा जनमित्र जिवलग आमचा सोयरा ॥ सांडिला संसारा ओंवाळुनी ॥ ६ ॥ माझे नामीं दृढ धरोनी विश्वास ॥ अखंड उदास देहभावी ॥ ७ ॥ जिवाहोनी पढियंता हा भक्त सांवता ॥ निर्धार सांगतां नवलाव याचा ॥ ८ ॥ हृदय विदारोनी आपुल्या हातें ॥ ठाव दिला मातें लपावया ॥ ९ ॥ बारा दिवसांचा या भक्तवत्सला ॥ माये सांडियेला वेणूनादें ॥ १० ॥ ह्मणती वो माझा त्या दिवसापासोनी ॥ नेणें मजवांचून आणिक कांहीं ॥ ११ ॥ हा विसोबा खेचर आणि नरहरि सोनार ॥ हा गोराकुंभार अंतरनिष्ठ ॥ १२ ॥ समाधिस्थ सदां निवाले निश्चित ॥ सबाह्य देखत मजलागीं ॥ १३ ॥ सुखाचा सुजाण आसंद सुदामा ॥ हा माझा आत्मा आवडता ॥ १४ ॥ घरदार संसार त्यजिली मजकारणें ॥ तोडिलें पैं येणें मायाजाळ ॥ १५ ॥ चोखामेळा वंका भक्त परमसखा ॥ विसावा हा देखा प्राण माझा ॥ १६ ॥ त्यजुनी सर्व संग एकविध भावें ॥ अनुसरले जीवें माझे ठायीं ॥ १७ ॥ ऐसे या भक्तांचे सांगतां उपकार ॥ आहेत बहुत फार कल्पकोडी ॥ १८ ॥ त्या सकळांच्या चरणांचा माझा नामा ॥ भक्तिभाव प्रेमा दिधला त्यासी ॥ १९ ॥

॥ १९४६ ॥ तंव तें भाग्याचे सागर विनविती द्विजवर ॥ ह्मणती तूं माहेर जोडलासी ॥ १ ॥ चरणीचा वियोग न व्हावा सर्वथा ॥ तोडावी ममता प्रपंचाची ॥ २ ॥ नलगे मोक्षमुक्ति नलगे धनसंपत्ती ॥ देई सत्संगती जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ वेदशास्त्र पठणें बहिर्मुखमनें ॥ केली अभिमानें छळणबुद्धी ॥ ४ ॥ धिक् तें जाणपण धिक् तो सन्मान ॥ नाहीं प्रेमखूण कळली तुझी ॥ ५ ॥ कुळाचेनि अभिमानें अंतरलों गा तेणें ॥ पूर्ण देहाभिमानें भुलोनीया ॥ ६ ॥ हे सकळ तुझी माया भुललों पंढरिराया ॥ ह्मणोनी जन्म वांया गेले होते ॥ ७ ॥ अपराधांच्या कोडी घडली आमूतें ॥ निषेधिलीं तूंतें मायबापा ॥ ८ ॥ परी त्वां दीनानाथें ब्रीद सत्य केलें ॥ आह्मां तारियेलें पतितांसी ॥ ९ ॥ नकळे काय होतें संचित आमुचें ॥ अनंत जन्माचें पूर्वपुण्य ॥ १० ॥ तें आजि फळलें तुझीया कृपादृष्टीं ॥ भाग्यें झाली भेटी संतजनां ॥ ११ ॥ दुर्जय तोडिलें माया मोहपाश ॥ केला पैं सौरस आपुल्यारूपीं

॥ १२ ॥ तापत्रय वणवा विझविला अवचिता ॥ दिल्हे प्रेमामृता जीवन आह्मां ॥ १३ ॥ आतां सर्वकाळ आविट हे दृष्टी ॥ यासाठीं संतभेटी निरंतर ॥ १४ ॥ प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी ॥ मग होत कल्पकोडी गर्भवास ॥ १५ ॥ करता करविता तूंचि पैं एक ॥ ब्रह्मांडनायक सर्वगत ॥ १६ ॥ आमुचे अवगुण न धरावे मानसीं ॥ निरवावें संतांसी माझे ह्मणुनी ॥ १७ ॥ तुह्मीया दासाचे द्यावें पैं दास्यत्व ॥ तयाची वंदीत चरणधूळी ॥ १८ ॥ हेंचि व्रततीर्थ क्रियाकर्म आह्मां ॥ द्यावा नित्य प्रेमा नामयासी ॥ १९ ॥

॥ १९४७ ॥ मग कृपेच्या सागरें भक्तजनें करुणाकरें ॥ देऊन आलिंगन करें निववीलें तयातें ॥ १ ॥ सर्व ज्ञानाचा रावो आत्मज्ञान देवो ॥ सांगेल अनुभावो तुह्माप्रती ॥ २ ॥ ते खूण आतां तरी धरा सर्वभावें ॥ दृढ धरोनी जीवें जतन करा ॥ ३ ॥ नलगे तीर्थाटन काया क्लेशजाण ॥ नलगे अनुष्ठान करणें बहू ॥ ४ ॥ नलगती सायास करणें उपवास ॥ धरावा विश्वास संतसंगें ॥ ५ ॥ नलगे वज्रासनी बैसावें नेहटी ॥ नलगे गिरीकपाटीं करणें वास ॥ ६ ॥ नलगे उग्रतप नानामंत्र जप ॥ भेणें जाय पाप संतसंगें ॥ ७ ॥ नलगे भस्म उधुळणें वाहणें जटाभार ॥ न घालावा पसार लोकाच्यारीं ॥ ८ ॥ सर्वभावें करुणा जिव्हे नामस्मृती ॥ मन येई निवृत्ति आपेआप ॥ ९ ॥ क्रियाकर्म धर्म प्रेमेंविण खटपटा ॥ कारितां आला वाटा दीर्घ दोषांचा ॥ १० ॥ साधनावाचुनी मार्ग सोपा जाणा ॥ करावें कीर्तना रामकृष्ण ॥ ११ ॥ सर्वकाळ कथा संतांची संगती ॥ वाचे नाम कीर्ति सर्वकाळ ॥ १२ ॥ तो हा राजमार्ग सर्वांहोनी चांग ॥ सदां संतसंग वाचे नाम ॥ १३ ॥ संकल्प विकल्प न धरावे मानसीं ॥ मनोभावें संतांसी शरण जावें ॥ १४ ॥ ज्ञानदेव ह्मणे पुढती तुह्मां एक ॥ सांगेन आणिक अनुभव ॥ १५ ॥

॥ १९४८ ॥ परमामृत सागर मंथुनिया पुरता ॥ काढिला तत्वतां ज्ञानबोध ॥ १ ॥ त्या सुखाचा पार जाणताती विरळे ॥ घेताती गळाले संतजन ॥ २ ॥ प्रेमाचिये तारीं वोगरू सुखामृत ॥ हें सुख त्वरित सेवा आधीं ॥ ३ ॥ हें सुख सेवितां परमानंद धनीं ॥ कृपा संतजनीं केली पूर्ण ॥ ४ ॥ ज्ञानाचें अंजन लेईलें संतजन ॥ जनीं जनार्दन देखती सदां ॥ ५ ॥ नाहीं भेद भिन्न सर्व ब्रह्म एक ॥ ब्रह्मांडनायक अनंत कोटी ॥ ६ ॥ दीपांचा

दीपक हृदय आत्मज्योती ॥ विश्व विठ्ठलमूर्ती देखती सदां ॥ ७ ॥ हें सुख दिधलें भक्तांसी विश्रांती ॥ नामयाची ये ख्याति परमानंदें ॥ ८ ॥ पढताना मंत्र ब्रह्मचि अघवें ॥ पाहातां अनुभवें वेदमत्तें ॥ ९ ॥ तें हें विठ्ठलनाम वेदाचें गव्हर ॥ जाणती साचार संतजन ॥ १० ॥ युगें अठ्ठावीस विठ्ठलनामें जपा ॥ हा पुंडलिक भक्त महानिधी ॥ ११ ॥ उघडली मांदूस भक्तिभाव तारू ॥ विठ्ठल उद्धरू कलियुगीं ॥ १२ ॥ नलागती सायास करणें उपवास ॥ विठ्ठलनामें पाश तुटती जाणा ॥ १३ ॥ आदिब्रह्म जूनाट जपती सिद्धमुनी ॥ तें दिलें मंथोनी पुंडलीकें ॥ १४ ॥ केशवनाम मंत्र नामयासी सांगितले ॥ विस्तारोनी केलें मंथन ऐसें ॥ १५ ॥

॥ १९४९ ॥ वेदाचें हें सार वैराग्याचें जीवन ॥ चिदाकाशींची खूण परम गुह्य ॥ १ ॥ जें शुद्धज्ञान गुह्य मोक्ष बीज ॥ सकळ मंत्रराज मंगळमूर्ती ॥ २ ॥ तें या नामयाचे होतें हृदयकमळीं ॥ कथा भूमंडळीं प्रकट केली ॥ ३ ॥ तें हें विठ्ठलनाम साराचेंही सार ॥ कलियुगीं उद्धार सकळजना ॥ ४ ॥ तें श्रवणाचें श्रवण मननाचें मनन ॥ जें निजध्यासन निजध्यासाचें ॥ ५ ॥ जें विचाराचें सार वृत्तीचा निर्धार ॥ स्वरूप साक्षात्कार उघड केला ॥ ६ ॥ जें भक्तीचें सौभाग्य ज्ञानाचें आरोग्य ॥ शास्त्राचें चांग मंथीतनाम ॥ ७ ॥ नामा परतें थोर नाहीं पैं आणिक ॥ जनासी तारक हेंचि एक ॥ ८ ॥ जे सकळ धर्म जन पवित्राचें पावन ॥ जे कां अधिस्थान आनंदाचें ॥ ९ ॥ जें योगसिद्धीचें जीवन पीयुष ॥ जेणें पूर्ण आयुष्य कामनेचें ॥ १० ॥ पुण्यपावन देवा भक्तांचे सोहळे ॥ प्रत्यक्ष गळाले आनंदाचे ॥ ११ ॥ भक्तिभावें याचें करितां श्रवण ॥ मग नाहीं दर्शन गर्भवास ॥ १२ ॥ ह्मणोनी कीर्तन करावें आवडी ॥ घ्यावी अर्थगोडी अनुभवें ॥ १३ ॥ नव्हे हें प्राकृत पाठांतर कवित्व ॥ उपनिषद मथितार्थ ब्रह्मरस ॥ १४ ॥ येथें जाणीव शाहणीव न करावी सर्वथा ॥ न पहावी योग्यता व्युत्पत्तीची ॥ १५ ॥ हें सात्विकाचें धन भोक्ता संतजन ॥ ज्ञानदेवें पूर्ण ग्रंथ केला ॥ १६ ॥

---



## ज्ञानदेवाच्या समाधीचे अभंग.

॥ १९५० ॥ ज्ञानदेव ह्मणे विठ्ठलासी ॥ समाधान तूंचि होसी ॥ परि समाधि हे ॥ तुजपाशीं ॥ घेईन देवा ॥ १ ॥ नलगे मज भुक्ति ॥ नलगे मज मुक्ति ॥ तुझा चरणी आहति ॥ थोर आर्थी ॥ २ ॥ विठोजी ह्मणे ज्ञानदेवा ॥ ज्ञानसागरा स्वानुभवा ॥ वचनेंचि विसांवा ॥ झाला मज ॥ ३ ॥ ऐके ज्ञान चक्रवर्ती ॥ तूं तंव ज्ञानाचीच मूर्ती ॥ परि पुससी जे आर्ती ॥ ते कळली मज ॥ ४ ॥ एक एक अनुभव कृपा ॥ पद पदांतरे केला सोपा ॥ तरी तया माझी कृपा ॥ सकळही वोळली ॥ ५ ॥ ज्ञानदेवो चरणी मिठी॥ मनेंसी पडली एक गांठी ॥ दृष्यादृष्य झाली एक दृष्टी ॥ प्रत्यक्ष भेटविलेसी ॥ ६ ॥ कर ठेवुनी कुरवाळी ॥ सर्वांग न्याहारुनी न्याहाळी ॥ ह्मणे तुवां घेतली जे आळी ॥ ते सिद्धीते पावेल ॥ ७ ॥ नामा उभा असे सन्मुख॥ ऐकतां थोर खेद दुःख ॥ ह्मणे ज्ञानांजन महासुख ॥ समाधि घेतसे ॥ ८ ॥

॥ १९५१ ॥ ज्ञानदेव उभा जोडोनी हस्त ॥ भक्त पाहती समस्त ॥ विठोजी ह्मणे कळला स्वार्थ ॥ या ज्ञानांजनाचा ॥ १ ॥ कैसें ओळलें सा ज्ञान ॥ समाधान तया ध्यान ॥ मन नाठवे मीतूंपण ॥ समाधिखूण ज्ञानासी ॥ २ ॥ मग ह्मणे विठोजी दातार ॥ समाधि तुज निरंतर ॥ आतां प्रस्थान करी साचार ॥ मज निरंतर आठवी ॥ ३ ॥ कैसे परिपूर्ण वाळले ॥ आपण समाधिरूप झाले ॥ मनातें मन समरसलें ॥ विठ्ठल स्वरूपीं ॥ ४ ॥ दशमी प्रस्थानाचा समयो ॥ एकादशी जागर उत्सावो ॥ द्वादशी क्षिराब्धी महोत्सावो ॥ ज्ञानदेवें केला ॥ ५ ॥ त्रयोदशी ह्मणे पांडुरंग ॥ कांहीं न करिगा उद्वेग ॥ अलकापुरी समाधि प्रसंग ॥ करी करी लवलाही ॥ ६ ॥ माता रुक्मिणी वाढी ताटीं ॥ विठोजी ह्मणे उघडी दृष्टी ॥ तुज मज आहे नित्य भेटी ॥ येई पंढरीये ॥ ७ ॥ नामा ह्मणे ज्ञान उदयो ॥ अलकापुरी सिद्ध समयो ॥ परी विठ्ठलीं मुराला भावो ॥ या ज्ञानदेवाचा ॥ ८ ॥

॥ १९५२ ॥ विठोजी ह्मणे ज्ञानदेवा ॥ तुझी विश्रांति मज ठेवा ॥ ते मुरली आमुचिया भावा ॥ निःसंदेहें ॥ १ ॥ कैसें समान ज्ञानदेवा ॥ अलकापुरी समाधि ठेवा ॥ विठ्ठल ओळला वोल्हावा ॥ नित्यरूप समाधि






॥ २ ॥ संत करिती महा खेद ॥ ह्मणती ज्ञानांजन भेद ॥ मग चालिले विद्वद ॥ अलकापुरीं ॥ ३ ॥ महावल्ली वृक्ष अज्ञान ॥ तो निक्षेपिला पूर्णधन ॥ मग विठोजी ह्मणे आपण ॥ ज्ञानदेवासी ॥ ४ ॥ धन्य धन्य ज्ञानेश्वरा ॥ पुण्यभूमि समाधि स्थिरा ॥ कृष्णपक्षीं तुज निर्धारा ॥ भेटी देत जाईन ॥ ५ ॥ कार्तिक मास शुद्ध एकादशी ॥ पंढरीयात्रा होईल सरिशी ॥ दुसरी कृष्णपक्षीं तुज निर्धारेसी ॥ दिधली असे ॥ ६ ॥ हें ऐकोनि संतजनीं ॥ जयजयकार केला ध्वनी ॥ दिंडी पताका मेळ गगनीं ॥ देव सुमनें वर्षताती ॥ ७ ॥ नामा ह्मणे आले वैष्णव ॥ अलकापुरीं मिळाले देव ॥ समाधिसुखें ज्ञानदेव ॥ बैसते जाहले ॥ ८ ॥

॥ १९५३ ॥ महा उत्साह त्रयोदशीं ॥ केला सा ज्ञानदेवासी ॥ मग नामा ह्मणे विठोबासी ॥ चरण धरूनिया ॥ १ ॥ समाधिसुख दिधलें देवा ॥ ज्ञानांजन समाधी ठेवा ॥ आजानवृक्षीं बीज वोल्हावा ॥ या ज्ञानांजनासीं ॥ २ ॥ कृपा आली विठ्ठलासी ॥ ह्मणे ज्ञानदेवा परियेसी ॥ तीर्थ भागीरथी अहर्निशीं ॥ तुज नित्य स्नानासी दिधली ॥ ३ ॥ इंद्रायणी दक्षिण वाहिनी ॥ भागीरथी मणिकर्णिका दोन्ही ॥ इया मिळालिया त्रिसंगमीं ॥ पुण्यभूमि तुझीये ॥ ४ ॥ येथें जरी नित्य स्नान घडे ॥ तरी नित्य वैकुंठवास जोडे ॥ तुज नाहीं नाहीं कुवाडे ॥ मी कोडें उभा असें ॥ ५ ॥ जेथें हरिकथानाम वाचे ॥ जो उच्चारील विठ्ठलाचें ॥ तयासी पेवें वैकुंठीचें ॥ दिधलें साचें अक्षयीं ॥ ६ ॥ आणिक ऐकेरे ज्ञानराजा ॥ जो या सिद्धेश्वरीं करील पूजा ॥ तो अंतरंग पैं माझा ॥ मुक्ती सहजा जाहली त्यासी ॥ ७ ॥ नामा ह्मणे ऐसें अंतरंग ॥ कैसा ओळला पांडुरंग ॥ ज्ञानदेवीं समाधि सांग ॥ हरिपाठ कीर्तनें ॥ ८ ॥

॥ १९५४ ॥ सनकादिकीं मंत्रघोष ॥ केले विधिपूर्वक पांच दिवस ॥ मग पांडुरंग यथा सावकाश ॥ भक्तावास महिमेचा ॥ १ ॥ धन्यभूमि अलकापुरी ॥ ज्ञान समाधि खेचरी ॥ पूर्ण परिपूर्ण श्रीहरी ॥ आपण उभा असे ॥ २ ॥ संत भागवत दोन्हडे ॥ अमर उभे चहूंकडे ॥ नारद तुंबर पुढें ॥ वीणा वाजविती ॥ ३ ॥ एकीं केला जयजयकार ॥ ज्ञानदेवीं धरूनिया कर ॥ विठ्ठलचरणासमोर ॥ निकट बैसते जाहाले ॥ ४ ॥ करें कुरवाळिलें ज्ञाना ॥ कासवि अवलोकिला पान्हा ॥ आसुवें येताती नयना ॥

तया ज्ञानदेवाचिया ॥ ५ ॥ विठोजी ह्मणे ज्ञानांजना ॥ तुझेनि कवित्वें हरे दारुणा ॥ उच्चारितां महा विघ्ना ॥ सकळ पळती ॥ ६ ॥ तुज आठवील जो भक्त ॥ तो होईल विरक्त ॥ ऐसें विठोजी बोलत ॥ येरु चरणीं रुळे ॥ ७ ॥ नामा ह्मणे सकळ तीर्थराजा ॥ तया कृपा कैसी केली सहजा ॥ एकादशी दिधली पूजा ॥ तया ज्ञानदेवासी ॥ ८ ॥

॥ १९५५ ॥ स्नानविधि केली भक्तीं ॥ नाममंत्राचिया आवृत्ती ॥ मग प्रत्यक्ष पूजिली मूर्ती ॥ विठोबाची ॥ १ ॥ धन्य धन्य तो ज्ञान ॥ राजा निवृत्ति निधान ॥ विठोजी आपण ॥ भक्तां साह्य ॥ २ ॥ मग सकळहि भक्त-मेळीं ॥ सहीत वनमाळी ॥ बैसले तयापाळीं ॥ इंद्रायणीचे ॥ ३ ॥ एकीं केलें स्तुतिस्तोत्र ॥ एक जपताती नानामंत्र ॥ एक गाताती वेदवग्त्रें ॥ विठो-बासी ॥ ४ ॥ तंव पुढारा झाला नारा ॥ तो नामयाचा पुत्र सैरा ॥ तो पुसतसे विचारा ॥ नामयासी ॥ ५ ॥ ये संतसभेमाजीं ॥ राउळ बैसले असे सहजीं ॥ यातें पुसे जो काजी ॥ कोण क्षेत्र ह्मणोनी ॥ ६ ॥ उठिला नामा प्रेमें डुल्ले ॥ वंदिलीं विठ्ठल पाउलें ॥ मग करद्वय जोडुनी बोले ॥ साशंकित ॥ ७ ॥ नामा ह्मणे पूर्ण ब्रह्म ॥ तें कैसें सभासंदि सम ॥ ते बोलतसे परम ॥ ज्ञानदेवा भाग्यें ॥ ८ ॥

॥ १९५६ ॥ मग सकळ प्रेमपुतळे ॥ बैसले माजी ब्रह्ममेळे ॥ तेथें नामा वचन बोले ॥ स्वामीप्रति ॥ १ ॥ बोळलें चैतन्य सतरावें ॥ पूर्ण नामओघ विठ्ठलदेवें ॥ पव्हे घालुनी ज्ञानदेवें ॥ जग तारिलें कीर्तनें ॥ २ ॥ नामा ह्मणे स्वामी सर्वज्ञ ॥ परि आमुचें मन निमग्न ॥ चरणरजें पापभग्न ॥ पवित्र जाहलें ॥ ३ ॥ तरी स्वामिराजा विनंती ॥ परियेसीं गा माझी पुढती ॥ अलकापुरी होती ॥ कवणिये युगीं ॥ ४ ॥ हें सांगिजे जी समर्था ॥ कवण क्षेत्र कवण तीर्था ॥ येथें क्षेत्रज्ञ हा सर्वथा ॥ कवण धर्म असे ॥ ५ ॥ तूं आत्माराम संपन्न ॥ जगा जुनाट नारायण ॥ तुजप्रति हें वचन ॥ न साहे माझें ॥ ६ ॥ कासवीचा तूं सार गाढा ॥ तैसा तुझा पवाडा ॥ हें पुसणें कोणवाडा ॥ तें तूंच जाणसी ॥ ७ ॥ नामा उभा तिष्ठत प्रेमें ॥ संत दाटले सप्रेमें ॥ तेंतें अनुक्रमें ॥ सांगतसे देव ॥ ८ ॥

॥ १९५७ ॥ देवासी कळलें गौप्यगुज ॥ ह्मणेरे नामया हेंची वोज ॥ तो निजभाव सहज ॥ प्रगट सांगूं आतां ॥ १ ॥ कृतायुगीं क्षेत्र आदि ॥ ज्ञानदेवा तेथें समाधी ॥ देव सांगतसे शुद्धी ॥ योगबुद्धी जुनाट ॥ २ ॥

ऐकें भक्तजन श्रेष्ठ ॥ भूमिनामें वैकुंठपीठ ॥ तें हें अलकापुरीं श्रेष्ठ ॥ आदि वरिष्ठ पीठ आड आड रहावें ॥ ३ ॥ आणिक ऐकरे वचन ॥ हें पंचक्रोशी पुरातन ॥ यासी युगें सांगतां संपन्न ॥ चतुरानन जाणतसे ॥ ४ ॥ कांहींएक किंचित सांगों ॥ युगसंख्या मार्गांत रिघो ॥ तरी वैवस्वत हाचि मार्गों ॥ पूर्ण वोळगो या पासोनी ॥ ५ ॥ मनु सहस्र युगें संख्या ॥ तैं अलकापुरीं आदि लक्ष्या ॥ कोटि याग असंख्या ॥ सहस्र दक्ष येथें झाले ॥ ६ ॥ आदि क्षेत्रसंख्या रहित ॥ ऋषिमुनी तपती सत्य ॥ आणि नारदमुनि असें सांगत ॥ हेचि पुरी पुरातन ॥ ७ ॥ नामा ह्मणे कैसें दिधलें ॥ हें ज्ञानासी सिद्ध लाधलें ॥ तेंचि आह्मासी ओडलें ॥ पूर्ण लाधलें पियूष ॥ ८ ॥

॥ १२५८ ॥ देव ह्मणे नामया ॥ ऐके येथें उचित दया ॥ एक एक तीर्थ सांगावया ॥ हेंतों पुराणीं असे ॥ १ ॥ नकळे देवाची थोरी ॥ कैसे पुढारले मुरारी ॥ गौप्यगुज श्रीहरी ॥ सांगतसे नामया ॥ २ ॥ पुराणीं ह्मणसी कोण कथा ॥ तरी ऐकें गा तूं सकळार्था ॥ शैवशास्त्र हा ग्रंथ सर्वथा ॥ सिद्धमार्ग असे ॥ ३ ॥ जें जें जुनाट क्षेत्रतीर्थ ॥ जें जें ब्रह्मनामें परमार्थ ॥ तो तो सांगितला हेत ॥ चतुराननें ॥ ४ ॥ ऐसें देवमुखींचें वचन ॥ ऐकतां संतोषले पूर्ण ॥ मग देताती आलिंगन एकमेकासी ॥ ५ ॥ जयजयकाराची ध्वनी ॥ विठ्ठलनामें गर्जे वाणी ॥ प्रेम वोसंडत नयनीं ॥ स्फुंदन रोमांचित ॥ ६ ॥ स्फुंदून नामा नाचे गाये ॥ परिसा ह्मणे वोळली माये ॥ तो ज्ञानासी पान्हा होये ॥ पूर्ण बोधाचा ॥ ७ ॥ नामा ह्मणे संतमेळीं ॥ कथा सांगितली रसाळी ॥ तंव ज्ञानदेवा करतळामळीं ॥ समाधि शेज घातली ॥ ८ ॥

॥ १२५९ ॥ मग ह्मणे सर्वज्ञ विठ्ठल ॥ न लावावा वाढवेळ ॥ मग पातले निर्मळ ॥ सिद्धेश्वरलिंगीं ॥ १ ॥ धन्य धन्य हरि दिवस ॥ धन्य धन्य हा निवास ॥ आपण हृषिकेश ॥ भक्ता साहे ॥ २ ॥ वैष्णव मिळाले संपन्न ॥ गाती हरिनाम कीर्तन ॥ तंव पातले सोपान ॥ प्रेमें वोसंडत ॥ ३ ॥ चरणीं घातली मिठी ॥ विठोजी ह्मणे उठी उठी ॥ लवलाहे उघडी दृष्टी ॥ भेट ज्ञानदेवासी ॥ ४ ॥ येरू ह्मणे मी कृतकृत्य ॥ नामस्मरण तुझें नित्य ॥ तेणें सकळ हित ॥ आमुचें झालें ॥ ५ ॥ तूं गा जनक जननी ॥ तूंचि एक त्रिभुवनीं ॥ पाहातां नित्य उन्मनी ॥ लागे आह्मां ॥ ६ ॥ समाधि शेज ज्ञानेसी ॥ तुवां घातली अहर्निशीं ॥ ते कर्णीं परिसत जिवेसी ॥ चरण धरित आलों ॥ ७ ॥

नामा ह्मणे ज्ञान सोपान॥ एक झाले जनि जनार्दन ॥ समाधि सांगे संजीवन॥ अलकापुरीं आले ॥ ८ ॥

॥ १९६० ॥ तंव निवृत्तीसी उन्मनी ॥ बैसली होती सप्तजन्मीं ॥ ते पालटोनी तत्क्षणीं ॥ मूर्ति ते न्याहाळी ॥ १ ॥ निवृत्ति निधान ॥ सोपान निजधन ॥ ज्ञानदेव आपण ॥ तिन्ही मूर्ती ॥ २ ॥ कोण भाग्याचे संतुष्ट ॥ जेथें प्रगटलें वैकुंठ ॥ विठ्ठलनामें पूर्ण पाड ॥ अलकापुरीसी ॥ ३॥ आदिक्षेत्र जुनाट ॥ युगें सांगतां उद्भट ॥ जें कां पुण्यरूप प्रकट ॥ सांगतसे महिमा ॥ ४ ॥ ऐसा उत्साह गमला ॥ निवृत्ति ध्यानीं निवाला ॥ तंव सोपान आलिंगिला ॥ ज्ञानराजें ॥ ५ ॥ निवृत्ति पाहे ज्ञानाकडे ॥ येरु धांवे लवडसवडे ॥ चरणरजामाजीं बुडे ॥ मन निमग्न केलें ॥ ६ ॥ तिन्ही देव एकत्र ॥ सत्व रजतमादि मंत्र ॥ हें गाताती नर जे स्तोत्र ॥ उद्धरती सर्वदां ॥ ७ ॥ नामा ह्मणे तिन्ही देव ॥ मिळाले सांग वैभव ॥ समाधि सेजे माधव ॥ देतू असे ज्ञानदेवा ॥ ८ ॥

॥ १९६१ ॥ हस्त ठेविला माथया ॥ ज्ञानदेव लागे पायां ॥ विठोजी ह्मणे लवलाह्या ॥ समाधीस बैसावें ॥ १ ॥ इंद्रचंद्रदेव येती ॥ ब्रह्मादिक गीतें गाती ॥ यम वरुण बृहस्पती ॥ विमानें दाटती अंतरिक्ष ॥ २ ॥ तंव पातले गरुडदेव ॥ रुक्मिणी सत्यभामा भाव ॥ राहि माता गोपी सर्व ॥ समाधि ज्ञानदेव पाहावया ॥ ३ ॥ ब्रह्मा इंद्र प्रजापती ॥ सर्व अंतरिक्षीं पाहाती ॥ अलकापुरिये श्रीपती ॥ हर्ष चित्तीं ज्ञानदेवा ॥ ४ ॥ ऋषिमुनि गणगंधर्व ॥ पिशाच गुह्यक सर्व ॥ ध्रुव अंबऋषि माधव ॥ चित्तीं भाव पाहावया ॥ ५॥ ऐसीं दाटलीं विमानें ॥ संत जाणताती ज्ञानें ॥ ज्ञानदेव ब्रह्म होणें ॥ हें विधान विठ्ठलाचें ॥ ६ ॥ जयजय शब्दें ध्वनि गर्जे ॥ तेणें स्वर्ग मृत्यु पाताळ गाजे ॥ पाताळीं शेष ह्मणे भुजे ॥ प्रेमें स्फुंदे नसमाये ॥ ७ ॥ नामा ह्मणे शिवादिकां ॥ सिद्धेश्वरीं मिळाले सकळिकां ॥ पाहाती विठ्ठल कौतुकां ॥ ज्ञानदेवसमाधीचें ॥ ८ ॥

॥ १९६२ ॥ देवध्वनि केलिया मुनी ॥ गंधर्व गायनें होती गगनीं ॥ ब्रह्मादिक इंद्र विमानीं ॥ इंद्रायणि ज्ञानदेवीं ॥ १ ॥ लागलिया मंगळतुरे ध्वनी ॥ तीर्थें असती उभीं करजोडुनी ॥ विठ्ठलदेव ज्ञानसंजीवनी ॥ नयनीं न्याहाळती ॥ २ ॥ राही रखुमाई माता ॥ सत्यभामा गोपी समस्ता ॥ आरतिया ओंवाळती निभ्रांता ॥ ब्रह्मत्वरिता ज्ञानदेवा ॥ ३ ॥ देवऋषिगण सकळ ॥

जयजयकार ध्वनि मंजुळ ॥ स्तुतिस्तोत्रें सकळ ॥ नक्षत्रादि गाती ॥ ४ ॥ वरुषती दिव्य सुमनें ॥ निवृत्ति सोपान नारायणे ॥ संबोखिले संजीवनें ॥ नित्य पारणें हरिपाठें ॥ ५ ॥ परिसा भागवत डुल्लत ॥ विठ्ठल झाला कृतकृत्य ॥ नामा असे शोकाकुलित ॥ चरणीं रत विठ्ठलाच्या ॥ ६ ॥ शेज घालुनी सुमनीं ॥ विठ्ठल पाहे रुक्मिणी ॥ ज्ञानदेवाचे गुण मनीं ॥ आठविते ह्मणे हरी ॥ ७ ॥ नामा झाला भयाभीत चित्तें ॥ ज्ञान्यासारखें रत्न मागुतें ॥ न देखों ऐसें विठ्ठलातें ॥ पुसे त्वरित रुक्मिणी ॥ ८ ॥

॥ १९६३ ॥ देवो ह्मणती रुक्मिणी ॥ हा एकचि योगी देखिला नयनीं॥ हेंचि ज्ञान संजीवनी ॥ जाण त्रैलोक्यासी ॥ १ ॥ धन्यधन्य धरातळीं ॥ जो यातें दृष्टीं न्याहाळी ॥ तो वाहात येईल टाळी ॥ वैकुंठ भुवनासी ॥ २ ॥ जो करील याची यात्रा ॥ तो तारील सकळगोत्रां ॥ सकळही कुळें पवित्रा ॥ जयाचेनि दर्शनें होतीं ॥ ३ ॥ अलकापुरी हे शिवपीठ ॥ पूर्वी येथें होते नीळकंठ ॥ ब्रह्मादिकीं तप वरिष्ठ ॥ येथेंचि पैं केलें ॥ ४ ॥ इंद्र येऊनिया भूमीसी ॥ याग संपादिले अहर्निशीं ॥ इंद्रायणी इंद्रोरिसीं ॥ पंचक्रोशी यापासूनि ॥ ५ ॥ येथें त्रिवेणी गुप्त असे ॥ भैरवापासोनि भागीरथी वसे ॥ पूर्ववटि जे माया दिसे ॥ ते प्रत्यक्ष जाणा पार्वती ॥ ६ ॥ भोंवतीं वनवल्ली वृक्ष ॥ येथें देव येउनी होती पक्षी ॥ हे असे नित्य साक्ष ॥ अस्थी नासती उदकीं ॥ ७ ॥ पंढरीहुनी हें सोपें ॥ जनाची हारावया पापें ॥ कळिकाळ कोपलिया कोपें ॥ न चले अलकापुरीसी ॥ ८ ॥ ऐसें सागतां हरिसी ॥ प्रेम ओसंडलें रुक्मिणीसी ॥ ह्मणे धन्यधन्य जयाची कुसीं ॥ ज्ञानदेव जन्मले ॥ ९ ॥ नामा ह्मणे माझा स्वामी ॥ सर्व संतसमागमीं ॥ ऐसें सांगितलें ग्रामीं ॥ अलकापुरीसी ॥ १० ॥

॥ १९६४ ॥ तंव पुसती होय माता ॥ तुह्मी ह्मणें खेद करा चित्ता ॥ तरी ज्ञानासारिखा कां आतां ॥ समाधीसी बैसवितां ॥ १ ॥ हें सांगावें सविस्तर ॥ याचे कोण कोण अवतार ॥ बंधु त्रिवर्ग हे साचार ॥ आणि ते भगिनी ॥ २ ॥ देव ह्मणती ब्रह्मा होये ॥ सोपानदेव नेणसी काय ॥ निवृत्ति शिव ज्योतिर्मय ॥ ज्ञानदेव ब्रह्मनिघोट ॥ ३ ॥ ऐसे ब्रह्मा विष्णु हर ॥ मुक्ताई ते मूळमाया साचार ॥ तारावया चराचर ॥ कलिमाजीं अवतरले ॥ ४ ॥ रुक्मिणी पुसे देवासी ॥ कां कलिमाजीं जन दोषी ॥ हे घातली देवा पुसी ॥ ते सांगती महाविष्णु ॥ ५ ॥ तरी ऐके हो साचार चित्तें ॥

तूं काय नेणसी व्यासातें ॥ ग्रंथीं सांगितलें भारतें ॥कलिमाजीं जन दोषी ॥ ६ ॥ कृष्ण अवतार झाला ॥ पांडवीं निजठाव टाकिला ॥ तेथून एक शकुन झाला ॥ जन्मेजयापासुनी ॥ ७ ॥ तया मागें विक्रमशक ॥ पुण्यपवित्र सकळ लोक ॥ कलियुगीं पुण्यश्लोक ॥ उज्जनीये नांदती ॥ ८ ॥ तेणें एकशत पंचतीस ॥ हरिले कळिकाळा दोष ॥ पुढें शालिवाहन व्हावयास ॥ अवतार जाण पैठणीं ॥ ९ ॥ तो हा शालीवाहन ॥ अठराहजार जाण ॥ तें क्षेत्र प्रतिष्ठान ॥ गंगा तीरीं प्रत्यक्ष ॥ १० ॥ या शकामाजीं प्रथम ॥ राजा भोज उत्तम ॥ मग पुण्यपुरुष जन्म ॥ थोडे घेती कलियुगीं ॥ ११ ॥ राजे भ्रष्ट यवन झाले ॥ ठायीं ठायीं दोष घडले ॥ मग इहीं अवतार घेतले ॥ कलिदोष हरावया ॥ १२ ॥ रुक्मिणी ह्मणे स्वामी ॥ सत्य सांगितलें तुह्मी ॥ पुराण प्रसिद्ध आह्मी ॥ अवतार चरित्रें जाणतसों ॥ १३ ॥ नामा ह्मणे पुढें हे जन ॥ यवन संसर्गें कठिण ॥ होतां गाती हरीचे गुण ॥ उद्धरती सर्वथा ॥ १४ ॥

॥ १९६५ ॥ पुष्पक विमानातळीं ॥ हरि उतरले भूतळीं ॥ तंव उदयो पूर्वमेळीं ॥ सूर्याचा जाहला ॥ १ ॥ धन्यधन्य प्रश्नोत्तर ॥ धन्यधन्य ते तरुवर ॥ धन्य ज्ञानदेव अवतार ॥ तिन्ही देव प्रगटले ॥ २ ॥ संत सनकादिक देव ॥ आणि भक्त आले सर्व ॥ स्नानें करुनिया भाव ॥ हरिचरणीं ठेविला ॥ ३ ॥ विलाप मांडिला भक्तीं ॥ खंति करिती त्रिजगतीं ॥ ज्ञानदेवासारिखी मूर्ती ॥ न देखों ह्मणती देवराया ॥ ४ ॥ देव ह्मणती निवृत्ती ॥ तूं प्रत्यक्ष शिवमूर्ती ॥ तारावया क्षिती ॥ अवतार धरिला ॥ ५ ॥ सोपानें घातलें लोटांगण ॥ मुक्ताईनें धरिले चरण ॥ संत करिताती स्तवन ॥ पांडुरंग रायाचें ॥ ६ ॥ मग संबोखोनिया हरी ॥ सोपानदेवो धरिला करीं ॥ निवृत्ति मस्तकावरी ॥ करकमळ ठेवीतसे ॥ ७ ॥ नारा विठा पुढें चाले ॥ ऐसें इंद्रायणीं गेले ॥ सौंगडी वृक्षातळीं बैसले ॥ सहपरिवारें सकळही भक्त ॥ ८ ॥ न्याहाळिती कांसव दृष्टीं ॥ ऐसा हरि चालत सृष्टीं ॥ नामा होतसे हिंपुटी ॥ ज्ञानदेवाकारणें ॥ ९ ॥

॥ १९६६ ॥ तंव अंतरिक्ष गगनीं ॥ अवचिति झाली वाणी ॥ भक्त तरतील मेदिनीं ॥ ज्ञानदेव दर्शनें ॥ १ ॥ धन्यधन्य वृक्ष अजान ॥ धन्य धन्य सिद्धेश्वरस्थान ॥ ज्ञानदेवा समाधान ॥ धन्य अलकापुरी ॥ २ ॥ ऐसी खवाणी वदली ॥ जयजयकारें टाळी पिटिली ॥ तंव स्नानसंध्या

सारिली ॥ देवभक्तीं सकळिकीं ॥ ३ ॥ मग पाहोनिया शुभदिन ॥ देवें करूं आदरिलें प्रयाण ॥ नामा होतसे खेदें क्षिण ॥ ज्ञानदेवा कारणें ॥ ४ ॥

॥ १९६७ ॥ मग प्रश्न आदरिला ॥ नामा स्फुंदों जो लागला ॥ कां गा ज्ञानदेवो गेला ॥ मज सांडूनिया ॥ १ ॥ कैसा होय तुझा दास ॥ कैसी पाहो तुझी वास ॥ ज्ञानाकारणें कासावीस ॥ जीव माझा होतसे ॥ २ ॥ देव ह्मणे नामयासी ॥ तूं ह्मणें कासावीस होसी ॥ तूंरे तयातें नेणसी ॥ तें कैसें आईक ॥ ३ ॥ ज्ञानदेव ज्ञानसागरू ॥ ज्ञानदेव ज्ञानागरू ॥ ज्ञानदेव भवसिंधुतारू ॥ प्रत्यक्ष रूपें पैं असे ॥ ४ ॥ ज्ञानदेव ज्ञानगम्य ॥ ज्ञानदेव ज्ञानधर्म्य ॥ ज्ञानदेव ज्ञाननेम ॥ सर्वथैव पैं असे ॥ ५ ॥ ज्ञानदेव हाचि देव ॥ ज्ञानदेवीं धरालिया भाव ॥ ज्ञान होईल जीवां सर्व ॥ यासी संदेह नाहीं ॥ ६ ॥ ज्ञानदेवीं धरितां ध्यान ॥ ध्यातां होय समाधान ॥ जीव शिवीं परिपूर्ण ॥ एके रात्रीं कीर्तन केलिया ॥ ७ ॥ ह्मणें तूं व्याकुळ होसी चित्तें ॥ आतां आठवी गा मातें ॥ नामस्मरणें एकाग्र चित्तें ॥ राम कृष्ण गोविंद ॥ ८ ॥ नामा ह्मणे तूं समर्थ होसी ॥ अर्जुनीं प्रीति करिसी ॥ हें सांगितलें व्यासीं ॥ एकादशाध्यायीं ॥ ९ ॥ तैसा पावे तूं विश्वेशा ॥ विश्वरूपा जगन्निवासा ॥ मी होतसें कासावीसा ॥ ज्ञानदेवाकारणें ॥ १० ॥ तरी तूं गा युगानयुगीं ॥ असशी भक्तांचिया संगीं ॥ आह्मी विनटलों पांडुरंगीं ॥ रंगारंगीं विठ्ठलीं ॥ ११ ॥ एक वेळ माझा शोक ॥ दुरी जाय हरे विख ॥ ते करी निर्विशेष ॥ नामा येतसे काकुळती ॥ १२ ॥

॥ १९६८ ॥ तंव नावेक श्रीहरी ॥ तटस्थ घटिकाचारी ॥ ध्यान धरूनी अंतरीं ॥ निश्चळ राहिला ॥ १ ॥ जयशब्दें नामा बोभाये ॥ केशवा त्राहे त्राहे ॥ मी व्याकुळ होताहें ॥ ज्ञानदेवाकारणें ॥ २ ॥ नारायणा त्राहे त्राहे ॥ कृपादृष्टि तूं रे पाहे ॥ मी व्याकुळ होत आहें ॥ ज्ञानदेवा कारणें ॥ ३ ॥ तुझेनि दर्शनें ॥ ज्ञानाचेनि अवलोकनें ॥ मज पंढरी असणें ॥ तुझे चरणीं गा विठ्ठला ॥ ४ ॥ आतां मज तूं सांभाळीं ॥ ज्ञानदेवावीण सदाकाळीं ॥ मज न कंठे निशी मंडळीं ॥ भानुसहित वर्ततां ॥ ५ ॥ तूं माझा जनक जननी ॥ परी ज्ञानदेवाविण मेदिनी ॥ शून्य वाटे मजलागुनी ॥ जैसे मच्छ जीवनेविण ॥ ६ ॥ तूं रक्षिता सर्व जीवांसी ॥ तरी कां दुःख दिधलें आह्मांसी ॥ तूं जवळी असतां हृषीकेशी ॥ ऐशी दशा हे प्राप्त ॥ ७ ॥

नामा खेदें क्षीण झाला जीवें ॥ तंव नेत्र उघडिले देवें ॥ आलिंगिला केशवें ॥ चारी भुजा पसरुनी ॥ ८ ॥

॥ १९६९ ॥ नामा न राहे खेद करूं ॥ केशव ठेवी अभयकरू ॥ ह्मणे तूं दुःखिया थोरू ॥ ज्ञानदेवा कारणें ॥ १ ॥ धन्यधन्य तुह्मी भक्त ॥ नित्य विष्णुचरणीं रत ॥ पुण्यशील भाग्यवंत ॥ ज्ञानदेव नामया ॥ २ ॥ तुमचेनि जन हे कृतार्थ ॥ कवित्वें तरेल हें सत्य ॥ माया मोहें निरसे सत्य ॥ नामस्मरणें तुमचेनी ॥ ३ ॥ धन्य ज्ञानदेव धन्यशिळ ॥ ज्ञानदेवा ऐसा सुढाळ ॥ मी न देखे भूमंडळ ॥ सकळही पाहतां ॥ ४ ॥ तूं करिसी खेद त्याचा ॥ तरी तो माझा आत्मा हे वाचा ॥ भाव सांडीं सांडी द्वैताचा ॥ निखळरूपें पाहे पां ॥ ५ ॥ तुह्मी भक्त आत्र उदिते ॥ तूं मनीं साजिरे पूर्णचित्तें ॥ मज पंढरीस येणें आवडतें ॥ नामें गातें तिये प्रीती ॥ ६ ॥ पुंडलिक माझा भक्तसखा ॥ परी प्रेमळ तुह्मी विशेषा ॥ तुमचेनि सर्व दुःखां ॥ हरणें मी हें जाणावें ॥ ७ ॥ नामा ह्मणे ज्ञानदेवाचें ॥ मज दर्शन होईल साचें ॥ तरीच रंगणीं मी नाचें ॥ श्रीहरिकीर्तनीं पंढरीसी ॥ ८ ॥

॥ १९७० ॥ एसें परिसलें विठ्ठलें ॥ तंव रुक्मिणीनें विनविलें ॥ याचे करीं जो जे ह्मणितलें ॥ हाकारिजे पुंडरिक ॥ १ ॥ धन्य धन्य धरातळीं ॥ जाया लोका लोक वनशाळीं ॥ वैष्णवीं पिटिली टाळी ॥ जयजय शब्दें करूनिया ॥ २ ॥ गरुडासी सांगे केशव ॥ कैसा यासी भेटेल ज्ञानदेव ॥ पुंडरिकासी जाउनी सर्व ॥ वृत्तांत सांगे येथींचा ॥ ३ ॥ तेणें नमस्कारुनी हरी ॥ निघाला पक्षाचा फडत्कारीं ॥ भेटला पुंडरिका झडकरी ॥ यथाविधीनें सांगितलें ॥ ४ ॥ पुंडरिक विस्मित चित्तीं ॥ ह्मणे धन्यधन्य ज्ञानमूर्ती ॥ ज्या कारणें वैकुंठपती ॥ अलकापुरीस गेले ॥ ५ ॥ धन्यधन्य विठोबाचे चरण ॥ धन्यधन्य माझे नयन ॥ धन्य नामा ऋषि संपन्न ॥ विष्णुभक्त सखा माझा ॥ ६ ॥ मग गरुडासी पुसिलें ॥ ज्ञानदेवा हाकारिलें ॥ दिव्य विमानीं बैसविलें ॥ चला ह्मणितलें अलकापुरीसी ॥ ७ ॥ नामा असे खेद करीत ॥ केशव तयासी संबोखित ॥ तुह्मा दोघांचा एकांत ॥ माझे निसंगें पुरेल ॥ ८ ॥

॥ १९७१ ॥ पुढें चालिला गरुड ॥ आक्रमित अवघे ब्रह्मांड ॥ मागें विमान शुद्ध प्रचंड ॥ पुंडलिक आणितसे ॥ १ ॥ धन्य हरिभक्तांचा मेळ ॥ धन्यधन्य ते गोपाळ ॥ धन्यधन्य अलकापुरी सुढाळ ॥ ज्ञानदेव येतसे

॥ २ ॥ दुरोनी लक्षित रुक्मिणी ॥ हरुषें सांगे चक्रपाणी ॥ पैल विमान येतसे गगनीं ॥ दाखवीजे नामया ॥ ३ ॥ मग नामयासी सावध ॥ करूनिया तो गोविंद ॥ ह्मणे तुझा पुरविला छंद ॥ पैल ज्ञानदेव येताहे ॥ ४ ॥ नेत्र विकासीत पाहे ॥ तंव गगनीं विमान दिसताहे ॥ पुंडरिक गरुड आहे ॥ दिव्य देही विमानीं ॥ ५ ॥ ऐसा जंव तटस्थ घटिका ॥ तंव उतरलें निमिष्य एका ॥ नामा पावला संतोषा ॥ ज्ञानदेवा देखोनी ॥ ६ ॥ विमान घंटिका गर्जत ॥ नामदेव पुढारा चालत ॥ जीजी रुक्मिणी ह्मणत ॥ वेगु कीजे ज्ञानदेवा ॥ ७ ॥ नामा ज्ञानदेव भेटले ॥ पुंडरीकें विष्णु नमस्कारिलें ॥ भक्तीं जयजय शब्द केले ॥ देवीं पुष्पवृष्टि केलिया ॥ ८ ॥

॥ १९७२ ॥ आलिंगन पडिलें दृढ ॥ मिठी न सुटे पडिलें गूढ ॥ पुंडरिक ह्मणे मज चाड ॥ या विठ्ठल चरणाची ॥ १ ॥ तुझे दरुषनें माझा लाभ ॥ जैसा ज्ञानदेवावरी लोभ ॥ तूं अनंत पद्मनाभ ॥ तैसाचि करी विठ्ठला ॥ २ ॥ नामदेवा आलिंगिलें प्रीतीं ॥ शिर चरणावरी अवचितीं ॥ ज्ञानदेवाच्या ठेवी पुढती ॥ ह्मणे धन्य क्षितीं मी एक ॥ ३ ॥ पुंडरिक ह्मणे नामया ॥ धन्यधन्य तुझा थाया ॥ क्षितीं आणिलें वैकुंठराया ॥ ज्ञानदेवाचेनि स्मरणें ॥ ४ ॥ धन्यधन्य युगानयुगीं तुह्मी ॥ धन्य देखिले तरीं आह्मी ॥ धन्य अलकापुर जन्मीं ॥ उपजोनी जो देखील ॥ ५ ॥ पंढरीहुनी हे मूळपीठ ॥ जुनाट पैं वैकुंठ ॥ पूर्वीं येथें होते नीळकंठ ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र इंद्र ॥ ६ ॥ तें हें शिवक्षेत्र प्रत्यक्ष ॥ पूर्वे मातुलिंग साक्ष ॥ तेथेंही केशव प्रत्यक्ष ॥ चतुर्भुज रूपें असे ॥ ७ ॥ दक्षिणे पुण्येश्वर देवो ॥ नागेश्वर महादेवो ॥ मूळपीठीं नागेंद्री पहाहो ॥ त्रिवेणीरूपें वाहातसे ॥ ८ ॥ पश्चिमे इंदुरिये देवो ॥ ब्रह्मेश्वर उत्तम ठावो ॥ उत्तरे सिद्धेश्वर देवो ॥ खेटक ग्रामीं भागीरथी ॥ ९ ॥ मध्यस्थळीं हे इंद्रायणी ॥ सरसी भागीरथी वाहनी ॥ सिद्धेश्वर शोभे स्थानीं ॥ ज्ञानदेवो सहित ॥ १० ॥ ये दक्षिण वाहिनीसी ॥ स्नान घडतां अहर्निशीं ॥ कोटि तीर्थें प्रयाग काशी ॥ प्रसन्न होती हरिहर ॥ ११ ॥ ऐसी ये तीर्थीं देवा ॥ समाधि दिधली ज्ञानदेवा ॥ पुंडरिक विनवीतसे केशवा ॥ धन्य भाग्य नामयाचें ॥ १२ ॥

॥ १९७३ ॥ स्वर्गमृत्यु पाताळ तिन्ही ताळे उदर ॥ विराटलें थोर विश्वरूप॥ समाधि संजीवन निवृत्तीसी फावलें ॥ तें निधान देखिलें आह्मी तुह्मी ॥ १ ॥ निवृत्ति सोपान ज्ञानदेव निधी ॥ मुक्ताई सिद्धि अलकापुरीं ॥ पंढरी प्रत्यक्ष

केली ज्ञानदेवें ॥ उभारुनी बाहे सांगे आज्ञा ॥ २ ॥ कळिकाळासी त्रास विठ्ठल उच्चारीं ॥ हरि चराचरीं क्षरला दिसे ॥ ३ ॥ सर्वत्र सबाह्य अंतरंग रूपडें ॥ तें रूप फाडोवाडे पारखिलें ॥ चिंतामणीचें सार कल्पतरु उघडें ॥ दावुनीया मूढ तारियले ॥ ४ ॥ सुवर्णाचा पिंपळ तिन्ही लोकीं ठाउका ॥ त्या समीप देखा कल्पतरु ॥ सिद्धेश्वरलिंगीं सिद्धिबुद्धि दाता ॥ जड जीवा मुक्तता देतू हरी ॥ ५॥ ऐशीये स्थानिकीं ज्ञानदेव राहिले ॥ राहुनी तारिलें मूढजना ॥ नामा ह्मणे ज्ञानदेव हा दातार ॥ जड जीवा उद्धार ॥ विठ्ठलहरी ॥ ६ ॥

॥ १९७४ ॥ तंव तेथें नवल वर्तलें ॥ आकाश असे विमानीं दाटलें ॥ ह्मणती मूळपीठ वैकुंठ देखिलें ॥ पुंडलिका सगट ॥ १ ॥ पंढरीहुनी आले कैसे ॥ पुंडलिक देव सरसे ॥ ज्ञानदेवासवें नामा असे ॥ आणि विष्णुभक्त अपार ॥ २ ॥ राहि रखुमाई सत्यभामा ॥ गाई गोपाळ मेघश्यामा ॥ ह्मणती पाहाहो महिमा ॥ या विष्णुभक्तांचा ॥ ३ ॥ सवें ध्रुव प्रल्हाद अंबऋषी ॥ रुक्मांगद सूर्यवंशी ॥ आणि ऋषिमुनी तापसी ॥ ऐसे सहित वनमाळी ॥ ४ ॥ बळी भीष्म नारद ॥ उद्धव अक्रूर विद्गद ॥ आणि बिभीषण सुबद्ध ॥ हनुमंतादि करूनी ॥ ५ ॥ हाहा हूहू गंधर्व गाती ॥ रुणु झुणु रुणु झुणु पावे वाजती ॥ देवांगना आरती ओंवाळिती ॥ देवभक्तांसहित ॥ ६ ॥ ऐसा शुभ काळ समयो ॥ झाला भाग्याचा उदयो ॥ ज्ञानदेव नामदेव पाहाहो ॥ धन्यधन्य धरातळीं ॥ ७ ॥ नामा नुघडी दृष्टीसी ॥ ध्यान धरिलें मानसीं ॥ लक्ष लाविले पायांसी ॥ विष्णुमूर्तीसी लीन झाले ॥ ८ ॥

॥ १९७५ ॥ तंव बोलत उद्धव ॥ धन्यधन्य हा देवाधिदेव ॥ धन्य धन्य ज्ञानदेव ॥ निजभक्त आवडता ॥ १ ॥ धन्य तीर्थ इंद्रायणी ॥ धन्य प्रत्यक्ष शूळपाणी ॥ तारक ब्रह्म त्रिवेणी ॥ मिश्रित रूपें वाहातसे ॥ २ ॥ चिंतामणी हे पाषाण ॥ दिव्य वनवल्ली जाण ॥ जेथें लागले हरीचे चरण ॥ ते धन्य अलकापुरी ॥ ३ ॥ जेथें समाधीसी बैसतां ॥ इंद्रादी सामोरे येती तत्वतां ॥ वैकुंठा जाईल निभ्रांतां ॥ रामकृष्ण उच्चारीत ॥ ४ ॥ यम न पाहे इकडे ॥ काळ नमस्कारी वाडेंकोडें ॥ ह्मणती पाहा हो केव्हडें ॥ भाग्य या ज्ञानदेवाचें ॥ ५ ॥ ऐसें उद्धव सांगे रुक्मिणी ॥ होय ह्मणती चक्रपाणी ॥ पंढरीहुनी हे जुनाट पुराणी ॥ शैवागमि बोलिलेंसे ॥ ६ ॥ ज्ञानदेवें नमस्कार केला ॥ नामा हृदयीं धरिला ॥ प्रीतीनें पुढती आलिंगिला ॥ ह्मणे धन्यधन्य

रे सखया ॥ ७ ॥ नामा लोळत गडबडां ॥ चरणरजा लागीं झाला वेडा ॥ केशव ह्मणे तूं धडफुडा ॥ विष्णुभक्त साचार ॥ ८ ॥

॥ १९७६ ॥ ऐशी प्रदक्षणा करुनी विष्णुभक्तां ॥ नामा जाहलासे सरता ॥ रुक्मिणी ह्मणे तत्वतां ॥ वैकुंठासी न्यावेंजी ॥ १ ॥ नामा ह्मणे नेघे मुक्ती ॥ मज पंढरीची आरती ॥ विठ्ठलनामें करीन कीर्ति ॥ नित्यकाळ जीवन्मुक्त ॥ २ ॥ मज नित्यमुक्ति जन्म नाहीं ॥ केशवासी माते पुसोनि पाही ॥ युगायुगीं अवतार दाही ॥ याचेनि संगें मज घडती ॥ ३ ॥ तिहीं त्रिभुवनीं उदार ॥ मुक्ति तुह्मापाशीं साचार ॥ परि भक्तिवीण मुक्ती असार ॥ कोण पामर इच्छिल ॥ ४ ॥ मुक्तिफळ कष्ट नैश्वर ॥ फळ एक विठ्ठलसार ॥ विष्णुभक्तीसी ज्यांचा निर्धार ॥ त्यांचे चरण वंदीन माथां ॥ ५ ॥ विष्णुवीण कीर्तन न करी ॥ भक्तीवीण नसे क्षणभरी ॥ कीर्तन करीन गजरीं ॥ रामकृष्ण गोविंद ॥ ६ ॥ मज नामाचें अमृत हरी ॥ माझें मुक्ति दास्य करी ॥ तूं मूळमाता जाणसी जरी ॥ तरी तुजशीं हें गुह्य बोलिलों ॥ ७ ॥ नामदेव परतोनी पाहे ॥ तंव ज्ञानदेवें उभारिले बाहे ॥ ह्मणे विष्णुभक्ति ऐशी आहे ॥ ऐके माते साचार ॥ ८ ॥

॥ १९७७ ॥ भक्त अमर स्वस्ति क्षेमें ॥ चरणरजें डौरले व्योमें ॥ मग कैलासीं मंदाकिनी सोमें ॥ नीळकंठें शिरीं धरिली ॥ १ ॥ धन्य विष्णुचरणींची गंगा ॥ स्नपन होत महालिंगा ॥ भीमरथी मृत्युलोकीं सवेगा ॥ इंद्रायणी समरस ॥ २ ॥ भोगावती पाताळा गेली ॥ मग विष्णुचरणीं गुप्त ठेली ॥ मग पुरोनीया उरली ॥ त्रिंबके शिखरीं ॥ ३ ॥ मग किती काळीं भागीरथी ॥ सगर उद्धरिले त्वरितीं ॥ भगीरथें आणिली सारथीं ॥ विष्णुतीर्थें करूनिया ॥ ४ ॥ ऐशी त्रिभुवनीं ज्याची थोरी ॥ तो मुकुटमणी हा हो श्रीहरी ॥ त्यातें सोडलिया मुक्ति चारी ॥ काय आह्मा तारिती ॥ ५ ॥ सर्व तीर्थें ज्याचें रंक ॥ आह्मी तयाचे सेवक ॥ ज्याचेनि नामें हें त्रैलोक्य ॥ नाम घेतां तरती ॥ ६ ॥ तो पूर्ण बीजमंत्र आह्मी जाणों ॥ विष्णुवीण कांहीं नेणों ॥ पूर्ण ब्रह्म काय ह्मणों ॥ हा महिमा तूं जाणसी ॥ ७ ॥ ज्ञानदेवें नमस्कारिलें हरी ॥ निवृत्ति सोपान झडकरी ॥ मुक्ताई भेटली लौकरी ॥ ज्ञानदेवा करीं धरियेलें ॥ ८ ॥

॥ १९७८ ॥ मग संतोष झाला हरिभक्तां ॥ ज्ञानदेव झाला बोलता ॥ निवृत्तीसी ह्मणे तुह्मी जावें आतां ॥ त्रिंबकशिखरासीं ॥ १ ॥ करा नमस्कार

हरीसी ॥ वेगीं जावें वैकुंठासी ॥ नित्य हरि चरणापाशीं ॥ तुह्मी आह्मीं सोपान ॥ २ ॥ मुक्ताई ह्मणे ज्ञानदेवा ॥ मज विठोबासी निरवा ॥ मजवरी लोभ असों द्यावा ॥ रुक्मिणी माता आदिकरूनी ॥ ३ ॥ पुंडरिकासी निरवावें ॥ समस्तांसी क्षेम सांगावें ॥ रुक्मिणीमातेच्या हातीं द्यावें ॥ मजलागीं ॥ ४ ॥ ज्ञानें करूनि विज्ञान ॥ भक्तीसी करावें निरोपण ॥ द्यावें समाधि संजीवन ॥ यावें शीघ्रवत ॥ ५ ॥ निवृत्तीनें दिधलें उत्तर ॥ आह्मी येउनी वेगवत्तर ॥ सोपानाशीं मार्गीं निरंतर ॥ समाधीसी चालवूनी ॥ ६ ॥ तंव बोलिला यादवराणा ॥ तुह्मी समाधीच्या मागितल्या खूणा ॥ परी नामयावरी जाणा ॥ माझी कासवदृष्टी ॥ ७ ॥ नामा ह्मणे विठोबासी ॥ तूं स्वामी दीनाचा होशी ॥ गेलें निधान ज्ञानदेव दाखविशी ॥ मज नयनीं प्रत्यक्ष ॥ ८ ॥

॥ १९७९ ॥ ऐसें बोलोनिया हरी ॥ रुक्मिणीसी विचार करी ॥ यासी भोजनें परोपरी ॥ अन्नें निपजवावी ॥ १ ॥ संतोष झाला हरिभक्तां ॥ जेथें स्वयें हरिभोक्ता ॥ कर्ता आणि करविता ॥ सर्वचाळक विठ्ठल ॥ २ ॥ तंव दिव्यग्राम उभवुनी ॥ भक्तीं देखिलें नयनीं ॥ विश्वकर्मा येउनी ॥ उत्तरापंथें निर्मिलें ॥ ३ ॥ तंव अष्टमहासिद्धी ॥ सर्व सामोग्रीची समृद्धी ॥ कर जोडुनी कृपानिधी ॥ विनविती आनंदें ॥ ४ ॥ दिव्यवनें दिव्यवल्ली ॥ दिव्यसुमनें समग्र झालीं ॥ वैकुंठीहुनी आलीं ॥ महाविष्णु कारणें ॥ ५ ॥ तेथें सुगंध परिमळ ॥ जवादीकस्तुरी निर्मळ ॥ चिंतामणी देती ढाळ ॥ नानाकीळ दीप्तीचे ॥ ६ ॥ चंदनाचे खांब उभारिले ॥ पवळ वेलीचे शोभले ॥ मुक्ताफळांचे घोंस मिरवले ॥ रत्नखचित चामरें ॥ ७ ॥ चंपक सुमनाची हारी ॥ सेवंती बटगरे नानापरी ॥ नानापुष्पीं परिमळ आगरीं ॥ दिव्यवनें कीं शोभती ॥ ८ ॥ ऊंस खर्जुरीया पोफळी ॥ फणसें नारिंगें नारळी केळी ॥ कर्दळी वाढीनलिया सरळी ॥ उदकपाट वाहाताती ॥ ९ ॥ तेथें भ्रमर रुणझुण करिती ॥ गोपाळ वेणू वाजविती ॥ नानापरी बागडे धरिती ॥ देव पाहती विमानीं ॥ १० ॥ तेथें योगीयांचीं ध्यानें ॥ निश्चळ राहिलीं आसनें ॥ निवृत्ति सोपानें ॥ तेथें देवडे उभे असती ॥ ११ ॥ नामा जातो लोटांगणीं ॥ वैकुंठ उतरलें मेदिनी ॥ अलकापूर पाटणीं ॥ उत्तरपंथें देखिलें ॥ १२ ॥

॥ १९८० ॥ ऐसें देखिलें वैष्णवीं ॥ वैकुंठ नगरी चिरंजिवी ॥ आणि ज्ञानदेव गोसावी ॥ विष्णुमूर्ती चतुर्भुज ॥ १ ॥ नाना वाद्यें वाजविती पावा ॥

समाधान होतसे जीवां ॥ नामा विनवितो केशवा ॥ तुझ्या दरुषनें निवालों ॥ २ ॥ तंव रुक्मिणीनें विनविलें ॥ यासी भोजनसारा का वहिलें ॥ तंव अक्रुरें पाचारिलें ॥ समस्तांसी देखा ॥ ३ ॥ उद्धव घालीत आसनें ॥ ताटें विस्तारिलीं बोणें ॥ राही रुक्मिणी विचक्षणें ॥ पंचामृतें वाढिती ॥ ४ ॥ समस्त भक्त दाटले ॥ पांथीकर एकवटले ॥ नानापरी भात विस्तरिले ॥ परिमळीत मगमगा ॥ ५ ॥ वरी मिरवे मुगाचें वरण ॥ कथिका वाढिली संपूर्ण ॥ नाना कोरिके विस्तीर्ण ॥ रुक्मिणी वाढीतसे ॥ ६ ॥ कामधेनूचें घृत ॥ पयोदधिक्षीर वाढित ॥ नानापत्र शाखा शोभत ॥ वैष्णवांच्या ताटीं ॥ ७ ॥ ऐसें समस्तांसी संपूर्ण ॥ भोजनासी बैसविले प्रीति करून ॥ तंव देव बोलती आपण ॥ ज्ञानदेवासी ॥ ८ ॥ निवृत्ति सोपान बोलावा ॥ मुक्ताईस आणावा ॥ पांथिकरासी रिघावा ॥ ताटीं बैसवा समस्तांसी ॥ ९ ॥ विष्णुमूर्ति चतुर्भुज ॥ पूजी ब्राह्मणद्विभुज ॥ तुळसी मंजिरी केशीराज ॥ त्यांचे मस्तकीं वाहतसे ॥ १० ॥ चरणतीर्थ घेतलें ॥ तेणें समस्त मंदिर शिंपिलें ॥ आपण मुखीं घातलें ॥ ह्मणें कृतकृत्य झालों मी ॥ ११ ॥ नामा तिष्ठत उभा द्वारीं ॥ त्यासीही रुक्मिणी ताट करी ॥ ऐशीं भोजनें परोपरी ॥ वैष्णवांचीं झालीं ॥ १२ ॥

॥ १९८१ ॥ ऐसे भक्त जेवुनी धाले ॥ समस्त पांथिक उठिले ॥ गोपाळें विडे दिधले ॥ आपुलेनि हातें ॥ १ ॥ धन्य धन्य तें भोजन ॥ धन्य धन्य तें निधान ॥ धन्य धन्य तें अंजन ॥ धन्य नारायण अलकापुरीं ॥ २ ॥ विठ्ठलें दिधलें वचन ॥ यासी घालारे आसन ॥ तंव उद्धवें आपण ॥ समस्तां बैसकार दीधले ॥ ३ ॥ पूजिले गंधाक्षता लावुनी ॥ टिळे कर्पूर चंदनीं ॥ ऐसे तिये वैकुंठ भुवनीं ॥ वैष्णवांसी पूजीतसे ॥ ४ ॥ तंव ह्मणे रुक्मिणी ॥ नामा आणा बुझावुनी ॥ आपुलेनि हातें चक्रपाणी ॥ त्यासी ग्रास घालावे ॥ ५ ॥ ऐसें सांगतां हरीसी ॥ बुझाविती नामयासी ॥ तो स्फुंदत उकसाबुकसी ॥ मग चहूंकरीं उचलिला ॥ ६ ॥ सवें संतांचा मेळा ॥ तयामाजीं परब्रह्म पुतळा ॥ नामा बुजावोनी तात्काळा ॥ देहावरी आणिला ॥ ७ ॥ तंव विस्तारुनी आलीं ताटें ॥ षड्रस अन्न बरवटें ॥ रुक्मिणीनें जेथें वैकुंठें ॥ भक्तांसहीत उभा असे ॥ ८ ॥ नामयातें संबोखोनी हरी ॥ बैसविला मांडियेवरी ॥ कवळ घ्यावया मुख पसरी ॥ चहूंकरीं हरी घालीतसे ॥ ९ ॥ नामा आनंदें डुल्लत ॥ तृप्त झाला प्रेमें ओसंडत ॥ सकळ संतां कवळ देत ॥ आपुले निजकरें ॥ १० ॥

॥ १९८२ ॥ ऐसा एकवळा भक्तांचा ॥ भोक्ता हरी वैकुंठीचा ॥ उतरोनी अलकापुरीं साचा ॥ करी भक्तांचा उत्सव ॥ १ ॥ ऐसे जेवुनी धाले ॥ हरी करीं निवाले ॥ मग सुखें रहिवासले ॥ सकळ भक्त वैकुंठीं ॥ २ ॥ देव ह्मणती निवृत्तीसी ॥ तुह्मीं जावें त्रिंबक शिखरासी ॥ मग समाधी सरसी ॥ गंगोदकें करूनि ध्यावी ॥ ३ ॥ तंव सोपान ह्मणे स्वामी ॥ पूर्वीं बोलिलेती तुह्मी ॥ करेपाठार संवत्सरग्रामीं ॥ समाधी देवो ह्मणोनी ॥ ४ ॥ देव ह्मणती संतांसी पुसा ॥ हा ज्ञानदेव असे सरिसा ॥ हाही दिव्यदेही आह्मासारिखा ॥ येईल तेथवरी ॥ ५ ॥ मुक्ताई ह्मणे देवाधिदेवा ॥ आह्मी करावी चरणसेवा ॥ तुझेनि विचारें जी केशवा ॥ समाधीधन भक्तांसी ॥ ६ ॥ ऐसा करिती विचार ॥ तंव पातले इंद्र चंद्र ॥ भक्तीं केले जयजयकार ॥ देवें दुंदुभी वाजिवल्या ॥ ७ ॥ संत सनकादिकीं स्तोत्रें ॥ मुखीं आरंभिलीं पवित्रें ॥ गाती हरिनाम चरित्रें ॥ ऋषिजन सकळ ॥ ८ ॥ धन्य धन्य अलकापुरी ग्राम ॥ जेथें प्रत्यक्ष पुरुषोत्तम ॥ उतरोनी वैकुंठधाम ॥ सोहळा करी भक्तांचा ॥ ९ ॥ नामा नाचे हरीचे द्वारीं ॥ ब्रह्मांड गरजे जयजयकारीं ॥ निवृत्ती सोपान ह्मणे हरी ॥ आह्मां निरंतरीं सांभाळी ॥ १० ॥

॥ १९८३ ॥ नानागंधें तुळसी माळा ॥ वैष्णवीं घातलिया गळा ॥ नमस्कार करिती गोपाळा ॥ चरणरजा वंदिती ॥ १ ॥ दोन्ही बाहे देव्हडे ॥ संतसनकादिक गाढे ॥ जयजयकारें पुढें ॥ महाशब्द गर्जिन्नले ॥ २ ॥ ऐसें इंद्रायणीच्या तटीं ॥ हरी रुक्मिणी जगजेठी ॥ संतसनकादिकांची गोमटी ॥ मांदी मिळाली असे ॥ ३ ॥ तंव पुंडरीकें नमस्कार केला ॥ ह्मणे तूं कां गा येथें विठो उगेला ॥ बहुत दिवस राहिला ॥ या ज्ञानदेवाकारणें ॥ ४ ॥ तरी पंढरीहूनि हें श्रेष्ठ ॥ तूं येथें उभा अससी प्रगट ॥ भूमी उतरलें वैकुंठ ॥ ज्ञानदेवाकारणें ॥ ५ ॥ बहुत दिवस येथेंचि जाले ॥ मी न देखें विटेवरी जंव पाउलें ॥ तंव नयन माझे भुकेले ॥ न राहाती देवराया ॥ ६ ॥ देव ह्मणती पुंडरिका ॥ तूं भक्त माझा निजसखा ॥ आणि हा ज्ञानदेव देखा ॥ दुजा न देखों त्रिभुवनीं ॥ ७ ॥ हे संतसनकादिक माझे ॥ यांचेनि समागमें माझें निज ॥ नामा डौरिन याचे चरणरज ॥ मग जावोंरे पंढरीसी ॥ ८ ॥

॥ १९८४ ॥ सर्व तीर्थें मिळालीं अनंतें ॥ ते सुखी करुनी कृतार्थें ॥ संवत्सरां जावोनी सोपानातें ॥ समाधीसी बैसवूं ॥ १ ॥ अनंतमुखा-

चिया रासी ॥ तूं दिल्या भक्तांचिया मानसी ॥ आनंद झाला पुंडरिकासी ॥ न बोले कांहीं ॥ २ ॥ सोपान ह्मणे वैकुंठा ॥ बीजें किजो जी श्रेष्ठा ॥ संवत्सर ग्राम कऱ्हे तटां ॥ वैकुंठासहित चालावें ॥ ३ ॥ इंद्र चंद्र ब्रह्मादि देव ॥ आणि गण मिळाले सर्व ॥ तेहतीस कोटी देव ॥ विमानीं आरूढले देखा ॥ ४ ॥ निवृत्ती सोपान ज्ञानदेव ॥ त्रीमूर्ती तिन्ही देव ॥ धर्म रक्षणार्थ पहाहो ॥ मनुष्यरूपें अवतरले ॥ ५ ॥ तिघेही उभे सन्मुख ॥ तिघांहीं थोर संतोष ॥ विनविती केशवास ॥ स्वामी विनंति अवधारिजे ॥ ६ ॥ ये अलकापुरीसी ॥ स्थापावें कोटी तीर्थांसी ॥ जो जो भक्त येईल स्नानासीं ॥ तयां वैकुंठा आणावें ॥ ७ ॥ ऐसें ऐकोनि श्रीहरी ॥ मग ह्मणे धन्य धन्य तुमची वैखरी ॥ जगदोद्धार केला संसारीं ॥ बावीस वरुषें असतां पैं ॥ ८ ॥ जो जो दिवस उगवला ॥ तो तो ज्ञानदेवें सफळ केला ॥ पदपदांतर कथिला ॥ जेणें आत्माराम संतोषे ॥ ९ ॥ पूर्वीं अनंत भक्त जहाले ॥ पुढेंही भविष्य बोलिलें ॥ परी निवृत्तीसी सोपानें सोडविलें ॥ अपार जीवजंतु ॥ १० ॥ मनुष्यगण प्राणी ॥ ज्याचा भार न साहे मेदिनी ॥ मार्ग इहीं अवतार घेउनी ॥ जग तारिलें कीर्तीनें ॥ ११ ॥ नामा पंढरीस नाचत ॥ ज्ञानेश्वर अलकापुरीं शोभत ॥ सोपान सत्वरीं मिरवित ॥ निवृत्ती त्रिंबक शिखरीं ॥ १२ ॥

॥ १९८५ ॥ ऐसें पांडुरंग बोलिले ॥ मग सकळ तीर्थांसी सांगितलें ॥ अलकापुरीस राहिले ॥ भक्त तारावया ॥ १ ॥ जो जो करील कीर्तन ॥ तो तो तरेल जाण ॥ अलकापुरीं नारायण ॥ स्वयें उभे असती ॥ २ ॥ ऐसा निरोप तीर्थांसी ॥ ते तिष्ठति अहर्निशीं ॥ कीर्तन करितां गजरेसी ॥ वैकुंठासी नेवो ह्मणती ॥ ३ ॥ देव ह्मणे यमुना नर्मदा ॥ त्रिवेणी भागीरथी त्रिविधा ॥ गंगा कृष्णा तुंगभद्रा ॥ इंद्रायणीस मिळावें ॥ ४ ॥ जो जो भक्त येईल स्नाना ॥ तो पवित्र करावा ये सणा ॥ वैकुंठ कैलासापर्यंत जाणा ॥ त्यासी घेउनी यावें ॥ ५ ॥ हो ह्मणती तीर्थें सकळें ॥ मग मीनलीं आपुलेनी मेळें ॥ गुप्त राहोनी यथाकाळें ॥ आज्ञा शिरसा वंदिती ॥ ६ ॥ गया काशी त्रिवेणी ॥ त्या शोभती विठ्ठलचरणीं ॥ ज्ञानदेवा समाधि रंगणीं ॥ अखंड वाहों लागल्या ॥ ७ ॥ सुवर्णाचा अश्वत्थ ॥ द्वारीं स्थापूनिया वास ॥ भोंवते देव्हडे तापस ॥ समाधीस बैसले ॥ ८ ॥ देव ह्मणे येथें जो करील तप ॥ तो होईल निःपाप ॥ केवळ होईल शिवरूप ॥

आत्माराम साक्षात ॥ ९ ॥ जप तप नेम मंत्र जाण ॥ कोटि याग घडेल पूर्ण ॥ अथवा द्विजीं दिधलिया अन्न ॥ चतुर्भुज नर होती ॥ १० ॥ ऐसें वचन सांगे हरी ॥ ज्ञानदेवासी धरिलें करीं ॥ निवृत्ती सोपान अंतरीं ॥ ध्यान धरोनी राहिले ॥ ११ ॥ नामा ह्मणे कोटि तीर्थांचें ॥ तीर्थ ओळलें पै साचें ॥ पाप जाईल अनंत जन्माचें ॥ एक एक स्नान केलिया ॥ १२॥

॥ १९८६ ॥ मग अष्टदिशा व्यापुनी ॥ तीर्थें राहिलीं स्थानीं स्थानीं ॥ अलकापुरीं पाटणीं ॥ इंद्रायणीच्या तटीं ॥ १ ॥ धन्य धन्य सृष्टी तळीं ॥ कीर्तन करितां वैष्णव मेळीं ॥ नाम जपतां गदारोळीं ॥ ते चतुर्भुज नर होती ॥ २ ॥ मग पुंडरीकासी सांगितलें ॥ कृष्णपक्षीं येथें पाहिजे आलें ॥ येरू ह्मणे स्वामीनें सांगितलें ॥ ते शिरसा वंदीन ॥ ३ ॥ देव ह्मणे आह्मी तुह्मी ॥ पंढरीहुनी समागमीं ॥ येउनी अलकापूर ग्रामीं ॥ सकळ तीर्थांसहित ॥ ४ ॥ मग व्यास वाल्मिक बोलाविले ॥ त्यांसही हें तीर्थ सांगितलें ॥ तिहीं शिवपीठ ऐसें ह्मणितलें ॥ जुनाट असे केशवा ॥ ५ ॥ या शिवतीर्थाचा महिमा ॥ कवणा वर्णवेल पुरुषोत्तमा ॥ पंढरी पांडुरंग माहात्मा ॥ भीमातीरही उत्तमा ॥ ६ ॥ आणि आईके वो सर्वोत्तमा ॥ येथें अधिक अष्टतीर्थ ग्रामा ॥ पंचक्रोशीची उपमा ॥ सिद्धि होती तत्काळ ॥ ७ ॥ ब्रह्मा विष्णु इंद्र तप ॥ आणि योगेश्वर उमप ॥ पाताळीं शेष समीप ॥ याज खालता आहे ॥ ८ ॥ स्कंदासी उपदेश स्थान ॥ लोहोगिरीसी येथुन ॥ पुरूरवा पुण्य क्षेत्रमहिमान ॥ पूर्वीं येथुनीचि जालें ॥ ९ ॥ येथुन भीमरथी नदी ॥ भीमाशंकरा घेउनी गेला नंदी ॥ तेथुनी उगमीं पडली सर्वां आधीं ॥ मग शंकरें तेथें स्थान केलें ॥ १० ॥ तें भीमा माहात्म्य प्रसिद्ध ॥ तो हा सिद्धेश्वर अगाध ॥ महा योगेश्वर निजबोध ॥ अलकापूर पाटणीं ॥ ११ ॥ ऐसें बोलतां तत्क्षणीं ॥ नामा गेला लोटांगणीं ॥ समाधी मूळपीठ स्थानीं ॥ अलकापुरीं ज्ञानदेव ॥ १२॥

॥ १९८७ ॥ मग व्यास पूजा सारिली ॥ तैशीच वाल्मिकाची केली ॥ वसिष्ठादिकीं अंगिकारिली ॥ समस्त ऋषि पूजियले ॥ १ ॥ धन्य धन्य धरातळीं ॥ येउनीया देवीं सकळीं ॥ माजी सहित वनमाळी ॥ अलकापुरीं नगरीये ॥ २ ॥ मग साठी तीनशें गंगा ॥ माजी द्वादश लिंगा ॥ अष्टोत्तरशें तीर्थें पैंगा ॥ तिहीं तप आरंभिलें ॥ ३ ॥ कोटी तीर्थांचा रहिवास ॥ अष्टभैरव सावकाश ॥ वीसकोटी गणेश ॥ साठीसहस्र गणासहित ॥ ४ ॥ ऐसे रहिवासले षण्मास ॥ दिव्य द्रुम फळें प्रतिदिवस ॥ दिव्य अन्नें साव-

काश ॥ अमृत भक्षिती देव ॥ ५ ॥ ऐसा सकळ तीर्थांचा मेळा ॥ तयामाजीं परब्रह्म पुतळा ॥ करी ज्ञानदेवाचा सोहळा ॥ अलकापूर नगरीये ॥ ६ ॥ गरुड हनुमंता ऐसे ॥ पुढें कामारी हृषिकेशें ॥ साक्षात वशिजे महेशें ॥ गौरीसहित अलकापुरीं ॥ ७ ॥ नंदिभृंगी शंख त्राहाटण ॥ प्रतिदिनीं विभूतीचें भूषण ॥ जयजय शंकर शिवपूर्ण ॥ ऐशीं स्तोत्रें गाताती ॥ ८ ॥ महा सभास्थळ वैकुंठ ॥ सभे श्रेष्ठ वैकुंठपीठ ॥ आणि शिवमूर्ती घनदाट ॥ नीळकंठ सभेसी ॥ ९ ॥ रंभा उर्वशी नाचती ॥ नारद तुंबर विणे वाजविती ॥ गणेश सारजा आळविती ॥ साहा राग एकवीस मूर्च्छना ॥ १० ॥ ऐसा राग स्थिरावला ॥ जयजयकारें घोष केला ॥ तेणें चवकला उठीला ॥ पाताळींचा तो शेष ॥ ११ ॥ ऐकोनी विष्णुकीर्तन ॥ तयासी आलें पैं स्फुंदन ॥ मग उच्चारित रामकृष्ण ॥ मृत्यलोकाशीं आला ॥ १२ ॥ सहस्र वदनें स्तुति करी ॥ हर नमस्कारिले हरी ॥ वाहुनी तुळशीमंजिरी ॥ ज्ञानदेवा पूजियेलें ॥ १३ ॥ नामा ह्मणे ज्ञानउदयो ॥ ज्ञानदेव भाग्याचा पहा हो ॥ आपण येउनी वैकुंठरावो ॥ समाधि दिधली निज हस्तें ॥ १४ ॥

॥ १९८८ ॥ ऐसे स्वर्गवासी अमर ॥ ते आपापलाल्या ठायीं स्थीर ॥ राहोनी करिती जयजयकार ॥ पुष्पवृष्टि ज्ञानदेवावरी ॥ १ ॥ धन्यधन्य विष्णुभक्ता ॥ ज्ञानदेवा तूं समर्था ॥ ह्मणोनी पडती पुष्पचळथा ॥ पांडुरंगावरी ॥ २ ॥ अनंत तीर्थांचा मेळ ॥ उदकें शिंपिती ब्रह्मगोळ ॥ लोहगिरि सुवर्णाचळ ॥ त्यावरी अलकापुरी ॥ ३ ॥ ह्मणती धन्य धन्य हे जन ॥ येथें जो करील कीर्तन ॥ तया जोडे वैकुंठस्थान ॥ चतुर्भुज होऊन जाईल ॥ ४ ॥ वेद ह्मणती इंद्रासी ॥ तूं पूर्वीं येथेंचि होतासी ॥ आणि ब्रह्मारुद्र तापसी ॥ पूर्वापार हे पुरीं असे ॥ ५ ॥ कृत त्रेत द्रापारादी ॥ येथें सकळांची समाधी ॥ धन्य ज्ञानदेव गोविंदीं ॥ रतोनि येथें बैसले ॥ ६ ॥ इंद्र ह्मणे विष्णुभक्त थोर ॥ प्रत्यक्ष हेही हरिहर ॥ निवृत्ति सोपान ज्ञानेश्वर ॥ हेही अवतार हरीचे ॥ ७ ॥ ऐसें सांगितलें समस्तां ॥ मग उदीत जाहले उभयतां ॥ शक्र जाहला निघता ॥ ब्रह्मा आदि करूनी ॥ ८ ॥ शेषही पाताळाशीं गेला ॥ पुंडरीक गोपाळ राहिला ॥ अलकापुरीं स्थिरावला ॥ सकळैक भक्तांसहित ॥ ९ ॥ सर्वे संतांचा मेळ ॥ ऐसा राहिला गोपाळ ॥ नामा ह्मणे चक्रचाळ ॥ पुढें कैसें वर्तलें ॥ १० ॥

॥ १९८९ ॥ गगनपंथें शुभ्र विमानें ॥ वेद लक्षिती अधोवदनें ॥ तंव अलकापुरीं कीर्तनें ॥ टाळ मृदंग झणत्कार ॥ १ ॥ जयजयकार क्षिती

होत ॥ महादोषा संहारघात ॥ नामा असे नाचत ॥ पांडुरंगापुढें ॥ २ ॥ रामकृष्ण अवतार ॥ चरित्र गाती सविस्तार ॥ वैष्णवीं केला जयजयकार ॥ पांडुरंगें ह्मणीतलें ॥ ३ ॥ ज्ञानदेव बैसले समाधी ॥ पुढें आजानवृक्षनिधी ॥ वामभोग पिंपळ आधी ॥ सुवर्णाचा शोभत ॥ ४ ॥ निवृत्ति सोपान खेचर ॥ ज्ञानदेव मुक्ताई निरंतर ॥ हे उत्तर द्वारें समोर ॥ बैसते जाहले ॥ ५ ॥ देव ह्मणे ज्ञानेश्वरा ॥ चंद्रसूर्य जंव दिनकरा ॥ तंव तुझी समाधि स्थिरा ॥ राहो रे निरंतर ॥ ६ ॥ जंववरी क्षितिमंडळ ॥ जंववरी हें समुद्रजळ ॥ मग कल्पक्षयीं यथाकाळ ॥ माझ्या हृदयीं ठसावें ॥ ७ ॥ आणि एक सोपारें ॥ ज्ञानदेव हीं अक्षरें ॥ जो जप करील निर्धारें ॥ ज्ञान त्यासी होईल ॥ ८ ॥ ऐसा दिधला आशीर्वाद ॥ मग संतांसी बोले गोविंद ॥ ज्ञानदेवा ऐसा उद्बोध ॥ दुजा न देखों सृष्टीसी ॥ ९ ॥ नामा ह्मणे स्वामी माझा ॥ अंगिकार केला वोजा ॥ पावला भक्तीचिया काजा ॥ गरुडारूढ होऊनी ॥ १० ॥

॥ १९९० ॥ ऐसे संतोषले देव ॥ प्रसन्नरूपें माधव ॥ मग बोलती ज्ञानदेव ॥ विठ्ठलाप्रती ॥ १ ॥ धन्य धन्य तूं विठ्ठला ॥ धन्य धन्य प्रत्यक्ष देखिला ॥ धन्य समारंभ येथिला ॥ सोहळा करी भक्तांचा ॥ २ ॥ तुझेनि आह्मी धन्य ॥ हें जगत्रयीं देवा मान्य ॥ ह्मणती भक्तासमान ॥ न देखों त्रिभुवनीं ॥ ३ ॥ तूं विश्वात्मा विश्वरूप ॥ तूं जगाचें नांवरूप ॥ तुज न लिंपे पुण्यपाप ॥ सदां शुद्ध बुद्ध आससी ॥ ४ ॥ तूं आह्मां भक्तां सरिसा ॥ सवें हिंडसी जगदीशा ॥ तुजवीण अष्टदिशा ॥ मज शून्य वाटती ॥ ५ ॥ तरी तूं पाळिशी भक्तलळा ॥ समाधीचा सोहळा ॥ तो दाखविला मज डोळां ॥ दिव्य दृष्टि देवोनी ॥ ६ ॥ तूं सत्वरजतमात्मक ॥ तूं सकळजीवांचा चालक ॥ तूं त्रिमूर्ति अवघा एक ॥ विराटस्वरूप सकळ ॥ ७ ॥ भक्तभाग्य भूमीतळीं ॥ याकारणें तूं वनमाळी ॥ दहा अवतार भूमंडळीं ॥ नाना चरित्रें खेळसी ॥ ८ ॥ ऐसें महिमान अगाध ॥ तें तुझें स्वरूप प्रसिद्ध ॥ कोण भाग्याचा मी प्रबुद्ध ॥ तो तूं मज कारणें आलासी ॥ ९ ॥ नामा ह्मणे ज्ञानदेवें ॥ ऐसी स्तुती केली स्वभावें ॥ तंव कृपा करूनिया देवें ॥ अभय कर दिधला ॥ १० ॥

॥ १९९१ ॥ चतुर्भुज शाममूर्ती ॥ शंखचक्राची आकृती ॥ पीतांबराची दिव्य दीप्ती ॥ पडिली सृष्टीवरी ॥ १ ॥ धन्य धन्य ज्ञानदेव ॥ धन्य धन्य तो माधव ॥ मग आरंभिला अनुभव ॥ ज्ञानदेवाचेनि मुखें ॥ २ ॥ तंव ह्मणे

ज्ञानेश्वरा ॥ तूं अवतारोनि चराचरा ॥ हरिला महादोष थारा ॥ तुझेनि कवित्वें ॥ ३ ॥ तुझें कवित्व माझ्या गोष्टी ॥ जो परिसेल हें सृष्टीं ॥ तो येईल माझे भेटी ॥ वैकुंठपीठीं विष्णूच्या ॥ ४ ॥ तुवां जो ग्रंथानुभव ॥ गीतेसी सांगितला भाव ॥ तें मुख्य ठेवणें राणीव ॥ अनुभवी जाणती ॥ ५ ॥ तैसाची अमृतानुभव ॥ सिद्ध पीठ केलें भाव ॥ दाउनी मनोहर राणीव ॥ निज गुह्य आमुचें ॥ ६ ॥ वसिष्ठगीतेची टीका ॥ भावार्थ काढिला श्लोका ॥ ग्रंथ संचिला नेटका ॥ करुनी रचना दाविली ॥ ७ ॥ तूं महाब्रह्मींचा अंश ॥ पदपदांतरीं केला प्रकाश ॥ दाउनीया उदास विशेष ॥ या जीवांसी तारिलें ॥ ८ ॥ तरी तूं आतां एक वेळ ॥ माझी स्तुति करी निर्मळ ॥ जेणें करुनी तरती सकळ ॥ वक्ते श्रोते ग्रंथकार ॥ ९ ॥ नामा ह्मणे परमानंद ॥ पावोनिया उद्बोध ॥ केला ज्ञानदेव सावध ॥ स्तुति उपरती मांडिली ॥ १० ॥

॥ १९९२ ॥ ऐसे अलकापुरीं पीठींचे ॥ भक्त नांदती दैवांचे ॥ जें कां सागर भाग्याचें ॥ ज्ञानउदयो प्रकासिते ॥ १ ॥ मग षोडशोपचारीं ॥ पूजा ज्ञानदेव आदरीं ॥ दिव्यवाद्य मंगळतुरीं ॥ ओंवाळिती पंचआरतीया ॥ २ ॥ ज्ञान सोपान निवृत्ती ॥ मुक्ताई प्रत्यक्ष ज्योती ॥ ओंवाळिती विष्णुमूर्ती ॥ चतुर्भुज पैं ॥ ३ ॥ पीतांबरधारी शाममूर्ती ॥ शंख चक्राची आकृती ॥ उद्धव अकुर ढाळिती ॥ चवरें वरी ॥ ४ ॥ प्रत्यक्ष लक्ष्मी आपण ॥ दिव्य स्वरूप प्रसन्न वदन ॥ माजी मिरवे दिव्य सिंहासन ॥ त्यावरी आरूढली ॥ ५ ॥ पुढें गरुड जोडुनी करी ॥ उभा पक्षांचा फडत्कारीं ॥ सूर्य लोपे तेजाकरी ॥ अमृत करुणामाफक ॥ ६ ॥ गोपाळ देव्हडे उभे ॥ मंजुळ पावे वेणुप्रभे ॥ शुभकाळ सुप्रभे ॥ माझी स्तुति मांडिली ज्ञानदेवें ॥ ७ ॥ नामा ह्मणे ऐका ॥ पुढें ग्रंथाची पीठिका ॥ तारील सकळ लोकां ॥ एकएक अक्षर आईकतां ॥ ८ ॥

( नमनस्तोत्र. )

॥ १९९३ ॥ नमो कालकुतुहल ॥ नमो चक्रचालक गोपाळ ॥ नमो विश्वप्रतिपाळ ॥ प्रभंजन ॥ १ ॥ नमो शिवशिवेशा ॥ नमो शिवादि विश्वेशा ॥ नमो रूपा अष्टदिशा ॥ व्यापक नारायणा ॥ २ ॥ नमो सकळगर्भोद्भवा ॥ नमो चित्तचालक भावा ॥ नमो विष्णुमूर्ति देवाधिदेवा ॥ श्रीविठ्ठला ॥ ३ ॥ नमो भजनशील व्यापका ॥ नमो ज्योतिर्लिंग दीपका ॥ नमोनमो तुज एका ॥ आत्म व्यापका जगत् गुरु ॥ ४ ॥ नमो

श्रीये श्रीनिवासा ॥ नमो आगमपरेशा ॥ नमो ज्ञानगम्याधीशा ॥ प्रतिकुळा ॥ ५ ॥ नमो स्वलीलाविनटा ॥ नमो स्तुति वैकुंठपीठा ॥ नमो रूपादि श्रेष्ठा ॥ वैकुंठींचिया ॥ ६ ॥ नमो दर्शनस्पर्शना ॥ नमो उपरती निधाना ॥ नमो तितिक्षा दारुणा ॥ कमळालया ॥ ७ ॥ नमो त्रिगठी आदटा ॥ नमो त्रिगुणा तूं उद्भटा ॥ नमो सत्वरूप सद्दा ॥ ब्रह्मनामा ॥ ८ ॥ नमो रजेश्वरा हरि ॥ नमो विगळित संहारि ॥ नमो वाचा वक्ताकरी ॥ वाचाळ वाक्पुष्पीं ॥ ९ ॥ नमो तम हर्ताकर्ता ॥ नमो सकळ संहर्ता ॥ नमो काळकौळू दाता ॥ रक्षिता हरिभक्ता ॥ १० ॥ तुज नमो हरहरेश्वरा ॥ नमो न देखों दुसरा ॥ नमो वेदांतसागरा ॥ सर्वेश्वरा तुज नमो ॥ ११ ॥ श्रुती निरामय नमो ॥ नमो ज्ञानरूप गमो ॥ नमो द्वैतनिरसन नमो ॥ करी तूं निजकरें ॥ १२ ॥ नमो व्यक्ताव्यक्त हरी ॥ नमो माया संहारकेसरी ॥ नमो सर्वांच्या माजि घरीं ॥ नांदसी तूं आत्मारामा ॥ १३ ॥ जिव शिव नमो तुज ॥ नमो सर्व जीवबीज ॥ नमो तूंचि सहज ॥ श्रीविठ्ठला ॥ १४ ॥ लीलेस्तव नटारंभ ॥ नमो जगदादिखिळस्तंभ ॥ उभा राहोनी प्रतीभ ॥ भीमातीरीं पंढरीये ॥ १५ ॥ नमो ऐशिया रूपेशा ॥ नमो त्रैलोक्य विस्तार ठसा ॥ नमो आदि परेशा ॥ जगदादीशा युगादी ॥ १६ ॥ नमो पुरुषोत्तम परेशा ॥ नमो सकळही उदासा ॥ करूनी जीवरूप ठसा ॥ नांदसी तूं चराचरीं ॥ १७ ॥ मधुसूदना तुज नमो ॥ मधु माधवा हृदय रमो ॥ नमो मधुर गीत तमो ॥ माजि घरीं आत्माचिये ॥ १८ ॥ त्रिविध त्रिमिर नाशा ॥ परम परमानंद उल्हासा ॥ नमो पुरविसी आशा ॥ हरिभक्तीची श्रीहरी ॥ १९ ॥ नमो वासना चक्रचाळी ॥ नमो तुंडवितंड गेली ॥ नमो सर्वही हरिली ॥ प्रपंचरचना ॥ २० ॥ नमो श्रीधर श्रीकर ॥ नमो सर्व संगीविकार ॥ नमो विकृति विकार ॥ हरिसी नामें एके ॥ २१ ॥ नमो शांति दया क्षमा ॥ नमो कृपाकर पुरुषोत्तमा ॥ नमो कासव दृष्टि समा ॥ निष्कलंक नाथा ॥ २२ ॥ नमोब्धी विश्वाद्य छेदका ॥ नमो एकार्णवपावका ॥ नमोद्वादश अर्का ॥ सुभाषका वेदवक्ता ॥ २३ ॥ नमो चित्तचकोर हर्ता ॥ नमो तुजवाचोनी सत्या ॥ विवेक प्रत्यया पैं नये ॥ २४ ॥ नमो अद्वैत अनंता ॥ नमो निर्द्वंद्व भोक्ता ॥ नमो नित्यानित्य सरता ॥ तुज नमोनमो ॥ २५ ॥ नमो दुर्गतिहरणा ॥ नमो सर्वहरण भरणा ॥ नमो सर्वदुष्टनिवारणा ॥ भय हरणा जगदीशा ॥ २६ ॥ नमो शिवशक्ति समलिंगा ॥ नमो भक्षक काळवेगा ॥ रुद्रादित्या वसुपैंगा ॥ सम सर्वांगा परमपरेशा ॥ २७ ॥ नमो कृत्रिम दहना ॥ नमो क्लेश करण हरणा ॥ नमो प्रतिपालकरणा ॥ नारायणा तुज नमो ॥ २८ ॥

नमो इंद्रियें नियंता ॥ नमो प्रपंच अकुसा ॥ नमो दीनादिसा ॥ सकळ बुद्धि तूंची ॥ २९ ॥ नमो अवधूत दत्ता ॥ नमो अपरमितमिता ॥ नमो सर्वावरिष्ठ सत्ता ॥ तूं चाळिता हृषीकेशी ॥ ३० ॥ नमो दृष्ट दर्पादर्पा ॥ नमो चमत्कार गंगा सर्पा ॥ नमो मनोहरण पापा ॥ नमो स्वल्पा रामकृष्णा ॥ ३१ ॥ नमो चतुर वेददीप्ता ॥ नमो हरणकरण तूं सुप्ता ॥ जाग्रती स्वप्न गुप्ता ॥ सत्य सुप्ता महाविष्णु ॥३२॥ नमो देवेश्वरे सूक्ता ॥ महा मोहा महाहर्ता ॥ मंदमंद नियंता ॥ नमो नारायणा ॥ ३३ ॥ क्षीर निरनिर्झरा ॥ नमो विदग्ध अनुकारा ॥ नमो विवेकसारा ॥ महानादा ॥ ३४ ॥ नमो मुखदंत सदना ॥ नमो भक्षकभुवना ॥ भोक्तावरा शुक्लवर्णा ॥ दयाघना गुणनिधी ॥ ३५ ॥ मृतामृता नमोनमो ॥ नमो श्रुतिशास्त्रसमो ॥ नमो हा गर्वगमो ॥ पद्म गर्भानंतानंता ॥ ३६ ॥ नमो चिदाकाशव्याप्ता ॥ चित्सत्ता चळण सत्ता ॥ चित्स्वरूपादि रूपा ॥ भुवनदीपा महामूर्त्ती ॥ ३७ ॥ नमो एक एकार्णव ॥ नमो कल्पादि गुणवैभव ॥ नमो सकळ हे देव ॥ हे भाव पैं तुझे ॥ ३८ ॥ गो गोपाळ नमो नमो ॥ गोविंद गुण विष्णुधर्मो ॥ नमो चित्ताचित्त निर्भो ॥ सर्वकाळ तुझ्या चरणीं ॥ ३९ ॥ ध्वज वज्रांकुशा ॥ ध्वज नीळविकाशा ॥ ध्वजांबरा अष्टदिशा ॥ नळी भामा सत्ता शामांकिता ॥ ४० ॥ सुषुप्तीचें जें सत्य ॥ तें नमो तुज कृत्य ॥ असो सजे अमित्य ॥ तें तें क्षमा करी स्वामी ॥ ४१ ॥ नमो निर्धारनियंता ॥ नमो सुखरूप दाता ॥ नमो आलिया पदार्था ॥ क्षमा करी स्वामी ॥ ४२ ॥ नमो चित्तविभ्रमो ॥ नमो धार्य धैर्य नमो ॥ नमो पुराणपुरुषोत्तमो ॥ पाहे कांसव दृष्टी ॥ ४३ ॥ पसाय दाना नमो ॥ परमपरेशा नमो ॥ ध्यानांतर गमो ॥ तुझ्या चरणीं केशवा ॥ ४४ ॥ आग्रह निहंत्या नमो ॥ सुग्रह परी नमो ॥ अनंता नित्य धर्मो ॥ वैकुंठ गुणग्राम नमोनमस्ते ॥ ४५ ॥ अनादृश्य दृश्यमान ॥ दृश्यादृश्य नित्य घन ॥ सुखरूप जगज्जीवन ॥ तुज नमो स्वामी ॥ ४६ ॥ दीप्तादीप्ता अदृश्या ॥ जीवन दिसती सादृशा ॥ जीवमेय हे भासा ॥ तुज नमो स्वामी ॥ ४७ ॥ परम परब्रह्मा ॥ आदिब्रह्मा तूं रामा ॥ भक्तालागीं तूं सउमा ॥ तुज नमो ॥ ४८ ॥ नमो नमो एकतत्वा ॥ बाह्यमुद्रा शुद्धसत्वा ॥ योगारूढ परतत्वा ॥ सबाह्य पावसी तुज नमो ॥ ४९ ॥ वेदादि परम वक्ता ॥ वेदादि तूंचि कर्ता ॥ तुजवांचोनी सर्व सत्ता ॥ नमो भक्ता न देखों ॥ ५० ॥ ज्योतिर्मय रूप तुझें ॥ सर्व तत्वा तूंच बीज ॥ नमो तुज सहज ॥ पुढती पुढती नमो नमो ॥ ५१ ॥ परब्रह्म परात्पर ॥ परम तत्व परम सार ॥ परम गुह्य परम विचार ॥ तुज

नमो नारायणा ॥ ५२ ॥ दिघड विघड सुघड ॥ जाड जड अवघड ॥ द्वैताद्वैत जोडाजोड ॥ कर्ता कार्यता तुज नमो ॥ ५३ ॥ संख्यारहित जीवना ॥ असंख्या जीव पाळणा ॥ नमो तुज संजीवना ॥ पुंडलिक धना पांडुरंगा ॥ ५४ ॥ निर्गुण सगुण रूपा ॥ देवादेव तूं सोपा ॥ तुझी झालिया कृपा ॥ नमन बापा तुझ्या चरणीं ॥ ५५ ॥ नमो नमो तारका ॥ तूं ब्रह्मानाम विशेषा ॥ नमो तुजवांचोनी सखा ॥ योगियासी पैं नाहीं ॥ ५६ ॥ युगादि युगत्रय ॥ युग जोग योगमय ॥ हे तुज पासाव होय ॥ ऐसिया नमो ॥ ५७ ॥ नमो नमो नम ॥ नाहीं नाहीं तुजसी सम ॥ ऐसा परा पश्यंती नेम ॥ वलीया चारी ॥ ५८ ॥ चहूं-मुक्ति परतत्वा ॥ पंचमु जो बद्धसत्वा ॥ षड्मार्ग गुणसत्वा ॥ ग्रास न करिसी तुज नमो ॥ ५९ ॥ चिद्रूद चिद्विलासा ॥ भानुबिंबा प्रतिप्रकाशा ॥ नमो तेजतेजसा ॥ आदि सूर्या ॥ ६० ॥ ऐसा चहूं ग्रंथींचा क्लेशू ॥ वाउगाची वाहे सोसू ॥ तिमिर त्रिगुण असोसु ॥ तो सत्वांशु तोडी माझा ॥ ६१ ॥ साही नाडी चक्रभ्रमें ॥ वाहतां इंद्रियांचीं ग्रामें ॥ आडखळोनी साउमे ॥ नये ऐसें करी नमो ॥ ६२ ॥ बाद्ध्यबाधा कर्माची ॥ सर्व सत्ता या भ्रमाची ॥ नमनें करूनिया तुमचीं ॥ तुह्मांसी अर्पिलीं स्वामी ॥ ६३ ॥ यमधर्माचिया सत्ता ॥ कर्मधर्माचिया पंथा ॥ कर्मधर्म विधाता ॥ ऐशिया नेमिता तुज अर्पिला ॥ ६४ ॥ दमशम समान ॥ इडा पिंगळा सुषुम्न ॥ साही चक्रें दरुषण ॥ तुझीं तुज अर्पिलीं ॥ ६५ ॥ मन पवन योगधारण ॥ तूं याशीं पैं कारण ॥ समतुकें अवघे गुण ॥ तुझ्या चरणीं निरपेक्षिले ॥ ६६ ॥ हे भूतभौतिक प्रचंड ॥ जन्मउत्पत्तीचें अंड ॥ जन्मजुगादि ब्रह्मांड ॥ खंड तूं जाणतां ॥ ६७ ॥ प्रचुरचर्या चित्ताची ॥ धावन वळन आंकोचनाची ॥ सुचना जे चमत्काराची ॥ तेही अर्पण तुज सदां ॥ ६८ ॥ निर्वासना वासनायुक्त ॥ फळें राहिलें जेथें चित्त ॥ तेथें तूं धांवोनी अनंत ॥ सोडविसी वासनामय ॥ ६९ ॥ सूक्ष्म अविचारा बोला ॥ बोलिना तुडे व्यर्थ गेला ॥ तो म्यां बुझावोनी संबोखिला ॥ मग लाविला तुझ्या पंथीं ॥ ७० ॥ निस धर्माचिया वोळी ॥ चळल्या वळल्या कोण चाळी ॥ त्यासी वेद तुझा पाळी ॥ सा तूं सांभाळी परब्रह्मा ॥ ७१ ॥ श्रुतिस्मृतीचीं वचनें ॥ त्याचीं आंगरींगमार्ग स्थानें ॥ कीर्तनीं गुण वर्णनें ॥ हेही नारायणें अंगिकारावीं ॥ ७२ ॥ उदंड विदंड वितंड ॥ देह द्वयाचे अभंड ॥ जे जे दिसे भ्रंश अंड ॥ ते शुभ्रचंड सांभाळी ॥ ७३ ॥ देहभरणाची ममता ॥ देह पाळिती जे सत्ता ॥ त्याही

वरील सूक्ष्मता ॥ तें कृपावंता सांभाळी ॥ ७४ ॥ तिमिर त्रिगुण अवघें ॥ जें जें आलें असेल वावें ॥ तें तें मी नेघे ॥ तें तूं सकळ वेगें ॥ सांभाळी ॥ ७५ ॥ योनीचिया कष्टा ॥ वरी वासना होत्या भ्रष्टा ॥ संसार हा कटकटा ॥ रतलों तुझ्या चरणीं ॥ ७६ ॥ विद्यावय साकुळ ॥ ब्रह्मकर्म आचारशीळ ॥ गेले आले विव्हळ ॥ ते तूं दयाळ सांभाळी ॥ ७७ ॥ नाना जन्म अवतार ॥ नाना शाखांचे निर्धार ॥ नाना गोत्र उच्चार ॥ तुझा विसर तूं जाणसी ॥ ७८ ॥ पाठ वेदादि वचनें ॥ शास्त्रदृष्टि अवलोकनें ॥ कीर्तनीं गुण वर्णनें ॥ हींहीं नारायणें अंगिकारावीं ॥ ७९ ॥ सर्वमय सर्व सपाटा ॥ त्यावरी करुनी चालिलों वाटा ॥ चंद्र सूर्य नक्षत्रें घनदाट ॥ करुनी एक वाट पायरी ॥ ८० ॥ सर्व अंडाचें ब्रह्मांड ॥ मीन ह्मणे अंडाअंड ॥ खंडें करूनिया निखंड ॥ प्रचंड मी तुजसी बोलें ॥ ८१ ॥ रोमरंध्रीं ब्रंह्मांडें ॥ सकळ विराटमय खंडें ॥ ऐशीं मत्ब्रह्में प्रचंडें ॥ तुझ्या अंगीं दातारा ॥ ८२ ॥ तूं विश्वरूपाची घडी ॥ तारक ब्रह्मचि उघडी ॥ मी या निजदृष्टीनें चोखडी ॥ तुझी मूर्त्ति न्याहाळीन ॥ ८३ ॥ ते न सुटे निजकळें ॥ येऱ्हवीं हे नाकळे ॥ तुझिया कृपागुणें आकळे ॥ तुझिया दासा निजभक्ता ॥ ८४ ॥ अनंत या नामाचा संकेत ॥ मन मुरालें जेथें निर्धुत ॥ तूंपणें परमाद्भुत ॥ परमानंदा ॥ ८५ ॥ गुणाग्र गोसावी राम ॥ गुणसमुद्र गुणग्राम ॥ सर्व भूतांचा विश्राम ॥ तुज नमो ॥ ८६ ॥ नमन केलिया विभूती ॥ चित्त रमले झाली विश्रांती ॥ तुज देखिलिया श्रीपती ॥ न राहे चित्तीं तळमळ ॥ ८७ ॥ नमन हेंचि थोर दिसे ॥ एऱ्हवीं तरंगाकार भासे ॥ देखिलें तितुकें नासे ॥ नैश्वर्य ऐसी श्रुति बोले ॥ ८८ ॥ नमन हेंचि परम ॥ नमन हें सुवर्म ॥ नमन हेंचि आत्माराम ॥ करूं निघाली ॥ ८९ ॥ नमन हाचि अनुभव ॥ नमन हाचि मुख्यभाव ॥ नमन हाचि पैं देव ॥ देवाधिदेव तूं पावसी ॥ ९० ॥ नमन हेंचि श्रेष्ठपीठा ॥ नेतसें तुझिया वाटा ॥ तुज ऐसा श्रेष्ठा ॥ मग या वाटा काय कराव्या ॥ ९१ ॥ नमन हेंचि तारका ॥ नमन हाचि विवेका ॥ नमनेंवीण त्रैलोक्य ॥ आडमार्गें रिघताती ॥ ९२ ॥ नमन लटिकें नव्हे नव्हे ॥ नमन भलतियासी न साहे ॥ जैसा साह्य सखा होय ॥ श्रीनिवृत्ती ॥ ९३ ॥ नमनाएवढा मंत्र ॥ नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र ॥ विचारलक्षणपात्र ॥ तेंचि जाणें येथींचें ॥ ९४ ॥ नमन करी ब्रह्मा श्रेष्ठा ॥ नाभिकमळीं धरी वैकुंठा ॥ नमन करी नीळकंठा ॥ तीर्थें मस्तकीं वंदिती ॥ ९५ ॥ इंद्र चंद्रमहेंद्र थोर ॥ नमनेंवीण नैश्वर ॥ अंडामध्यें चराचर ॥ नमनेंवीण न तरती ॥ ९६ ॥

श्रीगुरुकृपा जैं होय ॥ तैं नमनाची ऐशी सोय ॥ पाऊनि सुगम उपाय ॥ नमो नमस्ते तुज ॥ ९७ ॥ नमस्ते नमस्ते नमस्ते ॥ पुढती पुढती नमस्ते ॥ समाधिसुख आस्ते ॥ नमोनमः करितां ॥ ९८ ॥ नमो नमो आदिपीठा ॥ शिवादि गुणवरिष्ठा ॥ येथें येऊनि वैकुंठा ॥ समाधिशेज घातली ॥ ९९ ॥ महाविष्णु तूं योगरूपा ॥ महारूपाचिया स्वरूपा ॥ महादित्या अमुपा ॥ कोटिरुद्र तेजसा ॥ १०० ॥ शंखचक्रानें मंडित ॥ करकमळ तुझें मिरवत ॥ पदक हृदयावरी शोभत ॥ आणि श्रीवत्सलांछन ॥ १ ॥ अनंत बाहूंचा मेळ ॥ तो तूं चतुर्भुज गोपाळ ॥ मुगुट दिसत तेजाळ ॥ कोटि सूर्याहुनी प्रभा ॥ २ ॥ पितांबर माळ कंठीं ॥ सर्वांगीं चंदनाची उटी ॥ हिरे माणिकें कटींतटीं ॥ अनेक लीला फांकती ॥ ३ ॥ क्षुद्र घंटिकांच्या वोळी ॥ घणघणाट तया वेळीं ॥ देउडा पाउली निश्चळी ॥ वेणु वाजविसी सुस्वरें ॥ ४ ॥ रुणु झुणु रुणु झुणू ॥ ऐसा वाजविसी वेणू ॥ सुंदर तूं शामतनू ॥ अलकापुरीं उभा अससी ॥ ५ ॥ सभोंवते गोपाळ तुझे ॥ अंतरंग सखे माझे ॥ पुंडरिक तरी सहजे ॥ प्राणसखा पैं माझा ॥ ६ ॥ ऐसा ज्ञान उद्बोध बोले ॥ ज्ञानाज्ञान निरसलें ॥ विज्ञानही हारविलें ॥ दृश्यद्रष्टेनसी ॥ ७ ॥ बाप रखुमादेवीवरू ॥ समाधि देऊनिया स्थिरू ॥ वरी ठेऊनिया अभय करू ॥ वर देउनी राहिला ॥ १०८ ॥

॥ १९९४ ॥ ज्ञानदेवासी उद्धव ॥ बोले एकांतीचा भाव ॥ तुह्मा तुष्टला देवाधिदेव ॥ धन्य धन्य वैष्णव ॥ १ ॥ ज्ञानदेव ह्मणे स्वामी ॥ दीन विठोबाचे आह्मी ॥ धन्यधन्य भाग्याचे तुह्मी ॥ जे निरंतर विष्णुसंगें ॥ २ ॥ उद्धव ह्मणे ज्ञानेश्वरा ॥ आह्मी जाणो कृष्णावतारा ॥ परी पांडुरंग मूर्ति निर्धारा ॥ तूं आणि पुंडरिक जाणसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे ज्ञानदेवें ॥ मागुतें स्तवन आरंभिलें भावें ॥ तें ऐकावया देवें ॥ ऐक चित्त केलें ॥ ४ ॥

॥ १९९५ ॥ बैसोनी अंतरिक्ष विमानीं ॥ सर्व देव पाहती नयनीं ॥ वर्षाव करिती दिव्यसुमनीं ॥ विष्णुभुवनीं प्रत्यक्ष ॥ १ ॥ विठोबा कृपाळु गुणनिधी ॥ पुंडलिकासवें भक्तांची मांदी ॥ लघिमा महिमा आणि मादी ॥ कामारिसिद्धि तिष्ठती ॥ २ ॥ निश्चयें करूनी नेमिले तिथी ॥ कृष्णपक्ष अष्टमी समर्थी ॥ नाम संकीर्तन संतसंगती ॥ तो ब्रह्मप्राप्ति पावला ॥ ३ ॥ नवमी गजर हरिनामाचा ॥ तोचि वैष्णव काया मन वाचा ॥

तो प्रत्यक्ष विष्णुरूप साचा ॥ सत्य त्रिवाचा बोलिले ॥ ४ ॥ जोडे जया वद्य दशमी ॥ स्नान विष्णुपूजन स्वधर्मीं ॥ तो सत्वर पावेल निजधामीं ॥ नामसंभ्रमीं नाचत ॥ ५ ॥ व्रत एकादशी श्रेष्ठ गाढी ॥ कीर्तनश्रवणीं कोटी याग जोडी ॥ एकएक घडी कल्पाएवढी ॥ भूषणप्रौढी कीर्तीची ॥ ६ ॥ द्वादशीपारणें क्षीराब्धी ॥ हरिकीर्तनीं परमानंदीं ॥ तो पद पावला अनादी ॥ ज्ञानदेवीं विष्णूच्या ॥ ७ ॥ वद्यत्रयोदशी महाथोर गजर ॥ कुंचे गरुडटके दिंडी संभार ॥ वाजविती टाळ मृदंग झणत्कार ॥ हरिनामें अपार उद्धरिले ॥ ८ ॥ नामा ह्मणे वद्य चतुर्दशी ॥ पुढती अमावास्येचे दिवशी ॥ ज्ञानदेवा जो दृढ धरी मानसी ॥ तो कृतनिश्चयेसी तरलासे ॥ ९ ॥

॥ १९९६ ॥ ऐसें बोलोनि पांडुरंग ॥ आणिलें दिव्य प्रावर्ण सर्वांग ॥ दिले अलंकार अव्यंग ॥ हार मोती सुरंग लेवविले ॥ १ ॥ धन्य जन्मले भूमंडळीं ॥ कीर्तनीं नाचती गदारोळी ॥ ते विष्णुसन्निध सर्वकाळीं ॥ ऐसें वनमाळी बोलिले ॥ २ ॥ राही रुक्मिणी सत्यभामा ॥ विचारिती पुरुषोत्तमा ॥ बहुत अगाध येथींचा महिमा ॥ असे सर्वोत्तमा वरिष्ठ ॥ ३ ॥ ह्मणे विठोजी जंववरी धरा ॥ तंववरी समाधि स्थिरा ॥ हरिकीर्तन करती सैरा ॥ वंशपरंपरा उद्धरील ॥ ४ ॥ आणि मूळपीठ शिवाचें ॥ हेंचि पूर्व स्थान अगस्तीचें ॥ जाणोनि जन्म झाले चौघांचे ॥ सर्व क्षेत्राची आदिभूमी ॥ ५ ॥ पूर्वकल्याण युगायुगीं ॥ आणिक पुण्य जोडिलें प्रसंगीं ॥ तपें तपिन्नले महायोगी ॥ शुद्ध वीतरागी या ठायीं ॥ ६ ॥ येथें रामकृष्ण कथा ॥ करी जो शुद्ध भावार्था ॥ न पावे तो भवव्यथा ॥ संसार सर्वथा न बाधी ॥ ७ ॥ आणि सप्तद्वीप नवखंड ॥ गणित केलें अवघें ब्रह्मांड ॥ त्याहुनी पुण्य येथें अखंड ॥ जीवासी होईल ॥ ८ ॥ ऐसें उत्तमोत्तम थोर ॥ सकळ जीवाचें माहेर ॥ नामें तरती चराचर ॥ दिला वर रुक्मिणी ॥ ९ ॥ नामा ह्मणे देवराव ॥ महिमा सांगतसे भाव ॥ धन्य अलकापुरी गांव ॥ आदि ठाव वरिष्ठ ॥ १० ॥

॥ १९९७ ॥ नित्य अनुष्ठान तीर्थीं ॥ त्याचे पूर्वज उद्धरती ॥ जे कां अन्नदान करिती ॥ ते पावती वैकुंठीं ॥ १ ॥ ऐसें तीर्थक्षेत्र सर्वोत्तम ॥ आणिक नाहीं गायासी सम ॥ आदि विष्णु परब्रह्म ॥ मूळपीठ ॥ २ ॥ न वर्णवे येथींची थोरी ॥ प्रत्यक्ष येउनी श्रीहरी ॥ ज्ञानदेव कीर्तन गजरी ॥ समाधि भीतरी सुखरूप ॥ ३ ॥ अनंत पुण्य ज्याचे गांठीं ॥ तरीच ज्ञानदेव

पडे दिठीं ॥ जोडे तप कोट्यानकोटी ॥ ऐसे धूर्जटी बोलिले ॥ ४ ॥ हेंचि महा सिद्धाचें स्थळ ॥ शंकराचें मूळपीठ निर्मळ ॥ वास केलिया सर्वकाळ ॥ झाले निर्मळ दोष सर्व ॥ ५ ॥ अजान वृक्षातळीं हरिकथा ॥ नित्य जो नर करी तत्वता ॥ तो न जाय यमपंथा सर्वथा ॥ ऐसें जगन्नाथ बोलिले ॥ ६ ॥ द्वारीं सुवर्णाचा अश्वत्थ ॥ नित्य पूजलिया स्वस्थ ॥ लक्ष्मी न सांडी तया सत्य ॥ आर्तपुण्य होती ॥ ७ ॥ नित्य प्रदक्षिणा सप्त जोडे पवित्र ॥ पुण्यें पूर्वज बेताळीस सहित ॥ वैकुंठलोक प्राप्त ॥ तयासी होय ॥ ८ ॥ नित्य विष्णूचें पूजन ॥ नित्य नाम संकीर्तन ॥ नित्य वैष्णवसंत भोजन ॥ धन्य पावन इहलोकीं ॥ ९ ॥ नामा ह्मणे अलकापूर ॥ सर्व क्षेत्रामाजीं मनोहर ॥ परम पवित्र महा पवित्र ॥ शैवशास्त्र प्रसिद्ध असे ॥ १० ॥

॥ १९९८ ॥ ऐसें तीर्थ सर्वोत्तम ॥ सांगतसे पुरुषोत्तम ॥ शंकरादि परमधाम ॥ ब्रह्मनाम वर्णित ॥ १ ॥ क्षेत्रमहिमा अति अद्भुत ॥ आदि सिद्धेश्वर कुळदैवत ॥ समर्थ महाभागवत ॥ नामें गर्जत सर्वकाळ ॥ २ ॥ ह्मणे पुंडलिक पूर्वींचे स्थळ ॥ आणि शिवाचें मूळपीठ निर्मळ ॥ येथें निर्विकल्प सोज्वळ ॥ तप विशाळ जोडिलें ॥ ३ ॥ क्षेत्र पंढरीहुनी अधिक ॥ ऐसें बोलती ब्रह्मादिक ॥ ह्मणती धन्य येथींचे लोक ॥ शुद्ध भाविक प्रेमळ ॥ ४ ॥ घडे महाविष्णूचें पूजन ॥ तीर्थ व्रत संध्यास्नान ॥ वाचें हरिनाम कीर्तन ॥ श्रवणीं गुण विष्णूचे ॥ ५ ॥ विठोजी ह्मणे ऐक भक्ता ॥ तपोनिधि महंत तूं सर्वथा ॥ ज्ञानदेवासारिखा वक्ता ॥ मज आवडता न दिसे ॥ ६ ॥ तुह्मीं दोघे असा या सृष्टीं ॥ जग उद्धारी पाटोवाटीं ॥ कीर्तन करितां उठाउठी ॥ तों वैकुंठीं पावावें ॥ ७ ॥ पुंडलीक उठला सत्वरीं ॥ चरणरज वंदिले शिरीं ॥ ह्मणे मी भाग्याचा उजरी ॥ तूं कैवारी आमुचा ॥ ८ ॥ नामा ह्मणे देवभक्त ॥ एक ऋषि होऊनी समस्त ॥ निवृत्तिराज स्तुति बोलत ॥ प्रेम अद्भुत दाटलें ॥ ९ ॥

॥ १९९९ ॥ परब्रह्म परममूर्ती ॥ परमधाम परात्परकीर्ती ॥ परम अव्यय परंज्योती ॥ श्रुतिस्मृति स्वानुभव ॥ १ ॥ अकळ विकळ निरंजन ॥ ज्ञाताज्ञेय विश्वघन ॥ संशय दृश्य निरसन ॥ विश्वप्रिया ॥ २ ॥ कमलनयन विकाशा ॥ हृदयकमळ विलासा ॥ चरणकमळ विश्वेशा ॥ चित्त सुखधामा ॥ ३ ॥ चराचर सच्चिदानंदांग ॥ शुद्धस्नान शंकर दिव्यांग ॥ विष्णुमूर्ति पांडुरंग ॥ सगुणरूप भीमातटीं ॥ ४ ॥ सुजळ जळदघना ॥

सदन कोटी सूर्य किरणा ॥ मुक्ताहार जडित रत्ना ॥ किरिटी मुगुट विराजित ॥ ५ ॥ नीलोत्पल नीळवर्णा ॥ शामसुंदरा मूर्तिघना ॥ स्तवितां सहस्र वदना ॥ नकळे कांहीं ॥ ६ ॥ पार रजतमाचें मेहुडे ॥ पाहतां तूं न सांपडे ॥ नाहीं तुझिया पडिपाडे ॥ भूमंडळीं दैवत ॥ ७ ॥ अनंत ब्रह्मांडधीशा ॥ गुण न वर्णवे परेशा ॥ तुंवा ज्ञानदेव सर्वेशा ॥ आपणा ऐसा ठेविला ॥ ८ ॥ तंव निवृत्ति ह्मणे आह्मा तारिलें ॥ तुंवा नारायणा यावरी आदरिलें ॥ तो तूं चतुर्भुज गोपाळे ॥ सोपान तेथें येणें घडेल काय ॥ ९ ॥ नारायणें स्तुति परिसिली ॥ चित्त देऊनि अव्यक्त बोली ॥ तुह्मी गीतेवरी टीका केली ॥ ती मानवली सर्वांसी ॥ १० ॥ नामा ह्मणे सकळ वैष्णव ॥ जाणोनी शुद्ध सर्वभाव ॥ संतोषला देवराव ॥ तूं योगी शिव निवृत्तिनाथ ॥ ११ ॥

॥ २००० ॥ ह्मणे विठोजी शंकराचा ॥ प्रत्यक्ष अवतार तुझा साचा ॥ स्तुति केली असे वाचा ॥ विस्मयाचा पूर मज ॥ १ ॥ वस्ति सप्तद्वीप नवखंड ॥ त्यामाजीं अनंत ब्रह्मांड ॥ रोमरंध्रीं ज्या अखंड ॥ रूप प्रचंड मेदिनी ॥ २ ॥ ह्मणे निवृत्तिनाथ अवतारीं ॥ तुमच्या संगति श्रीहरी ॥ जें जें प्रेरसी कामारी ॥ सांगितलें करी उगाची ॥ ३ ॥ ह्मणे देवाधिदेव आतां ॥ सांगाल तें करूं तत्वता ॥ हरूं भवार्णवाची चिंता ॥ भवव्यथा जीवांची ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसे लळे ॥ पाळिलें पोशिलें गोपाळें ॥ करूनि समाधिसोहळे ॥ विष्णु केवळ प्रतिष्ठिला ॥ ५ ॥

॥ २००१ ॥ ऐकोनि वृत्त स्थीरावला ॥ महाविष्णु परम संतोषला ॥ मग सोपानदेवानीं आदरिला ॥ संवाद स्तुतीला परिसा ॥ १ ॥ जयजया तूं रामकृष्णा ॥ भक्ता भाविक हरि तृष्णा ॥ देह दीपक सहिष्णा ॥ कृष्ण कृष्ण ह्मणताती ॥ २ ॥ नरहरि नाम नरकेसरी ॥ वाजवोनी टाळीये करी ॥ टाळ मृदंग झणत्कारीं ॥ जयजय हरि ह्मणोनी आह्मी ॥ ३ ॥ एक हरि आह्मा सखा ॥ नाहीं त्रिभुवनामाजीं देखा ॥ समाधिस्वरूप ध्यानसखा ॥ चरणसुखा विनटलों ॥ ४ ॥ धन्य धन्य भूमिका देश ॥ स्वयें आपण जगन्निवास ॥ ज्ञानदेवें केला वास ॥ ही समाधि आस धरूनी ॥ ५ ॥ निवृत्ति महाराज श्रीगुरु थोर ॥ समाधि कारणें जाहले स्थिर ॥ पुढें कोण कैसा जाहला विचार ॥ सांगा निर्धार स्वामिया ॥ ६ ॥ देव ह्मणे ब्रह्म अवतार ॥ अवघियासी तूं चराचर ॥ श्रेष्ठपणें तुह्मी निर्धार ॥ आले आकारा सगुणरूप ॥ ७ ॥ सकळ असे तूं व्या-

पक ॥ स्वर्गलोक आणि मृत्युलोक ॥ अधर्म झालिया चाळक ॥ पुढती एकरूप धरिलें ॥ ८ ॥ ऐसें बोलोनि पांडुरंग ॥ सोपान निवाला सर्वांग ॥ सांकडें फेडितो श्रीरंग ॥ आमुचें अंतरंग जाणोनी ॥ ९ ॥ नामा ह्मणे सोपानदेव ॥ स्तुति आदरिली सद्भाव ॥ निजस्वहित स्वानुभव ॥ समाधिठाव संस्थित ॥ १० ॥

॥ २००२ ॥ सत्य सत्य जनार्दन ॥ सत्य सत्य नारायण ॥ सत्य सत्य आमुचें तूं धन ॥ जगज्जीवन जगदाकार ॥ १ ॥ तुजवांचोनी त्रिभुवनीं ॥ दुजा न देखों नाइको कोणी ॥ वेद शास्त्र पुराणीं ॥ अगाध करणी तुमची स्वामी ॥ २ ॥ तूं देवाधिदेवो उत्तम ॥ तूं निजभक्तांचा विश्राम ॥ तूं शंकराचा आत्माराम ॥ ऐसा नेम आमुचा ॥ ३ ॥ तरी भक्तांचा कोंवसा ॥ पावसी तूं हृषिकेशा ॥ नाहीं तुजवीण भरंवसा ॥ निश्चय ऐसा साच तूं ॥ ४ ॥ परत्रीचे देवतारू ॥ तुझा आगम निगम विचारू ॥ तुझ्या चिंतनें पारू ॥ उतरे संसारु दुर्घट ॥ ५ ॥ विठोजी ह्मणे मुक्ताबाई ॥ मन समर्पिलें माझे ठायीं ॥ तयासी जन्ममरण नाहीं ॥ सत्य पाही निर्धारें ॥ ६ ॥ नामा ह्मणे करूनि स्तुती ॥ मुक्ताबाई चरण वंदिती ॥ तंव संत महंतां विनविती ॥ आदिमूर्ति विठोबाची ॥ ७ ॥

॥ २००३ ॥ भक्त पुंडलिक पुढारला ॥ कर जोडोनि बोलिला ॥ वेदादिकां तुझा अबोला ॥ अनंत लीला स्वरूपाची ॥ १ ॥ ऐसा तूं समर्थ श्रीरंगा ॥ प्रगट आमुचिया भागा ॥ भीमातटीं पांडुरंगा ॥ मूढजना तारावया ॥ २ ॥ नवर्णवे भक्तपण ॥ न कळे तुमचें महिमान ॥ न बोलवे तंव साधन ॥ जन्मीं कोण केलें होतें ॥ ३ ॥ निरेभिवरेचे संगमीं ॥ चंद्रभागेचे उगमीं ॥ वेणुनादीं नारदस्वामी ॥ प्रेमनामीं डोलतसे ॥ ४ ॥ तरी तूं स्वामी दयाळ ॥ महाविष्णु तूं गोपाळ ॥ भक्तालागीं तूं कृपाळ ॥ दीनवत्सला पांडुरंगा ॥ ५ ॥ प्रेमा तुवां माझें करूनि मिस ॥ राहिलास युगीं अठ्ठावीस ॥ धरूनि सगुण रूपास ॥ ऐसा भक्ति भुललासी ॥ ६ ॥ तूं नियंता ईश्वरमूर्ती ॥ सकळ गोसावी श्रीपती ॥ तुजवांचोनी नेणें मती ॥ दयामूर्ति सागरा ॥ ७ ॥ नामा ह्मणे पुंडलिका ॥ देव ह्मणती पुण्यश्लोका ॥ स्तुति आदर केला निका ॥ धैर्य विवेक तूंचि होसी ॥ ८ ॥

॥ २००४ ॥ मग सारोनी संध्यास्नान ॥ देवभक्ति विष्णुपूजन ॥ पंक्ति आदरिलें आपोशन ॥ मागुती भोजन करिताती ॥ १ ॥ धन्य धन्य तूं ज्ञान-

राजा ॥ तुझी आवड केशव राजा ॥ पंक्ति परवडी समाजा ॥ वाढीती वोजा रुक्मिणी ॥ २ ॥ उभी राही सत्यभामा ॥ वाढीती पंचामृत उत्तमा ॥ बैसोनी पुंडलिक सामा ॥ ह्मणती दुर्लभ ॥ ३ ॥ निवृत्ति सोपान मुक्ताबाई ॥ गोपाळ देवढे दोन्हीं बाहीं ॥ रुक्मिणी सत्यभामा राही ॥ चतुष्ट ठाय वाढिती ॥ ४ ॥ वैष्णव प्रेमळाचे पंक्तीं ॥ प्रार्थना करितसे श्रीपति ॥ सोपान ज्ञानदेव निवृत्ती ॥ एकचि वृत्ति बैसले ॥ ५ ॥ गरुड तिष्ठत हनुमंतासेजारी ॥ त्यास रुक्मिणी ताट करी ॥ आनंदें गर्जती जयजयकारी ॥ रामकृष्ण हरिगोविंद ॥ ६ ॥ देवगण गंधर्व पाहाती ॥ ब्रह्मादिक चला ह्मणती ॥ केवढें भाग्याचिया मूर्ती ॥ भक्त आवडती जिवलग ॥ ७ ॥ नामा ह्मणे अलकापुर ॥ क्षेत्र सर्वांमाजीं थोर ॥ ज्ञानदेव समाधि स्थिर ॥ नामगजर सर्वकाळ ॥ ८ ॥

॥ २००५ ॥ मग विनवी ज्ञानदेव ॥ सकळांचा जाणोनी ठाव ॥ शुद्धभक्ति प्रेमळ वैष्णव ॥ सर्वभाव सख्य घेती ॥ १ ॥ बैसोनियां एकासनीं ॥ देवभक्त चक्रपाणी ॥ तांबूल घेऊनि वदनीं ॥ संतोष होउनी बोलती ॥ २ ॥ मग पाचारिला गरुड ॥ भक्त पुंडलिक प्रौढ ॥ सोपानदेव जगारूढ ॥ पुरे कोड सकळांचें ॥ ३ ॥ ऐसा निर्धार करूनी ॥ समस्तांचें भोजन सारूनी ॥ सिद्ध जाहली माता रुक्मिणी ॥ अस्तमानीं दिन गेला ॥ ४ ॥ जावोनि तया पुष्पकावरी ॥ शयन आरंभिलें हरी ॥ नारद तुंबर वैकुंठाभीतरीं ॥ मंजुळ सुस्वरीं गातसे ॥ ५ ॥ भक्त भागवत भाग्याचे ॥ घोष गजर केला वाचें ॥ ऐसे चतुर प्रहर निशीचे ॥ जागरण हरीचें क्रमिलें ॥ ६ ॥ केलें प्रयाण सुमुहूर्त ॥ पंढरीस जावयाचा आर्त ॥ संवत्सर घेवोनी समस्त ॥ सोपान स्वस्थ समाधिसी ॥ ७ ॥ नामा ह्मणे चालिला हरी ॥ ज्ञानदेव प्रार्थना करी ॥ देवा तूंचि निरंतरीं ॥ रहावें मंदिरीं आमुच्या ॥ ८ ॥

॥ २००६ ॥ भगवंत ह्मणे नामयासी ॥ तूं यथार्थ बोलिलासी ॥ क्षणक्षणा आठव मानसीं ॥ न पडे विसर मजसी ॥ १ ॥ आवडी भक्ति ज्ञान वीतरागी ॥ ज्ञानदेव युगायुगीं ॥ न देखे सकळ ब्रह्मांड जगीं ॥ मजलागीं खंती वाटे ॥ २ ॥ उद्धव चरणावरी ठेवोनि माथा ॥ एक विनंति परिसावी जगन्नाथा ॥ गुज अंतरींचें सांगा समर्था ॥ कृपावंता स्वामिया ॥ ३ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपानासी ॥ तिघां बैसविलें समाधीसी ॥ मुक्ताबाई इची स्थिति कैशी ॥ ती सांगावी ॥ ४ ॥ ह्मणे विठोजी

तूं काय नेणसी ॥ प्रीति करूनी आह्मां पुससी ॥ तरी ऐका स्तुति हृषिकेशी ॥ ऐसें उघड तुजसी बोलतों ॥ ५ ॥ निवृत्तीचा कर अभय शिरीं ॥ सत्य सनातन निर्धारी ॥ महाकल्पाच्या अंतिवरी ॥ देह अवसरीं ठेविला ॥ ६ ॥ तंववरी बाईचें शरीर ॥ चिरकाळ निरंतर ॥ मुक्ताबाई ब्राह्मणी साचार ॥ जाण निर्विकार उद्धवा ॥ ७ ॥ देवगण बैसोनि विमाना ॥ गेले आपुलिया भुवना ॥ सकळ महामुनिस्थाना ॥ हरिचरणा वंदोनी ॥ ८ ॥ ह्मणती सभाग्य केव्हडें ॥ जिहीं केलें ब्रह्म उघडें ॥ संवत्सर गांवीं वाडव कोडें ॥ देखिलें रोकडें सकळीं ॥ ९ ॥ निवृत्तिनाथ पायाळ पूर्ण ॥ ज्ञानदेव ज्ञानांजन ॥ सोपानदेव ब्रह्म जाणोन ॥ जिहीं निधान जोडिलें ॥ १० ॥ शुद्धिभक्ति भावज्ञान ॥ जोडिला विठोबा निधान ॥ तेथींचे विभागी संपूर्ण ॥ प्रेम जीवन ओसंडत ॥ ११ ॥ वैष्णव महंतासी कुरौडी ॥ मुक्ताबाई ओंवाळोनि सांडी ॥ सद्भाव उभारिली गुढी ॥ आनंद परवडी नाचती ॥ १२ ॥ नामा ह्मणे पंढरीसी ॥ स्वामी चालिले शीघ्र गतीसी ॥ सर्वें भक्त मांदी सरसी ॥ नाम वाचेसी गर्जती ॥ १३ ॥

॥ २००७ ॥ ऐसियाचें जो चरित्र आवडी ऐके ॥ तो या भक्तांबरोबरी तुके ॥ भोगी वैकुंठ निजसुख ॥ स्वयंमुखें बोलिले ॥ १ ॥ धन्य धन्य तो पुंडलिक भक्त ॥ जया कारणें हरि तिष्ठत ॥ ऐसे पवाडे गर्जत ॥ जग तारित नामेंकरूनी ॥ २ ॥ जन्मोजन्मीं सभाग्य होती ॥ तयालागीं निजपद प्राप्ति ॥ कदा काळीं पुनरावृत्ति ॥ नये मागुती संसारीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे नामस्मरण ॥ तुटती प्रपंचधरण बंधन ॥ सुख पावती निदान ॥ समचरण देखलिया ॥ ४ ॥

॥ समाधीचे अभंग प्रथम प्रकरण समाप्त ॥

---

## प्रकरण दुसरें.

॥ २००८ ॥ मंगळमूर्ति सुखधामा ॥ भक्तांचिया कल्पद्रुमा ॥ निवृत्तीचिया पुरुषोत्तमा ॥ नमो तुज ॥ १ ॥ विद्यासागरा वैरागरा ॥ संकटीं माउली ज्ञानेश्वरा ॥ भरित दाटलें अंबरा ॥ तो तूं योगेश्वरा मोक्षदायी ॥ २ ॥

मति चालविली रसाळ ॥ संत श्रोतियां केला सुकाळ ॥ दिधलें पुरुषार्थाचें बळ ॥ तें तूं केवळ संजीवनी ॥ ३ ॥ अमृत अनुभव आनंदलहरी ॥ ग्रंथ सिद्ध केला ज्ञानेश्वरी ॥ संस्कृत प्राकृत वैखरी ॥ वदविली माझी ॥ ४ ॥ आतां मोक्षाचिया वाटां ॥ पाहिला षड्चक्र चोहटा ॥ आज्ञा द्यावी वैकुंठा ॥ ज्ञानदेव ह्मणे ॥ ५ ॥

॥ २००९ ॥ आतां पदपदांतराची सेवा ॥ संपादिली स्वामी केशवा ॥ धन्य आमुचिया दैवा ॥ जोडिलां तुह्मीं ॥ १ ॥ आत्मविद्या बोलावया कारण ॥ सुख पावले श्रोते सज्जन ॥ आतां जे आरंभिलें मन ॥ तें आपण सिद्धि न्यावें ॥ २ ॥ भूवैकुंठ एक पंढरी ॥ त्याहुनी आगळी अलकापुरी ॥ सिद्धेश्वरा शेजारीं ॥ इंद्रायणी ॥ ३ ॥ त्रिपुटी पश्चिम मोक्षाची वाट ॥ प्रत्यक्ष कैलास सिद्धपेठ ॥ गोपाळपुरीं केली गोष्ट ॥ चौघीजणीं ॥ ४ ॥ नलगे कलियुगींचा वारा ॥ जें जें बोलिलों जगदोद्धरा ॥ मागितला थारा ॥ पदीं तुझ्या ॥ ५ ॥ आतां वैराग्याचें बळ ॥ सिद्धि प्राप्तीचें फळ ॥ ज्ञानदेवें घेतली आळ ॥ जाणा स्थळ आवडीचें ॥ ६ ॥

॥ २०१० ॥ अष्टोत्तरशें तीर्थें सारीं ॥ ओघें आलीं अलकापुरीं ॥ वाद्यें वाजताती गजरीं ॥ कीर्तन लहरी अमृताची ॥ १ ॥ जैसा कस्तुरीचा सुगंधू ॥ अनुभवी न ह्मणतीच बद्धू ॥ तैसा औटपिठाचा नादू ॥ आठवी गोविंदु आवडीनें ॥ २ ॥ बौद्ध अवतार चक्रपाणी ॥ सत्रावी कळा माय रुक्मिणी ॥ जाणत असे अंतःकरणीं ॥ भक्तइच्छा ॥ ३ ॥ भावें विठ्ठलें केली गोष्टी ॥ ज्ञानदेवें अपूर्व इच्छिलें पोटीं ॥ जावें उठाउठी ॥ समुदायेंसी ॥ ४ ॥

॥ २०११ ॥ विठ्ठल रुक्मिणीसहित गरुड हनुमंत ॥ आणिक संत महंत जमा झाले ॥ १ ॥ परिसा भागवत नामा पुंडलिक ॥ पताकासहित उठावले ॥ २ ॥ गंधर्व आणि देव आले सुरगण ॥ चाललीं विमानें अलकापुरीं ॥ ३ ॥ लहान थोर सारे आले ऋषेश्वर ॥ उतरले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा दिसती तातडी ॥ जाती मज घडी युगाऐसी ॥ ५ ॥

॥ २०१२ ॥ पंढरीचा पोहा आला अलकापुरीं ॥ पंच कोसावरी साधु जन ॥ १ ॥ पांडुरंगा संगें वैष्णवांचे भार ॥ दिंड्या ते बाहेर निघाल्यासे ॥ २ ॥ पातकांचे भार निघाले बाहेर ॥ भेटती ऋषीश्वर पांडुरंगा

॥ ३ ॥ अवघीया भेटी झाल्या त्या बाहेरी ॥ मग अलकापुरीं येते जाले ॥ ४ ॥ सोपानानें मग केला नमस्कार ॥ उतरिलें पार पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ २०१३ ॥ हरिहर विधाता आले अलकापुरीं ॥ इंद्रायणीतीरीं एक थाटीं ॥ १ ॥ योगियांचा सखा कोठें ज्ञानेश्वर ॥ जाती ऋषेश्वर भेटावया ॥ २ ॥ शुन्याचिया पोटीं निरंजन गुंफा ॥ ज्ञानयज्ञ सोपा सिद्ध केला ॥ ३ ॥ उन्मनी निद्रा लागलीसे फार ॥ स्वरूपीं ज्ञानेश्वर जागा झाला ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा भली केली बुद्धी ॥ लागली समाधि ज्ञानदेवा ॥ ५ ॥

॥ २०१४ ॥ लागली उन्मनीं वैराग्याची धुणी ॥ जागा निरंजनीं निरंतर ॥ १ ॥ भूचरी खेचरी चाचरीच्या छंदें ॥ अगोचरिच्या नादें सहस्र दळीं ॥ २ ॥ औट हातध्वनी चित्तवृत्ति जेथें ॥ उजळली ज्योत तन्मयाची ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा करा सावधान ॥ नाहीं देहभान ज्ञानदेवा ॥ ४ ॥

॥ २०१५ ॥ धन्य इंद्रायणी पिंपळाचा पार ॥ धन्य ज्ञानेश्वर पुण्यभूमी ॥ १ ॥ धन्य भागीरथी मनकर्णिका वोघा ॥ आणिक हो गंगा त्रिवेणी त्या ॥ २ ॥ धन्य ऋषीश्वर धन्य पांडुरंग ॥ मिळाले ते सांग अलकापुरी॥ ३॥ नामा ह्मणे धन्य भाग्याचे हे संत ॥ झाला पहा एकांत ज्ञानोबाचा ॥४॥

॥ २०१६ ॥ आल्याड पल्याड पताकांचे भार ॥ मध्यें मनोहर इंद्रायणी ॥ १ ॥ पिंवळ्या पाऱ्या आणिक हिरव्या ॥ नीळवर्ण साऱ्या लखलखीत ॥ २ ॥ जरी जर्तारी झाल्या रानभरी ॥ विजा सावरी खेळताती ॥ ३ ॥ सर्पाकार दंड तारागणावाणी ॥ पताका तिकोनी दाटताती ॥ ४ ॥ नामा ह्मणे पताकांचे भार ॥ केव्हडें भाग्य थोर ज्ञानोबाचें ॥ ५ ॥

॥ २०१७ ॥ कैलासाचा वास अधिक सिद्ध बेट ॥ विष्णूचें वैकुंठ पुरातन ॥ १ ॥ भूमिवरी पंढरी तैसी अलकापुरी ॥ पंच कोशावरी पुण्यभूमी ॥ २ ॥ सुखाची हे मूर्ति नीळकंठलिंग ॥ चक्रतीर्थ सांग मोक्ष भेटे ॥ ३ ॥ परमार्थ सुअर्थ देखतांची संत ॥ सांगितली मात अनुभवाची॥४॥ नामा ह्मणे देवा हें स्थळ चांगलें ॥ चित्त मन रंगलें ज्ञानोबाचें ॥ ५ ॥

॥ २०१८ ॥ पुसताती संत सांगा देवा मातें ॥ पूर्वी होतें येथें कोण क्षेत्र ॥ १ ॥ देव ह्मणे स्थळ सिद्ध हें अनादी ॥ येथेंच समाधि ज्ञानदेवा

॥ २ ॥ अष्टोत्तरशें वेळां साधिली समाधी ॥ ऐसें हें अनादी ठाव असे ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा सांगितलें उत्तम ॥ ज्ञानअंजनें सुगम देखों डोळां ॥ ४ ॥

॥ २०१९ ॥ स्वानंदें स्वभावें देव भक्ता भेटी ॥ वोरसोनी कंठीं आलिंगावें ॥ १ ॥ देव ह्मणे भलें आठवलें तुज ॥ ते हे संधि मज कळली असे ॥ २ ॥ पदपदांतरें केला मार्ग सोपा ॥ त्यांत माझी कृपा वोळली असे ॥ ३ ॥ देव ह्मणे तुझी पुरवीन आळी ॥ सुखी सही मंडळी वैष्णवांची ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा आज्ञा देगा यासी ॥ नेणुं काय आह्मांसी आरंभिलें ॥ ५ ॥

॥ २०२० ॥ उदित झालें मन आतां काय अनुमान ॥ करी शीघ्र प्रस्थान आज्ञा माझी ॥ १ ॥ देवाचा हो कर धरोनी ज्ञानेश्वर ॥ निघाला बाहेर योगीराज ॥ २ ॥ मागें पुढें संत चालिले मिरवित ॥ कौतुक पहात इहलोकीं ॥ ३ ॥ नारा विठा गोंदा माहादा विरक्त ॥ परसा भागवत उभे तेथें ॥ ४ ॥ समुदाय वैष्णव मिळालासे भारी ॥ महोत्सव गजरीं आरंभिला ॥ ५ ॥ नामा ह्मणे गुज दाविलें श्रीहरी ॥ धन्य अलकापुरी पुण्यभूमी ॥ ६ ॥

॥ २०२१ ॥ सारासार विचार करिती औघेजन ॥ हें ज्ञान अंजन दाविलें डोळां ॥ १ ॥ पाहिलें गे मायी अंतरींचें सुख ॥ वैकुंठनायक उभा असे ॥ २ ॥ ज्ञानदेवायोगें सकळांशीं दर्शन ॥ परब्रह्म निधान डुल्लतसे ॥ ३ ॥ वोसंडले देव पाहोनिया प्रेम ॥ डुल्लती सप्रेम अनुभवें ॥ ४ ॥ अवघेजन कोडें घालिती सांकडें ॥ सांगावे निवाडे नामयाचे ॥ ५ ॥ देव ह्मणे नामा विचारिलें आह्मा ॥ ते कां सांधी तुह्मा कळली नसे ॥ ६ ॥

॥ २०२२ ॥ देव ह्मणे नामया ब्रह्मक्षेत्र आदी ॥ येथेची समाधि ज्ञानदेवा ॥ १ ॥ चौयुगा आदिस्थळ पुरातन ॥ गेले ते नेमुन मुनिजन ॥ २ ॥ चालिले सकळ झाले ते विकळ ॥ अनादि हें स्थळ ज्ञानदेवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे सुख आह्मा सांगितलें हरी ॥ दीर्घध्वनि करी वोसंडोनी ॥ ४ ॥

॥ २०२३ ॥ खेद दुःख करी मनाचा कळवळा ॥ प्रेमाश्रु डोळां दाटताती ॥ १ ॥ नारा विठा गोंदा पाठविला माहादा ॥ साहित्या गोविंदा सांगितलें ॥ २ ॥ काय काय आणूं सांगा हें प्रमाण ॥ नेमियेला नेम

पांडुरंगें ॥ ३ ॥ तुळसी आणि बेल दर्भ आणि फुलें ॥ उदक हें चांगलें भागिरथीचें ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा साहित्य करितां ॥ आठवितें चित्ता खेद दुःख ॥ ५ ॥

॥ २०२४ ॥ साडेतीन पाउलें टाकिलीं निश्चळ ॥ नेमियेलें स्थळ उत्तरायणीं ॥ १ ॥ देव ह्मणे ज्ञाना होई सावधान ॥ माग वरदान मज कांहीं ॥ २ ॥ ज्ञानदेव ह्मणे शुद्ध कार्तिक मासीं ॥ वृत्त एकादशी स्वामीकडे ॥ ३ ॥ कृष्णपक्षीं वृत्त हरिदीन परिपूर्ण ॥ मागितला मान ज्ञानदेवें ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा आवाडीनें देतां ॥ जोडलें हें संतां पियूष जें ॥ ५ ॥

॥ २०२५ ॥ वोसंडोनी हरि आनंदला तेथें ॥ पुण्य हें अगणित सांगितलें ॥ १ ॥ सर्वांगालागीं न्याहाळीलें परिपूर्ण ॥ केलें निंबलोण आवडीनें ॥ २ ॥ अलकापुरीं कोणी करील कीर्तन ॥ तयालागीं येणें वैकुंठीचें ॥ ४ ॥ अस्ति नास्ति उदकीं करीन ब्रह्मरूप ॥ कोटी कुळांसहित उद्धारीन ॥ ४ ॥ जेथें ज्ञानदेव तेथें मी निशिदिनीं ॥ येथें सुखें ज्ञानी डुल्लताती ॥ ५ ॥ नामा ह्मणे आतां वोसंडलें हरी ॥ जड मुढावरी कृपा केली ॥ ६ ॥

॥ २०२६ ॥ वन वृक्ष वल्ली ईश्वरासमान ॥ ऋषि मुनि जन राहाती जेथें ॥ १ ॥ होउनीया पक्षी कमोद कोकिळा ॥ वेष्टियेलें स्थळा ब्रह्मबोधें ॥ २ ॥ मृत्तिका पाषाण पंचक्रोसीचे खडे ॥ झाले पहा धडफुडे ब्रह्मरूप ॥ ३ ॥ पंचमहापातकी गेले अलकापुरीं ॥ न चले साजवरी काळ यम ॥ ४ ॥ सांगताती देव ऐकती रुक्मिणी ॥ नामा ह्मणे चक्रपाणी वर दिला ॥ ५ ॥

॥ २०२७ ॥ चक्रतीर्थीं पाहा उभा तो गोपाळ ॥ पुढें विणे टाळ वाजताती ॥ १ ॥ स्वर्गींहुनी पुष्पें वर्षती सुरवर ॥ उभे ऋषेश्वर समुदायेंसी ॥ २ ॥ आणिक वाद्यें तेथें वाजती अपार ॥ जाती ज्ञानेश्वर समाधीसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा चुकों नेदी संधी ॥ पोहोंचवितां सिद्धि बाळकासी ॥ ४ ॥

॥ २०२८ ॥ कोणे जाणे माझे जीवींचा कळवळा ॥ प्रेमाश्रु डोळां लोटताती ॥ १ ॥ अवघीयांचें मन दूषित तटस्थ ॥ लहानथोर संत

वोसंडती ॥ २ ॥ तारियेले जड वा माझ्या कीर्तनीं ॥ आठवती मनीं गुण तुझे ॥ ३ ॥ नामा ह्मणे येथें बोलवेना मज ॥ जातसे निजगुज आवडीचें ॥ ४ ॥

॥ २०२९ ॥ काय सांगों देवा ज्ञानोबाची ख्याती ॥ वेद ह्मैशा द्वारीं मुखीं वदविले ॥ १ ॥ कोठवरी वानूं याची स्वरूपस्थिती ॥ चालविली भिंती मृत्तिकेची ॥ २ ॥ अविद्या मायेचा लागों नेदी वारा ॥ ऐसें जगदोद्धारें बोलियेलें ॥ ३ ॥ नामा ह्मणे यांनीं तारीले पतीत ॥ भक्ति केली ख्यात ज्ञानदेवें ॥ ४ ॥

॥ २०३० ॥ अनुभव हा सागर गुह्य आणि ब्रह्म ॥ उघडें अध्यात्म बोलियेलें ॥ १ ॥ प्रगट हें गुह्य उकलीलें गा बाळ ॥ केलें करतळमळ ज्ञानयानें ॥ २ ॥ कोणाची कल्पना नुरेंची वा येथ ॥ उघडा गुह्यार्थ सिद्ध केला ॥ ३ ॥ करणें न करणें सांगितला पंथ ॥ तिहींलोकीं कीर्त वाढविली ॥ ४ ॥ ज्ञान हें अंजन साधी संजीवनी ॥ नामा ह्मणे यांनीं ख्याती केली ॥ ५ ॥

॥ २०३१ ॥ अहंकार पोटीचें उतरिलें जहर ॥ केला उपकार जगामाजीं ॥ १ ॥ काम क्रोध उतें उतरिले डंभ ॥ करपले कोंभ संशयांचे ॥ २ ॥ विकल्पाचे पायीं घातीयेली बेडी ॥ केली तडातोडी इंद्रियांची ॥ ३ ॥ स्वर्गादिक सुखें माविलीं रोकडीं ॥ वैकुंठासी शिडी लावियेली ॥ ४ ॥ नामा ह्मणे धन्य उभारिल्या ध्वजा ॥ घातीयेल्या सेजा सुखधामीं ॥ ५ ॥

॥ २०३२ ॥ कासाविस प्राण मन तळमळी ॥ जैसी कां मासोळी जीवनावीण ॥ १ ॥ दाही दिशा वोस वाटती उदास ॥ करिताती सोस मनामाजीं ॥ २ ॥ घातीयेली घोण प्राण आला कंठीं ॥ ज्ञानदेवासाठीं तळमळी ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा वाटतसे खंती ॥ चालली विभूति योगियांची ॥ ४ ॥

॥ २०३३ ॥ नानापरी मन आवरीतों भारी ॥ कांहीं केल्या हरि विसर न पडे ॥ १ ॥ दृश्या अदृश्याच्या दूर केल्या गोष्टी ॥ उघडीली दृष्टि ज्ञानदेवें ॥ २ ॥ गीतेवरी टीका ग्रंथ केला सार ॥ केवळ ईश्वर ज्ञानाचा हा ॥ ३ ॥ नामा ह्मणे आतां देहासी वीटला ॥ स्वरूपीं पालटला ज्ञानदेव ॥ ४ ॥

॥ २०३४ ॥ गंध आणि अक्षता पंचामृत उदक ॥ धूप आणि दीप आणियेले ॥ १ ॥ संत सज्जनाचा मिळाला समुदावो ॥ मध्यें ज्ञानदेवो चालतसे ॥ २ ॥ क्षेत्रप्रदक्षणा करावया उद्देशी ॥ मुहूर्त देवापाशीं विचारीला ॥ ३ ॥ दशमीचे दिवशीं रिघावें बाहेर ॥ हरिदिनी जागर निशिदिनीं ॥ ४ ॥ द्वादशी पारणें सोडावें निश्चळ ॥ नेमियलें स्थळ सिद्धेश्वरीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि नेमिला सिद्धांत ॥ काय माझा अंत पाहातसां ॥ ६ ॥

॥ २०३५ ॥ ज्ञानेश्वरापाशीं आनंदी आनंद ॥ नाचतो गोविंद कीर्तनासी ॥ १ ॥ दशमीच्या दिवशीं महोत्साव अलकापुरीं ॥ करीतसे हरि आवडीनें ॥ २ ॥ हरिदिन जागरण होत सारी रात्र ॥ बसोनी पंढरिनाथ स्वअंगें ॥ ३ ॥ द्वादशी पुण्यतिथी केली ज्ञानेश्वरा ॥ पांच दिवस सारा महोत्साव ॥ ४ ॥ अमवास्येचे दिवशीं केला गोपाळकाला ॥ मग वैष्णवाला लाभ मोठा ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा आनंद अलकापुरीं ॥ कांहीं दिवस हरि राहा येथें ॥ ६ ॥

॥ २०३६ ॥ विनविती संत आणिक सज्जन ॥ नव्हे समाधान कांहीं केल्या ॥ १ ॥ नानाचि प्रकार करितसे घोर ॥ कांहीं केल्या स्थिर चित्त नव्हे ॥ २ ॥ काय पाहावें याला विरक्त पुरुषाला ॥ स्वरूपीं मिळाला ज्ञानदेव ॥ ३ ॥ नामा ह्मणे याचें उचंबळलें प्रेम ॥ ह्मणोनी परब्रह्म मागें पुढें ॥ ४ ॥

॥ २०३७ ॥ निवृत्ति सोपान आणिक मुक्ताबाई ॥ जातातीं पाही कोणीकडे ॥ १ ॥ देवासी गुह्यार्थ केला पा एकांत ॥ ज्ञानदेवें हित आरंभिलें ॥ २ ॥ नामा ह्मणे अवघे बसा एकीकडे ॥ ऐकों द्या निवाडे गुज याचें ॥ ३ ॥

॥ २०३८ ॥ निवृत्ति सोपान मुक्ताई धाकुटी ॥ धरियेली कंठीं पांडुरंगें ॥ १ ॥ कळवळली मनीं करिती दीर्घ ध्वनी ॥ आठविती मनीं ज्ञानदेव ॥ २ ॥ विकळ झालें चित्त संत हे दुश्चित्त ॥ नामा विकळ तेथ होत असे ॥ ३ ॥

॥ २०३९ ॥ निसंगासी संग नलगे आणिकाचा ॥ परमार्थ हा साचा गहन केला ॥ १ ॥ जड या जीवाचें हरविलें अज्ञान ॥ नेलें उतरून भवसिंधु ॥ २ ॥ ज्ञानियासी केली सिंधुसंजीवनी ॥ झालें जनीं वनीं एक

तारूं ॥ ३ ॥ नामा ह्मणे सत्य वा माझ्याचें बोलणें ॥ करी निंबलोण पदीं त्याचे ॥ ४ ॥

॥ २०४० ॥ फार आठवतें निवृत्तीचे चित्तीं ॥ सोपान स्फुंदती मुक्ताबाई ॥ १ ॥ आह्मा माता पिता निस ज्ञानेश्वर ॥ नाहीं आतां थार विश्रांतीसी ॥ २ ॥ छळीलें ब्राह्मणें प्रतिष्ठानीं जातां ॥ रेड्यामुखीं वेदांता बोलविलें ॥ ३ ॥ आला चांगदेव व्याघ्र वहान घेउन ॥ नेला अभिमान ज्ञानदेवें ॥ ४ ॥ नाना प्रकारचे आठविती शब्द ॥ नामा ह्मणे बोध भाविकाला ॥ ५ ॥

॥ २०४१ ॥ देव ह्मणे असें आठवाल फार ॥ लागला उशीर समाधीसी ॥ १ ॥ रुक्माबाई ह्मणे याजलागीं जाण ॥ ब्रह्मीं ब्रह्मखूण मेळविली ॥ २ ॥ अवतार हे चौघे झाले कैशापरी ॥ सांगा आह्मां हरि उकलोनी ॥ ३ ॥ शीव तो निवृत्ति सोपान ब्रह्मस्थिती ॥ ज्ञानदेव मूर्ती विष्णूची हो ॥ ४ ॥ ब्रह्मनी हे कळा माय मुक्ताबाई ॥ विचारूनी पाही स्वयंमुक्ता ॥ ५ ॥ नामा ह्मणे याला नाहीं पां उपाधी ॥ पूर्ण हे समाधि ज्ञानदेवा ॥ ६ ॥

॥ २०४२ ॥ अंतर बाहेर कळलें स्वरूप ॥ स्वयें नंदादीप उजळिला ॥ १ ॥ येणें जाणें कोठें योगी पहा अवीट ॥ सान वैकुंठ करुनी ठेवी ॥ २ ॥ ज्ञानीयाला मरण ह्मणती अज्ञान ॥ वायां तुह्मीं शीण करूं नका ॥ ३ ॥ घटाचीया योगें प्रतीबिंब भासे ॥ काय ह्मणे नासे निरालंब ॥ ४ ॥ दर्पणाचे योगें दुसरें देखणें ॥ काय मुखें दोन त्यांचीं झालीं ॥ ५ ॥ दृश्याचीयामुळें जीव दिसे येथें ॥ काय पां परमार्थ विटंबले ॥ ६ ॥ तंतुचीयामुळें पटाला विस्तार ॥ काय निराकार वायां गेलें ॥ ७ ॥ रुक्मादेवीवरें केलें समाधान ॥ धरुनी ठेले मौन्य अवघे जण ॥ ८ ॥

॥ २०४३ ॥ छत्र चामरें उभीं सन्मुख भोंवतीं ॥ रुक्माईचा पति मध्य भागीं ॥ १ ॥ निंबें आणि नारळ गोण्याचीं पोफळें ॥ उतो सांहीं केळें आणियलीं ॥ २ ॥ आणि बहुतापरी घेतली सामग्री ॥ पीत पितांबरीं मृगछाला ॥ ३ ॥ भगवीं आभरणें घेतलें भस्म ॥ अंगें परब्रह्म साह्य त्यासी ॥ ४ ॥ नामा ह्मणे स्वामी तिष्ठताती अंगें ॥ मेळविलीं सांगें साहित्यासी ॥ ५ ॥

॥ २०४४ ॥ उगमापासुनी गंगा सागरासी गेली ॥ काय दोन जालीं उदकें सांची ॥ १ ॥ तैसा ज्ञानदेव जाला अनुभव ॥ काय आह्मां देव

दूरावला ॥ २ ॥ सरिता सरोवराचे एके ठायीं झरे ॥ लहान थोर सारे स्वरूपीं माझ्या ॥ ३ ॥ रुक्मादेवीवरें उगविलें गाबाळ ॥ संत कृपाळ डुल्लताती ॥ ४ ॥ नामा ह्मणे येणें मोहिलें चित्त ॥ राहिले तटस्थ चौघेजण ॥ ५ ॥

॥ २०४५ ॥ आणिक वाद्यें तेथें वाजताती अपार ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ १ ॥ चिद्रत्नमंडप दिधला कल्लोळ ॥ जैसे दीपमाळ दीप ठेले ॥ २ ॥ नक्षत्र गोंधळ उसळती भारी ॥ चक्रें त्याजवरी उल्हाळती ॥ ३ ॥ मोतियें तोरणें लावलीं अपार ॥ झळकती तारे विभु ऐसे ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा नवल केलें गहन ॥ पुंजाळिलें गगन ज्ञानदेवें ॥ ५ ॥

॥ २०४६ ॥ निवृत्ति ज्ञानदेव उभे दोहींकडे ॥ सोपान तो पुढें मुक्ताबाई ॥ १ ॥ देहुडे सुरगण थका पडिले लोकां ॥ सुरू केला डंका वैकुंठींचा ॥ २ ॥ चक्रतीर्थीं उभे देव साधुजन ॥ करविलें स्नान ज्ञानदेवा ॥ ३ ॥ देवाचें हें तीर्थ घेतलें ज्ञानेश्वरें ॥ केला नमस्कार पादपद्मी ॥ ४ ॥ विठ्ठल रुक्मिणी ऋषिसुरवर ॥ पूजा ज्ञानेश्वर करीतसे ॥ ५ ॥ नामयाच्या हातीं गंध अक्षता ॥ पूजा महंता मान्य झाली ॥ ६ ॥

॥ २०४७ ॥ टाळ विणे मृदंग वाजती अपार ॥ नारद तुंबर गीत गाती ॥ १ ॥ शुक वामदेव अंबऋषि सादर ॥ मध्यें ज्ञानेश्वर ब्रह्मरूप ॥ २ ॥ पिपिलीकेसीं मार्ग जावया न मिळे ॥ जाती भार मेळे वैष्णवांचे ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा दाविली नवाळी ॥ पुरविली आळी ज्ञानोबाची ॥ ४ ॥

॥ २०४८ ॥ दशमीचे दिवशीं केली प्रदक्षिणा ॥ आणिक कीर्तना संत उभे ॥ १ ॥ रात्रंदिवस त्यांहीं केला हरिजागर ॥ हरिदिनीं थोर कृष्णपक्षीं ॥ २ ॥ मग केलें स्नान भागिरथीचे तीरीं ॥ संत महंता भारी पूजियेलें ॥ ३ ॥ अवलोकिलें डोळां अंतर बाहेरी ॥ मग सिद्धेश्वरीं येते झाले ॥ ४ ॥ सिद्धेश्वरालागीं पूजिलें निवळ ॥ मागितलें स्थळ समाधीसी ॥ ५ ॥ गंगा आणि गिरजा नीळकंठ ईश्वर ॥ केला नमस्कार नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ २०४९ ॥ अष्टोत्तरशें वेळ समाधि निश्चळ ॥ पूर्वीं तुझें स्थळ वहनाखालीं ॥ १ ॥ उठविला नंदी शिवाचा ढवळा ॥ उघडिली शिळा विवराची ॥ २ ॥ आसन आणि धुनी मृगछालावर ॥ पाहाती ऋषेश्वर

वोसंडोनी ॥ ३ ॥ वा माझी समाधि पाहिली जुनाट ॥ केवळ वैकुंठ गुह्यगौप्य ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा पुरातन स्थान ॥ ऐसें नारायणें दावियेलें ॥ ५ ॥

॥ २०५० ॥ नारा विठा गोंदा माहादा पाठविला ॥ झाडविली जागा समाधीची ॥ १ ॥ हरिदिनीं जागर केला निशीदिनीं ॥ उदईक पारणीं द्वादशीचीं ॥ २ ॥ गंगा गिरजा राही रुक्माबाई भामा ॥ उठिल्या रांधण्या पारण्याच्या ॥ ३ ॥ नाना प्रकारचे पाक ते अपार ॥ मुनि ऋषेश्वर बोलाविले ॥ ४ ॥ वैष्णव देव आणि आले सुरगण ॥ करोनिया स्नान इंद्रायणीं ॥ ५ ॥ पिंपळाचे पारीं बैसविल्या पंक्ती ॥ पात्रें ते श्रीपति वाढूं लागे ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवा करणें साहित्यासी ॥ होतो कासावीसी प्राण माझा ॥ ७ ॥

॥ २०५१ ॥ सोंवळ्यानें हरि वाढितो सकळां ॥ मनींचा कळवळा कोण जाणे ॥ १ ॥ रुक्माईचे कानीं सांगितली गोष्ट ॥ विस्तारावें ताट ज्ञानदेवा ॥ २ ॥ राही रुक्माबाई वाढिती आवडीनें ॥ सोडितो पारणें ज्ञानदेव ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा परब्रह्म अन्न ॥ जातों बोलावण ज्ञानदेवा ॥ ४ ॥

॥ २०५२ ॥ निवृत्ति सोपान मुक्ताई चवथी ॥ अनेक विभूति ज्ञानेश्वरा ॥ १ ॥ नामा पुंडलिक गरुड हनुमंत ॥ परसा भागवता बोलाविलें ॥ २ ॥ विठ्ठल रक्माई सत्यभामा राही ॥ इतुके तयेठायीं जमा झाल्या ॥ ३ ॥ विसोबा खेचर चांगा वटेश्वर ॥ सांवता कुंभार एकेठायीं ॥ ४ ॥ गंगा गिरजा दोघी नीळकंठ ईश्वर ॥ मध्यें ज्ञानेश्वर घेतियेला ॥ ५ ॥

॥ २०५३ ॥ निवृत्ति मुक्ताईचें करिती समाधान ॥ घेतला सोपान मध्यभागीं ॥ १ ॥ ऐक्य आहिक्याची बैसली एकवटें ॥ विस्तारिलीं ताटें रुक्माईनें ॥ २ ॥ एक एकालागीं देताती प्रसाद ॥ आतां ज्ञानराज पाहूं डोळां ॥ ३ ॥ नामा ह्मणे स्वस्थ जेवितां पंगती ॥ घृतपात्र हातीं विस्तारी तूं ॥ ४ ॥

॥ २०५४ ॥ ज्ञानदेवालागीं चंदनाची उटी ॥ पंचारती होती आनंदाच्या ॥ १ ॥ गंध आणि अक्षता पुष्पपरिमळा ॥ घेती वोसंगळा नामदेव ॥ २ ॥ ज्ञानदेव स्वस्थ देवा वोसंगळा ॥ माळा घाली गळां नामदेव ॥ ३ ॥

॥ २०५५ ॥ जेउनीया स्वस्थ उठिले परिपूर्ण ॥ केलें आचमन वैष्णवांनीं ॥ १ ॥ वैकुंठीचा प्रसाद पावले निवाडे ॥ गोंदा माहादा विडे वाटिताती ॥ २ ॥ दोन प्रहरपावेतों आटपलें भोजन ॥ तृतिय प्रहरीं कीर्तन आरंभिलें ॥ ३ ॥ कीर्तनाच्या नादें मोहिला गोविंद ॥ करावा उद्वेग समाधीचा ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा करितां उशीर ॥ विकळ ज्ञानेश्वर जात असे ॥ ५ ॥

॥ २०५६ ॥ मुगुट मनोहर कुंडलें मकाराकार ॥ कासे पितांबर कासीयेला ॥ १ ॥ खोविले गोशे स्वार गरुडावर ॥ उठविले भार वैष्णवांचे ॥ २ ॥ केलें आचमन तीर्थीं त्या तातडी ॥ आले उठाउठीं सिद्धेश्वरीं ॥ ३ ॥ परमार्थ स्वार्थ झाल्या गुह्य गोष्टी ॥ होताती भेटी ज्ञानदेवा ॥ ४ ॥ नामा ह्मणे भेटा लहान थोर सारे ॥ जातो ज्ञानेश्वर समाधीसी ॥ ५ ॥

॥ २०५७ ॥ ब्रह्मादिक तेथें करिताती पूजा ॥ घालिताती सेजा समाधीसी ॥ १ ॥ चिद्ब्रह्म आसन उन्मनीची धुनी ॥ समाधि सज्जनीं पाहियेली ॥ २ ॥ धुप्पट वस्त्राची घडी ते अमोल ॥ तुळसी आणि बेल आंथरिले ॥ ३ ॥ दुर्वा दर्भ वरी टाकिले मोकळे ॥ पुष्पें तीं सकळ समर्पिलीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे येथें छाया निरंतर ॥ सुखी ज्ञानेश्वर सुखावला ॥ ५ ॥

॥ २०५८ ॥ लावियेला दीप निरंजन ज्योती ॥ प्रकाशल्या दीप्ती तन्मयाच्या ॥ १ ॥ पुजूनी समाधि निघाले बाहेर ॥ प्रेमें ज्ञानेश्वर डुल्लतसे ॥ २ ॥ अनुमानिलें स्थळ सभोंवतीं सारें ॥ धन्य ज्ञानेश्वरें कृपा केली ॥ ३ ॥ देव आणि नामा रुक्माई राही ॥ स्फुंदती ठायीं ठायीं संतजन ॥ ४ ॥

॥ २०५९ ॥ निवृत्ति सोपान पुढें मुक्ताबाई ॥ देवा सांगा कांहीं निजगुज ॥ १ ॥ देव ज्ञानेश्वर बैसले जवळी ॥ घेतियेली आळी सोपानानें ॥ २ ॥ ज्ञानदेवें खूण सांगितली देवा ॥ पुर्ण तूं विसांवा सज्जनाचा ॥ ३ ॥ सोपानाचे हात देवाचीये हातीं ॥ तेव्हां अपमूर्ति कासावीस ॥ ४ ॥ म्लान वदनें निवृत्ति सद्गुरुसागर ॥ येउनी ज्ञानेश्वर चरणीं लागे ॥ ५ ॥ नामा ह्मणे याचे अंतर परिपूर्ण ॥ नाहीं देहीं भान निवृत्तीसी ॥ ६ ॥

॥ २०६० ॥ पांडुरंग निवृत्ति उभे दोघेजण ॥ आरंभिलें नमन ज्ञानदेवें ॥ १ ॥ नामा पुंडलिक उभे दोहींकडे ॥ ज्ञानराज पुढें उभे ठेले ॥ २ ॥ गंध आणि अक्षता पुष्प परिमळ ॥ आणियेलें जळ भागिरथीचें ॥ ३ ॥ अनंत

स्वरूपाचीं अनंत हीं नांवें ॥ नमन ज्ञानदेवें आरंभिलें ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा नमनाची रीती ॥ नमन सर्वांभूतीं मान्य झालें ॥ ५ ॥

॥ २०६१ ॥ पुढें ज्ञानेश्वर जोडोनिया कर ॥ बोलतो उत्तर स्वामिसंगें ॥ १ ॥ पाळिले पोसिले चालवीला लळा ॥ बा माझ्या कृपाळा निवृत्तिराजा ॥ २ ॥ स्वामीचिया योगें झालों स्वरूपाकार ॥ उतरलों पार मायानदी ॥ ३ ॥ निवृत्तीनें हात उतरिला वदना ॥ त्यागिलें निधाना आह्मालागीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा देखवेना मज ॥ ब्रह्मीं ज्ञानराज मिळविला ॥ ५ ॥

॥ २०६२ ॥ वोसंडोनी निवृत्ति आलिंगों लागला ॥ आणिकांच्या डोळां अश्रु येती ॥ १ ॥ अमर्यादा कधीं केली नाहीं येणें ॥ शिष्य गुरुपण सिद्धि नेलें ॥ २ ॥ गीतार्थाचा अवघा घेतला सोहळा ॥ गुह्यगौप्य माळा लेवविल्या ॥ ३ ॥ फेडिलीं डोळ्याचीं अत्यंत पारणीं ॥ आतां ऐसें कोणी सखे नाहीं ॥ ४ ॥ काढोनिया गुह्य वेद केले फोल ॥ आठवती बोल मनामाजीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे संत कासावीस सारे ॥ लाविती पदर डोळियांसी ॥ ५ ॥

॥ २०६३ ॥ देव ह्मणे ऐसें आठवाल कोठवर ॥ होईल उशीर समाधीसी ॥ १ ॥ निरंजनीं समाधि निरंतर तुह्मांसी ॥ व्यर्थ कासाविसी होऊं नये ॥ २ ॥ निवृत्तीसी पोटीं धरिलें देवानें ॥ केलें समाधान अवघीयाचें ॥ ३ ॥ ब्रह्मणीही कळा पुढें मुक्ताबाई ॥ देवा सांगा कांहीं आह्मांलागीं ॥ ४ ॥ देव ह्मणे तुज येणें जाणें नाहीं ॥ अनुभवोनी पाहीं जीवन्मुक्ती ॥ ५ ॥ ह्मणे मुक्ताबाई सख्या ज्ञानेश्वरा ॥ प्रार्थना तुह्मी करा देवालागीं ॥ ६ ॥ ज्ञानदेवें वचन घातलें देवावर ॥ विश्वाचें माहेर पांडुरंग ॥ ७ ॥ नामा ह्मणे स्वामी प्रेमाचिया रंगें ॥ बोलावणें स्वांगें करूं आह्मीं ॥ ८ ॥

॥ २०६४ ॥ ज्ञानदेवें देवा घातलें वचन ॥ करा समाधान सोपानाचें ॥ १ ॥ समुदायेसी तुह्मां करूं बोळवण ॥ ऐसाची सोपान ब्रह्म करूं ॥ २ ॥ तीर्थावळी वेळे नेमियलें स्थान ॥ तेथें पोंचविणें मजलागीं ॥ ३ ॥ विठ्ठल रुक्माबाई उभीं समाधान ॥ दिधलें वचन ज्ञानदेवा ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा स्थिरावलें मन ॥ करितां समाधान अवघीयांचें ॥ ५ ॥

॥ २०६५ ॥ निवृत्तिदेव ह्मणे सांगतों या वाचे ॥ राहाणें चौघांचें एकरूप ॥ १ ॥ त्रिवेणीचा ओघ जैसा एकेठायीं ॥ तैसी मुक्ताबाई आह्मामध्यें ॥ २ ॥ ब्रह्माविष्णुहर जैसे एकेठायीं ॥ तैसी मुक्ताबाई आह्मांमध्यें ॥ ४ ॥

रज तम गुण सत्व गुणाठायीं ॥ तैसी मुक्ताबाई आह्मांमध्यें ॥ ५ ॥ भूचरीं खेंचरी चांचरी ते पाही ॥ अगोचरी ठायीं मुक्तगंगा ॥ ६ ॥ प्रथम ज्ञानेश्वरें काढियेली वाट ॥ धरियेलें वैकुंठ अलकापुरीं ॥ ७ ॥ इंद्रनीळ पर्वत नेमिला सोपाना ॥ निवृत्तीसी जाणा त्रिंबकेश्वर ॥ ८ ॥ चौथी मुक्ताबाई नेमियेली तापी ॥ नामा ह्मणे ख्याती केली यांनीं ॥ ९ ॥

॥ २०६६ ॥ निवृत्तिदेव ह्मणे करितां समाधान ॥ कांहीं केल्या मन राहात नाहीं ॥ १ ॥ बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट ॥ ओघ बारा वाट मुरडताती ॥ २ ॥ बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा ॥ तृण राणोमाळा पांगलासे ॥ ३ ॥ हरिवीण खोपी पडियेली वोस ॥ दशादिशा पाडस भ्रमताती ॥ ४ ॥ मायबापें आह्मां त्यागियेलें जेव्हां ॥ ऐसें संकट तेव्हां झालें नाहीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा पेटला हुताशन ॥ करा समाधान निवृत्तीचें ॥ ६ ॥

॥ २०६७ ॥ देव रुक्माबाई आणिक साधुजन ॥ करिती समाधान निवृत्तीचें ॥ १ ॥ ज्ञानीयानीं ऐसी करावी जंव खंती ॥ अज्ञानाचा किती पाड आला ॥ २ ॥ धन्य तुमचा महिमा बोलती पुराणीं ॥ दृश्य कांहीं मनीं आठवूं नये ॥ ३ ॥ आकाशाचे ठायीं अभ्रें येती जाती ॥ कोण त्यांची खंती करूं पाहे ॥ ४ ॥ अवतारादिक गेले आले अपार ॥ जैसा का विस्तार मृगजळाचा ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवें धरियेलें हातीं ॥ उठविली विभूति निवृत्तिराज ॥ ६ ॥

॥ २०६८ ॥ गरुड हनुमंत मुक्ताई सोपान ॥ देव साधुजन आनंदले ॥ १ ॥ मागें पुढें संत पताकांचे भार ॥ मध्यें ज्ञानेश्वर मिरवतो ॥ २ ॥ टाळ आणि विणे मृदंग गायन ॥ करिती कीर्तन सुस्वरेसी ॥ ३ ॥ जयजयकार ध्वनि करिती सुरगण ॥ वर्षती सुमन स्वर्गींहुनी ॥ ४ ॥ हरिपाठ गजर करिती अपार ॥ नामा ह्मणे भार उठविले ॥ ५ ॥

॥ २०६९ ॥ सर्व स्वस्ति क्षेम वैष्णव मंडळी ॥ बैसलेती पाळी समाधीच्या ॥ १ ॥ पताकांची छाया दुणावली फार ॥ सिद्ध ज्ञानेश्वर तेव्हां झाले ॥ २ ॥ अजानवृक्षदंड आरोग्य अपार ॥ समाधीसमोर स्थापियेला ॥ ३ ॥ कोरड्या काष्टीं फुटियेला पाला ॥ तेव्हां अवघीयाला नमस्कारीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा घार गेली उडोन ॥ बाळें दानादान पडियेलीं ॥ ५ ॥

॥ २०७० ॥ मुंग्याचिये विवरीं लागलीसे आग ॥ पुढें आणि मागें झालें नाहीं ॥ १ ॥ राही रुक्माई आणि सत्यभामा ॥ ओंवाळिती प्रेमा ज्ञानेश्वरा

॥ २ ॥ उभारिल्या गुडीया आणि तोरणें ॥ छाया सुदर्शनें धरियेलें ॥ ३ ॥ नारा विठा गोंदा भेटला माहादा ॥ उभे जागोजागां राहिलेती ॥ ४ ॥ विसोबा खेंचर चांगावटेश्वर ॥ केला नमस्कार अवघीयांनीं ॥ ५ ॥ गोरा कुंभार सांवता माळी ॥ नामा तळमळी वत्सा ऐसें ॥ ६ ॥

॥ २०७१ ॥ परसा भागवतें केला नमस्कार ॥ सारे लहान थोर जमा झाले ॥ १ ॥ सकळांचिया पायीं नमियेलें नमना ॥ केली प्रदक्षिणा समाधीसी ॥ २ ॥ प्रथम पायरी बाहेरील जेथें ॥ उभा पंढरिनाथ भेटावया ॥ ३ ॥ देव ह्मणे बापा अमृत नेदी पाट ॥ फार केले कष्ट जगासाठीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे यांनीं अनुभवाच्या नौका ॥ पार केलें लोकां जडमूढां ॥ ५ ॥

॥ २०७२ ॥ देव निवृत्ति यांनीं धरिले दोन्ही कर ॥ जातो ज्ञानेश्वर बैसावया ॥ १ ॥ नदिचीया माशा घातलें माजवण ॥ तैसे जनवन कालवलें ॥ २ ॥ दाही दिशा धुंद उदयास्तावीण ॥ तैसेंची गगन कालवलें ॥ ३ ॥ जाउनी ज्ञानेश्वर बैसले आसनावरी ॥ पुढें ज्ञानेश्वरी ठेवियेली ॥ ४ ॥ ज्ञानदेव ह्मणे सुखी केलें देवा ॥ पादपद्मीं ठेवा निरंतर ॥ ५ ॥ तीन वेळां तेव्हां जोडिलें करकमळ ॥ झांकियेले डोळे ज्ञानदेवें ॥ ६ ॥ भीमसुद्रा डोळा निरंजन मैदान ॥ झाले ब्रह्म पूर्ण ज्ञानदेव ॥ ७ ॥ नामा ह्मणे आतां लोपला दिनकर ॥ बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ ॥ ८ ॥

॥ २०७३ ॥ निवृत्तीनें बाहेर आणिलें गोपाळा ॥ घातियेली शिळा समाधीसी ॥ १ ॥ सोपान मुक्ताई सांडिती शरीरा ॥ ह्मणती धराधरा निवृत्तीसी ॥ २ ॥ आणिकांची तेथें उद्विग्न तीं मनें ॥ घालिताती सुमनें समाधीसी ॥ ३ ॥ नामदेवें भावें केली असे पूजा ॥ बापा ज्ञानराजा पुण्यपुरुषा ॥ ४ ॥

॥ २०७४ ॥ अवघीं जयजयकारें पिटियेली टाळी ॥ उठली मंडळी वैष्णवांची ॥ १ ॥ सह मंडळी सारे उठले ऋषीश्वर ॥ केला नमस्कार समाधीसी ॥ २ ॥ पंचद्वारें संत रिघाले बाहेर ॥ सखा ज्ञानेश्वर अलकापुरीं ॥ ३ ॥ इंद्रायणीं केलें अवघ्यांहीं आचमन ॥ करिती समाधान निवृत्तीचें ॥ ४ ॥ सोपानासी पोटीं धरिलें देवानें ॥ संवत्सरगांवीं जाणें नेम केला ॥ ५ ॥ मुक्ताबाईलागीं सांगितली खूण ॥ जाय तों सोपान स्थीर असा ॥ ६ ॥ त्रिवर्ग तीं ऐसीं राहिलीं एकमनें ॥ जाणोनिया खूण नामा ह्मणे ॥ ७ ॥

॥ २०७५ ॥ देवसमागमें परतले भार ॥ केला हरिगजर समाधीसी ॥ १ ॥ नव दिवस संत समाधिजवळीं ॥ देव चंद्रमौळी कीर्तनासी ॥ २ ॥ शुद्धमार्गेश्वर दशमीभोजनें ॥ विधि नारायणें संपादिली ॥ ३ ॥ एकादशी कीर्तन द्वादशी पारणीं ॥ मग ऋषि मुनि संतोषले ॥ ४ ॥ त्रयोदशी देव रिघाले बाहेरी ॥ धन्य अलकापुरी ज्ञानराज ॥ ५ ॥ नामा ह्मणे धन्य पलाटण पाउलीं ॥ पंचक्रोशीं ठेलीं सकळ तीर्थं ॥ ६ ॥

॥ २०७६ ॥ धन्य अलकापुरीं शिवपीठ शिवाचें ॥ अगस्ति ऋषीचें पूर्वस्थळ ॥ १ ॥ त्रिवर्गीं ह्मणितलें जातां जातां हरी ॥ आह्मा कौंडण्यपुरीं आज्ञा द्यावी ॥ २ ॥ इंद्रनीळ पर्वत नेमिला सोपानदेवा ॥ तोंवरि करूं सेवा अंबिकेची ॥ ३ ॥ देव ह्मणे भलें आरंभिलें तुह्मी ॥ आज्ञा घेतों आह्मी पंढरीसी ॥ ४ ॥ इंद्रनीळ पर्वतीं समाधि सोपान ॥ सर्वत्र आमंत्रण देवें दिलें ॥ ५ ॥ देवें भक्तांलागीं झालें समाधान ॥ मग सुरगण आंवतिले ॥ ६ ॥ नामा पुंडलिक निघाले बाहेरी ॥ गरुडावरी देव स्वार झाले ॥ ७ ॥

॥ २०७७ ॥ समाधी परिपूर्ण बैसले ज्ञानेश्वर ॥ उठविले भार वैष्णवांचे ॥ १ ॥ अलकापुरी सव्य घेतली ते संतीं ॥ दिली भागीरथी ज्ञानालागीं ॥ २ ॥ भैरवापासुनी उगम निरंतर ॥ रानोमाळ झरे तीर्थ गंगा ॥ ३ ॥ सैंघ इंद्रायणी वाहाती मिळोनी ॥ अखंड क्षणीं वोघ जाती ॥ ४ ॥ चालिलें विमान गंधर्व सुरगण ॥ यात्रा परिपूर्ण झाली ह्मणती ॥ ५ ॥ तीर्थ महोत्साह झाला ह्मणती सारासार ॥ देव ऋषीश्वर परतले ॥ ६ ॥ वैष्णवांचे भार निघाले बाहेर ॥ केला जयजयकार सर्वत्रांनीं ॥ ७ ॥ पंढरीचा पोहा निघाला बाहेर ॥ गरुडावरी स्वार देव झाले ॥ ८ ॥ नामा ह्मणे ऐसा सुखी ज्ञानेश्वर ॥ झाला असे स्थीर ब्रह्मबोधें ॥ ९ ॥

---

## सोपानदेवाचे समाधीचे अभंग.

---

### प्रकरण पहिलें.

॥ २०७८ ॥ उगवला दीन प्रभात ॥ स्नान संध्या सारोनी समस्त ॥ उद्धव कर जोडोनी बोलत ॥ पूर्ण आर्त सर्वांचें ॥ १ ॥ अनुपम इच्छा

महिमा ॥ न बोलवे जाहली सिमा ॥ आतां चला वेगीं पुरुषोत्तमा ॥ आपुले आश्रमा पंढरीसी ॥ २ ॥ गरुड सामोरा तिष्ठत ॥ भक्त भागवत समस्त ॥ मुनी पुंडलिक विनवीत ॥ केलें दंडवत साष्टांगें ॥ ३ ॥ ह्मणे ज्ञानदेव यजुर्वेदी ॥ वागश्रेय वाक्बुद्धी ॥ परा पश्यंति वैखरी समाधी ॥ या मंत्रोदकें दिधलीं ॥ ४ ॥ ऐसाचि सोपान मार्ग ॥ तूंचि करितां पांडुरंग ॥ ग्राम लेखनाचा प्रसंग ॥ निरोपिला सांग कुळयाती ॥ ५ ॥ सकळवंश परंपरा ॥ न सोडावे तुह्मी आचारा ॥ आह्मी जातों संवत्सरा ॥ पंढरपुरा सांगत ॥ ६ ॥ सकळां आलिंगन दिधलें ॥ मग गरुडावरी आरूढले ॥ ज्ञानदेवानीं हरिचीं पाउलें ॥ दृढ धरिलीं निरंतर ॥ ७ ॥ नामा नाचे हरिद्वारीं ॥ आनंद झाला अलकापुरीं ॥ विठोबाची लीला पंढरी ॥ राम कृष्ण हरि गर्जती ॥ ८ ॥

॥ २०७९ ॥ मग उड्डाण साधिलें गरुडें ॥ गगन क्रमित गेला चंड ॥ वरी आरूढले प्रचंड ॥ भक्त पुंडलिकासहित ॥ १ ॥ पक्षाचेनि फडत्कार ॥ ग्राम टाकिला संवत्सर ॥ पाठारावरी कऱ्हे तीर ॥ जयजयकारें गर्जिन्नलें ॥ २ ॥ या काळीं समारंभ केला ॥ महा उत्सव हरिसी झाला ॥ आनंद-गजर प्रवर्तला ॥ दिव्यविमानें मेळा उतरला ॥ ३ ॥ दृष्टी देखावया कौतुक ॥ शिवगण आले सकळिक ॥ कर्ता ब्रह्मांडनायक ॥ महिमा अधिक संतांचा ॥ ४ ॥ मुनि पुंडलीक उतरला ॥ संगतीं वैष्णवांचा मेळा ॥ समाधिसुखाचा सोहळा ॥ सकळ कळा वर्ततसे ॥ ५ ॥ हातें खणोनी भूमिका ॥ अमृत शिंपुनी सुगंधिका ॥ ध्वज उभारोनी पताका ॥ गरुड टका कुंचे डोलती ॥ ६ ॥ नामा ह्मणे सुखसंगती ॥ वैष्णव हरिनाम गर्जती ॥ लक्षुनी नारायण प्रीती ॥ उतरोनी क्षितीं समाधी ॥ ७ ॥

॥ २०८० ॥ भक्तांसमागमें हरी ॥ सत्वर आले संवत्सरीं ॥ ब्रह्मानंद परोपरी ॥ चरण धरी सोपानदेव ॥ १ ॥ भागीरथी सर्वें सरिता ॥ धांवोनि आली गंगा माता ॥ यमुना सरस्वती उभयतां ॥ एकात्मका कऱ्हेमाजीं ॥ २ ॥ इंद्र चंद्र तेहतीसकोटी ॥ नवनाथ सिद्ध सौंगडी ॥ भक्त सनकादिक प्रौढी ॥ वेद परवडी गर्जती ॥ ३ ॥ गगनामाजीं देवांगना ॥ वर्षाव करिती दिव्यसुमनां ॥ ह्मणे निवृत्तिनाथ सोपाना ॥ चरणावरी ठेवी तूं ॥ ४ ॥ पुष्पकारूढ झाले देव ॥ आणिक मागुती आले सर्व ॥ ह्मणे पांडुरंग दैव सदैव ॥ सोपानदेव बाळ मूर्ती ॥ ५ ॥ इंद्रनीळ पर्वत आहे ॥

तेथोनी ठाव जावया पाहे ॥ सप्तपाताळीं शेष बाहे ॥ दीर्घ देह फणी असे ॥ ६ ॥ जावोनी त्यासी श्रुत करावें ॥ गरुडासी बोलिले देवरावें ॥ मार्गी चालिला लवलाहें ॥ क्रमित जावें सप्तपाताळीं ॥ ७ ॥ नामा ह्मणे अमृतकरीं ॥ मुख कुरवाळोनी श्रीहरी ॥ सोपान समाधीभीतरीं ॥ आपण पुढारी बैसले ॥ ८ ॥

( देवाची स्तुति. )

॥ २०८१ ॥ नमो अगणित गुणा ॥ नमो आगमगुणनिधाना ॥ नमो कलिविध्वंसगहना ॥ काळहनना तुज नमो ॥ १ ॥ प्रेमळ वैष्णव नैष्ठिक पूर्ण ॥ गाती नामसंकीर्तन ॥ हां हां हूं हूं गंधर्व देवगण ॥ करिती गायन सुस्वर ॥ २ ॥ हर्षें मंगळ वाद्यें वाजविती ॥ वैष्णव सप्रेमें नाचती ॥ नामा ह्मणे पुढतापुढती ॥ समाधिस्थिति अखंड ॥ ३ ॥

॥ २०८२ ॥ ऐसा सोपान संबोखिला ॥ महा उत्साव आनंद झाला ॥ अभय वर दिधला ॥ गर्जिन्नला देवराणा ॥ १ ॥ विठोजी ह्मणे तूंतें न विसंबे ॥ संवत्सरीं असेन स्वयंभे ॥ या वटेश्वरी सगुण सुलभे ॥ समारंभ प्रतिवर्षीं ॥ २ ॥ महासिद्धसाधकाचें स्थळ ॥ तो हा वटेश्वर सानुकूळ ॥ यासी नीळकंठ ह्मणती सुचळ अचळ ॥ शीतळ प्रथम नाम ॥ ३ ॥ पूर्णब्रह्म याचें स्थान ॥ येथें तप साधिलें गहन ॥ प्रत्यक्ष शंकर सुप्रसन्न ॥ आशीर्वचन बोलिले ॥ ४ ॥ इंद्रनीळ पर्वतरूप ॥ प्रत्यक्ष नारायण स्वरूप ॥ असे कौंडिण्यपुर समीप ॥ माता साक्षेपें ॥ ५ ॥ ऋषिगण गंधर्व ॥ क्षेत्रपाळ मल्हारी देव ॥ इंद्र चंद्र ब्रह्मदेव ॥ शुद्ध ठाव नेमिला ॥ ६ ॥ नामा ह्मणे जनार्दन ॥ बहुत संतोषला सोपान ॥ अंगें ब्राह्मण सनातन ॥ शुद्ध अधिष्ठान दिधलें ॥ ७ ॥

॥ २०८३ ॥ सोपान ह्मणे देवोत्तमा ॥ पूर्वीं येथें होता ब्रह्मा ॥ आणि तुह्मी सर्वोत्तमा ॥ कोणे स्थळीं होतां देवा ॥ १ ॥ ह्मणे कथा परिस ॥ कोट्यानकोटी युगास ॥ आह्मीं होतों पंढरीस ॥ अनंत कल्पें गेलीं ॥ २ ॥ अनंत भक्तांचिया मेळीं ॥ अनंत वैष्णव भूमंडळीं ॥ माजीं गवसले सकळीं ॥ केली आगळी पुंडलिकें ॥ ३ ॥ येणें प्रसन्न केलें शंकरा ॥ शंकरें मज दाखविलें निर्धारा ॥ आपण राहोनि पाठमोरा ॥ जग उद्धारा कीर्तनीं ॥ ४ ॥ भक्तीचेनि आराधन ॥ साधियलें बहुत पुण्य ॥ माझें झालेंसें येणें ॥

एक कारण पुंडलिकाचें ॥ ५ ॥ पूर्वापर पंढरीसी ॥ होती विष्णुमात ऐशी ॥ निर्धार करोनी मानसीं ॥ अहर्निशीं अनुष्ठान ॥ ६ ॥ येथोनि पूर्वभाग पंढरी ॥ पश्चिमभागीं ब्रह्मा अवधारी ॥ झाला अवतार कन्हे पाठारीं ॥ महादेव शिखरीं मान देती ॥ ७ ॥ तेहतीस कोटी देवस्थळीं ॥ पूर्व पश्चिम वैश्य मंडळी ॥ उग्र तप साधिलें चंद्रमौळीं ॥ या इंद्रनीळ पर्वतावरी ॥ ८ ॥ द्रोणाचळ इंद्राचळ ॥ हनुमंतें आणिला विशाळ ॥ साऱ्या शाखा अधोमूळ ॥ तो हा इंद्रनीळ पर्वत ॥ ९ ॥ येथें वल्ली सुवर्णाकार ॥ गुप्त असती सा निर्धार ॥ दिसे अस्तमानीं अंधार ॥ दीप आकार जगाप्रती ॥ १० ॥ येथोनिया दक्षिणद्वार ॥ गोकर्ण महाबळेश्वर पाठार ॥ पाताळद्वारीं पूजा शंकर ॥ बेलपत्र अद्यापि निघती ॥ ११ ॥ नामा ह्मणे देवाधिदेव ॥ सांगितला स्वानुभव ॥ अधिष्ठान गुढाव ॥ सोपानदेव निवांत ॥ १२ ॥

॥ २०८४ ॥ पूर्वकथा संवत्सरनगरीं ॥ सांगितली असे अवधारी ॥ मग शेषाद्रि पर्वतावरी ॥ गरुड शिखरीं उभा असे ॥ १ ॥ धन्य धन्य हा सोपान ॥ धन्य समाधि संपूर्ण ॥ प्रत्यक्ष येऊनि नारायण ॥ अभयदान दिधलेंसे ॥ २ ॥ अनंत वैष्णव प्रेमळ ॥ दिंडी पताका टाळ घोळ ॥ रामकृष्ण नाम सरळ ॥ भक्त सर्वकाळ नाचती ॥ ३ ॥ दिव्य उतरलीं विमानें ॥ देव वर्षती सुमनें ॥ इंद्र चंद्र देवगण ॥ लोटांगण घालती ॥ ४ ॥ समाधिसुखाचा आनंद ॥ अंगें करीतसे गोविंद ॥ कथा सांगितली अभेद ॥ श्रोते सन्निध सकळीं ॥ ५ ॥ ह्मणती धन्य धन्य सोपान ॥ देव पुरुष चतुरानन ॥ संत महंत वैष्णव प्रमाण ॥ रामकृष्ण गाताती ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवराव ॥ मनोरथ पूर्ण करोनी सर्व ॥ अपार गुण कीर्तिलाघव ॥ न कळे माव कोणाशीं ॥ ७ ॥

॥ २०८५ ॥ सोपान समाधी बैसला ॥ सकळीं पुष्प वर्षाव केला ॥ जयजयकारें भूगोल कोंदला ॥ आनंद दाटला महीवरी ॥ १ ॥ धन्य धन्य हा सोपान ॥ वर्णितसे श्रीभगवान ॥ क्षणोक्षणीं माझी आठवण ॥ उद्विग्न मन होतसे ॥ २ ॥ नारद तुंबर अक्रूर उद्धव ॥ पुंडलिकादि करूनी सर्व ॥ मुनिदेवगण गंधर्व ॥ स्तुतिस्तव बोलती ॥ ३ ॥ ह्मणती चौघेजण भाग्याचे ॥ जें निदान ब्रह्मादिकांचें ॥ तें निजध्यान शंकराचें ॥ सकळ जीवाची जीवनकळा ॥ ४ ॥ तो प्रत्यक्ष येउनी अनंत ॥ याची परीचर्या करित ॥ भक्ता साह्य होउनी भगवंत ॥ पूर्ण आर्त करावया ॥ ५ ॥ निज-

भक्तांचें कौतुक ॥ करोनी ब्रह्मांडनायक ॥ तया वर्णिती सनकादिक ॥ वरकड मशक बापुडें ॥ ६ ॥ पुंडलिक विस्मय बोलती ॥ हे चोघे भाग्याच्या मूर्ती ॥ याच्या नामें जग उद्धरती ॥ पावे विश्रांति जगासी ॥ ७ ॥ नामा ह्मणे सकळ जगाचा ॥ उदय जाहलासे दैवाचा ॥ सुकाळ केला स्वानंदाचा ॥ ब्रह्मविद्येचा मृत्युलोकीं ॥ ८ ॥

॥ २०८६ ॥ क्षणक्षणा पंढरीनाथ ॥ नामयाचा धरुनी हात ॥ ज्ञानदेवासी आठवीत ॥ कंठ सद्गदित होऊनी ॥ १ ॥ उद्धवासी ह्मणे पांडुरंग ॥ या सज्जनाचा न व्हावा वियोग ॥ हें हृदय होतसे दोन भाग ॥ सखे अंतरंग तुह्मी माझे ॥ २ ॥ मज याहूनि गोड न वाटे ॥ ऐसे जिवलग न भेटे ॥ समूळ जिवाचें दुःख आटे ॥ संतोष वाटे मानसीं ॥ ३ ॥ धन्य चौघेजण ॥ मुक्ताबाई ब्रह्मपूर्ण ॥ यांनीं तारिले सकळ जन ॥ दुःख दारुण नासलें ॥ ४ ॥ यांचेनि पडिपाडें ॥ उपमेसी दिसे थोकडें ॥ ज्ञानासारिखें रत्न जोडे ॥ हें तंव न घडे कल्पांतीं ॥ ५ ॥ माझ्या अंतरींचें गुज ॥ उद्धवा सांगितलें तुज ॥ कीं नामदेव आवडता सहज ॥ आणिक मज नावडतें ॥ ६ ॥ घडीघडी रुक्मिणीपाशीं ॥ बैसोनि सांगे हृषिकेशी ॥ माता रुक्मिणी निजमानसीं ॥ जिवलगासी आठवीतसे ॥ ७ ॥ निवृत्ति तुह्मां नाहीं भिन्नता ॥ साचा आत्मा तुह्मी अनंता ॥ शिव विष्णु ऐक्यता ॥ असे स्वभावतां मुळचीं ॥ ८ ॥ ज्ञानदेव तुमचाचि अंश ॥ केवळ ब्रह्म स्वयंप्रकाश ॥ स्वात्मसुख निजरहिवास ॥ स्वानंद असे उद्बोध ॥ ९ ॥ गोडीसवें जैसा गूळ ॥ सुवर्ण रत्नजडित तेजाळ ॥ जैसें पुष्पासवें परिमळ ॥ कैचें वेगळें स्वामिया ॥ १० ॥ सोपानदेव तरी पोटीचा ॥ तो सखा प्राण असे तुमचा ॥ येथें शब्द भिन्नपणाचा ॥ कोठवरी वाचा मिरवेल ॥ ११ ॥ सकळ संत महंत मिळोनी ॥ माथा ठेविला हरिचरणीं ॥ जगन्माता बोले रुक्मिणी ॥ तुह्मां पासोनी दूर नाहींत ॥ १२ ॥ नामदेवानीं धरिले चरण ॥ साष्टांग घालोनि लोटांगण ॥ तूं स्वामी सर्वांचें जीवन ॥ मी रंक दीन कैंचे बोलूं ॥ १३ ॥

---

## प्रकरण दुसरें.

॥ २०८७ ॥ सद्गुरु सागरा दिनबंधु ॥ अनाथनाथा सुरैकसिंधु ॥ चातकातें कृपाबिंदु ॥ प्रसाद द्यावा ॥ १ ॥ गुरु गणपति पुरातना ॥ सिद्धांत वेदांत जुनाट जुना ॥ दयाळा पातकहरणा ॥ रक्षी रक्षी स्वामिया ॥ २ ॥ तूं अंतरींचें जाणता ॥ तूं इच्छेचा दाता ॥ तूं हृदयीं प्रेरक होता ॥ कमळालया ॥ ३ ॥ दृश्यादृश्य करितां पार ॥ चौऱ्यांशीं लक्ष योनी दुर्धर ॥ चुकवुनी उतरसी पार ॥ संकटीं स्वामिया ॥ ४ ॥ निवृत्ति प्रवृत्ति दोन्ही थडी ॥ मधीं माया नदी उघडी ॥ बोधभावें घालिसी सांगडी ॥ पार उतरिसी स्वामिया ॥ ५ ॥ मी सोपान आपुला अंकित ॥ पद्महस्तें करावें मुक्त ॥ जो मनें इच्छिला अर्थ ॥ सिद्धि न्यावा स्वामिया ॥ ६ ॥

॥ २०८८ ॥ तूं सद्गुरु आनंदभरित ॥ तुझा आदि ना अंत ॥ तूं प्रकाशाप्रकाशमंत ॥ तुज नमों स्वामिया ॥ १ ॥ बुद्धिपालका वैभवा ॥ तूं देवाधिदेवा ॥ तूं जाणसी अंतरींचा गोवा ॥ उगवी उगवी स्वामिया ॥ २ ॥ तूं सत्स्वरूपाची चौघडी ॥ आणि परेची पैल थडी ॥ बोधभावें करी उघडी ॥ पार उतरी स्वामिया ॥ ३ ॥ तूं विश्रांतीचें स्थळ ॥ तूं निर्गुणानिर्गुण निर्मळ ॥ निवृत्तिमतीचा विषाळ ॥ पुरवी आळ सोपानाची ॥ ४ ॥

॥ २०८९ ॥ स्पष्ट जोडोनीया कर ॥ मी दासानुदास अपार ॥ प्रार्थना करुनी नमस्कार ॥ उतरी पार भवाब्धि ॥ १ ॥ निवृत्ति मुक्ताई परियेसी ॥ योगीराज झाला उदयासी ॥ वद्य कार्तिक मासीं ॥ अलकापुरीं जावें लागे ॥ २ ॥ ज्ञानदेवें मागितला मान ॥ देव वैष्णवांचें आगमन ॥ येउनी गंधर्वांचें विमान ॥ विधि नारायण संपादिल ॥ ३ ॥ इंद्रनीळ पर्वत पुरातन ॥ पूर्वीं येथें ब्रह्मयाचें स्थान ॥ कौंडण्यपुरीं अंबिकाभुवन ॥ महाब्रह्म योग माया ॥ ४ ॥ तिची भावें केली पूजा ॥ परमार्थ साधिला स्वहित काजा ॥ मुक्ताई आणि निवृत्तिराजा ॥ सोपान सहजा सिद्ध झाले ॥ ५ ॥

॥ २०९० ॥ धन्य कऱ्हेचे पाठारीं ॥ इंद्रनीळ पर्वत महागिरी ॥ जैसे अलकापुरी ॥ तैसें पुण्य क्षेत्र हें ॥ १ ॥ ऐसें अनुमानिलें स्थळ ॥ पूर्वापार निर्मळ ॥ सिद्धि पाववी आळ ॥ माय बापा ॥ २ ॥ मग सुमूहूर्त अमृतयोग ॥ सिद्ध संकेत ज्ञानमार्ग ॥ पहिला चंद्र स्वांग ॥ गमन केलें योगिराजें ॥ ३ ॥ निवृत्ति सोपान मुक्ताबाई ॥ अलकापुरीहुनी आले पाहीं ॥ मृदंग वाजती

घाई ॥ कीर्तन नवाई काय सांगूं ॥ ४ ॥ समाधि सावधान ॥ सुखी ज्ञानेश्वर निधान ॥ झालापां स्थीर सोपान ॥ भेटीलागीं ॥ ५ ॥ केलें समाधीस नमन ॥ विज्ञापिले सर्वजन ॥ करा आमची बोळवण ॥ शेवटीची ॥ ६ ॥

॥ २०९१ ॥ देव ह्मणे नाम्या मार्गशीर्ष गाढा ॥ जावें सासुवडा उत्सवासी ॥ १ ॥ सोपानासी आह्मीं दिधलें वचन ॥ चला अवघेजण समुदाय ॥ २ ॥ अलकापुरीची यात्रा केली सांग ॥ मग पांडुरंग सिद्ध झाले ॥ ३ ॥ दुरोनी पताका दिसती मनोहर ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥ निवृत्ति मुक्ताई घेतला सोपान ॥ जातो नारायण कऱ्हेतीरीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे देव गंधर्व सुरगण ॥ चालिले सोपान समाधीसी ॥ ६ ॥

॥ २०९२ ॥ भक्तांचें तें साह्य करणें पांडुरंगा ॥ ह्मणोनि तीर्थ गंगा उगावलें ॥ १ ॥ जान्हवी मंदाकिनी भोगावती मिळुनि ॥ दुजी हे त्रिवेणी या भूमीसी ॥ २ ॥ निर्झर जीवन वाहती निरंतर ॥ तेथें वटेश्वर उतरले ॥ ३ ॥ दुरोनी हें स्थळ दिसे मनोहर ॥ उतरले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा स्थळ आदी हे अनादी ॥ येथेची समाधि सोपानासी ॥ ५ ॥

॥ २०९३ ॥ उतरिलीं विमानें स्वर्गीचें राउळ ॥ पताका रानोमाळ मिरविताती ॥ १ ॥ सोपान मुक्ताई सद्गुरु निवृत्ति ॥ रुक्माईचा पति मध्यभागीं ॥ २ ॥ टाळ मृदंग वाजताती वीणे ॥ नारद गायन करीतसे ॥ ३ ॥ नामा पुंडलीक चालती आवडीनें ॥ संत साधुजन मिरवती ॥ ४ ॥ लहान थोर संत चालती मिळोन ॥ करिती बोळवण नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ २०९४ ॥ भोगावती तीरीं दिधला मंडप ॥ साधु आपरूप पांडुरंग ॥ १ ॥ रखुमाई राही बैसल्या अनेक ॥ सखा पांडुरंग उतरला ॥ २ ॥ वद्य मार्गशीर्ष दशमीं जागर ॥ हरिदिनीं गजर कीर्तनाचा ॥ ३ ॥ क्षेत्रप्रदक्षिणा केली असे संतीं ॥ आले भोगावती अवघेजण ॥ ४ ॥ निवृत्ति मुक्ताबाई दुश्चित्त अंतःकरण ॥ साहित्य नारायण करीतसे ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा आधीं नेमा स्थळ ॥ मग हें सकळ साहित्य करूं ॥ ६ ॥

॥ २०९५ ॥ वटेश्वरें वृत्तांत सांगितला सकळ ॥ पूर्वीं आमचें स्थळ याची क्षेत्रीं ॥ १ ॥ येथुनीया वाट जातसे पाताळां ॥ उघडिली शिळा समा-

धीची ॥ २ ॥ आसन मनोहर मृगछालावर ॥ पहाती ऋषेश्वर आनंदानें ॥ ३ ॥ सोपान वटेश्वर करिती एकांत ॥ कळले मनोगत नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ २०९६ ॥ सोपान वटेश्वर पातले समोर ॥ केला नमस्कार निवृत्तीसी ॥ १ ॥ ह्मणे मुक्ताबाई जाती दोघेजण ॥ ऐसें नारायणें बुझाविलें ॥२॥ गरुड हनुमंता परिसा भागवता ॥ मग साधुसंतां श्रुत केलें ॥ ३ ॥ गंधर्वा आणि देवा कळला वृत्तांत ॥ जाती उभय समाधीसी ॥ ४ ॥ नामा ह्मणे यांनीं आरंभिलें हित ॥ करितो स्वहित पांडुरंग ॥ ५ ॥

॥ २०९७ ॥ सोपान वटेश्वर उभे ठेले पुढती ॥ पंचारत्या होती आनंदाच्या ॥ १ ॥ गंध आणि अक्षता वाहियेल्या सहज ॥ देव निवृत्तिराज पूजियेले ॥ २ ॥ धूप आणि दीप आणिले संपूर्ण ॥ पूजिलें गगन सोपानानें ॥ ३ ॥ दाही दिशा दृष्टि अवलोकिली सारी ॥ गगन अंकुरी डवरिलें ॥ ४ ॥ चक्र सर्पाकार विजा लखलखती ॥ ज्योति प्रकाशती रानोमाळ ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा उदय झाला सकळ ॥ सोपानदेवें मूळ दाखविलें ॥ ६ ॥

॥ २०९८ ॥ शेंदूर पारवे नीळवर्ण ठसे ॥ जनीं वनीं दिसे परब्रह्म ॥ १ ॥ मुक्ताफळ भरित सबाह्य कोंदलें ॥ रूप हें चांगलें विठोबाचें ॥ २ ॥ श्वेत पीतवर्ण आंत तारांगण ॥ अंकुरलें गगन नानारूपें ॥ ३ ॥ ज्योतिर्मय ब्रह्म एकांतींचें पाहाणें ॥ समाधि नारायणें उदय केली ॥ ४ ॥ संत स्वरूप अवघे अवलोकिलें मनें ॥ नमन नामा ह्मणे आरंभिलें ॥ ५ ॥

॥ २०९९ ॥ निवृत्ति ह्मणे उर्मी तुटल्या शृंखळा ॥ मार्ग हा मोकळा आह्मां झाला ॥ १ ॥ पांडुरंग पाश आवरिला आपला ॥ ह्मणोनि फुटला मार्ग आह्मां ॥ २ ॥ आवरिली माया पुरातन आपुली ॥ ह्मणोनि आह्मां झाली बुद्धि ऐसी ॥ ३ ॥ नामदेवें मस्तक ठेवियलें पायीं ॥ आतां खेद कांहीं करूं नका ॥ ४ ॥

॥ २१०० ॥ जाती ब्रह्मादिक जाती चराचर ॥ मायीक व्यवहार ऐशापरी ॥ १ ॥ प्रकृति पुरुषाचा मांडियेला खेळ ॥ जाईल सकळ नाशिवंत ॥ २ ॥ चंद्र सूर्य जाईल जाईल मृगजळ ॥ जाती तिन्ही ताळ शून्यापोटीं ॥ ३ ॥ होईल निरामय अवघें चराचर ॥ ब्रह्मींचा विस्तार होईल ब्रह्मीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे स्वामी जाताती सकळ ॥ ब्रह्मीं माया मूळ झाली कैसी ॥ ५ ॥

॥ २१०१ ॥ धन्य आमचें भाग्य परब्रह्म संगें ॥ साहित्य स्वआंगें करीतसे ॥ १ ॥ नाशिवंत देह जाईल कीं अंतीं ॥ नीचाची संगति कोण काज ॥ २ ॥ पाहिला गे माय ब्रह्मींचा आवर्तु ॥ जीव आणि जंतु विस्तारिले ॥ ३ ॥ निवृत्ति मुक्ताईनें केलासे विवेक ॥ आपपर लोक दुजें नाहीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे चित्त केलें स्थीर ॥ देव ऋषेश्वर उठावले ॥ ५ ॥

॥ २१०२ ॥ पांडुरंग ह्मणे सख्या निवृत्तिराजा ॥ झाडा आतां शेजा समाधीच्या ॥ १ ॥ नारा विठा महादा पाठविला गोंदा ॥ झाडावया जागा समाधींच्या ॥ २ ॥ परिसा भागवत चांगदेव हातें ॥ आणिलें साहित्य समाधीचें ॥ ३ ॥ तुळसी बुका बेल दर्भ आणि फुलें ॥ उदक चांगलें भोगावतीचें ॥ ४ ॥ भस्म पितांबर भगवीं तीं वस्त्रें ॥ योगी दिगंबर समागमें ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा उठवा ऋषेश्वर ॥ होईल उशीर समाधीसी ॥ ६ ॥

॥ २१०३ ॥ उठिले वैष्णव घेउनि नारायणा ॥ चालिले ते स्नाना अवघे जन ॥ १ ॥ गंध आणि अक्षता विसोबाचे हातीं ॥ पूजा ते करिती सोपानाची ॥ २ ॥ सोपान वटेश्वर सोंवळे झाले सांग ॥ निवृत्ति पांडुरंग पूजियेले ॥ ३ ॥ गंधर्व आणि सुरगण पूजिती सोपान ॥ यथाविधि प्रमाण संपादिलें ॥ ४ ॥ नामा ह्मणे पूजा केली हृषीकेशी ॥ चला पारण्यासी अवघेजण ॥ ५ ॥

॥ २१०४ ॥ राही रखुमाई ऋद्धि सिद्धि जेथें ॥ पडले पर्वत पक्वान्नांचे ॥ १ ॥ बैसल्या त्या पंक्ति भोगावती तीरीं ॥ पात्रें टाकी हरि वैष्णवांला ॥ २ ॥ विसोबा खेचर पुंडलीक संगें ॥ वाढी पांडुरंग वैष्णवांला ॥ ३ ॥ संतसभेमाजीं निवृत्ति सोपान ॥ यथाविधि प्रमाण संपादिलें ॥ ४ ॥ रखुमाईला देवें सांगितली खूण ॥ सोडितो पारणें सोपानदेव ॥ ५ ॥ नामा ह्मणे स्वामी जातो बोलावण ॥ आणितों सोपान भोजनासी ॥ ६ ॥

॥ २१०५ ॥ चांगा वटेश्वर मुक्ता निवृत्तीश्वर ॥ सावता कुंभार ऐहिक ते ॥ १ ॥ एकेठायीं मिळाले परब्रह्म गवसून ॥ वटेश्वर सोपान मध्यभागीं ॥ २ ॥ सोपान वटेश्वर घेतले वोसंगळा ॥ माळा घाली गळां पुंडलीक ॥ ३ ॥ सोपान वटेश्वर पूजिती आवडीनें ॥ संगती निधान पांडुरंग ॥ ४ ॥ आनंदानें सारे बैसले एकवट ॥ विस्तारिलें ताट रखुमाईनें ॥ ५ ॥ नारा विठा गोंदा बोलाविला महादा ॥ नामा ह्मणे पूजा अवघेजण ॥ ६ ॥

॥ २१०६ ॥ उठिले वैष्णव आटोपलें भोजन ॥ केलें आचमन भोगावतीं ॥ १ ॥ अवघ्यांनीं घेतला सोपान वटेश्वर ॥ गोंदा महादा साचार विडे देती ॥ २ ॥ निशिदिनीं कीर्तन केलें द्वादशीं ॥ वद्य त्रयोदशी मार्गशीर्ष ॥ ३ ॥ भोगावतीं केलें अवघ्यांनीं स्नान ॥ चालिले सोपान समाधीसी ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा स्थळ मनोहर ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ ५ ॥

॥ २१०७ ॥ कळवळी मन नाहीं देहभान ॥ वटेश्वर सोपान सोंवळे झाले ॥ १ ॥ संत साधुजन होत कासाविसी ॥ आले समाधीपाशीं तातडीनें ॥ २ ॥ समाधीभोंवते कुंकुमाचे सडे ॥ पहाती निवाडे अवघे जन ॥ ३ ॥ वरी मृगछाला दिसताती लाल ॥ दर्भ आणि फुलें समर्पिलीं ॥ ४ ॥ दुर्वा आणि वेल टाकिले मोकळे ॥ साहित्य सकळ समर्पिलें ॥ ५ ॥ निवृत्ति पांडुरंग बैसले येऊन ॥ नमन सोपान करितसे ॥ ६ ॥

( सोपानदेवानें केलेली देवाची स्तुति. )

॥ २१०८ ॥ नमो ज्योतिर्मय ब्रह्मा ॥ आनंद ईश्वर पुरातना ॥ नमो नारायणा कमळकोंदणा ॥ नमो नमो स्वामिया ॥ १ ॥ नमो सद्गुरु निवृत्ति ॥ नमो रखुमाईच्या पति ॥ नमो ज्ञानमूर्ती अगम्य पुरुषा ॥ २ ॥ नमो भक्ति मुक्ति चैतन्य माया ॥ नमो कर्ता हर्ता काया ॥ नमो आदी पुरातन पाया ॥ परब्रह्मा ॥ ३ ॥ नमो विराट पुरुषा पुरातना ॥ नमो जगज्जीवना करुणाघना ॥ चराचरपालका आनंदघना ॥ अंगिकारी नमना माझिया ॥ ४ ॥ नमो ब्रह्मांडव्यापका ॥ नमो गुणातीतामायांतका ॥ चुकवी जन्म मरण एका ॥ तारी विश्व कृपेनें ॥ ५ ॥ नमो जळस्थळ रक्षिता ॥ आदी अवसानी तारिता ॥ नमो रोमारोम अव्यक्ता ॥ नमो नमो दिनबंधू ॥ ६ ॥ नमो विराट महद्ब्रह्मा ॥ निष्कलंक परब्रह्मा ॥ योगियांच्या सुखधामा ॥ नमो नमो दयाळा ॥ ७ ॥ औट हात ध्वनी ॥ नमो नमो अंतःकरणीं ॥ नमो सत्रावी त्रिवेणी ॥ त्रिपुटी जेथें ॥ ८ ॥ नमो विटेवरी सदटा ॥ नमो वैकुंठीचिये पिठा ॥ आदी अंतीं एकटा ॥ नमो आदिपुरुषा ॥ ९ ॥ आदी अंतीं शेवटीं ॥ सहस्रदळीं गुह्य पिठीं ॥ नमो उघडी दृष्टि ॥ स्वरूपीं तुझ्या ॥ १० ॥ नमो पायीं पडली मिठी ॥ नमो बांधिली हृदयीं गांठीं ॥ तुझें स्वरूप हृदयीं संपुष्टीं ॥ धरून ठेविलें स्वामिया ॥ ११ ॥ नमो गेलें आलें ॥ नमो झालें तें झालें ॥ नमो तुझें सांभाळुनि ॥ ठेवी आज्ञा ॥ १२ ॥

॥ २१०९ ॥ उभयतांनीं नमन केलें यथासांग ॥ अर्थी पांडुरंग साह्य केला ॥ १ ॥ कळवळिले संत वैष्णवांचे भार ॥ आणिक योगेश्वर स्फुंदताती ॥ २ ॥ गरुड हनुमंत विसोबा खेचर ॥ लाविती पदर डोळियांसी ॥ ३ ॥ निवृत्ति मुक्ताबाई चांगदेवासहित ॥ परिसा भागवत शोक करी ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा खेद सिंधू लोटा ॥ उठा आतां भेटा सोपानासी ॥ ५ ॥

॥ २११० ॥ सोपानदेवें ग्रंथ केला होता सार ॥ ठेविला समोर निवृत्तीच्या ॥ १ ॥ सवें मुक्ताबाई सद्गुरु निवृत्ति ॥ लक्ष्मीचा पति घेतियेला ॥ २ ॥ जयजयकार ध्वनि होताती अपार ॥ जाती योगेश्वर समाधीसी ॥ ३ ॥ राही रखुमाई नीळकंठ जवळी ॥ समाधीच्या पाळी अवघेजण ॥ ४ ॥ समाधि पायरीवरी वटेश्वर सोपान ॥ मागितला मान पांडुरंगा ॥ ५ ॥ प्रतिवर्षीं भेटी देऊं उभयतां ॥ अलकापुरीं जातां उत्सवासी ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवा कृपा केली फार ॥ दिधला कीं वर भक्तराजा ॥ ७ ॥

॥ २१११ ॥ निवृत्ति मुक्ताईनें धरियेलें मौन ॥ वटेश्वर सोपान मागियेला ॥ १ ॥ समाधि पताकांची पडली सावली ॥ उतरले खालीं योगीराज ॥ २ ॥ पांडुरंगासंगे गेले ऋषेश्वर ॥ सोपान वटेश्वरा बैसविलें ॥ ३ ॥ शिवाचा अवतार सद्गुरु निवृत्ति ॥ मुक्ताबाई सखी तुह्मापाशीं ॥ ४ ॥ अंतरींचें जाणतां बा पंढरीनाथ ॥ आले अश्रुपात सोपानासी ॥ ५ ॥ सोपानाची बोळवण करितसे हरी ॥ दीर्घध्वनि करी नामदेव ॥ ६ ॥

॥ २११२ ॥ धूप आणि दीप उजळिल्या ज्योती ॥ तेव्हां ओसंडती अवघे जन ॥ १ ॥ सोपान वटेश्वरें केला नमस्कार ॥ उतरले पार भवसिंधू ॥ २ ॥ घेतियेलें तीर्थ तंव झाले विकळ ॥ झांकियेले डोळे ब्रह्मबोधें ॥ ३ ॥ निवृत्ति मुक्ताई राहिली बाहेरी ॥ आतां तुह्मीं हरि सांभाळावें ॥ ४ ॥ देव ऋषेश्वर निघाले बाहेर ॥ केला नमस्कार नामदेवें ॥ ५ ॥

॥ २११३ ॥ जयजकारें टाळी पिटली सकळां ॥ घातियेली शिळा समाधीसी ॥ १ ॥ निवृत्ति मुक्ताईनें घातियेली घोन ॥ करितो समाधान पांडुरंग ॥ २ ॥ सोपान वटेश्वर सुखधामीं शेजा ॥ करिताती पूजा समाधीची ॥ ३ ॥ खेद दुःख झालें अवघ्या साधुजनां ॥ केली प्रदक्षिणा

समाधीसी ॥ ४ ॥ निवृत्ति मुक्ताईनें वंदिली समाधी ॥ देहभान शुद्धि हारपली ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा उठा अवघेजण ॥ करूं आचमन भोगावती ॥ ६ ॥

॥ २११४ ॥ वैष्णवांनीं केली समाधि प्रदक्षिणा ॥ गेले आचमना भोगावतीं ॥ १ ॥ सारी रात्र कीर्तन केलें त्रयोदशीं ॥ चतुर्दशी दिवशीं भोजनें केलीं ॥ २ ॥ अमावास्ये जागरण केलें परिपूर्ण ॥ प्रतिपदे गमन वैष्णवांचें ॥ ३ ॥ निवृत्ति मुक्ताई झाली उदासी ॥ आतां हृषिकेशी बोळवावें ॥ ४ ॥ चांगा ह्मणे माझी करा बोळवण ॥ घेऊनि नारायण समागमें ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा माघ मास नेमा ॥ चांगदेवा प्रेमा समाधि देऊं ॥ ६ ॥

॥ २११५ ॥ सव्य हातें नगर घेती ऋषेश्वर ॥ केला नमस्कार समाधीसी ॥ १ ॥ परतले देव आणि सुरगण ॥ चाललीं विमानें वैष्णवांचीं ॥ २ ॥ निवृत्ति मुक्ताबाई चांगदेव संगें ॥ रुक्मिणी पांडुरंग समुदायेसी ॥ ३ ॥ नामा ह्मणे देव गंधर्व ऋषिमुनी ॥ जाती उत्तरायणी निवृत्तिराज ॥ ४ ॥

॥ २११६ ॥ निवृत्तिदेवासंगें देव ऋषीश्वर ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ १ ॥ प्रतीपदे देव निघाले बाहेर ॥ केला नमस्कार समाधीसी ॥ २ ॥ अवघियासहित वैष्णव मंडळी ॥ सवें वनमाळी चालताती ॥ ३ ॥ गोदातीरा जाया निवृत्ति उद्देशी ॥ सह समुदायेशी उठावले ॥ ४ ॥ नामा ह्मणे घेतला नारायण संगें ॥ चालिले अनेगे भक्तराज ॥ ५ ॥

॥ २११७ ॥ निवृत्तिदेवा योग्य गंगेचें तें स्नान ॥ करूं अवघेजण आवडीनें ॥ १ ॥ तीर्थयात्रा होईल देवासमागमें ॥ केवढा महिमा रामें सांगितला ॥ २ ॥ मार्गीं चालताती भक्त आणि हरी ॥ आले भुलेश्वरीं अवघेजण ॥ ३ ॥ भुलेश्वरालागीं पूजा केली सांग ॥ भक्त पांडुरंगें तीन रात्रीं ॥ ४ ॥ तेथून वैष्णव चालियेले हरी ॥ आले सिद्धेश्वरीं देवभक्त ॥ ५ ॥ पाराशर ऋषीचें स्थळ पुरातन ॥ राहिले नारायण पंचरात्र ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवा जावें कपिलेश्वरा ॥ आनंद ऋषीश्वरा झाला फार ॥ ७ ॥

॥ २११८ ॥ कौतुकानें तेथें आले सावकाश ॥ उभे हरिदास कीर्तनासी ॥ १ ॥ दहा दिवस तेथें राहियेले स्वस्थ ॥ अवघ्यांचा मनोरथ पूर्ण

झाला ॥ २ ॥ क्षेत्रींचा महिमा पुसिती देवासी ॥ जना आगळी काशी सांगियेली ॥ ३ ॥ येथोनिया वाट जाते वारणसी ॥ मुनि आणि ऋषि आनंदले ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा दिवस झाले फार ॥ लागेल उशीर समाधीसी ॥ ५ ॥

॥ २११९ ॥ चालिले घेउनी देव ऋषीश्वरा ॥ आवघिया पुढारा गरुड देव ॥ १ ॥ दिवसानुदिवस चालिले सत्वर ॥ पहावें गोदातीर ह्मणोनिया ॥ २ ॥ धन्य गोदातीर धन्य कचेश्वर ॥ जाती ऋषीश्वर स्नानालागीं ॥ ३ ॥ सारा पौष मास नेला कचेश्वरीं ॥ नित्य गंगातीरीं स्नानसंध्या ॥ ४ ॥ पाहिला कचेश्वर पाहिली ती गोदा ॥ आली प्रतिपदा माघमास ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा जावें पुण्यस्तंभा ॥ मनोहर जागा सिद्धेश्वर ॥ ६ ॥

॥ २१२० ॥ उठले वैष्णव कीर्तन गजरीं ॥ आले सिद्धेश्वरीं आश्रमासी ॥ १ ॥ पौर्णिमेपावेतों राहिले निश्चळ ॥ नेमा आतां स्थळ समाधीसी ॥ २ ॥ निवृत्ति मुक्ताबाई संगें आला चांगा ॥ ह्मणती पांडुरंगा उठा आतां ॥ ३ ॥ ज्ञानदेवासाठीं उत्सव अलकापुरीं ॥ तैसा कऱ्हेतीरीं सोपानासी ॥ ४ ॥ तैसी चांगयाची पुरवावी आळी ॥ नामा वनमाळी उठावले ॥ ५ ॥

॥ २१२१ ॥ दशमीचे दिवशीं ठेविलें प्रस्थान ॥ साधियेला येणें देव गुरु ॥ १ ॥ दिधला मंडप सिद्धेश्वरासमोर ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ २ ॥ सर्व स्वस्थ तेथें बैसले मिळून ॥ नारद कीर्तन पुढें होत ॥ ३ ॥ धन्य पुण्यस्तंभ धन्य गंगातीर ॥ धन्य दिसती भार पताकांचे ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा निज भक्तीसाठीं ॥ अंगें होसी कष्टी पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ २१२२ ॥ गोदातीरीं उत्सव करिती जगजेठी ॥ चांगदेवासाठीं समारंभ ॥ १ ॥ निवृत्ति मुक्ताबाई संगें पंढरिनाथ ॥ आले मंडपांत समुदायेसी ॥ २ ॥ निवृत्ति पांडुरंग बैसले निवाडे ॥ चांगदेव पुढें उभे ठेले ॥ ३ ॥ जोडियेले कर चांगदेवें पुढती ॥ करिती विनंति वोसंडोनी ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा उठिलें अंतःकरण ॥ नाहीं देहभान चांगयासी ॥ ५ ॥

॥ २१२३ ॥ चवदाशें वर्षें शरीर केलें जतन ॥ नाहीं अज्ञानपण गेलें माझें ॥ १ ॥ अहंकारें माझें बुडविलें घर ॥ झालों सेवा चोर स्वामिसंगें ॥ २ ॥ तापत्रयीं तापलों महा अग्नीं जळालों ॥ अविवेकीं झालों मंद-

मती ॥ ३ ॥ काय माझा देह वायावीण व्यर्थ ॥ आलों शरणांगत पांडुरंगा ॥ ४ ॥ अभिमानें आलों श्रीअलकापुरीं ॥ अज्ञान केलें दुरी मुक्ताईनें ॥ ५ ॥ नामा ह्मणे योग दुःखाचें शरीर ॥ काय याचा घोर करूनिया ॥ ६ ॥

॥ २१२४ ॥ नाना दुःख माया आठवती मना ॥ आतां नारायणा कृपा करी ॥ १ ॥ माझ्या पातकांचा लागू नेदी अंत ॥ ऐसें माझें चित्त साक्ष असे ॥ २ ॥ ज्ञानाग्नि माझी करा तृणवत् ॥ होउनी कृपावंत श्रीहरी ॥ ३ ॥ योगीराज यांसी नाहीं पाप दोष ॥ केला उपदेश मुक्ताईनें ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा पेटलें अंतर ॥ करा आतां स्थीर योगीराज ॥ ५ ॥

॥ २१२५ ॥ अवघ्या विद्येचा अभ्यास ॥ पावलों मी क्लेश देवराया ॥ १ ॥ मुक्ताबाई योगें उतरलों भवसिंधू ॥ तैशी दीनबंधु कृपा करी ॥ २ ॥ पतितपावन नाम तुझें थोर ॥ करी अंगीकार अनाथाचा ॥ ३ ॥ धन्य आमुचें भाग्य जाहलें दर्शन ॥ अंगें नारायण साहिस करी ॥ ४ ॥ चांगदेवें ऐसें आठविलें फार ॥ केला नमस्कार नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ २१२६ ॥ कृपावंत झाली जेव्हां मुक्ताबाई ॥ स्वरूप दिशा दाही दाखविलें ॥ १ ॥ पाटीं पोटीं स्वरूप केलें सद्गुरूनें ॥ तंव अभिमान गेला माझा ॥ २ ॥ याच्या उपकाराची काय वर्णू थोरी ॥ ज्यांच्या संगें हरि जोडियेला ॥ ३ ॥ पुरे पुरे आतां आठविसी फार ॥ होईल उशीर समाधीसी ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा उठा संतजन ॥ करूं आतां स्नान गौतमीसी ॥ ५ ॥

॥ २१२७ ॥ हरिपाठ गजरें केला जयजयकार ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ १ ॥ टाळ मृदंग वाजती अपार ॥ मिरविती भार वैष्णवांचे ॥ २ ॥ दोही बाहीं उभे पतकांचे भार ॥ मध्यें मनोहर गौतमी ते ॥ ३ ॥ विसोबा खेचरें पुंडलिका हातें ॥ आणिलें साहित्य समाधीचें ॥ ४ ॥ नामा ह्मणे हरि चांगदेवा स्नान ॥ घाली आवडीनें प्रेमयुक्त ॥ ५ ॥

॥ २१२८ ॥ निवृत्ति मुक्ताबाई गोविंद गोपाळ ॥ उठले सकळ स्नानालागीं ॥ १ ॥ राही रखुमाई सहसमुदायेसी ॥ मुनि आणि ऋषि उठावले ॥ २ ॥ करुनीया स्नान निघाले सकळ ॥ नाचती गोपाळ गोदातीरीं ॥ ३ ॥ चांगदेवें सोंवळें होउनीया त्वरें ॥ देव ऋषीश्वर पूजियेले ॥ ४ ॥ धन्य गोदा-

तीर आदि हे अनादि ॥ उकरिली समाधि यथासांग ॥ ५ ॥ नामयाचे पुत्र नारा विठा गोंदा ॥ जागा झाडी महादा समाधीची ॥ ६ ॥

॥ २१२९ ॥ चांगदेव योगी निष्काम चांगला ॥ स्वरूपीं रंगला केशवाच्या ॥ १ ॥ सुगंध अक्षता पुष्पें परिमळ ॥ पूजिले सकळ संतसाधु ॥ २॥ राही रखुमाई आणि पांडुरंग ॥ पूजियले सांग चांगदेवें ॥ ३ ॥ पूजिली मुक्ताई सद्गुरु निवृत्ति ॥ आणिक विभूति गौरविले ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां नका राहूं स्थीर ॥ होईल उशीर समाधीसी ॥ ५ ॥

॥ २१३० ॥ उठियेले देव गोपाळमंडळी ॥ बैसले ते पाळीं समाधीचे ॥ १ ॥ निशीं सर्व कीर्तन वद्य माघमासीं ॥ व्रत एकादशी गोदातीरीं ॥ २ ॥ द्वादशी पारणें वैष्णव सोडिती ॥ बैसल्या त्या पंक्ति सिद्धेश्वरीं ॥ ३ ॥ सिद्धेश्वरीं पूजा केली चांगयानें ॥ पात्रें नारायण टाकूं लागे ॥ ४॥ राही रखुमाई करिती पक्वान्नें ॥ सोडितो पारणें चांगदेव ॥ ५ ॥ चांगदेवासंगें निवृत्ति मुक्ताई ॥ बैसली ते पाही वैष्णवांत ॥ ६ ॥ नामा ह्मणे आतां करावीं भोजनें ॥ ताटें रखुमाईनें विस्तारिलीं ॥ ७ ॥

॥ २१३१ ॥ एकमेळीं जेविती वैष्णव सकळ ॥ वाढिती गोपाळ सकळांसी ॥ १ ॥ पांडुरंगें केला चांगोवाचा सोहळा ॥ माळ घाली गळां पुंडलिक ॥ २ ॥ गंध आणि अक्षता विसोवाचे हातीं ॥ महापूजा होती चांगोवाला ॥ ३ ॥ आरत्या पंचारत्या करी आनंदानें ॥ नामा ह्मणे प्रेमें वोसंडले ॥ ४ ॥

॥ २१३२ ॥ निवृत्ति मुक्ताईचे वोसंडले नयन ॥ करितो समाधान पांडुरंग ॥ १ ॥ विसोबा खेचराचे भरोनि येती डोळे ॥ परिसा तळमळे पुंडलिक ॥ २ ॥ नाना खेद करुनि सारिलें भोजना ॥ जाती अचमना गंगेलागीं ॥ ३ ॥ आंचवले देव वैष्णव ते ऋषी ॥ जाती समाधीसी चांगदेव ॥ ४ ॥ जेवुनीया संत बैसले निवाडे ॥ गोंदा महादा विडे वांटिताती ॥ ५ ॥ नामा ह्मणे सर्वे उठे नारायण ॥ आले अवघेजण समाधीपाशीं ॥ ६ ॥

॥ २१३३ ॥ मुक्ताबाईनें चांगा घेतलासे पोटां ॥ उठा आतां भेटा लहान थोर ॥ १ ॥ भेटले ऋषीश्वर वैष्णव सकळी ॥ बसैले ते पाळीं समाधीच्या ॥ २ ॥ निवृत्ति मुक्ताईसी केला नमस्कार ॥ उतरिले पार भवसिंधू ॥ ३ ॥ विठ्ठल रखुमाईसी केली प्रदक्षिणा ॥ मग शुद्ध नमना आरंभिलें

॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा निवृत्ति मुक्ताबाई ॥ चांगा लागे पायीं जाऊनिया ॥ ५ ॥

( वटेश्वर नमन. )

॥ २१३४ ॥ नमो नमो गणपती ॥ नमो सरस्वती ॥ नमो नमो रमापति ॥ दीनबंधू ॥ १ ॥ नमो योगी दिगंतरा ॥ नमो वैष्णवांचिया भारा ॥ नमो गंधर्व ऋषीश्वरा ॥ लहान थोरां ॥ २ ॥ नमो नमो अंतरीं ॥ नमो नमो दिशा चारी ॥ नमो अंतरबाहेरी ॥ एकत्व एक ॥ ३ ॥ नमो अनंता अनंतनामा ॥ नमो जानकीश जगज्जीवना ॥ जयजय रामारामा ॥ तुज नमो ॥ ४ ॥ नमो मत्स्य कच्छ अवतार ॥ नमो सिंह सुकर ॥ नमो परशुराम फरशधर ॥ वामना तुज नमो ॥ ५ ॥ नमो रामा वेदपाळका ॥ नमो इंद्रियेंचक्रचाळका ॥ नमो बोधभाविका ॥ श्रीविठ्ठला ॥ ६ ॥ नमो कलंकी विनटला ॥ पटला विठ्ठला ॥ सारासार नटला ॥ तुज नमो ॥ ७ ॥ निरामय निगुर्ण तुज ॥ नमो नमो चतुर्भुज ॥ नमो सर्व जगदात्मज ॥ अनाथनाथा ॥ ८ ॥ नमो बारा ज्योतिर्लिंगा ॥ नमो पंढरी पांडुरंगा ॥ नमो भिवरा चंद्रभागा ॥ नमो वैकुंठपीठा ॥ ९ ॥ मी काय जाणें नामस्थिती ॥ नमन केलें भोळी भक्ती ॥ नमन श्रीपती ॥ मान्य झाले ॥ १० ॥ नमन निवृत्ति ज्ञानेश्वरा ॥ नमो सोपान वटेश्वरा ॥ नमन मुक्ताबाई निर्झरा ॥ सत्रावीच्या ॥ ११ ॥ नमो हंसा सुअक्षरा ॥ नमो व्यापक चराचरा ॥ नमो नमो अव्यक्त विषयावरा ॥ पांडुरंगा ॥ १२ ॥ नमन तुमचें तुह्मीं केलें ॥ नमन सहजासहज झालें ॥ नेणें काय आलें गेलें ॥ सद्गुरुनाथा ॥ १३ ॥

॥ २१३५ ॥ नमो अनादि चक्रपाणी ॥ नमो निवृत्ति ज्ञान स्वामी ॥ नमो सोपान संजीवनी ॥ मुक्ताबाई ॥ १ ॥ नमो सद्गुरु मुक्ताबाई ॥ नमो स्वस्वरूप ठायीं ठायीं ॥ नमो वंदितसें पायीं ॥ नमो नमो परमपद ॥ २ ॥ नमो सूर्येंधशनी ॥ नमो भ्रूमध्य आटणी ॥ नमो माय कुंडलणी ॥ योगियाची ॥ ३ ॥ नमो त्रिविध ताप हरण ॥ नमो विषय निवारण ॥ नमो स्वामि निष्काम ॥ कर्ता हर्ता नमो ॥ ४ ॥ नमो अर्ध नासिक धसनी ॥ नमो पाठीपोटीं दाटणी ॥ नमो जनी वनी ॥ चिन्मयछत्र ॥ ५ ॥ नमो योगमाया दिगंबर ॥ नमो व्यापक चराचर ॥ नमो दाही अवतार ॥ परब्रह्म नमो ॥ ६ ॥ कंद कळीकाळ हरणा नमो ॥ तुझ्यान परब्रह्म गमो ॥ शांति अव्यक्त शमो ॥ श्रीहरी ॥ ७ ॥ नमो संसारनिरसिता ॥ नमो माया हर्ता ॥ नमो अद्वय

अनंता ॥ पांडुरंगा ॥ ८ ॥ नमो पातकसंहारी ॥ नमो परब्रह्म खेचरी ॥ नमो योग अगोचरी ॥ परमात्मा आत्मा ॥ ९ ॥ नमो शिवशिवेशा ॥ नमो आदिगुरु जगदीशा ॥ नमो प्रकाशप्रकाशा ॥ परब्रह्मा ॥ १० ॥ पुरे पुरे येरझारा ॥ नमो वेव्हार सारा ॥ नमो शारंगधरा ॥ अंतःकरण पाहसी ॥ ११ ॥ नमो मुक्ताबाईच्या उपदेशा ॥ नमो आदि अनंता जगदीशा ॥ स्वरूपाची परेशा ॥ जगद्गुरु नमो नमो ॥ १२ ॥ नमस्ते नमस्ते निवृत्ति ॥ नमस्ते नमस्ते ज्ञानमूर्ती ॥ नमस्ते नमस्ते सोपान ज्योती ॥ परेशा ॥ १३ ॥

---

॥ २१३६ ॥ लाविली कौपीन पितांबरी एक ॥ त्यागिली अनेक महत्माया ॥ १ ॥ सव्य हातें घेतलें संतसाधुजना ॥ केली प्रदक्षणा समाधीसी ॥ २ ॥ समाधीचे पाळीं निवृत्ति वनमाळी ॥ अंतरीं कळवळी मुक्ताबाई ॥ ३ ॥ आणिकांच्या डोळां अश्रुपात येत ॥ होईल कीं गुप्त योगिराज ॥ ४ ॥ चांगदेवा दिधलीं विठोबाचीं पाउलें ॥ तीर्थ तें घेतलें देवगुरुचें ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि झाली आठवण ॥ करा बोळवण चांगोबाची ॥ ६ ॥

॥ २१३७ ॥ पुंडलिकें धरिला चांगोबाचा हात ॥ तंव सकळ संत कळवळती ॥ १ ॥ पताकांचे भार समाधीभोंवते ॥ तेव्हां साधुसंत उठावले ॥ २ ॥ यांच्या या ज्ञानाचा अंतपार नाहीं ॥ भली मुक्ताबाई ओसंडली ॥ ३ ॥ संतसमागम फळला तुजला ॥ एकांत फावला मुक्ताबाई ॥ ४ ॥ मसुरेप्रमाणें दावियेली खूण ॥ तेंचि पूर्णब्रह्म योगियांचें ॥ ५ ॥ फार दिवस तुह्मीं रक्षिलें शरीर ॥ मुक्ताईनें पार उतरिलें ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवा सरूचा महिमा ॥ बाप पूर्ण आह्मा पांडुरंग ॥ ७ ॥

॥ २१३८ ॥ कुंकुम केशराचे समधीसी सडे ॥ पहाती निवाडे जन लोक ॥ १ ॥ गोदातीरीं महोत्सव चांगदेवा ॥ पूर्ण तूं विसावा पांडुरंगा ॥ २ ॥ समाधीभोंवते उभे साधुसंत ॥ उतरले आंत चांगदेव ॥ ३ ॥ निवृत्ति पांडुरंग गेले समागमें ॥ वैष्णव रामराम बोलताती ॥ ४ ॥ राही रुक्माबाई उभ्या दोही बाहीं ॥ मध्यें मुक्ताबाई संबोखती ॥ ५ ॥ नामा पुंडलिक करिती समाधान ॥ स्थीर करा मन बोधभावें ॥ ६ ॥

॥ २१३९ ॥ समाधीसी शेज घातली मनोहर ॥ बैसविले वर चांगदेव ॥ १ ॥ आनंदानें टाळ्या पिटती वैष्णवभार ॥ लाविती पदर डोळियांसी ॥ २ ॥ टाळ मृदंगांचा झाला झणत्कार ॥ गेले योगेश्वर समाधीसी ॥ ३ ॥

सांडिलीं भूषणें भस्म आभरणें ॥ झाले निमग्न परब्रह्मीं ॥ ४ ॥ झांकियेले नेत्र उन्मनीच्या संगें ॥ निवृत्ति पांडुरंग ओसंडले ॥ ५ ॥ नामा ह्मणे झाला समाधिस्थ योगेश्वर ॥ निघाले बाहेर देवभक्त ॥ ६ ॥

॥ २१४० ॥ भूचरी खेचरी चाचरी निश्चळा ॥ अगोचरी डोळां स्थिरावली ॥ १ ॥ झांकिली समाधि संतसज्जनांनीं ॥ तुळसी पुष्पें वरुनी वर्षताती ॥ २ ॥ निवृत्तीनें मिठी विठोबाच्या गळां ॥ आणिकांच्या डोळां अश्रू येती ॥ ३ ॥ केलें समाधान विठ्ठल रखुमाईनें ॥ निवृत्ति ह्मणे रहाणें काय आतां ॥ ४ ॥ गेले योगिराज राहिले ठायीं ठायीं ॥ आतां मुक्ताबाई जाईल कीं ॥ ५ ॥ स्वरूपींचे ओघ जातील स्वरूपीं ॥ नामा ह्मणे निरोपी पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ २१४१ ॥ देवें समाधान केलें अवघेजणा ॥ चला आचमना गौतमीसी ॥ १ ॥ वद्य त्रयोदशी दिधली समाधी ॥ महोत्सव गोविंदीं समर्पिला ॥ २ ॥ गर्जती वैष्णव विठोबाच्या नामा ॥ थोर तुझा महिमा दीनबंधू ॥ ३ ॥ समाधि प्रदक्षिणा केली अवघेजणें ॥ झाली बोळवण चांगयाची ॥ ४ ॥ कीर्तन करीत आले गौतमीसी ॥ देव मुनि ऋषि आंचवले ॥ ५ ॥ अवघ्यांनीं आचमनें केलीं गोदातीरीं ॥ नामा ह्मणे हरि उठा आतां ॥ ६ ॥

॥ २१४२ ॥ आचमन करुनि आले सिद्धेश्वरा ॥ हरि ऋषीश्वरा आर्जविती ॥ १ ॥ निवृत्ति मुक्ताईला त्यागूं नये कोणी ॥ आतां उत्तरायणीं गमन करूं ॥ २ ॥ पांच रोज उत्सव केला चांगदेवा ॥ विश्वाचा विसावा श्रीहरी ॥ ३ ॥ वैष्णवांनीं समाधि बांधिली साजिरी ॥ सुवर्णाचा वरी पिंपळ तो ॥ ४ ॥ केला नमस्कार वैष्णवांनीं जेव्हां ॥ मुक्ताबाई तेव्हां वोसंडली ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा तीर्थक्षेत्र चांगलें ॥ चित्त मन रंगलें चांगयाचें ॥ ६ ॥

॥ २१४३ ॥ शुद्ध फाल्गुन मासीं वैष्णव हृषीकेशी ॥ पंचमीचे दिवशीं सिद्ध झाले ॥ १ ॥ निवृत्तिराज ह्मणे जावें ह्माळसापुरीं ॥ जेथें ज्ञानेश्वरी पूर्ण झाली ॥ २ ॥ उठावले भार देवऋषीश्वर ॥ केला नमस्कार समाधीसी ॥ ३ ॥ सव्यहातें क्षेत्र घेतलें वैष्णवांनीं ॥ चाललीं विमानें नेवाशासी ॥ ४ ॥ नामा ह्मणे देव निघाले बाहेर ॥ कीर्तन गजर पुढें होती ॥ ५ ॥

---

## मुक्ताबाईच्या समाधीचे अभंग.

॥ २१४४ ॥ तेथोनि वैष्णव आले नेवाशासी ॥ सहसमुदायेसी देवराव ॥ १ ॥ झाळसेलागीं पूजा केली असे निगुती ॥ राहिले दहा रात्रीं हृषीकेशी ॥ २ ॥ येथोनि चलावें पुढती शारंगधरा ॥ जावें टोकेश्वरा स्नानालागीं ॥ ३ ॥ चहूं युगा आदि स्थळ पुरातन ॥ आले नारायण गोदातीरीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे येथें रहावें हृशीकेशी ॥ विजया दशमीसी सिद्ध होऊं ॥ ५ ॥

॥ २१४५ ॥ देव ह्मणे रहाणें न घडेचि येथें ॥ जावें आतां पुढते उद्योगासी ॥ १ ॥ निवृत्तिराज ह्मणे शुद्ध प्रतिपदा ॥ जाऊंजी गोविंदा प्रतिष्ठाना ॥ २ ॥ अनादि जें स्थळ दाविलें नारायणें ॥ मग प्रतिष्ठाना येते जाहले ॥ ३ ॥ चक्रतीर्थीं पोहा ह्मणती आला थोर ॥ वैष्णवांचे भार उतरले ॥ ४ ॥ नामा ह्मणे हरि सहज आली वाट ॥ आप्पेगांव कोठें सांगा स्वामी ॥ ५ ॥

॥ २१४६ ॥ मायभूमि पाहूं यांची आह्मी डोळां ॥ चलावें गोपाळा सहजासहज ॥ १ ॥ भक्त त्र्यंबकपंत मूळ पुरुष आदि ॥ तयाची समाधि आप्पेगांवीं ॥ २ ॥ आप्पेगांवीं आले देव ऋषीश्वर ॥ उतरले भार वैष्णवांचे ॥ ३ ॥ धन्य यांचें कूळ धन्य यांचा वंश ॥ धन्य यांचे कुशी योगीराज ॥ ४ ॥ नामा ह्मणे आह्मा दाविलें नारायणें ॥ झालीं चौघीजणें याचि क्षेत्रीं ॥ ५ ॥

॥ २१४७ ॥ निवृत्ति मुक्ताईनें पाहुनि स्थळ डोळां ॥ आलासे उमाळा ओसंडोनी ॥ १ ॥ तात आणि मात गेलीसे येथून ॥ तेव्हां आह्मी लहान पांडुरंगा ॥ २ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न ॥ सांभाळी सोपान मजलागीं ॥ ३ ॥ तुझ्या योगें हरि क्रमियेला काळ ॥ फुटलासे मेळा तापसांचा ॥ ४ ॥ नामा ह्मणे यांचें कळवळिलें मन ॥ करी समाधान पांडुरंग ॥ ५ ॥

॥ २१४८ ॥ पाहिली गे माय पूर्वभूमि आपुली ॥ बहुत सन्मानिलीं वैष्णवांनीं ॥ १ ॥ चैत्रमास शिवरात्र उत्सव आगळा ॥ जावें पां वेरुळा धृष्णेश्वरा ॥ २ ॥ दशमीचे दिवशीं निघाले बाहेर ॥ उठावले भार वैष्णवांचे

॥ ३ ॥ वेरूळ नगर असे पुरातन ॥ विश्वकर्मा यानें कीर्ति केली ॥ ४ ॥ अगाध तें पुण्य बोलताती ऋषी ॥ जावें वेरुळासी नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ २१४९ ॥ मुक्ताई उदासी झाली असे फार ॥ आतां हें शरीर रक्षूं नये ॥ १ ॥ त्यागिले आहार अन्नपाणी सकळीं ॥ निवृत्तिराज तळमळी मनामार्जी ॥ २ ॥ गंधर्व सुरगण उठले सहमेळां ॥ गेले ते वेरुळा अवघेजण ॥ ३ ॥ वेरुळाचा महिमा सांगे हृषीकेशी ॥ जना आगळी काशी ह्मणोनिया ॥ ४ ॥ वेरुळाची यात्रा केली यथासांग ॥ मग पांडुरंग निघते झाले ॥ ५ ॥ चालिले श्रीरंग वैष्णवांचे भार ॥ पाहावें तापीतीर नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ २१५० ॥ निवृत्तीराज ह्मणे आतां पंढरिनाथा ॥ मुक्ताईला जपा अवघेजण ॥ १ ॥ वेधली चित्तवृत्ति स्वरूपीं निमग्न ॥ नाहीं देहभान मुक्ताईला ॥ २ ॥ अवघेजण जपती जपे नारायण ॥ चालती घेऊन मध्यभार्गी ॥ ३ ॥ निवृत्तिराजें धरिली मुक्ताबाई हातीं ॥ सांभाळीत जाती निशीदिनीं ॥ ४ ॥ पदोपदीं जपे निवृत्तिराज करें ॥ आणिक ऋषीश्वर सांभाळिती ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा जातां तातडीनें ॥ पुढें स्थळ कोण नेमियेलें ॥ ६ ॥

॥ २१५१ ॥ तापीचिये तीरीं महत् ग्राम थोर ॥ असे सोमेश्वर पुरातन ॥ १ ॥ वद्य वैशाख मास दशमी निर्मळ ॥ उष्णकाळ फार तापतसे ॥ २ ॥ तेथें परशुरामें मारियेला बाण ॥ पाहती पुरातन पश्चिमेस ॥ ३ ॥ पाहिलें माय आह्मीं तापीतीर ॥ उतरले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥ धन्य तापीतीर दिसे मनोहर ॥ दोहीं थडी भार पताकांचे ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि आवडीचें स्थळ ॥ कण्हेर कमळा उदय झाला ॥ ६ ॥

॥ २१५२ ॥ फुलले अनेक तरुवर तेथें ॥ दुर्वा दर्भ आंत उगवले ॥ १ ॥ करंज जांभळी लागली एकथाटी ॥ वरी बहु दाटी तरुवरांची ॥ २ ॥ अमृतफळें अपार विस्तारले फार ॥ त्यामार्जी मयूर टाहो देती ॥ ३ ॥ कंठ कोकिळा त्या सुस्वर गायन ॥ तरुवर सुमनें परिमळ ॥ ४ ॥ पारिजातकांची दाटी झाली भारी ॥ आंत मैलागिरी डुल्लताती ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा भला हा एकांत ॥ मार्कंडेयें येथें तप केलें ॥ ६ ॥

॥ २१५३ ॥ सोनियाचीं झाडें अनेक कर्दळी ॥ त्यांत रानकेळीं फोफावल्या ॥ १ ॥ सिताफळी भरीत अवघि तापीथडी ॥ दाट दिसती गाढी रामफळें ॥ २ ॥ तापीतीरीं ऋषि आणि शारंगधर ॥ पाठीमागें भार वैष्णवांचे ॥ ३ ॥ धन्य महतूनगर सोमेश्वर ॥ धन्य तापीतीर योगियांचें ॥ ४ ॥ उष्णकाळीं छाया आवडती फार ॥ ह्मणती ऋषीश्वर रम्य स्थळ ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा रंगलें अंतःकरण ॥ उतरती विमानें गंधर्वांचीं ॥ ६ ॥

॥ २१५४ ॥ उदित कमळें नानावर्ण सुंदर ॥ फुलले तरुवर नानारूपें ॥ १ ॥ श्वेतपीतरक्त भ्रमर रुणझुण ॥ होताती श्रवण वैष्णवांसी ॥ २ ॥ गुंजारव भ्रमती रत्नकळा फांकती ॥ मनोहर तापी दिसती सुरवरांला ॥ ३ ॥ तरुवर गगनीं अंकुरले भारी ॥ विजा तैं कोंदल्या बहुतापरी ॥ ४ ॥ गंधर्वं गायनें अलापित सुस्वरीं ॥ केलें स्पष्ट नयनी गुह्य गौप्य ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा मन झालें स्थीर ॥ पडियेला विसर अविद्येचा ॥ ६ ॥

॥ २१५५ ॥ निवृत्तीनें एकांत केला मुक्ताईशीं ॥ गमन कोणे दिवशीं आरंभिलें ॥ १ ॥ मुक्ताबाई ह्मणे जावें यावें कोठें ॥ अवघें निघोट स्वरूप स्वामी ॥ २ ॥ गर्जतां गगन कडाडली वीज ॥ स्वरूपीं सहज मिळयेली ॥ ३ ॥ मावळला दीप ज्योत कोठें होती ॥ सहज सामावती निरंजनीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे हरि जाईल पाहतां ॥ ऐसें माझे चित्ता कळों आलें ॥ ५ ॥

॥ २१५६ ॥ आमुच्या स्वस्थानीं नाहीं पा अंधार ॥ अवघी चराचर प्रकाशत्वें ॥ १ ॥ उदय आणि अस्तु नाहीं स्वरूपासी ॥ ऐसें मुनि ऋषि जाणताती ॥ २ ॥ आह्मीं कधीं आलों स्वरूप सोडोन ॥ जावें पालटोन जेथिल तेथें ॥ ३ ॥ अंतर बाहेर स्वामीचें स्वरूप ॥ स्वयें नंदादीप उजाळिला ॥ ४ ॥ वद्य वैशाखमासीं दशमीचे दिवशीं ॥ गेला ते स्नानासी तापीतीरीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे गोविंदा मनोहर नभा ॥ अंकुरला गाभा विराटाचा ॥ ६ ॥

॥ २१५७ ॥ टाळ विणे मृदंग सुस्वर गायन ॥ कोंदलें गगन दाही दिशा ॥ १ ॥ प्रळयीच्या विजा वर्षती अपार ॥ झाला धुंधकार दाही दिशा ॥ २ ॥ करोनिया स्नान बैसले बाहेर ॥ ह्मणती अंधकार फार झाला झुंजाट ॥ ३ ॥ सुटला वारा कांपूं लागे धरा ॥ नभची अंतरा काल-

वलें ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा झाली कैसी गती ॥ पडलीसे भ्रांति अवघ्या जना ॥ ५ ॥

॥ २१५८ ॥ निवृत्तिराज ह्मणे प्रळयींचा वारा ॥ सुटला शार्ङ्गधरा ऐसें वाटे ॥ १ ॥ हालतें गगन डोलती विमानें ॥ गेलें देहभान अवघीयांचें ॥ २ ॥ अवघीयांचे डोळे झांकले एकदां ॥ माध्यान्हि आंबुदा वळुनि आलें ॥ ३ ॥ निवृत्ति पांडुरंग राही रखुमाई ॥ धरा ह्मणती धाई मुक्ताईला ॥ ४ ॥ नामा ह्मणे केशवा जाहला उबाळा ॥ कांहीं केल्या डोळा उघडो नेदी ॥ ५ ॥

॥ २१५९ ॥ ऋषि ह्मणती हरि पातलेसें विघ्न ॥ आतां कैसे प्राण वांचतील ॥ १ ॥ कोणाचिया शुद्धि नाहींचिया कोणा ॥ ह्मणती नारायणा मृत्यु आला ॥ २ ॥ कडाडली वीज निरंजनी जेव्हां ॥ मुक्ताबाई तेव्हां गुप्त झाली ॥ ३ ॥ वैकुंठीं लक्ष घंटा वाजती एकघाई ॥ झाली मुक्ताबाई स्वरूपाकार ॥ ४ ॥ एक प्रहर झाला प्रकाश त्रिभुवनीं ॥ जेव्हां निरंजनीं गुप्त झाली ॥ ५ ॥ गेलें निवारुनि आकाश आभुट ॥ नामा ह्मणे कोठें मुक्ताबाई ॥ ६ ॥

॥ २१६० ॥ उघडिल्या दिशा उघडिलें गगन ॥ पाहिलें वदन भास्कराचें ॥ १ ॥ निवृत्तिराजातें कळवळा वाटे भारी ॥ आतां आह्मा हरि आज्ञा द्यावी ॥ २ ॥ जयजयकारें टाळ्या पिटीती सकळ ॥ नाचती गोपाळ तापीतीरीं ॥ ३ ॥ सकळांचे चित्तीं येतो कळवळा ॥ मुक्ताबाई डोळां पाहिली नाहीं ॥ ४ ॥ नानापरि खेद करिती योगेश्वर ॥ लाविती पदर डोळियांसी ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा कैसें आतां कांहीं ॥ आह्मा मुक्ताबाई बोलली नाहीं ॥ ६ ॥

॥ २१६१ ॥ ज्ञानेश्वरा तुह्मीं निरविलें सोपान ॥ केली बोळवण पांडुरंगा ॥ १ ॥ तो आह्मीं उत्सव पाहिलासे डोळां ॥ चांगोबाचा सोहळा दाविला हरी ॥ २ ॥ होती ऐसी नाहीं झाली मुक्ताबाई ॥ संत ठायीं ठायीं स्फुंदताती ॥ ३ ॥ रम्य स्थळ म्हणोनि राहिले एक मास ॥ युगा ऐसे दिवस क्रमियेले ॥ ४ ॥ अर्ध मास वैशाख अर्ध मास ज्येष्ठ ॥ फार होती कष्ट निवृत्तिराजा ॥ ५ ॥ मुक्ताबाई मुक्त केली केशवराजें ॥ नामा ह्मणे पूजा तापीतीरा ॥ ६ ॥

॥ २१६२ ॥ पूजियेली तापी पूजिला सोमेश्वर ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ १ ॥ कांहीं कोणावरी नाहीं पडलें ओझें ॥ कष्टी निवृत्तिराज होत असे ॥ २ ॥ आली गेली कैसी आज्ञा कळलें नाहीं ॥ कोठें मुक्ताबाई विसर्जिली ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा उठवा ऋषीश्वरा ॥ निवृत्तीचें करा समाधान ॥ ४ ॥

---

## श्रीनिवृत्तिनाथ याचे समाधीचे अभंग.

---

॥ २१६३ ॥ निवृत्तिराज ह्मणे भलें केलें देवा ॥ आतां जी केशवा सिद्ध व्हावें ॥ १ ॥ निवृत्तिदास ह्मणे सहजासहज हरी ॥ बोळविलीं सारीं सुखधामा ॥ २ ॥ दाही दिशा चित्त झालें असे सैरा ॥ आतां शार्ङ्गधरा सिद्ध व्हावें ॥ ३ ॥ आतां माझे श्रम नको घेऊं हरी ॥ जावें त्र्यंबकेश्वरीं समाधीसी ॥ ४ ॥ फार माझा प्राण आला असे कंठीं ॥ आतां जगजेठी सिद्ध व्हावें ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा दिवस नाहीं आतां ॥ त्वरें वेगीं संतां सिद्ध करा ॥ ६ ॥

॥ २१६४ ॥ विमानीं बैसली विठ्ठल सुखमूर्ती ॥ घेतला निवृत्ति मध्यभागीं ॥ १ ॥ राही रखुमाई बैसले सुरगण ॥ उठलीं विमानें गंधर्वांचीं ॥ २ ॥ गोपाळांचे भार उठले तातडीनें ॥ चालिलीं विमानें सुरवरांचीं ॥ ३ ॥ आतां त्वरें चला तुह्मी सप्तशृंगा ॥ कार्य हें गोविंदा सिद्धि न्यावें ॥ ४ ॥ आदिमाया तेथें होईल दर्शन ॥ संत साधुजन भेटतील ॥ ५ ॥ नामा ह्मणे धन्य तुझ्यायोगें हरी ॥ तीर्थयात्रा सारी घडली आह्मां ॥ ६ ॥

॥ २१६५ ॥ टाळ हे मृदंग गायन पुढती ॥ रंजविती निवृत्ति अवघेजण ॥ १ ॥ गीतार्थ करिती योगी मुनिजन ॥ रंजविती मन निवृत्तीचें ॥ २ ॥ आत्मसुख एक बोलती बोलणीं ॥ ज्ञानराज मनीं आठवतो ॥ ३ ॥ ज्ञानराजें आमुचे निववीले डोळे ॥ आतां ऐसे खेळे नाहीं कोणी ॥ ४ ॥ ऐकावा हा अर्थ मुक्ताईच्या मुखीं ॥ आतां ऐसी सखी नाहीं कोणी ॥ ५ ॥ नामा ह्मणे स्वामी सांगतां प्रमाण ॥ ऐकतां श्रवण खेद वाटे ॥ ६ ॥

॥ २१६६ ॥ अविट बोलणें बोलावें अनादि ॥ जें गुह्य वेदीं सांपडेना ॥ १ ॥ कीर्ति वैराग्य केलें सामराज्य ॥ गुरुत्वासी लाज नाहीं आली ॥ २ ॥ नाशिवंत शरीर केलें अविनाश ॥ घडविला विलास अध्यात्मीचा ॥ ३ ॥ अविट बोलणीं आठवतीं मनीं ॥ आतां त्रिभुवनीं दिसेनात ॥ ४ ॥ तुझ्यामुळें हरि चालतो उगला ॥ देहा आधीं गेला प्राण माझा ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा करितां ऐसा घोर ॥ सांडील शरीर निवृत्तिराज ॥ ६ ॥

॥ २१६७ ॥ जें जें सुख आह्मी अनुभविलें मना ॥ त्याचा नारायणा आठव होतो ॥ १ ॥ ऐसे पदोपदीं निवृत्तिराज कष्टी ॥ कोणकोणाच्या गोष्टी आठवाव्या ॥ २ ॥ ज्येष्ठाच्या आधींच कनिष्ठाचें जाणें ॥ केलें नारायणें उफराटें ॥ ३ ॥ उफराटें फार कळलें माझे मनीं ॥ वळचणीचें पाणी आढ्या गेलें ॥ ४ ॥ अवघ्यापरिस कष्टी केलें मुक्ताईनें ॥ कांहींच बोलणें घडलें नाहीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे विठोबा ऐकशी बोलणें ॥ अवघीयांचीं मनें कळवळती ॥ ६ ॥

॥ २१६८ ॥ गैहिनीनाथें मज सांगितलें सार ॥ केली ज्ञानेश्वरें व्याख्या त्याची ॥ १ ॥ काढिला शोधून अनुभव मुक्ताईनें ॥ तें ज्ञान सोपानें संपादिलें ॥ २ ॥ अनुभवें निववला चांगा वटेश्वर ॥ विसोबा खेचर सिद्ध झाला ॥ ३ ॥ त्या ज्ञानें झाला चांगदेव विकळ ॥ त्यागियेली सकळ अविद्यामाया ॥ ४ ॥ अज्ञानासी ज्ञान झालें तें सहज ॥ ऐसें निवृत्तिराज आठविती ॥ ५ ॥ सप्तशृंगीं आले देव सुरगण ॥ उतरिलीं विमानें नामा ह्मणे ॥ ६ ॥

॥ २१६९ ॥ देवीं देवेश शिवी शिवेश ॥ अगम्य सुरस आदिमाया ॥ १ ॥ अष्टदिशा अगोचरे अष्टभुजा संहारकारे ॥ असुरादि मंथन विरे कुलस्वामिनीये ॥ २ ॥ वदताती देव आणि सुरगण ॥ उतरिलीं विमानें ठायीं ठायीं ॥ ३ ॥ सकळांनीं पूजा केली आनंदानें ॥ करिती कीर्तनें अंबेपुढें ॥ ४ ॥ मंडपीं बैसले निवृत्ति नारायण ॥ नारद कीर्तन पुढें होत ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवी पहाती सकळ ॥ पूजिती गोपाळ आनंदानें ॥ ६ ॥

॥ २१७० ॥ सप्तशृंगालागीं केली प्रदक्षिणा ॥ आतां नारायणा सिद्ध व्हावें ॥ १ ॥ मार्गीं आदिमाया पूजिली आनंदीं ॥ ह्मणती धन्य मांदी वैष्णवांची ॥ २ ॥ चालतां चालतां दिवस झाले फार ॥ होईल उशीर समा-

धीसी ॥ ३ ॥ तीन रात्र तेथें राहिले गोपाळ ॥ मग ह्मणती सकळ चला आतां ॥ ४ ॥ नामा ह्मणे देव बैसले गरुडावर ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ ५ ॥

॥ २१७१ ॥ वंदिली अंबीका निघाले बाहेर ॥ कीर्तन गजर पुढें होत ॥ १ ॥ गोदातीरीं क्षेत्र धन्य त्र्यंबकेश्वर ॥ उतरले भार वैष्णवांचे ॥ २ ॥ ह्मणती पांडुरंगें दावियेलें स्थळ ॥ निवृत्तिराज विकळ फार झाले ॥ ३ ॥ पंचमीचे दिवशीं गेले पंचवटीं ॥ उतरले तटीं गौतमीचे ॥ ४ ॥ नामा ह्मणे शेवट केला वनमाळी ॥ रहाती ये स्थळीं निवृत्तिराज ॥ ५ ॥

॥ २१७२ ॥ सुंदर नारायण गौरविला फार ॥ केला नमस्कार वैष्णवांनीं ॥ १ ॥ सुरस सर्व तीर्थें आदि पुरातन ॥ केली नारायणें तीर्थयात्रा ॥ २ ॥ विसोबा खेचर परिसा भागवत ॥ अनेक ते संत बैसविले ॥ ३ ॥ मध्यें निवृत्तिराज पांडुरंग पुंडलिक ॥ पाहाती कौतुक गोमतीचें ॥ ४ ॥ दशमीचे दिवशीं केलें तें प्रस्थान ॥ विधि नारायण सांगतसे ॥ ५ ॥ नामा ह्मणे श्रीरंगा गौरविले सकळ ॥ झालासे विकळ निवृत्तिराज ॥ ६ ॥

॥ २१७३ ॥ सह समुदायेसी उठावें शार्ङ्गधरा ॥ हरिहरेश्वरा जाऊं आतां ॥ १ ॥ उठले वैष्णव आणि हृषिकेशी ॥ आले त्र्यंबकासी निवृत्तिराज ॥ २ ॥ एकादशी व्रत वद्य ज्येष्ठ मासीं ॥ उत्सव निवृत्तीसी देवें केला ॥ ३ ॥ द्वादशी पारणें सोडितां वैष्णव ॥ समारंभ देव करीतसे ॥ ४ ॥ राहिली ते शक्ति गळालें शरीर ॥ देहअहंकार त्यागियेला ॥ ५ ॥ कोणाची करावी पूजा कोणें कोणा ॥ अवघें नारायणा करणें येथें ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवा मुक्ताईची गती ॥ सांडिलें निवृत्ति शरीरासी ॥ ७ ॥

॥ २१७४ ॥ आपुलीया अंगें साहित्य श्रीरंगें ॥ पुजियेले सांग संतसाधू ॥ १ ॥ निवृत्तिराजा स्नान घातलें देवानें ॥ पूजा संतजन करिताती ॥ २ ॥ निवृत्तिदेवें केली विठोबाची पूजा ॥ उभारिल्या ध्वजा पताकांच्या ॥ ३ ॥ पश्चिमेसी स्थळ अनादि समूळ ॥ उघडिली शीळ समाधीची ॥ ४ ॥ ह्मणती योगेश्वर अनादि या शेजा ॥ चिद्रत्नें ती पूजा केली असे ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा जागा निरंजनीं ॥ युगादि हे धुणी धुपतीये ॥ ६ ॥

॥ २१७५ ॥ तुळसी बेल पुष्पें समर्पिलीं वर ॥ पाहाती ऋषीश्वर पहिली पूजा ॥ १ ॥ नारा विठा गोंदा पाठविला महादा ॥ झाडावया

शेजा पुढें झाले ॥ २ ॥ सभोंवती जागा झाडिली निर्मळ ॥ अनादि हें स्थळ निवृत्तिराजा ॥ ३ ॥ सभोंवती दीप लाविले समाधी ॥ ह्मणती पूजा आधीं केली असे ॥ ४ ॥ अनादि हे पूजा केली म्हणती संत ॥ आतां कोणीं आंत उतरूं नये ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि काय स्थळ चांगलें ॥ दुर्वा दर्भ फुलें वाहियेलीं ॥ ६ ॥

॥ २१७६ ॥ पुष्कर्णीच्या कांठीं वैष्णवांचे भार ॥ देव ऋषीश्वर जेवताती ॥ १ ॥ अवघीयां पात्रें वाढिलीं नारायणें ॥ सोडिती पारणें निवृत्तिराज ॥ २ ॥ विठोबा रखुमाईनें घेतला निवृत्ति ॥ जेविताती पंक्ति गोपाळांच्या ॥ ३ ॥ जेवले वैष्णव आणि हृषीकेशी ॥ गेले आचमनासी पुष्कर्णीतें ॥ ४ ॥ अवघे संत तेथें बैसले निवाडे ॥ पुंडलिक विडे वाटीतसे ॥ ५ ॥ नामा ह्मणे केशव बैसले कीर्तनास ॥ होतो कासावीस निवृत्तिराज ॥ ६ ॥

॥ २१७७ ॥ निवृत्तिदेवासाठीं स्फुंदती ऋषीश्वर ॥ लाविला पदर डोळियांसी ॥ १ ॥ गरुडावर पुंडलिकें घातियेला साज ॥ जाती निवृत्तिराज समाधीसी ॥ २ ॥ चालती विमानें वाजतसे घंटा ॥ उठा आतां भेटा अवघेजण ॥ ३ ॥ समाधीभोंवते कुंकुमाचे सडे ॥ पाहाती निवाडे योगीराज ॥ ४ ॥ कीर्तन गजरीं गेलीसे मंडळी ॥ बैसली ते पाळीं समाधीच्या ॥ ५ ॥ नामा ह्मणे पुढें उभे नारायण ॥ आरंभिलें नमन निवृत्तिराजें ॥ ६ ॥

( निवृत्तीचें नमन. )

॥ २१७८ ॥ नमो गणपति गजानना ॥ नमो सरस्वति मंगलध्याना ॥ नमो अगाध ब्रह्मपरायणा ॥ नमो नमो स्वामी ॥ १ ॥ नमो आदिमायादि सागरा ॥ नमो चिदानंद दिगंबरा ॥ एकत्व एक सारा ॥ नमो नमो तुज ॥ २ ॥ नमो मत्स्येंद्रनाथा अनादी ॥ नमो सर्वव्यापका बुद्धी ॥ नमो जुनाट युगादी ॥ तुज नमो ॥ ३ ॥ नमो सत्यकाळनाथ त्रिगती ॥ नमो पुढत पुढती ॥ योगेश्वरा आदिअंतीं ॥ नमो नमो स्वामी ॥ ४ ॥ नमो गैहिनीनाथ अविनाशा ॥ नमो सहजासहज प्रकाशा ॥ नमो व्यापुनि दाही दिशा ॥ आदि गुरु तुज नमो ॥ ५ ॥ गुप्तनाथ तुज नमन ॥ नमो सद्गुरु परब्रह्म पूर्ण ॥ सदा स्वरूपीं अनुसंधान ॥ नमस्ते नमस्ते ॥ ६ ॥ नमो गैहिनीनाथ आदि गुरु ॥ तूं संकटीं आदि तारूं ॥ नमो संसारहर्ता हरू ॥ सद्गुरुनाथा तुज नमो ॥ ७ ॥ नमो कर्ता हर्ता नारायणा ॥ नमो उदया अस्तु गगनघना ॥

नमो विराटपुरुषा जगज्जीवना ॥ नमस्ते नमस्ते कुळस्वामी ॥ ८ ॥ नमो त्रिपुटी गुप्तधना ॥ नीलवर्णा कलंकी कोंदणा ॥ नमो ज्योतिर्मय दारुणा ॥ नमो नमो जगद्गुरु ॥ ९ ॥ नमो पांडुरंग दयाळा ॥ नमो गोविंदा गोपाळा ॥ नमो वैष्णवां सकळां ॥ योगियां ऋषीश्वरां नमो नमो ॥ १० ॥ नमो सर्व चराचर ॥ नमो अंतरबाहेर ॥ नमो दाहीही अवतार ॥ जगद्भूषणा तुज नमो ॥ ११ ॥ नमन नेणों कैसे रीती ॥ नमन रंगलें विश्वरूपीं ॥ नमन चिन्मय गुह्य गौप्यीं ॥ नमो सर्व भूतीं निजगुरू ॥ १२ ॥

---

॥ २१७९ ॥ धूप पंचारती गंधाक्षता वाहती ॥ पूजिला निवृत्ति वैष्णवांनीं ॥ १ ॥ प्रेमें आसुवें येती सकळांचिये डोळां ॥ माळ घाली गळां पुडलिक ॥ २ ॥ निवृत्तिदेवें ग्रंथ केला होता सार ॥ ठेविला समोर विठोबाच्या ॥ ३ ॥ अवघ्या जनालागीं केला नमस्कार ॥ उठावले भार वैष्णवांचे ॥ ४ ॥ गोविंद गोपाळ आले ते सकळ ॥ प्रेमें होती विकळ निवृत्तिराज ॥ ५ ॥ केलीं आचमनें पुष्कर्णीचे तटीं ॥ आले उठाउठीं समाधीपाशीं ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवा निवृत्तीसारखा योगी ॥ नाहीं आतां जगीं दावावया ॥ ७ ॥

॥ २१८० ॥ समाधीच्या पाळीं बैसली सकळीं ॥ केला त्या गोपाळीं जयजयकार ॥ १ ॥ निवृत्तीच्या संगें पुंडलिक पांडुरंग ॥ सिद्ध झाले सांग समाधीसी ॥ २ ॥ निवृत्तिदेवीं वंदिलीं सकळांचीं पाऊलें ॥ तीर्थ चें घेतलें विठोबाचें ॥ ३ ॥ पताकांची छाया समाधीसी आली ॥ उत ले खालीं निवृत्तिदेव ॥ ४ ॥ पुंडलिक पांडुरंग गेले बरोबरी ॥ बैसले आस ना- वरी निवृत्तिराज ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा काय पहावें आतां ॥ गे ला पंढरिनाथा चिद्घनु तो ॥ ६ ॥ संत

र्त

॥ २१८१ ॥ निवृत्तिराज बैसले समाधीं सुचित्त ॥ चिन्मय ते ज्यो उजळली ॥ १ ॥ पुंडलिकें मिठी निवृत्तीच्या गळां ॥ अवघीयांच्या डोळां आसुवें येती ॥ २ ॥ विठोबाचें हृदय आलेंसे भरून ॥ झांकियेले नयन निवृत्तिराजें ॥ ३ ॥ पुंडलिकें आणिलें विठोबासी बाहेर ॥ केला नमस्कार वैष्णवांनीं ॥ ४ ॥ राही रखुमाई बैसल्या गहिंवरत ॥ आणिक संत महंत वोसंडती ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि शुद्धि नाहीं सकळां ॥ घाला आतां शिळा समाधीसी ॥ ६ ॥

॥ २१८२ ॥ नारा महादा गोंदा विठा झाला विकळ ॥ झांकियेली शीळ समाधीची ॥ १ ॥ गंधर्व आणि देव चिंतावले भारी ॥ दीर्घ ध्वनि करी नारा विठा ॥ २ ॥ गोंदा आणि महादा सांडिती शरीर ॥ विसोबा खेचर फार कष्टी ॥ ३ ॥ लोपलासे भानु पडला अंधार ॥ गेला योगेश्वर निवृत्तिराज ॥ ४ ॥ गेल्या त्या विभूति अनादि अवतार ॥ आतां देवा फार आठवतें ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि धरवेना धीर ॥ येती गहिंवर वोसंडोनी ॥ ६ ॥

॥ २१८३ ॥ परिसा भागवत करितसे शोक ॥ ह्मणती देवा दुःख फार झालें ॥ १ ॥ द्वादशी समाधि दिधली निवृत्तीसी ॥ झाले उदासी अवघेजण ॥ २ ॥ देव ह्मणे उठा करा आतां पूजा ॥ घालूं पुष्पशेजा समाधीसी ॥ ३ ॥ उठले सकळ होताती विकळ ॥ गेले ते गोपाळ समाधीसी ॥ ४ ॥ घेतली समाधि सव्य वैष्णवांनीं ॥ पूजिताती सुमनीं समाधीसी ॥ ५ ॥ नामा ह्मणे अवघे करा प्रदक्षिणा ॥ चला आचमना पुष्कर्णीसी ॥ ६ ॥

॥ २१८४ ॥ पांच दिवस उत्सव केला निवृत्तीसी ॥ काला आमावास्येशीं त्र्यंबकेश्वरीं ॥ १ ॥ प्रतिपदेसी हरि निघाले बाहेरी ॥ कीर्तन गजरीं पुढें होत ॥ २ ॥ कांहीं ऋषीश्वर राहियेले तेथें ॥ गेले ते बहुतेक अलकापुरा ॥ ३ ॥ गरुडावरी सिद्ध झाले नारायण ॥ चाललीं विमानें गंधर्वांचीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा जावें आषाढीसी ॥ आले एकादशी पंढरीये ॥ ५ ॥

॥ २१८५ ॥ जयजयकारें टाळी पिटीती सकळी ॥ चालली मंडळी वैष्णवांची ॥ १ ॥ पंढरीचा पोहा निघाला बाहेरी ॥ कीर्तन गजरीं पुढें होत ॥ २ ॥ विठोबा रखुमाई बैसलीं गरुडावर ॥ केला नमस्कार वैष्णवांनीं ॥ ३ ॥ ह्मणती तीर्थयात्रा झाली यथासांग ॥ पाहिले प्रसंग समाधींचे ॥ ४ ॥ गेले योगीराज अनादि जे आदि ॥ राहिल्या समाधि जगामाजीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा गेले मुनिजन ॥ राहिलें तें ज्ञान जगामाजीं ॥ ६ ॥

॥ २१८६ ॥ गेले दिगंबर ईश्वर विभूती ॥ राहिल्या त्या कीर्ति जगामाजीं ॥ १ ॥ वैराग्याच्या गोष्टी ऐकिल्या त्या कानीं ॥ आतां ऐसें

कोणी होणें नाहीं ॥ २ ॥ सांगतील ज्ञान ह्मणतील खूण ॥ नयेची साधन निवृत्तीचें ॥ ३ ॥ परब्रह्म डोळां दावूं ऐसें ह्मणती ॥ कोणा नये युक्ति ज्ञानोबाची ॥ ४ ॥ करतील अर्थ सांगतील परमार्थ ॥ नयेपां एकांत सोपानाचा ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा सांगूनिया कांहीं ॥ नये मुक्ताबाई गुह्य तुझें ॥ ६ ॥

॥ २१८७ ॥ नानापरि खेद आठविती मना ॥ आतां नारायणा सिद्धि न्यावें ॥ १ ॥ समाधीसी केली आरती पंचारती ॥ राहिली निवृत्ति स्वरूपीं तुझ्या ॥ २ ॥ सुखाचें साधन झालीं चौघेजणें ॥ केली नारायणें बोळवण ॥ ३ ॥ पंचक्रोशावरी उभे ठेले भार ॥ केला नमस्कार समाधीसी ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां जावें पंढरपुरा ॥ समाधींचा सारा विधि झाला ॥ ५ ॥

॥ २१८८ ॥ शेवटची समाधि झाली जैशी तैशी ॥ तुज हृषीकेशी समर्पिली ॥ १ ॥ आपुल्या सत्ताबळें चालविलें हरी ॥ विष्णुदासावरी कृपा केली ॥ २ ॥ नेणो कैसा होईल समाधीचा प्रसंग ॥ बोलिलांत अंगें पांडुरंगा ॥ ३ ॥ मुकियाला वाचा दिधली श्रीरंगें ॥ इच्छिला प्रसंग सिद्धि नेला ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा मायबाप विठ्ठल ॥ ह्मणोनि माझे बोल स्वीकारीले ॥ ५ ॥

॥ २१८९ ॥ काय म्यां बोलावें किती माझी मती ॥ तुह्मी रमापति गोड केलें ॥ १ ॥ विश्वरूप घडी उघडिली धडफुडी ॥ आतां काय थोडी कृपा ह्मणूं ॥ २ ॥ चिन्मय लहरी येती उन्मळुनी ॥ दया नारायणीं थोर केली ॥ ३ ॥ समाधि चरित्र केलें यथामती ॥ रखुमाईचा पति आर्जवीला ॥ ४ ॥ समाधिचरित्र जो करील श्रवण ॥ तयालागीं येणें वैकुंठीचें ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवगुरु धरील चित्तीं ॥ उद्धरील पति रुक्माईचा ॥ ६ ॥

॥ २१९० ॥ समाधि श्रवण करिती निशिदिनीं ॥ त्यांसी चक्रपाणी देईल भेटी ॥ १ ॥ समाधिश्रवणाचा धरील जो विश्वास ॥ नाहीं नाहीं दोष पातकाचा ॥ २ ॥ समाधि विरक्ताचीं पतिताला वाराणशी ॥ कोटि कुळें आणि त्यासी उद्धरील ॥ ३ ॥ जो कोणी बैसेल समाधिश्रवणा ॥ तया प्रदक्षिणा पृथ्वीची हे ॥ ४ ॥ स्वहित साधन सांगितलें येथ ॥ परिसा

भागवत लेखकु झाला ॥ ५ ॥ नामा ह्मणे हरि बोलिलों तुझिया बळें ॥ वाहिलीं तुलसीदळें स्वामीलागीं ॥ ६ ॥

---

## चोखामेळ्याच्या समाधीचे अभंग.

॥ २१९१ ॥ मंगळवेढ्याभोंवतें कुसूं घालावया ॥ माहारासी न्यावया दूत आले ॥ १ ॥ माहारासमागमें चोखामेळा गेला ॥ काम तें लागला करावया ॥ २ ॥ सर्वकाळ वाचें विठ्ठलनाम छंद ॥ आठवी गोविंद वेळोवेळां ॥ ३ ॥ चार महिने याचि रीतीनें लोटिले ॥ कुसूं कडाडिलें अकस्मात ॥ ४ ॥ तयाखालीं महार बहु चूर झाले ॥ चोख्यानें अर्पिले प्राण देवा ॥ ५ ॥ देव ह्मणे नाम्या त्वां जावें तेथें ॥ त्याच्या अस्थि येथें घेउनि याव्या ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवा कैशा ओळखाव्या ॥ विठ्ठलनाम जयामध्यें निघे ॥ ७ ॥

॥ २१९२ ॥ ऐकोनिया कानीं अंचळीं भराव्या ॥ आणोनिया द्याव्या आह्मापाशीं ॥ १ ॥ शालिवाहान शके बाराशें साठ ॥ प्रमाथी नाम स्पष्ट संवत्सर ॥ २ ॥ वैशाख वद्य पंचमी सुदीन ॥ गुरुवारीं प्रयाण करी चोखा ॥ ३ ॥ चोखा माझा जीव चोखा माझा भाव ॥ कुळ धर्म देव चोखा माझा ॥ ४ ॥ काय त्याची भक्ति काय त्याची शक्ति ॥ मीही आलों व्यक्ति तयासाठीं ॥ ५ ॥ माझ्या चोखियाचे करिती जे ध्यान ॥ तया कधीं विघ्न पडों नेदी ॥ ६ ॥ नामदेवें अस्थि आणिल्या पारखोनी ॥ घेत चक्रपाणी पितांबरीं ॥ ७ ॥

॥ २१९३ ॥ देवाचे अंचळीं उठिला गजर ॥ विठ्ठलनामें अंबर गर्जतसे ॥ १ ॥ संत समुदाय पताकांचे भार ॥ लोटले गजर ऐकावया ॥ २ ॥ वद्य त्रयोदशी वैशाख शुक्रवार ॥ नामाचा गजर महाद्वारीं ॥ ३ ॥ ऐसीं आनंदानें नामाच्या गजरीं ॥ दिली महाद्वारीं समाधि त्या ॥ ४ ॥ अस्थि निक्षेपण आपुलीया हातें ॥ करूनि अनंतें पाषाण ठेवी ॥ ५ ॥ राही रखुमाई कुर्वंडी करिती ॥ सत्यभामा आरति ओंवाळीत ॥ ६ ॥ नामा ह्मणे धन्य विठोबाची कृपा ॥ जाईन माझ्या बापा ओंवाळून ॥ ७ ॥

---

## पुंडलिकाचें देवाबरोबर संभाषण.

॥ २१९४ ॥ पुंडलीकालागुनी ह्मणे पांडुरंग ॥ सखा जीवलग तूंची माझा ॥ १ ॥ न पाहासी वास बोलसी उदास ॥ सांडोनीयां आस सर्वस्वाची ॥ २ ॥ वैकुंठ सोडोनी आलों तुजपाशीं ॥ कांगा न बोलसी भक्तराया ॥ ३ ॥ पितृभजनाचा झालासी अधिकारी ॥ केलीवा पायरी वैकुंठासी ॥ ४ ॥ मागे बापा कांहीं आवडे तें घेई ॥ मज वाटतें हृदयीं घालावाची ॥ ५ ॥ नामा ह्मणे देवा स्वामि मुगुटमणी ॥ उभा कर ठेवुनी कटीवरी ॥ ६ ॥

॥ २१९५ ॥ ह्मणे पुंडलीक देवा शिरोमणी ॥ परिसावी विनवणी एक माझी ॥ १ ॥ संसारबंधन तोडीरे दारुण ॥ हें एक मागणें तुजपाशीं ॥ २ ॥ ऋद्धि सिद्धि मोक्ष संपत्ति विलास ॥ सांडीयेली आस त्यांची जीवें ॥ ३ ॥ पंच महापातकी विश्वासघातकी ॥ त्यांसीं यमादिकीं गांजीयलें ॥ ४ ॥ ऐसीया पतीता करीरे सनाथ ॥ पुरवी माझें आर्त पंढरिराया ॥ ५ ॥ हेंचि माझें काज अंतरींचें गुज ॥ उद्धरी सहज महादोषी ॥ ६ ॥ नामा ह्मणे वर दिला नारायणें ॥ विठ्ठलदर्शनें मोक्ष जीवा ॥ ७ ॥

॥ २१९६ ॥ एक वेळ भेटी आलों भक्तराया ॥ स्फुरति माझ्या बाह्या क्षेमालागीं ॥ १ ॥ ऊठ पुंडलीका परतोनीयां पाहे ॥ जीवींचें आर्त काय सांग मज ॥ २ ॥ जीवाचीं पारणीं फेडी डोळ्यांची ॥ वास श्रीमुखाची पाहूं देई ॥ ३ ॥ हेंची आर्त धरोनी आलों असें जीवीं ॥ तें तूं सर्व पुरवी भक्तराया ॥ ४ ॥ नामयाचा स्वामि कृपेचा कोंवळा ॥ ह्मणउनी उतावळा भक्तालागीं ॥ ५ ॥

॥ २१९७ ॥ तंव पुंडलीक पुढारला ॥ कर जोडोनीयां वदला ॥ ह्मणे वेदादिकां अबोला ॥ तुझीया स्वरूपाचा ॥ १ ॥ तो तूं प्रगट श्रीरंगा ॥ येउनी आमुच्या लोभा ॥ स्थिर राहुनि चंद्रभागा ॥ भक्तजनां तारीसी ॥ २ ॥ नेणो कोण भक्तपण ॥ नेणो तुमचें महीमान ॥ कोणे जन्मीं साधन ॥ कोण केलें हें नेणवें ॥ ३ ॥ नीरे भीवरे संगमीं ॥ चंद्रभागेचे उगमीं ॥ वेणुनाद परब्रह्मीं ॥ गोपाळ गजरें गर्जती ॥ ४ ॥ तरी स्वामि दीनदयाळा ॥ महाविष्णु गा गोपाळा ॥

भक्तालागीं कृपाळा ॥ तारावया तयासी ॥ ५ ॥ माझें करोनीयां मीस ॥ वास केला युगें अठ्ठावीस ॥ करूनियां रहीवास ॥ माझे भक्ति लाधलासी ॥ ६ ॥ तूं नीयंता ईश्वरमूर्ती ॥ सकळा गोसांवी श्रीपती ॥ तुजवांचुनी नेणें मती ॥ दयामूर्ती परब्रह्मा ॥ ७ ॥ नामा ह्मणे पुंडलीकें ॥ ऐसें स्तवन केलें निकें ॥ तंव ह्मणीतलें पुण्य श्लोकें ॥ पुरे पुरे करी आतां ॥ ८ ॥

---

## ज्ञानदेव आणि नामदेव संवाद.

### नामदेव.

॥ २१९८ ॥ आला ज्ञानदेव वंदिले चरण ॥ मस्तक ठेवून नमस्कारी ॥ १ ॥ नामा ह्मणे आह्मां वडीलां नमस्कार ॥ जेष्ठ अधिकार आह्मा आहे ॥ २ ॥ आह्मी देवापाशीं असतों सर्वकाळ ॥ येउनी सकळ वंदिताती ॥ ३ ॥ वैष्णवांचे भार देवास शरण ॥ येताती जाण पंढरीसी ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां पाहिली मंडळी ॥ यासाठीं वनमाळी स्फुंदो रडे ॥ ५ ॥

॥ २१९९ ॥ ज्ञानदेव ह्मणे परियेसी नामया ॥ अद्वैत आत्मया प्रेममूर्ती ॥ १ ॥ भावें तुंवा जोडिलें अविनाश ॥ सांगपा सविस्तर मार्गु याचा ॥ २ ॥ कैसा तो साधावा सांग भजनविधी ॥ कैची मनबुद्धि सत्वशीळ ॥ ३ ॥ कैसा निर्विकार ध्यानाचा प्रकार ॥ हा सर्व विचार सांगे मज ॥ ४ ॥ कैसें तें श्रवण कैसें तें मनन ॥ कैसें निकें निजध्यासन एकविध ॥ ५ ॥ कवण ती भक्ति कवण ती मुक्ति ॥ कवण ती विश्रांति दावी मज ॥ ६ ॥ बहुत उत्कंठा तया सुखाकारणें ॥ तें मज पारणें करी आजी ॥ ७ ॥ सांगे हा अनुभव साधन उपाव ॥ विनवी ज्ञानदेव नामयासी ॥ ८ ॥

॥ २२०० ॥ ऐसें ऐकोनियां प्रेमा जाहला पोटीं ॥ ह्मणे बोलें हितगोष्टी अनुभवाची ॥ १ ॥ येर ते अधर्म सर्वही पाल्हाळ ॥ श्रम तो केवळ जाणिवेचा ॥ २ ॥ नव्हे बहुत श्रृत नव्हे ज्ञानशीळ ॥ दास मी दुर्बळ वैष्णवांचा ॥ ३ ॥ जाणणें नेणणें मीं कांहींच नेणणें ॥ ह्मणवोनी तुह्मासीं देवें निरविलें ॥ ४ ॥ घेतला माझा हात दिधला तुमचे करीं ॥ घातलें आभारीं मायबापा ॥ ५ ॥ तयाचेनी कृपा वदें येईल वाचेसरसें ॥ कळेल तैसें कांहीं निवेदावें ॥ ६ ॥ भानूस देखणें करीजे अनुतेजें ॥ तैसें माझें ज्ञान सहज

स्वामीप्रती ॥ ७ ॥ कल्पतरु वृक्ष कृपणाचे द्वारीं ॥ कां दैन्य भाकी घरीं कामधेनू ॥ ८ ॥ तैसा तुमचियाचा मज दीनाप्रती ॥ न कळे काळगति समर्थाची ॥ ९ ॥ नामा ह्मणे माझे बहु लळे पाळिले ॥ कईं देखेन पाउलें विटेवरी ॥ १० ॥

## नामदेवाचीं देवाविषयीं सलगीचीं वचनें.

॥ २२०१ ॥ निर्गुण नामाची अनंत कल्पना ॥ धरुनी नारायणा व्यक्ति येसी ॥ १ ॥ लाज लावियेली त्या निर्गुणपणा ॥ श्रुतीच्या वचना वाखाणीत ॥ २ ॥ तैसे न हो आह्मी करणीचे विलगट ॥ नामाचे निकट दास तुझे ॥ ३ ॥ चतुरा शिरोमणी नंदाचा खिल्लारी ॥ हें अघटीत मुरारी नाम जरी ॥ ४ ॥ तुमचे तुह्मी देवा सांगता तें निकें ॥ समर्थासी रंकें बोलिजे केवीं ॥ ५ ॥ देवा मुगुटमणी हे बोलती पुराणें ॥ आणी बळीचें राखणें द्वार काय ॥ ६ ॥ अर्जुना सारथी रथ वागवीसी ॥ उच्छिष्ट काढिसी धर्मा घरीं ॥ ७ ॥ विश्वंभर नाम तुझें कमळापति ॥ जगीं श्रुति स्मृति वाखाणिती ॥ ८ ॥ गौळियांचे घरीं दहीं लोणी चोरुनी ॥ खातां चक्रपाणि लाजसी ना ॥ ९ ॥ आतां दीनानाथ ब्रिद तुझें साचें ॥ तरी भूषण आमुचें जतन करी ॥ १० ॥ येर ठेवा ठेवी कायसी आह्मा आतां ॥ नामा विनविता केशीराजा ॥ ११ ॥

॥ २२०२ ॥ निरंजनीं वनीं पाषाण पैं व्हावें ॥ परी जन्मा न यावें मग त्याच्या ॥ १ ॥ राजाचें लेंकरूं पांघरे वाकळ ॥ तेव्हां ते सकळ लाज कोणा ॥ २ ॥ पोसवेना तरी दवडुनी देईं देवा ॥ नामा तुज केशवा विनवीतसे ॥ ३ ॥

॥ २२०३ ॥ नक्र बोले ऐके हृषीकेशी ॥ नाममात्रें तारिलें गजेंद्रासी ॥ काय कृपें झालें मजविशीं ॥ आतां कैसा बा मोकलोनी जासी ॥ १ ॥ कळलें तुझें देवपण आतां ॥ सोडी ब्रीद आपुलें दीनानाथा ॥ धृ० ॥ दीनानाथ ह्मणविसी कशासाठीं ॥ द्वैतभाव त्वां धरियेला पोटीं ॥ कैसें पाप लाविलें माझे पाठीं ॥ तुझें रूप देखिलें आजी दृष्टी ॥ २ ॥ दीनानाथ

बोलती वेद चारी ॥ साधुसंत गाताती नानापरी ॥ सत्य ब्रीद मिरवत चराचरीं ॥ सोडी ब्रीद आपुलें झडकरी ॥ ३ ॥ रज मात्रें तारिली अहिल्या शीळा ॥ नामें करुनी उद्धरिला अजामेळा ॥ पापी कैसा मी घननिळा ॥ तुझें रूप देखिलें म्यां आजि डोळां ॥ ४ ॥ न्याय ब्रीद घेईन तुझें आतां ॥ पापी कैसा मी सांग दीनानाथा ॥ कैसें पाप मारिलें माझ्या माथां ॥ अझुनी लाज कां नये तुझ्या चित्ता ॥ ५ ॥ नक्र बोले देवासी हांसू आलें ॥ निंदा नोहे स्तवन माझें केलें ॥ दीनानाथें तात्काळ उद्धरिलें ॥ विष्णुदास नामा कौतुक बोले ॥ ६ ॥

॥ २२०४ ॥ देवा तूं प्रथम कर्म भोगिसी ॥ सागरीं जळचर मत्स्य झालासी ॥ कमठे पाठी नसंडी कैसी ॥ कर्मे कासाविसी केलें तुज ॥ १ ॥ अपवित्र नाम आधीं वराह ॥ याहुनी थोर कूर्म कांसव ॥ अर्ध सावज अर्ध मानव ॥ हें भवभाव कर्माचे ॥ २ ॥ खुजेपणें बळीसी पाताळीं घातलें ॥ तेणें कर्मे तयाचें द्वार रक्षिलें ॥ पितयाचे वचना मातेसी वधिलें ॥ तें कर्म जडलें परशुरामा ॥ ३ ॥ श्रीरामा झाल्या आपदा बहुता ॥ कर्म भोगविलें अंतरली सीता ॥ भालुका तीर्थीं वधिलें अवचिता ॥ नाम अच्युता तुज जाहलें ॥ ४ ॥ ऐसा कष्टी होउनी बौद्ध राहिलासी ॥ तूं कलंकी या लोकां कां मारिसी ॥ आपुल्या दोषांसाठीं आणिका दंडिसी ॥ निष्कलंक होसी नारायणा ॥ ५ ॥ ऐसा तूं बहुतां दोषी बांधलासी ॥ पुढीलाची जन्में अवगतोसी ॥ विष्णुदास नामा ह्मणे हृषीकेशी ॥ तुझी भीड कायसी स्वामियाहो ॥ ६ ॥

॥ २२०५ ॥ पंढरीनिवासा सख्या पांडुरंगा ॥ करी अंगसंगा भक्ताचिया ॥ १ ॥ भक्त कैवारिया होसी नारायणा ॥ बोलतां वचन काय लाज ॥ २ ॥ मागें बहुतांचें फेडियलें ऋण ॥ आह्मांसाठीं कोण आली धाड ॥ ३ ॥ वारंवार तुज लाज नाहीं देवा ॥ बोलरे केशवा ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ २२०६ ॥ तुझा दास मी तों राहिलों होवोनी ॥ बोल चक्रपाणी पुरे आतां ॥ १ ॥ जावो प्राण आतां न सोडीं मी संग ॥ नव्हेची वाऊगे बोल माझे ॥ २ ॥ श्रुति स्मृति वेद काव्यें हीं पुराणें ॥ तें तुज भूषणें सुखें मानूं ॥ ३ ॥ काय हानि झाली सांगा मजपाशीं ॥ उद्धरा जगासी नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ २२०७ ॥ माझिया पितयाची होईल निद्राभंग ॥ न घडे प्रसंग बोलायाचा ॥ १ ॥ क्षण एक मौन धरूनियां रहा ॥ शरणांगत पहा कृपादृष्टी ॥ २ ॥ करूनी निर्धार आलेती जेणें भावें ॥ जतन करावें वचन देवा ॥ ३ ॥ नच जावें देवा माझे गांवेहूनी ॥ मागतों प्रार्थुनी हेंचि तुह्मां ॥ ४ ॥ माझें सुख पहावें मागेन तें द्यावें ॥ माझे गांवीं व्हावें अधिपती ॥ ५ ॥ नामयाचा स्वामी भक्तीसी भुलला ॥ पुंडलीकें राहवविला पंढरीये ॥ ६ ॥

॥ २२०८ ॥ प्रपंचाविषयीं नव्हतों आह्मीं दीन ॥ दीनानाथ कोण ह्मणे तुज ॥ १ ॥ सुष्ट दुष्ट तरी माझें आचरण ॥ तें तुज भूषण झालें देवा ॥ २ ॥ पतीतपावन कैसेंनी जोडतें ॥ जरी तें नव्हतें कर्म आड ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसा आहेसी गा देवा ॥ विचारिसी केशवा मायबापा ॥ ४ ॥

---

## देवांनीं नामदेवास गुरु करण्याची आज्ञा केली.*

॥ २२०९ ॥ श्रीविठ्ठलें आपल्या मुखवचनें ॥ नामदेवासी करी आज्ञापन ॥ होवोनी दीनाचे अति दीन ॥ सद्गुरूसी शरण रिघावें ॥ १ ॥ जोडल्या सद्गुरु कृपालेश ॥ मग सर्वत्र माझाची प्रकाश ॥ तुज मज भेदाचा भास ॥ तो निरसोन जाईल ॥ २ ॥ नामा ह्मणे तुजशीं ॥ पावावया सेविजे सद्गुरूसी ॥ तो तूं रोकडा जोडलासी ॥ आतां सद्गुरूसी काय काम ॥ ३ ॥ फळ तरूवर शिखरीं ॥ ह्मणोनी आरोहण कीजे त्यावरी ॥ तें फळ अवचिता जोडलें करीं ॥ मग तयावरी कासया चढावें ॥ ४ ॥ मग श्रीहरि ह्मणे अज्ञान ॥ सांडून सेविजे सद्गुरु चरण ॥ तुझ्या प्रेमें माया सोंग धरून ॥ लटिका तुजपाशीं मी खेळें ॥ ५ ॥ जंव सद्गुरूचें नाहीं सेवन ॥ तंव मी जैसें स्वप्नीचें धन ॥ माझें न तुटे भवबंधन ॥ सद्गुरु आज्ञेवांचुनी ॥ ६ ॥ तेणें नामा सद्गदीत झाला ॥ विठोबाच्या चरणीं लागला ॥ कोण गुरु पाहिजे केला ॥ तें सांगिजे स्वामिया ॥ ७ ॥ मग श्रीविठ्ठल ह्मणे ऐक आतां ॥ सांगेन सद्गुरूची गुण वार्ता ॥ त्यां पाहोनी तत्वता ॥ शरण तात्काळ रिघावें ॥ ८ ॥ भक्तीचें नेणें लक्षण ॥ कृपामंद दयाहीन ॥ इतराचे अवगुण ॥ अखंड मुखीं जल्पती ॥ ९ ॥ मी एक जाणतां सर्वा-

---

* ह्या प्रकरणापैकीं अभंग मागें पृष्ठ ४८ वर छापले गेले आहेत.

ठायीं ॥ सर्व शिकविलें त्यांचि पाही ॥ ऐसें बोलती जन प्रवाहीं ॥ महंती लागीं ॥ १० ॥ देखिलिया सज्जन ॥ त्यासी न करी सन्मान ॥ सभा देखोनियां छळण ॥ करी करवी तयाचें ॥ ११ ॥ लांडें लटिकें गद्य पद्य ॥ पुसोनी होती श्लाघ्य ॥ नेणे तरी हांसोनी निंद्य ॥ बोलती ह्या गुरूसी ॥ १२ ॥ तो जरी सांगे खरें ॥ त्यासी बोलती बरें बरें ॥ सभाजनासी नेत्रद्वारें ॥ अशुद्धता दाविती ॥ १३ ॥ आपण न सांगती आपुलें गुज ॥ पुढल्यासी ह्मणती नकळे तुज ॥ ऐसें संदेह करणीचें भोज ॥ वाटे तया ॥ १४ ॥ शिष्य करितां उल्हासती ॥ शिष्य होई ह्मणोनी उपदेशिती ॥ नानापरी बोधिती ॥ सेवेलागीं ॥ १५ ॥ शिष्य करिती बहुवस ॥ त्यांच्या सेवेची करिती आस ॥ जो न भजे त्यास ॥ शिष्या शाप देताती ॥ १६ ॥ तंत्र मंत्र उपदेशिती ॥ ध्यान आसनीं गोंविती ॥ देवा ब्राह्मणा न भजती ॥ आचारभ्रष्ट जो ॥ १७ ॥ धातु विद्येची धरिती गोडी ॥ जारणमारणाची अति आवडी ॥ विषय वासनेची हुंडी ॥ अखंड जीवीं ॥ १८ ॥ ज्ञान गर्वाचा महिमा बरवा ॥ श्रीगुरु ऐसा अखंड भावा ॥ शिष्य समुदाय देखोनी गर्वा ॥ थोरीवेचा मानिती ॥ १९ ॥ असो बहु ऐसें कथन ॥ परी सद्गुरु कृपाघन ॥ त्याचें ऐक महिमान ॥ सावध चित्तें ॥ २० ॥ ज्यासी गुरुत्वाचें नाहीं काज ॥ शिष्य भजतां वाटे लाज ॥ उदास वृत्ति सहज ॥ निर्मळ भोळा ॥ २१ ॥ निंदा स्तुति समान ॥ बोलती भेदिती कठीण वचन ॥ कधीं न होती क्रोधायमान ॥ कवणाही वरी ॥ २२ ॥ जे नेणती खरें खोटें ॥ समान वाटे सान मोठें ॥ सुखदुःखाचे चपेटे ॥ न शिवती कदा काळीं ॥ २३ ॥ शिष्य करितां आळस चित्तीं ॥ केलिया सर्वस्व निरोपिती ॥ कांहीं थोराव नाहींच चित्तीं ॥ महत्वाचा ॥ २४ ॥ सज्जन देखोनी आनंदती ॥ त्याचे गुणागुण न विचारिती ॥ जीवें भावें इच्छिती ॥ साधु संग ॥ २५ ॥ आपुला कष्टवुनी देहो ॥ ज्ञान तर्काचा कलहो ॥ साधु सेवेचा मनीं लाहो ॥ करी सदा ॥ २६ ॥ जें आंत बाहेरी भरोनी उरलें ॥ अंतरीं निवोनी विरालें ॥ परब्रह्मीं सहजावलें ॥ नेणों काय ॥ २७ ॥ ऐसें साधूचें महिमान ॥ सांगतां कैचें उरेल मन ॥ कल्पा अवधीं करितां कथन ॥ नव्हे पूर्णपूर्णता ॥ २८ ॥ ऐसा साधु भेटेल तुज ॥ तरी मीच होवोनी पावसी मज ॥ जाईल सर्व संदेह आज ॥ आपेआप नाम्या ॥ २९ ॥ मग नामदेव ह्मणे देवा ॥ ऐसा साधु भेटेल जेव्हां ॥ तरी कैसा परी सेवावा ॥ कृपानिधि तो ॥ ३० ॥ मग बोलिले

श्रीरंग ॥ दैवत बुद्धीचा होईल त्याग ॥ तन मन धन अर्पोन चांग ॥ शुद्ध सेवा करावी ॥ ३१ ॥ तर्क वितर्क बाह्य मुद्रा ॥ तेथें न चले गा भक्तनरेंद्रा ॥ तारी तारी या भवसमुद्रा ॥ ह्मणोनी शरण रिघावें ॥ ३२ ॥ ते अंतर्बाह्य व्यापक ॥ जाणती सर्व लीला कवतुक ॥ जैसे ज्यासी देखती देख ॥ तैसे तयासी आज्ञापिती ॥ ३३ ॥ भाग्यें जरी जोडती त्याचे चरण ॥ तरी वर्तणूक आहे कठीण ॥ ते तुज सांगतों गुप्त खूण ॥ सावधान ऐकपा ॥ ३४ ॥ शरीर वेंचिलें तरी वेंचिजे ॥ परी सद्गुरु वचन नुल्लंघिजे ॥ रात्रंदिवस राहिजे ॥ आज्ञा संकेतीं ॥ ३५ ॥ ज्यावरी गुरूची प्रीती ॥ त्याची अनन्य भावें कीजे भक्ती ॥ आज्ञे वांचोनी कल्पांतीं ॥ विरोध कोणासी न करावा ॥ ३६ ॥ कां जरी तो सर्वांतरीं आहे ॥ विरोध कोणाचा न साहे ॥ विशेष सद्गुरु जरी होये ॥ तरी खेद न कीजे ॥ ३७ ॥ अरे विरोधभाव असतां ॥ तें चढे सद्गुरूच्या माथा ॥ जैसा घट भंग होतां ॥ अमृत सांडे ॥ ३८ ॥ ज्यासी सद्गुरूची कृपा असे ॥ त्यासी मानावें आह्मां ऐसें ॥ सर्वस्व जातां मानस ॥ न करीजे अंतर ॥ ३९ ॥ देखे त्याचे हृदयांतरीं ॥ सद्गुरु वसे निरंतरीं ॥ त्यासी खेद होतां भारी ॥ अंतरे सद्गुरू ॥ ४० ॥ क्रोध हृदयीं भरला ॥ तो आत्मस्थितीसी अंतरला ॥ तोची गुरूचा घात केला ॥ शिष्याहातीं ॥ ४१ ॥ गुरुशिष्य तोची निजबंधु ॥ त्यासी स्वप्नीं न कीजे विरोधु ॥ करितां घडे गुरुवधु ॥ शास्त्रवाक्य ॥ ४२ ॥ तरी गा कार्याकारणें ॥ बोलिजे तेंची घडावें वर्तणें ॥ एक होतां कोपायमान ॥ एक समाधान त्यास द्यावें ॥ ४३ ॥ जो आपुल्या गुरूची स्तुति करी ॥ त्याचे चरण वंदावे शिरीं ॥ निंदा बोलती ये अवसरीं ॥ निघीजे तेथोनी ॥ ४४ ॥ गुरुसमीप न बैसिजे ॥ गुरूसी वचन न बोलिजे ॥ आज्ञा मागोनी वंदिजे ॥ कार्याकारणें ॥ ४५ ॥ जे देशीं आहे सद्गुरू ॥ तिकडे कीजे नमस्कारू ॥ चंद्राकारणें चकोरू ॥ तैसा भेटी इच्छिजे ॥ ४६ ॥ गुरूसी अर्पिजे तन मन ॥ गुरूसी अर्पिजे वित्त धन ॥ गुरूसी अर्पिजे चैतन्य ॥ आनंदरूप ॥ ४७ ॥ गुरूचे दोष गुण ॥ मनें न कीजे उच्चारण ॥ जें जें गुरूचें आज्ञापन ॥ मेरू ऐसें मानिजे ॥ ४८ ॥ सज्जनाची संगति धरिजे ॥ गुरुरूप विश्व मानिजे ॥ चित्तानुसार अर्पिजे ॥ साधुजनासी ॥ ४९ ॥ ज्यासी सद्गुरू कोपला ॥ तो साधु असतां खर वागला ॥ ईश्वर जरी साह्य झाला ॥ तरी काढों न शके ॥ ५० ॥ सद्गुरू आधीन सकळ देव ॥ गुरु आधीन पितर मानव ॥ सद्गुरु पूजितां सर्व ॥ आनंदातें पावती

॥ ५१ ॥ ऐसें सद्गुरूचें महिमान ॥ ह्मणोनी ब्रह्म त्या आधीन ॥ तो जरी पतितासी देईल मान ॥ तरी ब्रह्म पूर्ण तो होय ॥ ५२ ॥ ऐसें जेणें आचरावें ॥ तरी सद्गुरूसी शरण जावें ॥ नाहीं तरी करावें ॥ नामस्मरण माझें पैं ॥ ५३ ॥ तेणेंकरून कांहीं एक ॥ निवारू शकेल जन्मदुःख ॥ कोणें एक जन्मीं सद्गुरु देख ॥ भक्ति करोनी पाविजे ॥ ५४ ॥ चढो वोढी गुरु करिती ॥ मग सुबुद्धिही टाकिती ॥ त्यासी यमाघरीं प्राप्ति ॥ रवरवाची ॥ ५५ ॥ सद्गुरुसेवा तें मोक्षपद ॥ सद्गुरुसेवा तें आनंदपद ॥ सद्गुरुसेवा तो ब्रह्माव बोध ॥ कैवल्य प्राप्ति ॥ ५६ ॥ असो ऐसिया परी ॥ जो सद्गुरु वाक्य वाहे शिरीं ॥ तोची ब्रह्मविद्येचा अधिकारी ॥ हरिहरा वंद्य तो ॥ ५७ ॥ ऐसें नामदेवाप्रती श्रीहरी ॥ स्नेह साक्षपें निरूपण करी ॥ ऐकोनियां चरणावरी ॥ सद्गदीत होउनी लोटला ॥ ५८ ॥ देवा तूं होवोनी माझी दिवटी ॥ गुरु विधान दाखवी दृष्टी ॥ जेणें करूनी भवबंध गांठी ॥ सुटेल सर्वथा ॥ ५९ ॥ मग कळवळोनी श्रीहरी ॥ नामदेवातें पोटासीं धरी ॥ जाय पावशील झडकरी ॥ हस्त विसा खेचराचा ॥ ६० ॥ तेणें नाम्यासी समाधान ॥ देवही झाला सुखसंपन्न ॥ नामा पावोनी ब्रह्मज्ञान ॥ मिळशील माझ्या स्वरूपीं ॥ ६१ ॥ ऐसें हें देवभक्त निरूपण ॥ प्रथम शिष्यासी करी श्रवण ॥ मग दीजे पूर्णपण ॥ ह्मणे नामा ॥ ६२ ॥

---

## परिसाभागवत व नामदेव यांचा संवाद.

॥ २२१० ॥ परिसा ह्मणे नामयासी ॥ अरे नामदेवा परियेसी ॥ तूं तंव दवडिल्या न जासी ॥ मनीं न लाजसी अझुनी ॥ १ ॥ परिसा वदे नामयासी ॥ तुझे पूर्वज माझे चरणापाशीं ॥ जरी तूं हरिदास झालासी ॥ तरी याती हीनची ॥ २ ॥ तुवां कोठवरी काय देखिलें ॥ नाहीं वेदशास्त्र ह्मणीतलें ॥ एक तुजची जाणीतलें ॥ इतुकें झालें सांगावया ॥ ३ ॥ आणिक सांगेन एक ॥ तूं तर ठायींचाची वासनीक ॥ मातें लाविसी सौन टिलक ॥ तेथें पाईक काय करी ॥ ४ ॥ तयासी त्वां कौटाल्य केलें ॥ सहस्र वैष्णवांमाजीं भुरळें ठेले ॥ तंव ते उमगों लागले ॥ मग भुलले आपोआप ॥ ५ ॥ ऐसा तूं कवटाळिया पाहीं ॥ तुझे पूर्वज माझे पायीं ॥ मन शंका धरिसी

कांहीं ॥ अझुनी तरी विचारी पां ॥ ६ ॥ तुजसी करितां वादक ॥ तरी हे शंकतील लोक ॥ तूं तंव माझाची सेवक ॥ विष्णुदासा ह्मणे परिसा ॥ ७ ॥

॥ २२११ ॥ यावरी नामदेव काय बोलिला ॥ आजि मनीं संतोष फार झाला ॥ शब्द पूर्वजांचा ऐकिला ॥ आनंदें भरला सागर ॥ १ ॥ परसोबास ह्मणे नामा ॥ चरणतीर्थ द्यावें आह्मां ॥ तुमचे चरणींचा महिमा ॥ माझ्या पूर्वजा आतुडली ॥ २ ॥ इतुके दिवस गिवसितां पाही ॥ परी हे व्यवस्था न पडे ठायीं ॥ पूर्वज आहेत तुझे पायीं ॥ तें म्यां आजि जाणितलें ॥ ३ ॥ तयासी आपुले चरणीं राहविलें ॥ म्यां काय पूर्वीं कर्म केलें ॥ त्वां मज वेगळें धरियलें ॥ थीतें अंतरलें चरण तीर्थ ॥ ४ ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र समस्त ॥ हे तंव तुमच्या पायां पडत ॥ तया दंडवत घडत ॥ दोष जाती तयांचे ॥ ५ ॥ ऐसें ठायींचेच जाणतों ॥ तरी कासया हिंडतों ॥ चरण धरूनीच राहतों ॥ विष्णुदास ह्मणे नामा ॥ ६ ॥

---

## परिसाचें स्त्रीशीं संभाषण.

---

॥ २२१२ ॥ परिसा सांगे स्त्रियेपाशीं ॥ अवो अपूर्व वर्तलें पंढरीसी ॥ मज आणि नामयासी ॥ झाला विवाद परस्परें ॥ १ ॥ परिसा सांगे आपुली महिमा ॥ आजि फजीत केला नामा ॥ पुढती शरण आला आह्मां ॥ सकळ जना देखतां ॥ २ ॥ आह्मी तयासी निर्भत्सिलें ॥ परी ते आमच्या पायीं लागले ॥ काकुळती शरण आले ॥ मग सोडिलें तयातें ॥ ३ ॥ आह्मी साक्षात् विष्णुदास ॥ त्यानें ह्मणवावें विप्रदास ॥ ऐसें असावें प्रत्यक्ष ॥ विष्णुदास कां ह्मणवी ॥ ४ ॥ तूं ह्मणसी एक नामा ॥ येर वाउगीच उपमा ॥ त्यापाशीं असतां परमात्मा ॥ तरी कां आह्मा शरण येता ॥ ५ ॥ खालील पायरी तयाची जाण ॥ वरी आह्मासी महिमान ॥ आमुच्या हृदयीं परमात्मा आपण ॥ सदा जागृत वसतसे ॥ ६ ॥ धन्य धन्य माझें कुळगोत्र ॥ नाम पावलों भागवत ॥ केलिया पुण्या नाहीं मीत ॥ आणि वेदांत मी जाणें ॥ ७ ॥ यातिहीन आणि विष्णुदास ह्मणविती ॥ तेणें ते नर भय पावती ॥ तयासी न चुके पुनरावृत्ति ॥ विष्णुदास ह्मणे परिसा ॥ ८ ॥

( गर्वमोचन. )

॥ २२१३ ॥ यावरी काय बोलिली पतिव्रता ॥ विनंति करितें कोपूं नका ॥ तुह्मासी गर्व जरी नसता ॥ तरी घरीं भेटता परमात्मा ॥ १ ॥ तुह्मी ब्राह्मण पवित्र धन्य ॥ मुखीं वेद हरीचें नाम ॥ वरी गर्व अवलक्षण ॥ सकळही धर्म लोपले ॥ २ ॥ अमृत घातलें पाषाणावरी ॥ वरी वरी ओला कोरडा भीतरीं ॥ तैसा घात तुमच्या शरीरीं ॥ गर्वें हरि न भेटेची ॥ ३ ॥ गाय ते सर्वांठायीं पवित्र ॥ परि तिची वासना अपवित्र ॥ तैसें तुमचें धन्य कुळगोत्र ॥ गर्व अपवित्र सांडाजी ॥ ४ ॥ तुह्मासी चाड जरी हरीसी ॥ तरी मत्सरू करूं नका नामदेवासी ॥ तो आलिया घरासी ॥ हरि तुह्मासी भेटेल ॥ ५ ॥ आतां आदर करोनी आणाल नामा ॥ तयासवें येईल परमात्मा ॥ भेट होईल तुह्मा आह्मा ॥ त्या नामयाचेनी प्रसादें ॥ ६ ॥ आणखी एक अवधारी ॥ राउळा येत होते हरी ॥ नामा होता बरोबरी ॥ अचळ सरसावी रखुमाई ॥ ७ ॥ आणखी एक वृत्तांत ऐकिला ॥ कीर्तनासी नामदेव आला ॥ द्वारकेचा भोपा पोळला ॥ तो बुझाविला येथोनी ॥ ८ ॥ आणिक महादेवद्वारीं कीर्तन मांडिलें ॥ हें आंवढ्यासी वर्तलें ॥ देऊळ तयाकडे फिरलें ॥ भलें नवल नामयाचें ॥ ९ ॥ ऐसें बोलली कमळजा ॥ तुह्मी स्वामी मी तुमची भाजा ॥ गर्व सांडाजी वोजा ॥ तरी पंढरिराज भेटेल ॥ १० ॥

---

## परिसाभागवतानें केलेली नामदेवाची स्तुति.

॥ २२१४ ॥ कीर्तनाच्या वेळे अति सप्रेमेसी ॥ प्रत्यक्ष हृषीकेशी अवतरले ॥ १ ॥ धन्य तुझें जीणें धन्य मातापिता ॥ धन्य ते सरिता सागरेसी ॥ २ ॥ तुह्मी जातीचे ब्राह्मण मी आहे शिंपी ॥ मज काय देतोसी उपमा येवढी ॥ ३ ॥ चरणींचा रज सेवकही संताचा ॥ विशेषही तुमचा आज्ञाधार ॥ ४ ॥ नाठविसी लटिकें देसी थोरपण ॥ तुह्मी अहां ब्राह्मण आह्मी शिंपी ॥ ५ ॥ शास्त्रें पुराणें असती तुमचीये घरीं ॥ होती निरंतरीं अध्यायनें ॥ ६ ॥ पढतमूर्ख आह्मां नकळेची भेद ॥ मज तो गोविंद वश्य कैचा ॥ ७ ॥

मी तुमचा सेवकू अंगलग पाईकू ॥ मज आहे उपदेशू तुमचाच कीं ॥ ८ ॥ धोतरें प्रक्षाळणें लाविणें पत्रावळी ॥ तुमची उष्टावळी प्रसाद मज ॥ ९ ॥ थोरत्वातें मानोनी थोरपणें गेलों ॥ जीवनें सांडिलों मच्छ जैसा ॥ १० ॥ करी तळमळ मज आतां सांभाळी ॥ भेटी करी विठ्ठलीं नाम्या मज ॥ ११ ॥ रखुमाईचा वर आहे तुह्मापाशीं ॥ जाईजे तियेसी पुसावया ॥ १२ ॥ जें सांगेल तूतें दावील केशवातें ॥ भक्तवत्सल जेथें तेथें असे ॥ १३ ॥ रखुमाईनें मज सांगितली मात ॥ तुझीया खांद्या हात श्रीहरिचा ॥ १४ ॥ तो दाखवील तूतें सांगेल केशवातें ॥ माझी आण सातें घालोनियां ॥ १५ ॥ पूर्वीं प्रसन्न मज नागनाथीं झाला ॥ मस्तकीं ठेविला हात तेणें ॥ १६ ॥ तेंची रूप पाही धरोनियां राही ॥ शंका न धरी कांहीं आण माझी ॥ १७ ॥ मागें एक नाम बोलिलों उत्तर ॥ तेणें तुझें जिव्हार दुखविलें ॥ १८ ॥ पूर्वज पायातळीं बोलिलों ब्रीदावळी ॥ एकाएकी आकळी बुद्धि ठेली ॥ १९ ॥ रामचरणीं शिळा उद्धरिली पहातां ॥ ते नेली तत्काळतां परलोकासी ॥ २० ॥ तैसा मी पाषाण नुद्धरशील जाण ॥ खंती करसी तरी आण विठोबाची ॥ २१ ॥ भुजंग चाली तो नाम्यानें दाविला ॥ तंव येरू गेला धरावया ॥ २२ ॥ परिसा पळे कैसा लागला पाठीं ॥ परतोनी पाहे दृष्टीं तो अदृश्य झाला ॥ २३ ॥ ज्ञानी ज्ञानदेव ध्यानीं नामदेव ॥ भक्ति चांगदेव पुढारले ॥ २४ ॥ या तिन्ही मूर्ती एकची पैं असती ॥ यांची कांहीं भ्रांति न धरावी ॥ २५ ॥ परिसा ह्मणे जैसी सरिता सागरीं ॥ तैसे ते श्रीहरि मिळोनी गेले ॥ २६ ॥

॥ २२१५ ॥ मातें डावा डोळा उजवा हे सारिखे ॥ एक समतुके पाहे दोन्ही ॥ १ ॥ नांवें वेगळालीं इतकेंची जाण ॥ परी काय केलें येणें सांग मातें ॥ २ ॥ नाहीं जाणत न घडे तूं कैसी माउली ॥ ह्मणवोनी देह घाली चरणावरी ॥ ३ ॥ वांयाविण शीण धरिसीरे कासया ॥ ऐक रे परसया सांगेन तुज ॥ ४ ॥ नाम्याच्या खांद्यावरी ठेवोनियां हात ॥ आपण पंढरिनाथ येत होते ॥ ५ ॥ नाम्यासाहे ते भ्रांति पडली चित्तीं ॥ ह्मणवोनी एकांतीं राउळीं पुशिलें ॥ ६ ॥ देव गुह्य बोलिले मी तें चित्तीं ठेविलें ॥ दुजें वरीयलें भक्तीलागीं ॥ ७ ॥ सापासूनी नाम्याची शंका येतसे आह्मां ॥ अखंड परमात्मा जया जवळी ॥ ८ ॥ नाम्यासी देखोनी लोटांगणीं जावें ॥ दुजें न धरावें आन चित्तीं ॥ ९ ॥ इतुकें ऐकोनी परिसा विनविता झाला ॥ काय बोलियेला रुक्माईसी ॥ १० ॥ माते

पांडुरंगीं मज भेट करावी ॥ धरीन मी जीवीं चरण त्याचे ॥ ११ ॥ नेणेची हें वर्म माझी मूढमती ॥ मज करा विश्रांति विठ्ठलचरणीं ॥ १२ ॥ तंव ते आदिमाता सांगे परसोबासीं ॥ दैवें हें आह्मासी दिधलें नाहीं ॥ १३ ॥ भेटवावें तुज आज्ञा नसतां मज ॥ कोपतील सहज देवराव ॥ १४ ॥ तूं नाम्या विनवी निराभिमान होई ॥ तो दाखवील सोई देवाजीची ॥ १५ ॥ मागें होतें तें अवघेंची विसरलों ॥ लोटांगणीं आलों नामयासी ॥ १६ ॥ परिसा ह्मणे नाम्या तुझें बरवें गाणें ॥ जैसें कां नाणें टांकसाळींचें ॥ १७ ॥

॥ २२१६ ॥ परिसा ह्मणे नाम्या मी तुज देखिलें ॥ प्रत्यक्ष विठ्ठलें ऐसें जाण ॥ १ ॥ तूंच तूं विठ्ठल तूंच तूं विठ्ठल ॥ हाची सत्य बोल जाण आह्मा ॥ २ ॥ तुवां पदें केलीं राउळें सांगीतलीं ॥ येरी कवित्व केलीं आपुल्या मतें ॥ ३ ॥ तूं शिंपी नामा आह्मी उत्तम याती ॥ वायां अहंमती पडलों देवा ॥ ४ ॥ आह्मी एक आपुले दृष्टीनें देखीलें ॥ देवभक्त झाले दोन्ही एक रूप ॥ ५ ॥ तुझें नाम जपतां महा पातकें जाती ॥ तेणें होय मुक्ति ह्मणे परिसा ॥ ६ ॥

॥ २२१७ ॥ कवित्वापरीस कवित्व आगळें पैं आहे ॥ परि ते नकळे सोय नामयाची ॥ १ ॥ नाम बरवें नामदेव बरवा ॥ एकत्व बरवा परमात्मा ॥ २ ॥ दुधावरली साय तें मी वाणूं काय ॥ तैसें गाणें गाय नामदेव ॥ ३ ॥ नामा तोची कुडी केशव तोची देव ॥ तेथील अनुभव परिसा ह्मणे ॥ ४ ॥

॥ २२१८ ॥ कविरस वाटोनी क्षीरीस हिंगाची फोडणी ॥ भक्तीवीण आळवणी तैसी केंवी रुचे ॥ १ ॥ तैसें रसाळ अमृत नामयाचें गीत ॥ अनुभवी जाणत तेथींची गोडी ॥ २ ॥ दुधा तुपाची वाटी लावोनियां होटीं ॥ कांजी तयापोटीं केंवी रुचे ॥ ३ ॥ धायवरी जेवीजे तुपेंसी क्षीरीं ॥ सावरी भाकरी नाचण्याची ॥ ४ ॥ तैसें केशवाचें प्रेम नामदेव जाणे ॥ तेथील अनुभव परिसा ह्मणे ॥ ५ ॥

॥ २२१९ ॥ केशव परिसता नामा परिसविता ॥ तयाचिया चित्ता एक आला ॥ १ ॥ कायसी आह्मी केली बापुडी ॥ नामयाची घडी ऐक नये ॥ २ ॥ धिग् धिग् जीवित्व वांया गेलें ॥ नामया फावलें परिसा ह्मणे ॥ ३ ॥

॥२२२०॥ गंगातीरीं तप तुवां काय केलें ॥ योगीया सरीसें फळ लाधलें ॥ १ ॥ नामयारे तुवां कोणें योगें साधिलें ॥ निजरूप ठाकलें परब्रह्म ॥ २ ॥ अधल्या जन्मीं दशमी दिंडी आणि जागरण ॥ तेणें प्रेमें लाधले चरण केशवाचे ॥ ३ ॥ मज पाहतां स्वामीकाजीं वेंचलासी ॥ करवतीं धारातीर्थें नाहलासी ॥ ४ ॥ जती पद देवोनी द्रवपण पावलें ॥ केशवराजें मज कांहीं नाहीं वंचिलें ॥ ५ ॥ नामा आणि केशव एकची जाणावे ॥ परिसा भागवत बोलिला स्वभावें ॥ ६ ॥

॥ २२२१ ॥ तुह्मी गावें तेंची आह्मी अंतरीं ध्यावें ॥ ह्मणोनी स्वभावें भावाभाव नाहीं येथें ॥ १ ॥ आह्मी तुह्मी कांहीं नाहीं बा वेगळे ॥ ऐसा खेळे मेळे दिवस चारी ॥ २ ॥ जाणें तें न चुके अपकीर्ति कायसी ॥ नामा परसोबासी विनवीतसे ॥ ३ ॥

॥ २२२२ ॥ वैष्णवांचा थाट पताकांचे भार ॥ करिती जयजयकार नामघोष ॥ १ ॥ पुष्पांचा वर्षाव विमानांची दाटी ॥ नामघोष सृष्टि न समाये ॥ २ ॥ ऋषिगण गंधर्व इंद्र प्रजापती ॥ धन्य धन्य ह्मणती नामयासी ॥ ३ ॥ देव वेळाईत केलासे बा ऋणें ॥ अनन्य अनन्य भक्ति याची ॥ ४ ॥ अलकापूर ज्ञानिया इंद्रनीळ सोपान ॥ निवृत्तीसी जाणा त्रिंबकेश्वरीं ॥ ५ ॥ नामा महाद्वारीं श्रेष्ठ हे पंढरी ॥ प्रत्यक्ष भूमीवरी वैकुंठ हें ॥ ६ ॥ देवें नामयासी पोटासी धरिलें ॥ नेत्रोदकें क्षाळिलें सर्वांग हें ॥ ७ ॥ जन्मोनी सार्थक तुवां बरवें केलें ॥ वनीं मोकलीलें मजलागीं ॥ ८ ॥ तंव राईरुक्माई सत्यभामादि प्रवृत्ती ॥ नामा आलिंगिती प्रेमें करून ॥ ९ ॥ धन्य दिन सुखाचा वेदघोष विप्रांचा ॥ वैष्णवीं नामाचा घोष केला ॥ १० ॥ तेथें पूजा नमस्कारे परिसा यानें केली ॥ हृदयीं धरिलीं चरणकमळें ॥ ११ ॥

॥ २२२३ ॥ टाळ मांदळीं नाहीं चाड ॥ नाम गोड विठोबाचें ॥ १ ॥ वाहो टाळिया नाचो वागडें ॥ गावो नामें गोड विठोबाचीं ॥ २ ॥ परिसा ह्मणे येर अवघी उपाधी ॥ नाम गातां सिद्धि होईल रोकडी ॥ ३ ॥

॥ २२२४ ॥ पैल मेळारे कवणाचा ॥ नामा येतो केशवाचा ॥ १ ॥ ब्रीद दिसतें अंबरीं ॥ गरुड टके याच्या परी ॥ २ ॥ परसा येतो लोटांगणीं ॥ नामा लागला साचे चरणीं ॥ ३ ॥

॥ २२२५ ॥ कृतायुगीं नामा प्ऱ्हाद पैं झाला ॥ स्तंभीं अवतरला नारायण ॥ त्रेतायुगीं नामा अंगद कपि असे ॥ रामचंद्रें त्यासी आलिंगिला ॥ १ ॥ धन्य तो नामा धन्य तो नामा ॥ पढिये पुरुषोत्तमा जीवाहुनी ॥ २ ॥ द्वापारीं नामा उद्धव गहन ॥ नारायण क्षण न विसंबे ॥ कलियुगीं नामा संत साकार ॥ नकळे तो पार ब्रह्मादिकां ॥ ३ ॥ चहूं युगीं नामा वेगळा नाहीं झाला ॥ ह्मणवुनी पुरला नारायणा ॥ विष्णुदास नामा केशवीं रंगला ॥ देव आत्मा झाला ह्मणे परिसा ॥ ४ ॥

---

## परिसा भागवत.

॥ २२२६ ॥ अणुमाजीं राम रेणुमाजीं राम ॥ तृणकाष्टीं राम वर्ततसे ॥ १ ॥ बाहेरीं भीतरीं राम चराचरीं ॥ विश्वीं विश्वाकारीं वर्ततसे ॥ २ ॥ रामेवीण स्थळ रितेंची पैं नाहीं ॥ वर्ते सर्वांठायीं रामींराम ॥ ३ ॥ परिसा-भागवत कायावाचामनें ॥ श्रीरामावाचून अन्य नेणें ॥ ४ ॥

---




## गोराकुंभार.

॥ २२२७ ॥ वरती करा कर दोन्ही ॥ पताकाचे अनुसंधानीं ॥ १ ॥ सर्व हस्त करिती वरी ॥ गोरा लाजला अंतरीं ॥ २ ॥ नामा ह्मणे गोरोबासी ॥ वरती करावें हस्तांसी ॥ ३ ॥ गोरा थोट वरती करी ॥ हस्त फुटले वरचे वरी ॥ ४ ॥

॥ २२२८ ॥ देवा तुझा मी कुंभार ॥ नासी पापाचे डोंगर ॥ १ ॥ ऐशा संतर्से हो जाती ॥ घडे साधूची संगती ॥ २ ॥ पूर्ण कृपा भगवंताची ॥ कुंभार गोरा मागे हेंची ॥ ३ ॥

॥ २२२९ ॥ श्रवणें नयन जिव्हा शुद्ध करी ॥ हरि नामें सोहंकरी सर्व काम ॥ १ ॥ मग तुझा तूंची दिवटा होसीगा सुभटा ॥ मग जासील वैकुंठा हरिपाठें ॥ २ ॥ रामनामें गणिका तरली अधम ॥ अजामिळ

परम चांडाळ दोषी ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार विठ्ठल मंत्र सोपा ॥ एक वेळा बापा उच्चारीरे ॥ ४ ॥

॥ २२३० ॥ निर्गुणाचा संग धरिला जो आवडी ॥ तेणें केलें देशधडी आपणासी ॥ १ ॥ अनेकत्व नेलें अनेकत्व नेलें ॥ एकलें सांडिलें निरंजनीं ॥ २ ॥ एकत्व पाहतां अवघेंची लटिकें ॥ जें पाहे तितुकें रूप तुझें ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार ऐका नामदेव ॥ तुह्मा आह्मा नांव कैंचे कोण ॥ ४ ॥

॥ २२३१ ॥ अंतरींचें गूज बोलूं ऐसें कांहीं ॥ वर्ण व्यक्त नाहीं शब्द शून्य ॥ १ ॥ जयजय झनकूट जयजय झनकूट ॥ अनुहात जंगट नाद गर्जे ॥ २ ॥ परतल्या श्रुति ह्मणती नेती नेती ॥ त्याहीं नादा अंतीं स्थिर राहे ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार सत्रावीचें नीर ॥ सेवी निरंतर नामदेवा ॥ ४ ॥

॥ २२३२ ॥ एकमेकांमाजीं भाव एकविध ॥ असे एक बोध भेदरहित ॥ १ ॥ तूं मज ओळखी तूं मज ओळखी ॥ मी तुज देखत आत्मवस्तू ॥ २ ॥ आत्मवस्तु देहीं बोलतां लाज वाटे ॥ अखंडता विघडे स्वरूपाची ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार अनुभवाचा ठेवा ॥ प्रत्यक्ष नामदेवा भेटलासी ॥ ४ ॥



॥ २२३३ ॥ सरीतेचा ओघ सागरीं आटला ॥ विदेही भेटला मनामन ॥ १ ॥ कवणाचे सांगातें पुसावया कवणातें ॥ सांगतों ऐक तें तेथें कैचें ॥ २ ॥ नाहीं दिवस राती नाहीं कुळ याती ॥ नाहीं माया भ्रांति अवघेची ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार परियेसी नामदेवा ॥ सांपडला ठेवा विश्रांतीचा ॥ ४ ॥

॥ २२३४ ॥ निर्गुणाचे भेटी आलों सगुणासंगें ॥ तंव झालों प्रसंगीं गुणातीत ॥ १ ॥ मज रूप नाहीं नांव सांगू काई ॥ झाला काई बाई बोलूं नये ॥ २ ॥ बोलतां आपली जिव्हा पैं खादली ॥ खेचरी लागली पाहतां पाहतां ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार नाम्या तुझी भेटी ॥ सुखासुखी मिठी पडली कैसी ॥ ४ ॥

॥ २२३५ ॥ कैसे बोलणें कैसे चालणें ॥ परब्रह्मीं राहणें अरे नामा ॥ १ ॥ जेवी त्याची खूण वाढिताची जाणें ॥ येरा लाजिरवाणें अरे नामा

॥ २ ॥ ह्मणे गोराकुंभार अनुभवित जाणें ॥ आह्मांते राशी राहाणें असे नामा ॥ ३ ॥

॥ २२३६ ॥ मुकीया साखर चाखाया दिधली ॥ बोलतां हे बोली बोलवेना ॥ १ ॥ तो काय शब्द खुंटला अनुवाद ॥ आपुला आनंद आधाराया ॥ २ ॥ आनंदी आनंद गिळुनी राहणें ॥ अखंडित होणें न होतिया ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार जीवन्मुक्त होणें ॥ जग हें करणें शहाणें बापा ॥ ४ ॥

॥ २२३७ ॥ कवण स्तुति करूं कवणिया वाचे ॥ ओघ संकल्पाचे गिळिले चित्तें ॥ १ ॥ मन हें झालें मुकें मन हें झालें मुकें ॥ अनुभवाचें हें सुखें हेलावलें ॥ २ ॥ दृष्टीचें पहाणें परतलें मागुती ॥ राहिली निवांत नेत्रपातीं ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार मौन्य सुख घ्यावें ॥ जीवें ओवाळावें नामयासी ॥ ४ ॥

॥ २२३८ ॥ काया वाचा मन एक विध करी ॥ एक देह धरी नित्य सुख ॥ १ ॥ अनेकत्व सांडी अनेकत्व सांडी ॥ आहे तें ब्रह्मांडीं रूप तुझें ॥ २ ॥ निर्वासना बुद्धि असतां एकपणें ॥ सहज भोगणें ऐक्य राज्य ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार नाहीं रूप रेख ॥ तेंचि तुझें सुख नामदेवा ॥ ४ ॥

॥ २२३९ ॥ स्थूल होतें तें सूक्ष्म पै झालें ॥ मन हें बुडालें महासुखीं ॥ १ ॥ माझें रूप माझे विरालेंसें डोळां ॥ माझें ज्ञान समाविलें माझे बुबुळां ॥ २ ॥ ह्मणे गोराकुंभार नवल झालें नाम्या ॥ भेटी तुह्मां आह्मां उरली नाहीं ॥ ३ ॥

॥ २२४० ॥ केशवाचे भेटी लागलें पिसें ॥ विसरलें कैसें देहभान ॥ १ ॥ झाली झडपणी झाली झडपणी ॥ संचरलें मनीं आधीं रूप ॥ २ ॥ न लिंपेची कर्मीं न लिंपेची धर्मीं ॥ न लिंपे गुणधर्मीं पुण्यपापा ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार सहज जविन्मुक्त ॥ सुखरूप अद्वैत नामदेव ॥ ४ ॥

॥ २२४१ ॥ रोहिदासा शिवराईसाठीं ॥ दिली पुंडलिका भेटी ॥ १ ॥ पुंडलिका झाला अनुताप ॥ धन्य सत्य गुरु माय बाप ॥ २ ॥ जन्मा येऊनिया काय केली करणी ॥ व्यर्थ शिणविली जननी ॥ ३ ॥ नऊ महिने ओझें वागवून ॥ नाहीं गेला तिचा शीण ॥ ४ ॥ ऐसा झालों अपराधी ॥ क्षमा करा कृपानिधी ॥ ५ ॥ ऐसा पुंडलिका भाव ॥ उभा

केला पंढरीराव ॥ ६ ॥ भक्ता पुंडलिकासाठीं ॥ उभा भिवरेच्या तटीं ॥ ७ ॥ कटावरी ठेउनी कट ॥ उभा विटेवरी नीट ॥ ८ ॥ ऐसा भाव धरी ह्मणे गोरा ॥ तीर्थां जा फजीतखोरा ॥ ९ ॥

॥ २२४२ ॥ वंदावें कवणासी निंदावें कवणासी ॥ लिंपावें गगनासी कवण लिंपी ॥ १ ॥ नाहीं जया रूप नाहीं जया ठाव ॥ तेंचि व्यालें सर्व सांगतसे ॥ २ ॥ जीवनीं चंद्रबिंब बिंबलें पै साचे ॥ परि नाहीं तें नितंबिलें जवळें जेवी ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार नामया जीवलगा ॥ आलिंगन देगा मायबापा ॥ ४ ॥

॥ २२४३ ॥ नामा ऐसें नाम तुझिया स्वरूपा ॥ आवरण आरूपा कोण ठेवी ॥ १ ॥ तूं गुह्य चैतन्य नित्य वस्तु जाण ॥ रहित कारण स्वयंप्रकाश ॥ २ ॥ याही शब्दामाजी वाचा न लागे ॥ मार्ग पै न लागे निर्धारिता ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार आत्मया नामदेवा ॥ चिद्रूप अवघा दिससी साच ॥ ४ ॥

---

## रावण मंदोदरी संवाद.

---

### रावणाविषयीं.

॥ २२४४ ॥ मंदोदरी सांगे रावणाप्रती ॥ स्वप्न देखिलें म्यां मध्यरार्ती ॥ नेणो वान्नर मिळाले किती ॥ शीळा सागरू बांधिला ॥ १ ॥ दोघे धनुर्धर वीर वान्नर ॥ उतरोनी आले पैलसागर ॥ एकापरीस एकगावीर ॥ ते बडीवार बोलताती ॥ २ ॥ नेणो त्याचा वळीया आला ॥ लंकेभोंवता वेढा घातला ॥ सभामंडप उडोन नेला ॥ जो केला त्रिकुटेसी ॥ ३ ॥ लंकेभोंवता रुधिराचा पूर ॥ रणीं पडिला कुंभकर्ण वीर ॥ तो तुमचा सखा सहोदर ॥ निद्रा करी सामास ॥ ४ ॥ सत्य तुझी छेदील दश शिरें ॥ येणें रामें रणरंगधीरें ॥ लंका जाळोनी केली जोहरें ॥ अंबरी तुरे गर्जताती ॥ ५ ॥ हें स्वप्न सत्य होईल जाणा ॥ लंका दान बिभीषणा ॥ शरण जाई रघुनंदना ॥ नामयाच्या स्वामीसी ॥ ६ ॥

॥ २२४५ ॥ विनंति करी मंदोदरी ॥ परिसा स्वामी दशकंधरी ॥ १ ॥ वायां आणिली जानकी घरीं ॥ लाज झाली तिहीं लोकीं ॥ २ ॥ मज पाहातां हे विवसी ॥ क्षय आणिला कुळासी ॥ ३ ॥ आभिलाषितां परसती ॥ हे तो नव्हे राजनीती ॥ ४ ॥ कोण आमुचा हितकरू ॥ सांगे निर्मळ विचारू ॥ ५ ॥ नामया स्वामीसी शरण जावें ॥ स्वहित आपुलें करावें ॥ ६ ॥

॥ २२४६ ॥ ज्यातें ध्यानीं ध्यातीं योगी ॥ तो मज येतो भेटीलागीं ॥ १ ॥ तया रामासी विन्मुख होणें ॥ जळो जिणें लाजिरवाणें ॥ २ ॥ व्रतें तपें ज्या साधिती ॥ तो मज नित्य ध्यातो चित्तीं ॥ ३ ॥ जो अगम्य वेद पुराणा ॥ तो मज येतो समरंगणा ॥ ४ ॥ नामया स्वामीच्या दर्शनें ॥ मग कैचीं भवबंधनें ॥ ५ ॥

॥ २२४७ ॥ मंदोदरी करी विनंती ॥ परिसा स्वामी लंकापती ॥ १ ॥ सोडा रामाची अंतुरी ॥ जव तो राम आहे दुरी ॥ २ ॥ उदकीं तारिले पाषाण ॥ हा तो प्रताप नव्हे सान ॥ ३ ॥ झाला बिभीषण शाहाणा ॥ देखोनी तुमच्या दुश्चितपणा ॥ ४ ॥ जाउनी रामासी भेटला ॥ मृत्युपासूनी सुटला ॥ ५ ॥ नामयास्वामी रघुनंदन ॥ वेगी करावा प्रसन्न ॥ ६ ॥

॥ २२४८ ॥ ह्मणसी बिभीषण शाहाणा ॥ परि तो महा मूर्ख जाणा ॥ १ ॥ काय तो रामासी भेटला ॥ अवघा रामची नाहीं झाला ॥ २ ॥ कोण हित केलें तेणें ॥ राम नाकळीचीं मनें ॥ ३ ॥ राम दृष्टी देखताची ॥ पदवी न घेववे त्याची ॥ ४ ॥ ह्मणशी झाला लंकापती ॥ नाश पावेल कल्पांती ॥ ५ ॥ नामया स्वामीतें जिंकोन ॥ आवघा रामचि मीं होईन ॥ ६ ॥

---

## भीष्मप्रतिज्ञा.

॥ २२४९ ॥ मारिले ते वीर माव करी हरी ॥ मृषा ते वैखरी केली जगीं ॥ १ ॥ पण केला होता न धरीं शस्त्रासी ॥ भीष्म तो तयासी स्मरणवंत ॥ २ ॥ महामारी धरी अर्जुन वीरासी ॥ नये सांवरासी कांहीं केल्या ॥ ३ ॥ अश्व ते मारिले रथ ते सारिले ॥ घाय वरी केले वीरपार्था ॥ ४ ॥ पार्थाचें शरीर पुष्प पळसाचा ॥ ऐसा वर्ण त्याचा जाणोनियां ॥ ५ ॥ सावध तो नाहीं वीर रणांगणीं ॥ विचारलें मनीं जगन्नाथें ॥ ६ ॥

नाहीं पळ एक सावध हा वीर ॥ बाणाचे ते भार भीष्म टाकी ॥ ७ ॥ देखोनी निधन प्रतोद ठेवून ॥ प्रथित हो रण चक्र हातें ॥ ८ ॥ घेउनीयां करीं उठलाग वेगें ॥ धांवतां निजांगें देखियेलें ॥ ९ ॥ कासे पीतांबर सुटला तो करें ॥ सांवरून बरें धांवतसे ॥ १० ॥ भीष्म ह्मणे देवा माझी सत्य केली ॥ प्रतिज्ञा हरली आपली हो ॥ ११ ॥ जंरी तुझे चित्तीं असे तें मारणें ॥ कवण तो रक्षण करील माझें ॥ १२ ॥ येउनी लवकरी बैसे रथावरी ॥ खड्ग तुझ्या करीं देत आहें ॥ १३ ॥ ऐकतां हा बोल झाला लज्जायमान ॥ दिलें तें टाकून चक्र हातें ॥ १४ ॥ जयजयकार झाला रणीं तो भीष्माचा ॥ पण केला साचा देवराया ॥ १५ ॥ नामा ह्मणे ऐसी भक्ताचीहो चाड ॥ आपण लबाड झाले देव ॥ १६ ॥

॥ २२५० ॥ करितां ते युद्ध नऊ दिवस झाले ॥ संकट पडलें पांडवांसी ॥ १ ॥ एक वेळ ऐसी केली मात भारी ॥ नेम दिवस सारी एक बाकी ॥ २ ॥ समग्र पांडव करिती विचार ॥ चिंतातुर फार देखोनियां ॥ ३ ॥ तेव्हां कृष्ण ह्मणे चला अवघे जन ॥ भीष्मा लागोन विचारासी ॥ ४ ॥ कृष्ण परमात्मा धर्मराजासहित ॥ भीष्म शिबिरांत जाते झाले ॥ ५ ॥ करुनी बंदन पितामहालागीं ॥ बोलती ते वेगीं कैसी परी ॥ ६ ॥ नेम दिवस दहा त्यामाजी ते नव ॥ झाले ते स्वभावें कांहीं नव्हे ॥ ७ ॥ जयाचिया कांक्षा धरुनी ते मनीं ॥ आलों समरांगणीं हेंचि ठावें ॥ ८ ॥ तुजसी झुंझतां नये यश आह्मां ॥ तुझी ते महिमा अगाध हो ॥ ९ ॥ भार्गवराम बळी युद्धीं जिंकवेना ॥ तया तोषवेना युद्ध केल्या ॥ १० ॥ ऐसियासी कैसें मारावें तें रणीं ॥ न होतां हो रणीं जय कैसें ॥ ११ ॥ हाचि हो विचार आलों तुझ्या घरा ॥ सांगें विजय नरा प्राप्ति घडे ॥ १२ ॥ ऐकोनियां बोला मनीं आनंदला ॥ भीष्म महा भला काय बोले ॥ १३ ॥ जोंवरी जिवंत तोंवरी जयवंत ॥ आहे हें निश्चित कळों आलें ॥ १४ ॥ परंतु पुसतां विचार मजला ॥ तरी एका बोला सांगिजेल ॥ १५ ॥ तुमची हो दळीं शिखंडी नामक ॥ राजा नपुंसक पुरुष आहे ॥ १६ ॥ तया करा पुढें मागून अर्जुन ॥ बाणाचें संधान करावें कीं ॥ १७ ॥ माझी ते प्रतिज्ञा षंढावरी शस्त्र ॥ न धरी तें अस्त्र प्राण गेल्या ॥ १८ ॥ ऐसी युक्ति करा रणीं मज मारा ॥ यश येईल घरा आपेआप ॥ १९ ॥ ऐकोनी विचार आले निजस्थाना ॥ नामदेवी जाणा विचार केला ॥ २० ॥

---



# द्रोणपर्व ह्माळसेन कथा.

॥ २२५१ ॥ तयेवेळीं तो ह्माळसेनू ॥ श्रीकृष्णासी नमस्कारानू ॥ पांडवासी वंदनू ॥ मग सकळिका रायांसी ॥ १ ॥ मग रायासी स्वधर्मे ॥ तेणें आलिंगिलें अनुक्रमें ॥ संतोषोनी राया धर्मे ॥ बैसविला ॥ २ ॥ बंदीजन पवाडे पढती ॥ अगाध ब्रीदें वाखाणिती ॥ सकळ परिवारासहिती ॥ ह्माळसेनाचा ॥ ३ ॥ धन्य धन्य अर्जुनाचे झालें ॥ पूर्वपुण्य फळासी आलें ॥ एकाहून एक झाले ॥ अधिकाअधिक ॥ ४ ॥ तंव दुर्योधन ह्मणे वीरा ॥ आतां चलावें मेळीकारा ॥ बैसोनी एक वाट विचारा ॥ योजावें कांहीं ॥ ५ ॥ ह्माळसेनू विनवी श्रीहरी ॥ स्वामी जावें मेळीकारीं ॥ दिनु मावळलीयावरी ॥ येईन देवा ॥ ६ ॥ आजी कौरवाची पैज ॥ जंववरी मावळेल सूर्य ॥ तंववरी घेईन झुंज ॥ रणामाजी ॥ ७ ॥ जंव असे आस भरोवरी ॥ तंव घेईन झुंजारी ॥ रेखा पुसलिया संसारीं ॥ कवणू वांचें ॥ ८ ॥ जंव मावळे दिन ॥ तंववरी वांचेल प्राण ॥ तरी देखेन तुझे चरण ॥ नारायणा ॥ ९ ॥ नातरी पितयाचे कारणीं ॥ माझे प्राण वेंचिती रणीं ॥ तरी सदैव मजवाचुनी ॥ दुजा नाहीं ॥ १० ॥ आणि कोटि जन्माचें पुण्य ॥ जे देखिले तुझे चरण ॥ तरी मज वैकुंठभुवन ॥ वस्ति करी ॥ ११ ॥ तंव बोलिला शारङ्गपाणी ॥ जे जे इच्छा धरिसी मनीं ॥ तितकी पावसी निर्वाणीं ॥ संदेहो नाहीं ॥ १२ ॥ ऐसें बोलोनी निघाला ॥ सैन्या पुढीचा भवंडिला ॥ श्रीकृष्ण पांडवेसी आला ॥ मेळीकारीं ॥ १३ ॥ मग पाठविले बंदीजना ॥ जाउनी सांगा दुर्योधना ॥ केवी सांडोनी अभिमाना ॥ जात असा ॥ १४ ॥ न जिकता पुढील वैरी ॥ कैसें जातां मेळीकारीं ॥ ऐसी नव्हें भरोवरी ॥ क्षात्रधर्माची ॥ १५ ॥ मेळीकारीं जातां सैन्य ॥ तंव पातले बंदीजन ॥ तेहीं देउनी आशिर्वचन ॥ ब्रह्मावो केला ॥ १६ ॥ ह्मणती दुर्योधना राजाधिराजा ॥ क्षात्रपणाची घेउनी पैजा ॥ तरी कां आणितसा लाजा ॥ क्षात्रपणासी ॥ १७ ॥ रणीं वैरिया देऊन पाठी ॥ न घालिता पुरुषार्थाची गाठी ॥ मेळीकारा उठाउठी ॥ केवी जातां ॥ १८ ॥ नातरी सांडुनी हातीयेरा ॥ राज्य द्यावें युधिष्ठिरा ॥ जावें आपुलिया घरां ॥ कुटुंबामाजी ॥ १९ ॥ मनामाजी न धरावी लाज ॥ सांडावी वांटिवेची पैज ॥ तरी तुमचें निकें काज ॥ फळासी येईल ॥ २० ॥

जरी क्षात्रधर्माची आयनी ॥ पुरुषार्थ कराल समरंगणीं ॥ तरी भटाची कास धरुनी ॥ युद्धासी चला ॥ २१ ॥ ऐसी तिखट उत्तरें करून ॥ बोलते जाले बंदीजन ॥ तेणें खोंचलें मन ॥ महा वीरांचें ॥ २२ ॥ मग कुंचा भवंडिला जाणा ॥ सैन्य लागलें भेरी निशाणा ॥ शंख नादाचें स्फुरणा ॥ रण तुराचें ॥ २३ ॥ वीर सिंहनादें गर्जती ॥ कुंजर किंकाळिया देती ॥ रथ चक्रें घडघडती ॥ थोर नादें ॥ २४ ॥ उन्नत जालिया आरणी ॥ कौरव उभे ठेले रणीं ॥ भाटा दिधली पेटवणी ॥ बोलावी वेगी ॥ २५ ॥ भाट जाऊनी वेगेसी ॥ सांगती ह्माळसेनासी ॥ कौरव प्रवर्तले युद्धासी ॥ आले वेगी ॥ २६ ॥ मग चालिले दळभार ॥ चालिले पायाचे मोगर ॥ तेथें तुंबळ जालें थोर ॥ दोहीं दळीं ॥ २७ ॥ महींद्र मंथनीचे हल्लाळ ॥ तैसें उसळलें पायदळ ॥ अशुद्धाचें खल्लाळ ॥ रणामाजीं ॥ २८ ॥ मग उठावलें असीवार ॥ तेहीं भंगविलें पायाचे मोगर ॥ रणकंदन केलें थोर ॥ समरंगणीं ॥ २९ ॥ मग कुंजर भार उठावले ॥ तेहीं असिवारां भंगिले ॥ रक्तमांस कालविलें ॥ चिखलु झाला ॥ ३० ॥ मग उठावले रहंवर ॥ तेही पळविले कुंजर भार ॥ शस्त्रीं न दिसे दिनकर ॥ अभ्रामाजीं ॥ ३१ ॥ तेथें सुटले शरजाळ ॥ बाणीं व्यापिलें अंतराळ ॥ उठती अग्नीचे कल्लोळ ॥ दाही दिशा ॥ ३२ ॥ तंव कर्णू उठावला ॥ तेणें सबळ वाहानु पाचारिला ॥ ह्मणे साहे साहे वहिला ॥ जासी झणी ॥ ३३ ॥ ह्मणे साहे साहेगा वीरा ॥ झणी सरसील माघारा ॥ माझिया घायाचा दरारा ॥ लागला तुज ॥ ३४ ॥ हें परिसोनीया उत्तर ॥ कोपें खवळला महावीर ॥ मग चालिला समोर ॥ कर्णाउजू ॥ ३५ ॥ ह्मणे एक वेळां पडिलासी ॥ रणभूमि सांडुनी पळसी ॥ मुख दाखवितां न लाजसी ॥ निर्लज्जा तूं ॥ ३६ ॥ रणभूमि सांडुनी पळिजे ॥ तेणें मुख केवी दाखवीजे ॥ हृदय फुटोनी मरिजे ॥ तरीच भले ॥ ३७ ॥ अपकीर्तीसी जिणें ॥ तें अप्रयोजक मी ह्मणे ॥ मुख दाखविता लाजिरवाणें ॥ वीरांमाजी ॥ ३८ ॥ ऐसें ह्मणोनिया गुणीं ॥ विंधिला खडतर बाणीं ॥ जैसा कोपला शूलपाणी ॥ महाभूतीं ॥ ३९ ॥ कर्णू तोडी वरिच्यावरी ॥ परी कासावीस केला भारी ॥ सारथी आणि वारु चारी ॥ पाडिले भूमीं ॥ ४० ॥ बाण घातीं विकळ गेला ॥ मूर्च्छागत भूमीं पडला ॥ तंव अश्वत्थामा पावला ॥ सांवरी वीरा ॥ ४१ ॥ मग संधानाच्या शरीं ॥ अश्वत्थामा येतां दुरी ॥ तो भेदला शरधारीं ॥ विकळ केला ॥ ४२ ॥ तंव पावला दुःशासन ॥ तेणें खडतर घातले बाण ॥ झाकुळले रविकिरण ॥

आच्छादिलें दिसे ॥ ४३ ॥ तयाचे शर तोडुनी ॥ मग विंधिला अनिवार बाणीं ॥ दुःशासन पळविला रणीं ॥ रथें सहित ॥ ४४ ॥ भूरिश्रवा सोमदत्तू ॥ तेही पाचारिला वीरनाथू ॥ तुझा थोर पुरुषार्थू ॥ देखिला आह्मी ॥ ४५ ॥ कृतवर्मा आणि पौंडरीकू ॥ भगदत्तू पिंगाक्षू ॥ अनंत विजयो बाहाळीकू ॥ उठावले ॥ ४६ ॥ तये वेळीं सबळ वाहानू ॥ विरक्षत्रिया पंचाननू ॥ तेणें तोडिलें बाणें बाणू ॥ पाडिले भूमीं ॥ ४७ ॥ मग तेहीं सकळ वीरीं ॥ रघु घातला माझारी ॥ वर्षताती शरधारीं ॥ मेघ जैसें ॥ ४८ ॥ प्रळयकाळीं जळधार ॥ वर्षती अखंड धार ॥ जैसा झाकोळला दिनकर ॥ अभ्रामाजीं ॥ ४९ ॥ बापु येकला वीर राणा ॥ सावरीतु असे त्याचिया बाणा ॥ ते न साहवेची ह्माळसेना ॥ महावीरा ॥ ५० ॥ मग लोटिला रहंवरू ॥ जैसा तृणावरी वैश्वानरू ॥ कीं तमावरी दिनकरू ॥ उदय करी ॥ ५१ ॥ कीं महाभूतावरी रुद्र ॥ कीं प्रळयकाळीं समुद्र ॥ कीं दैत्य सैन्यावरी इंद्र ॥ वज्रघातें ॥ ५२ ॥ तैसा रथ घडघडीतु ॥ जैसा काळावरी कृतांतु ॥ कीं राक्षस सैन्यावरी जैसा हनुमंतु ॥ तैसियापरी ॥ ५३ ॥ वर्षताती खडतर बाणीं ॥ सैन्य घायवटलें थोर रणीं ॥ वीरासी झाली भंगणी ॥ क्षणामाजी ॥ ५४ ॥ करीं घेऊनियां गदा ॥ रथ घोडे करी चेंदा ॥ केला महा वीरासी धोदा ॥ रणामाजी ॥ ५५ ॥ सारथी आणि महारथी ॥ थोर घायीं पाडिलें क्षिती ॥ रथ सैरा धांवती ॥ रणामाजी ॥ ५६ ॥ कर्णाचा मनोरथू ॥ पुरविला मोडुनी रथू ॥ कर्णु करूनी विरथू ॥ चरणीं चाले ॥ ५७ ॥ दुःशासनु गदें हाणितला ॥ तो मूर्च्छागत पाडिला ॥ सकळ देखोनी पळाला ॥ सांडुनी रथू ॥ ५८ ॥ मग घेउनी रथ बाण ॥ खडतर करितसे संधान ॥ तें सपिच्छी खडतरोन ॥ विसंसर होती ॥ ५९ ॥ सैन्य पळालें गेले भंगीं ॥ आपण उभा रणरंगीं ॥ जैसा माया त्यजुनी योगी ॥ निर्विकारू ॥ ६० ॥ तें न साहत तेणें ॥ मग घातले खडतर बाण ॥ व्यापुनी ठेविलें रवी किरण ॥ अभ्रामाजीं ॥ ६१ ॥ आणिक सोडिले शर ॥ अति तिखट अनिवार ॥ जैसे उलथलें डोंगर ॥ कल्पांतसमयीं ॥ ६२ ॥ तें देखोन ह्माळसेन ॥ केले शंखाचें स्फुरण ॥ मग पाचारिला द्रोण ॥ समरंगणीं ॥ ६३ ॥ ह्मणे कालच्या दिवशीं गुरू ॥ सांडुनी पळालेती रहंवरू ॥ मागुता घेतला विचारू ॥ झुंजावयासी ॥ ६४ ॥ तंव द्रोणु आवेशला ॥ अग्निशस्त्रेंकरुनी हाणितला ॥ जैसा त्रिनेत्रु उघडिला ॥ महारुद्रें ॥ ६५ ॥ अग्नि प्रजळला अंबरीं ॥ जे प्रळय

काळची लहरी ॥ झाळसेन सैन्यावरी ॥ झेपावला ॥ ६६ ॥ तें देखिलें झाळसेनें ॥ शस्त्रें सोडिलें पर्जन्यें ॥ चाऱ्ही मेघ अव्हानुन ॥ एकेठायीं ॥ ६७ ॥ धन्य पावन पांगुळला ॥ गगनीं चहुं मेघांचा मेळा ॥ उदक वाहताहे खळाळा ॥ रणामाजीं ॥ ६८ ॥ सैन्यक वीर पुरीं वाहत ॥ मेघ मुसळधारी वर्षत ॥ ऐसें वर्तलें झुंजात ॥ कौरव सैन्यीं ॥ ६९ ॥ तंव द्रोणें काय केलें ॥ वायो अस्त्र मोकलीलें ॥ मेघमंडळ विध्वंसिलें ॥ क्षणामाजीं ॥ ७० ॥ उडताती गिरिकंदर ॥ पाषाण गोटी तरुवरें ॥ जेवीं प्रळयकाळीं वसुंधरें ॥ कंपु होय ॥ ७१ ॥ उडती रथचिया मोडुनी ॥ भ्रमतसें अंतराळीं ॥ जेवी गिधाची हाऊळीं ॥ तैसें दिसे ॥ ७२ ॥ ध्वजस्तंभ मोडले ॥ रथाचे साटे सोडले ॥ पताकाचे सडे झाले ॥ भूमंडळीं ॥ ७३ ॥ तें देखोन झाळसेन ॥ काढिला नवनी सीतुबाणें ॥ पन्नग अस्त्र अभिमंत्रून ॥ लाविलें गुणीं ॥ ७४ ॥ सर्प चालिले लक्ष कोटी ॥ फणिया उभारिल्या अंबरीं ॥ गरळ वमिताती त्रिकुटीं ॥ जैशा अग्निज्वाळा ॥ ७५ ॥ एक शत फणीयाचे ॥ एक शत सहस्र लक्ष कोटीचे ॥ जैसे डोंगर असीचे ॥ उसळले गगनीं ॥ ७६ ॥ वायो भक्षितां न लागे वेळ ॥ मुखें वमताती हळाहळ ॥ तेणें जळताहे अंतराळ ॥ अग्निज्वाळीं ॥ ७७ ॥ तंव द्रोणु आवेशला ॥ बाणु गुणीं लाविला ॥ गरुडास्त्र जपिन्नला ॥ मंत्रसिंधु ॥ ७८ ॥ गरुड चालिले असंख्यात ॥ नखीं पक्षीं विदारीत ॥ सर्पा वर्तलें झुंजात ॥ तये वेळीं ॥ ७९ ॥ न लागतां अर्ध घडी ॥ सर्प नेलें तडातोडी ॥ मग चालिले लक्ष कोडी ॥ रणामाजी ॥ ८० ॥ तवं झाळसेनें काय केलें ॥ पर्वतास्त्र मोकलीलें ॥ तेथें पर्वत चालिले ॥ गगन मार्गें ॥ ८१ ॥ असो हें मज पाहतां ॥ पूर्वीं पंख होतें पर्वता ॥ ते चालले असंख्यात ॥ धर्मकाजा ॥ ८२ ॥ तेणें गरुड रगडिले भारी ॥ पाडिले रणा माझारीं ॥ मग कौरव सैन्यावरी ॥ वर्षताती ॥ ८३ ॥ तंव कोपला द्रोण गुरू ॥ तेणें गुणीं लाविला शरु ॥ तो बाणु आणि वारु ॥ कृतांतु जैसा ॥ ८४ ॥ वज्र अस्त्र भजिलें ॥ तेणें पर्वत कुट केलें ॥ ठिकरीया करुनी सांडिलें ॥ क्षणामाजीं ॥ ८५ ॥ तंव तेणें झाळसेनें ॥ इंद्रास्त्र सोडिले त्राणें ॥ वज्र गेलें पळोन ॥ गगनपंथें ॥ ८६ ॥ इंद्रास्त्र सत्राणें ॥ विस्तारलें सहस्र गुणें ॥ तें करीतसें संहारणें ॥ कौरवासी ॥ ८७ ॥ तें द्रोणें देखोन नयनीं ॥ विष्णुशस्त्र लाविलें गुणीं ॥ तें नेलें पिटोनी ॥ इंद्र शस्त्रातें ॥ ८८ ॥ मग चालिले गजवदना ॥ विकट शुंडा दंड दारुण ॥ फरश घातें संहारून ॥ वैरियासी ॥ ८९ ॥ तंव झाळसेन कोपोनी ॥ गजास्त्र लाविलें गुणीं ॥ तेणें

नेलें पिटोनी ॥ विष्णुस्वरूपा ॥ ९० ॥ तया गजाचा प्रतापू ॥ वरी द्रोणाचार्याचा कोपू ॥ तो धनुर्वाडियाचा बापू ॥ काय करी ॥ ९१ ॥ सिंहास्त्र दारुण ॥ बाण सोडिला शीत ओढुन ॥ गजासुरा निःपातुन ॥ क्षणामाजीं ॥ ९२ ॥ तंव कोपला झाळसेनू ॥ गुणीं लाविला चामुंडाबाणू ॥ अठरा भुजा दारुणू ॥ बाबरझोंटी ॥ ९३ ॥ मुख विक्राळें ताणित ॥ डोळे गरगरां भवंडित ॥ कौरवा वर्तलें जुगांत ॥ तयेवेळीं ॥ ९४ ॥ तंव द्रोण कोपला महावीरू ॥ गुणीं लाविला एक शरू ॥ भैराळ अस्त्र विक्राळू ॥ गगनामाजीं सोडिलें ॥ ९५ ॥ शस्त्रें शस्त्र विलया गेलें ॥ तेजें तेज हारपलें ॥ तंव झाळसेनें विंधिलें ॥ सातें बाणें ॥ ९६ ॥ चारी चहू वारुयासी ॥ एकू भेदिले सारथियासी ॥ दोनी भेदिले द्रोणासी ॥ तयेवेळीं ॥ ९७ ॥ द्रोणु आला मूर्च्छागतू ॥ झाळसेनें सांडिला रथू ॥ आला गदा भवंडितू ॥ कर्णावरी ॥ ९८ ॥ गदाघातें रथु हाणितला ॥ कर्णु दुसरिया रथावरी गेला ॥ तोही रथु चूर्ण केला ॥ भूमंडळीं ॥ ९९ ॥ कर्णु पळाला घायत्राणें ॥ मग लक्षिला दुःशासनें ॥ तोही गदाघातें हाणोन ॥ लोळवीला ॥ १०० ॥ मना पवना वेगु नाहीं ॥ तैसा धावतु असे पाहीं ॥ संहारितु गदाघाई ॥ कौरवांसी ॥ १ ॥ अश्वत्थामा केला विरथू ॥ कृपाचार्य सांडी रथू ॥ सवळु पळाला जीवंतू ॥ देखोनियां ॥ २ ॥ मग पाचारिला दुर्योधनू ॥ आतां राखे आपुला प्राणू ॥ नातरी रिघावें शरणू ॥ युधिष्ठिरा ॥ ३ ॥ तंव पावला दुर्मदू ॥ एकवटले दोघे बंधू ॥ करुनी सिंव्हनादू ॥ मिसळले घाई ॥ ४ ॥ दुर्मदु ह्मणे झाळसेनासी ॥ बहु बोलतां पार जासी ॥ आपणाकडे न पाहसी ॥ मी कवणु ऐसें ह्मणोनी ॥ ५ ॥ सुखें असतां आपुले ठायीं ॥ नेणसी सुखदुःखा कांहीं ॥ तो तूं मराया आपल्या पायीं ॥ आलासी येथें ॥ ६ ॥ पुरे आयुष्याची विधी ॥ जेवि सर्पु लागे पानधी ॥ तुज कवणें शिकविली बुद्धी ॥ मतिहीनें ॥ ७ ॥ जरी चिरकाळ असे जिणें ॥ तरी जाय नगर टाकुन ॥ वृथा वेंचुनी प्राण ॥ कासया जासी ॥ ८ ॥ आह्मी तरी आपुले गांठीं ॥ बांधली मरणाची खुंटी ॥ विधि पुरलिया शेवटीं ॥ वांचून तेणें ॥ ९ ॥ पाहेपा कालचे दिवसीं ॥ जे परी झाली वा अभिमन्यासी ॥ तरी ओकूनियां कां प्राण देसी ॥ वृथा काजें ॥ १० ॥ तंव बोलिला झाळसेनू ॥ हें जाणें भेडसावणें ॥ आधी गांठीं बांधोन मरण ॥ आलों येथें ॥ ११ ॥ परी देख तुझें अंतरंग तूं ॥ या अकरा क्षोणि सहितू ॥ तुह्मी पावाल मृत्यू ॥ एकेएकू ॥ १२ ॥ तुमचे निर्वंश होती ॥

हें देखतसे अंतर्गती ॥ पांडव राज्य करिती क्षिती ॥ निश्चयेसी ॥ १३ ॥ धन्य धन्य अभिमन्य ॥ तेणें रणीं वेंचिले प्राण ॥ अंतीं तुष्टला नारायण ॥ मुक्तिदाता ॥ १४ ॥ आजी पितयाचे कारणीं ॥ माझे प्राण वेंचले रणीं ॥ परी सदैव मजहुनी ॥ दुजा नाहीं ॥ १५ ॥ असो तुह्मासी काय नीती ॥ तुह्मी असा पापमूर्ती ॥ तुह्मांसी कैची गती ॥ भूमिभार ॥ १६ ॥ ऐसें बोलोनी खडतरी ॥ दुर्मदु विंधिला दाही शरीं ॥ ते बाण नव्हेती मलाऱ्ही ॥ यमदंड ॥ १७ ॥ तंव दुर्मदें केलें संधान ॥ चारी सांडुनी तोडून ॥ सहाबाण तिष्टपणें ॥ पावले वेगीं ॥ १८ ॥ चारी चहू वारुयांसी ॥ एकु भेदला सारथीयासी ॥ एकु भेदला दुर्मदासी ॥ एकु पडला रणीं ॥ १९ ॥ तें देखोन दुर्योधन ॥ पळाला रथ मुरडुन ॥ हासिन्नला ह्माळसेन ॥ ह्मणे परतोन पाहे ॥ २० ॥ तंव द्रोणु सावधु झाला ॥ दळभारु एकवटला ॥ तेथें संग्रामु झाला ॥ अति दारुण ॥ २१ ॥ कृपाचार्य आणि द्रोणू ॥ अश्वत्थामा आणि सूर्यनंदनू ॥ भूरिश्रवा विकर्णू ॥ सोमदंतु ॥ २२ ॥ सोरट आणि पढीवारू ॥ चीन चीनभोठ आणि बर्बरू ॥ परी एकला न सावरू ॥ बागड राये ॥ २३ ॥ अतिबळ आणि सबळ ॥ कळाईत निकुंभ अनिळ ॥ ऐसें एकवटलें दळ ॥ कौरवांचें ॥ २४ ॥ सैन्या कुंचा भवंडिला ॥ शंखनादें कोंदाटला ॥ येथें सवेंची पावला ॥ दुर्योधनू ॥ २५ ॥ तंव ह्माळसेनाचिया सैनीं ॥ अंबर गर्जिन्नला निशाणीं ॥ शंख नादाचिया ध्वनीं ॥ नाद कोंदे ॥ २६ ॥ अतिरथी आणि महारथी ॥ वीर घालाघाली करिती ॥ ते सिंहनादें गर्जती ॥ महावीर ॥ २७ ॥ वीरसेनु दळभंजनू ॥ वीरबाहो सबळ वाहानू ॥ अग्निकेतु रणमर्दनू ॥ पराजितू ॥ २८ ॥ ऐसें सैन्यकहो वीर ॥ सौरपणें रणरंगधीर ॥ जेंही जिंकिले नृपवर ॥ मेदिनीचे ॥ २९ ॥ ऐसें सैन्य चालिलें रणीं ॥ मागुती परतली आयिनी ॥ पुढतीं द्वंद्वयुद्धें मांडोनी ॥ तुंबळ झालें ॥ ३० ॥ वीर पेटले महामारी ॥ वरुषताती खडतर शरीं ॥ तेथें जुगांत झालें भारी ॥ कौरव सैन्या ॥ ३१ ॥ तया कौरव सैन्या आंतू ॥ थोर हलकल्लोळ होतू ॥ जैसा मांडिला आवर्तू ॥ प्रळयकाळीं ॥ ३२ ॥ तंव कर्ण द्रोणें वाहलें ॥ कौरवसैन्य एकवटलें ॥ तेथें घोरांदर झालें ॥ महा दारुण ॥ ३३ ॥ बाणजाळ सुटलें कैसें ॥ सूर्यमंडळीं अभ्र जैसें ॥ सूर्यकिरण न दिसे ॥ अंधकारीं ॥ ३४ ॥ बाणीं खोंचलें सकळ सैन्य ॥ परी न भंगेची दारुण ॥ तें देखताहे म्हाळसेन ॥ महावीरू ॥ ३५ ॥ मग तेणें पेलिला रथू ॥ जेंवी काळवरी कृतांतू ॥ कीं चंद्रावरी राहुकेतू ॥ पर्व

समर्यी ॥ ३६ ॥ कीं काळावरी महाकाळू ॥ कीं दैत्यसैन्यावरी रणकंदळू ॥ कीं मनामाजी परिवळू ॥ दाहो जैसा ॥ ३७ ॥ कीं सृष्टि संहारितां तयेवेळीं ॥ जैसा विखें चंद्रमौळी ॥ कीं वडवानल समुद्रजळीं ॥ दाहो करी ॥ ३८ ॥ तैसा तो ह्माळसेन ॥ संहारी कौरवसैन्य ॥ बाण नव्हती ते दारुण ॥ काळदंड ॥ ३९ ॥ ना आणिकु एक मज गमत ॥ खेळ खेळताहे श्रीअनंत ॥ ह्माळसेने निमित्यें ॥ कौरवांसी ॥ ४० ॥ ऐसा उठावला महावीर ॥ फांकले तेजाचे अंकुर ॥ पळोन गेला अंधकार ॥ रविबिंब जैसें ॥ ४१ ॥ शंख वाहिला घनघोषू ॥ गर्जिन्नला स्वर्गलोकू ॥ पाताळभुवनीं शेषू ॥ कापिन्नला ॥ ४२ ॥ जेणें रथासी वेगु देउनी ॥ पावला टाकितु अरणी ॥ कौरवसैन्य भंगुनी ॥ सैन्यका वीरा ॥ ४३ ॥ देखोनी कुंजराचा भारू ॥ खवळिला महावीरू ॥ करिता झाला घोरू ॥ गदाघातें ॥ ४४ ॥ एकातें धरितु चरणीं ॥ एकातें टाकितु गगनीं ॥ कुंजरभर संहारुनी ॥ चालिला पुढा ॥ ४५ ॥ पुढा देखोनी असी वारा ॥ प्रवर्तला महा मारा ॥ तंव पुढा रमावरा ॥ देखता झाला ॥ ४६ ॥ मग रथें रथु हाणें ॥ घे घे पुढिलातें ह्मणे ॥ आकाशीं टाकी सत्राणें ॥ टाकी यासी ॥ ४७ ॥ तो मनातें टाकी मागें ॥ पवन आटोपे वेगें ॥ जैसा मीनु तरंगे ॥ समुद्रजळीं ॥ ४८ ॥ तो सैरावैरा धांवतू ॥ पाठी येताहे रथू ॥ तयाचा वर्णितां पुरुषार्थू ॥ खुंटली वाणी ॥ ४९ ॥ तंव द्रोणासी देखोनी नयनीं ॥ तो धाविन्नला चरणीं ॥ गदाघातें संहारुनी ॥ चारी वारू ॥ ५० ॥ द्रोणु बाणी वरूशत ॥ ते सर्वांगीं खडतरत ॥ अशुद्धाचे पूर वाहत ॥ तयेवेळीं ॥ ५१ ॥ परी न मानी तयाचिया मना ॥ जंव गदाघातु घावा द्रोणा ॥ तंव कर्णे केलें संधाना ॥ तयेवेळीं ॥ ५२ ॥ तैसाच दिधला अवघातू ॥ मोडिला कर्णाचा रथू ॥ तयेवेळीं तो सूर्यसुतू ॥ चरणीं चाले ॥ ५३ ॥ कर्ण द्रोण वरुण चाली ॥ वरुषताती शरधारीं ॥ तेथें खोचे जिव्हारी ॥ महावीरु तो ॥ ५४ ॥ कृपाचार्य अश्वत्थामा ॥ थोर पेटले संग्रामा ॥ दुःशासन साउमा ॥ पावला तेथें ॥ ५५ ॥ ऐसें कौरवसैन्य मिळालें ॥ शरधारीं वरुषले ॥ जैसे अभ्रामाजीं झाकुळले ॥ रविबिंब ॥ ५६ ॥ ते वेळीं तो ह्माळसेनू ॥ करीं घेउनी धनुष्यबाणू ॥ करिता जाला संधानू ॥ वीरराजू ॥ ५७ ॥ तेणें शरजाळ तोडुनी ॥ धनुष्य पाडिलें धरणीं ॥ खंड विखंड अरणी ॥ कौरवसैन्य ॥ ५८ ॥ मग मुद्गल हातीं घेतला ॥ चरण चाली उतरला ॥ गुरु हाणितला ॥ मस्तकावरी ॥ ५९ ॥ घाईघाई आली कळवळी ॥ मूर्च्छा

येउनी पडला भूमंडळीं ॥ तंव पिटली एक टाळी ॥ कौरवसैन्यीं ॥ ६० ॥ मागुता आला रथावरी ॥ कर्णु विंधिला दाहीं शरीं ॥ सारथी आणि वारू चारी ॥ पडिले रणीं ॥ ६१ ॥ सवेंची गदा घेउनी ॥ धाविन्नला चरणीं ॥ अश्वत्थामा हाणोनी ॥ पाडिला धरणीं ॥ ६२ ॥ तयाची परी कृपाचारी ॥ गदाघातें हाणितला शिरीं ॥ पडिला धरणीयेवरी ॥ मूर्च्छागतू ॥ ६३ ॥ तें देखोन दुर्योधनू ॥ पळाला रथ घेउनी ॥ सबळु आणि दुःशासनू ॥ पळती पुढा ॥ ६४ ॥ तंव समसप्तकु पाचारिला ॥ वीरा राहे राहे सैरा ॥ तेथें दोघा संग्रामु झाला ॥ घोर देखा ॥ ६५ ॥ उरी शिरीं कपाळीं ॥ जानु जांग वक्षस्थळीं ॥ दोघे वीर महाबळी ॥ न लोटती एकमेकां ॥ ६६ ॥ तंव तेणें झाळसेनें ॥ समसप्तकु हाणितला त्राणें ॥ थोर मूर्च्छा आली तेणें ॥ पडला धरणीं ॥ ६७ ॥ देखोनी सैन्या सुटला पळू ॥ कौरव सैन्यामाजीं हलकल्लोळू ॥ तो खवळला महाकाळू ॥ अंगवेना ॥ ६८ ॥ कौरवसैन्य पुढें पळत ॥ थोर हाहाःकार होत ॥ तेथें वर्तलें जुगांत ॥ महावीरा ॥ ६९ ॥ तंव बोलिला दुर्योधनू ॥ श्रीगुरु कोठवरी पळोन ॥ या पुढें नाहीं जाणें ॥ सर्वथा आह्मी ॥ ७० ॥ हा कपटिया नारायणू ॥ येणें रचिलेंसे निर्वाणू ॥ नातरी कैंचा झाळसेनू ॥ कोठूनी आला ॥ ७१ ॥ न कळती या कृष्णाचें मत ॥ एक एकासी निर्माण करीत ॥ जय देणें पांडवास ॥ भलतीये परी ॥ ७२ ॥ पहाजी सोळा वरुशाचा वीरू ॥ अभिमन्यु धाकुटें लेंकरूं ॥ तेणें केला संहारू ॥ महावीरांचा ॥ ७३ ॥ तंव बोलले द्रोण गुरू ॥ इतुका जाणसी विचारू ॥ तरी कां करीसी वैराकारू ॥ राज्य नेदिसी त्यांचें ॥ ७४ ॥ देवो तयाचा सारथी ॥ ऐसें जाणसी निगुती ॥ तरी कां धरितोसी अनिती ॥ विचारू दुजा ॥ ७५ ॥ ऐसें जाणतां मनीं ॥ पांडवा सारथी चक्रपाणी ॥ तरी कासया निर्वाणीं ॥ येता तुह्मी ॥ ७६ ॥ तया सारथी देवरावो ॥ तो पांडवासी देईल जयो ॥ कौरवासी करी क्षयो ॥ हें निभ्रांत जाणा ॥ ७७ ॥ धरूनि मच्छाचा वेषू ॥ दैत्य वधिला तो शंखू ॥ कूर्मवेषें भूमि गोळकू ॥ धरिला पृष्टीं ॥ ७८ ॥ जैं वराहरूप नटला ॥ तो हिरण्याक्षु दैत्य वधिला ॥ हिरण्यकश्यपु वधिला ॥ नरसिंहवेषें ॥ ७९ ॥ जै खुजें रूप धरुनी ॥ बळी पाताळीं घालुनी ॥ पृथ्वी निःक्षेत्री करुनी ॥ परशरामें ॥ ८० ॥ विरोचनाची होउनी नारी ॥ मग तो निर्दाळिला वैरी ॥ ऐसा कपटी श्रीहरी ॥ नेणसी राया ॥ ८१ ॥ पहिलाची घेतासी विचारू ॥ तरी कासया होता संहारू ॥ भीष्मदेवासारखा वीरू ॥ कासया पडता

॥ ८२ ॥ कासया पडता लक्ष्मण ॥ जयद्रथा होतें कां निर्वाण ॥ ऐसें तुझें मूर्खपण ॥ दुर्योधना ॥ ८३ ॥ आतां सांगसी विचारू ॥ तोची आह्मीं करूं ॥ वायां करितोसी संहारू ॥ महावीरांचा ॥ ८४ ॥ पाहे तुझिये कारणीं ॥ वीर पडती रणीं ॥ ऐसी तुझी करणी ॥ दुर्योधना ॥ ८५ ॥ ऐसें द्रोणगुरु बोलिला ॥ दुर्योधनु काळवंडला ॥ उगाची तो राहिला ॥ मौनरूपीं ॥ ८६ ॥ तंव बोलिला कृपाचारी ॥ गूढा असे याच्या शरीरीं ॥ श्रीगुरु तुमच्या उत्तरीं ॥ न बोले कांहीं ॥ ८७ ॥ तंव बोलिला गुरुरावो ॥ तुंवा कां धरिला मौनभावो ॥ जो सांगसी उपावो ॥ तोची करूं ॥ ८८ ॥ तंव बोलिला दुर्योधनू ॥ या वीरासी संहारून ॥ यामागें जीवूं कीं मरून ॥ भलतेंची घडो ॥ ८९ ॥ तंव द्रोणु बोलिला रायासी ॥ ब्रह्मशस्त्र आहे मजपाशीं ॥ येणें शस्त्रें अर्जुनासी ॥ घातु असे ॥ ९० ॥ हें शस्त्र गा दुर्योधना ॥ घातुक याचिया प्राणा ॥ उदैक पार्थाचिया प्राणा ॥ घेऊं आह्मी ॥ ९१ ॥ तंव दुर्योधन ह्मणे गुरूसी ॥ यापुढा जेव्हां वांचसी ॥ मग अर्जुनातें वधिसी ॥ समरंगणीं ॥ ९२ ॥ प्रस्तुत चुकवावें मरण ॥ रात्रीं आडतें कायसें विघ्न ॥ हें कार्य अवश्य करून ॥ यासी वधावें ॥ ९३ ॥ श्रीगुरु बोले उत्तरीं ॥ अभिमन्यु मारिला जया परी ॥ तैसेंची करावें वीरीं ॥ आजी देखा ॥ ९४ ॥ मग एकवटले वीर ॥ चालिला कौरवांचा भार ॥ शस्त्रा अस्त्रीं अंधकार ॥ पडिला तेथें ॥ ९५ ॥ तें देखिलें ह्मळसेनें ॥ तेणें पाचारिला द्रोण ॥ तुह्मां लाज नाहीं मी ह्मणे ॥ पळतां रणीं ॥ ९६ ॥ वीर ह्मणविता भारथींचे ॥ थोर पुरुषार्थ तुमचे ॥ महत्व न राखा नांवाचें ॥ पळतां रणीं ॥ ९७ ॥ क्षेत्रीं झुंजता रणीं ॥ पाठी देउनी पळे प्राणी ॥ तो पडे यमवदनीं ॥ कोटि वरुषें ॥ ९८ ॥ नातरी पळतियासी मारी ॥ कीं निःशस्त्रिया अवधारी ॥ कीं शरणांगतासी वधारी ॥ तो अप्रयोजकू ॥ ९९ ॥ एकवळा कीं करुनी ॥ एकलियासी वधिती रणीं ॥ तयासी होय यमजाचणी ॥ चंद्रार्क वरी ॥ २०० ॥ तरी तुह्मी कालच्या दिवशीं ॥ रणीं वधिलें अभिमन्युसी ॥ तें मूळ आहे तुह्मासी ॥ यमयातना ॥ १ ॥ असो तुह्मासी काय सांगणें ॥ तुह्मी ठाईहुनी कपट करणें ॥ तैसेंच भोगाल पतनें ॥ सत्य जाणा ॥ २ ॥ ऐसें बोलोनी घेतले बाण ॥ तोडिलें तयाचें संधान ॥ तंव आणिक आलें तीव्रपणें ॥ तेंही तोडिलें ॥ ३ ॥ तितकीया वीरांचें संधान ॥ एकलाची सांवरी त्राण ॥ जैसें नपूंसकाचें जिणें ॥ निरर्थक ॥ ४ ॥ मग एक वेळा करुनी ॥ रथा

भोंवता वेढा घालुनी ॥ मग वरुषताती बाणीं ॥ जलधारा जैसे ॥ ५ ॥ कर्णु ह्मणे देख देख ॥ हें सांवरी माझें लक्ष ॥ ह्मणोनी विंधिलें धनुष्य ॥ तुटलें शीत ॥ ६ ॥ तंव ते वज्रापासाव कठोर ॥ काय करी कर्णाचा शर ॥ मांडी देउनी महावीर ॥ चढविलें सीत ॥ ७ ॥ मग घेउनी गदेतें ॥ कर्ण हाणितला अव्हाटे ॥ कूट करुनी रथांत ॥ पाडिला भूमी ॥ ८ ॥ अश्वत्थामा तये क्षणीं ॥ चारी वारु खिळले बाणीं ॥ तें देखोनियां नयनीं ॥ तोडिलें वीरें ॥ ९ ॥ तयाच्या संधाना आंत ॥ लखलखीत बाण सात ॥ अश्वत्थामा करुनी विरथ ॥ पाडिला रणीं ॥ १० ॥ तयेच वेळीं कृपाचारी ॥ आखु छेदावया दाखवी दाही शरीं ॥ येता देखिलें दुरी ॥ झाळसेनें ॥ ११ ॥ ते बाणें बाण तोडिले ॥ मग कृपाचारी ते लक्षिलें ॥ मूर्च्छित पाडिले ॥ मोडीला रथू ॥ १२ ॥ तंव दुःशासनु पातला ॥ तेणें ध्वजास्थ देखिला ॥ तो वज्रापासावो घडिला ॥ केवीं तुटे ॥ १३ ॥ मग सोडिला बाण ॥ हृदयीं विंधिला दुःशासन ॥ पडला मुरकुंडी येऊन ॥ तये वेळीं ॥ १४ ॥ मग ह्मणे जी जी श्रीगुरू ॥ तुह्मी कां न करा हातीं येरू ॥ एवढा वाटीवेचा बडिवारू ॥ वृथा जातू ॥ १५ ॥ आवेशोनी द्रोणाचारी ॥ झाळसेनु विंधिला दाही शरीं ॥ तंव दृम दुहाकारी ॥ साहे माते ॥ १६ ॥ तंव पावला सबळू ॥ ह्मणें होसी बरळू ॥ आतां करीन हलकल्लोळू ॥ वीरा तुज ॥ १७ ॥ कर्णु अश्वत्थामा पावला ॥ कृपाचारी विकर्ण आला ॥ शैल्य सोमदंतु धाविन्नला ॥ थोर क्रोधें ॥ १८ ॥ तें देखोनिया वैरी ॥ जैसा सिंह गजावरी ॥ मग गदा घेऊनिया करीं ॥ उतरे चरणीं ॥ १९ ॥ वीरबाहो सबळ वाहानू ॥ वीरसेनु दळभंजनू ॥ अग्निकेतु रण मर्दनू ॥ पावले वेगीं ॥ २० ॥ शरधारी वरुषती ॥ तयाची संधानें तोडिती ॥ झाळसेनु करील ख्याती ॥ महा वीरेसी ॥ २१ ॥ कर्णु गदें करून हाणितला ॥ विकर्णु क्षितीवरी पाडिला ॥ अश्वत्थामा पावला ॥ चरण चाली ॥ २२ ॥ पुढा देखोनी कृपाचारी ॥ तयातें घावो देवोनी शिरीं ॥ सबळासी केली परी ॥ तें सांगवेना ॥ २३ ॥ दृपदासी धरुनी चरणीं ॥ तयासी भवंडिलें गगनीं ॥ रथेसी दिधला टाकोनी ॥ शैल्यावरी ॥ २४ ॥ तंव पुढा देखिला सोमदंतू ॥ तयाचा मोडूनियां रथू ॥ भूरिश्रवाचा पुरुषार्थू ॥ भंगिला तेणें ॥ २५ ॥ तो खवळला महाबाहो ॥ रथ घोडिया एकची घावो ॥ फेडीतु वैरियाचा ठावो ॥ महावीरू ॥ २६ ॥ मागें झाळसेनाचे वीर ॥ तेंही भंगिले कौरवांचे भार ॥ थोर होताहे हल-

कल्लोळ ॥ रणामाजीं ॥ २७ ॥ पुढें पळे कौरवसैन्य ॥ पाठी धांवे ह्माळसेन ॥ थोर होताहे कंदन ॥ कौरवांचें ॥ २८ ॥ तंव दुर्योधनु बोले ॥ गुरु तुह्मी विचारिलें ॥ कीं हा मेलिया भलें जालें ॥ सकळिकांचें ॥ २९ ॥ दुर्योधनाचे नांवें ॥ तेची पांडव जाणावे ॥ जरी हा न वांचला जिवें ॥ रणामाजीं ॥ ३० ॥ मज घातु जालियावरी ॥ तुह्मी वोळंगावें माझे वैरी ॥ ऐसें खडतर उत्तरीं ॥ खोंचला द्रोणू ॥ ३१ ॥ ह्मणे तूं होसी कुळहीनू ॥ ह्मणोनी बोलतोसी उणें ॥ तुझें तुज साजें बोलणें ॥ बोलतां मज ॥ ३२ ॥ गांधारीया सहजा सांगितलें ॥ तेंची आजी आठवलें ॥ तुझे प्रसूतसमयीं शब्द झाले ॥ जंबुकाचे ॥ ३३ ॥ तैंच म्यां वर्तिलें वर्तन ॥ कुळक्षयो याचेन गुण ॥ तेंची आलें वचन ॥ पुढें देखा ॥ ३४ ॥ अरे तुझीये कारणीं ॥ येथें अनाथें पडिलीं रणीं ॥ शेवटीं पुढें निर्वाणीं ॥ तूंही जासील प्राणा ॥ ३५ ॥ हा सर्वगतु श्रीहरी ॥ सर्वत्र सर्वांच्या उदरीं ॥ एकमेका करुनी वैरी ॥ संहारावो ॥ ३६ ॥ आमुचे सहजी वृद्धपणें ॥ यावरी कीर्ति जिणें ॥ तरी तुमचा काजीं प्राण ॥ वेंचणें सत्य जाणा ॥ ३७ ॥ इतकें बोलोनी वचन ॥ गुणीं लाविला रुद्रबाण ॥ पाचारिला ह्माळसेन ॥ तये वेळीं ॥ ३८ ॥ राख राख आपलिया प्राणा ॥ ह्मणोनी सोडिलें रुद्रबाणा ॥ तेणें तेजें गगना ॥ उजेडु जाला ॥ ३९ ॥ तें ह्माळसेनें देखोनी नयनीं ॥ वैष्णवास्त्र लाविलें गुणीं ॥ तेणें नेलें पिटोनी ॥ रुद्रशस्त्रातें ॥ ४० ॥ तेजें तेज हारपलें ॥ शस्त्रें शस्त्र विलया गेलें ॥ तंव ह्माळसेनें पाचारिलें ॥ द्रोणाचार्यासी ॥ ४१ ॥ मग हाणितला पांच बाणीं ॥ चारी वारु पाडिले रणीं ॥ सारथी बाणें खडतरोनी ॥ पडला देखा ॥ ४२ ॥ ते वेळीं द्रोणु विरथु जाला ॥ आणिका रथावरी गेला ॥ गदाघातें चूर्ण केला ॥ तोही रथू ॥ ४३ ॥ मग पळतसे चरणचाली ॥ थोर होताहे मारी ॥ मग द्रोणु विचारी ॥ मनामाजी ॥ ४४ ॥ आतां करावें निर्वाण ॥ नाहीं तरी नाहीं जिणें ॥ मग काढिला बाण ॥ निर्वाणींचा ॥ ४५ ॥ ब्रह्मअस्त्र लाविलें गुणीं ॥ तयासी प्रार्थना करुनी ॥ वैरियासी संहारुनी रणीं ॥ क्षणामाजीं ॥ ४६ ॥ पळत पळतां सोडिला बाणू ॥ तेणें व्यापिलें गगन ॥ तें ह्माळसेनाचें सैन्य ॥ देखतें जालें ॥ ४७ ॥ वरुषती शस्त्रधारी ॥ शर पडती धरणीवरी ॥ परी ह्माळसेनाचे शरीरीं ॥ धाकु नाहीं ॥ ४८ ॥ गदाघातु जेथ देत ॥ वारु मारी मोडी रथ ॥ उलंडले मदोन्मत्त ॥ गिरी जैसे ॥ ४९ ॥ कोटि सूर्यांचा प्रकाशू ॥ तैसा गगनीं आयासू ॥ करावया प्राणनाशू ॥ वैरियांचा

॥ ५० ॥ धगधगीत तत्क्षणीं ॥ शस्त्र आलें गगनीहुनी ॥ तें हाणितलें गदें करुनी ॥ थोर निघातें ॥ ५१ ॥ घायें उसळला बाण ॥ गेला रविमंडळा भेदून ॥ पुनरपी मावळता दीन ॥ उतरले भूमीं ॥ ५२ ॥ रणीं भीडता महावीरां ॥ घावो लागला पाठीमोरा ॥ बाण खडतरला सामोरा ॥ हृदयावरी ॥ ५३ ॥ बाण हृदयीं खडतरला ॥ मूर्च्छागतु भूमीं पडला ॥ जैसा मेरू उलंडला ॥ पृथ्वीवरी ॥ ५४ ॥ रामकृष्ण गोविंद ह्मणत ॥ धरणीं झाला मूर्च्छागत ॥ हृदयीं आला श्रीअनंत ॥ अविनाश मूर्ती ॥ ५५ ॥ काळें सलिला महाकाळू ॥ कीं सागरें दाहिला वडवानळू ॥ कीं उलथला भूमिगोळू ॥ येरी वाही ॥ ५६ ॥ तैसा उलंडला धरणीं ॥ हाहाःकारू झाला सैनीं ॥ एकटाळी आरणीं ॥ गर्जिन्नलीं ॥ ५७ ॥ तंव ह्माळसेनाचे वीर ॥ विंधितलें समोर ॥ जैसे वर्षताती जलधर ॥ प्रळयकाळीं ॥ ५८ ॥ ब्रह्मशस्त्राचा प्रतापू ॥ वरी द्रोणाचार्याचा कोपू ॥ रणीं मालविला दिपू ॥ अर्जुनाचा ॥ ५९ ॥ सूर्योदय होउनी मावळला ॥ त्रैलोक्या अंधार पडिला ॥ तैसा पांडवकुळीं झाला ॥ अंधकारू ॥ ६० ॥ वीर चालिले थोर रणीं ॥ तेही भंगीलिया आरणी ॥ कौरव गेले पळोनी ॥ मेळीकारा ॥ ६१ ॥ मग तेंही सैन्यकीं वीरीं ॥ ह्माळसेनु घातला रथावरी ॥ वेगीं आले मेळीकारी ॥ पांडवाचे ॥ ६२ ॥ आणुनी घातला श्रीकृष्णाचे चरणीं ॥ तो पांडवीं देखिला नयनीं ॥ आंग टाकिलें धरणीं ॥ पांचही जणीं ॥ ६३ ॥ तंव ह्माळसेनु सावधु झाला ॥ तेणें श्रीकृष्ण विनविला ॥ चरणीं स्थापावें घननीळा ॥ कृपानिधी ॥ ६४ ॥ आजी पितयाच्या काजा ॥ प्राणु वेंचला माझा ॥ अंतकाळीं वैकुंठ राजा ॥ भेटला मज ॥ ६५ ॥ आजी धन्य मी ये सृष्टीं ॥ मज जोडला जगजेठी ॥ पावन झालों वैकुंठीं ॥ कल्प कोटी ॥ ६६ ॥ ऐसें बोलत बोलतां ॥ प्राण गेला अवचिता ॥ तें देखोनी पंडुसुता ॥ दुःख झालें ॥ ६७ ॥ तंव बोले सारङ्गधरू ॥ याचा शोक नका करूं ॥ तुह्मी घ्यावा विचारू ॥ अंतर्गतू ॥ ६८ ॥ ब्रह्मशस्त्र दारुण ॥ घेते पांचाजणाचे प्राण ॥ तें झालें निर्वाण ॥ ह्माळसेनासी ॥ ६९ ॥ यासी संस्कारू कीजे ॥ ऐसे बोलोनी गरुडध्वजें ॥ ह्मणे सकल जनीं निघीजे ॥ भागीरथीसी ॥ ७० ॥ तयासी संस्कारू करुनी ॥ मग तिलांजुली देउनी ॥ मेळीकारासी येउनी ॥ रात्रीमाजीं ॥ ७१ ॥ पांडवासी दुःख झालें ॥ अन्न उदक वर्जिलें ॥ पाहा हो कैसें झालें ॥ ह्माळसेनासी ॥ ७२ ॥ मग बोलिले नारायण ॥ धन्य या कौरवाचें जिणें ॥ नित्य होताहे संहारणें ॥ महावीरांचें ॥ ७३ ॥ मागुते

संग्रामीं येती ॥ परी साभिमानु न सांडिती ॥ तुह्मी वायावीण चित्तीं ॥ दुःख धरितां ॥ ७४ ॥ कर्वतु जातसे सैरा ॥ परी कर्वतती दोन्ही धारा ॥ तैसा संग्रामु अवधारा ॥ परस्परें ॥ ७५ ॥ स्मशान वैराग्य धरणें ॥ तरी कायसें राज्याचें कारणें ॥ मागुता वनवासु सेवनें ॥ साही जणीं ॥ ७६ ॥ आमुची संगति ऐसी ॥ जें दुःख न धरावें मानसीं ॥ ऐसें बोले हृषीकेशी ॥ तयांप्रती ॥ ७७ ॥ तंव भीम बोलिला वचनीं ॥ हे सर्व माया तुझी करणी ॥ जें जें असेल तुझ्या मनीं ॥ तैसें वर्तूं आह्मी ॥ ७८ ॥ तंव ह्माळसेनाचा वीरीं ॥ तेंहीं विनविला श्रीहरी ॥ तूं अव्यायु मुरारी ॥ परमपुरुषू ॥ ७९ ॥ आतां आह्मां आशिर्वाद देणें ॥ तुवां पांडवाचें साह्य करणें ॥ अनाथांसी रक्षणें ॥ तुझ्या चरणीं ॥ ८० ॥ मग तेही आज्ञा घेउनी ॥ पांडवांसी पुसोनी ॥ मागा काय करील करणी ॥ नारायणू ॥ ८१ ॥ नामा विष्णुदास विनवितू ॥ तो लाघवी श्रीअनंतू ॥ कौरवां करूनि निःपातू ॥ जय देणें पांडवा ॥ २८२ ॥

---

## शिवरात्रीचे अभंग.

॥ २२५२ ॥ कैलासीचा देव भोळा चक्रवर्ती ॥ पार्वतीचा पति योगिराज ॥ १ ॥ तयाचिया पाया माझे दंडवत ॥ घडो आणि चित्त जडो नामीं ॥ २ ॥ जटाजुट गंगा अर्धचंद्र भाळीं ॥ तीन नेत्र ज्वाळी जातवेद ॥ ३ ॥ कंठीं काळकूट डांका शूळ हातीं ॥ सर्वांगीं विभूति साजतसे ॥ ४ ॥ गळां रुंडमाळा खापर हस्तकीं ॥ रामनाम मुखीं सर्वकाळ ॥ ५ ॥ व्याघ्रचर्मधारी स्मशानीं राहिला ॥ संगे भूतमेळा विराजीत ॥ ६ ॥ नामा ह्मणे नामें नासोनीयां पाप ॥ करी स्पष्टरूप भक्तांलागीं ॥ ७ ॥

॥ २२५३ ॥ डवरला गिरि कैलास धवला ॥ सिंहासन ज्वाला धवलेची ॥ १ ॥ पाहतां पाहतां निवती लोचन ॥ भव्य ज्याचें ध्यान एकरूप ॥ २ ॥ धवळा सर्वांगीं देव तो आपण ॥ लेइला भूषण तेंही तैसें ॥ ३ ॥ पर्वताची बाळा पार्वती धवळी ॥ अर्धांगीं शोभली एकरूप ॥ ४ ॥ सर्वांगीं लाविली धवळी विभुती ॥ माळा विराजती स्फटिकाच्या ॥ ५ ॥ पांढ-

॥ २ ॥ शिष्यें केलें पाप भोगावें गुरूनें ॥ स्त्रीनें केलें घेणें पुरुषासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे जन मायेंत गुंतले ॥ सेखीं खाती झोले संसाराचे ॥ ४ ॥

॥ २२६४ ॥ ऐसें बहुत काळ लोटलीयावरी ॥ पुण्याची सामोग्री हरपली ॥ १ ॥ मरोनिया जन्म हरणाचा पावला ॥ पतिव्रता झाल्या कुरंगिणी ॥ २ ॥ प्रारब्धाचा भोग सुटेना कोणासी ॥ केली जैसीं तैसीं घ्यावीं फळें ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवीं कृपा घडे जरी ॥ सुटावें तोंवरी भोग खरा ॥ ४ ॥

॥ २२६५ ॥ होउनी हरण राहिला ते वनीं ॥ दोघी त्या हरिणी स्त्रिया झाल्या ॥ १ ॥ जातीच्या स्वभावें करिती विहार ॥ चित्त झालें इष्ट एकमेकां ॥ २ ॥ धाकुटीला दोन्हीं पाडसें गोजिरीं ॥ दुजी गरोदरी पूर्ण मास ॥ ३ ॥ नामा ह्मणे पुढें काय झाली गती ॥ कथेची संगति ऐका वरी ॥ ४ ॥

॥ २२६६ ॥ देवलोकीं इंद्र शेवेसी सादर ॥ भूतसेन चाकर होता तेथें ॥ १ ॥ सेवेसी चुकतां होय तूं किरात ॥ ऐसें इंद्रें सातें शापीयेलें ॥ २ ॥ शेज सज्ज करितां अंतर पडिलें ॥ ह्मणोनी घडले भोग सासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे सेवा करणें हें कटीण ॥ साणें व्हावें जाण सावधान ॥ ४ ॥

॥ २२६७ ॥ ऐकतांची शब्द होउनी किरात ॥ राहिला निवांत एके ग्रामीं ॥ १ ॥ पाळणपोषण विषयांची वोढी ॥ करीतसे जोडी पातकाची ॥ २ ॥ चांडाळ भिल्लनाम घेतलें ठेउनी ॥ दुष्टभाव मनीं वाढविला ॥ ३ ॥ पासिकें वागुरा हातीं स्थूळ दंड ॥ सामोग्री उदंड मेळविली ॥ ४ ॥ हिंडे नाना वन पर्वत शिखरें ॥ मारीतसे फार जीवजंतू ॥ ५ ॥ जातीचा स्वभाव लागला तयासी ॥ कष्टे अहर्निशीं ह्मणे नामा ॥ ६ ॥

॥ २२६८ ॥ ऐसें असतां तो सरूं आला काळ ॥ प्रारब्धीचें बळ कैसें पाहा ॥ १ ॥ हिंडतां हिंडतां फार कष्टि झाला ॥ दृष्टीस तयाला न पडे कांहीं ॥ २ ॥ दरेदरी मोठ्या पर्वताच्यावरी ॥ वेंघोनियां करी नाना युक्ती ॥ ३ ॥ झाली सांजवेळ न मिळे आमीष ॥ होउनी उदास राहिलासे ॥ ४ ॥ नामा ह्मणे मग काय साणें केलें ॥ ऐकावें निश्चळें संतजनीं ॥ ५ ॥

॥ २२६९ ॥ मार्ग तो राहिला जाऊं कोणीकडे ॥ आमीष न जोडे काय कीजे ॥ १ ॥ चिंताज्वरें फार तापलें अंतर ॥ क्षुधेचा आडदर पोटामध्यें ॥ २ ॥ रिक्त जाऊं तरी कांहीं नाहीं घरीं ॥ वाट पाहे नारी दारापुढें ॥ ३ ॥ पाहूं जातां कांहीं नाठवे विचार ॥ तेणें स्थिरास्थिर पाय टाकी ॥ ४ ॥ नामा ह्मणे तेव्हां देखे सरोवर ॥ कांहींसा विचार कळों लागे ॥ ५ ॥

॥ २२७० ॥ भोंवतालें जाळें घाली नेटेंपाटें ॥ हस्तकीं तिखट बाण धरी ॥ १ ॥ येथील उदक पानासीं सावजें ॥ पाहे त्याचे व्याजें रोखोनियां ॥ २ ॥ तेथें एक बिल्ववृक्ष महाथोर ॥ वेंघोनियां त्यावर बैसलासें ॥ ३ ॥ डोळ्याआड आली ह्मणोनियां तोडी ॥ अंतरीं आवडी आमीषाची ॥ ४ ॥ बकाचियेपरी ध्यानस्थ राहिला ॥ जीविंचा जिव्हाळा वेगळाची ॥ ५ ॥ नामा ह्मणे कैसी देवाची नव्हाळी ॥ न करितां झाली देवपूजा ॥ ६ ॥

॥ २२७१ ॥ बहुता काळाचें तेथें एक लिंग ॥ होतें भूमि भाग होऊनियां ॥ १ ॥ भोळा महादेव तेणें संतोषला ॥ ह्मणे करी मला कोण पूजा ॥ २ ॥ लक्षवरी बिल्वदळें माथा पाहें ॥ आनंद न माये नामदेवा ॥ ३ ॥ नामा ह्मणे पाहे निमिषाची वाट ॥ पुराणीं बोभाट ऐसे साचे ॥ ४ ॥

॥ २२७२ ॥ पुराणीं पवाडे जयाचे अपार ॥ ऐकतां नानाचार सुख वाटे ॥ १ ॥ भोळा माझा देव पाहे भोळा भाव ॥ एकसरे जीव उद्धराया ॥ २ ॥ रावण मार्गों गेला पार्वती कारणें ॥ देते वेळे नेणें कैसें द्यावें ॥ ३ ॥ जातीची चांडाळी गोकर्णासी गेली ॥ दर्शनें ते नेली कैलासासी ॥ ४ ॥ नामा ह्मणे कैसें दैव या भिल्लाचें ॥ आलें पूजनाचें फळ हातां ॥ ५ ॥

॥ २२७३ ॥ माथां पडतां पाला ॥ सांब तेणें संतोषला ॥ १ ॥ होता प्राचीनाचा ठेवा ॥ बहु दुर्लभ मानवा ॥ २ ॥ काय भक्तीचा जीव्हाळा ॥ काय त्याचे अंगीं कळा ॥ ३ ॥ बहु केलीं दुष्ट कर्मे ॥ सेखी तोची झाला धर्म ॥ ४ ॥ नामा ह्मणे भोळादेव ॥ सांगायाचा हाची भाव ॥ ५ ॥

॥ २२७४ ॥ इतुकीयासाठीं ॥ बहु तुष्टला धूर्जटी ॥ १ ॥ काय सांगावा विचार ॥ दैव पारध्याचें थोर ॥ २ ॥ झाली तीन प्रहर निशी ॥ पूजा पावली देवासी ॥ ३ ॥ धाडीयेलें यमाला ॥ सुखी कराया तयाला ॥ ४ ॥ आला तो धांवत ॥ माग ह्मणे आपेक्षीत ॥ ५ ॥ साची विषयिक

बुद्धि ॥ पुढें आली तया संधी ॥ ६ ॥ जें जें याचकें मागावें ॥ तें तें दातयानें द्यावें ॥ ७ ॥ काय मागीतलें तेणें ॥ तेंची नामा ऐका ह्मणे ॥ ८ ॥

॥ २२७५ ॥ येउनीयां यम ठाकला पुढारीं ॥ पाहे दुराचारी दुरोनीयां ॥ १ ॥ घाबरला मनीं कोण ऐसें नेणें ॥ विचारितां मन भांबावलें ॥ २ ॥ पुसों लागे साला कोण तूं आलासी ॥ आणिक ह्मणशी माग कांहीं ॥ ३ ॥ देव किंवा यक्ष राक्षस किन्नर ॥ करितां निर्धार नपडे ठायीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे मूर्ख पारधी तो खरा ॥ दैव त्याच्या घरा आलें जाण ॥ ५ ॥

॥ २२७६ ॥ जाणोनीयां यम संतोषला मनीं ॥ मंजुळ वचनीं काय बोले ॥ १ ॥ केली देवें कृपा पाठविलें मज ॥ वरदान तुज द्यावयासी ॥ २ ॥ सर्व ही जीवाचा नियंता मी यम ॥ इच्छिसी तो काम पूर्ण करूं ॥ ३ ॥ शिवरात्री आजी उपवास केला ॥ शंकर पूजीला बिल्वदळीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें ऐकतां वचन ॥ पारध्याचें मन सुखावलें ॥ ५ ॥

॥ २२७७ ॥ जोडोनीयां हात वंदिला कृतांत ॥ ह्मणे माझा हेत येथलाची ॥ १ ॥ स्वर्गसुखाहुनी हेंची वाटे गोड ॥ संसाराची ओढ मोडवेना ॥ २ ॥ मृगा पक्षी याचें कळावें बोलणें ॥ सर्व कांहीं येणें साधकातें ॥ ३ ॥ येथुली हे आहे आमुची वासना ॥ पुरवुनी स्वस्थाना जावें आतां ॥ ४ ॥ नामा ह्मणे ज्याची जे कांहीं वासना ॥ तेची पुढें जाणा उभी ठाके ॥ ५ ॥

॥ २२७८ ॥ देउनीयां वर दंडपाणी गेला ॥ ध्यास पारध्याला मृगाचाची ॥ १ ॥ लाउनीयां चित्त ऐके चळवळ ॥ दृष्टीचें कळवळ लक्ष तेथें ॥ २ ॥ उगवला दीन जाहला प्रकाश ॥ मृगा पक्षीयास दृष्टि झाली ॥ ३ ॥ तोंची मृग पाहा आला उदकासी ॥ उड्डाण गगनासी साधीतसे ॥ ४ ॥ तृषाक्रांत मोठा चालीला निःसंग ॥ प्रारब्धाचा भोग ओढवला ॥ ५ ॥ उदकाचीये हांवें दृष्टि घाली दूर ॥ पाश तो समोर पाहीचना ॥ ६ ॥ येउनीयां पडे जाळ या माझारी ॥ लोळे पृथ्वीवरी एकसरा ॥ ७ ॥ नामा ह्मणे भिल्ल पाहातां लोचनीं ॥ वोढोनीयां गुणीं बाण लावी ॥ ८ ॥

॥ २२७९ ॥ घाव घालुं जातां देखीलें नवल ॥ पाहातसे खळ दुष्टभावें ॥ १ ॥ परी तें होणार कदापी चुकेना ॥ तैसीच वासना धांव घाली ॥ २ ॥ धाकुटी हरणी पाडसें धाकुटीं ॥ सांडी उठाउठी आली तेथें ॥ ३ ॥ पाहों जाता पाशीं गुंतला तो मृग ॥ तेव्हां काय मग केलें तिणें ॥ ४ ॥ मुखाप्रती मुख लाउनी चुंबिलें ॥ हृदय फुटलें देखतांची ॥ ५ ॥ सुख दुःख बोल बोलती ते वेळीं ॥ ह्मणती कपाळीं भोग होता ॥ ६ ॥ सोडविता कोणी न दीसे ये काळीं ॥ काळाची पडली उडी आतां ॥ ७ ॥ नामा ह्मणे खळा कळे त्याची वाणी ॥ ऐकाया लागुनी स्थिर झाला ॥ ८ ॥

॥ २२८० ॥ धर्मशास्त्र नीत बोलती ते बोल ॥ तेणें चोजवलें चित्त त्याचें ॥ १ ॥ आश्चर्याच्या डोहीं बुडाला पारधी ॥ ह्मणे कैसी बुद्धि याची पाहा ॥ २ ॥ रानीची रानवटें तया एवढें ज्ञान ॥ प्रेमेची जीवन वोसंडत ॥ ३ ॥ चाकाटली वृत्ति चित्त केलें स्थिर ॥ दोघांचीं उत्तरें ऐकतसे ॥ ४ ॥ नामा ह्मणे हरणीहरणाचा संवाद ॥ ऐकतां भवबंध तुटताहे ॥ ५ ॥

॥ २२८१ ॥ बंधनीं गुंतला देखोनीयां पती ॥ उडालीसे वृत्ति हरणीची ॥ १ ॥ देहाची ते आस सांडोनीयां लवलाही ॥ पडे रडे कांहीं बोल बोले ॥ २ ॥ ह्मणे तुह्मीं आतां नव जावें एकलें ॥ संगें आह्मां नेलें पाहिजे जी ॥ ३ ॥ बहुता जन्माची तुह्मां आह्मां गांठी ॥ कैसी आतां तुटी पाडीतसां ॥ ४ ॥ भोग जे भोगिले स्वप्न ऐसी झाली ॥ नाहींच पुरली वासना ते ॥ ५ ॥ नामा ह्मणे विषय वासना वोंगळ ॥ तेणें कोण्या काळें सुटीजेना ॥ ६ ॥

॥ २२८२ ॥ देखतांची कांता दुःखी झाला फार ॥ डोंगरची वर कोसळला ॥ १ ॥ बोलतां तियेसी न निघती बोल ॥ ऐसा ही ते वेळे अवधारी ॥ २ ॥ नको आतां पडूं मायेचीये भरी ॥ जाये वो सुंदरी स्वस्थाना ॥ ३ ॥ माझी गति मज तुझी गति तुज ॥ कांहींसे ते त्याज प्राण देसी ॥ ४ ॥ घरीं तुझी बाळें गोजिरीं गोमटीं ॥ जाउनीया पोटीं धरीं त्यांसी ॥ ५ ॥ न लावी उशीर जाइ बा माघारी ॥ जो तो दुराचारी न देखतां ॥ ६ ॥ बाळाचें पाळण तो स्त्रीयांचा धर्म ॥ सांगतसे वर्म जार आतां ॥ ७ ॥ माझीया प्रारब्धीं होतें तैसें झालें ॥ तूं काय अवले प्राण

देसी ॥ ८ ॥ नामा ह्मणे ऐसें सांगे तिच्या हिता ॥ परी तें नाइकतां कष्टी होय ॥ ९ ॥

॥ २२८३ ॥ नेत्रीं अश्रुधारा पडती अपार ॥ तेणें पृथ्वीवर पूर वाहे ॥ १ ॥ ह्मणे तुह्मांवीण कैसा प्राण धरूं ॥ वांचुनीयां करूं काय आतां ॥ २ ॥ माझिया भारानें दाटेल मेदिनी ॥ तुह्मां आव्हेरुनी गेल्या जरी ॥ ३ ॥ सुखाचे सांगातीं होतों दोघीजणी ॥ दुःख ह्मणवुनी सांडी कीजे ॥ ४ ॥ सांडिलिया तुह्मां देवासी मानेल ॥ वेदशास्त्र बोल हाकारिती ॥ ५ ॥ तुजवीण क्षण कंठवेना काळ ॥ मीना जैसें जळ तैसें आह्मां ॥ ६ ॥ तुजवीण जीणें व्यर्थ या संसारीं ॥ नामा ह्मणे खरी गोष्ट बोले ॥ ७ ॥

॥ २२८४ ॥ चांडाळभिल्ल तेणें ऐकिलें बोलणें ॥ सावधान मनें करोनियां ॥ १ ॥ तेव्हां होती चित्तीं वासना जे खोटी ॥ जीरउनी पोटीं चाकाटला ॥ २ ॥ भीतिल यालागीं वृक्षा आड झाला ॥ ऐकों जो लागला शब्द त्यांचे ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसा राहिला पारधी ॥ ऐकावें ते संधि काय झालें ॥ ४ ॥

॥ २२८५ ॥ दुसरी जे होती गर्भिण कुरंगी ॥ तेही लागवेगीं आली तेथें ॥ १ ॥ आहा ऐसें काय केलें वो साजणी ॥ नयेसी अझुनी कोंपटासी ॥ २ ॥ लहान पाडसें आक्रंदति भूकें ॥ कैसी येथें सुखें राहिलीस ॥ ३ ॥ जाई लवलाही त्यांसी स्तन देई ॥ सांगू आतां कांहीं बोलवेना ॥ ४ ॥ नामा ह्मणे धन्य तयाचें सौजन्य ॥ नाहीं भावभिन्न कोणामाजीं ॥ ५ ॥

॥ २२८६ ॥ येरी ह्मणे काय करूं वो सुंदरी ॥ आतां आहे घरीं काय माझें ॥ १ ॥ प्राणनाथें जाणें केलें स्वर्गलोका ॥ जाईन मी देखा तयासंगें ॥ २ ॥ वडीलपणें तुह्मीं लोभ असों द्यावा ॥ सांभाळ करावा बाळकांचा ॥ ३ ॥ वागुरे माझारी गुंतलासे कांत ॥ कायसें जीवित विचारीं पां ॥ ४ ॥ न लावी उशीर जाई येचक्षणीं ॥ अससी गर्भिणी पूर्ण मास ॥ ५ ॥ जरी देसी प्राण पतन गर्भासी ॥ होय ते दोषासी पात्र होसी ॥ ६ ॥ पोसोनियां बाळें वाढवी वंशाला ॥ द्यावें चित्त बोला माझ्या आतां ॥ ७ ॥ पळावया तुज नाहीं अंगीं बळ ॥ न देखतां खळ जाई वेगीं ॥ ८ ॥ नामा ह्मणे ऐसीं उत्तरें ऐकिलीं ॥ तेही घाबरली तयेवेळे ॥ ९ ॥

॥ २२८७ ॥ आहो गेला जीव झाला कासावीस ॥ ह्मणे झालें कैसें अकस्मात ॥ १ ॥ आहो कपाळीचा भोग वोढवला ॥ कांत तो निघाला सांडोनियां ॥ २ ॥ कैंची बाळें कोण कोणाची सांगाती ॥ पाहातां हे भ्रांति वाउगीची ॥ ३ ॥ ठायींची हे काया जायाची जाईल ॥ वांचलिया केवळ पतिविण ॥ ४ ॥ पतीवीण सुख काय या संसारीं ॥ दुःख कल्पवरी भोगावें कीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसें चिंतोनियां मनीं ॥ आली ती तत्क्षणीं हरणापाशीं ॥ ६ ॥

॥ २२८८ ॥ कपाळीं कपाळ लावी चुंबी रडे ॥ आक्रंदोनी पडे पृथ्वी-वरी ॥ १ ॥ आवडीचें चिन्ह सांगवेना वाचे ॥ जाणावें जयाचें त्याचे त्यांनीं ॥ २ ॥ मानेवरी मान टाकुनी राहिली ॥ वाचाही खुंटली बोल-वेना ॥ ३ ॥ आह्मीं तुजवीण न राहूं क्षणभरी ॥ उदास न करीं चित्त आतां ॥ ४ ॥ नामा ह्मणे मृगजन्म त्यांचा खरा ॥ लक्षितां विचारा ज्ञानें बहू ॥ ५ ॥

॥ २२८९ ॥ पट्टाची मी राणी वडील मानाची ॥ जे गति मृगाची तेचि मज ॥ १ ॥ जाईन सांगातें न सोडी संगती ॥ निश्चय हा चित्तीं दृढ केला ॥ २ ॥ तुझी बाळें घरीं कष्टती क्षुधेनें ॥ जाई वेगीं स्तनपान देई ॥ ३ ॥ बाळांकडे जाई पाहें कंठी काळ ॥ न करीं उतावीळ मन आतां ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसें संवादले फार ॥ तिघांचें अंतर एकविध ॥ ५ ॥

॥ २२९० ॥ ऐशा दोघीजणी एकविध भावें ॥ द्यावयासी जीव उभ्या ठेल्या ॥ १ ॥ धन्य धन्य त्यांचा संसार सफळ ॥ सत्वाचेंची बळ अंगामधीं ॥ २ ॥ पाजूनियां येई बाळकासी स्तन ॥ आह्मी दोघेजण येथें असों ॥ ३ ॥ न टाका मजला सांगोनी निघाली ॥ बिऱ्हाडासी आली लागवेगें ॥ ४ ॥ घेऊनियां अंकीं पाडसें तीं दोन्ही ॥ लावूनिया स्तनीं शोक करी ॥ ५ ॥ एकमेकें सुखें राहावें अनन्य ॥ तुटलें सौजन्य तुह्मां आह्मां ॥ ६ ॥ पति पडिलासे फांसी सांडीतसे प्राण ॥ आह्मांलागीं जाणे त्याच्या संगें ॥ ७ ॥ हृदयीं धरोनी दिधलें चुंबन ॥ तीं ह्मणती कोण पोशी आह्मां ॥ ८ ॥ येऊं तुह्मांसंगें देऊं आधीं प्राण ॥ पुढील कारण तुह्मीं पाहा ॥ ९ ॥ नामा ह्मणे ऐसी पांच होती एक ॥ देखोनी कौतुक वाटतसे ॥ १० ॥

॥ २२९१ ॥ निघोनियां देखा आलीं सा तटाका ॥ झाली एकमेकां भेटी तेथें ॥ १ ॥ परस्परें दुःख देखतां वाढलें ॥ धैर्याचेंची बळ केलें त्यांनीं ॥ २ ॥ देहभाव कांहीं नाठवे तयांसी ॥ गुंतोनी मोहासी जीव देती ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवें सोडवावें त्यांसी ॥ हें तो अनेकासी आटोपेना ॥ ४ ॥

॥ २२९२ ॥ पारधी तो झड घालोनी पातला ॥ घालावया घाला एकसरें ॥ १ ॥ भयाभीत झालीं पांचही ते काळीं ॥ वासना गुंतली एकमेकां ॥ २ ॥ वरील कुरंगी येउनी त्यापाशीं ॥ लागोनी पायांसी काय बोले ॥ ३ ॥ नको मारूं पति तृषेनें पीडिला ॥ मारी तूं मजला त्याज आधीं ॥ ४ ॥ आहेवपणानें धाडीं स्वर्गलोका ॥ येतुल्यानें सुखा पात्र होऊं ॥ ५ ॥ इतुकीयामाजी दुसरीही आली ॥ ते ह्मणे उराली थांब आतां ॥ ६ ॥ तृषेनें पीडिलों पाजीं आधीं पाणी ॥ मग जैसा धनी तैसें करी ॥ ७ ॥ नामा ह्मणे भिल्ल विसरला घात ॥ राहिला निवांत सांच्या बोले ॥ ८ ॥

॥ २२९३ ॥ वडील कुरंगी काय बोले त्यासी ॥ सांगतें धर्मासी पुर्वीलीया ॥ १ ॥ बांधोनी मारितां घडे महादोष ॥ पाजी उदकास सोडोनीयां ॥ २ ॥ पिउनीयां जळ येऊं तुजपाशीं ॥ मग सावकासी करी काज ॥ ३ ॥ आमुचा विश्वास नाहीं तुज जरी ॥ मागशी सापरी भाक देऊं ॥ ४ ॥ पर उपकारी पडतसे देह ॥ लोभ आतां काय वांचुनीयां ॥ ५ ॥ भुकेलीया अन्न तान्हेल्या जीवन ॥ पुण्यासी कारण इतुकेंची ॥ ६ ॥ पांचजणीं तुज वोपीयेले देह ॥ यालागीं संदेह न धरावा ॥ ७ ॥ नामा ह्मणे ऐसा प्रार्थितां किरात ॥ द्रवला मनांत काय बोलें ॥ ८ ॥

॥ २२९४ ॥ होउनीयां तुह्मीं वनीचीं वनचरें ॥ बोलतसां फार धर्माधर्म ॥ १ ॥ येणें कांहीं कांहीं द्रव आला मना ॥ तुमची भावना कोण जाणे ॥ २ ॥ सोडिल्या पाण्यासी टाकुनी आह्मांसी ॥ गेलीया तुह्मांसी काय कीजे ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसें बोलोनी किरात ॥ करावया घात शस्त्र काढी ॥ ४ ॥

॥ २२९५ ॥ देखती तीं दोन्हीं पाडसें त्याकाळीं ॥ भिल्लापुढें आलीं लागवगें ॥ १ ॥ सांभाळोनी हात ऐकावी विनंती ॥ धरीं कृपा चित्तीं आमुचीया ॥ २ ॥ अतीतालागोनी चिलिया वोपी देहे ॥ तेणेची तों

लाहे परधाम ॥ ३ ॥ मातापितरांसी न करावा घात ॥ मारावें आमुतें आधीं आतां ॥ ४ ॥ कोंवळें शरीर गोड बहु मास ॥ लागो सार्थकास तुझे काजीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे सत्व मोठें त्या पांचाचें ॥ होती कैलासीचे अधिकारी ॥ ६ ॥

॥ २२९६ ॥ हरणी सांगे कांहीं कर्मविपाकासी ॥ ऐशा ऐशा दोषीं ऐसे होती ॥ १ ॥ टाकुनीयां आह्मीं तुज जाऊं जरी ॥ अंधतमाभितरी वास पावों ॥ २ ॥ गुरु स्वामि द्रोही विश्वासघातकी ॥ तयास तो नरकीं वास सदां ॥ ३ ॥ परद्रोही परनिंदेसी रतला ॥ तो होय कावळा जन्मोजन्मीं ॥ ४ ॥ पंक्तिभेदकेची मरतील पोरें ॥ किंवा पती मरे बाळपणीं ॥ ५ ॥ सदांसर्वकाळ दुष्ट कर्मी रत ॥ शूकरादी होत नीच योनी ॥ ६ ॥ अतीत अभ्यागत पूजा नाहीं ज्याला ॥ घूस सर्प बिळामाजीं होती ॥ ७ ॥ नामा ह्मणे केलें तैसें तें भोगावें ॥ सावधान व्हावें जाणत्यांनीं ॥ ८ ॥

॥ २२९७ ॥ पापिष्टाचें जीणें काय तेजीयलें ॥ गळा स्तन झाले शेळीयेचे ॥ १ ॥ येथेंची जो खोटा तेथें तो करंटा ॥ व्यर्थ आला पोटा माउलीच्या ॥ २ ॥ तप्त ताम्र भूमि लोळवी तिसरा ॥ लोटिती अघोरा नरकामाजीं ॥ ३ ॥ लोहोचंचुकाग टोंचिती येवोनी ॥ मारिताती घणीं माथां घाव ॥ ४ ॥ बांधोनियां गळां टांगिती उफराटें ॥ हाणताती सोटे वरिच्यावरी ॥ ५ ॥ आसीपत्रावरी वोढिती धरोनी ॥ लोटिती नेउनी कुंभपाकीं ॥ ६ ॥ जळतीया खांबा भेटवीती बळें ॥ खैराच्या इंगळे नाहाविती ॥ ७ ॥ प्रळय शूर सर्प झोंबती कंठेसी ॥ ओढोनी जिव्हेसी खंड करिती ॥ ८ ॥ नामा ह्मणे ऐसी पापिष्टाची गती ॥ जन्म लक्ष शतीं हेंची फळ ॥ ९ ॥

॥ २२९८ ॥ न करूं आह्मीं तैसें घेईं आतां भाक ॥ अंतरीं निःशंक झालों सर्व ॥ १ ॥ तुह्मां आह्मां साक्षी असे सदाशीव ॥ येथें दुजा भाव धरूं नको ॥ २ ॥ पिउनीयां पाणी न येऊं तुजपाशीं ॥ तरी घडो आह्मांसी सर्व पापें ॥ ३ ॥ जातीचा ब्राह्मण न करी ब्रह्मकर्म ॥ तो जैसा अधम तैसे आह्मीं ॥ ४ ॥ स्वामिद्रोही आणि विश्वासघातकी ॥ तो पडे ज्या नरकीं तेथें पडों ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐसी वाहोनियां आण ॥ धरीले चरण पारध्याचे ॥ ६ ॥

॥ २२९९ ॥ पारधीयासी तेव्हां दाटला गहींवर ॥ लोटलें अपार प्रेम तेव्हां ॥ १ ॥ जीवदान दिल्हें जावें तुह्मीं आतां ॥ न करावी चिंता कांहीं येथें ॥ २ ॥ इंद्राचा मी दूत चुकलों सेवेसी ॥ यालागीं जन्मासी आलों जाणा ॥ ३ ॥ तुमचीया बोलें निवालें अंतर ॥ ऐसें इतःपर न करीं कांहीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे शुभकाळ त्याचा आला ॥ ह्मणवोनी झाला पश्चात्ताप ॥ ५ ॥

॥ २३०० ॥ सोडोनियां गळा मुक्त केलें त्यांसी ॥ पिउनी उदकासी आली पुढती ॥ १ ॥ क्षुधेलासी फार न लावीं उशीर ॥ घेउनीयां शस्त्र ह्मणी वेगीं ॥ २ ॥ घर तुझें दूर वाहावेना भार ॥ आह्मी तेथवर येत असों ॥ ३ ॥ सत्यत्व देखोनी ह्मणतसे पारधी ॥ तुह्मांसी न वधीं जावें आतां ॥ ४ ॥ पाठोवाटी त्याच्या घरालागीं आल्या ॥ चरणीं घातल्या मिठ्या त्यांनीं ॥ ५ ॥ नामा ह्मणे सत्व आगळें पांचाचें ॥ वर्णावया वाचे नव्हे शेषा ॥ ६ ॥

॥ २३०१ ॥ हरिश्चंद्र राजा सत्वनिष्ठ मोठा ॥ स्त्रीपुत्र चोहोटामाजीं विकी ॥ १ ॥ तैसेंची येथें मृगाअंगीं सत्व ॥ वोपीयेला जीव पारध्यासी ॥ २ ॥ शिबीराजा अंग कापी नेटपाटें ॥ सत्वासी पालट होऊं नेदी ॥ ३ ॥ ताम्रध्वजा शिरीं कर्वत घातला ॥ नाहीं पालटला मनोधर्मा ॥ ४ ॥ नामा ह्मणे मागें बहुतीं केली कीर्ती ॥ तयां ऐसी रीति येथें दिसे ॥ ५ ॥

॥ २३०२ ॥ आधींच कृपाळू भोळा महादेव ॥ जाणीतला भाव कुरंगांचा ॥ १ ॥ कृपा केली देवें मांडिला सन्मान ॥ धाडिलें विमान दुताहातीं ॥ २ ॥ लखलखीत टके पताका हालती ॥ तयामाजीं होती गीत नृत्य ॥ ३ ॥ नाना सुमनाची शय्या आरुवार ॥ करिती उपचार सिद्धि आठ ॥ ४ ॥ आले अकस्मात तयाचीयेपाशीं ॥ पाहातां सर्वांसी नवल वाटे ॥ ५ ॥ दिव्य देह झाले पांचाचे ते काळीं ॥ विमानीं बैसलीं लागवेगें ॥ ६ ॥ पारधी देखोनी तटस्थ राहिला ॥ दूतीं तया केला उपदेश ॥ ७ ॥ शिवरात्री आजी जागरण उपवास ॥ केला तेणें दोष सर्व गेला ॥ ८ ॥ करोनी पारणें होई शिवभक्त ॥ आशापाशीं चित्त गोवूं नको ॥ ९ ॥ अखंड कीर्तन शिवनामाचें करीं ॥ तेणें मोक्षपुरी पावसील ॥ १० ॥ पुढिल्या शिवरात्री नेऊं कैलासासी ॥ सांगोनियां त्यासी गेले वेगीं

॥ ११ ॥ नामा ह्मणे मोक्ष झाला त्या पांचासी ॥ वस्ति चंद्रापाशीं केली त्यांनीं ॥ १२ ॥

॥ २३०३ ॥ तेणें उपदेशें पारध्यासी ज्ञान ॥ करीतो कीर्तन नामघोषें ॥ १ ॥ संचिताचा नाश क्रियमाण बुडविलें ॥ सहज त्या जोडलें मोक्ष सुख ॥ २ ॥ दुसऱ्या शिवरात्री पूजिलें शंकरा ॥ करोनियां बरा भाव शुद्ध ॥ ३ ॥ विमानीं वाहोनी स्वस्थानीं स्थापिला ॥ येथुनी संपला कथाभाग ॥ ४ ॥ नामा ह्मणे शिव विष्णु एक रूप ॥ जाणोनियां जप करा त्यांचा ॥ ५ ॥

॥ २३०४ ॥ शिवरात्री कथा धन्य जे ऐकती ॥ इच्छिलें पावती सर्व कांहीं ॥ १ ॥ पातकाचा नाश पुण्य वाढे फार ॥ शेवीं विश्वंभर कृपा करी ॥ २ ॥ भोग भोग्य ज्ञान वाढेल संतान ॥ काळ करी चरणसेवा त्यांची ॥ ३ ॥ नामा ह्मणे शिव अक्षरें हीं दोन्हीं ॥ जपावीं सज्जनीं वारंवार ॥ ४ ॥

॥ २३०५ ॥ नामाचा महिमा कोण जाणें सीमा ॥ चतुर्मुखें ब्रह्मा नेणें कांहीं ॥ १ ॥ संसारा आलीया हेची करा जोडी ॥ अखंड घ्यावी गोडी हरिनामें ॥ २ ॥ सहस्रमुखें शेष वाखाणितां कीर्ती ॥ नाहीं तया तृप्ति आजीवरी ॥ ३ ॥ पशु पक्षी तृण कीटक अपार ॥ नामें गेलें पार उतरोनी ॥ ४ ॥ कापुराचे राशी पडे अग्निकण ॥ तैसें नाम जाण पातकासी ॥ ५ ॥ नामाग्नीनें दोष जळती एकसरा ॥ कैवल्य ये घरा बसल्या ठायीं ॥ ६ ॥ नामा ह्मणे धन्य नामाचा प्रताप ॥ ध्यातां एक रूपदेव-भक्त ॥ ७ ॥

॥ २३०६ ॥ लिंगपुराणीं हा बोलिला इतिहास ॥ तोचि म्यां तुह्मांस निवेदिला ॥ १ ॥ अनेक पुराणीं अनेक प्रकार ॥ तारावया नर नाना रीती ॥ २ ॥ मुख्य हेचि कथा शिवरात्रीची जाणा ॥ कैलासीचा राणा तोष पावे ॥ ३ ॥ नामा ह्मणे मन करोनी निश्चळ ॥ करा गदारोळ हरि-कथा ॥ ४ ॥

॥ २३०७ ॥ सदां सोमवारीं विभूति लावून शिरीं ॥ तुमच्या मंदिरीं आलाप करी ॥ १ ॥ शंकरा त्रिपुरारी हरि उच्चारी ॥ ह्मणती षडाक्षरी पावें मज ॥ २ ॥ हरहर ॐनमो शिवाय हर हर जय जय ॥ नाहीं भवभय तुझेनी नामें ॥ ३ ॥ करिती शिवरात्री वाहती बेलपत्री ॥ प्रगट होऊनी गाती भक्ति-

भावें ॥ ४ ॥ बोलती सत्कीर्ति जिंकिलें पवित्रीं ॥ हर नाम मंत्री तुज पूजिती ॥ ५ ॥ रुद्राक्षाच्या माळा घालुनीयां गळां ॥ तो तुह्मां जवळा सर्वमान्य ॥ ६ ॥ शिव शंभु भोळा बहुतां पुण्यें जोडला ॥ पावे जाश्वनीळा ह्मणे नामा ॥ ७ ॥

॥ २३०८ ॥ जाऊं पाण्या नि सुरवाण्या ॥ आळवीतो गोड राण्या ॥ गोविंद गीतीं गाऊं ॥ आनंदें जाऊं पाण्या ॥ खाऊं कंदमुळें आह्मी असों वनीं ॥ न देखों गोविंद न ऐकों कानीं ॥ १ ॥ आह्मीं गोड भिल्लिणी काय ऐसी गोडी ॥ तुझिया नामाची लागली आवडी ॥ २ ॥ आजीचा दिवस आह्मां झालासे आनंदू ॥ विष्णुदासनामा यानें लावियेला छंदू ॥ ३ ॥

॥ २३०९ ॥ नरहरि रामा गोविंदा वासुदेवा ॥ धृ० ॥ बाबा अहंकार निसी घनदाट ॥ गुरु वचनीं फुटली पहाट ॥ माता भक्ति भेटली वरवंट ॥ तिनें मार्ग दाविला चोखटगा ॥ १ ॥ एके बोले सुफळ बोलावें ॥ वाचें हरि हरि ह्मणावें ॥ संत समागम धरावे ॥ तेणें ब्रह्मानंद होय आघवागा ॥ २ ॥ आला सीतळ शांतीचा वारा ॥ तेणें सुख झालें या शरीरा ॥ तुटला पातकाचा थारा ॥ कळीकाळासी धाक दरारागा ॥ ३ ॥ अनुहात वाजती टाळ ॥ अनाक्षरीं गीत रसाळ ॥ अनुभव तन्मय सकळ ॥ नामा ह्मणे केशव कृपाळुगा ॥ ४ ॥

## हुंबरी.

॥ २३१० ॥ हमामा हुंबरी देई कान्हो गोवळीया ॥ १ ॥ समस्त मिळोनी गोपाळीं ॥ तया यमुनेच्या पावळी ॥ कृष्णें मांडली धुमाळी ॥ कळंबा तळीं आनंद ॥ २ ॥ वळुनी कांबळया वेटी ॥ सांहीं बांधिल्या मणगटीं ॥ विवाद मांडिला निकटी ॥ धुर्जटी कान्होसी ॥ ३ ॥ आतां कृष्णा कवणे ठायीं ॥ जासी तुजवरी आली डाई ॥ आमची हमामा हुंबरी देई ॥ उभा राहे पै कांगा ॥ ४ ॥ कृष्ण ह्मणे मी एकवदू ॥ तुह्मी आह्मीं गडी वादू ॥ गोवळी घेतलासे हादू ॥ अति निकदू कान्हुसी ॥ ५ ॥ ह्मणे बळिराम पहागा ॥ बोल नव्हे तुह्मा जोगा ॥ तुह्मी समर्थ श्रीरंगा ॥ आह्मां कांगा भेटविसी ॥ ६ ॥ ऐसा सकळीं मान केला ॥ तेव्हां कृष्ण संतोषला ॥ आनंद चित्तासी पावला ॥ ह्मणे भला भला नाम्या ॥ ७ ॥

# गोंधळ.

॥ २३११ ॥ प्रथम अवतारीं आई थोर ख्याति केलीवो ॥ ब्रह्मयाच्या कैवारा आपण मच्छरूप झाली वो ॥ धुंडोळिला सागर आई शंखासुरा मिठी घाली वो ॥ वधिले राक्षस ब्रह्मपुरी स्थापिलें वो ॥ १ ॥ ऐसी बहु लोकां माझारी आई खेळतसे गोंधळीं ॥ तेहतीस कोटि देवता सर्वे मेळवूनी मेळीं ॥ त्रासिले राक्षस भक्त जना प्रतिपाळीं ॥ धृ० ॥ कूर्म वेष धरूनी धरणी पाठीवरी धरिली वो ॥ महेंद्र मंथन मेळीं आई वेगीसी पावली वो ॥ समुद्रमंथन करितां आई बरवा गोंधळ घाली वो ॥ नारायण विश्वरूप देवा जै त्यांच दिधलें वो ॥ २ ॥ वराह रूप धरूनी आई थोर पवाडा केला वो ॥ पृथ्वीच्या कैवारा घालिसी गोंधळ गाढा वो ॥ वधिला हिरण्याक्ष त्याचा केला त्वां रगडावो ॥ खेचर देव ते धरणी धरियली दाढा वो ॥ ३ ॥ विक्राळ रूप धरुनी स्तंभ फोडुनी निघाली वो ॥ सिंहनादें गर्जतां हाक त्रिभुवनीं फुटली वो ॥ वधिला हिरण्यकश्यप अंतर माळा गळां घाली वो ॥ प्ऱ्हादाकारणें कैसी गोंधळी नाचली वो ॥ ४ ॥ इंद्राच्या कैवारा आई साने रूप धरिलें वो ॥ बळिच्या द्वारा जाऊन भूमिदान मागितलें वो ॥ त्रिलोक मोजितां बळिस पाताळीं घातलें वो ॥ मागुता येईल ह्मणवुनी साचें द्वार त्वां रक्षिलें वो ॥ ५ ॥ जमदग्नि रेणुके कुशीं धरियेला अवतार वो ॥ हातीं परशु घेउनी केला दैत्यांचा संहार वो ॥ एकविस वेळ मेदिनी निःक्षत्रिय करुनी फेडिला भूमिभार वो ॥ वधिला सहस्रार्जुन कामधेनूच्या कैवारा वो ॥ ६ ॥ पितृवचनाकारणें आई वनवासासी गेली वो ॥ अठरापद्में वान्नर मिळवुनी गोंधळ घाली वो ॥ वधिला दशशिर लंका दिधली शरणांगता वो ॥ ७ ॥ वसुदेवकुळटिळके तरी तूं कंसासुर मारिके वो ॥ कुळांतकुळ तारिके तरी तूं कौरव संहारिके वो ॥ पांडव प्रतिपाळके कोण गोंधळ वर्णू शके वो ॥ ८ ॥ वेदमार्ग धरूनी देवा दैसीं त्रासिलें वो ॥ साचीया कैवारा आई सौम्यरूप धरिलें वो ॥ बौद्धरूप धरुनी असुरांलागीं मोहिलें वो ॥ कौसल्या देवता जे त्या रूपें त्वां दिधलें वो ॥ ९ ॥ कलियुगाच्या अंतीं थोर होईल अन्नान्नवो ॥ एके ठायीं होउनी खातील चारी वर्ण वो ॥ तेव्हां पृथ्वी भारें तुजला येईल शरण वो ॥ तेव्हां तूं पावसी कलंकी अवतार धरुनी वो ॥ १० ॥ पुंडलिकाकारणें पंढरपुरीं केला वास वो ॥ तुझा गोंधळ गातां थोर जीवास उल्हास वो ॥ तूं माये

माउली तुझा मज बहु विश्वास वो ॥ विनवी विष्णुदास नामा तुझा दासाचा मी दास वो ॥ ११ ॥

## जागर.

॥ २३१२ ॥ कैलास भुवनीं ॥ देव बैसले सिंहासनीं ॥ आपण भवानी ॥ कर जोडुनी उभी असे ॥ १ ॥ भक्तिरस द्यावा ॥ तेथील अनुभव घ्यावा ॥ नित्य हरि जागरू सांगावा ॥ कोण फळ तयाचें ॥ २ ॥ तंव चंद्रचूड संतोषला ॥ देवी प्रश्न बरवा केला ॥ अमृतबोध प्रवर्तला ॥ दुजें बोलती व्यापकें ॥ ३ ॥ या हरिजागराचें फळ ॥ तुज सांगेन सोज्वळ ॥ महादेव ऐसें बोलिले ॥ प्रेमभावें गिरजेसी ॥ ४ ॥ परिसा हरि जागरू ॥ गिरजेसी सांगे महेश्वरू ॥ नवविधा भक्तीचा प्रकारू ॥ शिवतत्त्वीं बोलतों ॥ ५ ॥ प्रथम अश्विनीचा भरू ॥ पूर्ण तिथि जी शंकरू ॥ करुनी व्रतांचा स्वीकारू ॥ मास दीन पर्यंत ॥ ६ ॥ मग मिळोनी संतसज्जन ॥ करावें हरिजागरण ॥ गीतवाद्य सुलक्षण ॥ नृत्य विलास तांडव ॥ ७ ॥ मग सारोनी देवासी मार्जन ॥ वरी गंगोदकें स्नान ॥ मग वस्त्रें परिधान ॥ देवासी करावीं ॥ ८ ॥ यज्ञोपवीत अलंकार ॥ करोनी पूजा नमस्कार ॥ आणि नैवेद्य नाना प्रकार ॥ भगवंतासी अर्पावा ॥ ९ ॥ सद्यस्तृप्त घृत पूर्ण ॥ वरी षड्रस पक्वान्न ॥ भावें सर्वांसीं पूजोन ॥ नमस्कार भावें करावा ॥ १० ॥ मग करावी वैष्णावांची पूजा ॥ मनीं भाव न धरावा दुजा ॥ स्वयंभ मूर्ति मीच सहजा ॥ सदा संतां जवळिकें ॥ ११ ॥ संत मार्जनादि भेदू ॥ जेंवी मिळणी गंगासिंधू ॥ अखंड वाचे परमानंदू ॥ हरिकीर्तन करावें ॥ १२ ॥ त्या हरिजागराचें महिमान ॥ दुजें नाहीं समाधान ॥ सकळ तीर्थ केलिया पुण्य ॥ परी सरी न पवशी ॥ १३ ॥ सकळ तीर्थांची परवडी ॥ दान देतां पृथ्वी थोकडी ॥ या हरि जागराची प्रौढी ॥ ते तयाहुनी अधिक ॥ १४ ॥ पहिले पक्षीं मज अर्पिला ॥ दावा विष्णु थोर झाला ॥ दुजा पक्षु सांगाजी वहिला ॥ ह्मणोनी नमस्कारिलें शंकराशीं ॥ १५ ॥ परिसे गिरिजे देवी ॥ कथा सांगेन बरवी ॥ फळ पावती मानवी ॥ अंतःकरणीं कल्पिलें ॥ १६ ॥ दुजा पक्षु प्रथम तिथी ॥ वैश्वानरेसी प्रीत्यर्थी ॥ बीज ब्रह्मया सांगती ॥ ऋषीसहित उपचारू ॥ १७ ॥ पंचमी अष्टमी नागकुळा ॥ शेषादिका सकळा ॥ प्रीत्यर्थ पावो नागकुळा ॥ षष्ठी स्वामी कार्तिक ॥ १८ ॥ भानु सप्तमीं जागरीं ॥ जैसा समुद्र सरिता सागरीं ॥ अष्टमीची अवधारीं ॥ माझारी मृत्युलोक ॥ १९ ॥ नवमीच षष्ठी योगिनी ॥

आणि चार कोटी कात्यायनी ॥ दुर्गेसहित भवानी ॥ दशमी यम पवित्र गुणी ॥ २० ॥ तेहतीस कोटी एकादशी ॥ ब्रह्मा हरिहर बोरसी ॥ नंदी धेनु तेरेसी ॥ आणि चतुर्दशी परियसा ॥ २१ ॥ पौर्णिमा चंद्रतारा ॥ इंद्रादिका देवा सकळां ॥ इसर्थ पावो देवा सकळां ॥ जे बोलिया वेद-श्रुती ॥ २२ ॥ संतोषोनी उमापती ॥ ऐसें पुराणें बोलती ॥ या हरि जाग-राची स्थिती ॥ तुजप्रति सांगितली ॥ २३ ॥ हें सकळ मीच भोक्ता ॥ येर परिवार देवता ॥ भ्रांति मीच भाविता ॥ भावेंविण न कळे मी ॥२४॥ जेथें भाव तेथें देव ॥ आन न धरावा संदेहो ॥ विश्वसृष्टी एकची पहा हो ॥ तरी मी असे जवळीकें ॥ २५ ॥ विष्णुदास नामयासी ॥ हरिचें नाम सदां मानसीं ॥ राम हा मंत्र उपदेशी ॥ भवसागर तरावया ॥ २६ ॥




## बागुल.

॥ २३१३ ॥ पहिला बागुल बोलती ऐसा ॥ तया नांव ह्मणती मासा ॥ शंख वधोनियां साचा ॥ वेद चारी आणिले ॥ १ ॥ कृष्णा राहे उगला ॥ नाहीं तर सांगेन त्या बागुला ॥ घुसळणा उशीर झाला ॥ रवी सोड गोविंदा ॥ धृ० ॥ दुसरा बागुल बोलती ॥ नाम कांसव ह्मणती ॥ जेणें सृष्टि रक्षिली पृष्ठीं ॥ पायीं पोटीं शिरला ॥ कृष्णा० ॥ २ ॥ तिसरा बागुल बोलती ॥ नाम वराह ह्मणती ॥ जेणें दाढे धरिली क्षिती ॥ दैत्य थोर मारिला ॥ कृष्णा० ॥ ३ ॥ चवथा बागुल नरकेसरी ॥ थोर खांबांत गुरगुरी ॥ दैत्य वधोनी मांडिवरी ॥ भक्त प्ऱ्हाद रक्षिला ॥ कृष्णा० ॥ ४ ॥ पांचवा बागुल ब्रह्मचारी ॥ उभा असे बळिचे द्वारीं ॥ भिक्षा मागोनी श्रीहरी ॥ बळिचें द्वार रक्षिलें ॥ कृष्णा० ॥ ५ ॥ सहावा बागुल बोलती ॥ नाम परशुराम ह्मणती ॥ ज्यानें वधिलें मातेप्रती ॥ पित्याच्या वचनें ॥ कृष्ण० ॥ ६ ॥ सातवा बागुल बोलती साचा ॥ राम ह्मणती दशर-थाचा ॥ रावण वधोनी दशमुखाचा ॥ जानकिसी आणिलें ॥ कृष्णा० ॥ ७ ॥ आठवा बागुल बोलती ॥ थोर गोकुळीं आहे ख्याती ॥ कोणा न कळे त्याची गती ॥ वेद चारी शिणले ॥ कृष्णा० ॥ ८ ॥ नववा बागुल बोलती ॥ नांव बौद्ध ह्मणती ॥ कोणा न कळे त्याची गती ॥ बौद्धरूपें राहिला ॥ कृष्णा० ॥ ९ ॥ होता कलंकीचा रथू ॥ वेगीं येईवा धांवतू ॥ नामा ह्मणे पंढरिनाथू ॥ कैसा बागुल झालासी ॥ कृष्णा० ॥ १० ॥

## खेळिया.

॥ २३१४ ॥ ऐक खेळिया तुज मी सांगतों ॥ जाणुनि खेळ खेळेंरे ॥ ऐक खे० ॥ धृ० ॥ नव्हे तें कैसें झालेंरे खेळिया ॥ नाहीं तें दिसूं लागलेंरे ॥ अरुप होतें तें रुपासि आलें ॥ जीव शिव नाम पावलेंरे ॥ आपलिच आवडी धरून खेळिया ॥ आपआपणातें व्यालेंरे ॥ आपणा कारणें केली बायको ॥ तिणें येवढें वाढीवलेंरे ॥ ऐक खेळि० ॥ १ ॥ ब्राह्मणाचें पोर एक खेळासि भ्यालें ॥ तें बारावर्षें लपालेंरे ॥ कांपत कांपत बाहेर आलें ॥ तें नागवेंच पळूनि गेलेंरे ॥ साहा तोंडांचें एक सांभाचें बाळ त्यानें ॥ बहुतचि दळ आटियलेंरे ॥ खेळ खेळतां चकचकियलें ॥ तें कपाट फोडुनि गेलेंरे ॥ ऐक खे० ॥ २ ॥ चार तोंड्याचा पोर एक नारद्या बाबा ॥ खेळगडि मोठा होतारे ॥ कुचाळि करूनी पोरें भांडवी ॥ आपण राहे वेगळारे ॥ गंगा गौरी दोघी भांडवी ॥ सांभासी पाठवी राना रे ॥ खेळ खेळे परि ठायीं न सांपडे ॥ तो एक खेळिया शहाणारे ॥ एक खे० ॥ ३ ॥ खेळिया माजी हनमंत्या शहाणा ॥ तो न पडे कामव्यसनीं रे ॥ कामचि नाहीं तेथें क्रोधचि कैचा ॥ तेथें कैचें भांडणरे ॥ रामा गड्याची आवडी मोठी ॥ ह्मणुनि केलें येणेंरे ॥ ऐक खे० ॥ ४ ॥ यादवांचा पोर एक गोप्या भला ॥ तो बहुतचि खेळ खेळलारे ॥ लहान थोर अवघे मारूनी ॥ खेळचि मोडुनि गेला- ॥ ५ ॥ ऐसे खेळिये कोट्यानकोटी ॥ गणित नाहीं त्यांलारे ॥ विष्णुदास नामा ह्मणे वडीलहो ऐका ॥ विचारूनी पाहा देहींरे ॥ सूर्याचा पोर एक यम्याही जाणा ॥ तो हाणोनी फोडील डोईरे ॥ ६ ॥

## गौळण.

॥ २३१५ ॥ यशोदे घराकडे चाल मला जेवूं घाल ॥ धृ० ॥ साध्या गव्हांची पोळी लाटी ॥ मला पुरण पोळी करून दे मोटी ॥ नाहीं अड- वित गुळासाठीं ॥ मला जेवूं घाल ॥ ये० ॥ १ ॥ तूप लावून भाकर करी ॥ वांगें भाजून भरीत करी ॥ वर कांद्याची कोशिंबिरी ॥ मला जेवूं घाल ॥ ये० ॥ २ ॥ आईग खडे साखरेचे खडे ॥ लवकर मला करून दे वडे ॥ बाळ स्फुंदस्फुंदोनी रडे ॥ मला जेवूं घाल ॥ ये० ॥ ३ ॥ आई लहानच वे गे उंडा ॥ लवकर भाजुन दे मांडा ॥ लांब गेल्या गाईच्या झुंडा ॥ मला जेवूं घाल ॥ ये० ॥ ४ ॥ आई मी खाईन शिळा घांटा ॥ दह्याचा करून दे मट्टा ॥

नाहीं माझ्या अंगीं ताठा ॥ मला जेवूं घाल ॥ ये० ॥ ५ ॥ भाकर बरीच गोड झाली ॥ भक्षुनी भुक हरपली ॥ यशोदेनें कृपा केली ॥ मला जेवूं घाल ॥ ये० ॥ ६ ॥ आई मी तुझा एकुलता एक ॥ गाई राखितो नउ लाख ॥ गाई राखून झिजलीं नख ॥ मला जेवूं घाल ॥ ये० ॥ ७ ॥ नामा विनवी केशवासी ॥ गाई राखितो वनासी ॥ जाऊन सांगा यशोदेसी ॥ मला जेवूं घाल ॥ येशोदे० ॥ ८ ॥

॥ २३१६ ॥ तळवा तळहात टेंकीत ॥ डाव्या गुडघ्यानें रांगत ॥ गौळ्याघरीं सारंगनाथ ॥ तो म्यां देखिला सये ॥ १ ॥ गवळण जसवंती पैं सांगे ॥ आली कृष्णाचिये मागें ॥ येणें येणें वो श्रीरंगें ॥ नवनीत माझें भक्षिलें ॥ २ ॥ याचे हातीं लोण्याचा कवळ ॥ मुख माखलें अळुमाळ ॥ चुंबन देतां येतो परिमळ ॥ नवनीताचा सये ॥ ३ ॥ येणें कवाड उघडीलें ॥ येणें शिंकें हो तोडीलें ॥ दह्यादुधातें भक्षिलें ॥ उलंडीलें ताकातें ॥ ४ ॥ ऐसें जरी मी जाणतें ॥ यमुनापाणिया न जातें ॥ धरुनी उखळासी बांधितें ॥ शिक्षा लावितें गोविंदा ॥ ५ ॥ ऐसा पुराणप्रसिद्ध चोर ॥ केशव नाम्याचा दातार ॥ पंढरपुरीं धरिला अवतार ॥ भक्ता पुंडलिकासाठीं ॥ ६ ॥

॥ २३१७ ॥ ह्मणे यशोदा बा गोविंदा नको जाऊं परद्वाराला ॥ गौळण मुखरण जपली तुला ॥ धृ० ॥ कृष्ण सखा देतो मुका यशोदे सुंदरी ॥ लिंबलोण उतरी बाळावरी ॥ गेला एकीचे वाड्यामधीं गवळण नव्हती घरीं ॥ जाऊन बैसला तुळई वरी ॥ दहीं दुध खाऊन ढेंकर दिधला ॥ बोलावी गोपाळांला ॥ गौ० ॥ १ ॥ शिंकें सोडून बाहेर टाकिलें शेजारणीचें दारीं ॥ आपण गेला बिदीवरी ॥ आली गौळण घरधनीण लगबगा पाहे आपले मंदिरीं ॥ चटें तुपाची फोडलीं सारी ॥ त्याच पावली पुसाया गेली शेजारणीचे घरीं ॥ शिंकीं पडलीं तिचे परवरीं ॥ धरली हातीं अगे माझे सवती कसी केली माझी चोरी ॥ दांत खावून गाल कुसकरी ॥ झाली दोघींची झोट धरणीं आले लोक पाह्याला ॥ गौ० ॥ २ ॥ केंस धरून दोघीजणी एकमेकीला मारी ॥ आपण हांसे उभा राहुन दुरी ॥ अवघ्या गौळणी मिळून ह्मणती यशोदे सुंदरी ॥ बाई हा आटप आपुला हरी ॥ दहीं दुध खाऊन शिंकीं आणुन टाकिलीं माझें दारीं ॥ सवतीची चोरी आणली मजवरी ॥ आली माझ्या अंगावर दांत खाऊन गाल कुसकरी ॥ झिंपरीन झिंपरी निपसली सारी ॥ आह्मांस पाहून गालींच हांसतो

ह्मणून मला समजला ॥ गौ० । ३ ॥ स्त्रीपुरुष निजलीं होतीं समया लावून चारी ॥ हळुच गेला तिचे मंदिरीं ॥ वेणी दाढिची गांठ बांधली दोहींची एकसरीं ॥ आपण निघुन गेला बाहेरी ॥ दचकुन उठलीं गांठ सुटेना बोलाविलें शेजारी ॥ त्यांनीं वोढून आणलीं बाहेरी ॥ गौळी ह्मणे अगे गौळणी दाढी उपटली सारी ॥ गौळी वढ वढून दाढी धरी ॥ शरण जातां गांठ सुटली गेलीं आपल्या घराला ॥ विष्णुदास नामा बोलला ॥ ह्मणे यशो० ॥ ४ ॥

## धेनु.

॥ २३१८ ॥ वेणुनादीं चरे पाणी पी भीवरे ॥ ते धेनु हुंबरें वत्सांलागीं ॥ १ ॥ वाणें ते सांवळीं नामें ते श्रीधरा ॥ चरे वसुंधरा चवदा भुवनें ॥ धृ० ॥ केशव नामें गाय माधव नामें गाय ॥ विठ्ठल नामें गाय कामधेनु ॥ २ ॥ प्रेमें ते पान्हावे भक्ता घरीं जाय ॥ भूकेलिया खाय पातकासी ॥ ३ ॥ नामा ह्मणे गाय भाग्यवंता घरीं ॥ पाप्या जन्मवरी पाठीलागे ॥ ४ ॥

## शास्त्री व पंडित.

॥ २३१९ ॥ शास्त्रज्ञ पंडित तो एक मी मानी ॥ आपणाते देखोनी तन्मय झाला ॥ १ ॥ येरां माझें नमन सर्व साधारण ॥ ग्रंथांचें रक्षण ह्मणोनिया ॥ धृ० ॥ वेद पारायण मानी तो ब्राह्मण ॥ चित्त समाधान संतुष्ट सदां ॥ २ ॥ पुराणिक तो होउनी कृतार्थ ॥ विषयीं विरक्त विधि पाळी ॥ ३ ॥ मानी तो हरिदास ज्या नामीं विश्वास ॥ सर्वस्वें उदास देहभावा ॥ ४ ॥ नामा ह्मणे ऐसे भेटवी विठ्ठला ॥ त्यालागीं फुटला कंठ माझा ॥ ५ ॥

॥ २३२० ॥ वरीवरी बोलती श्रुतिचिया मती ॥ पाविजे ते गति वेगळी असे ॥ १ ॥ तुज न पविजे शब्द ब्रह्मज्ञान ॥ पाविजे तें वर्म वेगळें असे ॥ धृ० ॥ जाणीव खटपट बोलती सैराट ॥ पाविजे ती वाट वेगळी असे ॥ २ ॥ एक ते तर्कीचे चकोरची वक्ते ॥ जे शास्त्र समजाविते लोकाचारी ॥ ३ ॥ एक चतुर वक्ते वित्पन्न श्रोते ॥ ते संत रंजवीते लोकांमाजीं ॥ ४ ॥ नामा ह्मणे जी हीं तुज जाणितलें ॥ त्यासींच फावलें भक्तिसुख ॥ ५ ॥

## आळंदीचें वर्णन.

॥ २३२१ ॥ धन्य पुण्यभूमि आळंदी हें गांव ॥ दैवताचें नांव सिद्धेश्वर ॥ १ ॥ चौऱ्यांशी सिद्धींचा सिद्धवटीं मेळा ॥ तो सुखसोहळा काय सांगूं ॥ २ ॥ विमानांची दाटी पाहती सुरवर ॥ वर्षताती भार सुमनांचे ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा चला तया ठाया ॥ विश्रांति घ्यावया कल्पवरी ॥ ४ ॥

## ब्राह्मण.

॥ २३२२ ॥ ब्रह्म ते ब्राह्मण श्रुतीचें वचन ॥ सर्व नारायण सर्वाभूतीं ॥ १ ॥ चहु शिक्षा जनीं गुरु चालू वर्ण ॥ प्रत्यक्ष पुराणें साक्ष देती ॥ २ ॥ हेळसुनी निंदी दुरावी ब्राह्मणा ॥ सभेमाजीं जाणा दुऱ्हाविती ॥ ३ ॥ त्याचें पाप नाहीं खंडण सर्वथा ॥ ह्मणोनी अनंता भय वाटे ॥ ४ ॥ कोपला महर ब्राह्मणा मारिला ॥ लक्ष वेडावलीं भूषण त्या ॥ ५ ॥ क्रोध अग्नि ज्वाळा झगटती जेथें ॥ न उरती तेथें काडिमात्रें ॥ ६ ॥ उगेच ब्राह्मणा सांबें छळियेले ॥ सर्व शांत झाले आपोआप ॥ ७ ॥ अपेक्षिती कोण्ही तेंचि तें होतें ॥ न बोलावे येथें बोल कांहीं ॥ ८ ॥ अग्नीसी लहान थोर न ह्मणावा ॥ पडे परिस्वाहा सर्व कांहीं ॥ ९ ॥ मार्केडेय बुद्धि छळुनी ब्राह्मण ॥ आयुष्य तें उणें होय माझें ॥ १० ॥ ब्राह्मणाचें वीर्य मातंगीचे पोटीं ॥ त्याचि एका गोष्टी आशिर्वाद ॥ ११ ॥ आयुष्याचे कल्प सात चौदा होती ॥ ऐकोनी विश्रांति कीर्तनानें ॥ १२ ॥ धन्य गोत वित्त स्त्रिया आणि पुत्र ॥ सर्व व्हावें हित ब्राह्मणातें ॥ १३ ॥ कुळक्षयो व्हावे ऐसें वाटे जीवा ॥ ब्राह्मणासी दावा नको बापा ॥ १४ ॥ नामा ह्मणे ऐसे धन्य ते ब्राह्मण ॥ धरिले चरण माथा त्यांचे ॥ १५ ॥

## जातें संसार घरटीं.

॥ २३२३ ॥ संसार घन घनदाट ॥ कैं होईल शेवट जातीयाचा ॥ १ ॥ जीव हेंचि जातें कर्म हाचि खुंटा ॥ वोढिती वरंवटा चौघीजणी ॥ २ ॥ जातां वैरू वैरणें जंव आहे लहाणे ॥ जातां जाई जणे जाईल जाणा ॥ ३ ॥ एकोत्तरशें कौरव वैरिले वैरणा ॥ यांचा पांडवा जाणा तेंचि झालें ॥ ४ ॥ नळनीळ मांधाता वैरियले जातां ॥ निमिष न लागतां पीठ झालें ॥ ५ ॥

संसाराचा वोढा वोढितां न वोढे ॥ बैस पैलकडे लावी हात ॥ ६ ॥ नामा ह्मणे विठोबा दिनाचें माहेर ॥ सदां पंढरपूर गाऊं गीतीं ॥ ७ ॥

## चाटापरीचे.

॥ २३२४ ॥ जन्मासी येवोनी जाहलों मी चाटा ॥ गेलों होतों हाटा पंढरीये ॥ १ ॥ गुंड गे करी गुंड गे करी ॥ बैसलों द्वारीं पंढरीये ॥ २ ॥ शनिवारीं पुंडलिकापाशीं ॥ चंद्रभागेसी स्नान केलिये ॥ ३ ॥ आदित्यवारीं करीं पझाळें ॥ कळीकाळा न भीयें त्याचेनी बळिये ॥ ४ ॥ सोमवारीं वेणुनादीच्या हाटा ॥ जातसे चाटा उभवोनी गुढीये ॥ ५ ॥ विष्णुदास नामयानें उभवोनी गुढी ॥ विकलीसे मौढिये केशीराजये ॥ ६ ॥

## कुळवाडी.

॥ २३२५ ॥ आह्मी कीर्तन कुळवाडी ॥ आणिक नाहीं उदीम जोडी ॥ १ ॥ वाचा पिकली पिकली ॥ हरिनामाची वृष्टी झाली ॥ २ ॥ दशमी एकादशीच्या दिवशीं ॥ झाल्या कैवल्याच्या राशी ॥ ३ ॥ संत ह्मणती नामा भला ॥ हरिनामाचा सुकाळ झाला ॥ ४ ॥

॥ २३२६ ॥ चालती कुळवाडी नटके ॥ उपकें घेतलीसें नाकें ॥ चार वर्षें पिकलें निकें ॥ त्याचें कण सांचले ॥ १ ॥ पुढें एक निपाणीक पडिलें ॥ त्या कणाचें द्रव्य सांचलें ॥ कृपणाचें घर भरिलें ॥ वंचक झाला भक्तांसी ॥ २ ॥ स्त्रियांबाळां खाऊं नेदी ॥ धर्म न करीच निशुद्धी ॥ डोईस बांधलीसे चिंधी ॥ खांदीं रकटें ठिगळाचें ॥ ३ ॥ त्या द्रव्याचें करी कळांतर लेखा ॥ सजगाणीस देई रुका ॥ रुक्यास घेई पैका ॥ आठा दिवसाच्या बोला ॥ ४ ॥ सवाई दिडि दुणी ॥ अकर्ताच घरीं आणि ॥ तो न भजे चक्रपाणी ॥ पाप धुणी होतसे ॥ ५ ॥ तंव एक अतीत घरासी आला ॥ बाईलीनें त्यासी स्वैंपाक केला ॥ तंव आपण उठून जागला ॥ झड करी आला द्वारासी ॥ ६ ॥ कोणें दाखविलें माझें घर ॥ त्यावरी घेईन जहर ॥ कोठें गेला सुना मोगर ॥ अरगळा कोणें काढिली ॥ ७ ॥ ऐसा तो ब्राह्मण चरफडत गेला ॥ आपण परतोन माघारा आला ॥ धांवोनी घाव हाणितला ॥ डोई फोडिली बायलेची ॥ ८ ॥ कैसी केली बोहरी ॥ वोज नाहीं तुझे घरीं ॥ नागविलें इया पोरीं ॥ तीनवेळां खातातीं ॥ ९ ॥ ऐसी

गजबज ऐकोन ॥ शेजारी आला धांवोन ॥ त्यासी हातीं धरोन ॥ गृहा भीतरीं हिंडविला ॥ १० ॥ त्यासी बैसावया दिला पिढा ॥ तों स्वैंपाक आणोनी ठेविला पुढां ॥ पहा हो बायलेचा धाडस केवढा ॥ ऐका तुह्मी दादोजी ॥ ११ ॥ ऐसीं पूर्ण अकरा वर्षे भरलीं ॥ बारा वर्षांची साऊली पडली ॥ या रीतीनें गुजराण झाली ॥ तंव अग्नि लागला गृहासी ॥ १२ ॥ शेतांतून कुळवाडें केली चोरी ॥ पाणी रिघालें पेवा भीतरीं ॥ सुनेनें घालून घेतलें विहिरीं ॥ ऐसेपरी नागवलों ॥ १३ ॥ ऐसे जे नर असती ॥ ते जन्मोजन्मीं नागवती ॥ त्यांची न चुके यातायाती ॥ विष्णुदास ह्मणे नामा ॥ १४ ॥

## शेत.

॥ २३२७ ॥ संसार शेत सुलभ भुमिथोर वाहीलीं नवही द्वारें ॥ पांचही आउतें मेळवुनी तेथें जुंपियेली दोन्ही ढोरें ॥ उखीतें करी येति जाती भारि नव्हति कोण्हि स्थिरें ॥ बुनादि शेत वाहिले ते काय सांगूं अपाररे ॥ १ ॥ संसारशेत करिकारे आत्मा देहाचिया लाहे परि ॥ भक्तिउंच माळा उभा राहुनि हरिनाम सों करिरे ॥ धृ० ॥ हरिश्चंद्र राजा सात्विक भला तेणें वाहो केला ॥ सत्वनांगर त्रिगुणतिफणि निर्वाण कुळव धरिला ॥ भक्ति कुऱ्हीवरी उभा राहुनियां बहुत भाग्य पिकला ॥ खळे दाणे तेणें दिधले ब्राह्मण युगानयुगि तरलारे ॥ २ ॥ शिराळ शेटी कुळवाडी मोठा बहु सोसियेल्या वेठी ॥ आलिया गेलिया जेववी राड भक्ता देतो थोर सृष्टी ॥ भला भला ह्मणोनि जगीं वाखाणिला देव आला साचे भेटी ॥ मुक्ति शेत तया इनाम दिधला ठाव दिला वैकुंठीं ॥ ३ ॥ रावणाचें शेत चवदा चाहुर दाटल्या दुर्बुद्धी पेढी ॥ गर्व अहंकार दाट खुंट झाडें शेत आले तेणें पडी ॥ कर्मकांड किडा मुळि जो बैसला बीज गेलें तेणें वोढी ॥ बटकर बाण अंगि जो सेकला तोही झाला देशधडीरे ॥ ४ ॥ अवघी कुळवाडी कौरवें केली नाटोपेचि दुर्योधन ॥ अर्ध वांटेकरी धर्म दुराविला शेतासि नाहीं रक्षण ॥ अधर्म टोळि शेत जे खादले ॥ बिज गेलें चौपट होउन ॥ हरिभक्तिविण फलकट जाले न जोडे कृष्ण निधानरे ॥ ५ ॥ पांचही पांडवीं नवाट काढीलें वाहीले अद्वैतवन ॥ नीरंजन वनशेत जें पिकलें आपण कृष्ण रक्षण ॥ द्रौपदी सुंदरी डाहोरा जो केला दुर्वासा दिधलें भोजन ॥ अनंत खंडी सांजे जे पिकली जोडले

कृष्ण निधानरे ॥ ६ ॥ ज्ञानदेव चांगदेव वटेश्वर निवृत्ति मुक्ताई सोपानदास ॥ परसाभागवत सावता सालया रसाळ चोखामुधेश ॥ परमानंद जोगाजनमित्र नागा गोरादामा कूर्मदास ॥ इतुकें शेतकरि त्यांचा अंगवांटेकरी नामा विष्णुदासरे ॥ ९ ॥

## कलियुग.

॥ २३२८ ॥ ऐका कलियुगाचा धर्म ॥ पुत्र सांगे पितयासी काम ॥ ब्राह्मण त्यजिती ब्रह्मकर्म ॥ ऐसें वर्तमान मांडलें ॥ १ ॥ माया बहिणी दवडिती ॥ स्त्री आपुली आणविती ॥ ऐका ऐका नवल गती ॥ अगा श्रीपति परियसा ॥ २ ॥ भार्या न करिती पतिची सेवा ॥ नाहीं कवणा धर्माचा हेवा ॥ वर्ततसे पापाचा ठेवा ॥ अगा केशवा परीयेसी ॥ ३ ॥ अरे वैराग्याच्या घराचारू ॥ आणि संन्यासा मोह थोरू ॥ संता बहुत अहंकारू ॥ रुसणे नलगे कोणासी ॥ ४ ॥ झाला कलीचा प्रवेशू ॥ तुह्मा नामाचा विश्वासू ॥ हृदयीं हृषीकेशू ॥ विष्णुदास नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ २३२९ ॥ मागें सांगून गेले अर्जुना ॥ कृष्ण उपदेशी पंडुनंदना ॥ येथें राहतां पाविजे बंधना ॥ थोर वर्तमान कलियुगीं ॥ १ ॥ या कलिमाझारी ॥ पुत्र होती पितयाचे वैरी ॥ घरची माता होय कामारी ॥ पुरुषातें नारी अव्हेरिती ॥ २ ॥ न येती वृक्षा फळें आटति धेनू ॥ न पिके मही न वर्षे घनू ॥ यापरी अटवि सकळ जनू ॥ ऐसें जगजीवनू बोलिला ॥ ३ ॥ आणिक एक वर्तेल अपवित्र ॥ ब्राह्मण सांडीतिल वेदमंत्र ॥ आचार सांडुनी होति शूद्र ॥ ऐसे अपवित्र कलियुगीं ॥ ४ ॥ थोर वर्तमान पडेल काळ ॥ चहुंवर्णांचा एकमेळ ॥ कोणीकोणाचा न धरी विटाळ ॥ मग गोपाळ निघते झाले ॥ ५ ॥ आतां वेळोवेळां सांगूं किती ॥ मोडला धर्म सरलि प्रवृत्ती ॥ विष्णुदास नामा येतो काकुळती ॥ कैसेनि भक्ती करूं आतां ॥ ६ ॥

## पदें.

॥ २३३० ॥ कान्होबा निवडी आपुलीं गोधनें ॥ धृ० ॥ पांच पोळ्या तीन भाकरी ॥ दीड कानिवला एक पुरी ॥ आह्मा धाडिलें वैल्या दुरी ॥ आमुची ठकवून खाल्ली शिदोरी ॥ कान्हो० ॥ १ ॥ परियेसी शारंग-

धरा ॥ तुझा बैल चुकला मोरा ॥ सांगूं गेलों तुझ्या घरां ॥ पाठीं लागला तुझा ह्मातारा ॥ कान्होबा० ॥ २ ॥ परियेसी हृषीकेशी ॥ गाई ह्मशीचें दूध पिशी ॥ वासरें प्यालीं ह्मणून सांगशी ॥ उद्यां ताक नाहीं आह्मासी ॥ कान्हो० ॥ ३ ॥ कान्होबा ओढाळ तुझ्या गाई ॥ होत्या नऱ्हसा कळंबा ठायीं ॥ शिव्या देती तुझी आई ॥ कान्होबा० ॥ ४ ॥ विष्णुदास नामा साहे ॥ देवा तूंचि बाप माये ॥ अखंड माझे हृदयीं राहे ॥ कान्होबा० ॥ ५ ॥

॥ २३३१ ॥ मी माझें ह्मणतां अर्थ जोडितां साहीचक्र गेले ॥ नळ नीळ मांधाता पुरुषार्थी सारिखे तेही काळें ग्रासीयले ॥ कपील महामुनी सिद्ध विचारितां सगर रायेंपै भंगा गेले ॥ कुमार अंतःपुर सांडुनीया ते भक्तराज काय झालेरेरे ॥ १ ॥ संसार स्वप्न जाणुनीया शरण रिघे पंढरीरायारेरे ॥ धृ० ॥ ढुंढुभिरायें धर्म चालविला तेणें शांतीचा सागर ह्मणविले ॥ अजपाळ जैपाळ राजा दशरथ सूर्यवंशी ते जन्मले ॥ जळींचे तरंग जळींच निमाले नेणो तेथें काय जालें ॥ राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न सांगपा ते काय झालेरेरे ॥ २ ॥ सूर्यवंशीं राजा हरिश्चन्द्र जन्मला स्वप्न तेणें साच केलें ॥ स्त्रीपुत्रातें विकुनीया तेणें ब्राह्मणा सुखीया पै केलें ॥ शिबी चक्रवर्तीनें आपुलें मांस देऊनी ॥ प्राण देऊनी जीवंत भक्तराज काय झालेरेरे ॥ ३ ॥ शरीराचें मुद्गलें सामास कवणें वेंचिलें ऋषि भोजनासी आले ॥ स्त्रीपुत्रातें वंचुनीया तेणें अतीता सुखी केलें ॥ सत्व पाहावया कैलासीचा राणा कांतीनगरी उजू ठेले ॥ श्रीयाळें पोटींचे बाळक दिधलें सांगपा तें काय झालेरेरे ॥ ४ ॥ कौरवां पांडवां अति दळभार संग्राम अठरा अक्षौहिणी रणांसी आले ॥ नव वेळें नारायण आले गेले परी अकरा रुद्र गणतीसी आले ॥ छपन्नकोटी यादवेसीं कृष्ण भालुका तीर्थीं निमाले ॥ नामा ह्मणे ऐसे कल्पनेचें अवघें परोपरी भजिन्नले ॥ ५ ॥

॥ २३३२ ॥ रावणा मारून माझे माये गे ॥ बिभीषण लंकेस स्थापिलास काय गे ॥ अयोध्येसी आलीस काय गे ॥ माझे हृदयमंदिरीं राहे गे ॥ विठ्ठल माय गे ॥ १ ॥ रुसुनी आली रखुमाबाई गे ॥ तिच्या मागें तूं धांवलीस काय गे ॥ संगे घेऊनीयां गोपाळ गाय गे ॥ मम हृदयमंदिरीं राहे गे ॥ २ ॥ सत्यें राधिकेचे पायीं गे ॥ सोडुनी द्वारकेचा ठाय गे ॥

आलीस काय गे ॥ माझे हृदयमंदिरीं राहे गे ॥ ३ ॥ धन्य पुंडलीक भक्त माय गे ॥ त्याणें विटेवर उभा केला काय गे ॥ नामा ह्मणे माझे माय गे ॥ माझे हृदयमंदिरीं राहे गे ॥ ४ ॥

॥ २३३३ ॥ कडू वृंदावन साखरें घोळीलें ॥ तरी काय गेलें कडूपण ॥ १ ॥ तैसा तो अधम करो तीर्थाटण ॥ नोहे त्याचें मन निर्मळत्व ॥ २ ॥ बचनाग रवा दुग्धीं शिजविला ॥ तरी काय गेला त्याचा गुण ॥ ३ ॥ नामा ह्मणे संत सज्जन संगतीं ॥ ऐशासही गति कालांतरीं ॥ ४ ॥

॥ २३३४ ॥ अरे अरे कान्हया वेल्हाळा ॥ तूं रे बरविया गोपाळा ॥ तुज देखियेलें डोळां ॥ रे धेनुवा हुंबरती ॥ १ ॥ माते देवो शिदोरी ॥ ऐसें ह्मणतसे मुरारी ॥ मी जाईन वो दुरी ॥ धेनु चारावयालागी ॥ २ ॥ ॥ २ ॥ अलें बेलें चिलें मेकें ॥ सुरण मिरगोडी पै तिखें ॥ दह्यावांचोनी नव्हें निकें ॥ शिदोरी ताकें कालऊं निकें ॥ ३ ॥ वडजा वाकुडा पेंदा सुदामा ॥ हेची पांतिकर आह्मां ॥ तेथें विष्णुदास नामा ॥ उच्छिष्ट शितें वेंचितसें ॥ ४ ॥

॥ २३३५ ॥ अच्युता अनंत गोविंद ॥ अरे मेघःशामा ॥ तूं आत्मया रामा रे ॥ आत्मया तूं रामा रे ॥ ह्मणा ह्मणा गोविंद नाम रे ॥ ऐसें तुझें ध्यान लागो आह्मा रे ॥ नाम याचा स्वामि पंढरिराणा रे ॥ १ ॥

॥ २३३६ ॥ आह्मी लटिकें ॥ न बोलूं वर्तमान खोटें ॥ धृ० ॥ लटिकें गेलें कटका तेथें ॥ गाडग्या एवढे राळें ॥ उडत चिमणी चरत चाले तिचे वाटी येवढे डोळे ॥ १ ॥ शेळी करी घुसळण मांजर काढी लोणीं ॥ उंदीर गेले देशांतरा ताकें भरल्या गोणी ॥ २ ॥ पाण्यांत कांसव गीत गाय वनांत कोल्हा नाचे ॥ सावज मनीं संतोषला खोकड पुस्तक वाचे ॥ ३ ॥ कांतणी घरीं लग्न लागलें सरडा कणीक कांडी ॥ बागुल वंध्या कण्या परणीं घुबड मांडे रांधी ॥ ४ ॥ नामा ह्मणे विष्णुदास हो ऐका त्यांची कीर्ति ॥ जो लटिकें ह्मणेल त्याचे पूर्वज नरका जाती ॥ ५ ॥

॥ २३३७ ॥ गुरुराव गुण गंभीरवो वावो चैतन्य प्रकाशु ॥ योगी सहज सुकामिनी विलासु ॥ धृ० ॥ चिदानंद घनु तनु सांवळावो हरि पाहतां

निवती लोचन ॥ तनु मन चरणीं वो गुंतलीं नाम गोपाळाचें अमृत समान ॥ १ ॥ पितांबरशेला माळ कंठीं या रावो गोपाळा ॥ मुगुटीं झळाळ सर्वांगीं कस्तुरीचें विलेपन कटीं रुळे वनमाळा ॥ २ ॥ येणेंची जन्में पाविजे गोपाळासी आनु नाहीं सार ॥ श्रीवत्सलांछन हेंची खुण विष्णुदास नामयादातार ॥ ३ ॥

॥ २३३८ ॥ गेलीया वृंदावना तेथें देखीला कान्हा ॥ संवगडिया माजीं उभा ध्यान लागलें मना ॥ १ ॥ हरिनाम गोड झालें काय सांगो गे माय ॥ गोपाळ वाहती पावे मन कोठें न राहे ॥ २ ॥ त्याचें मुख साजिरें वो कुंडलें चित्त चोरें ॥ सांडुनी अमृत धनी लुब्धलीं चकोरें ॥ ३ ॥ सांडुनी ध्रुव मंडळ आली नक्षत्र माळा ॥ कौस्तुभा तळवटीं वैजयंती शोभे गळा ॥ ४ ॥ सांडुनी मेघराजु कटिसूत्रीं तळपे विजू ॥ भुलला चतुराननू तया नव्हे उमजू ॥ ५ ॥ सांडुनी लक्ष्मी निज गोपाळासी बोले गुज ॥ अचोज हा चोजवेना ब्रह्मादिकां सहज ॥ ६ ॥ वांजट धीट मोठी ऐसी कवण असे खिळू ॥ भेदली हरि चरणीं पायीं मुरडीव वांकी सोज्वळू ॥ ७ ॥ त्याचे पायींचीं नेपुरें वाजती वो गंभीरें ॥ लुब्धलीया पक्षयाती धेनु पाचारी स्वरें ॥ ८ ॥ आणिक एक नवल कैसें स्वर्गीं देव झाले पिसे ॥ ब्रह्मादिक उच्छिष्टा लागीं देखा जळीं झाले मासे ॥ ९ ॥ आणिक एक नवल परी करीं घेऊनी शिदोरी ॥ सवंगड्या वांटितसे नामया स्वामी मुरारी ॥ १० ॥

॥ २३३९ ॥ चेइला तो जाणरे ॥ सद्गुरूवचनीं निर्धारें ॥ विपरीत भावना विसर पडिला ॥ कंठीं जया परिहाररे ॥ १ ॥ आपणा पैं पहावया ॥ कवण लावूं दिवारे ॥ चंद्र सूर्य जेणें प्रकाशें ॥ तो मीं कैसा पाहूं येई रे ॥ २ ॥ अंत त्यासी नाहीं रे ॥ स्थान मान कांहीं रे ॥ चेइला तेणें ओळखीला ॥ येरासी अगम्य भाईरे ॥ ३ ॥ पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर ॥ नाहीं दाही दिशा रे ॥ महाप्रळयीं सप्त सागर एक होती ॥ अनुभविया तो तैसारे ॥ ४ ॥ दाही दिशा व्यापूनियां ॥ तो अंधकार महा रे ॥ रवि प्रकाश जाहल्या ॥ आपेंआप निरसला रे ॥ ५ ॥ काष्टीं पावक उपजला ॥ तोही तयासमरे ॥ नामा ह्मणे केशीराजा ॥ चेइल्या आह्मां तुह्मीरे ॥ ६ ॥

॥ २३४० ॥ भिन्न रात्रीं माध्यान्ही वो ॥ सेजे सुदली नारी ॥ आपआपणा विसरूनियां ॥ सुशोभित अंधारीं ॥ १ ॥ सामाजीं चारी भुजा ॥

शंख चक्र वो करीं ॥ पद्म गदा हातीं शोभती ॥ दिसे सर्व शृंगारीं ॥ २ ॥ येऊनी हंस तुळीके ॥ कैसें धरियलें करीं ॥ देऊनी आलिंगन ॥ वोरसलें वो दुरी ॥ ३ ॥ पालवीं धरितां धरितां ॥ निघाला बाहेरी ॥ त्यालागीं प्राण जातो ॥ भेटवा झडकरी ॥ ४ ॥ कवण ते प्राण सखी ॥ भेट करील विठोसी ॥ सांडुनी वीरगुंठी ॥ चरण झाडीन केशीं ॥ ५ ॥ कवण मी कैंचा नेणें ॥ जाती कुळ तयाचें ॥ कवणा पासाव झाला ॥ तें मी नेणें वो साचें ॥ ६ ॥ इंद्र चंद्र नीळ कीळ ॥ घन नभ रूप तयाचें ॥ चरणीं तोडर रुळे ॥ वरीं नेपूरें साचे ॥ ७ ॥ नख चन्द्र मंडीत वो ॥ जन्मस्थान गंगेचें ॥ जानु जघन नीट ॥ पीतांबर वो कासे ॥ ८ ॥ सावरी नाग मुरडी ॥ रत्न मेखळा साजे ॥ माजू जो मुष्टी माय ॥ सा मन वेधलें माझें ॥ ९ ॥ नाभीं सरोवरीं वो ॥ पिसे ब्रह्म कमळ ॥ अनुपम्य उदर ज्याचें ॥ विशाळ वक्षस्थळ ॥ १० ॥ कौस्तुभ वरी शोभे ॥ करितो झळफळ ॥ कुंडलांचेनी रत्नें ॥ कैसेनी फांकताती कीळ ॥ ११ ॥ वदनीं मी काय वाणुं ॥ प्रसिद्ध निर्मळ ॥ भाळीं तो अर्ध चन्द्र ॥ मृग नाभीचा टिळ ॥ १२ ॥ सरळ ज्या अंगोळिका ॥ नवरत्नें जडीत ॥ कंकणें मनगटीं ॥ बाहुवटी सुशोभित ॥ १३ ॥ त्यावरी कीर्ति मुखें ॥ भुजादंड मिरवत ॥ वैजयंती पदक ॥ हिरे मुगुटीं झळकत ॥ १४ ॥ मयूर पत्रें शिरीं ॥ शोभा दिसे अमित ॥ चंद्र मंडळ लोपलीं वो ॥ महा तेज अद्भुत ॥ १५ ॥ व्यापिलें वन माळीये ॥ लावण्य तेज अमित ॥ तें रूप देखावया ॥ माझा जीव उल्हासत ॥ १६ ॥ ऐसी तापली विरहज्वरें ॥ थोर होतो उबारा ॥ चंदन पोळतसे ॥ न घाला विंजण वारा ॥ १७ ॥ चंद्रमा दाहतसे ॥ उष्ण तो खडतरा ॥ तंव येरी जाणितला ॥ वेध नंदकुमरा ॥ १८ ॥ होईल केशीराजा ॥ पाहे द्वारकापुरा ॥ भक्ति ही विरहा माता ॥ तिणें आणिला घरा ॥ १९ ॥ नामया विष्णुदासा ॥ भेटी शारंगधरा ॥ तनु मन जीवें त्याला ॥ सुख झालें अंतरा ॥ २० ॥

॥ २३४१ ॥ राधा वनीच्या पुत्रास धन बहुत झालें ॥ तो ह्मणे आतां धर्म करीन ॥ बापाचियाश्राद्धा आवंतिले ब्राह्मण ॥ एक जेवण सदामाचें ॥ १ ॥ कैसी नागवण आली रे बापा ॥ वेंचा परते पाप आणिक नाहीं ॥ धृ० ॥ सहाजणा ब्राह्मणां सहा सवा शेराचा भात ॥ कढींत हिंग जिरें मिरें बहुत ॥ त्यावरी घातलें मुगाचें वरण ॥ येवोकां मरण जेवत्यांसी ॥ २ ॥ सहाजणा ब्राह्मणां घातले सहा वडे ॥ घालितां रडे उकसाबुकसी ॥ त्यावरी घातलें तूप लोणकडें ॥ जावो कां मढें या जेवित्यांचें

॥ ३ ॥ सगळ्या गऱ्हांची रांधिली क्षीरी ॥ ही एक महामारी आली देखा ॥ त्यावरी घातला साखर गुळ ॥ उठोकां पोटशूळ जेवित्यांसी ॥ ४ ॥ जेवण झालें दहीं भात आला ॥ तंव आत्मा लागला ब्रह्मांडासी ॥ बहुतेका दिवसासी अंतर पडिला ॥ समुळीं नागविला ह्मणे नामा ॥ ५ ॥

॥ २३४२ ॥ संसार सागरींरे ॥ माझें माहेर पंढरपुरीं ॥ विठोवा बाप माझा ॥ माता रखुमाई सुंदरी ॥ धृ० ॥ पुंडलिक भाऊ माझा ॥ तोहीं नांदे बरव्या परी ॥ सासुरें दुर्बळ भारी ॥ मज मोकलिलें दुरीं ॥ सुख दुःख कवणा सांगूं ॥ माझें माहेर पंढरपुरीं ॥ १ ॥ भ्रतार निष्ठुर वो ॥ काम क्रोध दोघे दीर ॥ आशा हे सासु माझी ॥ ते मज गांजितसे थोर ॥ २ ॥ तृष्णा हे नणंद सखी ॥ तिनें व्यापियलें घरीं ॥ भक्ति हे माझी बहिणी ॥ ते मज होईल निर्धारीं ॥ ३ ॥ वर्ष महिने दिवस घडिया ॥ वाट पाहें अझुनी ॥ देहा माजीं करिती देखा ॥ न्यावया न पवे कोणी ॥ ४ ॥ गजेंद्र हरिश्चन्द्र सासी ॥ सोडावया आला ॥ प्ऱ्हाद अंबऋषी तिहीं ॥ तुझा धांवा केला ॥ ५ ॥ उपमन्यु दूध मागतां क्षीरसागरू दिल्हा ॥ गजेंद्र अजामेळ त्यांच्या सत्वा तूं पावला ॥ नामया विष्णुदास ॥ गीतीं गोविंदु गाइला ॥ ६ ॥

॥ २३४३ ॥ तत्वमसी वाक्य उपदेशीलें तुज ॥ तें तूं जीवीं कां अज्ञान धरिसी दुर ॥ धृ० ॥ त्रिभुवना परता धांवतोसी दुरी ॥ आधीं तूं आपुली शुद्धिकरी ॥ उदय अस्तु झाला कवणीये घरीं ॥ पिंडा माझारीं पाहेपां ॥ १ ॥ जागृती मध्यें कवण जागतें ॥ दोहीं माजीं स्वप्न कोण देखतें ॥ सुषुप्तीमध्यें कोण नांदतें ॥ मग अनुवादतें तें कवण ॥ २ ॥ जागृती वरोनी करी चिंतन ॥ सुषुप्तीमाजीं रीघे ज्ञान ॥ दोन्हीं माजीं स्वप्न देखे कवण ॥ जीव कीं मन सांगपां ॥ ३ ॥ निद्रा मरण हें एक स्थान ॥ दोहींचा देखणा जाणें आपण ॥ लहान सुईच्या इंधनाहुन ॥ आढळलें मन पांचासीं ॥ ४ ॥ इंद्रियें चपळ चेइलीं ॥ जागत होतीं तीं कांपरतलीं ॥ जाऊनियां कवना घरीं लपालीं ॥ मना मिळालीं कवणें गुणें ॥ ५ ॥ सांगतां तेथें अनुवाद कैचा ॥ नाहीं तूं पण खुंटली वाचा ॥ विष्णुदास नामा बोलिला साचा ॥ परम पदीं बैसलासे ॥ ६ ॥

॥ २३४४ ॥ राम राजीवलोचना ॥ करुणा निधी भक्तजना ॥ यातां यातीनिवारणा ॥ तूं पावना स्वामिया ॥ १ ॥ जगद्रुपा जळदगहना जद्गुरु सितापती जगज्जीवना ॥ काय वाणू तुझीयारे गुणा ॥ आवघ्याजनां आव-

डसी ॥ २ ॥ रामा त्र्यंबकभंजना ॥ दशकंठ तूं छेदना ॥ मधु कैठ निर्दळणा ॥ गरुडवाहना वासुदेवा ॥ ३ ॥ रामा दशरथनंदना ॥ योगीजन मनरंजना ॥ अभयवरद वैष्णवजना ॥ बिभिषणा स्थापियलें ॥ ४ ॥ जयजय श्रीवत्सलांछना ॥ ब्रह्मपदाचिया भूषणा ॥ अहिल्याकष्ट निर्दळना ॥ नारायणा परियेसि ॥ ५ ॥ ह्मणउनी तुझे मी पोशणें ॥ हें ऐके ऐके रघुनंदनें ॥ येणेंचि कारणें आलों शरण ॥ विष्णुदास ह्मणे नामा ॥ ६ ॥

---

## हिंदुस्थानीभाषेंत अभंग.

॥ २३४५ ॥ ज्यो कोई वसुधा दान दे आवे ॥ कोटी जाग करे करावे ॥ तीरथ बरथ करे स्नाना ॥ नाहीं नाहीं हरी नाम समाना ॥ १ ॥ ज्यो कोइ ज्यावे हीमालये गले ॥ काशी करवत लेकर मरे ॥ दसवे द्वारे काढे प्राण ॥ नाहीं० ॥ २ ॥ काया कलम करेवर जीवे ॥ नाकुच खावे नाकुच पीवें ॥ गगन मंडळमों जोगध्यान ॥ नाहीं० ॥ ३ ॥ नाहीं आगली पिछली बात वनावे ॥ नेम धरम मन मुहुं पावे ॥ च्यारो बेद पढे पुरान ॥ नाहीं० ॥ ४ ॥ संत गुरूकी जब कृपा भई ॥ प्रेमभरातही रदे धरलीई ॥ कहे नामदेव भज भगवान ॥ नाहीं० ॥ ५ ॥

॥ २३४६ ॥ ज्या हो तुम गीरीवर ताहां हाम मोरा ॥ जाहां तुम चंदा ताहां मै चकोरा ॥ १ ॥ जाहां तुम तरुवर ताहां मै पंछी ॥ जाहां तुम सरोवर ताहां मै मछी ॥ ध्रु० ॥ जाहां तुम दीवा ताहां मै बत्ती ॥ जाहां तुम पंथी ताहां मै साती ॥ २ ॥ बेलके पाती शंकर पुजा ॥ नामदेव कहे भाव नही दुजा ॥ ३ ॥

॥ २३४७ ॥ दुध पीवोरे मेरे गोवींदराय ॥ ध्रु० ॥ काला बछेरा कपील गाय ॥ दुध दुहावन नामा जाय ॥ १ ॥ सुन्नेका कछुवा दुधने भरीया ॥ पिवो नारायण आगे धरीया ॥ २ ॥ परवाकी सुरत दुध नहीं पीवत ॥ शीर पछार पछार नामा रोवत ॥ ३ ॥ ऐसा भक्त मै कबहु न पाया ॥ नामदेवने देव हसाया ॥ ४ ॥

॥ २३४८ ॥ नामा तै झुटारे ॥ तेरा पंथ झुटारे ॥ अल्ला है आलम का साइ ॥ सोही गुप्त चेहेरारे ॥ १ ॥ मुसलमान साहेब जाने ॥ नही राम सु

तोली ॥ पांच बखत निजाम गुजरी ॥ महजत नही कैं बोली ॥ २ ॥ पादशहा नही दीवानारे ॥ तेरा तुंही दीवानारे ॥ धृ० ॥ गाइत्री सो हम बि जानी ॥ खेतनी राना खांती ॥ एक पाव तो छीनलीया है ॥ तीन पावपर जाती ॥ ३ ॥ नामा तुही झुटारे ॥ बकरी काटी मुरगी काटी ॥ हलाल कहताहै ॥ मुरगीमेसे अंडा निकला ॥ हलाल कैं नही होता है ॥ ४ ॥ पादशहा तुही दीवारे ॥ बावा आदम हमबी जाने ॥ ढवळानंदी आवे ॥ सीरालसेटका बेटा मारा ॥ हराम खाना खावे ॥ ५ ॥ नामा तु० ॥ उननें मारा उननें तारा ॥ उनने कीया उधारा ॥ मुवा पोंगडा आप जीवावे ॥ ऐसा राम मेरा ॥ ६ ॥ पादशहा तु० ॥ दशरथके दोनो बेटे ॥ राम लछमण भाई ॥ घर छोडके जंगल बसाया ॥ जोरू आप गमायीं ॥ ७ ॥ नामा० ॥ जळउपर पाषाण तारे ॥ चरनसें शिला उधारी ॥ रावण मारकर बिभीषण थापा ॥ लंका बकसी सारी ॥ ८ ॥ पादशा तु० ॥ गाउं बछवा दोनो काटे ॥ नामा आगे डारे ॥ नामदेवनें हात लगाया ॥ बछीया पीवन लागे ॥ ९ ॥ अब तों भली बनी हैजी ॥ सबका एक धनी हैजी ॥ १० ॥ नामा अकबर सहजी मीले ॥ साचा झगडा उनका ॥ उचोनीचो करकर देखे ॥ सोही उचानीचा ॥ ११ ॥ अबतो भली० ॥

॥ २३४९ ॥ मन पंछीया मत्त पड पिंजरे ॥ संसार माया जाळरे ॥ १ ॥ धन जोबन रूप कारण ॥ न कर गर्व गव्हाररे ॥ २ ॥ एकदिन मो तिन विरिया ॥ सदा झमकत कालरे ॥ ३ ॥ कुंभ काच्या निर भरिया ॥ बीनसत नहि बाररे ॥ ४ ॥ कहत नामदेव सुन भई साधु ॥ साधु संगत धरनारे ॥ ५ ॥

॥ २३५० ॥ पंढरीनाथ विठाई बतावो मुजे पंरढीनाथ विठाई ॥ धृ० ॥ माय बापके सेवा करीये पुंडलीक भक्त सवाई ॥ वैकुंठसे विष्णु लाये खडे करकर बतलाई ॥ १ ॥ चंद्रभागा बालवंटपर कबिरा धुम चलाई ॥ साधु संतकी हो गयी गर्दी भजन कुटाई खुब खाई ॥ २ ॥ त्रिगुणामें रेनु वेनु बजावें सागरका जवाई ॥ दही दुधकी हंडी फुटगई भरभर दुधया पाई ॥ ३ ॥ नामदेव देवके गुरू शिखावें खेचरी मुद्रागाई ॥ कृष्णजीकी बारबार गावे हरीनाम बढाई ॥ ४ ॥

॥ २३५१ ॥ हीन दिन जात मेरी पंढरीके राया ॥ ऐसा तुमनें नामा दरजी कायकु बनाया ॥ १ ॥ टाळ बिना लेके नामा देऊळमें

गया ॥ पुजा करते बह्मन उन्नें बाहेर ढकलाया ॥ २ ॥ देऊळके पिछे नामा अल्लक पुकारे ॥ जीदर जीदर नामा उदर देऊळ ही फिरे ॥ ३ ॥ नाना वर्ण गवा उनका एक वर्ण दुध ॥ तुम कहाके बह्मन हम कहाके सुद ॥ ४ ॥ मन मेरी सुई तन मेरा धागा ॥ खेचरजीके चरणपर नामा सिंपी लागा ॥ ५ ॥

---

## नानक साहेबाच्याग्रंथामधील हिंदुस्थानी पदें.

### राग आसा.

॥ २३५२ ॥ एक अनेक व्यापक पूरक जत देखो तत सोई ॥ माया चित्रबिचित्र विमोहेत बिर्ला बूझे कोई ॥ सब गोविंद है सब गोविंग है गोविंद बिन नही होई ॥ सूत एक मनसतसहंस है जैसे ओतप्रोत प्रभु सोई ॥ जलतरंग अर फेन बुदबुदा जलते भिनन होई ॥ यह प्रपंच परब्रह्मकी लीला औ बिचारत आनन होई ॥ मिथ्या परम अर सुपन मनोरथ सत पदारथ जान्या ॥ सुकिर्त मनसा गुरुपदेशी जागृतीही मन मान्या ॥ कहेत नामदेव हरीकी रचना देखो हृदय बिचारी ॥ घटघट अंतर सर्व निरंतर केवळ एक मुरारी ॥ १ ॥

॥ २३५३ ॥ आनीले कुंभ भराइले उदक ठाकूरको स्नान करो ॥ ब्यालीस लखजी जलमे होते ॥ विठल भैला काय करो जत्र जाव तत्र विठल भैला महा अनंद करे सब केला ॥ आणियेले फूल परोईले माला ठाकूरकी हू पूजा करूं ॥ पहले बास लई है भवरे विठल भैला काय करूं ॥ आणीले दुध रंधाईले खीर ठाकुरको नैवेद करूं ॥ पहिलें दूध बटाऱ्यो बचरे बिठल भैला काय करूं ॥ इभे विठल उभे विठल विठल बिन संसार नही ॥ थान नंतर नामा परथवे पूर रह्यो तूं सर्व मीह ॥ २ ॥

॥ २३५४ ॥ मन मेरे गज जिव्हा मेरी काती ॥ माप माप काटो जमकी फासी ॥ कहा करूं जाती कहा करूं पाती ॥ रामको नाम जपो दीनऔराती ॥ रागबिन रागो सिवबिन सीवो ॥ रामनामबिन कही न जीवो ॥ हम तो भगतकरूं हरीके गुण गाऊ ॥ आठ प्रहर आपना खसमकूं त्यागु ॥ सोनेकी सुई रूपेका धागा ॥ नामाका चित्त हरसूं लागा ॥ ३ ॥

॥ २३५५ ॥ सांप कुंच छोडे बिख नही छांडे ॥ उडुक माहे जेसे बक-ध्यान मांडे ॥ काहेको किजे ध्यान जपना ॥ जबते सुध नही मन अपना ॥ सिंघ अच भोजन जो नर जाने ॥ ऐसेही फल देव बखानें ॥ नामेके स्वामी लाहेले झगडा ॥ राम रसायन पिवो रेदगडा ॥ ४ ॥

॥ २३५६ ॥ परब्रह्म जे चिनसी आसा ते न भावसी ॥ रामभगत चेतीयले अचित मन राक्षी ॥ कैसें मन करेगारे संसार सागर बिखेको बना ॥ झुटी माया देखके भुलारे मना ॥ सिंपिके जन्मदेला गुरुपदेश भैला ॥ संतके प्रसाद नामा हर भेटला ॥ ५ ॥

## राग गुजरी.

॥ २३५७ ॥ जो राजदे तब कवन बढाई ॥ जो भीक मंगावे तबक्या घटा जाई ॥ तूं हर भज मन मेरे पद निर्बाना ॥ बहूर न होये तेरा आवज जोना ॥ सब ते उपाई परम पुलाई ॥ जिस तूं देवे तिसे भुजाई ॥ सतगुरू मिले तब संसार जाई ॥ किसहू पुजूं दुजा नजर न आई ॥ एके पाथर किजे भाव ॥ दुजे पाथर धरिये पाव ॥ जे वह देवतो हमबी देव ॥ कहे नामदेव हम हरीकी सेव ॥ ६ ॥

## राग सोरट.

॥ २३५८ ॥ जब देखा तब गावा तो जना धिरज पावा ॥ नाद समाईलोरे सदगुरू भेटले देवा ॥ जै जिनमिल कारजिसंता ॥ तहे अनाहद शब्द बिजंता ॥ जोति जोत समानी ॥ मैं गुरु प्रसादी जानी ॥ रतन कमल कोठडी चमकार बिजल तहीं नाहीं दूर ॥ निज आत्मा मेरा है रह्या भरपूर ॥ जहे अनाहद सूर उजाडा ॥ तहे दिपक जले छंछारा ॥ गुरुप्रसादी जान्या ॥ जन नामा सहज समान्या ॥ ७ ॥

॥ २३५९ ॥ पाड पडो सन पुछले नामा ॥ काप है छानछवाई हो ॥ तो पै दुगुणी मजुरी देउ ॥ मोको बेडी देउ बताई हो ॥ रिबाई बेडी देनन जाई ॥ देख बेडी रह्यो समाई ॥ हमारे बेडी प्राण धारा बेडी प्रत मजुरी मागे ॥ जो कोई छान छवाने हो ॥ लोक कुटुंब सब हूते तोरे ॥ तो आपण बेडी आवे हो ॥ ऐसो बर्णन साकू ॥ सब अंतर सब ठायी हो ॥ गुंगे महा अमृत रस चाख्या पुछे कहन न जाई हो ॥ बेडीके

गुण सुनरी बाई ॥ जलद बाण ध्रुव थाप्यो हो ॥ नामेके स्वामी सिया बहोरी लंका बिबिखन आपो हो ॥ ८ ॥

॥ २३६० ॥ अन मडपा मंदल बाजे ॥ बिन श्रवण घर हर गाजे ॥ बादल बिन बरखा होई ॥ तो तत बिचारे कोई ॥ मोको मिलीयो राम सनेही ॥ जहे मिली है देह सोदेही ॥ मिल पारस कंचन होया ॥ मुक मनसा रतन परोया ॥ निज भावभया परम भागा ॥ गुरु पुछे मनपती यागा ॥ जल पितर कुंभ समान्या ॥ सब राम एककर जान्या ॥ गुरु चेले है मनमान्या ॥ जीननामे तत पछाना ॥ ९ ॥

## राग घनासरी.

॥ २३६१ ॥ गहेरी करके निब खुदाई ॥ उपर मंडप छाये मारकंडे ते कवन काई ॥ जीन तिर्णधर मूड बुलाए ॥ हमरो कर्ता राम सनेही ॥ काहेरे नर गर्व करत है ॥ बिनस जाय कूठी देही ॥ मेरी मेरी कयरो करते दूर जो धनसें भाई ॥ बारह जो जन छत्र चलेथा ॥ देही गिरजन खाई ॥ सब सोनेकी लंका होती ॥ रावणसे अदकाई ॥ कहाभयो दरबाधे हातीं खीनमे भई पराई ॥ दुर्वासासों करत ठगोरी ॥ जादवयह फल पाये ॥ किरपाकरी जिन अपने उपर ॥ नामदेव हर गन गाये ॥ १० ॥

॥ २३६२ ॥ दस बरागने मुह बसकिनी ॥ पंच हुकामिट नावो ॥ सतर दोय भरे अमृत सर ॥ बिखको मार कठावो ॥ पाछे बहुरन आवन पावो ॥ अमृत बानी घटते उचरो ॥ आत्मको समझावो ॥ बजर कुठार मोहे हरी छीना ॥ कर मिनत लग पावो ॥ संतनके हम उलटे सेवक ॥ भगत न ते डर पावो ॥ हितकर भगत करे जो जन ॥ तिन भव सगल चुकाई ये ॥ कहत नामदेव बाहर क्या भरमो ॥ इत संजम हर पाईये ॥ ११ ॥

॥ २३६३ ॥ मारबर जैसे नीर बालहा ॥ बेल बालहा कर हला ॥ ज्यो कुरंगनिस नाद बालहा ॥ मेरे मन रामैया ॥ मेरा मन रूढो अन्योतरंग रुढो मेरो रामैया ॥ ज्यो धरणीको इंद्र बालहा ॥ कूसम बास जैसे भवरला ॥ जूं कोकल को अंब बालहा ॥ तो मेरे मन रामैया ॥ चतवीको जैसे सूर बालहा ॥ मासन सरोवर हंसला ॥ जूं तरणी कोकंत बालहा ॥ त्यूं मेरे मन रामया ॥ बारकको जैसे खिर बालहा ॥ चातक मूख जैसे

जलधरा ॥ मशरीको जैसे नीर बालहा ॥ त्यूं मेरे मन रामया ॥ साधक सिद्ध सकल मुनी चाहे विरले काहू डीठला ॥ सकल भवन तेरो नाम बालहा ॥ त्यूं नामे मन विठला ॥ १२ ॥

## राग तोडी.

॥ २३६४ ॥ कोई बोले निरवा कोई बोले दूर ॥ जलकी मशरी चले खजूर ॥ काहेरे बकवा दलायो ॥ जिन हरपायो तिने छपायो ॥ पंडत होके बेद बखाने ॥ मूरख नामदेव रामै जाने ॥ कोनको कुलंक रखो ॥ राम नाम लेत ही भयो ॥ पतत पवित्र भये राम कहितही ॥ राम संग नामदेव जिनको प्रत्यय आयी ॥ एकादशीव्रत रहे काहेको तिरथ जाई ॥ भणत नामदेव सुकृत सुमत भये ॥ गुरुमत राम कहेको कोन वैकुंठ गये ॥ १३ ॥

॥ २३६५ ॥ तीन छंदे खेलो आछे ॥ कुंभारकेघर हंडी आछे ॥ राजाके घर सांडीगो ॥ बावनके घर रांदी आछे ॥ रांदी सांदी हांदीगो बाणेके घर हिंग आछे ॥ भहिसर माथे सिंगगो ॥ देवल मध्य लिंगया आछे ॥ लिंग सिंग हिंग गो ॥ तेलीके घर तेल आछे ॥ जंगलमध्ये वेल गो ॥ मालीके घर केल आछे ॥ केल बेल तेल गो ॥ संतामधे गोव्यंद आछे ॥ गोकलमधे श्याम गो ॥ नामे मधे राम आछे ॥ राम श्याम गोव्यंद गो ॥ १४ ॥

## राग तलंग.

॥ २३६६ ॥ मै अंधले की टेक तेरा नाम खुंद कारा ॥ मै गरीब मै मसकीन तेरा नाम है अधारा ॥ करीमा रहिमा अलाह्र तूं गनी ॥ हाजरा हजूर दर पेस तूं मनीं ॥ दरियाव तूं हिंदद तूं बिसवायार तूं धनी ॥ देह लेह एक तूं दिगर कोनही ॥ तूं दाना तूं बिना मै बिचार क्या करी ॥ नामेचे स्वामी बकसिंद तूं हरी ॥ १५ ॥

## राग बिलावल.

॥ २३६७ ॥ सुफल जन्म मोको गुरू किना ॥ दुःख बसार सुख अंतर दिना ॥ ग्यान जन मोको गुरू दिना ॥ रामनाम बिन जीवन मन हिना ॥ नामदेव स्मरण कर जाना ॥ जगजीवनसे जीव समाना ॥ १६ ॥

## राग गौंड.

॥ २३६८ ॥ असमेद जगमें तुला पुरख दाने ॥ प्राग स्नानें ॥ तो न पुजे हर किरत नामा ॥ आपने राम भजरे मन आळसीया ॥ गया पिंड भर्त्ता बनारस अस वस्ता मुखवेद चतूर पडता सकल धर्म ईच्छिता गुरु ग्यान इंद्रिय दृढता खट कर्म सहत रहता ॥ सिव्ह सगत संवादं मन छोड छोड सकल भेदं ॥ स्मर स्मर गोविंदं भज नामा तरसह भवसिंधु ॥ नाद भरमे जैसे मृगाये ॥ प्राण त्यजे वाको ध्यान न जाये ॥ ऐसे रामा ऐसे हेरो राम छोड चित अंत न फेरो ॥ जूं मिना हेरे पसू आरा सोना घडते हरे सुनारा ॥ जूं बिरवी हेरे परनारी ॥ कोंडा डारत हिरे जुवारी ॥ जै जै देखो तै तै रामा ॥ ताके चरण नित्य ध्याये नामा ॥ १७ ॥

॥ २३६९ ॥ मोको तारले रामा तारले ॥ मै अजान जन तर बिन जानो बाप बिठला बाह दे ॥ नरतेह सुर होई जात निमखमे सत्गुरु बुध सिखलाई ॥ नरते उपज स्वरगको जीसो सो ओखद मै पाई ॥ जहा जहा ध्रुव नारद टेके नेक टकावो मोही तेरे नाम अब लंब बहुत है नामेकी निजमतएही ॥ मोह लाभती ताला बेली ॥ बछरे बिन गाय अकेली ॥ पानीया बिन मीन तलफे ऐसे राम नाम बिन बापरो नामा ॥ जैसे गायका बाछा छुटला ॥ थान चोखत माखन घुटला ॥ नामदेव नारायण पाया ॥ गुरु भेटत अलख लखाया ॥ जैसे विखे हे तपर नारी ॥ ऐसे नामे प्रीत मुरारी ॥ जैसे तापते निर्मल घामा ॥ तैसे राम नामबिन बापरो नामा ॥ १८ ॥

॥ २३७० ॥ हरहर करत मीटे सब भर्मा ॥ हरको नामले उत्तम धर्मा ॥ हरहर करत जात कुलहरी ॥ सो हर अंधलेकी लकरी ॥ हरे नमस्ते हरेनमः ॥ हरहर करत नही दुःखजन ॥ हरहर नाखुष हरे प्राण अजामिल कियो वकुंठे थान ॥ सुत्रा पढावत गणका तरी ॥ सो हर नैनोका पुतरी ॥ हरहर करत पूतनातरी ॥ बाल घातनी कपटे भरी ॥ स्मरण द्रोपद सुत धरी ॥ गौतमसती शिलानिसतरी ॥ केसी कंस मथन जिन किया ॥ जिया दान कालीको दिया ॥ परणेव नामा ऐसो हरी ॥ जस जपत भये अपदा टरी ॥ १९ ॥

॥ २३७१ ॥ भैरो भूत शितला धावे ॥ खर बाहनको छार उडावे ॥ हूं तो एक रमया लेहू ॥ आन बदलावन देहूं ॥ सिव सिव करके जो नर ध्यावे ॥ वर्द चढे डमरू डमकावे ॥ माहा माईकी पूजा करे ॥ नर ते नार होय उतरे ॥ तूं कहियतहै आद भवानी ॥ मुक्त की बरीया कहा छपानी ॥ गुरूमत रामनाम गहुमिता ॥ परणवे नामा यौ कहे गीता ॥ २० ॥

॥ २३७२ ॥ आज नामें बिठल देख्या मूरखको समझ्यावोरे ॥ पांडे तुमरी गायभी लोधेका खेत खातीथी ॥ लेकर ठेंगा तंगरी तोरी ॥ लांगत लांगत जातीथी ॥ पांडे तुमरा महादेव ॥ धवले बलद चढ आवत देख्याथा ॥ मोदीके घर खाना पाका ॥ वाका लडका मार्‍याथा ॥ पांडे तुमरा रामचंद सोभी आवत देख्याथा ॥ रावन सेती सरवर होई घरकी जोय गवाईथी ॥ हिंदु अन्ना तुरककाणा दो हाते ग्यानी श्याणा ॥ हिंदु पूजे देहुरा ॥ मुसलमान मसीद नामें सोई सेव्या जह देहुराना मसीद ॥ २१ ॥

## राग रामकली.

॥ २३७३ ॥ आणीयले कागद कादीयले गुडीया आकाशमध्यें भ्रमिले ॥ पंच जनासो बात बतौआ चित्तसुदोरी राखीले ॥ मन रामनाम बेधिले ॥ जैसे कनककला चित मांडियले ॥ आणिलें कुंभ भराईले उदक राजकुमार पुरंदरीये ॥ हस्त बिनोद बिचार करत है चित्त सुगागर राखीले ॥ मंदर एक द्वार दस जाके गौचरावन छाडीयले ॥ पांचकोसपर गौचरावत चित्त सुबछरा राखीले ॥ कहत नाम देव सुनो तर लोचन बालक पालन पौढियले ॥ अंतर बाहर काज विरुधी चित्त सुबारक राखीयले ॥ २२ ॥

॥ २३७४ ॥ बेद पुराण शास्त्र या अनंता ॥ गीत कवित्व न गावोंगो ॥ अखंड मंडल निरंकारमें नाहद बन बजावोंगो ॥ बैरागी रामे गावोंगो शब्द अतीत अनाहद राता ॥ अकलके घर जावोंगो ॥ ईडा पिंगला और सुखमना कोणे बंद रहावोंगो ॥ चंद सूरज दोई संकर राखूं ब्रह्मजोत मिल जावोंगो ॥ तीरथ देखन जलमें पैसो जिया जंत न संतावोंगो ॥ अट-सट तिरथ गुरू दिखाये ॥ घटही भितर नावोगो ॥ पंच सहायी जनकी शोभा ॥ भलो भलोना कहावोगो ॥ नामा कहे चित हरसु राता ॥ सुन समाध समावोंगो ॥ २३ ॥

॥ २३७५ ॥ माय न होती बाप न होता ॥ कर्म न होती काया ॥ हम नही होते तुम नही होते ॥ कवण कहाते आया ॥ राम कोईना किसई केरा जैसे तरवर पंख बसेरा ॥ चंद न होता सुर न होता ॥ पानी पवन मिलाया ॥ शास्त्र न होता वेद न होता ॥ कर्म कहाते आया ॥ खेचर भूचर तुलसी माला ॥ गुरूप्रसादी पाया ॥ नामा परणवे परम तत्व है ॥ सद्गुरू होई लखाया ॥ २४ ॥

॥ २३७६ ॥ बनारसी तप करे उलट तीरथ मरे अग्नी दहे काया कल्प किजे अस्मेद यज्ञ किजे ॥ सोना गर्भ दान दिजे ॥ राम नाम सर तो न पुजे ॥ छोड छोडरे पाखंडी ॥ मन कपट न कीजे ॥ हरका नाम नित्य निस लीजे ॥ गंगा जो गोदावरी जाईये कुंभ जो किदारे नाईये गोमती सहस्त्र गौ दान दीजे कोटजो तीरथ करे तनजो हिमाले गाले ॥ राम नाम सर तौन पूजे ॥ असदान गजदान सेजानारी भुमदान ऐसो दान नित्य निस ही कीजे ॥ आत्मजो निर्मल किजे आप बराबर कंचन दिजे ॥ राम नाम सर तौन पूजे मन न कीजे रोष ॥ जमें न दिजे दोष ॥ निर्मल निर्वाण पद चीत दीजे ॥ दसरथ राय नंद राजा मेरा रामचंद्र ॥ परणवे नामा तत रस अमृत पीजे ॥ २५ ॥

राग मारु.

॥ २३७७ ॥ चार मूर्त चार सिद्ध मिलके दुलहू प्रभुकी शरण पऱ्यो ॥ मुक्त भयो चहूं जुगजान्यो ॥ जस कीरत माथे छतर धऱ्यो ॥ राजाराम जपत कोण कोण तऱ्यो ॥ गुरुपदेस साधकी संगत भक्त भक्त ताको नाम पऱ्यो ॥ शंख चक्र माला तिलक बिराजत देख प्रताप जम डऱ्यो ॥ निर्भय भये राम बल गर्जत जन्ममरण संताप हऱ्यो ॥ अमरीकको दियो अभय पद राज बिभीखन अदक कऱ्यो ॥ नौनिध ठाकूर दई सुदामे ध्रुव अचल अजुन टऱ्यो ॥ भक्त हेत माऱ्यो हर नाखुप ॥ नृसिंहरूप हो देह धऱ्यो ॥ नामा कहे भक्त व सके सब ॥ अजहू बलके द्वार खऱ्यो ॥ २६ ॥

राग भैरव.

॥ २३७८ ॥ जैसी भुखे प्रीत अनाज ॥ तृखावंत जलसे ती काज ॥ जैसी मूढ कुटुंब परायण ॥ तैसी नामें प्रीत नारायणा ॥ नामें प्रीत नारा-

यणा ॥ लागी सहज सभाय भयो बैरागी ॥ जैसी पर पुरखा रतनारी ॥ लोभी नर धनका हीत कारी ॥ कामी पुरखा कामिनी प्यारी ॥ ऐसी नामीं भीत मुरारी ॥ साई भीत जे आभ लाये ॥ गुरु प्रसादी दुधाजाये ॥ कबहून तुटस रह्या समाये ॥ नामें चितलाया सचनाये ॥ जैसी भीत बारक आरमाता ॥ तैसा हेरसती मनराता ॥ परणवे नामदेव लागी भीत ॥ गोविंद बसे हमारे चित ॥ २७ ॥

॥ २३७९ ॥ घरकी नार त्यागे अंधा ॥ परनारीसे घाले धंदा ॥ जैसे सिंबल देख सुवा बिगसाना ॥ अंतकी बार मुवाल पटना ॥ पापीका घर अग्नीमाह ॥ जलत रहे मिटवे कबना ॥ हरकी भक्त न देखे जाय ॥ मारग छोड अमारग पाय ॥ मुलोमूला आवे जाय ॥ अमृत डार लादविस खाय ॥ ज्यौन वेस्वाके परे अखारा ॥ कापड पहर करे शृंगारा ॥ पुरे ताल निहाले सास ॥ वाके गले जमका है फास ॥ जाके मस्तक लिखो कर्मा ॥ सोभज परहै गुरुकी शरणा ॥ कहत नामदेव यह बिचार ॥ इनविद संतो उतरोपार ॥ २८ ॥

॥ २३८० ॥ संटा मरका जाय पुकारे पढे नही हमही पच हारे ॥ राम कहे कर जाल बजावे ॥ चटीया सबे बगारे ॥ राम नाम जप गोकरे हिरदे हरजीको स्वरण धरे ॥ बसुधा बसकीनी सब राजे विनती करे पट रानी ॥ पुत प्रऱ्हादका कही नही माने ॥ तिन तो और ठानी ॥ दुष्ट सभा मिल मंत्र उपाया ॥ करस है औद घनेरी ॥ गिर तर जल ज्वाला भय राख्यो राजाराम माया फेरी ॥ काड खड्ग काल भय कोप्ये ॥ मोह बतावो जो तोह राखे ॥ पीत पीतांबर त्रिभुवन धनी स्तंभ माह हर भाखे ॥ हर नाकस जीन नखो विदाऱ्यो ॥ सुर नर किये सनाथा ॥ कहे नामदेव ॥ हम नरहर ध्याते ॥ राम अभय पद दाता ॥ २९ ॥

॥ २३८१ ॥ सुलतान पुछे सुनरे नामा ॥ देखो राम तुमारे कामा ॥ नामा सुलतानें बांधला ॥ देखो तेरा हर विठला ॥ बिस्मील गौ देव जिवाय नातर गर्दन मारूं ठाय ॥ बादशाह ऐसी क्यौ होये ॥ बिस्मिल किय न जिवे कोय ॥ मेरा किया कुछु न होय ॥ कर है राम होय है सोय ॥ बादशाह चढ्यो हंकार ॥ गजहस्ती दिनो चमकार ॥ रुदन करे नामे की माय ॥ छोड राम किन भजे खुदाय ॥ नाहु तेरा पुंगडा ना तूं मेरी माय ॥ पिंड पडे तो हरगुन गाय ॥ करे गजेंद्र सोंडकी

चोट ॥ नामा उभरे हरकी ओट ॥ काजी मुल्ला करे सलाम ॥ ईन हिंदु मेरा मल्या मान ॥ बादशाह बिनती सुनयेहो ॥ नामें सरभर सोना लेव ॥ माल लेहू तो दोजक परूं ॥ दीन छोड दुनियाको भरूं ॥ पावो बेडी हाथो ताल नामा गावे गुण गोपाल ॥ गंगा जमन जब उलटी वहे ॥ तो नामा हर करता रहे ॥ सात धरी जब बिती सुनी ॥ अबहून आयो त्रिभुवन धनी ॥ पाखंतन बाज बजाईला ॥ गरुड चढे गोविंद आइला ॥ आपने भक्तकी करी प्रीत पाल ॥ गरुढ चढ आये गोपाल ॥ कहत धरन कोडी करू कहत लेकर उपर धरूं ॥ कहत मुई गौ देहु जवाय ॥ सब कोई देखे पति आय ॥ नामा परणवे सेलम सेल ॥ गौदुहाई बछरा मेल ॥ दूध दोह जब मटकी भरी ॥ ले बादशाहके आगे धरी ॥ बादशाह महलमे जाय औ घटकी घट लागी आय ॥ काजी मुल्ला बिनती फर्माय ॥ बक्षसि हिंदु मै तेरी गाय ॥ नामा कहे सुनो बादशाह ॥ यह कुछ पतिया मुझे दिखाय ॥ ईसपती याका एह प्रमाण ॥ साचसील चालो सुलतान ॥ नामदेव सत्र रह्यो समाय ॥ मिल हिंदु सब नामे पह जाय ॥ जो अब की बार न जीवे गाय नाम देवका पतिया जाय ॥ नामे की कीरत रही संसार ॥ भक्त जनाले उधऱ्या पार ॥ सकल क्लेश निंदक भया खेद ॥ नामें नारायण नाहीं भेद ॥ ३० ॥

॥ २३८२ ॥ जो गुरुदेवत मिले मुरार ॥ जो गुरुदेवत उतरे पार ॥ जो गुरुदेवत वैकुंठ तरे ॥ जो गुरुदेवत जीवन मरे ॥ सत सत सत गुरुदेव ॥ झुट झुट झुट झुट आन सब सेव ॥ जो गुरुदेवत नाम दृढावे ॥ जो गुरुदेव न दहदिस धावे ॥ जो गुरुदेव पंचते दूर ॥ जो गुरुदेव न मरबो झूर ॥ जो गुरुदेवत अमृत वाणी ॥ जो गुरुदेवत अकथ कहाणी ॥ जो गुरुदेवत अमृत देह ॥ जो गुरुदेव नाम जप लेह ॥ जो गुरुदेव भुवनत्रय सुझे ॥ जो गुरुदेव उच पद बुझे ॥ जो गुरुदेवता सिस आकास ॥ जो गुरुदेव सदासा वास ॥ जो गुरुदेव सदा बैरागी ॥ जो गुरुदेव परनिंदा त्यागी ॥ जो गुरुदेव बुरा भला एक ॥ जो गुरुदेव ललाटे लेख ॥ जो गुरुदेव कंद नही हीरे ॥ जो गुरुदेव देहुरा फीरे ॥ जो गुरुदेवत छापर छाई ॥ जो गुरुदेव सहज निकसाई ॥ जो गुरुदेवत आठसट नाया ॥ जो गुरुदेवत चक्र लगाया ॥ जो गुरुदेव द्वादस सेवा ॥ जो गुरुदेव सबे दुःख मेवा ॥ जो गुरु देवत संशय तुटे ॥ जो गुरु देवत जमते छुटे ॥ जो गुरुदेवत भवजल तरे ॥ जो गुरुदेवता जन्म न मरे ॥ जो गुरुदेव अठदस बिवहार

जो गुरुदेव अठारे भार ॥ विन गुरुदेव आवर नही जाई ॥ नामदेव गुरुकी सरनाई ॥ ३१ ॥

राग बसंत.

॥ २३८३ ॥ साहेब संकट व्हय सेवक भजे ॥ चिरकाल नजीवे दौ कुल हसे तेरी भक्ति न छोडूं भावे भजे ॥ चरन कमल मेरे हियारे वसे जैसे अपने धनीं प्राणी मरण मांडे ॥ तैसे संतजन राम नाम न छांडे ॥ गंगा गया गोदावरी संसारके कामा ॥ नारायण सो प्रसन्न होये ता सेवक नामा ॥ ३२ ॥

॥ २३८४ ॥ लोभ लहेर अति निझर बाजे ॥ काया डूबे केशवा ॥ संसार समुद्रे तारक गोविंदे ॥ तारले बाप विठला ॥ आन लवेडा हो खेवट न साको ॥ तेरा पार न पाया विठला ॥ होऊ घादल सद्गुरु मिलवो तूं मोको पार उतार केशवा ॥ नामा कहे हो तरभी न जाणो ॥ मोको बाह दे बाप विठला ॥ ३३ ॥

॥ २३८५ ॥ सेहेज अवल धुंदी मनी गाडी चालती पिछे तिनका लेकर हाकती ॥ जैसें पनकर तुटत हाकथी ॥ सर धोवन चाली लाडली ॥ धोबी धोवे विरहे विरहता हर चरन मेरा मन राता ॥ भणत नामदेव रमरह्या ॥ अपने भगत परकर दया ॥ ३४ ॥

राग सारंग.

॥ २३८६ ॥ काहेरे मन बिख्या बन जाय ॥ भुलोरे ठग मुरी खाय ॥ जैसे मीन पानीमे रहे काल जाल की सुध नही लहे ॥ जिव्हा स्वादी जीवत लोह ऐसे कनक कामिनी बांदेमोह ॥ जूं मधमाखी संचे अपार ॥ मधलीनो मुख दीनी छार ॥ गऊ बाचको संचे खीर गला बांधकर दोह लेव अहीर ॥ माया कारन सरम अति करे ॥ सो माया ले गाडे धरे ॥ अति संचय समजे नही मूढ तन धरती धन हो गयो दूर ॥ काम क्रोध तृष्णा अति जरे साध संग कबहू नही करे ॥ कहत नामदेव त्याची आण ॥ निरभय होये भजे भगवान ॥ ३५ ॥

॥ २३८७ ॥ बदो कीन हो माधो मोसो ॥ ठाकूर ते जन जन ते ठाकूर खेल परो है तोमू ॥ आपण देव देहुरा आपण आपलगावे पूजा ॥ जलते

तरंग तरंग ते है जल कहत सुन न को दुजा ॥ आपे गावें आपे नाचे आप बजावे तुरा ॥ कहत नामदेव तूं मेरो ठाकूर ॥ जन उरा तूं पूरा ॥ ३६ ॥

॥ २३८८ ॥ दास अनंत मेरो निजरूप ॥ दर्शन निमक तापत्रय मोचन ॥ परसत मुक्त करत ग्रहे कूप ॥ मेरी बांधी भक्त छुडावे बांधे भक्त न छुटे मोहे ॥ एक समय मोको ग्रहे बांधे तो फुन मूपे जबाब न होये ॥ मै गुण बंद सकलकी जीवन ॥ मेरी जीवन मेरेदास ॥ नामदेव जाके जी ऐसी तैसो ताको प्रेम प्रगास ॥ ३७ ॥

राग मल्हार.

॥ २३८९ ॥ सेवियले गोपाल राय ॥ अकल निरंजन ॥ भक्त दान दिजे ज्याचे संतजन ॥ ज्याचे घर दिगज दिसे सरायचा ॥ बैकुंठभवन चित्रशाला ॥ सप्तलोक समान पूरियले ॥ ज्याचे घर लक्ष्मी कुवारी ॥ चंद्र सूरज दीवडे ॥ कौतक काल बपडा कोटवाल ॥ कोतवाल सो करागरी: सो ऐसा राजा श्रीनरहरी ॥ ज्याचे घर कुलाल ब्रह्मा चतुरमुख दावडा ॥ जन विश्व संसार राखियले ॥ ज्याचे घर ईश्वर बागला जगतगुरु तत सारखा जाग्यान भाकियले ॥ पाप पुण्य याचे धाडिया ॥ द्वारें चित्रगुप्त लेखिया ॥ धर्मराय परलीपर प्रतिहार ॥ तूं ऐसा राजा श्रीगोपाल ॥ ज्याचे घर गण गंधर्व ऋषि बापडे धाडिया ॥ गांवत आछे सर्व शास्त्रे बहु रुपीया ॥ आन गर्वा आखाडा मंडलीक ॥ बोल बोल आछे ॥ चौर धुले है ज्याचे है पवन चेरी सकत जी ले भवन ॥ अंडटूक ज्याचे भस्मति सो ऐसा राजा त्रिभुवनपती ॥ ज्याचे घरीं कूर्म पाल स हंस फणी वासत सज बालुवा ॥ अठारे धार बनस्पति माल्नी ॥ छिनमे करोडी मेघ माला पानी हारिया नख प्रवेश ज्याचे सुरसरी ॥ सप्त समुद्र ज्याचे घड थली ॥ एते जीव ज्याचे वर्तनी ॥ सो ऐसा राजा त्रिभुवनधनी ॥ ज्याचे घर निकट वर्ती अर्जुन ध्रुव प्रल्हाद अंबरिक नारद लेजे सिद्ध बुद्ध गणगंधर्व बान बहेला ॥ एथे जीय ज्याचे है घरी सर्वव्यापक अंतर हरि ॥ प्रणवे नामदेव साची आन ॥ सकल भक्त ज्याके निशान ॥ ३८ ॥

॥ २३९० ॥ मोको तूंना वसार तूंना वसार तूंना वसारे रामैया ॥ आलाप वंति हि भर्म जो हे ॥ मुजउपर सब कोपला ॥ सुद सुद कर मार उठायो ॥ काहा करो बाप बिठला ॥ मुयेहुये जो मुक्ति देउगे मुक्ति ना

जाने कोयला ए पंडिया मोको धेड कहत है तेरी पैज पछोडी होयला ॥ तूं जो दयाल कृपाल कहत है ॥ अति भुज भयो अपारला फेर दिया देहुरा नामेको पंडियानको पिछ वारला ॥ ३९ ॥

राग कानडा.

॥ २३९१ ॥ ऐसो राम राय अंतर जानी ॥ जैसे दरपन माह बदन परवानी ॥ बसे घटाघट लीप न झिपे ॥ बंधन मुक्त जात न दिसे ॥ पानी माहे देख मुख जैसा ॥ नामेको स्वामी विठल ऐसा ॥ ४० ॥

राग तोडी.

॥ २३९२ ॥ राम नाम खेती राम नाम वारी ॥ हामरे धन बाबा बनवारी ॥ टेक ॥ या धनकी देशहु आधी काई ॥ तसकर हारे नलगे कोई ॥ १ ॥ दहदिसीं राम रह्या भरपुरी ॥ सतनी नीयरे झाकत दुरी ॥ २ ॥ नामदेव कहे मेरे करम न सोई ॥ क्रतम साईसी करे न कोई ॥ ३ ॥

॥ २३९३ ॥ राम सोधन ताके काहा वथोरो ॥ अष्ट सिद्धि नव निधि करत नीहारो ॥ टेक ॥ हरण कसीब वध करी अधपती देही ॥ इंद्रको वभिो प्रहीलाद न लेही ॥ १ ॥ देव दानव जाही संपदा करी मानो ॥ गोष्पद सेवगताही त्रापदा करी जानो ॥ २ ॥ अर्थ धर्म कामकी कदा मोषी मागो ॥ दास नामदेव प्रेम मगती अंतरीं जो जागे ॥ ३ ॥

॥ २३९४ ॥ माझा प्राणोत विठ्ठला ॥ पैडी अटकी हो बांधला ॥ टेक ॥ कली पोटीं कुसमल कली काल ॥ मेरे बंधमो चहूं श्रीगोपाल ॥ १ ॥ काटी नारायण भवके बंध ॥ समृध दृढ करी वोडी कंद ॥ २ ॥ नाम देवका नराईन किन्ही सार ॥ चले प्रोहण उतरो पार ॥ ३ ॥

॥ २३९५ ॥ गरुड मंडल अव ॥ पृथ्वी पति गरुड मंडल याव ॥ टेक ॥ तूं पृथ्वी पति जाग्रत केला ॥ मैं गरुड गुन नागर चेला ॥ १ ॥ नामदेव कहे बालक तेरा ॥ भक्ति दान दे साहेब मेरा ॥ २ ॥

॥ २३९६ ॥ राममे रमी राम संभारे ॥ मैं बलिताका छीन न बिसारे ॥ टेक ॥ राम रमे रमीदी अईतारी ॥ वैकुंठनाथ मीले बनवारी ॥ १ ॥ राम रमे रमी दीजे हरी ॥ लाजनकी अई पसवा करी ॥ २ ॥ सरीर





सभागा सो मोही भावे ॥ पार ब्रह्मका जे गुन गावे ॥ ३ ॥ सरीर धरेकी इहे बढाई ॥ नामदेव नाऊ न वीसरी जाई ॥ ४ ॥

॥ २३९७ ॥ राम बोले राम बोले ॥ राम बिना कोऊ न बोलेरे भाई ॥ टेक ॥ एकल मिठीकुंजर चिटी ॥ भाजनहै बहु नाना ॥ स्थावर जंगम कीट पतंगा ॥ सब घट राम समाना ॥ १ ॥ एकल चीता रहीले नीता और छुटीले सब आसा ॥ प्रणवत नामा भये नेहि कामा तुम टाकुर मे दासा ॥ २ ॥

॥ २३९८ ॥ रामस नामानामही रामा ॥ तूं साहेब मैं सेवक स्वामी ॥ टेक ॥ हरी सरवर जग तरंग कहावे ॥ सेवग हरी तजी कहुं कत जावे ॥ १ ॥ हरि तरवर जग पंखी छाया ॥ सेवग हरि भजी आवे गवाया ॥ २ ॥ नामा कहे मैं नरहरी पाया ॥ राम रमे मैं रमी राम समाया ॥ ३ ॥

॥ २३९९ ॥ सहजे सहजे सब गुन जईल ॥ भगवंत भगवान ऐथी रहिला ॥ टेक ॥ मुकती भय लाजाय धायला ॥ वो सेवग स्वामी संगी राहिला ॥ १ ॥ * * * * पिवत प्राण केद न अघाइला ॥ २ ॥ राम नामा मिली संगी रहिला ॥ जबलग रस तबलग पिवेला ॥ ३ ॥

॥ २४०० ॥ जन नामदेव पायो नाऊं हरी ॥ जम अइका करी हे बौरी ॥ इब मोरी छुटी परी ॥ टेक ॥ भाव भगतकी नाना बिधि किन्ही ॥ फळका कोन करी ॥ केवळ ब्रह्म नीःकटी लीव लागी ॥ मुक्ति कहव परी ॥ १ ॥ नाम लेत सनकादिक तारे ॥ पार न पायो तास हरी ॥ नामदेव कहे सुनोरे संतो ॥ इब मोही समाझी परी ॥ २ ॥

॥ २४०१ ॥ धिग् तो वक्ता धिग् तो सुरता ॥ प्राणनाथको नाम नहिं लेता ॥ टेक ॥ नाद वेद सब गनीक पुराण ॥ रामनामको मरम न जाण ॥ १ ॥ पंडित होई सो बेद बखाणो ॥ मुरीख नामदेव रामही जाणो ॥ २ ॥

॥ २४०२ ॥ रामनाम जपी वै श्रवण सुनीवो ॥ सलील मोह्ये मैं वही नहीं जाईवो ॥ टेक ॥ अकथ कथ्यो न जाई कागदी लीख्यो न माई ॥ सकल भूवन पती मिल्यो सहज भाई ॥ १ ॥ राम माता राम पिता राम सर्वही जीव दाता ॥ मणत नामा * * * यो छीयो कहेरे पुकारी गीता ॥ २ ॥

॥ २४०३ ॥ राम आपणा पयाणा राम आपणा पयाणा ॥ नामदेव मुरख लोग सयाना ॥ टेक ॥ जब हाम हिरदे प्रित बिचारी ॥ रजबल छांडीर भय भीखारी ॥ १ ॥ जब हरि कृपा करी हम जाणा ॥ तब्रथा चेरा अबभये राणा ॥ २ ॥ नामदेव कहे मैं नरहरी गावो ॥ पद खोवत परमारथ पावो ॥ ३ ॥

॥ २४०४ ॥ तूं अगाध वैकुंठ नाथा ॥ तेरे चरण मेरो माथा ॥ टेक ॥ जबभूतें नाना पेषु ॥ जंत्र जाऊं संत्रतूहीजु पेषु ॥ १ ॥ जल थलमहीयल काष्ठ पाष्याणा ॥ आगम निगम बार बेद पुराणा ॥ २ ॥ मैंमे निखा जन मानीर बधन ज्वाला ॥ नामा काटा कुर दिन दयाला ॥ ३ ॥

॥ २४०५ ॥ सबे चतुरता बरते व्यपना ऐसा न कोई ॥ नीरपखव्हे खेले ताथे मिठे अंतर पखी ॥ टेक ॥ अंतर कुटील रहत खचरमती ॥ उपरी मज नकरी दिन खपती ॥ ऐसा न कोई नीरपख व्हे खेले ॥ प्रभुविना ऐर रेनी दिन सुपनी ॥ १ ॥ सोई साध सोई सुनीग्यानी ॥ ज्याकी मिलागी रहिल्यो रसनी ॥ भणत नामदेवनी नीथीती पाई ॥ जाकई रामनाम निज रजनी ॥ २ ॥

॥ २४०६ ॥ मैं अपराधी बाप मैं अपराधी ॥ साचिली तुह्मची भक्ति न साधी ॥ टेक ॥ घणो अग्यान अगीना भंगी ॥ कीय काम कुसंगा संगी ॥ १ ॥ यहु अग्यान इहीं वरी घाटो ॥ निखर कमाई नछट नाटो ॥ २ ॥ कीया दान गोष्पद सब जाने ॥ पैटा परबस मेर भवाने ॥ ३ ॥ नरनीर दोष नरायन नामीं ॥ ऐसा बबक अह्मचा स्वामी ॥ ४ ॥ नरक निवार नरहरी नामा ॥ कीलेमे कसराह दिवाना ॥ ५ ॥

॥ २४०७ ॥ लोक एक अनंत वाणी ॥ सहीजावंन सारंगपाणी ॥ टेक ॥ जिहीं जिहीं रंगें लोकराता वाहा रंगीं जन नरा चाला ॥ जिहीं जिहीं मारग संसा जाइला सोपथ देरे वचिला ॥ १ ॥ नीबो नई कोई एक चिन्हें झुटे भ्रमी भुली इला ॥ प्रणवत नामो परम तंतरे सत गुरु निकट बताईला ॥ २ ॥

॥ २४०८ ॥ कहां करू जाती कहां करूं पाती ॥ राजाराम सेऊ दीन राती ॥ टेक ॥ मन मेरो गंगा मन मेरो कासी ॥ राम रमे काटु जमकी फांसी ॥ १ ॥ सीवणा सीवणा सीउ सिऊ ॥ राम विना हुं कैसे जीऊं ॥ २ ॥

अनंत नामका सिऊ बागा ॥ जा सीवत जमका डर भागा ॥ ३ ॥ सुरतकी सुई प्रेम का धागा ॥ नामेका मन हरिसो लागा ॥ ४ ॥

॥ २४०९ ॥ ऐसें मन राम नामें वेधिला ॥ जैसे कनक तुला चितरा खीला ॥ टेक ॥ आणीले कागद साजीले गुडी ॥ आकाश मंडल छोडी ॥ पाच जना सो बात बाताउवो ॥ चितसो डोरी राखिला ॥ १ ॥ आणिले कुंभ भराले उदक ॥ राजकुंवारी पुलंदरीये ॥ हस्त विनोद देत करताली ॥ चितस्यो घागरी राखीला ॥ २ ॥ मंदीर एक द्वार दस जाके ॥ गऊ चरावण चालीला ॥ पाच कोषर चरावे ॥ चित्त सौवाछा राखीला ॥ ३ ॥ भणत नामदेव सुनो त्रिलोचन ॥ बाली पालणी पौटिला ॥ आपण मंदिर काजई करती ॥ चित्तसो बालीक राखीला ॥ ४ ॥

॥ २४१० ॥ जौलग राम नामें हेत न भयो ॥ तौलग मेरी करत जनम गयो ॥ टेक ॥ लागी पंक पकले धोवो ॥ नृमल होवे जनमवी गोवे ॥ १ ॥ भीतरी मैला बाहेरी चोखा ॥ पाणी ष्यंड पखाले धोखा ॥ २ ॥ नामदेव कहे सुरही पर हरीये ॥ भेड पुछकेस भवजल तीरीये ॥ ३ ॥

॥ २४११ ॥ काना चिता का गाइला ॥ का घसी घसी चंदन लाविला ॥ टेक ॥ अपापर नाहीं चिन्हीला ॥ तो चित्त चितारे डहकीला ॥ १ ॥ की रतन आगे नाचे लाई ॥ स्यभदेव चिन्हें नही कोई ॥ २ ॥ स्यभ देवकी सेवा जाणे ॥ तो देव दृष्टि व्है सकल पछाने ॥ ३ ॥ नामदेव भणे मेरे यही पूजा ॥ अतमराम अवर नही दुजा ॥ ४ ॥

॥ २४१२ ॥ रामची भगती दुहेलीरे बापा ॥ सकळ निरंतर चिन्हीले आपा ॥ टेक ॥ बाहेरा उजेला भीतरी मैला ॥ पाणी पडपखाल न गहिला ॥ १ ॥ पुतली देवकी पाती देवा ॥ दुही बीध नामन जानई सेवा ॥ २ ॥ पाखंड भगती राम नही रीझे ॥ बाहरी अंधालोग पतीजे ॥ ३ ॥ नामदेव भणे मोरा नेत्र पलटा ॥ राम चरणा चित्त बहु पैठा ॥ ४ ॥

॥ २४१३ ॥ काहेकु कीजे ध्यान जपना ॥ जो मन नाहसुध अपना ॥ टेक ॥ साप काचली छांडे बीसही न छांडे ॥ उदकमे बक ध्यान मांडे ॥ १ ॥ स्यभके भोजन कहा लुकाना ॥ तैसे बछटे देवपुजाना ॥ २ ॥ तेरी पूजा सेवा एरे ॥ मोली पराई काठी देरे ॥ ३ ॥ नामदेवका स्वामी भानी लई न्हागरा ॥ रामभाई न परी भगरा ॥ ४ ॥

॥ २४१४ ॥ भगत वेला बाबा काडला ॥ वीन परती तइ पुजाइ सीता ॥ टेक ॥ न्हावे धोवे करे सनाना ॥ हीरदे अखी न माघे कान ॥ १ ॥ गल पेहरे तुलसीकी माला ॥ अंतर गती कोई लाभाकाला ॥ २ ॥ नामदेव कहीये पेठावलु ॥ भीतरी लाख उपरी हिंगलु ॥ ३ ॥

॥ २४१५ ॥ साई मेरो रीझई साची ॥ दडे कपटी न जाई राची ॥ टेक ॥ कोई बहु गावे कोई बहु नाचे ॥ जब लग नाहीं हीरदे साचे ॥ १ ॥ अनेक सीगारे बहु कामनी ॥ नाहीं न पीव मनी भावे भामिनी ॥ २ ॥ पतीवरता पतीहीकु जाणे ॥ नामदेव कहे हरि नाहीकी माने ॥ ३ ॥

॥ २४१६ ॥ रतन पारखु नीरारे ॥ मुलमा मही हीरारे ॥ टेक ॥ संख पारखु नीर खीरा जोई ॥ बैरागर क्या खोटा होई ॥ १ ॥ कालकुष्ट बीख बाधो गाठी ॥ कहां भयो नही खायो बाटी ॥ २ ॥ खायो बिख किन्हो बिस्तार ॥ नामदेव भयो हरि गरुड बार ॥ ३ ॥

॥ २४१७ ॥ कलंक रहो रामनाम लेतही ॥ पतीत पावन भये राम कहतही ॥ टेक ॥ राम संगीना नामदेव जीनहु मतीही आई ॥ एकादशी व्रत करे काहेकु तीर जाई ॥ १ ॥ भगत नामदेव सुमती सुकृत आई ॥ राम कहत जन कोण बैकुंठ जाई ॥ २ ॥

॥ २४१८ ॥ रामनाम नरहरि श्रीबनवारी ॥ सेइथें निरंतर चरण मुरारी ॥ टेक ॥ गुरुको सबद बैकुंठनी सरणी ॥ हीरदे मीयाग प्रेम रस बहनी ॥ १ ॥ ज्या कारणें त्रिभुवन फीर आय ॥ सो निधान घट भीतरी पाय ॥ २ ॥ नामदेव कहे कहु आय न जाय ॥ अपनो राम घरीं बैठे गाय ॥ ३ ॥

॥ २४१९ ॥ राम जुहारी न ऐर जुव्हारू ॥ जीवनी जाइ जनम कत हारू ॥ टेक ॥ आनंदें वस्योरी नन भाखू ॥ राम रसायन रसना चाखू ॥ १ ॥ थावर जंगम कीट पतंगा ॥ सत्य राम सब हीतके संगा ॥ २ ॥ भणत नामदेव जीवनी रामा ॥ अनदेव फोकट बेकामा ॥ ३ ॥

॥ २४२० ॥ जादीन भगता अईला ॥ चारू मुगती पाइला ॥ टेक ॥ दरसन धारवा भागिला ॥ कोई अहु सुकृत जागिला ॥ १ ॥ सनमुख दरसन देखिला ॥ तब जनम सुफळ करी लेखिला ॥ २ ॥ वैष्णव हीरदे रेखिला ॥ जन नामदेव आनंदें गाईला ॥ ३ ॥

॥ २४२१ ॥ परहारि धंदाकार सबैला ॥ मेरी चिंता राम करेला ॥ टेक ॥ नारायण माता नारायण पीता ॥ वैष्णव जन परवार सहिता ॥ १ ॥ केशोके वहुघत भयला ॥ तापे नामदेव ऐकत देला ॥ २ ॥

॥ २४२२ ॥ माई गोव्यद बाप गोव्यदा ॥ जाती पाती गुरुदेव गोव्यदा ॥ टेक ॥ गोव्यद ग्यानवेद ध्याना ॥ सदा आनंदी राजाराम ॥ १ ॥ गोपद गावे गोव्यद नाचे ॥ गोव्यद भव सदा तृतिकाछे ॥ २ ॥ गोव्यद पाती गोव्यद पूजा ॥ नामो भणौ येरे दव न पूजा ॥ ३ ॥

॥ २४२३ ॥ माई तूं मेरे बाप तूं ॥ कुटुंबी मेरा विठला तूं ॥ टेक ॥ हरी हमारी नावरी ॥ हरी उतार पैल तीरीं ॥ १ ॥ साध संगती मिली पहचार ॥ केसो नामदेवका दातार ॥ २ ॥

॥ २४२४ ॥ हीरदे माला हीरदे गोपाला ॥ हिरदे सिष्टीको दीन दयाला ॥ टेक ॥ हीरदे रंग मही हीरदे छाया ॥ हीरदे रैणी पाणी नीकया ॥ १ ॥ हीरदे दीपक धरी उजाला ॥ पुटीकी वार तटी गण ताला ॥ २ ॥ हीरदे रंग राम नही जाती ॥ रंगीरे नामा हरीके भाती ॥ ३ ॥

॥ २४२५ ॥ अवनी बीसारू राम संभारू ॥ जो रबीसारू तो सबहारु ॥ टेक ॥ तन मन हरी परीछीन वारी ॥ घडी घडी मुहुरत पल नही डारू ॥ १ ॥ सुमीरन स्वासाभरी भरी पीऊ ॥ रंक राम गुड खाईर जीऊ ॥ २ ॥ अगे मांडी राम रटी लेहु ॥ जौर बीसारू तौ रोई देहू ॥ ३ ॥ नामदेव कहे ऐर असन करीहू ॥ राम नाम धन लागो ही मरीहू ॥ ४ ॥

॥ २४२६ ॥ रामराई उलगु अन जानु ॥ अनंत जाऊ भले जाऊ ॥ टेक ॥ जोग जुगती कछु मुगती न भाखूं ॥ हर नाम हर नाम हीरदे भाखूं ॥ १ ॥ राम नाम नामदेव अनहद आछे ॥ भगती प्रेमरस गावे नाचे ॥ २ ॥

॥ २४२७ ॥ बीहु बीहु तेरी सबल माया ॥ अगे इनी अनक भरमाया ॥ टेक ॥ मायाके अंतर ब्रह्म न दीसई ॥ ब्रह्मके अंतर माया न दीसइ ॥ १ ॥ भणत नामदेव अये बीबी धाना ॥ देहू घोडावर चढाई कान्हा ॥ २ ॥

॥ २४२८ ॥ तुन बीसारी तुन बीसारी ॥ मैता बीसारी स्वामी मोरी ॥ टेक ॥ अखील भवन पती गरडी ग्रामीं ॥ अती काल हारे अंतरजामी ॥ १ ॥ जामन मरण बीसर जन पूजा ॥ तुम सादेव अवर नही दुजा ॥ २ ॥ तुजु विश्व रमई जन नामा ॥ सकल संतनके पुरवन कामा ॥ ३ ॥

॥ २४२९ ॥ बाप मझा समझीन परई ॥ साच उठारी अइर कछ भरई ॥ टेक ॥ पाणीका चित्त पवनका थंबा ॥ कृत उपायो रचो अरंभा ॥ १ ॥ इहाका उपजाई हा बिलाना ॥ बोलन हरा काहा समाना ॥ २ ॥ कहई नारायण सुनी जन नामा ॥ जहां सुरती तहां पुरवण कामा ॥ ३ ॥ जीवत राम न भयो प्रकासा ॥ भणत नामदेव भूवो कैसी असा ॥ ४ ॥

॥ २४३० ॥ कैसें तीरत बहु कुटील भयो ॥ कली कह चीहन देसी नाहीं नडीयो ॥ टेक ॥ कैसी सेवा कैसे ध्यान ॥ जैसे उजल बग उनमान ॥ १ ॥ भाव भुजंग भणयो हारी ॥ सुरतीसी बाणा मती मजारी ॥ २ ॥ नामदेव भणे बहु इही गुणी बाध्य ॥ डाईणी प्रभ सकल गजर बाध्य ॥ ३ ॥

॥ २४३१ ॥ काल भई बापा सह्या न जाई ॥ महा भैभीत जगत कृत खाई ॥ टेक ॥ अनेक मुनेश्वर उझो जाई ॥ सुरनर थाके करत उपाई ॥ १ ॥ कंपे पीर पेगंबर देव ॥ रीखी कंपे चौरासी देव ॥ २ ॥ चंद सुरज घर पवन आकाश ॥ पाणी कंपे अगनीगरास ॥ ३ ॥ कंपे लोक लोकांतर खंड ॥ तेभी कंपे असथीर प्यंड ॥ ४ ॥ अवीचल अभै नारायण देव ॥ नामदेव प्रनवे अलख अभेव ॥ ५ ॥

॥ २४३२ ॥ ऐसे जगमे दास नीयारा ॥ बेद पुराणा पढो किन सो ॥ चौपंडित करो बिचारा ॥ टेक ॥ दधि बिलोई जैसे घृत लीजे ॥ बहुरी न एकट थाई ॥ पावक दार जतन करी काधौ बहुरी न कष्ट समाई ॥ १ ॥ पारस परसी होत जैसे कंचन बहुरी न त्रंबक होई ॥ अक पलास बेधीय चंदन काष्ट कही न काई ॥ २ ॥ रामही जपही रामही जाने ॥ छाडी करमकी असा ॥ रामही भज तई रामही होई प्रणवे नामा दासा ॥ ३ ॥

॥ २४३३ ॥ इतनो कहत तोही कहा लागत ॥ राम रटी सोवत जागत ॥ टेक ॥ धृव प्रल्हाद इही गुन तारे ॥ रामनाम अक्षर दो उचारे ॥ १ ॥ रामनाम सनकादिक रोता ॥ रामनाम निर्भय पद दाता ॥ २ ॥ भणत नामदेव बीसोवीसा ॥ जैसी मनसा तैसी दसा ॥ ३ ॥

॥ २४३४ ॥ मैको माधो मळसूत्रधारी ॥ मैं काहां जानो सेवा तुह्मारी ॥ टेक ॥ तुह्मारे घरको भांडवी दावत ॥ तुह्मारे घरको अदिकलावत ॥ १ ॥ नामदेव कहे देवनींके देवा ॥ सुरन न फुनीग तुह्मारी सेवा ॥ २ ॥

॥ २४३५ ॥ संत प्रवाणी भगती अपीला ॥ नही अपीला प्राण त्यागीला ॥ टेक ॥ हमची थाती तुह्मवसी भैला ॥ हम वाजविला तुम चित लागीला ॥ १ ॥ चारी मुगती आठही सिद्धि आया ॥ भगती न अपो दास न भैया ॥ २ ॥ नामदेव विठल सनमुख बोलिला ॥ भगती अपीला मुगती त्यागिला ॥ ३ ॥

॥ २४३६ ॥ बाजी जामन बाजी रची ॥ मैं बली ताकी जीनी खची ॥ टेक ॥ बाजी जामन बाजी मरण ॥ बाजी लागी रहीरे मन ॥ १ ॥ बाजी मनमे सोची बिचारी ॥ अपे सुन अपे सूभधारी ॥ २ ॥ नामदेव कहे मै तेर शरणा ॥ मीठी घाली जामन अरु मरणा ॥ ३ ॥

॥ २४३७ ॥ पुरीख हाजारी बरण नाहीं ॥ दुरी ठठा बोले माही ॥ टेक ॥ ग्यान ध्यान रहीत खेले ॥ अदृष्टी माहे दृष्टि मेले ॥ १ ॥ सगीलागा भेख काछे ॥ सारीखा अगे अरो पाछे ॥ २ ॥ पुज जाणी रमीजे कोई ॥ तो हरी समीप न्है न जन सोई ॥ ३ ॥ नीगंध रूप विवर्जित वासा ॥ भणवत नामा हरिका दासा ॥ ४ ॥

॥ २४३८ ॥ देवातरी भगतीनमो पै होइजी ॥ जीही सेवा साहिब भल मानइ करी नही जाने कोइजी ॥ टेक ॥ सुमृत कथा होत नाही मो पेइ ॥ कुथु तो होई अभिमानजी ॥ जोइ जोइ करूसो मोही वाधई ॥ त्राही त्राही भगवानजी ॥ १ ॥ जामें सकल जीवकी उतपती ॥ सकल जीवमे अपजी ॥ माया मोहकरी सकल भुलाणा ॥ तूं घटी घटी व्यापक वापजी ॥ २ ॥ सो वैकुंठ कहो धो कैसा ॥ खंडख स्वाजहा जाइन ॥ यहु परतीती होत नही मोपे ॥ जीवंत मुगती न पाइयेन ॥ ३ ॥ मै जनजीव

ब्रह्म तूं माधो ॥ वीनदेख्या दुःख पाइये ॥ साखे सम पके है जन ॥ नामा संगी मिलावन गाइये ॥ ४ ॥

॥ २४३९ ॥ देवा मेरी हीन जाती हो ॥ काहुपे सहीयन जाती हो ॥ टेक ॥ मैं नही मैं नही तूं है मैं नही हो ॥ तूं एक अनेक हो विस्तारो मेरी चरम न साइ हो ॥ १ ॥ जसे नदीया समदीस मावी धरणी बहती हो ॥ तुह्मारी कृपाथे नीच उंच भये तूं कालकी काती हो ॥ २ ॥ नामा कहे मेरदे वीन देवा संग न साती मी तुला ॥ तुह्मारे सरनहु भजी दुव्यो हुबद छोडीव बा विठुला ॥ ३ ॥

॥ २४४० ॥ अण बोता चरण नही छारू ॥ मैं तुह्मारी अन बाबा विठला ॥ टेक ॥ टगमग टगमग क्या चोघता ॥ एक बोल बोलूं बोलता ॥ १ ॥ कैधु कुतेल कैधुबली ॥ प्रणव पे नामदेव पुर बहुरली ॥ २ ॥

॥ २४४१ ॥ काइरे मन बीसया बनजाई ॥ देखत ही ठगमुली खाइ ॥ टेक ॥ मधुमाषी संचीयो अपार मधुलीनो मुषी दीन्हो छांडर ॥ गाई बछरूसंचे खीर गलही बांधे दुही लई अहीर ॥ १ ॥ जैसे मीन पाणीमें रहे काल जालकी सुध नही रही ॥ जीभ्या स्वादे निगल्यो लोह कनक कामना बाध्यो मोही ॥ २ ॥ बीसया काजी बहुत श्रमकरे सो बिसयाले एडे घेरे ॥ अंतीं समया जान नही मुली धन धरती अचला भयो धुली रे ॥ ३ ॥ कामक्रोध तृष्णा * * * साध संगती कभु ना करे ॥ प्रणत नामदेव ताकी आनन भई व्हे सारंग प्राण रे ॥ ४ ॥

॥ २४४२ ॥ जत्र जाउ तत्र विट्ठल भैला ॥ विट्ठल लियो राजाराम देवा ॥ टेक ॥ अणली कुभरा लियो उदका ॥ बाल गोघड न्हान चारउ ॥ पहिली नीरजु मछली ठैरा ॥ जुटनी भैला काय करूं ॥ १ ॥ अनले केसर सुकटी समसरी ॥ बालगोविंदही बोली ॥ सुपही त्रास भुपग मीलनी ॥ झुटणी भैला काय करूं ॥ २ ॥ अणिले पहुप उवालय माला ॥ बालगोविंद कु माल दचु ॥ पहिली वास जु भौरा लीनी ॥ झुटनी भैला काय करूं ॥ ३ ॥ अणीले घृत जोले वाती ॥ बाल गोविंद दीप रचु ॥ पहिली जोती नामा देखीहु ॥ झुट भैली काय करूं ॥ ४ ॥ अणिले अन्न जोले धुपा ॥ बालगोविंद दीप रचु ॥ पहिली बासना सीका अले ॥ झुटणी भैला काय करूं ॥ ५ ॥ अणीले तंदुला रांधीले खीरा ॥ बालगोविंद ही खीर रचू ॥

पहिली जुवछे वाघे ॥ झुटणी मैला काय करूं ॥ ६ ॥ आउत विठ्ठल जाउत विठ्ठल ॥ विठ्ठल व्यापक माया ॥ नामाका चित्त हरिको लागा ॥ तातें परम पद पाया ॥ ७ ॥

॥ २४४३ ॥ लटकी ना बोलों बाप ॥ वर्तमान गाढा ॥ कोल्हा येव्हडा मोतीडा ॥ मैं माझे डोलें देखिला ॥ टेक ॥ छेली बेली बांध जाईला ॥ मंजरीया भै डुडे ॥ उडत पंख मैल परपेर ॥ वानर लीजे व्हौ दाडे ॥ १ ॥ बावलींयाचें खोटें ॥ माखणीयाचे पोटे ॥ संषे सुणहा मारिला ॥ तहा मैंडक अभीला लोटे ॥ २ ॥ अह्म जुगैला विराटदेस ॥ गाढी दुध कैला ॥ सरबे अटे गाझीला तहा ॥ चहुदह रजन भरीला ॥ ३ ॥ लटक्यो गाईयो गठीया ॥ जोले गटीयो इव डौराले ॥ उडत पंखीमे मुंगी पेखी ॥ वाटी इवटी कोले ॥ ४ ॥ विष्णुदास नामदेव इम प्रणवे ॥ यछे जीवची उक्ती ॥ लटिकी अछे सांगिलता ॥ छे मोख न मुक्ती ॥ ५ ॥

॥ २४४४ ॥ संतसु लेना संतसु देना ॥ संत संगतीनो दुस्तर तरणा ॥ १ ॥ संतकी छाया संतकी नाया ॥ संतसंगतीं वैकुंठ पाया ॥ २ ॥ कहा करूं जग देखत अंधा ॥ तेजी आनंद बिचारे धंदा ॥ ३ ॥ असंत संगतीं नामा कबहुन जाई ॥ संगतीमें रहा समाई ॥ ४ ॥

॥ २४४५ ॥ रामनाम बीन और नही दुजा ॥ कृष्ण देवकी करी हूं पूजा ॥ १ ॥ रामही माई रामही बाप ॥ राम बीना कुणाठाई पाप ॥ २ ॥ संपत्ती विपत्ती रामही होई ॥ राम विणा कुण तारी हे मोही ॥ ३ ॥ भजत नामा अमृतसार ॥ सुमरी सुमरी उतरे पार ॥ ४ ॥

॥ २४४६ ॥ सावध सावध रे भजले रे राजा ॥ उत्तम नरतनु पायो रे भाई । गाफल क्यौं हुवा दीवानो ॥ धृ० ॥ जिने जन्ममें डारा है तुजकूं। बिसर गया उनका ध्यान ॥ फिर पस्तायेगा दगा पायेगा । निकल जायेगा अवसान ॥ सावध० ॥ १ ॥ क्या करना सो आजि करले । फीर नये ऐसी जोडी ॥ हौंस जायेगा पिंजरा पडेगा । तुज कैसी भूल पडी ॥ सावध० ॥ २ ॥ सुन्नेका मंदिर मेहेल बनाया । धन संपत नहि तेरी ॥ मा भैन आवर जोरु है लडके । सुखके खातर सारे ॥ अकेले आना अकेले जाना । सब झुटी माया पसरीयुं ॥ सावध० ॥ ३ ॥ लक्ष चौऱ्यांसीका

फेरा आवेगा । तब चुपी मिलाये बंदकु ॥ फिरता फिरता जु रमता है बाबा । कोन रखे तेरे तनकु ॥ जिस माय उदरीं जन्म लायगा । तेरे संगत दुःख उनकु ॥ सावध० ॥ ४ ॥ गरभीकी यातना सुन मोरे भाइ । नवमास बंधन डारे ॥ नहीं जगा हलने चलनेकु बाबा । छोडनेकु कोई नहां आवे ॥ आगलगी है देखत अंधे । कायके खातर खोया ॥ सावध० ॥ ॥ ५ ॥ ऐसी बात सुनके नामा सावध हुवा । गुरुके पाव मिठी डारी ॥ मै अनाथ दुबले शरण भये तुमकु । आप गोरखके चरण लागेरी ॥ सावध० ॥ ६ ॥

॥ २४४७ ॥ राम विठ्ठला देव विठ्ठला ॥ हम तुमारे सेवक ॥ १ ॥ बालक बेला माई विठ्ठल बाप विठ्ठल ॥ जाती पाती गुरुगोत विठ्ठल ॥ २ ॥ ग्यान विठ्ठल ध्यान विठ्ठल ॥ नामाका स्वामी प्राण विठ्ठल ॥ ३ ॥

॥ २४४८ ॥ दूध पिवो गोविंद लाला ॥ धृ० ॥ काला बछरा कपिला गाई ॥ दूध दुहावत नामा जाई ॥ १ ॥ सोनेका गडवा दूधने भरिया ॥ पिवो नारायण आगे धरिया ॥ २ ॥ परभुवनकी मुरत दूध न पिवत ॥ सीर पछार नामा रोवत ॥ ३ ॥ ऐसा भगत मै कबु न पाया ॥ नामदेवने देव हसाया ॥ ४ ॥

॥ २४४९ ॥ भले बिराजे लंबकनाथ ॥ धृ० ॥ धरणी पाय स्वर्गलोंग माथ ॥ योजन भरके हाथ ॥ १ ॥ शिव सनकादिक पार न पावे ॥ अनगन सखा बिराजत साथ ॥ २ ॥ नामदेवके आपही स्वामी ॥ कीजे मोही सनाथ ॥ ३ ॥

॥ २४५० ॥ हीन दीन जात मोरी पंढरीके राया ॥ दुनयामो शिंपी नामा काहेकु बनाया ॥ १ ॥ टाळ दिंडी लेकर नामा देउलमो आया ॥ पुंजा करते बह्मन बाहेर भया ॥ २ ॥ सुन्ना तेरा सुई रूप तेरा धागा ॥ नाना बरन गाई एक बरन दूध ॥ ३ ॥ तुम कैसे बह्मन हम कैसे शूद्र ॥ देउल पिछे नामा अलक पुकारे ॥ जीधर जीधर नामा उधर उधर देउल फिरे ॥ ४ ॥ सुन्ना तेरा सुई रूपा तेरा धागा ॥ विदुराजेका छंद नामाकु लागा ॥ ५ ॥

---

# भुपाळ्या.

—:0:—

## भुपाळी कृष्णाची.

॥ २४५१ ॥ गवळण दसवंती पैं सांगे ॥ आली या कृष्णाचेनि मागें ॥ येणें येणें हो श्रीरंगे ॥ नवनीत चोरिले माझें ॥ धृ० ॥ तळवा तळहात टेंकित ॥ डावे गुडघ्यानें रांगत ॥ गौळ्या घरीं सारंगनाथ ॥ तो म्यां देखिला सये ॥ १ ॥ एके हातीं लोण्याचा कवळू ॥ मुख माखिलेंसे अळूमाळू ॥ चुंबन देतां अति परिमळू ॥ नवनीताचा गे सये ॥ २ ॥ येणें माझें कवाड गे उघडिलें ॥ येणें माझें शिंकें गे तोडिलें ॥ दह्या दुधाचे डेरे भक्षिले ॥ लंवडीले तक्राचे ॥ ३ ॥ ऐसें जरी मी जाणतें ॥ यमुना पाण्या नव जातें ॥ धरुनि उखळासी बांधितें ॥ शिक्षा लावितें गोविंदा ॥ ४ ॥ ऐसा पुराण प्रसिद्ध चोर । स्वामी नामयाचा दातार ॥ पंढरपुरी धरिला अवतार ॥ भक्त पुंडलिकासाठीं ॥ ५ ॥

## भुपाळी विठ्ठलाची.

॥ २४५२ ॥ उठाउठा प्रभात जाहली ॥ चिंता श्रीविठ्ठल माउली ॥ दीन जनाची साउली ॥ येई धांउली स्मरतांचि ॥ धृ० ॥ पंढरपुरी जे भिमातटी ॥ सुंदर मनोहर गोमटी ॥ दोन्ही कर ठेवुनियां कटीं ॥ भेटीसाठीं तिष्ठतसे ॥ १ ॥ कीरीट कुंडलें मंडित ॥ श्रीमुख अति सुंदर शोभत ॥ गळां वैजयंती डुल्लत ॥ हार मिरवत तुळसीचा ॥ २ ॥ सुरेख मूर्ति सगुण सांवळी । कंठी कौस्तुभ एकावळी ॥ केशर उटी परिमळ आगळी ॥ बुका भाळीं विलसतसे ॥ ३ ॥ पीत पितांबर कसला कटीं ॥ अक्षयीं वीट चरण तळवटी ॥ सकळ सौंदर्य सुखाची पेटी ॥ इंद्रिय संपुष्टी आठवातें ॥ ४ ॥ अति प्रिय आवडे तुळसी बुका ॥ तसीच प्रीति करी भोळ्या भाविका ॥ नामा पदपंकज पादुका ॥ शिरीं मस्तकीं वंदीतसे ॥ ५ ॥

॥ २४५३ ॥ उठा अरुणोदय प्रकाश जाहला ॥ घंटा गजर गर्जिनला ॥ हरि चौघडा सुरू जाहला ॥ काकड आरती समयाचा ॥ धृ० ॥ महाद्वारीं वैष्णव जन ॥ पूजा सामुग्री घेउन ॥ आले घावें तयांसी दर्शन ॥ बंदीजन गर्जती ॥ १ ॥ सभा मंडपीं कीर्तन घोष ॥ मृदंग टाळ विणे

सुरस ॥ आनंदें नाचती हरिचे दास ॥ परम उल्हास करूनिया ॥ २ ॥ चंद्रभागे वाळवंटी ॥ प्रातःस्नानाचि जन दाटी ॥ आतां येतिल आपुले भेटी ॥ उठी उठी गोविंदा ॥ ३ ॥ ऐसें विनवी रुक्मिणी ॥ जागृत जाहले चक्रपाणी ॥ नामा बद्धांजुळी जोडुनि ॥ चरणीं माथा ठेवितसे ॥ ४ ॥

॥ २४५४ ॥ उठा जागे व्हारे आतां ॥ स्मरण करा पंढरिनाथा ॥ भावें चरणीं ठेवा माथा ॥ चुकवी व्यथा जन्माच्या ॥ १ ॥ धन दारा पुत्रजन ॥ बंधु सोईरे पिशून ॥ सर्व मिथ्या हे जाणून ॥ शरण रिघा देवासी ॥ २ ॥ मायाविघ्नें भ्रमलां खरे ॥ ह्मणतां मीं मायेनि घरें ॥ हें तों संपत्तीचें वारें ॥ साचोकारें जाईल ॥ ३ ॥ आयुष्य जात आहे पहा ॥ काळ जपतसे महा ॥ स्वहिताचा घोर वहा ॥ ध्यानीं रहा श्रीहरीच्या ॥ ४ ॥ संत चरणीं भाव धरा ॥ क्षणक्षणा नामस्मरा ॥ मुक्ति सायोज्यता वरा ॥ हेंचि करा बापानों ॥ ५ ॥ विष्णुदास विनवी नामा ॥ भुलूं नका भवकामा ॥ धरा अंतरीं निज प्रेमा ॥ न चुका नेमा हरिभक्ति ॥ ६ ॥

॥ २४५५ ॥ उठा साधुसंत । साधा आपुलें हीत ॥ गेला गेला हा नरदेह । मग कैंचा भगवंत ॥ ध्रु० ॥ उठोनियां पहांटे । विठ्ठल पहा उभा विटे ॥ चरण तयाचे गोमटे । अमृत दृष्टि अवलोका ॥ १ ॥ जागें करा रुक्मिणीवरा । देव आहे निदसुरा ॥ वेगें लिंबलोण करा । दृष्ट होईल तयासी ॥ २ ॥ पुढें वाजंत्रें वाजती । ढोल दमामे गर्जती ॥ होते कांकड आरती । माझे पांडुरंग रायाची ॥ ३ ॥ शिवनाद शंख भेरी । गजर होतो महाद्वारीं ॥ केशवराज विटेवरी । नामा चरण वंदितो ॥ ४ ॥

॥ २४५६ ॥ उठोनियां प्रातः काळीं ॥ तुळस वंदावी माउली ॥ तुळस संतांची साउली ॥ मुगुटीं वाहिली विष्णूनें ॥ १ ॥ तुळस असे ज्याचे द्वारीं ॥ लक्ष्मी वसे त्याचे घरीं ॥ येवोनी श्रीहरि ॥ क्रिडा करी स्वानंदें ॥ २ ॥ तुळसीसी मंजुरा येतां ॥ पळ सुटे यमदूतां ॥ अद्वैत तुळस कृष्ण स्मरतां ॥ नासे दुरित चित्ताचें ॥ ३ ॥ जे जे तुळशी घालिती उदक ॥ ते नर पावती ब्रह्मसुख ॥ नामा ह्मणे पंढरिनायक ॥ तुळसी जवळी उभा असे ॥ ४ ॥

## पाळणे.

—:०:—

॥ २४५७ ॥ जो जो जो जो रे मधुसुदना ॥ बाळा जगजीवना ॥ हालवी यशोदा पाळणा ॥ निज बा नारायणा ॥ जो जो जो जो रे ॥ प्रथम अवतारीं ॥ स्तवन करिताची पै विधी करुणासागर ॥ गुणनिधी शंखासुर वधोनी ॥ १ ॥ द्वितीये संकष्टी ॥ इंद्रासी कुर्मरूप होसी ॥ सिंधु मंथुनिया श्रमलासी ॥ सौख्य समस्ता देसी ॥ २ ॥ त्रितीये वराह हिरण्याक्षी ॥ धरूनि त्याची कुक्षी ॥ पळता धरियेला अनुलक्षी ॥ फोडुनी त्याची वक्षी ॥ ३ ॥ चतुर्थ नरसिंह विशाळ ॥ अग्नीचा कल्होळ ॥ निवंडुनी असुराचे तेजाळ ॥ काढी अंतमाळ ॥ ४ ॥ पंचम वामन सुंदर ॥ क्षिराब्धीचा वर ॥ जेणें भुलविला दिनकर ॥ हारिला दानासुर ॥ ५ ॥ षष्ठम भार्गव अभिदानीं ॥ पिता जमदग्नी ॥ पृथ्वी निःक्षेत्री त्रिबाणीं ॥ दिधली विप्रा दानीं ॥ ६ ॥ सप्तम अयोध्यापुरवासी ॥ राजाराम होसी ॥ पितृवचनाचे नेमासी ॥ राहुनिया वनवासी ॥ ७ ॥ अष्टम अवतार गोकुळीं ॥ जन्मला वनमाळी ॥ चाणूर कंसाची मंडळी ॥ जाळुनी केली होळी ॥ ८ ॥ नवम बौध्य अवतार ॥ पुढें येती युगांतर ॥ ९ ॥ दशम कलंकी होणार ॥ नामा ह्मणे संत ॥ १० ॥

॥ २४५८ ॥ स्त्री गरवार पति उदरीं ॥ पतिव्रता पण साजे तियेनारी ॥ १ ॥ अबला खेळवी मोहें ॥ कडीये घेवोनी देतसे पाहे ॥ २ ॥ समस्तीं मिळोनी पाळणा घातला ॥ विष्णुदास नाम यानें अनुभव गाइला ॥ ३ ॥

---

## आरत्या.




—:०:—

॥ २४५९ ॥ युगें अठ्ठाविस विटेवरी उभा । वामांगें रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥ पुंडलिका भेटी परब्रह्म आलेंगा । चरणी वाहे भीमा उद्धरी जगा ॥ धृ० ॥ जयदेव जयदेव जय पांडुरंगा । रखुमाई वल्लभा राईच्या वल्लभा पावे जिवलगा ॥ १ ॥ तुळसी माळा गळां कर ठेवून कटीं । कासे पीतांबर कस्तुरी लल्लाटीं ॥ देव सुरवर नित्य येती भेटीं ।

गरुड हनुमंत पुढें उभे रहाती ॥ २ ॥ ओंवाळू आरती कुरवंड्या येती । चंद्रभागे माजीं सोडूनिया देती ॥ दिंडी पताका वैष्णव नाचती । पंढरीचा महिमा वर्णू मी कीती ॥ ३ ॥ ओंवाळूं आरति अनुछत्रपाळा । सोनियाचीं कमळें पद्माळे तळां ॥ राई रखुमाबाई राणिया सकळां । ओंवाळीला राजा विठ्ठल सांवळा ॥ ४ ॥ आषाढी कार्तिकी भक्तजन येती साधुजन येती । चंद्रभागेतीरीं स्नानें जे करिती ॥ दर्शन हेळा मात्रें तया होय मुक्ति । केशवासी नामदेव भावें ओंवाळिती ॥ ५ ॥ जय देव जय देव० ॥

## आरती कृष्णाची.

॥ २४६० ॥ हरिनाम गोड जाहले काय सांगूं गे माय ॥ गोपाळ बाहताती वेणु आरती पाने ॥ धृ० ॥ गेलें होतें वृंदावना तेथें भेटला कान्हा ॥ गोपाळासी वेध माझा छंद लागला मना ॥ १ ॥ आणिक एक नवल कैसें ब्रह्मादिकांलागी पिसें ॥ उच्छिष्टा लागोनिया देव जाहले जळीं मासे ॥ २ ॥ आणिक एक नवल चोज गोपाळांसी सांगे गुज ॥ आजळ जळीं चोजवेना पाहतां नेत्र ते अंबुज ॥ ३ ॥ आणि एक नवलपरि करीं धरिली सिदोरी ॥ गोपाळासी वाढीतसे नामयाचा स्वामी हरि ॥ हरिनाम० ॥ ४ ॥

## आरती ज्ञानदेवाची.

॥ २४६१ ॥ इंद्रायणिचे तटीं धरिला रहिवास । विश्व तारावया लक्ष्मी–निवास ॥ ज्ञानेश्वररूपें धरिलें निज वेष । वर्म जाणें तया सद्गुरु उपदेश ॥ जयदेव जयदेव जय ज्ञानदेवा । जीवा शिवाचा आदि परब्रह्म ठेवा ॥ १ ॥ कृष्ण एकादशी कार्तिकमासीं । आपण पंढरिनाथ सनकादिकांसी ॥ यात्रेसी येताती स्वानंद रासी । दर्शन घडे तया निज मुक्ति देसी ॥ २ ॥ ॥ जय० ॥ म्हैसिक पुत्र केला वाचक वेदाचा । प्रतिष्ठाणीं गर्व हरिला विप्रांचा ॥ विशेष अर्थ केला भगवतगीतेचा । प्रत्यक्ष द्वारीं पिंपळ शोभे कनकाचा ॥ ३ ॥ जय० ॥ सनकसिद्धगणांमाजीं तूं श्रेष्ठ । ज्ञानावरी माजीं ज्ञानवरिष्ठ ॥ अनुताप दिप्ति विश्व घनदाट । नामयावरी लोटे प्रेमाचा लोट ॥ ४ ॥ जय० ॥

## काकडआरति.

॥ २४६२ ॥ चंदनाची ओवरी उदविली प्रकारीं ॥ कनकाचा मंचक शेजे सुमनें वरी ॥ १ ॥ ओंवाळूं आलिया शेजे आरती ॥ निद्रा करी बापा

लक्ष्मीपती ॥ धृ० ॥ संतसनकादिक यांतें आज्ञा दिजे ॥ शुकादिक ज्ञानी यांचा नमस्कार घेजे ॥ २ ॥ बाळा प्रौढा मुग्धा यातें आज्ञा दीजे ॥ मज सेवका संनिध पहुडविजे ॥ ३ ॥ विष्णुदास नामा राहिला द्वारां नेहटी ॥ जयजयकार करित देतसे घिरटी ॥ ४ ॥

## आरत्या संतांच्या.

॥ २४६३ ॥ गुण आणि गंभीर रणधीर ॥ तया योग्य साजे केशव शरीर ॥ तैसा अमृतराज हा विसोबा खेंचर ॥ बोलोनी अबोलणा नकल्पी ऐसा सार ॥ १ ॥ जयजय आरती या हरिदासांच्या भक्ता ॥ दिंडी पुढें डोलत गाती पंढरिनाथा ॥ धृ० ॥ हरीदासा महिमा नवर्णवे वाचा ॥ पतिता उद्धरण जाणविला साचा ॥ त्याचा दासीपुत्र होय तो दैवाचा ॥ ह्मणोनी संतचरणीं भाव धरावा साचा ॥ २ ॥ साधुसंताघरीं श्वान मी होइन ॥ मग त्यांच्या पायीं नित्य लोळेन ॥ हरिभक्ति सोय ते मी लाभेन ॥ तयांचे पोसणें कइ मी होइन ॥ ३ ॥ दूध देखोनी जैसी मांजर सोय ॥ तैसे न संडवति या संताचे पाय ॥ चालतां तया संगे मद मत्सर जाय ॥ ह्मणोनी आवडी त्यांचे धरावे पाय ॥ ४ ॥ तैसी आरती हे अमृतराज ॥ गातां उन्मेष उन्मनी सहज ॥ सत्रावीचें बोळलें अमृत मज ॥ धन्य तृप्तितीर जोडलें सहज ॥ ५ ॥ यांचि कृपा तरी सार्थक जन्म ॥ नाहीं तरी निरर्थक होइल जाण ॥ विष्णुदास नामा ह्मणे नेणते अज्ञान ॥ केशवचरणीं ठेवुनी केलें सार्थक निर्वाण ॥ ६ ॥

॥ २४६४ ॥ क्षार उदक देउनी मधुरता आली ॥ तैसी लवण स्थिति अमृत खोली ॥ तयाच्या अंतरीं प्रवृत्ति मुराली ॥ परी साखरेची मौल्यता कवणे आणिली ॥ १ ॥ जयजय आरती प्रेम सिंधुपुरा ॥ ऐक्या ऐक्य केलें तुंवा येकसरा ॥ धृ० ॥ नित्य प्रेमें जागती जागरणी जागा ॥ आणिक उद्धरण जगासी सांगा ॥ येकि येकादशी पुण्य आलें तें पहागा ॥ द्वादशी लाधली ते भक्तासी मागा ॥ २ ॥ ऐसे परउपकारी लोळावें त्यांचे द्वारीं ॥ तेंची केशवध्यान येर लटिके संसारी ॥ त्यांचे रंगणीची शीळा देवा मज करी ॥ नाहींतरी व्यर्थ जन्मोनी पशुपरी ॥ ३ ॥ पूर्वज उद्धरण दिसे वैकुंठ वाट ॥ हरिदासाचे भार मीरवती गरुड टके गोमटे ॥ धन्य तृप्तितीर बरवें वाळुवंट ॥ वैष्णव रंगीं नाचतां हर्ष बहु वाटे ॥ ४ ॥

लाधलों समसुख काशीये जातां ॥ विश्वनाथ प्रेम प्रेमाचिया सत्ता ॥ बाणली वीरश्री पंढरीनाथा ॥ जिकडे तिकडें देखें हरीदास गर्जतां ॥ ५ ॥ निवृत्ति सोपान हे ज्ञानेश्वरु ॥ चांगदेव मुक्ताई वटेश्वरु ॥ अवघीयां अवघा साक्षात्कारु ॥ सद्गुरु जाण तो विसोबा खेंचरु ॥ ६ ॥ त्याचे चरणीं-चा रजरेणु हा नामदेव शिंपा ॥ पाहातां अनुभव सकळार्थ सोपा ॥ विठ्ठल कृपेस्तव यांची मजवरी कृपा ॥ हे एकची मूर्ति पावलों ऐसें देखोपां ॥ ७ ॥

## आरत्या विठ्ठलाच्या.

॥ २४६५ ॥ येइवो विठ्ठले माते माउलीये ॥ निढळावरी कर ठेउनी वाट मी पाहें ॥ १ ॥ येतियास पुसें जात्या निरोप ॥ पंढरपुरीं माझा मायबाप ॥ २ ॥ पितांबर शेला कैसा गगनीं झळकला ॥ गरुडावरी बैसुनी माझा कैवारी आला ॥ ३ ॥ विठोबाचें राज्य आह्मा नित्य दिवाळी ॥ विष्णुदास नामा जिवेभावें ओवाळी ॥ ४ ॥

॥ २४६६ ॥ उठा पांडुरंगा आतां दर्शन द्या सकळां ॥ झाला अरुणोदय सरली निद्रेची वेळा ॥ १ ॥ संत साधु मुनि अवघे झालेती गोळा ॥ सोडा शेजेसुख आतां पाहूंद्या मुखकमळा ॥ २ ॥ रंगमंडपीं महाद्वारीं झालीसे दाटी ॥ मन उतावेळ रूप पहावया दृष्टीं ॥ ३ ॥ राई रखमाबाई तुह्मा येऊंद्या दया ॥ शेजें हालउनी जागें करा देवराया ॥ ४ ॥ गरुड हनुमंत उभे पहाती वाट ॥ स्वर्गींचे सुरवर घेउनी आले बोभाट ॥ ५ ॥ झालें मुक्तद्वार लाभ झाला रोकडा ॥ विष्णुदास नामा उभा घेउनि काकडा ॥ ६ ॥

॥ २४६७ ॥ लाजलें गे माय आतां कोणा ओवाळूं ॥ जिकडे पाहावें तिकडे चतुर्भुज गोपाळू ॥ ध्रु० ॥ ओवाळाया गेलें मी द्वारकें ॥ जिकडे पहावें तिकडे चतुर्भुज सारिखें ॥ १ ॥ ओवाळाया गेलें मीहो मंदिरीं ॥ जिकडे पाहवें तिकडे चतुर्भुज श्रीहरी ॥ २ ॥ ओवाळाया गेलें सारंगधरा ॥ जिकडे पहावें तिकडे चतुर्भुज पसारा ॥ ३ ॥ वैजयंती गळां श्रीवत्सलांच्छन ॥ विष्णुदास नामा येणें दाविली खूण ॥ ४ ॥ लाजोनी गेलें सखये माझारीं ॥ जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज नरहरी ॥ ५ ॥

॥ २४६८ ॥ आजिचा दिवस आह्मां सोनियाचा ॥ गोवळू भेटला कान्हो नंदाचा ॥ १ ॥ कान्होबा पेंदारी येईल यमुने ॥ तयावीण मज घडी नगमे ॥ २ ॥ सोळासहस्र गोपी ह्मणती अगा जगज्जीवना ॥ एके वेळीं

भेटी देई नंदनंदना ॥ ३ ॥ उजळुनी आरती करूं कुरवंडिया ॥ शेष भरं नाम्या स्वामी वनमाळिया ॥ ४ ॥

---

## मराठी पदें.




—:०:—

॥ २४६९ ॥ कुडी ह्मणे आत्म्याला ॥ नका टाकुन जाऊं स्वामी मजला ॥ ध्रु० ॥ तुझी माझी बाळपणाची बहु प्रीत ॥ बसून दोघें पिंजऱ्यांत ॥ आतां कसें केलें चंचळ चित्त ॥ ओढवलें संचित ॥ आत्म्या तुझा कळेना मज अंत ॥ जातोस वैकुंठांत ॥ कधीं पडशील रे, पडशील माझ्या डोळां ॥ कुडी० ॥ १ ॥ आत्मा ह्मणे वचन ऐक कुडी ॥ तुझी न माझी जोडी ॥ अंतर पडलें नाहीं अर्ध घडी ॥ पुढें गेले गडी ॥ आह्मां जाणें आहे तांतडी ॥ तुटली मायेची बेडी ॥ आग लागो रे, लागो, या संचिताला ॥ कुडी० ॥ २ ॥ कुडी ह्मणे तूं माझा मनमोहन ॥ जातोस पिंजऱ्यांतून ॥ मी बैसलें परदेशी होऊन ॥ आतां मला नाहीं कोण ॥ बसा भाव भोगिले हौसेन ॥ सोन्याचें कंकण ॥ मजवर तुटून पडलें गगन ॥ कडाडलें अस्मान ॥ आतां भेटूं रे, भेटूं गळ्याशीं लावूं गळा ॥ कुडी० ॥ ३ ॥ कुडीला कोठें दिला हो जानिवसा ॥ मसणपूर गांव खासा ॥ तेथें भाव महार आहे खासा ॥ त्रैलोक्यामध्यें ठसा ॥ आत्मा पहातो कुडीचा तमाशा ॥ हिंडतो दाही दिशा ॥ जैसा गळ वोढून घेतो मासा ॥ होतो कासावीसा ॥ जेथून आला रे, आला तेथें गेला ॥ कुडी० ॥ ४ ॥ मैना कां रुसलीस तूं मजवर ॥ मी परदेशी नर ॥ हात जोडुनी तुझ्या समोर ॥ नको होऊं दिलगीर ॥ तुजला भाउबंध अवघे सार ॥ साहाय्य करतील फार ॥ तूं मृत्युलोकची राहाणार ॥ मला जाणें आहे दूर ॥ एकवीस स्वर्गांवरती माझें घर ॥ अवघ्याला महशूर ॥ विष्णुदास नामा पामर ॥ संतांचा किंकर ॥ सोडूं नका गुरूच्या चरणाला ॥ कुडी० ॥ ५ ॥

॥ २४७० ॥ अंतकाळीं मी परदेशी ॥ ऐसे जाणुनी मानसीं ॥ ह्मणोनियां हृषीकेशी ॥ शरण आलों तुजलागीं ॥ १ ॥ नवमास गर्भवासीं ॥ कष्टविलें सा मातेसीं ॥ अंतीं निष्ठुर झाली कैसी ॥ तीही दूरि राहिली

॥ २ ॥ बंधुबहिणींचा कळवळा ॥ हें तूं जाणसी दयाळा ॥ जेव्हां पडेल यम-शृंखळा ॥ तींही दूरि राहतील ॥ ३ ॥ कन्यापुत्रादिक बाळ ॥ दूर राहती सकळ ॥ तुझें दर्शन केवळ ॥ तेंही दूर राहिलें ॥ ४ ॥ बापालागीं जे आवड ॥ मुखीं घालुनी करी कोड ॥ जेव्हां लागे यमओढ ॥ तोहि दूर राहिला ॥ ५ ॥ देह गृहाची कामिनी ॥ ती ही राहिली भुवनीं ॥ मी तव जळतसें स्मशानीं ॥ अग्नीसवें एकला ॥ ६ ॥ इष्ट आले मित्र आले ॥ ते तो स्मशानाहूनीं परतले ॥ टाकोनियां मजलागीं गेले ॥ एकटाचि स्मशानीं ॥ ७ ॥ ऐसें जाणोनी निर्धार ॥ मग मज आलासे गहिंवर ॥ दाही दिशा अंधकार ॥ मग मज कांहीं सुचेना ॥ ८ ॥ ऐसें जाणुनीयां पाहीं ॥ मनुष्य जन्म पुन्हां नाहीं ॥ नामा ह्मणे तुझे पायीं ॥ ठाव देई विठ्ठला ॥ ९ ॥

॥ २४७१ ॥ पाटोळा तिंमलारे मजवरी घाली कांबळें ॥ धृ० ॥ आषाढमासिचारे कैसा शीतळ वारा ॥ वर्षतो मेहुलारे कैशा शीतल धारा ॥ १ ॥ झिरमिर झिरमिरे कैसा वर्षतो मेहू ॥ जाळीचें घोंगडें बा मजवर घाली सेवू ॥ २ ॥ प्रेमाचें भरतेंगा कैसा महापूर आला ॥ नामया विष्णुदास केशवराजीं मिनला ॥ ३ ॥

॥ २४७२ ॥ मुक्ताफळी नथ नाकीं । चरणीं ल्याली वाळे वांकी ॥ पितांबरें अंग झांकी । कृष्णा मामाजी ॥ धृ० ॥ खांद्यावरी धाबळी । पायघोळ लांबवली ॥ पांघरली धाबळी । कृष्णा मामाजी ॥ १ ॥ गाई पाठी लागली । पळतां नाहीं भागली ॥ मायबहिण चांगली । कृष्णा मामाजी ॥ २ ॥ देहुडा पावली । उभी माझी माउली ॥ विश्रांतीची साउली ॥ कृष्णा मामाजी ॥ ३ ॥ उभा नीट विटेवरी । उभा भीमरथीचे तीरीं ॥ नामयाचा कैवारी । कृष्णा मामाजी ॥ ४ ॥

---




## दशावताराचे अभंग.

---:०:---

॥ २४७३ ॥ मीनरूप झाला प्रथम तो हरी ॥ ज्याचा चराचरीं वास होता ॥ १ ॥ मार्कंडेयालागीं दाखविली माया ॥ वटपत्रीं तया रूपासी हो ॥ २ ॥ बाळमुकुंदानें स्वरूप दावितां ॥ श्वासोच्छ्वास घेतां

चौदाकल्प ॥ ३ ॥ पाहोनीयां माया अंतरीं निमाला ॥ घाबरा तो झाला ऋषिराज ॥ ४ ॥ अश्वासून तया दाखविली माया ॥ धन्य देवराया नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ २४७४ ॥ उदकीं बुडतां क्षिति तारियेली ॥ भूतें सारियलीं दाढेवरी ॥ १ ॥ अद्यापि तूं होसी ऐसा हृषीकेशी ॥ धरुनी मारिसी बळिवंत ॥ २ ॥ नामा ह्मणे धन्य अघटित करणी ॥ दाढेसी धरुनी वराह तूं ॥ ३ ॥

॥ २४७५ ॥ प्र्ल्हादाकारणें स्तंभीं अवतार ॥ भक्त राजेश्वर ह्मणताती ॥ १ ॥ जळीं स्थळीं आहे सर्वा ठायीं हरी ॥ प्रत्यक्ष तूं न्याहारी स्तंभामाजीं ॥ २ ॥ ऐकतांचि वाणी क्रोधासी चढला ॥ खड्ग तो काढिला कोशांतून ॥ ३ ॥ तयेकाळीं हाक मारिली प्रचंड ॥ फोडिलें ब्रह्मांड नरसिंहे ॥ ४ ॥ धरूनियां दैत्य वेगीं मांडीवरी ॥ नखानें तो चिरी पोट त्याचें ॥ ५ ॥ जयजयकार झाला ब्रह्मादि पातला ॥ इंद्रादिक आला देवांसहित ॥ ६ ॥ करूनियां स्तुति देव शांतविला ॥ प्र्ल्हाद तो झाला पूर्ण भक्त ॥ ७ ॥ नामया हो झाली मायबाप भेटी ॥ लाभ उठाउठी आनंदाचा ॥ ८ ॥

॥ २४७६ ॥ बळीराजा दैत्य बहुत मातला ॥ संपत्ति हरिल्या देवांचिया ॥ १ ॥ तयाकाळीं जेजे देव आठविती ॥ प्रार्थना करिती देवदेवा ॥ २ ॥ तयाकाळीं तुवां अदिति उदरीं ॥ अवतारधारी बटु झाला ॥ ३ ॥ छळूनियां बळी पाताळीं घातला ॥ आपण राहिला तया द्वारीं ॥ ४ ॥ देव देवपदीं बैसउनी सारे ॥ राखीतसे द्वार नामा ह्मणे ॥ ५ ॥

॥ २४७७ ॥ मारावया राजे ब्राह्मणाचे घरीं ॥ रेणुकाजठरीं अवतार ॥ १ ॥ करूनियां पृथ्वी निःक्षत्रिय बहुवेळां ॥ दान ते सकळा विप्रां दिली ॥ २ ॥ खुंटविला चिरंजीव अद्यापि तो आहे ॥ आत्मरूपीं पाहे निजानंदीं ॥ ३ ॥ दाशरथी रामा झाला समागम ॥ तेणें एक बाण दिल्हा ह्मणे नामा ॥ ४ ॥

॥ २४७८ ॥ दशरथ राजा संतान तें नाहीं ॥ ह्मणोनियां पाही ऋषेश्वरीं ॥ १ ॥ करूनि विनंति पुत्रेष्टी हे केली ॥ पुरोडांश भक्षिली पत्नियांनीं ॥ २ ॥ तपाच्या सामर्थ्यें पुत्र चार झाले ॥ अविनाश आले अव-

तारासी ॥ ३ ॥ रघुपति रामें पूर्ण मुसावलें ॥ चैतन्य प्रगटलें कौसल्येसी ॥ ४ ॥ तेणें केली ख्याति राक्षस मारिले ॥ रामराज्य केलें त्रैलोक्यांत ॥ ५ ॥ नामा ह्मणे मज नाम गोड आहे ॥ त्यालागीं तूं पाहे विचारुनी ॥ ६ ॥

॥ २४७९ ॥ श्रीकृष्ण लीलामृत बाणतांचि गोडी ॥ कथेची परवडी आवडती ॥ १ ॥ तयाचा विस्तार तोचि बोलवीता ॥ आहे सर्व सत्ता त्याचे हातीं ॥ २ ॥ तेथें मी पामर काय बोलूं वाणी ॥ दिसे किविलवाणी संतांपुढें ॥ ३ ॥ ह्मणोनी विस्तार आटोपिला नाहीं ॥ वेदांसी तें नाहीं पुरतें ठावें ॥ ४ ॥ नामा ह्मणे नामें आठवा अवतार ॥ पूर्ण ब्रह्म साचार कृष्णरूप ॥ ५ ॥

॥ २४८० ॥ मध्यें झालें मौन देव निजध्यानीं । बौध्य ते ह्मणोनी नांवें रूप ॥ १ ॥ पाखांडें बहुत कलिमाजी झालीं । वर्णाश्रम सकळीं बुडवीले ॥ २ ॥ पापाचिया राशी जळतील नामीं । निश्चय हरिनामीं नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ २४८१ ॥ कलिचिये अंतीं होणार कलंकी । मारील म्लेंछ कीं घोड्यावरी ॥ १ ॥ करील धर्माची उभारील गुढी । कृतयुगा मौढी करी तोची ॥ २ ॥ तोंवरी साधन हरिनाम कीर्ति । संताची संगती नामा ह्मणे ॥ ३ ॥

---

## साधूंचीं स्तवनें.

—:o:—

### गोऱ्याकुंभाराचें स्तवन.

॥ २४८२ ॥ माती तुडवितां नाहीं देहस्थिती ॥ आठवीत चित्तीं पांडुरंग ॥ १ ॥ गोरोबाची कांता पाणियासी जातां ॥ पुत्राला पहातां खेळतसे ॥ २ ॥ दृष्टी असो द्यावी स्वामि बाळावरी ॥ नाहीं कोणी घरीं सांभाळाया ॥ ३ ॥ नामा ह्मणे नाहीं गोरा देहावर ॥ सर्वही निर्धार पांडुरंगीं ॥ ४ ॥

## सांवत्याचें स्तवन.

॥ २४८३ ॥ धन्य तें अरण्य रत्नाची खाण ॥ जन्मला निधान सांवता तो ॥ १ ॥ सांवता सागर प्रेमाचा आगर ॥ घेतला अवतार माळ्याघरीं ॥ २ ॥ धन्य त्याची माता धन्य त्याचा पिता ॥ सांठविला दाता त्रैलोक्याचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे त्याचा जन्म सुफळ झाला ॥ वंश उद्धरीला माळियांचा ॥ ४ ॥

॥ २४८४ ॥ स्वरूपाकारणें विश्वरूप घेसी ॥ निर्गुणादाविसी गुणरया ॥ १ ॥ तत्त्वीं तत्त्वरवी उगवे मंडळीं ॥ अवघें झोकोळी आपुल्यातें ॥ २ ॥ दृश्याचियेदीप्ति दृश्यासी न दिसे ॥ समरस असे तेज त्याचें ॥ ३ ॥ चित्स्वरूपीं नांदे तत्स्वरूप भासे ॥ आकारासरिसें तदाकार ॥ ४ ॥ करुणा वोतिलें सप्रेम सुतेज ॥ तेथें तूं विराज ज्ञानदेवा ॥ ५ ॥ ज्ञान हेंचि तोय विज्ञान हे गंगा ॥ प्रेमें प्रेम भागा स्नान करी ॥ ६ ॥ एकत्व आरामें शांति पूर्ण घरीं ॥ श्रीहरि कामारी होतो तुझा ॥ ७ ॥ स्वस्ती श्रीनिवृत्ति गुरुत्व उचित ॥ लक्ष्मी अवचित नामदेवा ॥ ८ ॥

## शंकराचें स्तवन.

॥ २४८५ ॥ सदां सोमवारीं विभूति लाउनी शिरीं ॥ तुमच्या मंदिरीं आलाप करी ॥ १ ॥ शंकर त्रिपुरारि हरि उच्चारी ॥ ह्मणती षडाक्षरी पावे मज ॥ २ ॥ हर हर ॐनमः शिवाय हर हर जय जय ॥ नाहीं भवभय तुझेंनि नामें ॥ ३ ॥ करिती शिवरात्री वाहाती बेलपत्री ॥ प्रगट होउनि गाती भक्तिभावें ॥ ४ ॥ बोलती सत्कीर्ति जिंतीलें पवित्रीं ॥ हर हर नाम मंत्रीं तुज पूजिती ॥ ५ ॥ रुद्राक्षाच्या माळा घालुनीया गळां ॥ तो तुह्मां जवळां सर्व मान्य ॥ ६ ॥ शिवशंभु प्रभु बहुता पुण्यें जोडला ॥ पावे जाश्वनीळा ह्मणे नामा ॥ ७ ॥

---

## योगसंबंधी अभंग.

—:o:—

॥ २४८६ ॥ मुख्य मातृकांची संख्या ॥ सोळा अक्षरें नेटक्या ॥ १ ॥ समचरणीं अभंग ॥ नव्हे ताळ छंदो भंग ॥ २ ॥ चौक पुलिता विसर्ग ॥

गण यति लघु दीर्घ ॥ ३ ॥ जाणे एखादा निराळा ॥ नामा ह्मणे तो विरळा ॥ ४ ॥

॥ २४८७ ॥ सोळा त्या समाधि औट पीठा माझारी ॥ तेथें नरहरि देव नांदे ॥ १ ॥ बारा गुंफे माजीं भ्रमर गुंफे मध्यें ॥ तेथें आत्मा शुद्ध ज्ञान नांदे ॥ २ ॥ गोल्हाटाचा भेद असेची आघवा ॥ शुद्ध ज्ञानदिवा अलक्षतो ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मां तेजाच्या उजेडा ॥ देव केला घोडा बैसावया ॥ ४ ॥

॥ २४८८ ॥ समाधिस्थ सदां राहे समाधान ॥ निःशब्द ह्मणणें याचि लागीं ॥ १ ॥ राम ते समान नव्हती समाधान ॥ समाधि बैसणें एकचित्तें ॥ २ ॥ उन्मनी उपासना प्रेमाची दाटणी ॥ आत्मरूप जनीं दिसतसे ॥ ३ ॥ नामा ह्मणे रूप डोळ्यांतील बाहुली ॥ तीचि जगीं जाहली जगदाकार ॥ ४ ॥

॥ २४८९ ॥ वामांगी बाहुली तूर्या दावी कळा ॥ ते लक्षी पाउलां रामरूप ॥ १ ॥ माया निजरूप दक्षिणांगी वसे ॥ तूर्येचा हा भास मावळला ॥ २ ॥ मीं माया ह्मणतां पाहे आपणातें ॥ आत्माराम तेथें ज्ञानजळीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे ज्ञान माया ते आपण ॥ दृष्टीचे देखणें आत्मरूप ॥ ४ ॥

॥ २४९० ॥ सत ज्ञान आनंद गगनाचें प्रावर्ण ॥ नाहीं रूप गुण गुणातीत ॥ १ ॥ नाद ना भेद ना छंदे निरंतर ॥ दोहीच्या विचारें ब्रह्म नांदे ॥ २ ॥ येकवटि ब्रह्म आत्मारामरूप ॥ तें पाहा स्वरूप लावण्याचें ॥ ३ ॥ नामा ह्मणे केलें चैतन्य जवळ ॥ मांडीयेला खेळ संतीं तेथें ॥ ४ ॥

॥ २४९१ ॥ चैतन्याचा खेळ येकवट ब्रह्म ॥ निर्गुणासी गुण रूप जाहलें ॥ १ ॥ चैतन्य त्या कळा रूपा आले सत ॥ निर्गुणाचा हेत रामकृष्ण ॥ २ ॥ खेळ मांडीयेला गोल्हाट शिखरीं ॥ गोलांगुळांगुळीं समाधिस्थ ॥ ३ ॥ समाधी साधन अखंड उन्मनी ॥ औटपीटध्वनी नाद होय ॥ ४ ॥ नामा ह्मणे तेथें चौक्या ज्या रंगल्या ॥ अरंग मिरवल्या संतसंगें ॥ ५ ॥

॥ २४९२ ॥ खेळ मांडियला गोल्हाट शिखरीं ॥ अर्ध चंद्रावरीं शेखी याचा ॥ १ ॥ चोवीस त्या गुंफा रुद्रलिंगीं नांदे ॥ अभेद तो वेद बोले तेथें ॥ २ ॥ तीही अक्षरांच्या वाटेच्या सेजारी ॥ सोळा चंद्र नारी भेदाभेद ॥ ३ ॥ सूर्य एकवीस शोभती चहुकडे ॥ खेळती उघडे संत तेथें ॥ ४ ॥

॥ २४९३ ॥ दृष्टीचें देखणें तेचि रूपमाया ॥ शब्द बोलावया ज्ञान झालें ॥ १ ॥ ज्ञानाची जी जागा हृदयीं पाहावी ॥ सत्रावीसी दावी खेळ तेथें ॥ २ ॥ सत्रावी जीवन माया तिचे पोटीं ॥ ज्ञान झाली दृष्टि देखावया ॥ ३ ॥ देखणें सिद्धांत बोलणें वेदांत ॥ शब्द तोचि हेत सत्रावीचा ॥ ४॥ नाद आणि भेद देखणें सिद्धांत ॥ बोलणें वेदांत हेंचि दोनी ॥ ५ ॥ हेत तो अहंकार दोहींतें नाचवी ॥ अविद्येसी दावी निजसुरा ॥ ६ ॥ नामा ह्मणे सिद्ध देखणें हा जन्म ॥ डोळ्या माजीं वर्म बोलिलें तें ॥ ७ ॥

॥ २४९४ ॥ अंतःकरणीं विष्णु तोचि आत्मा असे ॥ चंद्रमा भासे मन तेंची ॥ १ ॥ बुद्धि ब्रह्मदेव चित्त नारायण ॥ अहंकार जाण रुद्ररूप ॥ २ ॥ ज्ञान आत्मे पांच ज्ञानीं ओळखावे ॥ पांच ते पाहावे कर्मस्थानीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे कैसें दाखऊं उघडें ॥ वाटतसें कोडें मज आतां ॥ ४ ॥

---

## स्फुट अभंग.

—:०:—

॥ २४९५ ॥ अज्ञान बाळक तुझा प्ऱ्हाद धांवा करितां ॥ आणि त्रिभुवन देवता नाभी नाभीरे आतां ॥ माझा प्ऱ्हादु असे वो केउता ॥ तो कवणें पा गांजिला ॥ १ ॥ वदन पसरुनी विक्राळ ॥ झरझरीत झरे लाळ ॥ नेत्र जैसें वडवानळ ॥ शोषु पाहे जलनिधी ॥ २ ॥ संहार झालें नागकुळ ॥ भ्याले अष्ट लोकपाळ ॥ स्वर्गीं सुटली खळबळ ॥ अमरावती इंद्रासी ॥ ३ ॥ मग दैसाते पाचारितु ॥ लोह खणखणा वाजतु ॥ धाकें अंबर गर्जतु ॥ तेणें कांपे मेदिनी ॥ ४ ॥ वेटाळुनी चहूंहातीं ॥ विदारिला चपेट घातीं ॥ जैसा रुद्र प्रळयांतीं ॥ तैसा हरि दिसतसे ॥ ५ ॥ दैत्य न मरे कवणे परी ॥ मग तो धरिला जानूवरीं ॥ नखें उदर फाडुनी सत्वरीं ॥ अस्थि

चूर्ण केलिया ॥ ६ ॥ भोजें नाचत देवता ॥ मुक्ति झाली दैसनाथा ॥ नामया स्वामि वरदहस्ता ॥ अभय दाता भक्तांसी ॥ ७ ॥

---

## गुरूचें महात्म्य.

॥ २४९६ ॥ देव देव करीतां शिणलें माझें मन ॥ पाणी आणि पाषाण जेथें तेथें ॥ १ ॥ देव दगडाचा बोलेल हा कैंचा ॥ कोण्या काळीं वाचा होईल यासी ॥ २ ॥ देव दाखवी ऐसा कोण आहे गुरु ॥ हुरमुंजी आणि घेरु जेथें तेथें ॥ ३ ॥ नामा ह्मणे देव हृदयीं दाविला ॥ खेंचरानें केला उपकार ॥ ४ ॥

॥ २४९७ ॥ भक्तिऋण घेत माझें ॥ चरण गहाण आहेत तुझे ॥ १ ॥ प्रेम व्याज देगा हरी ॥ माझा हिशेब लौकर करी ॥ २ ॥ तुझे नामें आहे खेत ॥ चाल करूं पंचाईत ॥ ३ ॥ नामा ह्मणे केशव राजा ॥ यासी साक्षी सद्गुरुराजा ॥ ४ ॥

॥ २४९८ ॥ पहापहा ते अभक्त दैत्य ते माजले । धरणीवरीं झालें ओझें सांचें ॥ १ ॥ दिधलासे त्रास ऋषि मुनि रावां । न पूजिती देवां तये काळीं ॥ २ ॥ राहिले यज्ञ न करिती कीर्तन । पळाले ब्राह्मण दैत्या भ्यानें ॥ ३ ॥ वच्छरूपें पृथ्वी ब्रम्ह्यापासीं जाय । नेत्रीं वाहे तोय तिये- चिया ॥ ४ ॥ बुडविला धर्म अधर्म झाला फार। सोसवेना भार मज आतां ॥ ५ ॥ ब्रह्मा इंद्र देव बरोबर शिव ॥ चालिले हे सर्व क्षीरसागरां ॥ ६ ॥ नामा ह्मणे आतां करितिल स्तुति । सावधान चित्तीं अवधारा ॥ ७ ॥

॥ २४९९ ॥ पंढरी हें क्षेत्र पावन पवित्र । महिमा विचित्र त्रिभुवनीं ॥ १ ॥ पाहिलिया क्षणीं नासती पातकें । ऐसियासी तुके दुजें कोण ॥ २ ॥ तृण पक्षि सर्व झाले ऋषि देव । पहाती वैभव पंढरीचें ॥ ३ ॥ भूमि ते राहिली विष्णु चक्रावरी । वैकुंठिची परी सर्व येथें ॥ ४ ॥ टाळ नृत्य घोष पताकांचे भार । गर्जे भीमातीर सर्वकाळ ॥ ५ ॥ पुंडलिकासाठीं ठाके केशिराज । भेटीनें सायुज्य त्यास देती ॥ ६ ॥ स्नानें उद्धरती दर्शनें प्रशस्तीं । वाचे नाम कीर्ति विठोबाची ॥ ७ ॥ नामा ह्मणे लाभ थोर हा जोडतो । पंढरिसी येतो प्राणी त्यासी ॥ ८ ॥

॥ २५०० ॥ गुंडाळिल्या जटा तोचि माथा फेटा । गोजिरा गोमटा रामचंद्र ॥ १ ॥ वैकुंठींचा राजा ह्मणवितो योगी । दावावया जगीं योग करी ॥ २ ॥ आकर्ण लोचन हातीं चाप बाण । वल्कलें भूषणें नेसोनिया ॥ ३ ॥ पितृवचनालागीं मानोनि साचारी । झाला पादचारी वनीं हिंडे ॥ ४ ॥ देवांचिया काजीं ठेवोनिया निज । सर्वांपरी सज्ज झाला अंगें ॥ ५ ॥ नामा ह्मणे त्याचें न कळे कौतुक । आपूलिया सुख वाढावया ॥ ६ ॥

## ध्यान.

॥ २५०१ ॥ देह देव्हारापाट हृदय संपुष्ट ॥ मधीं कृष्णमूर्त बसविली ॥ १ ॥ प्रेमाचे पाण्यानें प्रक्षाळीन तुज ॥ आत्मस्वरूप निज पांडुरंगा ॥ २ ॥ भावें केलें गंध भक्तीची अक्षता ॥ वाहिली निढळा देवावरी ॥ ३ ॥ मन केला मोगरा चित्त केलें शेवंती ॥ भक्तीची तुळसी अर्पियेली ॥ ४ ॥ धूप दीप आर्ती ओवाळीन तुज ॥ एक केशवराज सकळ सिद्ध ॥ ५ ॥ त्रिवेणी पक्कान्न केलें ब्रह्मार्पण ॥ वांच्छित भोजन अर्पियेलें ॥ ६ ॥ नामा ह्मणे देवा सेवा केली एका ॥ पंचप्राण सखा विटेवरी ॥ ७ ॥

॥ २५०२ ॥ खांद्यावरी पांवा कस्तुरीचा टिळा ॥ चालत गोपाळ गाईमागें ॥ १ ॥ यमुने पावळी गोपां पाचारीत ॥ सिदोऱ्या शोभत पाठीवरी ॥ २ ॥ अंतीं पंक्ति करी सा गोपाळांच्या ॥ संगें गोविंद सांच्या अखंडित ॥ ३ ॥ नामा ह्मणे दोनें विटों देऊं नका ॥ वैकुंठनायका सांभाळावें ॥ ४ ॥

## एकादशी महात्म्य.

॥ २५०३ ॥ एकादशी दिनीं खाईल जो अन्न ॥ सूकर होऊनि येईल जन्मां ॥ १ ॥ एकादशी दिनीं करील जो भोग ॥ त्यासी माता संग घडतसे ॥ २ ॥ एकादशी दिनीं खेळेल जो सोगटी ॥ काळ हाणील खुंटी गुदस्थानीं ॥ ३ ॥ रजस्वी शोणीत सेविल्या समान ॥ तांबूल चर्वण करील जो ॥ ४ ॥ नामा ह्मणे नाहीं माझ्याकडे दोष ॥ पुराणीं हें व्यासवाक्य आहे ॥ ५ ॥

## कूट.

॥ २५०४ ॥ गोड गोड लिंबाचा वाटून पेला ॥ अठरा मुलें झालीं साला ॥ १ ॥ बाई माझ्या बापानें पाठ फोडिला ॥ माझा बाप तो करितो चाळा ॥ २ ॥ गरवार झाली तिसऱ्या वेळां ॥ बाळ मांडीवर खेळला ॥ ३ ॥ * * * * माझा बाप निर्गुणकारी ॥ सहा सहा झालीं साचे उदरीं ॥ ४ ॥ बाई माझा बाप तो अविनाश ॥ निर्गुण आला आकारास नामा ह्मणे विष्णुदास ॥ ५ ॥

॥ २५०५ ॥ याहो क्षेत्र केलें जुंपिलीं आउतें ॥ अठरा धान्यें तेथें पेरियेलीं ॥ १ ॥ मेघःशाम मेघ वर्षे सर्वां धारीं ॥ बीज विटेवरी सासिन्नलें ॥ २ ॥ जगाचें जीवन पंढरी पिकली ॥ चराया सोकलीं भुतें जाणा ॥ ३ ॥ घालुनिया माळा रक्षी कळिकाळां ॥ काय कलिमळा संसाराची ॥ ४ ॥ पापासों करणें भक्ति हे गोफण ॥ भूस सांडी कण वेंचिताती ॥ ५ ॥ वेदशास्त्र ऐसे बोल बोलविता ॥ गूढ वेगळिता लाभ होती ॥ ६ ॥ नामा ह्मणे स्वामि विठ्ठल सुकाळ ॥ अन्न ब्रह्म फळ त्रिभुवनीं ॥ ७ ॥

## ईश्वरप्राप्ति.

॥ २५०६ ॥ निद्रिस्ताचे सेजें सर्प कां उर्वशी ॥ पाहो विषयासी तैसे आह्मी ॥ १ ॥ ऐसी कृपा केली माझ्या केशीराजें ॥ प्रतितीचें भोजें एकसरां ॥ २ ॥ शेण आणि सोनें भासतें समान ॥ रत्न कां पाषाण येकरूप ॥ ३ ॥ पाया लागो स्वर्ग वरी पडो आग ॥ आत्मस्थिति भंग नोहे नोहे ॥ ४ ॥ नामा ह्मणे कोणी निंदा आणि वंदा ॥ झालों ब्रह्मानंदाकार आह्मी ॥ ५ ॥

॥ २५०७ ॥ हरिश्चंद्रराजा होता सत्वगुणी ॥ वाहातसे पाणी डोंबाघरीं ॥ १ ॥ सत्य पतिव्रता तारामति राणी ॥ राहिली भोगोनी कायाक्लेश ॥ २ ॥ भरत ऐकतां मातेचें वचन ॥ श्रीराम दर्शन कैसे घडे ॥ ३ ॥ माता पिता सर्व अन्हेरी जनक ॥ नामा ह्मणे भाक प्रारब्ध हे ॥ ४ ॥

॥ २५०८ ॥ विचारुनी पाहा पंढरिचें पाडे ॥ सुख होय थोडें क्षीरसिंधू ॥ १ ॥ सांडुनी वैकुंठ आले जगजेठी ॥ वस्ती वाळवंटीं केली

जाण ॥ २ ॥ भक्त सहाकारी ब्रीदें बडिवार ॥ सेवा सुखसार पांडुरंग ॥ ३ ॥ जीवींचे सोयरे न मिळे वैकुंठीं ॥ हरिदासा भेटी आडलिया ॥ ४ ॥ प्रीतीचें वोरस उभा मागें पुढें ॥ जीवासी आवडे भक्त राणा ॥ ५ ॥ लक्ष्मीचा विलासी न वाटे विश्रांती ॥ आवडे श्रीपति भक्तभावा ॥ ६ ॥ संगें सर्वकाळ धांवे पाटो वाटी ॥ घाली कृपादृष्टि तयावरी ॥ ७ ॥ अमृत सुरस नव्हेति पै गोडी ॥ ह्मणोनि आवडी कालयाची ॥ ८ ॥ हरुपें निर्भर सुरवरा खेळे ॥ वाळवंटीं लोळे संतसगें ॥ ९ ॥ अट्ठावीस युगें उभा विटेवरी ॥ भक्तप्रीय हरि स्वामि माझा ॥ १० ॥ नामा ह्मणे त्याचे सुखरूप पाय ॥ क्षणेक न होय जीवाहुनी ॥ ११ ॥

॥ २५०९ ॥ अनुसरे त्यासी फिरो नेदी मागें ॥ राहे अंगसंगें समागमें ॥ १ ॥ समागमें असे सर्व साक्षी देव ॥ जैसा ज्याचा भाव तैसा राहे ॥ २ ॥ सदां मुखीं नाम आळस न उच्चारीं ॥ प्रीति मानी हरि हास्यमुखें ॥ ३ ॥ फळपाकीं सर्व देतील प्राणीया ॥ नामा धरी पाया बळकट ॥ ४ ॥

## देवाचें स्तवन.

॥ २५१० ॥ दुःखाची निवृत्ति सुखाचें तें सुख ॥ पाहतां श्रीमुख गोविंदाचें ॥ १ ॥ रंगणीं रांगत गुलगुला बोलत ॥ असूर रूळत चरणातळीं ॥ २ ॥ नामा ह्मणे हातीं लोणियाचा उंडा ॥ गौळणी त्याच्या तोंडा भुललीया ॥ ३ ॥

॥ २५११ ॥ हावो हावो देव ह्मणताती श्रुती ॥ परिसा नेणती भूललिया ॥ १ ॥ तुझ्या कृपा नेणती कमळापती ॥ तुज बाळ ह्मणती गौळियाचें ॥ २ ॥ विष्णुदास नामयानें दाखविल्या खुणा ॥ पंढरीचा राणा श्रीविठ्ठल ॥ ३ ॥

॥ २५१२ ॥ श्रीधरा अनंता गोविंदा केशवा ॥ मुकुंदा माधवा नारायणा ॥ १ ॥ देवकी तनया गोपिकारमणा ॥ भक्त उद्धारणा केशीराजा ॥ २ ॥ मकरकुंडल श्रवणीं शोभती ॥ येकावळी दिप्ती सृष्टि लोपे ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझा नकळेची पार ॥ भजे निरंतर भक्तजन ॥ ४ ॥

॥ २५१३ ॥ वेदासी कानडा श्रुतीसी कानडा ॥ विठ्ठल उघडा पंढरीये ॥ १ ॥ नाम बरवें रूप बरवें ॥ दर्शन बरवें कानडीयाचें ॥ २ ॥ नामा ह्मणे तुझें अवघेंचि बरवें ॥ साहुनी बरवें प्रेम तुझें ॥ ३ ॥

॥ २५१४ ॥ केशीराजा आदि सकळा अनादी ॥ तूंचि कृपानिधि नारायणा ॥ १ ॥ अव्यक्ता अक्षरा सर्व अविनाशा ॥ अगा पंढरीशा पांडुरंगा ॥ २ ॥ तूंचि ब्रह्मचारी गोपिकांचे घरीं ॥ सर्वस्वें उद्धरी सर्व जीवां ॥ ३ ॥ लटिकें दाविसी गोकुळाभीतरीं ॥ नामा ह्मणे शिरीं भार वाही ॥ ४ ॥

## नाममहिमा.

॥ २५१५ ॥ ब्राह्मण हो तुह्मी सर्व नारीनर ॥ सर्वांसी आधार नाम सत्य ॥ १ ॥ नामाविण गति नसरे आणिक ॥ वैकुंठनायक बोले मुखें ॥ २ ॥ परि तेंचि नाम पहावें शोधुनी ॥ चौऱ्यासीची खाणी तेव्हां चुके ॥ ३ ॥ नामा ह्मणे आतां सद्गुरु वंदुनी ॥ नाम घ्या शोधुनी सत्य मुक्त ॥ ४ ॥

॥ २५१६ ॥ द्वारावती भुवना गेलों ॥ शंखचक्र घेउनी आलों ॥ १ ॥ वाटे प्रपंचें धरियलों ॥ राम नामें सोडविलों ॥ २ ॥ शंखचक्र भरुनी केणें ॥ द्वारावती केलें पेणें ॥ ३ ॥ नामा ह्मणे लाभ झाला ॥ फुकासाठीं हरि जोडला ॥ ४ ॥

॥ २५१७ ॥ नामीं नारायण ॥ होय भक्तांचे आधीन ॥ १ ॥ न मागतां भक्ती ॥ नामा पासी च्यारी मुक्ती ॥ २ ॥ भुलो नये जाण ॥ नाम वैकुंठीं निशाण ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे प्राणी ॥ सम होती नारायणीं ॥ ४ ॥

॥ २५१८ ॥ वदनीं तुझें नाम अमृत संजीवनी ॥ असतां चक्रपाणी भय कवण ॥ १ ॥ या जन्ममरणाची कायसी मग चिंता ॥ तुझीया शरणांगतां पंढरिनाथा ॥ २ ॥ हृदयीं तुझें रूप बिंबलें साचार ॥ तेथें कवण पार संसाराचा ॥ ३ ॥ नामा ह्मणे तुझें नाम वेळोवेळ ॥ ह्मणतां कळिकाळ पायां पडे ॥ ४ ॥

## करुणापर अभंग.

॥ २५१९ ॥ सगुण संपन्न पंढरीच्या राया ॥ आमुच्या स्वामिया केशीराजा ॥ १ ॥ राम कृष्ण हरि श्रीधरा मुकुंदा ॥ सज्जनी स्वानंदा

सर्वातीता ॥ २ ॥ गोविंद गोपाळा गोपवेषधारी ॥ गोवर्धन धरी नखावरी ॥ ३ ॥ दुष्ट दुर्जनासी दुःख फार चित्तां ॥ पावन पतितां नामा ह्मणे ॥ ४ ॥

॥ २५२० ॥ नावडे प्रपंच तापत्रय माया ॥ येई धांवोनिया केशीराजा ॥ १ ॥ भवभयें फार भ्यालों जन्मांतरा ॥ चौऱ्याशीचा फेरा चुकवितो ॥ २ ॥ सत्कथा श्रवण नाम संकीर्तन ॥ नघडे भजन मज देवा ॥ ३ ॥ नवविधा भक्ति कोणें केली कैसी ॥ नामा ह्मणे ऐसी दावी सदां ॥ ४ ॥

॥ २५२१ ॥ तुझे चरणीं चित्त रंगलें अनुरागें ॥ बहुजन्मीं वियोगें शिणलें होतें ॥ १ ॥ आहाळलें पोळलें तापत्रयीं पडिलें ॥ तृष्णें विभांडिलें नानापरी ॥ २ ॥ काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर ॥ इहीं निरंतर जाजावलों ॥ ३ ॥ बुडतिया अवचटें लाभे तीयें सांगडी ॥ ते जीवें न सोडी तैसें झालें ॥ ४ ॥ नामा ह्मणे तूं केशव कृपेचा सागर ॥ झणीं माझा अव्हेर करसी देवा ॥ ५ ॥

॥ २५२२ ॥ तूं एक सज्ञान मी एक अज्ञान ॥ तुझें नाम जाण विस्तारीलें ॥ १ ॥ आतां करिसी काय आतां करिसी काय ॥ सांपडली सोय रामचंद्रा ॥ २ ॥ चरणीं जे आहे ती माझी माय ॥ ईश्वरू तो वाहे शिरकमळीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा न सोडीं मी भावा ॥ जन्मोजन्मीं सेवा द्यावी तुझी ॥ ४ ॥

॥ २५२३ ॥ ऐशा विचारें समाधान करी ॥ गोविंद श्रीहरि नारायण ॥ १ ॥ सर्वकाळ ऐसी वदो ही वैखरी ॥ आणीक अंतरीं नाठवावें ॥ २ ॥ आणिकासी गुज न बोले वदन ॥ वदो नारायण सर्वकाळ ॥ ३ ॥ रामकृष्ण माझ्या देवाचें स्तवन ॥ शास्त्रेंही पुराणें भाट ज्याची ॥ ४ ॥ नामा ह्मणे आतां ऐसें करी देवा ॥ हृदयीं केशवा राहे माझ्या ॥ ५ ॥

॥ २५२४ ॥ साधुनी समाधि तुज म्यां चिंतावें ॥ मग माझ्या यावें हृदयांत ॥ १ ॥ तंव पांडुरंगा संता माजीं उणें ॥ तुजलागीं निर्वाणे करी देवा ॥ २ ॥ तुजसी संबंध लौकिका वेगळा ॥ पाळसी गोपाळा लळे माझे ॥ ३ ॥ उपजता बाळ हितार्था लागोनी ॥ प्रसन्न जननी होई आधी ॥ ४ ॥ भीडेस्तव पान्हा फुटोनिया थानीं ॥ पेहे त्या पाजुनी दिल्हें

काय ॥ ५ ॥ उदित सूर्यास लागे विनवावा ॥ यावें तुवां गांवा प्रकाशित ॥ ६ ॥ मग ते तयानें निवारावें तमां ॥ हें तो मेघश्यामा नाहीं श्रुत ॥ ७ ॥ पृथ्वी भूतीं काय करावा आदरु ॥ मग त्याचा भारु चालवावा ॥ ८ ॥ जीवना जीवन प्रार्थुनी आणावें ॥ तेणें काय निववावें संत त्यासीं ॥ ९ ॥ सर्वज्ञ उदार होसी चक्रवर्ती ॥ कार्या कारणांतीं नांद तुझी ॥ १० ॥ नामा ह्मणे माझें चित्त कृष्णाकार ॥ करूनी निर्धार प्रेम देई ॥ ११ ॥

॥ २५२५ ॥ तुज दिले आतां यत्न करी याचा ॥ जीवभाव वाचा काया मनें ॥ १ ॥ भागलों दातारा शीण झाला भारी ॥ आतां मज तारी अनाथासी ॥ २ ॥ नेणता सोसिली तयाची आटणी ॥ नव्हतांहीं कोणी कांहीं माझीं ॥ ३ ॥ वर्म नेणें दिशा हिंडति मोकाट ॥ इंद्रिय सुसाट सर्व पृथ्वी ॥ ४ ॥ येरझार फेरा शिणलों सायासीं ॥ आतां हृषिकेशी अंगीकारी ॥ ५ ॥ नामा ह्मणे मन ईंद्रियाचे सोई ॥ धांव यासी कायी करूं आता ॥ ६ ॥

॥ २५२६ ॥ मी तो तुझा दास न करी उदास ॥ माया मोहोपाश तोडी देवा ॥ १ ॥ प्राण जावो परि नको करूं त्याग ॥ करी अंग संग अंगिकार ॥ २ ॥ अंगीकारी आतां अजामेळ अंती ॥ समान श्रीपति समकरी ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे वाणावें म्यां किती ॥ नामें केली ख्याति चराचरी ॥ ४ ॥

॥ २५२७ ॥ येतां जातां थोर कष्टलों गर्भवासी ॥ पडिलोंगा उपवासी प्रेमेंविण ॥ १ ॥ बहुतांचा सेवक झालों काकुळती ॥ नपवती विश्रांती तयाचेंनी ॥ २ ॥ ऐसें माझें मन शिणलें नानापरी ॥ घालीन आभारी संताचिया ॥ ३ ॥ वियोगें संताच्या व्याकुळ चिंतातूर ॥ हिंडे दारोदार दीनरूपें ॥ ४ ॥ परि कोणी संताच्या न घालिती चरणीं ॥ तळमळी अनुदिनीं अश्रांत सदां ॥ ५ ॥ माझें माझें ह्मणोनी जया घाली मिठी ॥ दिसे तेंचि घडी नाहीं होय ॥ ६ ॥ तया शोकानळे संतप्त आंदोळे ॥ गेलें तें न मिळे कदांकाळीं ॥ ७ ॥ न देखत ठायीं देखावया धांवें ॥ भ्रांती भूलले भावें नानामार्गीं ॥ ८ ॥ तुझा स्वरूपानंदु नाहीं वोळखिला ॥ झाली तें विठ्ठला हानि थोर ॥ ९ ॥ लोहाचा कवळु लागला परिसातें ॥ पढिये सर्वांते होय जेवी ॥ १० ॥ नामा ह्मणे तैसी भेटी संत चरणीं ॥ करूनी त्रिभुवनीं होईन सरतां ॥ ११ ॥

---

## देवास नैवेद्य जेविवला.

—:o:—

॥ २५२८ ॥ आह्मी हाटा जाऊं लवकरी येऊं ॥ नैवेद्य पाठवूं नाम्या हातीं ॥ १ ॥ दुसऱ्या दिवसीं नैवेद्य धाडिला ॥ दामशेटी गेला त्याच्या मागें ॥ २ ॥ जाऊनिया नामा उभा राहे सन्मुख ॥ ह्मणे विठोबास जेवी बापा ॥ ३ ॥ देव ह्मणे नाम्या बसावें द्वारांत ॥ लवकरी जेवितों पाहे आतां ॥ ४ ॥ जेऊनिया देवें हातीं दिधली वाटी ॥ तेव्हां दामशेटी काय बोले ॥ ५ ॥ बारावर्षें तुज उपवासी मारिलें ॥ आजि जेवविलें नामदेवें ॥६॥ देव ह्मणे आतां ऐका दामशेटी ॥ हे तो गुह्य गोष्टी बोलूं नका ॥ ७ ॥ आह्मी न बोलतां आह्मी न सांगतां ॥ कळे अवचिता आपणासी ॥ ८ ॥ करसी चोरी तूं गुप्त गोकुळांत ॥ पृथ्वींत मात कोणी नेली ॥ ९ ॥ गोकुळींच्या गोष्टी येथें बोलूं नये ॥ मौन पंढरीये धरिलें आहे ॥ १० ॥ मौन धरियेलें सांगसी आह्मासी ॥ तरी कां जेवशी पांडुरंगा ॥ ११ ॥ काय तुझें घर पडियलें ओस ॥ चोरट्यासंगें कैसा जेवलासी ॥ १२ ॥ चोखियाचें अन्न मिष्टान्न भोजन ॥ मिळायाकारण येथें नाहीं ॥ १३ ॥ राम अवतारीं वान्नरगणें ॥ लंकेसी झोंबणें सीतेसाठीं ॥ १४ ॥ पाला खाऊनिया वाहिले पर्वत ॥ बांधियेला सेतु सिंधुवरी ॥ १५ ॥ कृष्ण अवतारीं गोपाळ साचार ॥ वळूं गायी फार देवा सवें ॥ १६ ॥ यमुनेचे तिरीं खेळूं चेंडुफळी ॥ आपण दिधली नाहीं डायी ॥ १७ ॥ पसरितों पदर धरितों हनुवटी ॥ अन्याय हा पोटीं घाली नाम्या ॥ १८ ॥ तेव्हां दामशेटी धरूनी हातासी ॥ ह्मणे नामयासी चाल घरा ॥ १९ ॥ धन्य माझें भाग्य धन्य माझा वंश ॥ परब्रह्म वेष प्रगटलें ॥ २० ॥ बौध अवतारीं आह्मी झालों संत ॥ वर्णावया मात नामा ह्मणे ॥ २१ ॥

---

## तुळसी महात्म्य.

—:o:—

॥ २५२९ ॥ तुळसी विण ज्याचें घर ॥ तें तंव जाणावें अघोर ॥ तेथें वसती यम किंकर ॥ आज्ञा आहे ह्मणोनी ॥ १ ॥ तुळसीवृंदावन ज्याचे घरीं ॥ त्यासी प्रसन्न श्रीहरी ॥ तें वर्जिलें यम किंकरी ॥

आज्ञा आहे ह्मणोनी ॥ २ ॥ तुळसीवृंदावना ॥ जे करिती प्रदक्षणा ॥ अंतकाळीं होतां स्मरण ॥ जन्ममरण नाहीं नामा ह्मणे ॥ ३ ॥

॥ २५३० ॥ तुळसीवृंदावन दर्शन ॥ त्यासी वैकुंठीं गमन ॥ लटिकें ह्मणे कोण ॥ त्यासी आण केशवाची ॥ १ ॥ तुळसी माळा घाली गळां ॥ त्या भेटे घनसांवळा ॥ चतुर्भुज सहित कमळा ॥ केशीराज प्रत्यक्ष ॥ २ ॥ तुळसी रोपा घाली उदक ॥ त्याचे हरती महादोष ॥ ब्रह्मादिकां नकळे निःशेष ॥ जन्ममरण त्या नाहीं ॥ ३ ॥ तुळसीची देवा बहु प्रीति ॥ आणिक पुष्पें न लागती ॥ नामा ह्मणे जी श्रीपति ॥ हेचि भक्ति द्यावी मज ॥ ४ ॥

॥ २५३१ ॥ तुळसी पुष्पांहुनि आगळी ॥ वृंदावनीं ते मिरवली ॥ देवें मस्तकीं वंदिली ॥ वंद्य झाली तिहीं लोकां ॥ १ ॥ तुळसी वंदावी माउली ॥ अरे हे संतांची साउली ॥ तुळसीपासीं वनमाळी ॥ सदां रहात असे ॥ २ ॥ तुळसी दळ भूमीवरी पडिलें ॥ तें जरी मस्तकीं वंदिलें ॥ कोटी तीर्थस्नान केलें ॥ एवढें फळ नामा ह्मणे ॥ ३ ॥

---

## स्फुट अभंग.

---:०:---

॥ २५३२ ॥ साधावया पूर्ण सुख ॥ तें हें विटेवरी देख ॥ १ ॥ नको जाऊं परदेशीं ॥ वास करी पंढरीसी ॥ २ ॥ भाव धरूनि बळकट ॥ मुखीं नाम एकनिष्ठ ॥ ३ ॥ नामा ह्मणे गोणाबाई ॥ सर्व सुख त्याचे पायीं ॥ ४ ॥

॥ २५३३ ॥ मिथ्या मायाजाळ मृगजळ बाधा ॥ लागलासे धंदा संसारीया ॥ १ ॥ आलेरे आलेरे हाकित टाकित ॥ मुद्दा गिवसीत काळचक्रीं ॥ २ ॥ बंधनापासुनी बांधलेसे पायीं ॥ बुडतों मी डोहीं निर्जळा ये ॥ ३ ॥ कोण भरंवसा धरिलासे जिवीं ॥ वळीया सोडवी कदां काळीं ॥ ४ ॥ पुत्रपत्नी बंधु ह्मणसील झणीं ॥ धांवोनि निर्वाणीं पाव आतां ॥ ५ ॥ नामा ह्मणे वेगीं सावधान व्हावें ॥ शरणही जावें पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ २५३४ ॥ मांजरें केली एकादशी ॥ इळवरी होतें उपवासी ॥ यत्न करितां पारण्यासी ॥ धांडनी गिवसी उंदिरु ॥ १ ॥ लांडगा बैसला

ध्यानस्त ॥ तोंवरी असे निवांत ॥ जंव पेट सुटे जीवांत ॥ मग घात करी वत्साचा ॥ २ ॥ श्वान गेले मलकार्जुना ॥ देह कवतीं घातलें जाणा ॥ आलें मनुष्यदेह पणा ॥ परि खोडी न संडी आपुली ॥ ३ ॥ श्वानें देखिला स्वयंपाक ॥ जोंवरी जागे होते लोक ॥ मग निजलिया निःशंक ॥ चारी मडकीं फोडिलीं ॥ ४ ॥ वेश्या झाली पतिव्रता ॥ तिचा भाव असे दुश्चिता ॥ तिसी नाहीं आणिक चिंता ॥ परद्वारा वांचुनी ॥ ५ ॥ दासानें केली समाराधना ॥ बहुत लोक जेविले जाणा ॥ परि नसंडी वोखटी वासना ॥ खटनट चाळितसे ॥ ६ ॥ ऐशा प्रकारच्या भक्ती ॥ असती त्या नेणो किती ॥ एक ओळंगा लक्ष्मीपती ॥ ह्मणे विष्णुदास नामा ॥ ७ ॥

॥ २५३५ ॥ भूमीचें मार्दव ॥ सांगे कोंभाची लवलव ॥ तैसे आचार गौरव ॥ सुकुलीन जनाचें ॥ १ ॥ झाड जाणावें फुलें ॥ मानस जाणावें बोलें ॥ भोगें जाणावें केलें ॥ जन्मांतरीचें ॥ २ ॥ लोभ जाणावा उभय दृष्टी ॥ क्रोध जाणावा भोंवया गांठी ॥ लटिका जाणावा बहु गोष्टी ॥ नष्ट प्रकृति ओळखावा ॥ ३ ॥ द्वाही घातलीया जाणावा खरा ॥ ढोकळ जाणावा कळी अवसरा ॥ परद्वारिणी जाणावी उण्या उत्तरा ॥ कुश्चळी घरोघरीं हिंडतसे ॥ ४ ॥ मृदंग जाणावा गंभीर नादें ॥ गाणें जाणावें सुस्वर शब्दें ॥ ओंकार जाणावा अक्षर भेदें ॥ शाहाणा शब्दें ओळखावा ॥ ५ ॥ विष्णुदास नामा करी विनंती ॥ या उत्तराची न मानावी खंती ॥ केशवाचा प्रसाद आहे माझे चित्तीं ॥ देवा काय करिसी ते न कळे ॥ ६ ॥

॥ २५३६ ॥ विठ्ठलाचे पाय धरूनियां राहे ॥ मग संसार तो काय करील तुझें ॥ १ ॥ संसाराचें भय नाहीं हरिचे दासा ॥ विठू आह्मा सरिसा निरंतर ॥ २ ॥ निरंतर वसे हरि भक्तापासी ॥ विसंबेना त्यासी कदांकाळीं ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसा विठ्ठल सोडोनी ॥ व्यर्थ काय जनीं शिणताती ॥ ४ ॥

॥ २५३७ ॥ वीतभर पोट लागलेंसे पाठी ॥ साधुसंगें गोष्टी सांगू न देई ॥ १ ॥ पोट माझी माता पोट माझा पिता ॥ पोटानें ही चिंता लाविलीसे ॥ २ ॥ पोट माझा बंधु पोट माझी बहीण ॥ पोटानें हें दैन्य मांडिलेंसे ॥ ३ ॥ विष्णुदास नामा पोटाकडे पाहे ॥ अझून किती दाय हिंडविसी ॥ ४ ॥

॥ २५३८ ॥ अभक्ताचे स्थळीं भ्रांताची संगती ॥ परदारा चित्तीं परनिंदा ॥ १ ॥ नेणे भूतदया शांतीचें लक्षण ॥ कार्या कारण बोल तसे ॥ २ ॥ हरिचिया दासा करिती मत्सर ॥ करी निरंतर द्वेषबुद्धि ॥ ३ ॥ नामा ह्मणे व्यर्थ पेटला पर्वत ॥ नेणे अपघात स्वयें पावे ॥ ४ ॥

॥ २५३९ ॥ हरिसी शरण निघा वहिलें ॥ राहे कळिकाळ उगलें ॥ १ ॥ खंडलें एका बोलें ॥ विठ्ठल समर्थें अंगिकारिलें ॥ २ ॥ नामयानें संसारा जिंकिलें ॥ केशव चरणीं मन ठेविलें ॥ ३ ॥

॥ २५४० ॥ सात्वीक हें वैराग्य अर्थाचें हें मूळ ॥ आशा हें केवळ अनर्थ जाण ॥ १ ॥ अंतरापासोनी नसतां विवेक ॥ निभ्रांताचे टक आशेवरी ॥ २ ॥ राजस तामस करूनियां गोळा ॥ होतसे अंधळा दाटोनियां ॥ ३ ॥ नामा ह्मणे ऐसे उदंड उपाय ॥ विठोबाचे पाय अंतरती ॥ ४ ॥

॥ २५४१ ॥ कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव ॥ कोणतें वैभव वाणी आतां ॥ १ ॥ अंत्यज आणि जातिवंता ॥ मुखीं नाम घेतां उडी घाली ॥ २ ॥ बैसोनी आसनीं आळवितां नाम ॥ उभा सर्वोत्तम तयापुढें ॥ ३ ॥ प्रेमाचीया भरें उभ्यानें गर्जता ॥ नाचे हा अनंत तया सवें ॥ ४ ॥ नामा ह्मणे तया कीर्तनाची गोडी ॥ घालीतसे उडी नेटेपाटे ॥ ५ ॥

॥ २५४२ ॥ सरस्वती माते द्यावी मज स्फुर्ती ॥ येतों काकुळती तुजलागीं ॥ १ ॥ लाडिकें लडिवाळ मागतसें तुज ॥ वंदीतसे रज चरणीचे ॥ २ ॥ त्वरें येउनीया मस्तकीं ठेवी हात ॥ जाईल हे भ्रांत तेव्हां माझी ॥ ३ ॥ आपुल्या बाळासी धरी आतां हातीं ॥ न करी फजिती जनामध्यें ॥ ४ ॥ विश्वात्मा जो हरि त्याची वर्णीतसे कीर्ती ॥ आवडीचा वोती रस आतां ॥ ५ ॥ ऐकोनी स्तवन झालीसे प्रसन्न ॥ नाम्या तुझा अभिमान मजलागी ॥ ६ ॥

॥ २५४३ ॥ देवाधिदेवा सर्वत्रांच्या जीवा ॥ ऐके वासुदेवा दयानिधी ॥ १ ॥ ब्रह्मा आणि इंद्र वंद्य सदाशिवा ॥ ऐके वासुदेवा दीनबंधू ॥ २ ॥ चवदा लोकपाळ करिती तुझी सेवा ॥ ऐके वासुदेवा कृपासिंधू ॥ ३ ॥ योगीयाचे ध्यानीं नातुडसी देवा ॥ ऐके वासुदेवा जगद्गुरू ॥ ४ ॥ निर्गुण निराकार नाहीं तुज माया ॥ ऐके कृष्णराया कानडीया ॥ ५ ॥ वेडा मी अविचारी करी मजवर दया ॥ ऐके कृष्णराया शहाणीया ॥ ६ ॥

करुणेचा पर्जन्य शिंपी मजवरता या ॥ ऐके कृष्णराया गोजीरीया ॥ ७ ॥ नामा ह्मणे जरी दाविसील पाया ॥ तरी वदावया स्फुर्ती चाले ॥ ८ ॥

॥ २५४४ ॥ युगा ऐसें पळ तुजवीण जाय ॥ पाहातोसी काय अंत माझा ॥ १ ॥ कोमळ हृदय तुझें पंढरीच्या राया ॥ कठिण सखया कैसें झालें ॥ २ ॥ विचारिलें चित्तीं दुर्लभ मी हरिहरा ॥ जाऊं कसा घरा रंकाचीया ॥ ३ ॥ अंगीकारावरी अव्हेराची मात ॥ नव्हें हें उचित देवराया ॥ ४ ॥ मागें जे जे आळी केली वासुदेवा ॥ उदारा केशवा पुरविली ॥ ५ ॥ नुपेक्षिसी आतां भरंवसा चित्तास ॥ दिसोनी निरास आली आतां ॥ ६ ॥ वांचोनिया दुःख भोगावेंरे आतां ॥ प्राणासी मुकतां हेंचि भलें ॥ ७ ॥ वर्णिता वर्णिता नामा झाला समाधिस्थ ॥ जहालें विदित पांडुरंगा ॥ ८ ॥

॥ २५४५ ॥ तुज न पोसवे दातारा ॥ तरी ऐशा घाली चिरा ॥ एका पोटा दुर्भर ॥ अव्हेरूं नको दातारा ॥ १ ॥ तुज म्यां जिवीं अनुसरावें ॥ तुह्मींही तसेंच अपंगावें ॥ परी म्यां आणिकांचें न ह्मणवावें ॥ जन्मोजन्मीं दातारा ॥ २ ॥ विष्णुदास नामा ह्मणे ॥ मज उपेक्षिसी झणें ॥ जन्मोजन्मीचें पोसणें ॥ केशवा उणे येऊं न देई ॥ ३ ॥

॥ २५४६ ॥ विश्रांतीचें स्थळ आळंदी हें गांव ॥ सिद्धेश्वर नांव दैवताचें ॥ १ ॥ चौऱ्यासी सिद्धींचा सिद्ध बेटी मेळा ॥ तो सुखसोहळा काय वाणूं ॥ २ ॥ विमानाची दाटी पुष्पांचा वर्षाव ॥ पाहताती देव स्वर्गाहुनी ॥ ३ ॥ नामा ह्मणे देवा चला तया ठाया ॥ विश्रांति घ्यावया कल्पवरी ॥ ४ ॥

॥ २५४७ ॥ पैल आला रामराणा ॥ लंका दिधली बिभीषणा ॥ १ ॥ नळनीळ जांबुवंत ॥ मध्यें चाले रघुनाथ ॥ धृ० ॥ मागें वानरांचे थाट ॥ पुढें गर्जताती भाट ॥ २ ॥ केला अयोध्या प्रवेश ॥ ह्मणे नामा विष्णुदास ॥ ३ ॥

---

## देवानें केलेली नामदेवस्तुति.

—:o:—

॥ २५४८ ॥ तुह्मी सदाचार महंत ब्रह्मवादी ॥ तुमचीं वागनदी ब्रह्मरूप ॥ १ ॥ सत्यवचन जळपत्र हें निर्मळ ॥ कृतार्थ केवळ झालोंसें मीं ॥ २ ॥ हा तुमचा विश्वास दृढ आहे मज ॥ तुह्मी माझे पूज्य परम-

देव ॥ ३ ॥ स्नानाचा विचार आहे पंचविध ॥ सांगेन हद्गद भाव याचा ॥ ४ ॥ अर्थीं देउनी दृष्टि विवेक घ्यावा पोटीं ॥ प्रतिति येईल गोष्टी अनुभवाच्या ॥ ५ ॥ उत्तमाहुनी उत्तम सत्यवाक्स्नान ॥ या परतें पावन आणिक नाहीं ॥ ६ ॥ कायावाचामनें हें दृढ धरीजे ॥ हेळाच तरीजे भवसागरू ॥ ७ ॥ बाहीर भीतरि शुद्ध सर्व काळ ॥ हें दुजे निर्मळ शुद्ध स्नान ॥ ८ ॥ हें ज्या सदैवा घडे भाग्य योगें ॥ मग त्या नलगे साधन कांहीं ॥ ९ ॥ सकळ इंद्रियांचा करुनी निग्रह ॥ दवडावा विग्रह वासनेचा ॥ १० ॥ हें तीसरे निर्मळ घडे ज्यासीं स्नान ॥ नलगे अनुष्ठान करणें त्यासी ॥ ११ ॥ सर्वांभूतीं करुणा हेंचि पै चवथें स्नान ॥ साधितो सज्जन विरळा कोणी ॥ १२ ॥ त्याचेनि दर्शनें जळतीं पापराशी ॥ तो सर्व तीर्थासीं तीर्थरूप ॥ १३ ॥ पांचवें तें स्नान काया प्रक्षाळावी जळीं ॥ करणें ते आंघोळी लौकिकांची ॥ १४ ॥ काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर ॥ हे दोष दुर्धर देहामाजी ॥ १५ ॥ विवेक वैराग्य धरावा मानसीं ॥ राहावें सांगातिसी संतांचिया ॥ १६ ॥ अनंत जन्मीचें हेंचि प्रचित ॥ ज्याच्या वाचे नित्य रामकृष्ण ॥ १७ ॥ शांति क्षमा दया निजबोध निवृत्ती ॥ अखंड खेळती जयापाशी ॥ १८ ॥ तो एक संसारीं धन्य देव नामा ॥ आवडतसे आह्मां जीवाहुनी ॥ १९ ॥

नामदेवाचे अभंग समाप्त.

---

## राजाईचे अभंग.

---

॥ २५४९ ॥ अंगोळीये विठा कडीयेसी नारा ॥ राजाई पंढरपुरा चालीयेली ॥ १ ॥ भीवरा संपूर्ण जातसे भरली ॥ राजाई बोलली कैसें झालें ॥ २ ॥ एकली मी बाळें काय करूं आतां ॥ आहा पंढरिनाथा काय केलें ॥ ३ ॥ एक बांधिलें पाठीसी दुजें बांधिलें पोटासी ॥ वेणुनादापासी वाहावत गेली ॥ ४ ॥ हांबरडा हाणोनी बोभाय नामया ॥ आवर्तीं पडोनियां तळास गेली ॥ ५ ॥ योगनिद्रा सारोनी देव जागा झाला ॥ त्वरित पावला काढिलीं तिघें ॥ ६ ॥ नारा विठा दोघे कडीयेसी घेतलें ॥ राजाईस धरिलें दक्षिण करीं ॥ ७ ॥ आणिलीं माहाद्वारा पुढें दे लेंकुरां ॥ विठोबा सामोरा नामा आला ॥ ८ ॥ बावा बावा ह्मणोनि नारा धाविन्नला ॥ नामत्या बोलिला परते होई ॥ ९ ॥ देखोनी राजाईसी गहिंवरु पै आला ॥ अरे बा विठ्ठला काय

केलें ॥ १० ॥ बाळेसहित विख घेईन मी आतां ॥ पाहे पंढरिनाथा बुडवीन घर ॥ ११ ॥ मेला सर्प होता तो ओंटीये घेतला ॥ खांडोनी घातला डेऱ्यामाजी ॥ १२ ॥ खाली ज्वाळ घाली उकळी फुटली ॥ पोटासी धरिलीं दोघें बाळें ॥ १३ ॥ देह विठोबासी समर्पण करूं ॥ ऐसा पै निर्धारू धरियेला ॥ ॥ १४ ॥ रुक्मिणी ह्मणे देवा अनर्थ मांडिला ॥ नामा बाहेर गेला निश्चयेसी ॥ १५ ॥ डेरा उघडोनी राजाई जंव पाहे ॥ तोंडभरी भरलाहे अवघें सोनें ॥ १६ ॥ राजाईनें धरिलें नामयाचे चरण ॥ कृपादृष्टि पाहणें आह्मांकडे ॥ १७ ॥ विठ्ठल विठ्ठल ऐसें बोलियला ॥ निवांत राहिला घटका च्यारी ॥ १८ ॥ कांपत कांपत माहाद्वारा आला ॥ तुझी माव विठ्ठला नकळे कांहीं ॥ १९ ॥ अष्टदिशा देवा वरुता आणि खालुता ॥ तुजवीण सर्वथा ठाव नाहीं ॥ २० ॥ तंव नामदेव निजला देखिला ॥ अंतरीं उठिल्या विठ्ठल ध्वनी ॥ २१ ॥ राजाई ह्मणे प्रयत्न न चले तेथें आतां ॥ प्रार्थू पंढरिनाथा बहुतांपरी ॥ २२ ॥ राजाईनें धरिलें विठोबाचे पाय ॥ कृपादृष्टि पाहे आह्मांकडे ॥ २३ ॥

॥ २५५० ॥ घरधनी यांणीं केला गुरू ॥ बाई मी आतां काय करूं ॥ असोनी नाहींसा संसारू ॥ चमत्कार कृपेचा ॥ १ ॥ धांवेपावेगे मेसाई ॥ येथें कोणाचें न चले कांहीं ॥ सत्पण तुझे ठायीं ॥ तरी हें नाहींसे करीगे ॥ धृ० ॥ मंत्र घेतला जैसा ॥ घरीं संतांचा वोळसा ॥ वोस पडो हरिदासा ॥ गेले नमत मागुतें ॥ २ ॥ काय सांगो याची रीती ॥ सोसे सोसे पाये चर्णप्रती ॥ अवघे भांबडभूत होती ॥ नाचताती आनंदें ॥ ३ ॥ लौकिकांत गेलीं वायां ॥ एकाच्या एक पडती पाया ॥ ह्मणती येगा पंढरिराया ॥ ब्रह्मानंदें डुल्लती ॥ ४ ॥ भोळी सासू गोणाबाई ॥ पांढरा स्फटिक व्याली पाही ॥ त्याणें जोडिला शेषशाई ॥ काय राजाई करूं ह्मणे ॥ ५ ॥

॥ २५५१ ॥ सावध सावध राजाई वो सुखें ॥ नामयानें दुःख निरसीलें ॥ १ ॥ संसारातें येऊन भाग्याचा ॥ छंद लागला विठ्ठलाचा ॥ धृ० ॥ याचें नाम न दिसे तिही त्रिभुवनीं ॥ नाइको दुजे कर्णी नाम्याऐसी ॥ २ ॥ वैष्णवांचे गजर टाळघोळ दिंडी ॥ उभयतां ब्रह्मांडीं घोष गेला ॥ ३ ॥ तयाच्या दर्शनें कलीमाजी तारिली ॥ भाग्यें विनटली विठ्ठलेसी ॥ ४ ॥ राजाई ह्मणे माते रखुमाई बुद्धिमंते ॥ आमुच्या अदृष्टातें लिहिलें कैसें ॥ ५ ॥

॥ २५५२ ॥ परियेसी रुक्माई जैसा बैसला पाटीं ॥ दैन्य पै न सोडी काय करूं ॥ १ ॥ सदैवाच्या स्त्रिया अलंकार मंडित ॥ मजवरी नाहीं प्रीत कायकरूं ॥ २ ॥ दरिद्रें विश्रांति घातली वो कैसी ॥ सांगो कोणापासीं माउलीये ॥ ३ ॥ एकी दिव्य वस्त्रें नेसल्या परिकर ॥ मज खंडे जर्जर मिळालेंसे ॥ ४ ॥ मोडकें खोंपट वारा येतो भरभराट ॥ बहु होती कष्ट कोणा सांगों ॥ ५ ॥ कैची कुसुमसेज कैचे पटकुळ ॥ फाटकी वाकळ अथरुणा ॥ ६ ॥ कन्या आणि पुत्र झालीं उपवरी ॥ अजोनी न धरी घर प्राणनाथ ॥ ७ ॥ जन लोकांमाजी केलें येणें हांसे ॥ ह्मणती लागलें पिसें नामयासी ॥ ८ ॥ जन्मीं न देखे उपाय येणें केले अपाये ॥ कोणा सांगों माये सुखदुःख ॥ ९ ॥ आमुच्या वडिला शस्त्र सुई आणि कातरी ॥ हा बाण आणि सुरी वागवीतसे ॥ १० ॥ येकांते भोंकीलें रुदना करी याची नारी ॥ वाहीयेली सुरी नागनाथीं ॥ ११ ॥ लज्जेचा हा गांव सांडियेला येणें ॥ शिकवावें कोणें माउलीये ॥ १२ ॥ संसाराचा येणें सांडिला पसारा ॥ कणव स्त्री बाळा नये कैसी ॥ १३ ॥ नसतां विठोबा नसतां पंढरी ॥ तरी हा सुखें घरीं नांदता कीं ॥ १४ ॥ होणार होऊन गेलें शिकवूं आतां काई ॥ विनवीते राजाई रखुमाईसी ॥ १५ ॥

॥ २५५३ ॥ शिकवावो रुक्माई आपुलीया कांता ॥ कां आह्मां अनाथां कष्टवीतो ॥ १ ॥ जन्मोनियां आमुची पुरविली पाठी ॥ मोडिली राहाटी संसाराची ॥ २ ॥ आतां आह्मीं काय करणें माउलीये ॥ बैसूं सावलीये कवणाचीये ॥ धृ० ॥ माझ्या भ्रतारासीं लावियेला चाळा ॥ क्षण जीवा वेगळा न करी त्यासी ॥ ३ ॥ आमुचा वेव्हार विध्वंसिला पाहीं ॥ करुणा माझी कांहीं नये त्यासी ॥ ४ ॥ सकळाचें मूळ आपणा आधीन ॥ केलें येणें जाणें पांडुरंगें ॥ ५ ॥ आपुलें परावें मोहो हा सांडिला ॥ आंगटा मोडिला उपाधीचा ॥ ६ ॥ उघडें घरदार लौकिक वेव्हारा ॥ धरिला निर्धार याचे नामीं ॥ ७ ॥ रात्रंदिवस जपे गोविंद हृदयीं ॥ आमुची चिंता कांहीं नलगे त्यासी ॥ ८ ॥ तुमचे सन्निधानें झालों आह्मीं दीन ॥ न वाटे निर्वाण कैसें तुह्मां ॥ ९ ॥ संसाराची व्यथा नेणवे सर्वथा ॥ होय तें उचिता करणें आह्मां ॥ १० ॥ धरी निरंतर एकची उत्तर ॥ परि हा तुह्मीं विचार काय केला ॥ ११ ॥ अनुभव अनुभवीं जाणें तुह्मीं समर्थपणें ॥ सदां मुखीं ह्मणे नामीं तुझ्या ॥ १२ ॥ जन्मोनी अवघी तुमची पोषणी ॥ नेणो तुह्मांवांचोनी कोणी दुजें ॥ १३ ॥ कायावाचामनें तुमचीये पाईं ॥ विनवीते राजाई जीवलगा ॥ १४ ॥

॥ २५५४ ॥ शिकविती ऐसें तुह्मीं नाइका ॥ नाहीं भय शंका लौकिकाची ॥ १ ॥ लावोनी लंगोटी झालेती गोसावी ॥ आमुची ठेवाठेवी कोण करी ॥ २ ॥ ऐसी तुमची स्थिति विलग देखोनी ॥ पडिलें चिंतवनीं काय करूं ॥ ध्रु० ॥ धडची कांटींये घातलें हें कैसें ॥ बळेंची आपणा पिसें लाविये लें ॥ ३ ॥ सुखाचा संसार करोनी बारा वाटे ॥ नांव केलें मोठें जगामाजी ॥ ४ ॥ तोडियेला मोह सांडियेली माया ॥ भुलविलें तुमचीया चित्ता कोणें ॥ ५ ॥ कवणे पुण्य ऐसी जोडियेली जोडी ॥ केली बिघडाबिघडी आह्मां तुह्मां ॥ ६ ॥ तुमचीये गति लेंकरें नेणती ॥ कोण चालविती घराचार ॥ ७ ॥ ह्मणोनी माझें चित्त आपुलेनी उद्वेगें ॥ कवणा जीवीचें सांगो सुखदुःख ॥ ८ ॥ सर्वस्वें सांडोनी धरिला तुह्मी देव ॥ येणें पुसिला ठाव संसारीचा ॥ ९ ॥ आमची करुणा नवाटेची कांहीं ॥ विनवीते राजाई नामदेवा ॥ १० ॥

॥ २५५५ ॥ चिंताक्रांत स्त्रीनें मनीं दुःख धरिलें ॥ ह्मणे कां बापें दिल्हें ऐसीयासी ॥ १ ॥ खाया ना जेवाया लेया ना नेसाया ॥ दैन्य भोगावया आलें जन्मा ॥ २ ॥ ज्याची करितो भक्ति त्याचें हें करणें ॥ घरोघरीं हिंडणें न चुकें माझें ॥ ध्रु० ॥ लाज सांडोनीया निलाजिरे झाला ॥ सुडपडसुड घेतला जग जाणे ॥ ३ ॥ जे सुरी राहिली तेची दैना झाली ॥ तेचि राहिली तइंहुनी ॥ ४ ॥ भक्ताची हे कांता मनीं वाहे चिंता ॥ काय झाला कर्ता पंढरिराव ॥ ५ ॥ वेष वाणीयाचा सवें बैल द्रव्याचा ॥ ह्मणे नामा आमुचा केउता गेला ॥ ६ ॥ बीदीं उभा राहिला घर पुसूं लागला ॥ ह्मणे नामा राहिला कवणे ठायीं ॥ ७ ॥ येरी सांगितलें तुळसीबन अपार ॥ तेंची जाणा घर नामयाचें ॥ ८ ॥ बाहेर तरी कोणी बैसला द्वारीं ॥ बोलाविली नारी नामयाची ॥ ९ ॥ अहो अहो बाइ हे ठेवावी गोणी ॥ नामा येतो परतोनी येईन मी ॥ १० ॥ येरि ह्मणे सांस आहां तुह्मी कोण ॥ आपुलें नाम खूण सांगा मज ॥ ११ ॥ माझें नाम तरी केशवशेटी सांगावें ॥ हें द्रव्य वेचावें लागे तितुकें ॥ १२ ॥ आणीक मागावें हें कांहीं न ठेवावें ॥ क्षेम माझें सांगावें सखा ह्मणोनी ॥ १३ ॥ इतुकें बोलोनी देव पाठमोरा झाला ॥ सवेंची घरा आला विष्णुदास ॥ १४ ॥ हे कैची गोणी ह्मणे टाकोनी गेला वाणी ॥ परी आह्मीं कोणी वोळखुचीना ॥ १५ ॥ नांव सांगितलें केशवशेटी ह्मणीतलें ॥ तंव येरें जाणीतलें माझा देव ॥ १६ ॥ दैन्य धांवा केला देव कष्टविला ॥ अपराध झाला तुजपासून ॥ १७ ॥ राजाई ह्मणे आह्मां थोर लाभ झाला ॥ बीडवइ भेटला केशवशेटी ॥ १८ ॥

॥ २५५६ ॥ जोडानी दोन्हीं कर माथा ठेवी चरणीं ॥ परिसा विनवणी स्वामी माझी ॥ १ ॥ मी तंव अज्ञान नकळे तुमचा महिमा ॥ अपराध क्षमा करा मज ॥ २ ॥ अंतरीची खूण कांहीं सांगा मज ॥ तुह्मीं हृदयीं बीज धरोनी असा ॥ धृ० ॥ जेणें सुखें तुमचें चित्त निरंतर ॥ आनंदें निर्भर सदां असा ॥ ३ ॥ इच्छा तृष्णा देहीं मावळली कल्पना ॥ सदां समाधाना इंद्रियांसी ॥ ४ ॥ मायबापीं मज दिधलें तुमचे हातीं ॥ जन्मोनी सांगाती लावीयेलें ॥ ५ ॥ देव द्विज गुरु साक्षी हे करोनी ॥ स्वामीचे चरण जोडीयेले ॥ ६ ॥ तुमची चित्तवृत्ति उदास देखोनी ॥ पडिलें चितावनीं काय करूं ॥ ७ ॥ मग तुमचा स्वामी कृपेचा कोंवळा ॥ न धरत पातला अनाथबंधू ॥ ८ ॥ मग त्या विश्वंभरें कृपेच्या सागरें ॥ पुसिली आदरें गोष्टी तुमची ॥ ९ ॥ तंव मी दुराचारी निर्भर्त्सिलें तुह्मां ॥ ऐकोनी मेघःशामा कृपा आली ॥ १० ॥ तंव जगज्जीवन बोले अमृतवाणी ॥ लोटोनिया गोणी दारवंटा ॥ ११ ॥ ह्मणे द्रव्य तुह्मीं सर्वही वेचावें ॥ आणिक मागावें लागेल तें ॥ १२ ॥ सद्गदित कंठें सांगितलें तुह्मां ॥ परी नकळे महिमा दैवहीन ॥ १३ ॥ लोभाचा वोरसु कवणीये जन्मीचा ॥ नकळे तुमचा त्यांचा ऋणानुबंध ॥ १४ ॥ पाहातां श्रीमुख निवालें माझें चित्त ॥ मग हे मनोरथ विसरलें ॥ १५ ॥ क्षण एक आनंद झाला माझ्या मनीं ॥ उपमा कवण द्यावी तया सुखा ॥ १६ ॥ आतां ये संसारीं मीच धन्य जगीं ॥ जें तुह्मां अर्धांगीं विनटलें ॥ १७ ॥ एक वेळ घाला विठोबाचे पायीं ॥ विनवीते राजाई नामदेवा ॥ १८ ॥

॥ २५५७ ॥ नामा ह्मणे स्त्रीये अनुचित केलें ॥ कां माझ्या शिणविलें विठोबासी ॥ १ ॥ निंदेच्या उत्तरीं निषेधिलें मज ॥ वाटली त्या लाज मायबापा ॥ २ ॥ मग तो माझा स्वामी झाला वेषधारी ॥ तुजलागीं सुंदरी पुढारला ॥ धृ० ॥ रत्नजडित मुगुट सत्वर फेडुनी ॥ आलासे वेष्टोनी शुभ्र शेला ॥ ३ ॥ तेणें भारें त्याचा दगदगिला मस्तक ॥ ह्मणोनी मज शोक वाटतसे ॥ ४ ॥ कस्तुरी मळवट सुरेख पुसोनी ॥ आलासे लाउनी विभूति भाळीं ॥ ५ ॥ रुद्राक्षांचे मणी लेउनी कर्णपुटीं ॥ कुंडलें गोमटीं लपविलीं ॥ ६ ॥ कौस्तुभ वैजयंती काढिली परती ॥ बांधलेसें प्रीति शिवलिंग ॥ ७ ॥ देखोनी रखुमाईस वाटेल उदास ॥ असती उपहास केले त्याचे ॥ ८ ॥ रमा शरणांगत आलिंगिली बाहीं ॥ कैसी गोणी तिही कवळिली ॥ ९ ॥ सर्वांगीं साजिरी चंदनाची उटी ॥ भ्रंशली गोमटी श्रम झाला ॥ १० ॥ सोनसळा पुटा

फेडोनी गोमटा ॥ नेसला धोवटा बोटधारी ॥ ११ ॥ इंद्रनीळ तनु रुळली असे रजें ॥ श्रीमुख रवितेज कोमाइलें ॥ १२ ॥ धन्य तुझे नयन देखिले श्रीचरण ॥ जीवें निंबलोण नाहीं केलें ॥ १३ ॥ द्रव्याचेनी लोभें भ्रांत झालें मन ॥ हातीचें निधान हारविलें ॥ १४ ॥ आतां आदि अंतीं पाहातां केवळ ॥ मूळ आणि फळ दुःखरूप ॥ १५ ॥ जाणोनी विकृति धरिली सज्जनी ॥ सांडिलें निर्वाणी वमन जैसें ॥ १६ ॥ जाणसी तें करी आपुलें तूं हित ॥ म्यां तरी ठेविलें चित्त साधे पायीं ॥ १७ ॥ नामा ह्मणे केशवा पाहे निर्वाण ॥ माझा अभिमान आहे त्यासी ॥ १८ ॥

॥ २५५८ ॥ दोन प्रहर रात्र पाहोनी एकांत ॥ राजाई वृत्तांत सांगे मातें ॥ १ ॥ अहो रखुमाबाई विठोबासी सांगा ॥ भ्रतारासी कांगा वेडें केलें ॥ २ ॥ वस्त्र पात्र नाहीं खाया जेवायासीं ॥ नाचे अहर्निशीं निर्लज्जसा ॥ ३ ॥ चवदा मनुष्यें आहेत माझे घरीं ॥ हिंडतां दारोदारीं अन्नासाठीं ॥ ४ ॥ बरा मार्ग तुह्मी उमजोनी सांगा ॥ नामयाची राजा भली नव्हे ॥ ५ ॥

---

## केशवाचे अभंग.

——:०:——

॥ २५५९ ॥ उदमाचा करून झाडा ॥ कर्म कदबा अवघा फाडा ॥ १ ॥ मग येणें जाणें नाहीं ॥ पुढें वेव्हार नलगे कांहीं ॥ २ ॥ व्याज मुद्दल देउन उजू ॥ तिहीं लोकीं व्हावें रुजू ॥ ३ ॥ केशव ह्मणे लिगाड तोडा ॥ सुखसागर विठ्ठल जोडा ॥ ४ ॥

॥ २५६० ॥ निज आत्मज्ञान डोहीं ॥ जे बुडोन गेले पाहीं ॥ १ ॥ तनु त्याग होतां सांची ॥ मग सगुणा भेटी कैची ॥ २ ॥ अहंभाव वांटून प्याले ॥ ते जिवंतची मुक्त झाले ॥ ३ ॥ केशव ह्मणे डोळां ॥ ते पहावें वेळोवेळां ॥ ४ ॥

॥ २५६१ ॥ खेचरापासी जाय पुससी मागसी तें आहे ॥ येरा आणिका काय उमगेना ॥ १ ॥ जाय जाय वेगी लवलाहे पाहे ॥ खेचराचे पाय सोडूं नको ॥ २ ॥ तो सांगेल तें उगलेंच घेई ॥ आणिकाचे बाहीं

पडूं नको ॥ ३ ॥ केशव ह्मणे नामयाच्या विठ्या भक्तराया ॥ आलिंगुनी चहूं बाह्या दिधलें क्षेम ॥ ४ ॥

॥ २५६२ ॥ नम्रतेवीण योग्यता जे कोणी मिरवीती ॥ ते केवी पावती ब्रह्मसुख ॥ १ ॥ लटके नेत्र लाउनी ध्यान पै करिती ॥ ते केवी पावती केशवातें ॥ २ ॥ एक संत ह्मणविती नग्न पै हिंडती ॥ अंतरींची स्थिति खड-बड ॥ ३ ॥ झालेपणाचे दिस गुण ॥ वस्तु ते आपण होउनी ठेले ॥ ४ ॥ सागरांत गंगा मिळोनिया गेली ॥ परतोनी पावली नाम नाहीं ॥ ५ ॥

॥ २५६३ ॥ तुझे पाय माझिया गळ्यासी ॥ करीन एक मग उग-लाची देसी ॥ १ ॥ आपुलें मागतां ह्मणें धिक्कारिसी ॥ चोरासी सांगसी निजगुज ॥ २ ॥ सांपडलीया लाथ बुकी साहावी ॥ जीवीं धूर धरावी विठो ऐसी ॥ ३ ॥ मग होणार तें हो या शरीरा ॥ सांपडलीया धरा जीवेंभावें ॥ ४ ॥ धुरेसी झगडा करावा सैरा ॥ या रांडपोरां खवळसी काय ॥ ५ ॥ केशव ह्मणे विठा झुंजार तूं भला ॥ खेचरू दाखविला ठेवा तुझ्या बापाचा ॥ ६ ॥

---

## गोणाईचे स्फुट अभंग.

———:o:———

॥ २५६४ ॥ वडील वडील आमुचे बोलताती परी ॥ तुज ऐसा श्रीहरि देव नाहीं ॥ १ ॥ दर्शना आले या पाडीसी आव्हाटा ॥ मन मारुनी चोहाटा भुलविसी तूं ॥ २ ॥ ऐसा कैसा कोणे केलासी देव ॥ आमुच्या जिनीया खेव आणियेला ॥ ३ ॥ माझें बाळ तुझ्या दर्शनासी आलें ॥ तें त्वां भुलविलें केशीराजा ॥ ४ ॥ रात्रंदिवस तुझ्या नामाचारे छंद ॥ गोविंद गोविंद ह्मणतसे ॥ ५ ॥ ताहानभूक विसरला पिसाट पै झाला ॥ नोळखे मजला काय करूं ॥ ६ ॥ परतोनी संसाराची सांडियेली आस ॥ बोलतो उदास सर्वांपरी ॥ ७ ॥ लोकांची लेंकरें कांगा चाळ-विसी ॥ आपणा ऐसें करिसी भलत्यासी ॥ ८ ॥ आणीक असतां तुज-वेगळा थोर ॥ मग माझा विचार कळतां तुज ॥ ९ ॥ तुज येक वर्म पुंड-लीकचि आहे ॥ जेणें जोडविलें पायें विटेवरी ॥ १० ॥ याहुनी आणीक अधिक पावसी ॥ आह्मां दुर्बळियासी कष्टविता ॥ ११ ॥ मागें पुढें तुज

ऐसेंची फावलें ॥ तें तंव नचले मजसी कांहीं ॥ १२ ॥ जीव मी देईन कीं नामा नेईन ॥ नांव मी करीन गोतामाजी ॥ १३ ॥ आतां बरवें विचारिगा श्रीहरी ॥ माझा नामा करी मज आधिन ॥ १४ ॥ नाहीं तरी जिवीत्व वेंचीन तुझ्या पाईं ॥ विनविते गोणाई केशीराजा ॥ १५ ॥

॥ २५६५ ॥ घेउनी कापड जाय बाजारासी ॥ गोणाई नाम्यासी शिकवीतसे ॥ १ ॥ लोकांचे हे पुत्र संसार करिती ॥ आमुची फजिती केली नाम्या ॥ २ ॥ नाम्या विठोबाचा छंद नव्हे बरा ॥ मैंद हा खरा गळाकाढू ॥ ३ ॥ याचे संगतीनें संसार जाळावा ॥ भोपळा हा घ्यावा भीक मागूं ॥ ४ ॥ नको संग धरूं नाम्या ऐक गोष्टी ॥ गोणाई हनुवटी धरुनी सांगे ॥ ५ ॥

॥ २५६६ ॥ सुख पंढरीस पाहूं ॥ आले भीमातिरीं बहू ॥ १ ॥ प्रेमें गर्जती हरिचे दास ॥ मागे पंढरी निवास ॥ २ ॥ मोक्ष पाईं लोळण घाली ॥ देखोनी मुक्ताई निवाली ॥ ३ ॥ ज्ञानदेव सद्गदित ॥ देखोनी गोणाई हांसत ॥ ४ ॥

## आरती.

॥ २५६७ ॥ फळलें भाग्य माझें ॥ धन्य जालों संसारीं ॥ सद्गुरु भेटले हो ॥ त्यानें धरिलें करीं ॥ पश्चिमें चालविलें ॥ आत्मस्थिति निर्धारी ॥ त्रिकुटावरी नांदे ॥ देखीयेली पंढरी ॥ तें सुख काय सांगों ॥ वाचे बोलतां नये ॥ आरतीच्यानी योगें ॥ गेलें मीपण माये ॥ १ ॥ राउळामाजी जातां ॥ राहे देह अवस्था ॥ मन हे उन्मन झालें ॥ नसे बद्धतेची वार्ता ॥ हेतु हा मावळला ॥ नसे शब्द निःशब्दता ॥ तटस्थ होउनी ठेला ॥ निजरूप पाहतां ॥ तें सुख काय सांगों ॥ वाचे बोलतां नये ॥ २ ॥ गुणाई गुणगाई ॥ पूर्ण जळाल्या वाती ॥ नवल अविनाश ॥ * * * *

---

## नारा याचे अभंग.

—:०:—

॥ २५६८ ॥ देवा माझें मीपण ठेवी आपुले चरणीं ॥ घाली माझे मनीं रूप तुझें ॥ १ ॥ मग मी लोकांचारी असेन वर्तता ॥ राहीन चिंतिता

चरण तुझें ॥ २ ॥ चंदनाची वृत्ति वेधले तरुवर ॥ सबाह्य अभ्यंतर काय झाले ॥ ३ ॥ सरिता सिंधूसी मिळोनि हरपली ॥ सागरची झाली एकसरें ॥ ४ ॥ लवण जळाचे प्रवृत्ति असे ॥ ऐक्यभावें न दिसे वेगळे कांहीं ॥ ५ ॥ नारा ह्मणे शरण आलों केशीराजा ॥ ऐसा भाव माझा करीगा वेगीं ॥ ६ ॥

॥ २५६९ ॥ तुज मी अनन्य शरण ॥ सर्व पांडुरंगा जाण ॥ १ ॥ माता बाळा कोपे रागें ॥ द्यावें आहारातें मागे ॥ २ ॥ जाय कडीयेसी नघे ॥ परी तिची अंगसंगें ॥ ३ ॥ ह्मणे खटी परतें लोटी ॥ परी सदा पायीं घाली मिठी ॥ ४ ॥ नारा ह्मणे नामयाचा ॥ बापा सांभाळावी वाचा ॥ ५ ॥

॥ २५७० ॥ तुज भांडवल मोक्ष एक गांठी ॥ तो केला पावन तुझ्या नामें ॥ १ ॥ आतां गौप्य काय आहे तुझ्यापाशीं ॥ जें तूं मज देशी पांडुरंगा ॥ २ ॥ चतुर्विध मुक्ति दृष्टि मज वोळगती ॥ ध्यातां तुझे चित्तीं चरणकमळ ॥ ३ ॥ आणिका ऋद्धि सिद्धि दाखविसी आस ॥ या दासीचा अभिलाष कोण करी ॥ ४ ॥ भूतळींचें वैभव निजकर्मभोग ॥ तें तुज उद्वेग करणें बहू ॥ ५ ॥ नारा ह्मणे नाम्यानें सांगितलें बीज ॥ तेंची मजसी गुज बोल कांहीं ॥ ६ ॥

॥ २५७१ ॥ कोटी यज्ञांचीं हीं फळें ॥ त्यांहुनी हरिनाम आगळें ॥ १ ॥ तें फळ वेगळें सांगावया ॥ नाहीं उपमा द्यावया ॥ २ ॥ महा पातकांचिया राशी ॥ नामें पावती मोक्षासी ॥ ३ ॥ दोन अक्षरांसाठीं ॥ गणिका घातली वैकुंठीं ॥ ४ ॥ हरिनामाचा संग्रह करा ॥ ह्मणे विष्णुदास नारा ॥ ५ ॥

॥ २५७२ ॥ काळा अलोट अभंग ॥ हरिचे दास अंतरंग ॥ १ ॥ हाकारितीं वेळोवेळां ॥ कृष्णा गोविंदा गोपाळा ॥ धृ० ॥ कंठीं तुळसीच्या माळा ॥ नेत्रीं अश्रूचिया किळा ॥ २ ॥ गुढिया झळकती रोमांकुरीं ॥ कंप न धरेची शरीरीं ॥ ३ ॥ आंतु बाहेरी निरंतरी ॥ मागा पुढां अवघा हरी ॥ ४ ॥ संतचरणीचा रजःकण ॥ नारा नामयाचा प्राण ॥ ५ ॥

॥ २५७३ ॥ मी आहें तेथें मग तूं कइचा ॥ हा उपजन्माचा तोडी वेळ ॥ १ ॥ आपुला करोनी ठेवी तुझ्या चरणीं ॥ नमानिती कोणी क्षिती

नाहीं ॥ धृ० ॥ सेवासुख देई हेची दुणेपण ॥ येर तो अभिमान खंडी देवा ॥ २ ॥ नारा ह्मणे अससी माझीया जिव्हाळा ॥ सुखरूपा विठ्ठला केशीराजा ॥ ३ ॥

॥ २६७४ ॥ तुझे चरणीं चित्त रंगलें अनुरागें ॥ बहु जन्म वियोगें शिणलों होतों ॥ १ ॥ उठविता येथुनी मुरकुंडी घाली ॥ कृपेची साउली देखुनी तुझी ॥ धृ० ॥ आहाळले पोळले ताप त्रई विराले ॥ तृष्णा वी-भांडीले नानापरी ॥ २ ॥ कामक्रोध मदमत्सरु अहंकार ॥ देह निरंतर जाजावलें ॥ ३ ॥ बुडतीया जरी अवचितां सांगडी ॥ तें जीवें न सोडी तैसें झालें ॥ ४ ॥ विनवी नामयाचा विष्णुदास नारा ॥ वंशपरंपरा दास तुझा ॥ ५ ॥

॥ २६७५ ॥ तापत्रया तापलें देहे असे पीडिलें ॥ वासना विभांडिलें मन माझें ॥ १ ॥ विठोबा वेगळें न देखें मी सुख ॥ पाहेन तुझें मुख एकवेळ ॥ धृ० ॥ सुखाची साउली पाहीन दृष्टीभरी ॥ जाईन महाद्वारीं लोटांगणी ॥ २ ॥ हारला शीणभाग जन्मजन्मांतरिचा ॥ नारा नामयाचा शरणांगत ॥ ३ ॥

॥ २६७६ ॥ माझ्या विठोबाचें श्रीमुख साजिरें ॥ झळकती कुंडलें मनोहर ॥ १ ॥ मनातें तूं आठवी आसनीं शयनीं ॥ भोगिसी उन्मनीं सहज सुख ॥ धृ० ॥ गगनीं असो पैं न येतो मार्तंडू ॥ तैसें तूं अखंडु करी ध्यान ॥ २ ॥ कमलकळीके जैसा भ्रमर आसक्त ॥ तैसा तूं निश्चित राहे चरणीं ॥ ३ ॥ जैसा कां समंधु जीवन जळचरें ॥ येणेची निर्धारें दृढ धरी ॥ ४ ॥ नारा ह्मणे माझ्या बापाचें साधन ॥ सांपडली खूण अंतरीची ॥ ५ ॥

॥ २६७७ ॥ पुंडलिकाद्वारीं होतसे वेव्हार ॥ नामयाची पोरें भांड-ताती ॥ १ ॥ येउनीया चौघे उभे ठेले सत्वर ॥ बोलताती पोरें नामयाचीं ॥ धृ० ॥ आमुचा अंकी लागताती पुराणीं ॥ नामयाचे ऋणीं बांध-लासी ॥ २ ॥ नामयाचा नारा बैसलासे दारीं ॥ विठोबावरी आळ आला ॥ ३ ॥

॥ २६७८ ॥ कैचें आह्मां जाति कुळ ॥ कैचे आह्मी धर्मशील ॥ १ ॥ तुझ्या नामीं अनुसरलों ॥ तिहीं लोकीं सरते झालों ॥ धृ० ॥ कैंची क्रिया

कैचें कर्म ।। कैचे वर्णाश्रम धर्म ॥ २ ॥ नारा विनवी विष्णुदास ॥ आमुचे वंशीं हा विश्वास ॥ ३ ॥

॥ २५७९ ॥ आह्मा व्रत एकादशी ॥ देव केशव तीर्थ तुळसी ॥ १ ॥ अनेक नेणों बा साधन ॥ आमचा विषय हरिकीर्तन ॥ धृ० ॥ संतसंगती निरंतर ॥ प्रेमधन हें भांडार ॥ २ ॥ विनवी विष्णुदासाचा नारा ॥ आमची ऐसी हे परंपरा ॥ ३ ॥

## महाद्याचे अभंग.

———:o:———

॥ २५८० ॥ यादवांचे कुळीं झोंड जे जन्मले ॥ नाहीं ऐसें केलें मागें-पुढें ॥ १ ॥ देइगा विठोबा आमुचें ठेवणें ॥ लोकांचें तूं ऋण नेदों पाहासी ॥ ध्रु० ॥ आमुचे साधु आहेत सज्जन ॥ तुमचा जमान कोठें देवा ॥ २ ॥ नामयाचा महादा बळकट झाला ॥ विठोबा आणिला चौबारांत ॥ ३ ॥

## गोंदाचे अभंग.

———:o:———

॥ २५८१ ॥ साठीं नव लक्ष चौऱ्याणव कोटी ॥ बापाची हे जोडी देई देवा ॥ १ ॥ जमान देउनी नाहींसें तूं करी ॥ वार्या एरझारी शिणवितोसी ॥ २ ॥ आमुचे जमान देवा तुमचे पायें ॥ तुझा कोठें आहे जमान सांगे ॥ ३ ॥ नामयाचा गोंदा बळकट धरिता झाला ॥ विठोबा आणिला चौबारांत ॥ ४ ॥

॥ २५८२ ॥ सेज सिद्ध झाली निजा श्रीधरा ॥ आज्ञा द्यावी लोकां जाती आपुल्या घरा ॥ १ ॥ रात्र बहुत जाहाली देवा चला मंदिरा ॥ राईरकुमाबाई वाट पाहाती सुंदरा ॥ २ ॥ तुझ्मासमोरास देवा झाली पंढरी ॥ विनटला चरणीं गोंदा उभा राहिला द्वारीं ॥ ३ ॥

# नामदेवाचें चरित्र.

——:0:——

॥ २५८३ ॥ नैवेद्याचा नेम असे दामाजीसी ॥ नित्य विठ्ठलासी न्यावें बोणें ॥ १ ॥ बोणें दाखवावें मग अन्न घ्यावें ॥ ऐसा तो सद्भाव त्याचे मनीं ॥ २ ॥ ऐसें करितां दिन कांहीं क्रमिले ॥ दामाजी चालिले ग्रामांतरा ॥ ३ ॥ दामाशेटी काय ह्मणे गोणाईसी ॥ नित्य विठोबासी न्यावें बोणें ॥ ४ ॥ गोणाई बोलिली सांगा नामदेवा ॥ करील तो सेवा विठ्ठलाची ॥ ५ ॥ दामाजीनें पुत्र बोलाविला नामा ॥ करी मेघःशामा सेवा नित्य ॥ ६ ॥ नित्यानित्य न्यावें विठोबासी बोणें ॥ मग अन्न घेणें आज्ञा केली ॥ ७ ॥ अवश्य ह्मणोनी लागला चरणासी ॥ धरिलें पोटासी नामदेवा ॥ ८ ॥ नामदेवा हातीं समर्पिलें बोणें ॥ गेला तो तेथुनी गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५८४ ॥ नामदेवा कैसा हा रे नफा केला ॥ नैवेद्य तो नेला विठ्ठलासी ॥ १ ॥ नैवेद्य नेउनी ठेवियला पुढें ॥ प्रेमें बोले गोड नामदेव ॥ २ ॥ नामदेव ह्मणे जेवावें विठ्ठला ॥ माथा ठेवीयेला चरणावरी ॥ ३ ॥ नामदेव माथा ठेवी चरणावरी ॥ न जेवीच परी पांडुरंग ॥ ४ ॥ न जेवी ह्मणोनी नामा शोक करी ॥ मुख पाहे हरि प्रीति करोनी ॥ ५ ॥ प्रेमें नामा काय ह्मणे विठ्ठलासी ॥ कांरे न जेविसी मायबापा ॥ ६ ॥ माझे पितयाचे हातें तूं जेविसी ॥ मज दुजें पाहसी पांडुरंगा ॥ ७ ॥ घरासी मी आतां बोणें नेऊं काई ॥ मारील गोणाई मज आतां ॥ ८ ॥ काय करूं आतां देवा हो श्रीहरी ॥ नामा विनंति करी गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५८५ ॥ विनविते देवा बहुत प्रकारीं ॥ जेवावें श्रीहरि मायबापा ॥ १ ॥ दोनी कर जोडोनी घाली लोटांगण ॥ द्यावें जीवदान देवराया ॥ २ ॥ अझुनी नये तुज बा करुणा ॥ काय नारायणा करूं आतां ॥ ३ ॥ मारील गोणाई घेईल माझा जीव ॥ कायतरी कींव नये माझी ॥ ४ ॥ काय करूं आतां विठ्ठल रुक्माई ॥ मारील गोणाई मजलागी ॥ ५ ॥ नये तुज कांहीं कींव माझी पाही ॥ वाहीन आतां पायीं शिरकमळ ॥ ६ ॥ वाहीन शिरकमळ ह्मणे नामदेव ॥ धरिला सद्भाव ऐसा मनीं ॥ ७ ॥ देह त्याग त्यानें मांडिला शरिरीं ॥ फांसा रुकनी दोरी लावियेली ॥ ८ ॥ गळां घालूनि फांस बांधिला काष्टासी ॥ त्यागितां

प्राणासी धरिलें देवें ॥ ९ ॥ उठविला नामा पांडुरंगें करीं ॥ आलिंगी श्रीहरि गोंदा ह्मणे ॥ १० ॥

॥ २५८६ ॥ आलिंगिला नामा हृदयीं विठ्ठलें ॥ ताट विस्तारिलें रुक्माईनें ॥ १ ॥ विठ्ठल रुक्माई तिसरा नामदेव ॥ जेवियेले भावें तिघे-जण ॥ २ ॥ जेवूनियां त्यांनीं विडा तो घेतला ॥ नामा सुखी केला पांडुरंगें ॥ ३ ॥ देव त्यास ह्मणे जाहालों समाधान ॥ घाली लोटांगण नामदेव ॥ ४ ॥ मनोरथ माझा पुरविला देवा ॥ नित्य ऐसी सेवा घड-वावी ॥ ५ ॥ ऐसी भाक मज देई नारायणा ॥ करावी वासना तृप्त माझी ॥ ६ ॥ विठ्ठलानें भाक दिली नामयासी ॥ नित्य सेवा ऐसी दिधली तुज ॥ ७ ॥ ऐसें भाष्यवचन करोनी देवासी ॥ लागला चरणासी नाम-देव ॥ ८ ॥ आज्ञा घेऊनिया नामा तो चालिला ॥ मंदिरासी आला गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५८७ ॥ नामा आला घरा पुसत गोणाई ॥ उशीर कां पाही लावियेला ॥ १ ॥ ताट जो पाहिलें रिकामें देखिलें ॥ बोणें काय केलें पुसतसे ॥ २ ॥ नामा ह्मणे बोणें देव जेवियेला ॥ ह्मणोनी लागला उशीर मज ॥ ३ ॥ बोणें कोठें देव जेवितां देखिला ॥ त्वां दिलें पोरांला नामदेवा ॥ ४ ॥ ऐसें नित्य बोणें देशी तूं पोरासी ॥ सोंग घेऊन येसी मजपासी ॥ ५ ॥ कादुनी चराट नामा टांगियेला ॥ बहुत ताडिला गोणा-ईनें ॥ ६ ॥ रागें रागें त्याला अधिक अधिक मारी ॥ मिळोनी शेजारीं सोडविला ॥ ७ ॥ आण वाहे नामा ह्मणे गोणाईसी ॥ जेविले हृषीकेशी पांडुरंग ॥ ८ ॥ नको मारूं आई दिलें नाहीं कोणा ॥ लागत चरणा गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५८८ ॥ नामयाचा नेम पाहो आदरिला ॥ मनामध्यें केला नेम तिणें ॥ १ ॥ मनामध्यें ह्मणे आणिक द्यावें बोणें ॥ पाहावी हे खूण कैसी आहे ॥ २ ॥ एके दिवसीं बोणें दिल्हें नाम्यापासी ॥ न्यावें हें देवासी ह्मणे माय ॥ ३ ॥ नामा ह्मणे आई जेवील हृषीकेशी ॥ आणिक मारिसी मज काय ॥ ४ ॥ न मारी ह्मणोनी बोलिली गोणाई ॥ माथा ठेवुनी पायीं चालीयेला ॥ ५ ॥ नैवेद्य घेउनी गेला विठूपासी ॥ बैसले सुखेसी तिघेजणें ॥ ६ ॥ तिघेजणें एकेठायीं ते जेविलीं ॥ गोणाई आव-चिती आली तेथें ॥ ७ ॥ कवाडा आडुनी पाहात गोणाई ॥ तिघे एके-

ठायीं जेवितातो ॥ ८ ॥ जेवितां देखिले आली ते घरासी ॥ सास आली तिसी गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५८९ ॥ सास आल्यावरी कष्टी जाहली मनीं ॥ मारिलें पापिणीं नामयासी ॥ १ ॥ मारिलें ह्मणोनी महा शोक करी ॥ जेवुनीया घरीं आला नामा ॥ २ ॥ नामा आला घरा पाहे मातेकडे ॥ आनंदानें रडे गोणाबाई ॥ ३ ॥ नामा विनवीत दोन्ही कर जोडोनी ॥ लागला चरणीं गोणाईच्या ॥ ४ ॥ नामा ह्मणे माते कां शोक करिसी ॥ सांग मजपासी काय जाहालें ॥ ५ ॥ माता ह्मणे आतां काय सांगूं नाम्या ॥ सास माझ्या मना आली आजी ॥ ६ ॥ कवाडा आडून देखियेलें आह्मी ॥ जेवियेलां तुह्मी तिघेजण ॥ ७ ॥ व्यर्थ मी मारिलें केला जाच तुज ॥ ऐसा भक्तराज गांजियेला ॥ ८ ॥ आतां मज देव कोपेल विठ्ठल ॥ ऐसी माता बोले गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५९० ॥ नामयाची माता काय ह्मणे देवा ॥ मज तूं केशवा कोपूं नको ॥ १ ॥ मज कोपूं नको देवा पांडुरंगा ॥ गोणाई गोविंदा विनवीतसे ॥ २ ॥ न कळतां देवा मारिला मी नामा ॥ मज करी क्षमा मायबापा ॥ ३ ॥ सर्वस्वी मी अपराधी पंढरीच्या राया ॥ नाम्याविषयीं दया असों द्यावी ॥ ४ ॥ घातलें तयासी तिणें लोटांगण ॥ केलें समाधान विठ्ठलानें ॥ ५ ॥ नामा आलिंगिला हृदयीं मातेनें ॥ जोडला सज्जन देव तुज ॥ ६ ॥ तुज हा जोडला पंढरीचा राव ॥ जाहला बरवा ठाव नामदेवा ॥ ७ ॥ बहुत पूर्वपुण्य होतें तुझे गांठीं ॥ पडली हे मिठी विठ्ठलासी ॥ ८ ॥ नामा विठ्ठलासी नाहीं द्वैतपण ॥ धरीत चरण गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५९१ ॥ विठ्ठल रुक्माई भक्त नामदेव ॥ निसानी सद्भाव जेवितसे ॥ १ ॥ सेवा करितां बहु दिवस क्रमिले ॥ नातवन आलें फार दिवसे ॥ २ ॥ कांहीं नाहीं घरीं द्रव्य आणि धन ॥ राजाई ते ह्मणे गोणाईसी ॥ ३ ॥ काय खावें आतां असो कोणे परी ॥ लाविलें दारोदारीं विठ्ठलानें ॥ ४ ॥ उपवास सोसूं किती आतां दिवस ॥ घालूं या पोरांस काय आतां ॥ ५ ॥ विठ्ठलानें कांहीं वरें नाहीं केलें ॥ नाम्या वेडें केलें पांडुरंगें ॥ ६ ॥ वेडें करुनी आह्मा जांच तूं करिसी ॥ पोट मारविसी मायबापा ॥ ७ ॥ किती दुःख सोसूं आतां या शरीरीं ॥ करीन निर्धारी

जीवघात ॥ ८ ॥ चौपोरांसहित घालीन भिमे उडी ॥ लागेन पैल थडी गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५९२ ॥ भावें भक्तिवादें करावें कीर्तन ॥ आशाबद्ध मन करूं नये ॥ १ ॥ निष्कामें करावें देवाचें कीर्तन ॥ भय हें सांडून शरीराचें ॥ २ ॥ रणामध्यें कैसा भिडतो रणशूर ॥ होवोनी उदार जिवावरी ॥ ३ ॥ तैसा पांडुरंगीं धरा हो निर्धार ॥ उतरा हा पार भवसिंधू ॥ ४ ॥ सिंधु उतरोनी लावा जगढाल ॥ पाहा तें नवल विठ्ठलाचें ॥ ५ ॥ देव जोडियेला तया काय उणें ॥ गोंदा ह्मणे मन धीट करा ॥ ६ ॥

॥ २५९३ ॥ दोघेजण बाळ नारा ह्मादा तान्हें ॥ बांधियेलें तिनें मागें पुढें ॥ १ ॥ उडी ते घातली भीवरेचे डोहीं ॥ आला लवलाहीं पांडुरंग ॥ २ ॥ येउनी शिरला भीवरेचे डोहीं ॥ ओढोनी राजाई ठेवी कांठीं ॥ ३ ॥ पाहे तो राजाई कांठीं उभी आहे ॥ क्रोधें बोलताहे विठ्ठलासीं ॥ ४ ॥ क्रोधें ह्मणे देवा कांरे जाचितोसी ॥ लल्लाट महिषी आपटिलें ॥ ५ ॥ क्रोधें ते आणिक टाकियली उडी ॥ नेली पैलथडी विठ्ठलानें ॥ ६ ॥ मग ते राजाई चालिली घरासी ॥ देखिला वाटेसी मेला सर्प ॥ ७ ॥ सर्प तो घेउनी वेगी आली घरासी ॥ ठेवी शिजावयासी चुलीवरी ॥ ८ ॥ सर्प हा शिजला खाऊं पांचजणें ॥ केला विचार तिनें गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५९४ ॥ शिजला तो सर्प काढिलें झांकण ॥ पाहे तो सुवर्ण तोंडावरी ॥ १ ॥ सुवर्ण देखोनी सुखी जाहाली मनीं ॥ बाई हरिखोनी सांगे नाम्या ॥ २ ॥ सांगितलें वर्तमान नाम्यापासी ॥ नामा ह्मणे तिसी पाहूं सोनें ॥ ३ ॥ सुवर्ण आणुनी ठेवियेलें पुढें ॥ काय केलें वेडे नामा ह्मणे ॥ ४ ॥ कशासाठीं माझ्या स्वामीसी पीडिलें ॥ कांगे कष्टी केलें देवराया ॥ ५ ॥ मेळविले द्विज तया नामयानें ॥ वांटियलें सोनें ब्राह्मणासीं ॥ ६ ॥ तेव्हां राजाईनें आकांत मांडिला ॥ नामा वेडा केला पांडुरंगें ॥ ७ ॥ सुवर्णासारखी वस्तु ते वांटिली ॥ भुली ते घातली नामयासीं ॥ ८ ॥ नामदेवा तिनें बहु जाच केला ॥ कृपाळु पावला गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५९५ ॥ जाच केला ह्मणोनी चालिला श्रीहरी ॥ भक्ताचा कैवारी पांडुरंग ॥ १ ॥ पंढरीचा वाणी झाला केशवशेट ॥ लावियेला मूठ ढवळानंदी

॥ २ ॥ वराईची गोणी घालून सावरी ॥ आणून नाम्या घरीं उतरली ॥ ३ ॥ पुसता तो नामा गेला अंघोळीसी ॥ सांगे राजाईसी केशवशेट ॥ ४ ॥ धनाची हें गोणी वेंचा तुह्मी घरीं ॥ सांगा बहुता परी नामयासीं ॥ ५ ॥ नामदेव माझा मित्र आहे सगा ॥ केशवशेटीं सांगा दिल्ही गोणी ॥ ६ ॥ वचन सांगोनी केशवशेट गेला ॥ नामदेव आला मंदिरासी ॥ ७ ॥ येउनी पुसत कवणाची गोणी ॥ तुमचा मित्र वाणी केशवशेट ॥ ८ ॥ नामा पाहे तंव वराईची गोणी ॥ दुःखी जाहला मनीं गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५९६ ॥ वराईची गोणी कळली राजाईसी ॥ नामा ब्राह्मणांसी बोलावीत ॥ १ ॥ इतुक्यामध्यें होन मडकेंभर काढिले ॥ गोणी ते शिविली होती तैसी ॥ २ ॥ द्विज मेळवुनी आला नामदेव ॥ वाटियेलें सर्व द्रव्य त्यानें ॥ ३ ॥ नामा ह्मणे द्रव्य ज्याचें त्या दिधलें ॥ ऋण तें ठेविलें नाहीं कांहीं ॥ ४ ॥ राजाई ते होन सांभाळाया गेली ॥ हाता राख आली कोळशाची ॥ ५ ॥ कोळसे देखोनी खोंचली ते मनीं ॥ धन्य तुझी करणी पांडुरंगा ॥ ६ ॥ नामदेवापुढें सांगे वर्तमान ॥ चोरोनिया होन म्यां ठेविले होते ॥ ७ ॥ पाहतां त्या होनांचें जाहले कोळसे ॥ नामा पाहतसे जाहलें सोनें ॥ ८ ॥ वाटिलें ब्राह्मणां तेही होन त्यानें ॥ फेडियलें ऋण गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

॥ २५९७ ॥ राजाईचा संशय फेडिला मनीचा ॥ कळला पूर्ण सांचा पांडुरंग ॥ १ ॥ भावें ते राजाई ह्मणे नामदेवा ॥ सज्जन हा ठावा पांडुरंग ॥ २ ॥ विठ्ठलावांचुनी आणिक नाहीं थोर ॥ धरिला निर्धार राजाईनें ॥ ३ ॥ विकल्प सांडुनी मन केलें शुद्ध ॥ धरिला गोविंद मनामाजी ॥ ४ ॥ नामा ते राजाई जाहाला एकभाव ॥ लावियेला जीव विठ्ठलपायीं ॥ ५ ॥ नारा विठा गोंदा माहादा आउबाई ॥ त्यांणीं धरिला पायीं पांडुरंग ॥ ६ ॥ नामयाची दासी नागी दुसरी जनी ॥ त्यांनीं सेवा करुनी केला देव ॥ ७ ॥ एकभाव पहा लाविला विठ्ठला ॥ त्यांनीं जवळ केला पांडुरंग ॥ ८ ॥ विठ्ठलावाचोनी दुजे नाहीं मनीं ॥ गेलें लोटांगणी देवराया ॥ ९ ॥ ऐसा त्याचा भाव कळला देवासी ॥ सकळ वैकुंठासी पाठविलें ॥ १० ॥ अंतकाळीं नामा धरिला हृदयीं ॥ ठेवियेला पायीं गोंदा ह्मणे ॥ ११ ॥

॥ २५९८ ॥ ऐसा नामा भक्त पूर्ण केली सेवा ॥ उद्धरिलें जीवा संगतीच्या ॥ १ ॥ आवडला नामा देवा विठ्ठलासी ॥ ठेवी चरणापासी अखंडीत ॥ २ ॥ नामयाची कुडी घातली पायरी ॥ येतां जातां हरि पाय देती ॥ ३ ॥ आणिकहि पाय देती साधुसंत ॥ ऐसा पूर्ण भक्त उद्धरिला ॥ ४ ॥ न सोडी विठ्ठल नामयासी घडी ॥ बहु त्याची गोडी विठ्ठलासी ॥ ५ ॥ गोडी हे ह्मणोनी ठेविला चरणीं ॥ आहे तो भजनीं नामदेव ॥ ६ ॥ ऐसा पांडुरंग भक्ताची माउली ॥ करितो साउली मायबाप ॥ ७ ॥ नरदेहा आलिया भजावा हा देव ॥ मनीं दुजाभाव धरूं नये ॥ ८ ॥ भजावें भजन नामयाचे परी ॥ होय साहाकारी गोंदा ह्मणे ॥ ९ ॥

---

# विठ्याचे अभंग.

---

॥ २५९९ ॥ उदर भरावया घेऊनिया सोंग ॥ घरोघरीं बोंब उपदेशाची ॥ १ ॥ आपणा कळेना लोकां सांगे ज्ञान ॥ धरूनियां ध्यान बक जैसा ॥ २ ॥ आपण बुडाले आणिका बुडविती ॥ हात धरुनी जाती यमलोका ॥ ३ ॥ दुरी पंथ जाणे तया यमपुरी ॥ पापाची शिदोरी बांधोनिया ॥ ४ ॥ विठा ह्मणे काय करूं त्याच्या कपाळा ॥ पापाचा कंटाळा न धरिती ॥ ५ ॥

॥ २६०० ॥ देहसमयांति इष्टमित्र मिळती ॥ सांभाळा ह्मणती मुलें माझीं ॥ १ ॥ स्त्री धनधान्याते निरवोनी जात ॥ आपुलें स्वहित विचारिना ॥ २ ॥ गाई घोडें ह्मैसी सेवक आणि दासी ॥ सांडोनिया जासी एकलाची ॥ ३ ॥ मी कोण काय कशाला आलों येथें ॥ हित कीं अनहित करुनी जातों ॥ ४ ॥ हें तंव सूचना नाठवे ज्यांचे मना ॥ जुंपिला तो घाणा चौऱ्यासीच्या ॥ ५ ॥ विठा ह्मणे तया कोण सोडविता ॥ वेगी पंढरिनाथा शरण जावें ॥ ६ ॥

॥ २६०१ ॥ कामधेनु गाई घालुनी बाहेरी ॥ ताक घरोघरीं मागतसे ॥ १ ॥ कल्पतरू वृक्ष असे ज्याचे घरीं ॥ तो कां दारोदारीं भीक-मागे ॥ २ ॥ ऋद्धि आणि सिद्धि विठोबाच्या दासी ॥ तया हृषीकेशी

शरण जावें ॥ ३ ॥ इंद्र आणि चंद्र विठोबाचे किंकर ॥ देव सुरवर ध्याती ज्यातें ॥ ४ ॥ राव आणि रंक विठोबाचें मागते ॥ ते कायरे तूंतें देती बापा ॥ ५ ॥ ऐसा कोण आहे सर्व पुरविता ॥ एका भगवंता वाचोनिया ॥ ६ ॥ मुखीं नाम असें पुण्य ज्या पदरीं ॥ कळी काळावरी सत्ता त्याची ॥ ७ ॥ विठा ह्मणे शरण जाय हृषीकेशी ॥ मग निज-सुखासी पावसील ॥ ८ ॥

॥ २६०२ ॥ जावोनी वेव्हार सांगेन पंढरी ॥ जेथें पुंडलिकद्वारीं उभा केला ॥ १ ॥ देवोनी जाय कां घेवोनी जाय ॥ आतां न सोडी पाय केशवाचे ॥ २ ॥ एक अंगेसी एक जांगेसी ॥ तरी जीवें हृषीकेशी न सोडी तुज ॥ ३ ॥ वेव्हारा सान्निधी पुंडलिक लोभा ॥ विठा ह्मणे उभा तेणें केला ॥ ४ ॥

॥ २६०३ ॥ उभया धरणें आपण बैसला ॥ ह्मणोनी भला भला वेव्हारू हा ॥ १ ॥ आमच्या वेव्हारीं साक्ष हा एकू ॥ पुंडलिकें लोकू उद्धरिला ॥ २ ॥ नाहीं तरी वेव्हारू अवघाची खोटा ॥ पुंडलिकाचे चोहटा उभा असे ॥ ३ ॥ ऐसें सात पांच वेव्हारी बुडविले येणें ॥ विठा ह्मणे धरणें जीवीं पाय तुझे ॥ ४ ॥

॥ २६०४ ॥ अनंत अपरंपार नाम हें सधर ॥ नामसुख सागर अमृत लहरी ॥ १ ॥ नाम हेंचि तारूं नाम हेंचि तारक ॥ भवमूळ छेदक नाम तुझें ॥ २ ॥ नाम हें जीवन नाम हें निधान ॥ नाम हें कारण आनंदाचें ॥ ३ ॥ नाम हें सांठा तोची वैकुंठीचा मोठा ॥ सांगतसे विठा नामयाचा ॥ ४ ॥

॥ २६०५ ॥ साधूच्या दर्शना लाजसी गव्हारा ॥ दासीच्या घरा पुष्पें नेसी ॥ १ ॥ वेश्यादासी मुरली जनाची ओंवळी ॥ ते तुज सोंवळी वाटे कैसी ॥ २ ॥ तिची गुडगुडी उच्छिष्ट अमंगळ ॥ ते तूं धरिसी तोंडीं सर्वकाळ ॥ ३ ॥ कुलस्त्रीसी चिंध्या दासीस लुगडीं ॥ लेंकरें उघडीं दैन्यवाणी ॥ ४ ॥ या कर्मास्तव झालासी पोरटा ॥ नामयाचा विठा सांगतसे ॥ ५ ॥

॥ २६०६ ॥ त्रैलोक्या माझारीं एक विठाबाई सुंदरी हो ॥ पुंडलिका कारणें तिष्ठत भीमातीरीं हो ॥ १ ॥ उदो बोला उदो बोला विठाबाई

माउलीचा हो ॥ मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवना माझारी हो ॥ २ ॥ चौक साधियला नामीं ॥ कळस ठेविला वरी हो ॥ ३ ॥ गोंधळ्या माझारीं एक पुंडलिक नेटका हो ॥ घातला गोंधळ विठाई दाविली तिहीं लोका हो ॥ ४ ॥ गोंधळ घालीत गेली कैसी रावणाच्या घरा हो ॥ शरणागत रक्षिलें वधियलें दशाशिरा हो ॥ ५ ॥ आषाढी कार्तिकी तुझा गोंधळ वाळवंटीं हो ॥ येती सनकादिक गरुड टके यांची दाटी हो ॥ ६ ॥ करुनी गोपाळकाला गोंधळ घाली वेणूनादीं हो ॥ गोपिकांसहित सर्वें गोपाळांची मांदी हो ॥ ७ ॥ नामयाचा विठा कैसा गोंधळी नेटका हो ॥ वडिलांची विठाई कुलस्वामिनी अंबिका हो ॥ ८ ॥

॥ २६०७ ॥ देवा आमुचें ठेवणें जुगादीचें नाणें ॥ जातां नामयानें सांगितलें ॥ १ ॥ इतके दिवस पाहिली तुझी वास ॥ परि तूं उदास न बोलसी ॥ २ ॥ तुजवांचोनी आह्मां कोण आहे पोसिता ॥ देईबा कृपावंता नामप्रेम ॥ ३ ॥ आह्मी तुह्मी सेवक रंकाहुनी रंकें ॥ कठीण बोलणें निकें वदे तुज ॥ ४ ॥ ह्मणोनी वेळोवेळां लागो तुझ्या पायीं ॥ लटकीच गोवाई करूं नको ॥ ५ ॥ तुज आणि आह्मासी वेगळीक नाहीं ॥ तरी तूं न धरी कांहीं दुजाभावो ॥ ६ ॥ आपुलें ह्मणवावें अंधारीं ओळखावें ॥ नामप्रेम द्यावें ह्मणे विठा ॥ ७ ॥

॥ २६०८ ॥ मी तुझा अंकिला अगा पंढरिनाथा ॥ ब्रीद आपुलें आतां साच करी ॥ १ ॥ पतितपावन ऐसें बोलती पुराणें ॥ तारियले हीन अनंत याती ॥ २ ॥ ह्मणोनी ब्रीदाचा तोडर तुझ्या पायीं ॥ गर्जताती घाई वेदश्रुती ॥ ३ ॥ विठा ह्मणे मज देई चरणसेवा ॥ आणिक केशवा न मागें कांहीं ॥ ४ ॥

॥ २६०९ ॥ विठा नामयाचा आला पंढरपुरा ॥ भेटला सोयरा विटेवरी ॥ १ ॥ सुखदुःख अवघें सांगितलें श्रीहरी ॥ धरणें तुझे द्वारीं घेईन देवा ॥ २ ॥ नामयासारिखा आणिक कोणी आहे ॥ सृष्टिमाजी पाहे विचारुनी ॥ ३ ॥ नामा माझा सखा जिवाचा तो जीव ॥ साचा आहे भाव माझे ठायीं ॥ ४ ॥ मज वांचुनी नामा दुजें नेणें कांहीं ॥ मी साचे हृदयीं सदां असे ॥ ५ ॥ नामयानें नाम जोडिलें निधान ॥ ठेविलें सर्व धन तुझ्या पायीं ॥ ६ ॥ समर्थासी कांहीं बोलूं नये आतां ॥ ठेवणें

कृपानाथा देई वेगीं ॥ ७ ॥ चहूं युगीं नामा सांगातेंचि आहे ॥ वेगळा कांहीं नोहे क्षणभरी ॥ ८ ॥ माझिया बापाची तुजजवळ ठेवी ॥ विठा ह्मणे द्यावी केशीराजा ॥ ९ ॥

॥ २६१० ॥ सुखाचा निज ठेवा तुमचा केशवा ॥ भाग्यें नामदेवा जोडलासी ॥ १ ॥ तेणें तुझी सेवा केली मनोभावें ॥ ह्मणोनियां देवें घेतली धाव ॥ २ ॥ उदंड हें निधन निक्षेपें ठेविलें ॥ थोडें बहुत दिधलें भाग्यवंता ॥ ३ ॥ अभिलाषी वस्तु तुझे पायीं ठेविली ॥ ते आह्मा उगवली ह्मणे विठा ॥ ४ ॥

॥ २६११ ॥ पितृभजन जरी पुंडलिक न करिता ॥ तरी कां हा झोंड येता पंढरीसी ॥ १ ॥ वेव्हार करितां आह्मासी जिंकिलें ॥ जन्ममरण केलें देशधडी ॥ २ ॥ विठा ह्मणे यानें बुडविले अपार ॥ पुढती हा चोर कबुल नाहीं ॥ ३ ॥

॥ २६१२ ॥ नलगे आयुष्य भविष्य संपत्ती ॥ नाम लक्ष्मीपति द्यावें मज ॥ १ ॥ तेणें तिहीं लोकीं होईन सरता ॥ आणिक कृपावंता न मागें कांहीं ॥ २ ॥ नामयाचें प्रेम मज देई देवा ॥ न घालावें खेवा संसारासीं ॥ ३ ॥ वडिलाचें ठेवणें तुवां अभिलाषिलें ॥ तें देई वहिलें पांडुरंगा ॥ ४ ॥ संसारतारका भक्तजन पाळका ॥ यादवकुलटिळका केशवराया ॥ ५ ॥ भवमूल छेदका गोपीमनरंजका ॥ होसी बंधुसखा यादवकुळां ॥ ६ ॥ विठ्याचा तूं स्वामि भक्तिप्रेम सुख ॥ यदुवंशटिळक यादवराया ॥ ७ ॥

॥ २६१३ ॥ तुजवीण जिवलग सोईरे ॥ मज तों नाहींवा दुसरे ॥ १ ॥ विठो धांवे दडवा दडवी ॥ भक्त आपुला सोडवी ॥ २ ॥ बहुत गांजिलों संसारीं ॥ जोजावलों मदमत्सरीं ॥ ३ ॥ विषयसर्पें डंखियला ॥ लोभदंभें भक्षियला ॥ ४ ॥ कामक्रोधाचीये धाडी ॥ पडिलोंसे बांदवडी ॥ ५ ॥ विठा ह्मणे राखे लाज ॥ होसी आमुचा पूर्वज ॥ ६ ॥

॥ २६१४ ॥ बोलूंरे वेदांतीं बोलूंरे सिद्धांतीं ॥ बोलूं नेती नेती अनिर्वाच्य ॥ १ ॥ बोल बोल बोल रे तूं मना ॥ बोल नारायणा समर्पिला ॥ २ ॥ माझा बाप बोल बोलुनीयां गेला ॥ केशव बांधिला बोल

बोलें ॥ ३ ॥ नामयाचा विठा बोल नाहीं विसरला ॥ केशव उभा केला भक्तिसुखें ॥ ४ ॥

॥ २६१५ ॥ साधुसंतजना करितों प्रार्थना ॥ भेटवा देवराणा द्वारकेचा ॥ १ ॥ तनमन प्राण वेधले साचे पायीं ॥ येउनी माझ्या राही हृदयकमळीं ॥ २ ॥ गोपाळाचे मेळीं खेळे वनमाळी ॥ यमुने पाबळीं वेणुवाहे ॥ ३ ॥ शंख चक्र करीं मोरपिच्छ शिरीं ॥ कानीं मकराकारी मुक्ताफळें ॥ ४ ॥ गळां वनमाळा कासे सोनसळा ॥ देखुनी व्रजबाळा तन्मय झाल्या ॥ ५ ॥ नंदाचे नंदनें मोहियेलें मन ॥ लागलेसें ध्यान गोविंदाचें ॥ ६ ॥ विठा नामयाचा चरणींचा रज ॥ भेटवा यादवराज द्वारकेचा ॥ ७ ॥

॥ २६१६ ॥ बोल तो मधुरू बोले तो उदारू ॥ बोल राज्यधरू धीर धर्म ॥ १ ॥ बोल तो नकळे बोल तो नकळे ॥ बोल तो नकळे जाणतेया ॥ २ ॥ बोलाच्या आधारें बोलाच्या विचारें ॥ बोले सर्व सार जिणोनियां ॥ ३ ॥ बोले जें अव्यक्त स्वरूप विचारू ॥ ब्रह्म बोल सारु विठा ह्मणे ॥ ४ ॥

॥ २६१७ ॥ तूंचि येसी तूंचि जासी ॥ तूंचि भोगिसी गर्भवास ॥ १ ॥ नेणों आह्मी आणिक बापा ॥ तुह्मी याची कृपा चिरंजीव ॥ २ ॥ पापपुण्य दोन्ही तूंचि भोगिसी ॥ आमुचा नेदिसी भक्तिवांटा ॥ ३ ॥ नामयाचा विठा ह्मणे केशवराजा ॥ मी दाईज तुझा वांटेकरी ॥ ४ ॥

॥ २६१८ ॥ पायीं घातला तोडरू ॥ देखुनी पळाला संसारू ॥ १ ॥ आले हरिदास नेटके ॥ भेणें पळालीं पातकें ॥ २ ॥ गळां घालुनी तुळसी माळ ॥ वीर करिताती कल्होळ ॥ ३ ॥ हांकारिती सहस्र नामें ॥ रंगीं नाचताती प्रेमें ॥ ४ ॥ पताका झळकती अंबरीं ॥ वैष्णव नाचती गजरीं ॥ ५ ॥ विठा केशवाचा नटू ॥ बोले कळिकाळासी धटू ॥ ६ ॥

॥ २६१९ ॥ पूर्वजन्मीं आराधितां ॥ तुझें वर्म आलें आमुच्या हातां ॥ नामदेवें सांगितलें जातां ॥ तें सर्वथा देइजे ॥ १ ॥ आमुचे वडिलीं गा जोडिलें ॥ तें तुझे पायीं गा ठेविलें ॥ गौप्य करितां नोव्हे गा भलें ॥ दे उगलें गा दातारा ॥ २ ॥ आमुचें आह्मासी गा देतां ॥ कां बा नये तुझ्या चित्ता ॥ गाऱ्हाणें देईन संता ॥ चौघा देखतां घेईन ॥ ३ ॥ तुझा दारवंटा राखेन हरी ॥ तुज रीघों नेदीं बाहेरी ॥ जरी मोकळिसी अधांतरीं ॥ तरी

हे लाज कवणातें ॥ ४ ॥ आणिक कांहीं न मागें तूंतें ॥ सेवावृत्ति द्यावी मातें ॥ मज निरवावें संतातें ॥ आपुला दास ह्मणोनी ॥ ५ ॥ नामयाचा विठा ह्मणे ॥ यांत कांहीं करिसी उणें ॥ तरी आमुच्या वडिलाचें निरूपणें ॥ बांधलासी गा विठ्ठला ॥ ६ ॥

॥ २६२० ॥ देतां घेतां तूं तिहीं लोकीं उदार ॥ माझा कां अव्हेर केला बापा ॥ १ ॥ ऐसें जाणोनियां पाहतोसी काई ॥ तुझी सेवा देई श्रीविठ्ठला ॥ २ ॥ नामयाचा विठा ह्मणे नको हा संसार ॥ पायीं अभय थार देई मज ॥ ३ ॥

॥ २६२१ ॥ हरि ह्मणा हरि ह्मणा अहो जन ॥ आणिक बोलाल तरी विठ्ठलाची आण ॥ १ ॥ अहिल्या पाषाण अजामेळ कुळहीन ॥ उद्धरिला दर्शनें वाल्मिक जाण ॥ २ ॥ नामयाचा विठा संतचरणीं ठेवोनी माथा ॥ कीर्तनेंवीण वृथा नको गोष्टी ॥ ३ ॥

॥ २६२२ ॥ हरिकथा ऐकतां संसार आठविती ॥ तयाच्या सुकृति अवघा नाश ॥ १ ॥ निश्चित होऊनि ऐकतां श्रवणीं ॥ यमाची करणी नलगे कांहीं ॥ २ ॥ आतां रामकृष्ण ह्मणे कां रे वाचा ॥ कळिकाळ मोचा वाहतील ॥ ३ ॥ विठा ह्मणे संतीं अवधान द्यावें ॥ हृदयीं धरावें केशवनाम ॥ ४ ॥

॥ २६२३ ॥ एक होतें तें द्वैत पैं झालें ॥ एक पाहतां द्वैत कैचें उरलें ॥ १ ॥ द्वैताचा भास मृगजळीं दिसे ॥ पाहूं गेलें तेथें भास भासे ॥ २ ॥ चहूंचें बोलणें सहाचें नेणिव ॥ अठराची जाणीव कैची तेथें ॥ ३ ॥ नागरीचा भाव विठोबाचा दिसे ॥ परत्रींचें पिसें लागुनी ठेलें ॥ ४ ॥ नामयाचा विठा नामीं विनटला ॥ सर्वस्व हरपला देहभाव ॥ ५ ॥

॥ २६२४ ॥ वैकुंठनायका आनंदपद दायका ॥ यादवकुळटिळका केशीराजा ॥ १ ॥ संसारतारका भक्तजनपाळका ॥ यादवकुळटिळका केशीराजा ॥ २ ॥ भवमुक्तिदायका गोपीमनरंजका ॥ यादवकुळटिळका केशीराजा ॥ ३ ॥ विठ्याचा स्वामि भक्त प्रेमसुखा ॥ यादवकुळटिळका केशीराजा ॥ ४ ॥

॥ २६२५ ॥ कीर्तनाची ध्वनि पडली माझ्या कानीं ॥ जाईन लोटांगणीं तेथवरी ॥ १ ॥ माझें सुख तें पहा वैष्णव जन ॥ तयांचीं

दर्शनें कैं होतील ॥ २ ॥ उभ्या गाती आणि कीर्तन ऐकती ॥ हृदयीं आळविती केशीराज ॥ ३ ॥ ऐसीयाचे संगतीं होता बाप माझा ॥ ह्मणतसे राजा विठा नामयाचा ॥ ४ ॥

॥ २६२६ ॥ विश्वंभरा तुझें नाम गा दुर्लभ ॥ परि केलें सुलभ नामदेवें ॥ १ ॥ नामाची सांगडी लावूनिया कांसे ॥ नामदेवें कैसें उतरिलें ॥ २ ॥ नाम मज देई आणिक न मागें कांहीं ॥ प्रेम तुझे पायीं असों द्यावें ॥ ३ ॥ पतितपावन देवकी नंदना ॥ हरि नारायणा पद्मनाभा ॥ ४ ॥ मुखीं तुझें नाम आवडी प्रेमाची ॥ मग वैकुंठीची चाड नाहीं ॥ ५ ॥ सुखाच्या सागरा केशवा उदारा ॥ तो आह्मा सोयरा जिव्रलगू ॥ ६ ॥ द्यावा प्रेमसंरसू नामामृतरसू ॥ विठा विष्णुदासू विनवीतसे ॥ ७ ॥

॥ २६२७ ॥ कृष्ण गौळियाचें लोणी चोरी ॥ तंव अवचिता शेंडीं सांपडली हरी ॥ घेवोनी आलिया बाहेरी ॥ तंव यशोदे वोसंगा ॥ १ ॥ चाकटलिया गौळणी ॥ देवो विसरल्या गाऱ्हाणीं ॥ लाजें मौन्य धरोनी ॥ अवलोकिती गोविंदा ॥ २ ॥ आह्मा अवघिया पासी असे ॥ पैल यशोदा वोसंगा दिसे ॥ हें स्वप्न कीं साच असे ॥ ह्मणती माणसें वेडावलीं ॥ ३ ॥ ऐशा अनेक परिच्या वेदश्रुती ॥ वाचे वर्णावया न येती ॥ विठा विनवी विष्णुदासाप्रती ॥ ऐसा यशोदेचा कान्हया ॥ ४ ॥

॥ २६२८ ॥ अर्थ मोक्ष काम ॥ उच्चारितां विठ्ठलनाम ॥ १ ॥ जें जें आवडे मनासी ॥ त्यानें यावें पंढरीसी ॥ २ ॥ चला आनंदें कौतुकें ॥ पेंठ केली पुंडलिकें ॥ ३ ॥ नचले कोणाची हे थोरी ॥ राया रंका केली सरी ॥ ४ ॥ सांडोनिया अहंभावा ॥ हाकारावया वैष्णवा ॥ ५ ॥ विठा विष्णुदास ह्मणे ॥ नामा नेघे त्यास उणें ॥ ६ ॥

॥ २६२९ ॥ ज्यासी नावडे पंढरी ॥ तोचि वसेल अघोरीं ॥ १ ॥ त्यासी जांची यमदूत ॥ सकळ पूर्वजांसहित ॥ २ ॥ जया नावडे हरिनाम ॥ तया कुंभपाकीं धाम ॥ ३ ॥ जया नावडती संत ॥ ते चालती यमपंथ ॥ ४ ॥ जया नावडे भीमरथी ॥ तेचि अघोरीं पचती ॥ ५ ॥ या बोलाचा धरी विश्वास ॥ विठा ह्मणे विष्णुदास ॥ ६ ॥

॥ २६३० ॥ बहुतां पुण्याचे कष्ट ॥ त्यासी प्राप्त हें वैकुंठ ॥ १ ॥ तैसी नोहे ही पंढरी ॥ पतित पापियातें तारी ॥ २ ॥ बहुता तपाचें

प्रत्यक्ष ॥ त्यासी अपकारी मोक्ष ॥ ३ ॥ जेणें केलीं तप तीर्थं ॥ तोचि आवडे मुक्तीतें ॥ ४ ॥ देह यासी नानाविधि ॥ त्यासी प्राप्त होय सिद्धी ॥ ५ ॥ विठा ह्मणे नामघोष ॥ पळ काढील महा दोष ॥ ६ ॥

॥ २६३१ ॥ देखुनी पंढरीच्या सुखा ॥ मोक्षपद आलें फुका ॥ १ ॥ अवघें विठ्ठलची झालें ॥ येणें पुंडलिकें केलें ॥ २ ॥ ऋद्धि सिद्धि पंढरपुरीं ॥ होवोनी वोळती कामारी ॥ ३ ॥ मुक्ति वागती अंगणीं ॥ घरोघरीं वाहे पाणी ॥ ४ ॥ तीर्थ चिंतवणी करिती ॥ पुढें आमुची कोण गती ॥ ५ ॥ आला कळिकाळा त्रासू ॥ विठा ह्मणे विष्णुदासू ॥ ६ ॥

॥ २६३२ ॥ मग साधुसंत ह्मणती विठ्या जाय ॥ मग तूं याचे पाय सोडूं नको ॥ १ ॥ अठ्ठाविस युगें एकाचें धरणें ॥ तेथें हें मागणें दुसरें कोठें ॥ २ ॥ एकाची मागणी मागें पैं होईल ॥ मग तुजसी येईल बोलतां दुःख ॥ ३ ॥ ह्मणोनी पंढरिनाथु खूणची दावी तूं ॥ नामयाचा विठा पुसतू वेव्हारी धीट ॥ ४ ॥

॥ २६३३ ॥ चराचरीं जाणा एक खेचरू ॥ त्याचीं पाउलें साचारू धरिलीं आह्मी ॥ १ ॥ आतां पाउलें न सोडूं ॥ पाउलें न सोडूं वेव्हारू विठा ॥ २ ॥ या पाउलाकारणें व्यवहारु झाला ॥ खेचर वदला विठ्ठल साक्ष ॥ ३ ॥ तेंचि पाउलें साधुसंत आह्मा ॥ विठा ह्मणे परब्रह्मा पावन केलें ॥ ४ ॥

॥ २६३४ ॥ केशवाचे पाय जाणें मी आणि कांहीं नेणें ॥ ह्मणोनी जीवें प्राणें अनुसरलों ॥ १ ॥ पायते अतू पायते अतू ॥ पायते अतू खेंचराचे ॥ २ ॥ पायांपरतें सुख आणिक नाहीं ॥ विटेवरी पाय ध्येई मज ॥ ३ ॥ ह्मणोनी पुढतां पुढतीं विठा लागे पायीं ॥ ह्मणे खेंचर आई विनंति ऐका ॥ ४ ॥

॥ २६३५ ॥ तीर्थ तपें व्रतें देवातें जोडिलें ॥ तें नामदेवासी दिधलें प्रेमसुख ॥ १ ॥ ऐक्यसुख परब्रह्म साधिलें ॥ यश जें जोडिलें त्रिभुवनीचें ॥ २ ॥ धन्य तुझें नाम धन्य तुझें नाम ॥ धन्य देवा प्रेम तुझे पायीं ॥ ३ ॥ नामा गोतामाजी पायाळु जन्मला ॥ देव भावें आला भूमंडळीं ॥ ४ ॥ स्वर्गींचें ठेवणें उमगिलें तेणें ॥ केशवनाम नाणें अगणित ॥ ५ ॥ नेत्रीं लेईला भक्तीचें अंजन ॥ उमगिलें निधान नाम-

नाणें ॥ ६ ॥ विठा ह्मणे देवा तें प्रेम तुझे पायीं ॥ न मागतां देई केशी-राजा ॥ ७ ॥

॥ २६३६ ॥ माळा मुद्रा सोंग घेउनी होती संत ॥ सदां विषयांत चित्त त्यांचें ॥ १ ॥ पोटासाठीं एक घेऊनिया वेष ॥ ठकविती देश रांडा-पोरें ॥ २ ॥ पाषाण बांधोनी नदीये निघाला ॥ सांगा कोण गेला पैलतीरा ॥ ३ ॥ ब्राह्मणाचे परी मैंद वेष धरी ॥ घालावया करीं फांसे जैसें ॥ ४ ॥ विठा ह्मणे संत न ह्मणा त्यासी ॥ जाती नरकासी अधःपाता ॥ ५ ॥

॥ २६३७ ॥ जाति ज्ञान नाहीं मति ज्ञान फार ॥ फुंजे दंभाकार लौकिकांत ॥ १ ॥ तेथें माझ्या मना नव्हे समाधान ॥ न पाविजे खूण संतावीण ॥ २ ॥ संत तेचि जाणा शांत ज्याचें मन ॥ अणूचें प्रमाण दुजें नाहीं ॥ ३ ॥ विठा ह्मणे तेथें स्थिरावलें मन ॥ झालें समाधान त्याचें संगें ॥ ४ ॥

---

## विसोबा खेचर आणि विठा यांचा संवाद.

॥ २६३८ ॥ तंव धाउनी गेला चरणीं लागला ॥ देवा तूं दाखविला ठेवा माझ्या मायबापाचा ॥ १ ॥ जाऊन तो धरीन न सोडी मी आतां ॥ जे मज पंढरिनाथा ग्वाही दिधली ॥ २ ॥ तंव खेचरु तेथें स्नानसंध्या करी ॥ तंव ओढोनी पाय धरी विठा नामयाचा ॥ ३ ॥ तंव तो अव-चिता खडबडोनी भ्याला ॥ कोठोनी घाला पडिला धाडी मजवरी ॥ ४ ॥ उठी परता तूं कोणाचारे काय ॥ ठाई ठाई राहे हालूं नको ॥ ५ ॥ तुझिया वडिलासी जाब देईन ॥ धरोनी नेईन हें पोर कोणाचें ॥ ६ ॥ लाडिकें लडिवाळ आपुलें बा धांवें पायीं ॥ तुज कोणी नाहीं मग तूं निलाजिरे ॥ ७ ॥ छंद ना बंद झोंबतोसी धीटा ॥ बांधेन चोहटा चौघा-चारी ॥ ८ ॥ फजीत करतील तुजकी मज जाण ॥ खेचर विसोबा ह्मणती जा तुज विठोबाची आण ॥ ९ ॥

॥ २६३९ ॥ माझे बापाचे निधनें बडिवार बोलसी ॥ ते तूं घेवोनी आलासी उजागरपणें ॥ १ ॥ उगलाची देई लावूं नको दावा ॥ केशवासी ठावा आहे तुझा जीवभाव ॥ २ ॥ सरता पुरता आमुचेनी झालासी ॥ ते तूं आणिका सांगसी कोण्या तोंडें ॥ ३ ॥ सांगतां बहुत होईल पैं व्याजें ॥

मग सोई मज तुज लाविती कां ॥ ४ ॥ ते ह्मणती ऋणवोडा हा ठायींचा ॥ अहो यासी बोला वाचा बुद्धिवंती ॥ ५ ॥ तूं नामयाच्या विठ्या धीर आणि चतुर ॥ तुजसी खेचर काय बोलिला ॥ ६ ॥

॥ २६४० ॥ तंव खेचरु ऐसी शिकवण बोली ॥ कैसी खूण लाधली सांग विठ्या ॥ १ ॥ जयाचा तुज जाहला बहुत ॥ तो झाला शरणागत विठोबासी ॥ २ ॥ वेद पुराणें शास्त्रें ते साक्ष देती ॥ जें खेचर ह्मणती ब्रह्मबीज ॥ ३ ॥ भारत आणि भागवत जया मुखें पाठ ॥ संध्यागायत्री निष्ठा त्रिकाळ जप ॥ ४ ॥ जें केशवासी नकळे अखंड दंडे ॥ ऐशीं बोलणीं उदंडे बोलोनी जाती ॥ ५ ॥ जाती आणि गोत वडील लहान थोर ॥ अवघें पंढरपुर साक्ष देती ॥ ६ ॥ साधुसंतजन आणि महानुभाव ॥ हरीचे दास सर्व सांगताती ॥ ७ ॥ जें खेचर विसोबा ज्ञानघन लाधला ॥ ठेवा तो दिधला नामयासी ॥ ८ ॥

॥ २६४१ ॥ जावोनी वेव्हार सांगेन पंढरीं ॥ जेथें पुंडलिक द्वारीं उभा केला ॥ १ ॥ देवोनी जाय कां घेवोनी जाय ॥ आतां न सोडी पाय केशवाचे ॥ २ ॥ एक अंगेसी एक जांगेसी ॥ तरी जीवें हृषीकेशी न सोडी तुज ॥ ३ ॥ वेव्हारा सान्निधी पुंडलिका लोभा ॥ विठा ह्मणे उभा तेणें केला ॥ ४ ॥

॥ २६४२ ॥ उभया धरणें आपण बैसला ॥ ह्मणोनी भला भला वेव्हारु हा ॥ १ ॥ आम्हुच्या वेव्हारीं साक्ष हा एकू ॥ पुंडलिकें लोकू उद्धरिला ॥ २ ॥ नाहीं तरी वेव्हारु अवघाची खोटा ॥ पुंडलिकाचे चोहटा उभा असे ॥ ३ ॥ ऐसे सात पांच वेव्हारी बुडविले येणें ॥ विठा ह्मणे धरणें जीवीं पाय तुझे ॥ ४ ॥

॥ २६४३ ॥ माय वेल्हाळी वेल्हाळी ॥ ब्रह्मरसा पान्हावली ॥ १ ॥ दोहणार चवघेजण ॥ धार सुटेना अझून ॥ २ ॥ साहा लागले कासेसी ॥ अठरा करिती निदिध्यासी ॥ ३ ॥ नकळे ब्रह्मादिका वाटा ॥ ह्मणे नामयाचा विठा ॥ ४ ॥

॥ २६४४ ॥ नाम तारी पतितासी ॥ ते कां आव्हेरी भक्तांसी ॥ १ ॥ प्रेमळ देवाचें लडिवाळ ॥ करी निजांगें प्रतिपाळ ॥ धृ० ॥ सेवाऋणें वागवी भार ॥ जन्मोजन्मींचा दातार ॥ २ ॥ स्वामि स्वयें अंगिकारी ॥

बोळगा कांहो दारोदारीं ॥ ३ ॥ निष्ठुर नव्हे कोणेकाळीं ॥ कृपाकटाक्षें कुरवाळी ॥ ४ ॥ दास विठा ह्मणे वेगें ॥ यात्रे जावें माझे संगें ॥ ५ ॥

॥ २६४५ ॥ द्रौपदीचें थालीपात्र ॥ त्यांत कैचें शाखापत्र ॥ १ ॥ माव याची अभिनव ॥ बाव मानसीं उपाव ॥ धृ० ॥ जंव लाधला तो आपण ॥ केलें तृप्त त्रिभुवन ॥ २ ॥ सेवा घेउनी सारी काम ॥ अंगें चैतन्य निष्काम ॥ ३ ॥ याच्या छळें आकर्षिला ॥ बळिचा द्वारपाळ झाला ॥ ४ ॥ भक्तियोगें द्वेषेंभयें ॥ वेध लाउनी सन्मुख होये ॥ ५ ॥ दोही बाही आपण देव ॥ काय नेणा पंढरिराव ॥ ६ ॥ दास विठा ह्मणे धंदा ॥ कृपा देवाची संपादा ॥ ७ ॥

॥ २६४६ ॥ भिऊनियां निघे समर्थाचे पाठीं ॥ वैरियाची भेटी न करी तया ॥ १ ॥ तैसा तुज आलों शरण केशवें ॥ मज त्वां राखावें चरणांजवळी ॥ धृ० ॥ न करा उदास न राखा अभिमान ॥ माझें अगमन विचारी कां ॥ २ ॥ तुझेनि जे होईल ते मी मागेन ॥ चरणसेवा करीन अहर्निशी ॥ ३ ॥ अविद्या अपार संचली हे देवा ॥ याचा मजकूर दावा नाहीं कोणी ॥ ४ ॥ देवा मज आतां नको गर्भवास ॥ विठा विष्णुदास विनवीतसे ॥ ५ ॥

॥ २६४७ ॥ दासी देवा अनुसरावें ॥ कां आणिका शरण जावें ॥ १ ॥ लाभालाभ जेथींचा तेथें ॥ श्रम अन्यथा तो व्यर्थ ॥ धृ० ॥ पुण्योदक भागीरथी ॥ नेदी चातकासी तृप्ती ॥ २ ॥ सेवितां स्तवितां चकोरा ॥ काय वर्षे अमृतधारा ॥ ३ ॥ कासवीवीण कोण बाळा ॥ पाळी निज दृष्टि स्नेहाळा ॥ ४ ॥ स्वामीचिया मनोभावा ॥ करणें ते परम सेवा ॥ ५ ॥ दास विठा ह्मणे मीन ॥ कैसा वाचे उदकेंविण ॥ ६ ॥

॥ २६४८ ॥ यात्रे बोलावितो हरी ॥ कांहो नवजा पंढरी ॥ १ ॥ विठोबा कृपेचा कोंवळा ॥ बहु भक्तांचा कळवळा ॥ धृ० ॥ भक्त आठवती चित्तीं ॥ देवा वाटे परमखंती ॥ २ ॥ देव अवज्ञा अनुचित ॥ पृथक सत्ता आत्मघात ॥ ३ ॥ ऋण वारी भगवंत ॥ दुबळा नव्हे लक्ष्मीकांत ॥ ४ ॥ दास विठा ह्मणे त्वरा ॥ यात्रा पंढरीची करा ॥ ५ ॥

॥ २६४९ ॥ घेतां देतां तूं तिही लोकीं उदार ॥ माझा कां अव्हेर केला बापा ॥ १ ॥ तुझी सेवा देई तुझी सेवा देई ॥ तुझी सेवा देई श्री-




विठ्ठला ॥ २ ॥ विठा ह्मणे केशवा नको हा संसार ॥ तुझे चरणीं अभ्यंतर ध्यान देई ॥ ३ ॥

॥ २६५० ॥ मरण हें पेरणें जन्म हें उगवणें ॥ हें मायेची खूण जाणीतली ॥ १ ॥ संग तुझा पुरे संग तुझा पुरे ॥ संग तुझा पुरे नारायणा ॥ धृ० ॥ तूं तरी न मरे मी तरी न मरे ॥ भक्ति हे संचरे हाचि लाभू ॥ २ ॥ विठा ह्मणे केशवा ठाईचा मी नेणें ॥ गर्भवास भोगणें तुझी लाज ॥ ३ ॥

॥ २६५१ ॥ आमुचा नामा तुज गेला निरवुणी ॥ मी तुजवांचोनी नेणें कवणा ॥ १ ॥ कायावाचामनें जोडिलें जें बापें ॥ तें दिधलें तुज पैं ठेवावया ॥ धृ० ॥ तें देगा आमुचें नको करूं विचारू ॥ नामा तुझा डिंगरू त्याचे आह्मीं ॥ २ ॥ जुनें नाणें आमुच्या वडिलाचें ठेवणें ॥ बहुता कष्टीं तेणें जोडियेलें ॥ ३ ॥ तें आह्मांलागोनी ठेविलें तुझ्या पायीं ॥ आमुचे आह्मां देई केशीराजा ॥ ४ ॥ तूं अनाथा कोंवसा दीनाचा कृपाळू ॥ तरी आमुचा सांभाळू करी कां वेगें ॥ ५ ॥ आमुचे संचितार्थ आह्मासी देउनी ॥ यश घे त्रिभुवनीं ह्मणे विठा ॥ ६ ॥

॥ २६५२ ॥ आमुचें ठेवणें जुगादीचें नाणें ॥ जातां नामयानें सांगितलें ॥ १ ॥ इतके दिवस पाहिली तुझी वाट ॥ परि तूं उदास न बोलसी ॥ धृ० ॥ तुजवांचोनी आह्मां कोण असे पोशिता ॥ देई कृपावंता नामप्रेम ॥ २ ॥ आह्मीं तुझी सेवकें रंकाहुनी रंक ॥ कठीण बोलणें निकें वदे तुज ॥ ३ ॥ ह्मणोनी वेळोवेळां लागे तुझ्या पायीं ॥ लटकीच गोवाई करूं नको ॥ ४ ॥ तुज आह्मांसी वेगळीक नाहीं ॥ तरी तूं न धरी कांहीं दुजाभाव ॥ ५ ॥ आपुले ह्मणावें अंधारीं ओळखावें ॥ नामप्रेम द्यावें ह्मणे विठा ॥ ६ ॥

॥ २६५३ ॥ हरिनामाचा ध्वनि ऐकोनी श्रवणीं ॥ जाईन लोटांगणीं तेथवरी ॥ १ ॥ माझे सखे अवघे वैष्णवजन ॥ त्यांचें मज दर्शन कैं होईल ॥ २ ॥ एक उभे गाती एक बैसुनी ऐकती ॥ हृदयीं आलिंगिती गोपिनाथू ॥ ३ ॥ ऐशियांचे संगतीं आहे बाप माझा ॥ विनवितो विठा सहजा नामयाचा ॥ ४ ॥

॥ २६५४ ॥ बरवें बरवें वाळवंट ॥ काय इच्छिसी वैकुंठ ॥ १ ॥ हें सुख तेथें नाहीं ॥ मुक्ति घेउनी करिसी काई ॥ २ ॥ ह्मणे नामयाचा विठा ॥ बापा नको जाऊं वैकुंठा ॥ ३ ॥

॥ २६५५ ॥ मांजराचे डोळे गेले ॥ उंदिर धराया तळमळे ॥ १ ॥ तैसा नव्हे रे सन्यास ॥ धांवे विषयावरी हव्यास ॥ २ ॥ वेश्या झाली पट्टराणी ॥ स्मरीना पूर्वील करणी ॥ ३ ॥ सर्प प्रतिवर्षीं पालटे ॥ परि अंहकार न पालटे ॥ ४ ॥ पहिलें पोशिलें मर्कटा ॥ कोणें शिकविल्या चेष्टा ॥ ५ ॥ ह्मणे नामयाचा विठा ॥ वज्र लागो या लल्लाटा ॥ ६ ॥

॥ २६५६ ॥ अनंत अपरंपार नाम हें सधर ॥ नाम सुखसागर अमृत लहरी ॥ १ ॥ नाम हेंचि तारूं नाम हेंचि तारक ॥ भवमूळ छेदक नाम तुझें ॥ २ ॥ नाम हेंचि जीवन नाम हें निधान ॥ नाम हें कारण आनंदाचें ॥ ३ ॥ नाम हें सांठा तोचि वैकुंठींचा मोठा ॥ ह्मणतसे विठा नामयाचा ॥ ४ ॥

॥ २६५७ ॥ जैसा आंबा वर्षत पाडी ॥ तैसी धरीं गोडी कीर्तनीं नाचे ॥ १ ॥ न करी घातमात न लावी वेळू ॥ तेणें हा गोपाळू अंतरला ॥ ध्रु० ॥ दुधावरील साय मधेसी गोडी ॥ तैसी धरी आवडी रामनामीं ॥ २ ॥ जतीचा साटा तो वैष्णव लाटा ॥ ह्मणतसे विठा नामयाचा ॥ ३ ॥

॥ २६५८ ॥ काय गाणीव काय जाणीव ॥ काय शहाणीव कीर्तनाची ॥ १ ॥ थाक तोडिलें डोळे मोडिलें ॥ लोकां मानवलें बरें गातो ॥ २ ॥ हरिचें नाम तूं नेणसी ॥ वाया कीर्तनीं उभा ठाकसी ॥ ३ ॥ हरीचें नाम तुह्मीं गारे प्रेमें ॥ विठा ह्मणे माझ्या बापाच्या नांवें ॥ ४ ॥

॥ २६५९ ॥ आमुचा बाप अग्रज तुझा ॥ तूं बा आह्मां होसी आजा ॥ १ ॥ कैसें आह्मा धरिलें दुरी ॥ सांग कृपाळुवा हरी ॥ २ ॥ तूं आमुचा मूळपुरुष ॥ आह्मी अवघे तुझे अंश ॥ ३ ॥ आह्मी तुझी तिसरी पिढी ॥ संत जाणताती प्रौढी ॥ ४ ॥ अरे कायशीं शतें लोटलीं ॥ कैशी लाघावळी तुटली ॥ ५ ॥ हांसोनी बोले केशीराज ॥ विठ्या अवघें घेई मज ॥ ६ ॥

॥ २६६० ॥ माझिया बापाचा तुजपाशीं ठेवा ॥ विठा ह्मणे द्यावा केशीराजा ॥ १ ॥ ठेविलें ठेवणें झडकरी देई ॥ वेव्हार कांहीं लावूं

नको ॥ २ ॥ आपुलें मागतां कोण आड येईल ॥ आतां जाणवेल तुझें माझें ॥ ३ ॥ विटेसहित चरणीं घालीन मिठी ॥ करीन सेवसाटी जन्मोजन्मीं ॥ ४ ॥ विठा ह्मणे मज खवळिसी वांया ॥ पिसाळलिया पायां झोंबेन तरी ॥ ५ ॥

॥ २६६१ ॥ मायबापें काय नसती आमुचीं ॥ लेंकरें आमचीं त्याचे हातीं ॥ १ ॥ माझें देई माझ्या हातीं लवलाही ॥ होई उतराई केशीराजा ॥ धृ० ॥ तुझ्या पायीं माझा बांधीन गळा ॥ न भिये कळिकाळा सत्य जाणा ॥ २ ॥ जितुकें देणें तितुकें घेईन मी आतां ॥ नामयानें जातां सांगितलें ॥ ३ ॥ रगव्या पाठोळ्यासी पडियेली मिठी ॥ आतां जगजेठी तुज मज ॥ ४ ॥ बोरी फाटे कांहो केळी आहो फाटे ॥ नामयाचे विठे खवळलें ॥ ५ ॥

॥ २६६२ ॥ खवळलें आतां न भियेरे तुज ॥ सांडियेली लाज लौकिकाची ॥ १ ॥ आह्मीं दीन सिंपे यातीचे हो हीन ॥ दे माझें ठेवणें केशीराजा ॥ २ ॥ साठी लक्ष चौऱ्याण्णव कोडी ॥ त्यांतून एक कवडी न सोडी मी ॥ ३ ॥ आणिक याहुनी असेल आगळें ॥ तें घेईन बळें न सोडी तुज ॥ ४ ॥ तुज थोरपण काई गा हें देवा ॥ आह्मां दुर्बळाचा ठेवा अभिलाषसी ॥ ५ ॥ पोरटीं ह्मणोनी अभिलाष करिसी ॥ ते कोठें निस्तरिसी ह्मणे विठा ॥ ६ ॥

॥ २६६३ ॥ तुज काय देवा न पुरतें आलें ॥ विश्वासें ठेविलें अभीलाषसी ॥ १ ॥ लाजीरवाणें नको करूं देवा आतां ॥ देइगा कृपावंता नामप्रेम ॥ धृ० ॥ शरणागता वज्रपंजर ह्मणवीसी ॥ तरी कां तूं न देसी आह्मा आमुचें ॥ २ ॥ माझ्या नामयानें जन्मोनी जोडिलें ॥ तें देगा वहिलें ह्मणे विठा ॥ ३ ॥

॥ २६६४ ॥ उदार चक्रवर्ती लक्ष्मीचा पती ॥ तरी कां काकुळती चित्तीं वाहासी ॥ १ ॥ आह्मां दुर्बळांचें ठेवणें कां ठेविलें ॥ दिवाळें निघालें काय तुझें ॥ ध्रु० ॥ ज्याचें घेसी त्याचें ऐसेंची करिसी ॥ तें न चले मजपाशीं केशीराजा ॥ २ ॥ चौघाचारीं तुज वेढीन मी आतां ॥ मग बैसेल माथां अपकीर्ती ॥ ३ ॥ अठराही बोलती साही सत्य वाचा ॥ उदार ठायींचा कां नहोसी ॥ ४ ॥ देणें घेणें तुज न सुटे सर्वथा ॥ विचारुनी आतां पाहे मनीं ॥ ५ ॥ नामयाचें ठेवणें तुजजवळी आहे ॥ न सोडी तुझे पाय ह्मणे विठा ॥ ६ ॥

॥ २६६५ ॥ माझिया बापाची मिराशी गा देवा ॥ तुझी चरण-सेवा पांडुरंगा ॥ १ ॥ उपास पारणें राखे दारवंटा ॥ केला भाग्य वांटा आह्मांलागी ॥ ध्रु० ॥ तुजपरतें दुजें नेणें आणिक कांहीं ॥ देखें सर्वाठायीं रूप तुझें ॥ २ ॥ तुझ्या सुखें धाला तुजमाजी निवाला ॥ आपुला विसरला देहभाव ॥ ३ ॥ आह्मांसी घातलें तुझीये आभारीं ॥ विठा ह्मणे अंगिकारी नारायणा ॥ ४ ॥

॥ २६६६ ॥ माझिया बापासी तुझाचि विश्वास ॥ ह्मणवी तुझा दास अंतरंग ॥ १ ॥ वृत्तिसहित मन ठेवुनी तुझ्यापायीं ॥ तुजपरतें कांहीं जाणेचिना ॥ ध्रृ० ॥ तों आह्मांलागी शब्दें न पुससी ॥ विसरोनी गेलासी दीनानाथा ॥ २ ॥ जागे ठाणांतरीं पंढरी चोहोटा ॥ राखे दारवंटा रात्रंदिवस ॥ ३ ॥ छत्रचवर धरूं हाडपी डोळे करूं ॥ जाणवी आवसरू सेवा विधी ॥ ४ ॥ शरीर प्राणाचा देऊनियां बळी ॥ धरिले हृदयकमळीं चरण तुझे ॥ ५ ॥ विठा ह्मणे तुज नाहीं आठवण ॥ सहज तूं निर्गुण पंढरिराया ॥ ६ ॥

॥ २६६७ ॥ भूतळीचीं तीर्थें नामा जंव करी ॥ गांजीयेले पोरी नामयाच्या ॥१॥ तुमचें ठेवणें खेचराचे पायीं ॥ आणिकाचे वाहीं पडों नका ॥ धृ० ॥ वाया मृगजळ दाविसील आह्मा ॥ सर्वथा पुरुषोत्तमा न सोडीं मी ॥ २ ॥ झोंडाचें ठेवणें ठेवावें कवणें ॥ झोंडापरिस होणें झोंड जेणें ॥ ३ ॥ नामयाचा विठा झोंड पैं झाला ॥ विठो उभा केला भक्तिसुखें ॥ ४ ॥

॥ २६६८ ॥ माझ्या ठेवी दाखवी लवलाही ॥ बांधीन मी पायीं जीव तुझ्या ॥ १ ॥ सिद्धच ठेवणें नामयानें ठेविलें ॥ त्यासी कां लाविलें आडवें हें ॥ धृ० ॥ दोहीं कटावरी ठेऊनियां हात ॥ कैसा हा पाहात घरघेणें ॥ २ ॥ तुझिया पायासी बांधीन मी गळा ॥ न भीये कळिकाळा सखजाण ॥ ३ ॥ दारकोंड करोनी बैसेन दारवंटा ॥ नामयाचा विठा हालों नेदी ॥ ४ ॥

॥ २६६९ ॥ आमुचा बाप आह्मां सांगे ॥ भाक दिधली पांडुरंगें ॥ १ ॥ तुह्मां न विसंबे सर्वथा ॥ तुमचा भार माझ्या माथां ॥ धृ० ॥ करीन तळहात साउली ॥ तुमची अवघी वंशावळी ॥ २ ॥ विठा ह्मणे विसरलासी ॥ आह्मां शब्दीं न पुससी ॥ ३ ॥

॥ २६७० ॥ पंढरिराया माझिया बापें ॥ प्रसन्न केलें तुजप्रतापें ॥ १ ॥ आह्मा दिलें तुझे हातीं ॥ पाळी ह्मणे प्रेमभक्ती ॥ धृ० ॥ तृप्त सहित माझिया मना ॥ क्षेम घालीन तुझिया चरणा ॥ २ ॥ तुझें गुणनाम कीर्तन ॥ हे मज देइगा जीवदान ॥ ३ ॥ देऊनिया प्रेमाचें भातुकें ॥ खेळविसी स्या कौतुकें ॥ ४ ॥ विठा ह्मणे नामयाचा ॥ प्रसाद तुझीये कृपेचा ॥ ५ ॥

॥ २६७१ ॥ तुझ्या प्रेमाचें कारणें ॥ ह्मणे म्यां घेतलें धरणें ॥ १ ॥ विठा देगा झडकरी ॥ मी तर न सोडी निर्धारी ॥ धृ० ॥ शीर फोडीन कर्वती ॥ नये तुज काकुळती ॥ २ ॥ देह घालीन गोरांजनीं ॥ मोकालिसी मजलागोनी ॥ ३ ॥ तुझे द्वारीं देईन प्राण ॥ तरी तूं पाहासी निर्वाण ॥ ४ ॥ विठा ह्मणे पंढरिराया ॥ आह्मा शिणवूं नको काया ॥ ५ ॥

॥ २६७२ ॥ तुजसारिखा पंढरिनाथा ॥ स्वामि शिरावरी असतां ॥ १ ॥ तरी मी आणिकांचा मागता ॥ लाज कोणासी समर्था ॥ धृ० ॥ असोनी क्षीरसिंधु जवळी ॥ क्षुधाक्रांत तळमळी ॥ २ ॥ कामधेनु तें वोळगतां ॥ न पुरे कामना सर्वथा ॥ ३ ॥ विठा ह्मणे नारायणा ॥ आतां शरण जाऊं कोणा ॥ ४ ॥

॥ २६७३ ॥ जननी बाळका कोपे रागें ॥ परि ते आहार तिसची मागे ॥ १ ॥ तैसा तुज मी शरण ॥ पंढरिराया निरुता जाण ॥ धृ० ॥ खेटी ह्मणोनी परते लोटी ॥ परि ते चरणीं घाली मिठी ॥ २ ॥ टाकोनी जाय कडीये नेघें ॥ परि तें धांवें तियेची मागें ॥ ३ ॥ विठा ह्मणे पंढरिनाथा ॥ आह्मा नुपेक्षी सर्वथा ॥ ४ ॥

॥ २६७४ ॥ देहसमय अंतीं इष्टमित्र मिळती ॥ सांभाळा ह्मणती मुलें माझीं ॥ १ ॥ स्त्री धनधान्य ते निरवुनी जात ॥ आपुले स्वहित विचारीना ॥ धृ० ॥ गाडे घोडे ह्मैसी सेवक आणि दासी ॥ सांडोनिया जासी एकलाची ॥ २ ॥ मी कोणरे काय कसा आलों येथें ॥ हित कीं अनहित करोनी जातों ॥ ३ ॥ हे तंव सूचना नाठवे ज्याच्या मना ॥ जुंपिलें तें घाणा चौऱ्यासीच्या ॥ ४ ॥ विठा ह्मणे तया कोण सोडविता ॥ वेगी पंढरिनाथा शरण जावें ॥ ५ ॥

॥ २६७५ ॥ हिंडतां श्रमलों बहु श्रम झाला ॥ अजूनी माझी तुला करुणा नये ॥ १ ॥ मज काय देतां होईल तुझें उणे ॥ किती होसी कृपण

पांडुरंगा ॥ धृ० ॥ घेउनी धरणें बैसलों महाद्वारीं ॥ झालों पैं भिकारी पंढरीचा ॥ २ ॥ विठा ह्मणे देवा माझें मज देया ॥ लौकिक कां वाया करितोसी ॥ ३ ॥

॥ २६७६ ॥ कामधेनु गाय घालोनी बाहेरी ॥ ताक घरोघरीं मागतसे ॥ १ ॥ कल्पतरु वृक्ष असे ज्याचे घरीं ॥ ते कां दारोदारीं भीक मागे ॥ धृ० ॥ रिद्धि आणि सिद्धि विठोबाच्या दासी ॥ तया हृषीकेशी शरण जावें ॥ २ ॥ इंद्र आणि चंद्र विठोबाचे किंकर ॥ देवसुरवर ध्याती ज्यातें ॥ ३ ॥ राव आणि रंक विठोबाचें मागतें ॥ ते कायरे तूंतें देती बापा ॥ ४ ॥ ऐसा कोण आहे सर्व पुरविता ॥ एका भगवंता वाचूनिया ॥ ५ ॥ मुखीं नामपुण्य असे ज्या पदरीं ॥ कळिकाळावरी सत्ता त्याची ॥ ६ ॥ विठा ह्मणे शरण जावें हृषीकेशीं ॥ मग निज-सुखासी पावसील ॥ ७ ॥

॥ २६७७ ॥ मी तुझा पोषणा आगा नारायणा ॥ झणी केविल-वाणा दिसो देसी ॥ १ ॥ तुझा ह्मणवितां आणिका शरण जातां ॥ लाज माझ्या चित्ता वाटे थोर ॥ धृ० ॥ रायाचा सेवक रंकाचिये द्वारीं ॥ फिरतां घरोघरीं लाज कोणा ॥ २ ॥ विठा ह्मणे देवा मी तुझा शरण ॥ मागतसे दान नाम तुझें ॥ ३ ॥

॥ २६७८ ॥ माझा बाप माय विठोबा रकुमाई ॥ वडील बंधु भाई पुंडलिक ॥ १ ॥ साधुसंत जन सोइरें हें जाण ॥ वंदीन चरण भावें त्यांचें ॥ धृ० ॥ निजाचे सोइरें कां गा नोळखसी ॥ भ्रमें भुललासी माया-जाळी ॥ २ ॥ पाळिलों पोसिलों जन्मोनी जयाचा ॥ उतराई त्याचा कांई होऊं ॥ ३ ॥ पाहेपा परतोनी मूळिचा तूं कोण ॥ सद्गुरुशी शरण रिघे वेगीं ॥ ४ ॥ सद्गुरु दयाळें लेवविलें अंजन ॥ मज जनार्दन अवघा भासे ॥ ५ ॥ विठा ह्मणे तारी आपुल्या शरणांगता ॥ अनाथाच्या नाथा पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ २६७९ ॥ आनंदें नाचत पंढरीसी जाऊं ॥ गीती गुण गाऊं विठो-बाचे ॥ १ ॥ पंढरी पावन पुण्यभूमि जाणें ॥ विठ्ठल दर्शनें दोष जाती ॥ धृ० ॥ आनंदें हो प्रेमें नाचों माहाद्वारीं ॥ आठवूं अंतरीं घडीघडी ॥ २ ॥ आह्मां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा ॥ घोष हरिनामाचा सदां वाचें ॥ ३ ॥ विठा नामयाचा चरणीं झाला लीन ॥ सांपडलें धन विटेवरी ॥ ४ ॥

॥ २६८० ॥ विठोबाचे बहु उपकार शिरीं ॥ चुकविली फेरी चौऱ्यांसीची ॥ १ ॥ भ्रमणा दुःखाच्या बहुत वेदना ॥ ह्मणोनी नारायणा शरण आलों ॥ धृ० ॥ अनाथाच्या नाथा तूं दीनाचा गोसावी ॥ तोडर तुझ्या पायीं शोभे देवा ॥ २ ॥ कर्ता करविता सर्व तुझी सत्ता ॥ विश्वाचा चाळिता चित्तवृत्ती ॥ ३ ॥ विठा ह्मणे नामस्मरे त्याचे मुखीं ॥ बहु केलें सुखी शरणांगतें ॥ ४ ॥

॥ २६८१ ॥ पतितपावन ऐकिलासी कानीं ॥ ह्मणोनी चक्रपाणी शरण आलों ॥ १ ॥ जपतप नेणें मूढ मतिहीन ॥ बोबडें गाईन नाम तुझें ॥ धृ० ॥ मग कृपाळुवा जी बोळला संपूर्ण ॥ बोलावलें मन भक्तिबोधें ॥ २ ॥ विठा ह्मणे पूर्वपुण्य कांहीं होतें ॥ तरीच पंढरिनाथें अंगिकारिलें ॥ ३ ॥

॥ २६८२ ॥ ऐसें सुख कोठें आहे ॥ मुक्ति मागोन करिसी काय ॥ १ ॥ सांडोनी पंढरीची वारी ॥ मोक्ष मागे तो भिकारी ॥ धृ० ॥ सांडोनी वाळवंट ॥ कां बा इच्छिसी वैकुंठ ॥ २ ॥ मुखीं कवळ काल्याचे ॥ ऐसे वैकुंठीं बा कैचे ॥ ३ ॥ नामयाचा विठा खेळे ॥ बाप नामची माझें भोळें ॥ ४ ॥

॥ २६८३ ॥ धरोनी हनुवटी ॥ मेळवीन दृष्टादृष्टी ॥ १ ॥ ह्मणे मी ऐसाची पाहीन ॥ चरण धरोनी राहीन ॥ धृ० ॥ जेवीं कमळणी दीनकरा ॥ चातका वरुषे जळधारा ॥ २ ॥ बाळक जननी ये भावीं ॥ चकोर चंद्रातें आळवी ॥ ३ ॥ कृपणाचें ठेविलें धन ॥ तेथुनी न निघे साचें मन ॥ ४ ॥ विठा विनवी अनुसंधानें ॥ तुज असतां मज काय उणें ॥ ५ ॥

॥ २६८४ ॥ नामयाचे वंशीं मैंद जन्मला ॥ मार्ग हा पाडिला वैकुंठीचा ॥ १ ॥ सत्तरावीचे पाश घेऊनियां हातीं ॥ वाट दिवसरातीं पाडीतसे ॥ धृ० ॥ मैंदाच्या हाता आला सावकार ॥ भांडारी कुबेर घरीं ज्याचे ॥ २ ॥ नामयाचा विठा सख हा मैंद ॥ भुलवुनी गोविंद ह्मणवी तुझें ॥ ३ ॥

॥ २६८५ ॥ नामयाचे वंशी जन्मलें लबाड ॥ साधिलें घबाड विटेवरी ॥ १ ॥ प्रपंचासी आह्मीं सोडिलें उदक ॥ वैकुंठनायक आप्त केला ॥ २ ॥ लौकीकाची लाज निश्चयें सोडिली ॥ दृढ मिठी दिल्ही विठोपायीं ॥ ३ ॥ लबाड ह्मणती निर्माण पैं झालें ॥ तेथें बुडविलें मीतूंपण ॥ ४ ॥ नामयाचा विठा सखाचा लबाड ॥ प्रपंच काबाड ब्रह्म केलें ॥ ५ ॥

॥ २६८६ ॥ नामयाचे वंशी जन्मा आलें सुनें ॥ वडिलाचें ठेवणें प्राप्त झालें ॥ १ ॥ संतसज्जनाचें राखितसे द्वार ॥ सुनें सारासार ह्मणती मज ॥ धृ० ॥ प्रपंच थोरला घालोनी आसन ॥ आडवें पैं ध्यान विठोबाचें ॥ २ ॥ गुरुगुरु ऐसा शब्द माझा पाड ॥ घातलें कवाड यमलोकीं ॥ ३ ॥ नामयाचा विठा सुनें सुनें एका ॥ पूजिल्या निष्टंका परब्रह्म ॥ ४ ॥

॥ २६८७ ॥ धर्म अर्थ मोक्ष काम ॥ उच्चारितां रामराम ॥ १ ॥ जें जें आवडे मनासी ॥ त्याणें जावें पंढरीसी ॥ धृ० ॥ चला आनंदें कौतुकें ॥ पेठ भरली पुंडलिकें ॥ २ ॥ नचले कोणाची थोरी ॥ रायारंका एकीसरी ॥ ३ ॥ सांडोनियां आहे भाव ॥ हाचि करावा व्यवसाव ॥ ४ ॥ विठा ह्मणे विष्णुदास ॥ आणिक नलगे सायास ॥ ५ ॥

॥ २६८८ ॥ जननी बाळकाचें जीवन ॥ जरी तें नेणें भुकताहान ॥ १ ॥ तरी तें कशानें वांचती ॥ विचारावें कमळापती ॥ धृ० ॥ वत्सालागीं तान्हीं ॥ लागूं नेदी आपुल्या स्तनी ॥ २ ॥ कूर्मी आपुलीया बाळा ॥ नावलोकी वेळोवेळां ॥ ३ ॥ विठा ह्मणे जगज्जीवना ॥ आतां नुपेक्षावें दीना ॥ ४ ॥

॥ २६८९ ॥ हाट करी आह्मी आठवडे मुळीचे ॥ पंढरपुरीचे वारकरी ॥ १ ॥ खेप ठिकाणाची वस्तु सवंगाची ॥ सवाई निढळाची उणी नव्हे ॥ २ ॥ चोहाटा चौकाचा दुकान नाक्याचा ॥ जागा मिराशीचा पुरातन ॥ ३ ॥ हरिनाम केणें नित्य हमेशाई ॥ तेव्हां तोटा नाहीं कोणें काळीं ॥ ४ ॥ विठा ह्मणे वजन केली वैकुंठीची । गुणी निर्गुणीची कडासन ॥ ५ ॥

---



## लाडाईचे अभंग.

:o:

॥ २६९० ॥ पूर्व संबंधें मज दिधलें बापानें ॥ शेखी काय जाणें कैसें झालें ॥ १ ॥ प्रसुतालागीं मज आणिलें कल्याणा ॥ अंतरला राणा पंढरीचा ॥ २ ॥ मुकुंदें मजशीं थोर केला गोवा ॥ लोटियलें भवानदीमाजी ॥ ३ ॥ ऐकिला वृत्तांत सर्व झालें गुप्त ॥ माझेंची संचित खोटें कैसें ॥ ४ ॥ द्वादशबहात्तरीं कृष्ण त्रयोदशी ॥ आषाढ हें मासी देव-

द्वारीं ॥ ५ ॥ सर्वांनीं हा देह अर्पिला विठ्ठलीं ॥ मज कां ठेविलें पापिणीसी वेगळी ॥ ६ ॥ लाडाई ह्मणे देह अर्पीन विठ्ठला ॥ ह्मणोनी आदरिला प्राणायाम ॥ ७ ॥

## आऊबाईचे अभंग.

---:o:---

॥ २६९१ ॥ तारी मज आतां रखमाईच्या कांता ॥ पंढरिच्या नाथा मायबापा ॥ १ ॥ अनाथाचा नाथ ऐकियेलें कानीं ॥ सनकादिक मुनि बोलताती ॥ २ ॥ त्याचिया वचनाचा पावोनी विश्वास ॥ धरिली तुझी कास पांडुरंगा ॥ ३ ॥ नामयाची लोकीं आऊ ह्मणे देवा ॥ कृपाळू केशवा सांभाळावें ॥ ४ ॥

## जनाबाईचे अभंग.

---:o:---

### उपास्य विठोबा.

॥ २६९२ ॥ सांवळी ते मूर्ति हृदयीं बिंबली ॥ देही बुद्धि पालटली माझी साची ॥ १ ॥ धन्य माझी भक्ति धन्य माझा भाव ॥ हृदयीं पंढरिराव राहतसे ॥ धृ० ॥ आशा तृष्णा कैशा मावळल्या दोन्हीं ॥ चिंता विठ्ठलचरणीं जडोनी ठेली ॥ २ ॥ नामयाचे जनी विश्रांति पै झाली ॥ हृदयीं राहिली विठ्ठलमूर्ती ॥ ३ ॥

॥ २६९३ ॥ देहाचा पालट विठोबाचे भेटी ॥ जळ लवणा गांठीं पडोन ठेली ॥ १ ॥ धन्य मायबाप नामदेव माझा ॥ तेणें पंढरिराजा दाखविलें ॥ धृ० ॥ रात्रंदिवस भाव विठ्ठलाचे पायीं ॥ चित्त ठायींचे ठायीं मावळलें ॥ २ ॥ नामयाचे जनी आनंद पै झाला ॥ भेटावया आला पांडुरंग ॥ ३ ॥

॥ २६९४ ॥ विठ्ठल रुक्मिणी ॥ तुह्मी अखंड चिंतामणी ॥ १ ॥ तुह्मा सुख काय उणें ॥ झालें सोईरें त्रिभूवन ॥ धृ० ॥ काय उणें तयापासी ॥ रिद्धि सिद्धि ज्याच्या दासी ॥ २ ॥ लक्ष लावारे चरणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ३ ॥

॥ २६९५ ॥ सांडुनी पंढरी जाती वाराणशी ॥ काय सुख त्यांसी आहे तेथें ॥ १ ॥ तया पंचकोशी ह्मणती मरावें ॥ मरूनियां व्हावें जीवन्मुक्त ॥ २ ॥ नको वा विठोबा मज सांडों काशी ॥ सांगतों तुजपाशीं एक एक ॥ ३ ॥ मरती मानवनर कुळस्तंभीं ॥ घालूनियां गाळी पापपुण्य ॥ ४ ॥ इक्षुदंड घाणा जैसा भरी माळी ॥ तैसा तो कवळी काळनाथ ॥ ५ ॥ लिंग देहादिक करिती कंदना ॥ येथील यातना नको देवा ॥ ६ ॥ आई आई ह्मणती काय करूं ॥ ऐसें दुःख थोरू आहे तेथें ॥ ७ ॥ न जाय तो जीव एक्या अवसरीं ॥ पडती नानापरी दुःख भारी ॥ ८ ॥ रुद्रादिक देव तेही भांबावले ॥ भुलूनियां गेले मुक्तिसाठीं ॥ ९ ॥ ते हे मुक्ति येथें खेळे पंढरीसी ॥ लागती पायांसी संतांचिया ॥ १० ॥ तैसी हे पंढरी पाहतां नयनीं ॥ भीमातिरीं आणि मोक्ष आला ॥ ११ ॥ सख्या पुंडलिका लागतांची पायां ॥ मुक्ति ह्मणे वांया गेलें मी कीं ॥ १२ ॥ घर रिघूनियां मुक्ति होय दासी ॥ मोक्ष तो पाठीसी धांव घाली ॥ १३ ॥ मोक्ष सुखासाठीं मुक्ति लोळे बिदीं ॥ ने घे कोणी कधीं कदाकाळीं ॥ १४ ॥ समर्थाच्या घरीं भिक्षा नानापरी ॥ मागतां पदरीं घालिताती ॥ १५ ॥ आवतणें सांडुनी कोणें जावें भिके ॥ सामराज्य सुखें तुझे पायीं ॥ १६ ॥ जनी ह्मणे तुज रखुमाईची आण ॥ मज एक क्षण विसंबसी ॥ १७ ॥

॥ २६९६ ॥ पंढरीचा वारकरी ॥ त्याचे पाय माझे शिरीं ॥ १ ॥ हो कां उत्तम चांडाळ ॥ पायीं ठेवीन कपाळ ॥ २ ॥ वृथा होती हरिहरा ॥ सिद्ध मुनि ऋषेश्वरा ॥ ३ ॥ मुखीं नाम गर्जे वाणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २६९७ ॥ आले वैष्णवांचे भार ॥ दिले हरिनाम नगारे ॥ १ ॥ अवघी दुमदुमली पंढरी ॥ कडकडाट गरुडपारीं ॥ २ ॥ टाळ मृदंग धुमाळी ॥ रंगणीं नाचे वनमाळी ॥ ३ ॥ ऐसा आनंद सोहळा ॥ दासी जनी पाहे डोळां ॥ ४ ॥

॥ २६९८ ॥ कीर्तनाचा रस आवडे नरासी ॥ लागती पायासी मुक्ति चारी ॥ १ ॥ आणि पंढरीचा निश्चयें ज्यां केला ॥ वारकरी झाला पंढरीचा ॥ २ ॥ मोक्षाचा जो मोक्ष मुक्तीची जे मुक्ती ॥ जनी ह्मणे किती सांगूं फार ॥ ३ ॥

॥ २६९९ ॥ नामयाचे ठेवणें जनीस लाधलें ॥ धन सांपडलें विटेवरी ॥ १ ॥ धन्य माझा जन्म धन्य माझा वंश ॥ धन्य विष्णुदास स्वामी माझा ॥ धृ० ॥ कामधाम माझे विठोबाचे पाय ॥ दिवसनिशी पाहे हारपली ॥ २ ॥ माझ्या वडिलाचें दैवत तोहा पंढरिनाथ ॥ तेणें माझा अर्थ पुरविला ॥ ३ ॥ संसारीचें सुख नेघे माझे चित्तीं ॥ तरीच पुनरावृत्ति चुकविल्या ॥ ४ ॥ नामयाचे जनी आनंद पै झाला ॥ हृदयीं बिंबला पांडुरंग ॥ ५ ॥

॥ २७०० ॥ येग येग विठाबाई ॥ माझे पंढरीचे आई ॥ १ ॥ भिमा आणि चंद्रभागा ॥ तुझे चरणीच्या गंगा ॥ २ ॥ इतुक्यासहित त्वां बा यावें ॥ माझे रंगणीं नाचावें ॥ ३ ॥ माझा रंग तुझिया गुणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २७०१ ॥ नाहीं केली तुझी सेवा ॥ दुःख वाटतसे माझे जिवा ॥ १ ॥ नष्ट पापिण मी हीन ॥ नाहीं केलें तुझें ध्यान ॥ २ ॥ जें जें दुःख झालें मला ॥ तें त्वां सोसिलें विठ्ठला ॥ ३ ॥ रात्रंदिवस मजपाशीं ॥ दळूं कांडूं लागलासी ॥ ४ ॥ क्षमा करावी देवराया ॥ दासी जनी लागे पायां ॥ ५ ॥

॥ २७०२ ॥ विठो पंढरीचे राजे ॥ झगडाझगड नौबत वाजे ॥ १ ॥ अवघी दुमदुमली पंढरी ॥ जयजयकार गरुडपारीं ॥ २ ॥ टाळ मृदंग धुमाळी ॥ रंगणीं नाचे वनमाळी ॥ ३ ॥ ऐसा आनंद सोहळा ॥ दासी जनी पाहे डोळां ॥ ४ ॥

---

## देवाची स्तुति.

———:o:———

॥ २७०३ ॥ विठो माझा लेंकुरवाळा ॥ संगें लेंकुरांचा मेळा ॥ १ ॥ एकनाथ खांद्यावरी ॥ कबिराचा हात धरी ॥ २ ॥ पुढें चाले ज्ञानेश्वर ॥ मागें मुक्ताई सुंदर ॥ ३ ॥ गोरा कुंभार मांडिवरी ॥ चोखा जीवा बरोबरी ॥ ४ ॥ बंका कडियेवरी ॥ नामा करांगुळी धरी ॥ ५ ॥ जनी ह्मणे गोपाळा ॥ करी भक्तांचा सोहळा ॥ ६ ॥

॥ २७०४ ॥ संत राउळा चालिले ॥ ज्ञानेश्वर तंव बोले ॥ १ ॥ एवढें नवल सांगावें ॥ दासी जनीचें पद ल्याहावें ॥ २ ॥ पाय जोडुनी विटेवरी ॥ कटीं हात उभा हरी ॥ ३ ॥ रूप सांवळें सुंदर ॥ कानीं कुंडल मनोहर ॥ ४ ॥ सोनसळा वैजयंती ॥ पुढें गोपाळ नाचती ॥ ५ ॥ गरुड पारीं सन्मुख उभा ॥ जनी ह्मणे धन्य शोभा ॥ ६ ॥

॥ २७०५ ॥ अहो यशोदेचा हरी ॥ गोपिकांसी कृपा करी ॥ १ ॥ वेणु वाजवितो हरी ॥ सर्व देवांचा साह्यकारी ॥ २ ॥ धांवे धांवे गाई पाठीं ॥ जनी ह्मणे जगजेठी ॥ ३ ॥

॥ २७०६ ॥ असो थोरथोरांची मात ॥ तूंचि मिळालासी गोपाळांत ॥ १ ॥ त्यांच्या शिदोऱ्या सोडिसी ॥ ग्रासोग्रासीं उच्छिष्ट खासी ॥ २ ॥ न ह्मणे सोंवळें ओंवळें ॥ प्रत्यक्षची तें ओवळें ॥ ३ ॥ स्वानंदाचे डोहीं हात ॥ धुतले सर्वांहीं निश्चित ॥ ४ ॥ हातीं काठ्या पायीं जोडे ॥ दासी जनी वाट झाडे ॥ ५ ॥

॥ २७०७ ॥ देव देखिला देखिला ॥ नामें ओळखुनी ठेविला ॥ १ ॥ तो हा विटेवरी देव ॥ सर्व सुखाचा केशव ॥ २ ॥ जनी ह्मणे पूर्ण काम ॥ विठ्ठल देवाचा विश्राम ॥ ३ ॥

॥ २७०८ ॥ अहो द्रौपदीच्या बंधू ॥ तारक देवा कृपासिंधू ॥ १ ॥ पांचाळीसी वस्त्रें देत ॥ पुरवितो जगन्नाथ ॥ २ ॥ जनी ह्मणे भाग्यवंत ॥ तिच्या भावाचा अंकित ॥ ३ ॥

॥ २७०९ ॥ अहो गोकुळींच्या देवा ॥ आदि अंत तुह्मां ठावा ॥ १ ॥ नलगे पुसावें हो कोणा ॥ आदि अंत हो सुजाणा ॥ २ ॥ जनी ह्मणे हो गोकुळीं ॥ किती खासी उष्टावळी ॥ ३ ॥

॥ २७१० ॥ जन्म खातां उष्टावळी ॥ सदा राखी चंदावळी ॥ १ ॥ राईरुक्मिणीचा कांत ॥ भक्तिसाठीं कण्या खात ॥ २ ॥ देव भुलले पांडुरंग ॥ ऐसा जाणावा श्रीरंग ॥ ३ ॥ जनी ह्मणे देवराज ॥ करी भक्तीचें हो काज ॥ ४ ॥

॥ २७११ ॥ मारूनिया सा रावणा ॥ राज्य दिधलें बीभिषणा ॥ १ ॥ सोडवुनी सीता सती ॥ राम अयोध्येस येती ॥ २ ॥ ख्याति केली रामायणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ३ ॥

॥ २७१२ ॥ योगीं शीण झाला ॥ तुजवांचुनी विठ्ठला ॥ १ ॥ योग- करितां अष्टांग ॥ तुजविण शुका रोग ॥ २ ॥ बैसला कपाटीं ॥ रंभा लागे त्याच्या पाठीं ॥ ३ ॥ तईं त्वांचि सांभाळिला ॥ जेव्हां तुज शरण आला ॥ ॥ ४ ॥ सांगोनी पुत्रातें ॥ त्वांचि छळिलें कश्यपातें ॥ ५ ॥ अमरांच्या राया ॥ ह्मणे जनी सुखालया ॥ ६ ॥

॥ २७१३ ॥ धन्य धन्य ज्याचे चरणीं गंगाओघ झाला ॥ मस्तकीं धरिला उमाकांतें ॥ १ ॥ धुंडितां ते पाय शिणला तो ब्रह्मा ॥ बोल ठेवी कर्मा आपुलीया ॥ २ ॥ शुक सनकादिक फिरती हरिजन ॥ नारदादि गाणें जयासाठीं ॥ ३ ॥ ते चरण आह्मासी गवसले अनायासी ॥ धन्य झाली दासी जनी ह्मणे ॥ ४ ॥

॥ २७१४ ॥ तुझ्या निजरूपा कारणें ॥ वेडावलीं षड्दर्शनें ॥ १ ॥ परि सोय न कळे त्यासी ॥ समीप असतां देवासी ॥ २ ॥ चारी श्रमें हो कष्टती ॥ वेदशास्त्रें धुंडाळिती ॥ ३ ॥ परि कवणें रीति तुला ॥ न जाणवे जी विठ्ठला ॥ ४ ॥ तुझी कृपा होय जरी ॥ दासी जनी धृपद करी ॥ ५ ॥

॥ २७१५ ॥ ऐसा आहे पांडुरंग ॥ भोग भोगुनी निःसंग ॥ १ ॥ अविद्येनें नवल केलें ॥ मिथ्या सत्यत्व दाविलें ॥ २ ॥ जैसी वांझेची संपत्ती ॥ तैसी संसार उत्पत्ती ॥ ३ ॥ तेथें कैंची बा धरिसी ॥ ब्रह्मीं पूर्ण जनी दासी ॥ ४ ॥

॥ २७१६ ॥ स्तन पाजायासी ॥ आली होती ते माउसी ॥ १ ॥ तिच्या उरावरीं लोळे ॥ विठो माझा क्रीडा खेळे ॥ २ ॥ मेल्यें मेल्यें कृष्ण- नाथा ॥ सोडी सोडी रे अनंता ॥ ३ ॥ लिंग देह विरविरलें ॥ जनी ह्मणे या विठ्ठलें ॥ ४ ॥

॥ २७१७ ॥ भजन करी महादेव ॥ राम पुजी सदाशिव ॥ १ ॥ दोघे देव एक पाही ॥ तयां ऐक्य दुजें नाहीं ॥ २ ॥ शिवा रामा नाहीं भेद ॥ ऐसे देव तेही सिद्ध ॥ ३ ॥ जनी ह्मणे आत्मा एक ॥ सर्व घटीं तो व्यापक ॥ ४ ॥

॥ २७१८ ॥ ऐसा हा देवानें थोर पवाडा केला ॥ पूर्व अवतारीं झाला हयग्रीव ॥ १ ॥ मग अंबऋषिसाठीं पडियेला संकटीं ॥ मच्छ झाला

पोटीं समुद्राच्या ॥ २ ॥ होउनी कच्छप पर्वत धरिला ॥ वराहें मारिला दैत्य भार ॥ ३ ॥ तयाचा सहोदर मृत्यु नाहीं ऐसा वर ॥ तेव्हां नारसिंह झाला अवतार ॥ ४ ॥ अर्धनारी नटेश्वर दुसरा तो वामन ॥ भार्गव तो निधान दाशरथी ॥ ५ ॥ होऊनिया कृष्ण कंस वधियेला ॥ आतां बुद्ध झाला सखा माझा ॥ ६ ॥ लीला अवतारीं हरि करी खेळ नाना ॥ ह्मणे जनी जाणा तैं मी होत्यें ॥ ७ ॥

॥ २७१९ ॥ मृदु वाहे पाणी ॥ व्रज मानी ऐसें लोणी ॥ १ ॥ क्षमा ऐसी जीवीं ॥ क्रोधभूत हे पृथिवी ॥ २ ॥ गंध माती सरी ॥ करुनी आपुली अस्तुरी ॥ ३ ॥ गुण दोष मना नाणी ॥ ह्मणे बहिरी होय जनी ॥ ४ ॥

॥ २७२० ॥ खांदीऋषि तो चालिला ॥ बळीनें द्वारपाळ केला ॥ १ ॥ ऐसा भक्ता आधिन होसी ॥ त्याच्या वचनें वर्तसी ॥ २ ॥ कष्टी होता अंबऋषी ॥ त्याचे गर्भवास सोसी ॥ ३ ॥ सर्व दुःखासी साहिलें ॥ जनी ह्मणे दळण केलें ॥ ४ ॥

॥ २७२१ ॥ बाप रकुमाबाई वर ॥ माझे निजाचें माहेर ॥ १ ॥ तें हें जाणा पंढरपुर ॥ जग मुक्तीचें माहेर ॥ २ ॥ तेथें मुक्ति नाहीं ह्मणे ॥ जनी न पाहे साचें वदन ॥ ३ ॥

॥ २७२२ ॥ स्मरतांची पावसी ॥ तरी भक्तासीं लाधसी ॥ १ ॥ ऐसा नाहीं न घडे देवा ॥ वायां कोण करी सेवा ॥ धृ० ॥ न पुरतां आस ॥ मग कोण पुसे देवास ॥ २ ॥ कोठें चक्रपाणी ॥ तुज आधीं लाही जनी ॥ ३ ॥

॥ २७२३ ॥ अनंत लावण्याची शोभा ॥ तो हा विटेवरी उभा ॥ १ ॥ पितांबर माल गांठीं ॥ भाविकासीं घाली मिठी ॥ धृ० ॥ त्याचे पाय चुरी हातें ॥ कष्टलीस माझे माते ॥ २ ॥ आवडी बोले त्यासी ॥ चला जाऊं एकांतासी ॥ ३ ॥ ऐसा ब्रह्मीचा पुतळा ॥ दासी जनी पाहे डोळां ॥ ४ ॥

॥ २७२४ ॥ आळवितां धांव घाली ॥ ऐसी प्रेमाची भुकेली ॥ १ ॥ ते हे यशोदेच्या बाळा ॥ बरवी पाहतसे डोळां ॥ धृ० ॥ विटेवरी उभा नीट ॥

केली पुंडलिकें धीट ॥ २ ॥ स्वानंदाचें लेणें ल्याली ॥ पाहून दासी जनी धाली ॥ ३ ॥

॥ २७२५ ॥ विठो पंढरीच्या नाथा ॥ काळ साहे नाहीं आतां ॥ १ ॥ मज टाकिलें परदेशीं ॥ नारा विठा तुजपासीं ॥ धृ० ॥ तुजविण माझें कोण ॥ करील तें समाधान ॥ २ ॥ हीन दीन तुझे पोटीं ॥ ह्मणे जनी द्यावी भेटी ॥ ३ ॥

॥ २७२६ ॥ मायेहुनी माय मानी ॥ करी जिवाची ओंवाळणी ॥ १ ॥ परलोकीचें तारूं ॥ ह्मणे माझा ज्ञानेश्वरू ॥ २ ॥ वित्त गोत चित्त पाहे ॥ सत्य वंदी गुरुचे पाय ॥ ३ ॥ पतिव्रते जैसा पती ॥ जनी ह्मणे सांगों किती ॥ ४ ॥

॥ २७२७ ॥ संसारीं निधान लाधलें जनां ॥ सद्गुरुचणार सेवी बापा ॥ १ ॥ कायावाचा मनें तयास देवावीं ॥ वस्तु मागून घ्यावी अगोचर ॥ २ ॥ तें गोचर नव्हे जाण गुरुकृपेवीण ॥ एऱ्हवी तें आपणांमाजी आहे ॥ ३ ॥ असतां सम्यक परि जना चुकामुक ॥ भुललीं निष्टंक मंत्रेंतंत्रें ॥ ४ ॥ माळ वेष्टण करीं टापोर घेती शिरीं ॥ नेम अष्टोत्तरीं करिताती ॥ ५ ॥ जो माळ करविता वाचेसी वदविता ॥ तया हृदयस्था नेणें कोणी ॥ ६ ॥ सोहं आत्मा प्रगट जो दाखवी वाट ॥ सद्गुरु वरिष्ठ तोचि जाणा ॥ ७ ॥ तया उत्तीर्णता व्हावया पदार्था ॥ न देखों सर्वथा जनी ह्मणे ॥ ८ ॥

॥ २७२८ ॥ नोवरीया संगें वऱ्हाडी या सोहोळा ॥ मांडे पुरणपोळ्या मिळे अन्न ॥ १ ॥ परीसाचेनीसंगें लोहो होय सोनें ॥ तयाची भूषणें श्रीमंतासीं ॥ २ ॥ जनी ह्मणे जोड झाली विठोबाची ॥ दासी नामयाची ह्मणोनीयां ॥ ३ ॥

॥ २७२९ ॥ संतभार पंढरींत ॥ कीर्तनाचा गजर होत ॥ १ ॥ करीत जेथें देव उभा ॥ सम चरणांची शोभा ॥ २ ॥ रंग भरे कीर्तनांत ॥ तेणें हरिदास नाचत ॥ ३ ॥ सखा विरळा ज्ञानेश्वर ॥ नामयाचें जो जिव्हार ॥ ४ ॥ ऐशा संता शरण जाऊं ॥ जनी ह्मणे सांला घ्याऊं ॥ ५ ॥

॥ २७३० ॥ अळकापुरवासिनी समिप इंद्रायणी ॥ पूर्वेसी वाहिनी प्रवाह तेथें ॥ १ ॥ ज्ञानाबाई आई आर्त तुझे पायीं ॥ धांवोनियां येई

दुडदुडां ॥ २ ॥ बहु कासाविस होतो माझा जीव ॥ कनवाळ्याची कींव येऊं द्यावी ॥ ३ ॥ नामयाची जनी ह्मणावी आपुली ॥ पायीं सांभाळिली मायबापें ॥ ४ ॥

॥ २७३१ ॥ भक्तामाजीं अग्रगणी ॥ पुंडलिक महामुनी ॥ १ ॥ त्याचे प्रसादें तरलें ॥ साधुसंत उद्धरिलें ॥ २ ॥ तोचि प्रसाद आह्मासी ॥ विटेवरी हृषीकेषी ॥ ३ ॥ पुंडलिक बापमाय ॥ दासी जनी वंदी पाय ॥ ४ ॥

॥ २७३२ ॥ आंधळ्याची कांठी ॥ अडकली कवणें बेटीं ॥ १ ॥ माझिये हरणी ॥ गुंतलीस कोणे रानीं ॥ २ ॥ मुकें मी पाडस ॥ चुकलें भोवें पाहे वास ॥ ३ ॥ तुजवीण काय करूं ॥ प्राण किती कंठीं धरूं ॥ ४ ॥ आतां जीव जाऊं पाहे ॥ धांव घाली माझे आये ॥ ५ ॥ माझी भेटवा जननी ॥ संतां विनवी दासी जनी ॥ ६ ॥

॥ २७३३ ॥ संत हे कोण तरी देवाचे हे डोळे ॥ पूजेविण आंधळे देवाचीये ॥ १ ॥ कोण्या नेत्रें देव पाहे तुजकडे ॥ यासाठीं आवडे संत-करी ॥ २ ॥ संत ऐसे करी देवाचे कान ॥ सांडियेल्या ध्यान कोण ऐके ॥ ३ ॥ संत पुसती तरी देवाचे ते पाय ॥ आगमा न गमे सोय मागा-डीये ॥ ४ ॥ संत पुससी तरी देवाचें तें पोट ॥ धरूनियां बोट दाविती हरी ॥ ५ ॥ देवाचा हा गळा ॥ जेणें रस आगळा वेदादिकां ॥ ६ ॥ संतसरी पुससी तरी देवाचें वदन ॥ माझें तें वचन संत झाले ॥ ७ ॥ परादिया चारी सांडुनी मीपणीं ॥ संत बोले वाणी विठोबाची ॥ ८ ॥ परेचिया परी आनंदा माझारीं ॥ संत झाले अंतरीं पडजीभ देवा ॥ ९ ॥ क्षरजे नासिलें अक्षर तें काढिलें ॥ निःशब्दाचें झालें बोले संत ॥ १० ॥ शब्द तो उडाला नाद तो बुडाला ॥ भेद तो आटला माया भावीं ॥ ११ ॥ विठो वटावरीं पारविया झाले ॥ केश ते वाढले माय संत ॥ १२ ॥ कुरळ कुरळ होऊनियां देती ते सुढाळ ॥ ह्मणे जनी वोवाळ जीवेंभावें ॥ १३ ॥

॥ २७३४ ॥ या वैष्णवाच्या माता ॥ तो नेणवे देवां दैतां ॥ १ ॥ तिहीं कर्म हें पुसिलें ॥ अकर्म समूळ नाहीं केलें ॥ २ ॥ कानाचे हे कान ॥ झालें धरूनिया ध्यान ॥ ३ ॥ डोळियाचा डोळा ॥ करुनी धाले प्रेम सोहाळा ॥ ४ ॥ तोही वश्य नरदेहीं ॥ जनी दासी वंदी पायीं ॥ ५ ॥

॥ २७३५ ॥ बाप श्रोतियाचा राजा ॥ कैसी उभारिली ध्वजा ॥ १ ॥ एक झाला परिक्षिती ॥ ऐसे पवाडे गर्जिती ॥ २ ॥ भागवतीं रससुखें ॥ द्रौपदी वाढी सावकाशें ॥ ३ ॥ ज्याची ऐकतां गर्जना ॥ कंप काळाचिया मना ॥ ४ ॥ सात दिवस वृष्टि झाली ॥ जनी ह्मणे मात केली ॥ ५ ॥

॥ २७३६ ॥ पंढरीचें सुख पुंडलिकासी आलें ॥ तेणें हीं वाढिलें भक्तालागीं ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति वरदान दिधलें ॥ तेंहि नाहीं ठेविलें आपणापाशीं ॥ २ ॥ उदार चक्रवर्ती बाप पुंडलिक ॥ नामें विश्वलोक उद्धरिलें ॥ ३ ॥

॥ २७३७ ॥ ज्ञानाचा सागर ॥ सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥ मरोनियां जावें ॥ बा तुझ्याच्या पोटा यावें ॥ २ ॥ ऐसें करी माझ्या भावा ॥ सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥ ३ ॥ जावें वोवाळुनी ॥ जन्मोजन्मीं दासी जनी ॥ ४ ॥

॥ २७३८ ॥ भला भला पुंडलिका ॥ तुझ्या भावार्थाचा शिका ॥ १ ॥ भलें घालूनियां कोडें ॥ परब्रह्म दारापुढें ॥ २ ॥ घाव घातला निशाणीं ॥ ख्याति केली त्रिभुवनीं ॥ ३ ॥ जनी ह्मणे पुंडलिका ॥ धन्य तूंचि तिहीं लोकां ॥ ४ ॥

॥ २७३९ ॥ ज्ञानेश्वर अभंग बोलिले ज्या शब्दां ॥ चिदानंद बाबा लिही त्यांस ॥ १ ॥ निवृत्तीचे बोल लिहिले सोपानें ॥ मुक्ताईचीं वचनें ज्ञानदेवें ॥ २ ॥ चांगयाचा लिहिणार शामा तो कांसार ॥ परमानंद खेचर लिहित होता ॥ ३ ॥ सांगे पूर्णानंद लिही परमानंद ॥ भगवंत भेटी आनंद रामानंद ॥ ४ ॥ सांवता माळ्याचा काशिबा गुरव ॥ कर्म्याचा वसुदेव काईत होता ॥ ५ ॥ चोखामेळ्याचा अनंतभट्ट अभ्यंग ॥ ह्मणोनी नामयाचे जनीचा पांडुरंग ॥ ६ ॥

॥ २७४० ॥ संतांचा तो संग नव्हे भलतैसा ॥ पालटावी दशा तात्काळिक ॥ १ ॥ चंदनाचें संगें पालटती झाडें ॥ दुर्बळ लांकडें देवामायां ॥ २ ॥ हें कां ऐसें व्हावें संगती स्वभावें ॥ आणिकें न पालटावें देहालागीं ॥ ३ ॥ तैसा निःसंगाचा संग अग्रगणी ॥ जनी ध्याय मनीं ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥

॥ २७४१ ॥ भाव अक्षराची गांठी ॥ ब्रह्मज्ञानानें गोमटी ॥ १ ॥ ते हे माया ज्ञानेवरी ॥ संतजनां माहेश्वरी ॥ २ ॥ ज्ञानेश्वर मंगळ मुनी ॥ सेवा करी दासी जनी ॥ ३ ॥

॥ २७४२ ॥ विष्णुमुद्रेचा अंकिला ॥ तोचि वैष्णव एक भला ॥ १ ॥ अहं जाळोनी अंगारा ॥ सोहंभस्मी तीर्थ सारा ॥ धृ० ॥ विष्णु माया द्वारावती ॥ भक्तिमुद्रा त्या मिरवती ॥ २ ॥ पंचायतन पुजी भावें ॥ अहं सोहं भस्मीं नांवें ॥ ३ ॥ प्रेमतुळसी घाली कानीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २७४३ ॥ गीतेवरी आन टीका ॥ त्यांनीं वाढियेली लोकां ॥ १ ॥ रानताटामाजीं ॥ त्यानें वोगरिलें कांजी ॥ २ ॥ या ज्ञानेशा वांचोनी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ३ ॥

॥ २७४४ ॥ स्त्री जन्म ह्मणवुनी न व्हावें उदास ॥ साधुसंता ऐसें केलें जनीं ॥ १ ॥ संताचे घरीची दासी मी अंकिली ॥ विठोबानें दिल्ही प्रेमकळा ॥ धृ० ॥ विदुर सात्विक माझिये कुळीचा ॥ अंगिकार त्याचा केला देवें ॥ २ ॥ न विचारितां कुळ गणिका उद्धरिली ॥ नामें सरती केली तिहीं लोकीं ॥ ३ ॥ ऋषींचीं कुळें उच्चारीली जेणें ॥ स्वर्गावरीं तेणें वस्ती केली ॥ ४ ॥ नामयाची जनी भक्तीतें सादर ॥ माझें तें साचार विटेवरी ॥ ५ ॥

॥ २७४५ ॥ पुंडलिक भक्तबळी ॥ विठो आणिला भूतळीं ॥ १ ॥ अनंत अवतार केवळ ॥ उभा विटेवरी सकळ ॥ धृ० ॥ वसुदेवा नकळे पार ॥ नाम्यासवें जेवी फार ॥ २ ॥ भक्तभावार्था विकला ॥ दासी जनीला आनंद झाला ॥ ३ ॥

॥ २७४६ ॥ एक टाळी झाली चंद्रभागे वाळवंटीं ॥ माझा ज्ञानदेव गोपाळासीं लाह्या वाटी ॥ १ ॥ एक टाळी झाली चंद्रभागे तीरीं ॥ माझा नामदेव हरिदास कथा करी ॥ धृ० ॥ जातीचा अविंद धन्य भक्तराज जगीं ॥ विणिताती शेले देव कबिराचे मागीं ॥ २ ॥ चिखल करितां तुडविलें तें लेंकरूं ॥ वैष्णव बोलती गोरा जातीचा कुंभारू ॥ ३ ॥ सांवता माळ्यापासीं लपायाला गेले हरी ॥ चिरियेलें पोट उदरीं घातले मुरारी ॥ ४ ॥ सांवत्या सारिखे धन्य भक्तराज भोळे ॥ जनी ह्मणे

तातडीनें वरी बांधलें चवाळें ॥ ५ ॥ ज्ञानदेव नामदेव मागें लागोलाग आले ॥ सांवत्याच्या पोटांतून देवां बाहेरी काढिलें ॥ ६ ॥ नामदेव कथा करी पुढें नाचे पांडुरंग ॥ जनी ह्मणे बोला ज्ञानदेवाचे अभंग ॥ ७ ॥ अभंग बोलतां रंग कीर्तनासी आला ॥ प्रेमाचिया छंदें देव नाचाया लागला ॥ ८ ॥ नाचतां उडतां त्याचा गळाला पितांबर ॥ सावध होई देवा दास बोलिला कबीर ॥ ९ ॥ साधु या संतांनीं देव धरिला मग नेटीं ॥ काय झालें ह्मणोनी दचकलें जगजेठी ॥ १० ॥ जेवितां जेवितां दचकले चक्रपाणी ॥ बोलाविली नाहीं नामयाची जनी ॥ ११ ॥ साधुसंत तुह्मीं घांस नका कोणी घेऊं ॥ घडीभरी थांबा दासी जनीला बोलावूं ॥ १२ ॥

---

## संकल्प.

---:o:---

॥ २७४७ ॥ दळितां कांडितां ॥ तुज गाईन अनंता ॥ १ ॥ न विसंबें क्षणभरी ॥ तुझें नाम गा मुरारी ॥ २ ॥ नित्य हाचि कारभार ॥ मुखीं हरि निरंतर ॥ ३ ॥ मायबाप बंधुबहिणी ॥ तूं बा सखा चक्रपाणी ॥ ४ ॥ लक्ष लागलें चरणासी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ ५ ॥

॥ २७४८ ॥ जनी ह्मणे नामदेवासी ॥ चला जाऊं पंढरिसी ॥ १ ॥ आला विषयाचा कंटाळा ॥ जाऊं भेटूं त्या गोपाळा ॥ २ ॥ आवडीनें जगजेठी ॥ गळां घालूनियां मिठी ॥ ३ ॥ आवडीनें गुज कानीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २७४९ ॥ करूं हरीचें कीर्तन ॥ गाऊं निर्मळ ते गुण ॥ १ ॥ सदां धरूं संतसंग ॥ मुखीं ह्मणूं पांडुरंग ॥ २ ॥ करूं जनावरी कृपा ॥ रामनाम ह्मणवूं लोकां ॥ ३ ॥ जनी ह्मणे कीर्ति करूं ॥ नाम बळकट धरूं ॥ ४ ॥

॥ २७५० ॥ आनंदाचे डोहीं ॥ जो कां समूळ झाला नाहीं ॥ १ ॥ कीर्तनें जन्मला ॥ हरिभक्तीनें शिंपिला ॥ २ ॥ आळवितसे अंतवरी ॥ वाचा नाम लोहा करीं ॥ ३ ॥ समूळ झाला नाहीं ॥ देहें जनी विठ्ठलपायीं ॥ ४ ॥

॥ २७५१ ॥ मी तों समर्थाची दासी ॥ मिठी घालीन पायासी ॥ १ ॥ हाचि माझा दृढभाव ॥ करीन नामाचा उत्सव ॥ २ ॥ आह्मां दासींस हें काम ॥ मुखीं विठ्ठल हरिनाम ॥ ३ ॥ सर्व सुख पायीं लोळे ॥ जनी-संगें विठ्ठल बोले ॥ ४ ॥

॥ २७५२ ॥ तुझा लोभ नाहीं देवा ॥ तुझी करिना मी सेवा ॥ १ ॥ नाहीं अंगीं थोरपण ॥ मिथ्या धरिसी गुमान ॥ २ ॥ रागा येउनी काय करिशी ॥ तुझें बळ आह्मांपाशीं ॥ ३ ॥ नाहीं सामर्थ्य तुज हरी ॥ जनी ह्मणे धरिली चोरी ॥ ४ ॥

॥ २७५३ ॥ संतसभा पंढरींत ॥ कीर्तनाचा गजर होत ॥ १ ॥ करीत जेथें देव उभा ॥ समचरणींची शोभा ॥ २ ॥ रंग भरे कीर्तनांत ॥ तेणें हरिदास नाचत ॥ ३ ॥ सखा विरळा ज्ञानेश्वर ॥ नामयाचा जो जिव्हार ॥ ४ ॥ ऐशा संतांसी शरण जाऊं ॥ जनी ह्मणे त्याला ध्याऊं ॥ ५ ॥

॥ २७५४ ॥ तुझे चरणीं घालीन मिठी ॥ चाड नाहीं रे वैकुंठीं ॥ १ ॥ सर्व भावें गाईन नाम ॥ सखा तूंचि आत्माराम ॥ २ ॥ नित्य पाय वंदिन माथा ॥ तेणें नासे भवभय व्यथा ॥ ३ ॥ रूप न्याहाळीन दृष्टी ॥ सर्व सुखें सांगेन गोष्टी ॥ ४ ॥ दीनानाथा चक्रपाणी ॥ दासी जनी लावी ध्यानीं ॥ ५ ॥

॥ २७५५ ॥ जात्या वरिल्या गीतासी ॥ दळण मिसे गोविंदासी ॥ १ ॥ देहबुद्धीचें वैरण ॥ बरवा दाणा तो निसून ॥ २ ॥ विठ्ठलाची ज्यासी गोडी ॥ जनी ह्मणे ते आवडी ॥ ३ ॥

॥ २७५६ ॥ नित्य सारूं हरिकथा ॥ तेथें काळ काय आतां ॥ १ ॥ वनवासी कां धाडिलें ॥ कृपाळें वा हो विठ्ठलें ॥ २ ॥ आशा मनशा तृषा तिन्हीं ॥ ह्या तो ठेविल्या बांधोनी ॥ ३ ॥ काम क्रोध विषय झालें ॥ हे तो मोहोनी राहिलें ॥ ४ ॥ अवलोकुनी कृपादृष्टी ॥ जनी ह्मणे देई भेटी ॥ ५ ॥

॥ २७५७ ॥ माझी पहा हो हरिणी ॥ गुंतलीसे कोणे वनीं ॥ १ ॥ मुकें तुझें मी पाडस ॥ चुकल्यें भितें पाहें वास ॥ २ ॥ चुकली माझी वो हरिणी ॥ फिरतसे रानोरानीं ॥ ३ ॥ आतां भेट जावोनी ॥ ह्मणतसे दासी जनी ॥ ४ ॥

॥ २७५८ ॥ स्मरण तें हेंचि करूं ॥ वाचे रामराम स्मरूं ॥ १ ॥ आणिक न करूं तें काम ॥ वाचे धरूं हाचि नेम ॥ २ ॥ सुकृताचें फळ ॥ जनी ह्मणे हें केवळ ॥ ३ ॥

॥ २७५९ ॥ सत्वरजतमें असे हें बांधिलें ॥ शरीर दृढ झालें अहंकारें ॥ १ ॥ सांडी अहंकार धरी दृढभाव ॥ हृदयीं पंढरिराव धरोनियां ॥ २ ॥ नामयाची जनी भक्तीसी भुलली ॥ ते चरणीं राहिली विठोबाचे ॥ ३ ॥

॥ २७६० ॥ मनामागें मन लावूं ॥ तेथें सर्व सुख पाहूं ॥ १ ॥ मग आह्मां काय उणें ॥ दया करी नारायण ॥ २ ॥ जनी ह्मणे ऐसें मन ॥ करूं देवा हो आधिन ॥ ३ ॥

॥ २७६१ ॥ आतां भीत नाहीं देवा ॥ आदि अंत तुझा ठावा ॥ १ ॥ झालों नामाचेनी बळकट ॥ तेणें वैकुंठ पायवाट ॥ २ ॥ ज्ञान वैराग्य विवेक बळें ॥ तें तंव आह्मांसवें खेळे ॥ ३ ॥ दया क्षमा आह्मापुढें ॥ जनी ह्मणे झाले वेडे ॥ ४ ॥

॥ २७६२ ॥ मी तों समर्थाची दासी ॥ देव आणीन संतांपाशीं ॥ १ ॥ आह्मां दासीचें काम ॥ मुखीं हरि हरिनाम ॥ २ ॥ हाचि माझा दृढभाव ॥ मुखीं नामाचा उत्सव ॥ ३ ॥ सर्व सुख पायीं लोळे ॥ विठो जनी संगें खेळे ॥ ४ ॥

॥ २७६३ ॥ माझें चित्त तुझ्या पायीं ॥ ठेवीं वेळोवेळां पायीं ॥ १ ॥ मुखीं उच्चार नामाचा ॥ कायामनें जीवें वाचा ॥ २ ॥ धरणें तें ऐसें धरूं ॥ जनी ह्मणे विठ्ठल स्मरूं ॥ ३ ॥

॥ २७६४ ॥ आह्मी पातकाच्या राशी ॥ आलों तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥ मना येईल तें तूं करी ॥ आतां तारी अथवा मारी ॥ २ ॥ जनी ह्मणे सृष्टीवरी ॥ एक अससी तूं बा हरी ॥ ३ ॥

॥ २७६५ ॥ लज्जा सांडूनियां मांडावें दुकान ॥ तेव्हां नारायण जोडी होय ॥ १ ॥ हातीं घेईन टाळ खांद्यावरी विणा ॥ कोण मज मना करती आतां ॥ २ ॥ डोईचा पदर पडला खांद्यावरी ॥ भरल्या बाजारीं

जाईन तशी ॥ ३ ॥ जनी ह्मणे देवा झाल्यें मी वेसवा ॥ निघालें केशवा घर तुझें ॥ ४ ॥

॥ २७६६ ॥ चला पंढरीसी जाऊं ॥ रखुमादेवीवर पाहूं ॥ १ ॥ स्नान करूं भिवरेसी ॥ पुंडलिका पायांपाशीं ॥ २ ॥ डोळे भरून पाहूं देवा ॥ तेणें ईश्वर जीवाभावा ॥ ३ ॥ ऐसा निश्चय करुनी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २७६७ ॥ आह्मी स्वर्गलोक मानु जैसा ओक ॥ देखोनियां सुख वैकुंठींचें ॥ १ ॥ नलगे वैकुंठ न वांछूं कैलासा ॥ सर्वस्वाची आस विठोपायीं ॥ २ ॥ नलगे संतति धन आणि मान ॥ एक करणें ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥ सत्य कीं मायी आमुचें बोलणें ॥ तुमची तुह्मा आण सांगा हरी ॥ ४ ॥ जीवभाव आह्मी सांडूं ओंवाळुनी ॥ ह्मणे दासी जनी नामयाची ॥ ५ ॥

॥ २७६८ ॥ मना लागो हाचि धंदा ॥ रामकृष्ण हरि गोविंदा ॥ १ ॥ जिव्हे करूं नित्य नेम ॥ सदां विठोबाचें नाम ॥ २ ॥ नामामध्यें नामसार ॥ जप करी निरंतर ॥ ३ ॥ ह्मणे जनी नाम घेणें ॥ नाममंत्रें शंकर होणें ॥ ४ ॥

॥ २७६९ ॥ आतां येतों स्वामी आह्मी ॥ कृपा असो द्यावी तुह्मी ॥ १ ॥ बहु दिवस सांभाळ केला ॥ पुन्हा जन्म नाहीं दिला ॥ २ ॥ थोर सुकृताच्या राशी ॥ तुमचे पाय मजपाशीं ॥ ३ ॥ ऐसा नामदेव बोले ॥ ऐकोनी दासी जनी डोले ॥ ४ ॥

॥ २७७० ॥ कांगे निष्ठुर झालीसी ॥ मुक्या बाळातें सांडिसी ॥ १ ॥ तुज वांचोनियां माये ॥ जीव माझा जावों पाहे ॥ २ ॥ मी वत्स माझी माय ॥ नये आतां करूं काय ॥ ३ ॥ प्राण धरियेला कंठीं ॥ जनी ह्मणे देई भेटी ॥ ४ ॥

॥ २७७१ ॥ सख्या घेतलें पदरीं ॥ आतां न टाकावें दुरी ॥ १ ॥ थोराचीं उचितें ॥ हेंचि काय सांगों तूंतें ॥ २ ॥ ब्रह्मियाचा ताता ॥ सजना लक्ष्मीच्या कांता ॥ ३ ॥ आपुली ह्मणवुनी ॥ आण गावी दासी जनी ॥ ४ ॥

॥ २७७२ ॥ शिणलें डोळुलें ॥ कांहो न येसी विठ्ठले ॥ १ ॥ तूं माझी वो जननी ॥ मला कां टाकिसी वनीं ॥ २ ॥ धीर किती धरूं आतां ॥ घालीं कव धरी हाता ॥ ३ ॥ मज आवडी भेटीची ॥ धणी घेईन मी पायांची ॥ ४ ॥ सर्वा जिवांची स्वामिणी ॥ ह्मणे जनी मायबहिणी ॥ ५ ॥

॥ २७७३ ॥ माझें दुःख नाशी देवा ॥ मज सुख दे केशवा ॥ १ ॥ आह्मा सुख ऐसें देई ॥ तुझी कृपा विठाबाई ॥ २ ॥ चरणीं अनन्य शरण ॥ त्यासी नाहीं जन्म मरण ॥ ३ ॥ जनी ह्मणे हेंचि मागें ॥ धण्या सर्व तुज सांगें ॥ ४ ॥

॥ २७७४ ॥ अहो देवा हरिहर ॥ उतरी आह्मा भवपार ॥ १ ॥ देवा आह्मी तुझे दास ॥ करूं वैकुंठीं वो वास ॥ २ ॥ जनी ह्मणे कल्पवृक्ष ॥ देव दृष्टासी पैं भक्ष ॥ ३ ॥

॥ २७७५ ॥ हात निढळावरी ठेवुनी ॥ वाट पाहे चक्रपाणी ॥ १ ॥ धांव धांव पांडुरंगें ॥ सखे जिवलगे अंतरंगें ॥ २ ॥ तुज वांचुनी दाही दिशा ॥ वाट पाहातें जगदीशा ॥ ३ ॥ हांसें करूं नको जनासी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ ४ ॥

॥ २७७६ ॥ साधु आणि संत ॥ जन्म द्यावा जी कलीत ॥ १ ॥ मागणें तें हेंचि देवा ॥ कृपा करी हो केशवा ॥ २ ॥ संत दयाळ परम ॥ तया साक्षी नारायण ॥ ३ ॥ जनी ह्मणे ऐसे साधु ॥ तयापाशीं तूं गोविंदु ॥ ४ ॥

॥ २७७७ ॥ विटेवरी ब्रह्म दिसे ॥ साधु संतांचा रहिवास ॥ १ ॥ देव भावाचा अंकित ॥ जाणें दासाचें तें चित्त ॥ २ ॥ भक्ति जनी मागे देवा ॥ तिचा मनोरथ पुरवा ॥ ३ ॥

॥ २७७८ ॥ येई जीवाचिया जीवा ॥ रामा देवाचिया देवा ॥ १ ॥ सर्व देव बंदीं पडिले ॥ रामा तुम्ही सोडविले ॥ २ ॥ मारूनियां लंकापती ॥ सोडविली सीता सती ॥ ३ ॥ देवा तुमची ऐसी ख्याती ॥ रुद्रादिक ते वर्णिती ॥ ४ ॥

॥ २७७९ ॥ शरण आलों नारायणा ॥ आतां तारी हो पावना ॥ १ ॥ शरण आला मारुतिराया ॥ त्याची दिव्य केली काया ॥ २ ॥

शरण प्रल्हाद तो आला ॥ हिरण्यकश्यपू मारिला ॥ ३ ॥ जनी ह्मणे देवा शरण ॥ व्हावें भल्यानें जाणोन ॥ ४ ॥

॥ २७८० ॥ रुक्माई आईचें आहे ऐसें भाग्य ॥ असावें आरोग्य चिरकाळ ॥ १ ॥ सख्या पुंडलिका आवडतें स्थळ ॥ असावें चिरकाळ स्वास्ति क्षेम ॥ २ ॥ अहो संतजनच्या आवडतें धन ॥ असावें कल्याण चिरकाळ ॥ ३ ॥ जन्मोजन्मीं हेंचि मागें गोविंदासी ॥ ह्मणे जनी दासी नामयाची ॥ ४ ॥

॥ २७८१ ॥ माझिये जननी हरिणी ॥ गुंतलीस कवणे वनीं ॥ १ ॥ मुकें तुझें मी पाडस ॥ चुकलों माये पाहे त्यास ॥ २ ॥ चुकली माझिये हरिणी ॥ फिरतसे रानोरानीं ॥ ३ ॥ आतां भेटवा जननी ॥ विनवितसे दासी जनी ॥ ४ ॥

॥ २७८२ ॥ गंगा गेली सिंधुपाशीं ॥ त्याणें अव्हेरिलें तिसी ॥ १ ॥ तरी तें सांगावें कवणाला ॥ ऐसें बोले वा विठ्ठला ॥ २ ॥ जळ काय जळचरा ॥ माता अव्हेरी लेंकुरा ॥ ३ ॥ जनी ह्मणे शरण आलें ॥ अव्हेरितां ब्रीद गेलें ॥ ४ ॥

॥ २७८३ ॥ परधन कामिनी समूळ नाणी मना ॥ नाहीं हे वासना माया केली ॥ १ ॥ तृष्णा हे अधम न व्हावी मजला ॥ प्रेमाचा जिव्हाळा देई तुझ्या ॥ २ ॥ निरपेक्ष वासना देगा मज देवा ॥ आणि तुझी सेवा आवडीची ॥ ३ ॥ शांतीची भूषणें मिरविती अंगीं ॥ वैष्णव आणि योगी ह्मणावे ते ॥ ४ ॥ असो तो अकुळी असो भलते याती ॥ माथां वंदी प्रीति जनी दासी ॥ ५ ॥

॥ २७८४ ॥ जेवी जेवी वा मुरारी ॥ तुज वाढिली शिदोरी ॥ १ ॥ कनकाचे ताटीं ॥ रत्नजडित ठेविली वाटी ॥ २ ॥ आमुचें ब्रह्म सारंगपाणी ॥ हिंडतसे रानोरानीं ॥ ३ ॥ गोपाळांचे मेळीं ॥ हरि खेळे चेंडूफळी ॥ ४ ॥ तुळसीचे वनीं ॥ उभी राहे दासी जनी ॥ ५ ॥

॥ २७८५ ॥ माझी आंधळ्याची कांठी ॥ अडकली कवणे बेटीं ॥ १ ॥ आतां सांगूं मी कवणासी ॥ धांवे पावे हृषीकेशी ॥ २ ॥ तुजवांचुनी विठ्ठला ॥ कोणी नाहीं रे मजला ॥ ३ ॥ माथा ठेवी तुझे चरणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २७८६ ॥ सख्या पंढरीच्या नाथा ॥ मज कृपा करी आतां ॥ १ ॥ ऐसें करी अखंडित ॥ शुद्ध नेम शुद्ध व्रत ॥ २ ॥ वेधु माझ्या चित्ता ॥ हाचि लागो पंढरिनाथा ॥ ३ ॥ जीव ओंवाळुनी ॥ जन्मोजन्मीं दासी जनी ॥ ४ ॥

॥ २७८७ ॥ आतां वाट पाहूं किती ॥ देवा रुक्माईच्या पती ॥ १ ॥ येई येई पांडुरंगें ॥ भेटी देई मज संगें ॥ २ ॥ मी बा बुडतें बहु जळीं ॥ सांग वरवी ब्रीदावळी ॥ ३ ॥ राग न धरावा मनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ३ ॥

॥ २७८८ ॥ वाट पाहतें मी डोळां ॥ कांगा न येसी विठ्ठला ॥ १ ॥ तूं वो माझी निज जननी ॥ मज कां टाकियेलें वनीं ॥ २ ॥ धीर किती धरूं आतां ॥ कव घाली पंढरिनाथा ॥ ३ ॥ मला आवड भेटीची ॥ धनी घेईन पायांची ॥ ४ ॥ सर्व जिवांचे स्वामिणी ॥ ह्मणे जनी मायबहिणी ॥ ५ ॥

॥ २७८९ ॥ येई येई विठाबाई ॥ माझे पंढरीचे आई ॥ १ ॥ भीमा आणि चंद्रभागा ॥ तुझ्या चरणींच्या गंगा ॥ २ ॥ इतक्यासहित तूं बा यावें ॥ माझे रंगणीं नाचावें ॥ ३ ॥ माझा रंग तुझे गुणीं ॥ बोले नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २७९० ॥ अहो द्वारकेच्या राया ॥ ज्ञान देई नाम घ्याया ॥ १ ॥ मतिमूढ मी तुझी दासी ॥ ठाव देई चरणापाशीं ॥ २ ॥ तुझे पदरीं पडल्यें खरी ॥ माझा सांभाळ करी हरी ॥ ३ ॥ नकळे हरिची करणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २७९१ ॥ कां गा न येसी विठ्ठला ॥ ऐसा कोण दोष मला ॥ १ ॥ मायबाप तूंचि धनी ॥ मला सांभाळीं निर्वाणीं ॥ २ ॥ त्वां बा उद्धरिले थोर ॥ तेथें किती मी पामर ॥ ३ ॥ दीनानाथा दीनबंधू ॥ जनी ह्मणे कृपासिंधू ॥ ४ ॥

॥ २७९२ ॥ विठोबारायाच्या अगा लेकवळा ॥ जाउनी कळवळा सांगा माझा ॥ १ ॥ विठोबारायाच्या अगा मुख्य प्राणा ॥ भेटवी निधाना आपुलिया ॥ २ ॥ अगे क्षेत्र माये सखे पंढरिये ॥ मोकलीं तें पाय जीव जातो ॥ ३ ॥ विश्वाचिये मातें सुखाचें अमृतें ॥ सखा पंढरिनाथ त्रिनवी

तरी ॥ ४ ॥ तूं मायबहिणी देवाचे रुक्मिणी ॥ धरोनियां जनी घाली पायीं ॥ ५ ॥

॥ २७९३ ॥ अहो ब्रह्मांड पाळका ॥ ऐके रुक्मिणीच्या कुंका ॥ १ ॥ देवा घेतलें पदरीं ॥ तें तूं टाकूं नको दुरी ॥ २ ॥ होतें लोकांमध्यें निंद्य ॥ तें त्वां जगांत केलें वंद्य ॥ ३ ॥ विनवीतसे दासी जनी ॥ परिसावी माझी विनवणी ॥ ४ ॥

॥ २७९४ ॥ देवा देई गर्भवास ॥ तरीच पुरेल माझी आस ॥ १ ॥ पारि हे देखारे पंढरी ॥ सेवा नामयाचे द्वारीं ॥ २ ॥ करी पक्षि कां सूकर ॥ श्वान श्वापद मार्जार ॥ ३ ॥ ऐसी आशा हे मानसीं ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ ४ ॥

॥ २७९५ ॥ तुझे पाय रूप डोळां ॥ नाहीं देखीलें गोपाळा ॥ १ ॥ काय करूं या कर्मासी ॥ नाश होतो आयुष्यासी ॥ २ ॥ जन्मा येऊनियां दुःख ॥ नाहीं पाहीलें श्रीमुख ॥ ३ ॥ लळे पुरविसी आमुचे ॥ ह्मणे जनी ब्रिद साचें ॥ ४ ॥

॥ २७९६ ॥ पुंडलिकें नवल केलें ॥ गोपिगोपाळ आणिले ॥ १ ॥ हेंचि देई हृषीकेषी ॥ तुझें नाम अहर्निशीं ॥ २ ॥ नलगे आणिक प्रकार ॥ मुखीं हरि निरंतर ॥ ३ ॥ रूप न्याहाळिन डोळां ॥ पुढें नाचेन वेळोवेळां ॥ ४ ॥ सर्वाठायीं तुज पाहे ॥ ऐसें देउनी करी साह्य ॥ ५ ॥ धांवा करितां रात्र झाली ॥ दासी जनीसी भेट दिली ॥ ६ ॥

॥ २७९७ ॥ खंडेराया तुज करितें नवस ॥ मरूं दे रे सासू खंडेराया ॥ १ ॥ सासू मेल्यावरी तुटेल आसरा ॥ मरूं दे सासरा खंडेराया ॥ २ ॥ सासरा मेलिया होईल आनंद ॥ मरूं दे नणंद खंडेराया ॥ ३ ॥ नणंद मरतां होईन मोकळी ॥ गळां घालीन झोळी भंडाराची ॥ ४ ॥ जनी ह्मणे खंडो अवघे मरूं दे ॥ एकटी राहूं दे पायापासीं ॥ ५ ॥

॥ २७९८ ॥ काय करूं या कर्मासी ॥ धांव पाव हृषीकेशी ॥ १ ॥ नाश होतो आयुष्याचा ॥ तुझें नांव नये वाचा ॥ २ ॥ काय जिणें या देहाचें ॥ अखंड अवघ्या रात्रीचें ॥ ३ ॥ व्यर्थ कष्टविली माता ॥ तुझें नाम नये गातां ॥ ४ ॥ जन्म मरणाचें दुःख ॥ ह्मणे जनी दाखवीं मुख ॥ ५ ॥

॥ २७९९ ॥ आधीं घेतलें पदरीं ॥ आतां न धरावें दुरी ॥ १ ॥ तुह्मा थोराचें उचित ॥ हेंचि काय सांग तूतें ॥ २ ॥ अहो ब्रह्मियाच्या ताता ॥ सखया लक्ष्मीच्या कांता ॥ ३ ॥ दयेच्या सागरा ॥ जनी ह्मणे अमरेश्वरा ॥ ४ ॥

॥ २८०० ॥ आह्मीं जावें कवण्या ठायां ॥ न बोलसी पंढरिराया ॥ १ ॥ सरिता गेली सिंधूपाशीं ॥ जरी तो ठाव न दे तिसी ॥ २ ॥ जळ कोपलें जळचरासी ॥ माता न घे बाळकासी ॥ ३ ॥ ह्मणे जनी आलें शरण ॥ जरी त्वां धरिलेंसें मौन्य ॥ ४ ॥

॥ २८०१ ॥ हा दीनवत्सल महाराज ॥ जना सर्वें काय काज ॥ १ ॥ तुझी नाहीं केली सेवा ॥ दुःख वाटे माझ्या जीवा ॥ २ ॥ रात्रंदिवस मजपाशीं ॥ दळूकांडू तूं लागसी ॥ ३ ॥ जें जें दुःख झालें मला ॥ तें तें सोसिलें विठ्ठला ॥ ४ ॥ क्षमा कीजे पंढरिराया ॥ दासी जनी लागे पायां ॥ ५ ॥

॥ २८०२ ॥ पंढरी सांडोनी जाती वाराणसी ॥ काय सुख त्यासी आहे तेथें ॥ १ ॥ तया पंचक्रोसी ह्मणती मरावें ॥ मरोनियां व्हावें जीवन्मुक्त ॥ २ ॥ नको गा विठोबा मज धाडूं काशी ॥ सांगेन तुजपाशीं ऐक आतां ॥ ३ ॥ मरचीमात्र वेरण स्तंभीं घाली ॥ घालोनिया गाळी पापपुण्य ॥ ४ ॥ जावोनिया तेथें प्रहर दोन रात्रीं ॥ सत्य मिथ्या श्रोतीं श्रवण करा ॥ ५ ॥ आई आई बा बा ह्मणती काय करूं ॥ ऐसें दुःख थोरू आहे तेथें ॥ ६ ॥ इक्षुदंड घाणा जैसा भरी माळी ॥ तैसा तो कवळी काळनाथ ॥ ७ ॥ लिंगदेहादिक करिती कंदन ॥ तेथील यातना नको देवा ॥ ८ ॥ न जाय तो जीव एकसरी हरी ॥ रडती नानापरी नाना दुःखें ॥ ९ ॥ अमरादिक थोर थोर भांबावले ॥ भुलोनिया गेले मुक्तीसाठीं ॥ १० ॥ ती ही मुक्ति माझी खेळे पंढरीसी ॥ लागतां पायांसी संताचिया ॥ ११ ॥ ऐसिये पंढरी पहाती शिखरीं ॥ आणि भीमातीरीं मोक्ष आला ॥ १२ ॥ सख्या पुंडलिका लागतांची पाया ॥ मुक्ति ह्मणे वायां गेलीं मीं कीं ॥ १३ ॥ घर रिघवणी मुक्ति होय दासी ॥ मोक्ष तो पाठीसी धांव घाली ॥ १४ ॥ मोक्ष सुखासाठीं मुक्ति लोळे ॥ बीं नेघे कोणी कदां काळीं ॥ १५ ॥ मोक्ष मुक्ति जिही हाणितल्या

पायीं ॥ आमुची ती काय धरिती सोय ॥ १६ ॥ समर्थाचे घरीं भिक्षा नानापरी ॥ मागल्या पदरीं घालिताती ॥ १७ ॥ अंबोल्या सांडोनी कोण मागें भीक ॥ सांराजाचें सुख तुझें ॥ १८ ॥ जनी ह्मणे तुज रखुमाईची आण ॥ जरी मज क्षण विसंबसी ॥ १९ ॥

॥ २८०३ ॥ ऐसा वर देईं हरी ॥ गाईं नाम निरंतरीं ॥ १ ॥ पुरवी आस माझी देवा ॥ जेणें घडे तुझी सेवा ॥ २ ॥ हेंचि आहे माझे मनीं ॥ कृपा करी चक्रपाणी ॥ ३ ॥ रूप न्याहाळुनियां डोळां ॥ मुखीं नाम लागो चाळा ॥ ४ ॥ उदाराच्या राया ॥ दासी जनी लागे पाया ॥ ५ ॥

॥ २८०४ ॥ काय करूं पंढरिनाथा ॥ काळ साह्य नाहीं आतां ॥ १ ॥ मज टाकिलें परदेशीं ॥ नारा विठा तुजपाशीं ॥ २ ॥ श्रम बहु झाला जीवा ॥ आतां सांभाळी केशवा ॥ ३ ॥ कोण सखा तुजवीण ॥ माझें करी समाधान ॥ ४ ॥ हीन दीन तुझे पोटीं ॥ जनी ह्मणे द्यावी भेटी ॥ ५ ॥

॥ २८०५ ॥ ऐक बापा हृषीकेशी ॥ मज ठेवी पायांपाशीं ॥ १ ॥ तुझें रूप पाहीन डोळां ॥ मुखीं नाम वेळोवेळां ॥ २ ॥ हातीं धरिल्याची लाज ॥ माझें सर्व करी काज ॥ ३ ॥ तुजविण देवराया ॥ कोणी नाहीं रे सखया ॥ ४ ॥ कमळापति कमळपाणी ॥ दासी जनी लागे चरणीं ॥ ५ ॥

॥ २८०६ ॥ पोट भरुनी व्यालासी ॥ मज सांडुनी कोठें जासी ॥ १ ॥ धिरा धिरा पांडुरंगा ॥ मज कां टाकिलें निःसंगा ॥ २ ॥ ज्याचा जार त्यासी भार ॥ मजला नाहीं आणिक थार ॥ ३ ॥ विठाबाई माय-बहिणी ॥ तुझे कृपें तरली जनी ॥ ४ ॥

॥ २८०७ ॥ ऐक बापा माझ्या पंढरीच्या राया ॥ कीर्तना आल्यें या आर्तभूतां ॥ १ ॥ माझ्या दुणेदारा पुरवी त्याची आस ॥ न करी निरास आर्तभूतां ॥ २ ॥ त्यैलोक्याच्या राया सख्या उमरावा ॥ अभय तो द्यावा कर तया ॥ ३ ॥ जैसा चंद्रश्रवा सूर्या उच्चैश्रवा ॥ अढळपद ध्रुवा दिधलेंसें ॥ ४ ॥ उपमन्यु बाळका क्षीराचा सागरू ॥ ऐसा तूं दातारु काय वानूं ॥ ५ ॥ ह्मणे दासी जनी आले या कीर्तनीं ॥ तया कंटाळुनी पिटूं नका ॥ ६ ॥

॥ २८०८ ॥ राजाई गोणाई ॥ अखंडित तुझे पायीं ॥ १ ॥ मज ठेवियेलें द्वारीं ॥ नीच ह्मणोनी बाहेरी ॥ २ ॥ नारा गोंदा महादा

विठा ॥ ठेवियलें अग्रवाटा ॥ ३ ॥ देवा केव्हां क्षेम देसी ॥ आपुली ह्मणोनी जनी दासी ॥ ४ ॥

॥ २८०९ ॥ अविद्येच्या वो रात्रीं ॥ आडकलों अंधारीं ॥ १ ॥ तेथुनी काढावें गोविंदा ॥ यशोदेच्या परमानंदा ॥ २ ॥ तुझे सन्निधेचे पाशीं ॥ ठाव नाहीं अविद्येसी ॥ ३ ॥ तुझे संगती पावन ॥ उद्धरिलें ब्रह्में पूर्ण ॥ ४ ॥ अजामेळ शुद्ध केला ॥ ह्मणे दासी जनी भला ॥ ५ ॥

॥ २८१० ॥ धन कलत्र माय ॥ सर्व जोडी तुझे पाय ॥ १ ॥ सखा तुजवीण पाही ॥ दुजा कोणी मज नाहीं ॥ २ ॥ माझी न करावी सांडणी ॥ ह्मणे तुझी दासी जनी ॥ ३ ॥

॥ २८११ ॥ रुक्मिणीच्या कुंका ॥ सुरा अमरा प्रियलोकां ॥ १ ॥ तूं धाव माझे आई ॥ सखे साजणी विठाबाई ॥ २ ॥ शिवाचिया जपा ॥ मदनताता या निष्पापा ॥ ३ ॥ दयेच्या सागरा ॥ ह्मणे जनी अमरेश्वरा ॥ ४ ॥

॥ २८१२ ॥ ऐसा पुत्र देईं संता ॥ तरी त्या आवडी पंढरिनाथा ॥ १ ॥ गीता नित्य नेमें ॥ वाची ज्ञानेश्वरी प्रेमें ॥ २ ॥ संताच्या चरणा ॥ करी मस्तक ठेंगणा ॥ ३ ॥ कन्या व्हावी भागीरथी ॥ तुझें प्रेम जीचे चित्तीं ॥ ४ ॥ ऐसे करी संतजना ॥ दासी जनीच्या निधाना ॥ ५ ॥

॥ २८१३ ॥ मी वत्स माझी गायी ॥ नये आतां करूं काई ॥ १ ॥ तुह्मीं तरी सांगा कांहीं ॥ शेखी विनवा विठाबाई ॥ २ ॥ येई माझिये हरणी ॥ चुकलें पाडस दासी जनी ॥ ३ ॥

॥ २८१४ ॥ सख्या पंढरीच्या राया ॥ घडे दंडवत पायां ॥ १ ॥ ऐसें करी अखंडित ॥ शुद्ध प्रेम शुद्ध चित्त ॥ २ ॥ वेध माझ्या चित्ता ॥ हाचि लागो पंढरिनाथा ॥ ३ ॥ जावें ओवाळुनी ॥ जन्मोजन्मीं ह्मणे जनी ॥ ४ ॥

॥ २८१५ ॥ कांगा उशीर लाविला ॥ माझा विसर पडिला ॥ १ ॥ तुजवरी संसार ॥ बोलविलें घरदार ॥ २ ॥ तो तूं आपुल्या दासासी ॥ ह्मणे जनी विसंबसी ॥ ३ ॥



॥ २८१६ ॥ किती सांगूं तूतें ॥ बुद्धि शिकवणें हें मातें ॥ १ ॥ सोम-वंशाच्या भूषणा ॥ प्रतिपाळीं हर्षे दीना ॥ धृ० ॥ शिकवावें तूतें ॥ हाचि अपराध आमुतें ॥ २ ॥ स्वामीलागी धीट ऐसी ॥ ह्मणती शिकवी जनी दासी ॥ ३ ॥

॥ २८१७ ॥ अहो सखीये साजनी ॥ ज्ञानाबाई वो हरणी ॥ १ ॥ मज पाडसाची माय ॥ भक्ति वत्साची ते गाय ॥ धृ० ॥ कांगा उशीर लाविला ॥ तुजविण शिण झाला ॥ २ ॥ अहो बैसलें दळणी ॥ धांव घाली ह्मणे जनी ॥ ३ ॥

॥ २८१८ ॥ शिणल्या बाह्या आतां ॥ येऊनियां लावी हाता ॥ १ ॥ तूं माझें वो माहेर ॥ काय पहातोसी अंतर ॥ धृ० ॥ वोंवाळुनी पायां ॥ जीवें-भावें पंढरिराया ॥ २ ॥ धर्म ताता धर्म लेंकी ॥ ह्मणे जनी हें विलोकी ॥ ३ ॥

॥ २८१९ ॥ योग न्यावा सिद्धी ॥ सकळ गुणाचिया निधी ॥ १ ॥ अरूपाच्या रूपा ॥ सांभ राजाचिया जपा ॥ २ ॥ ब्रह्मियाचा ताता ॥ ह्मणे जनी पंढरिनाथा ॥ ३ ॥

॥ २८२० ॥ माय मेली बाप मेला ॥ आतां सांभाळी विठ्ठला ॥ १ ॥ मी तुझें गा लेंकरूं ॥ नको मजशीं अव्हेरू ॥ धृ० ॥ मतिमंद मी तुझी दासी ॥ ठाव द्यावा पायांपाशीं ॥ २ ॥ तुजविण सखे कोण ॥ माझें करील संरक्षण ॥ ३ ॥ अंत किती पाहासी देवा ॥ थोर श्रम झाला जीवा ॥ ४ ॥ सकळ जिवाच्या जीवना ॥ ह्मणे जनी नारा-यणा ॥ ५ ॥

॥ २८२१ ॥ गजेंद्रासी उद्धरिलें ॥ आह्मी तुझें काय केलें ॥ १ ॥ तारिली गणिका ॥ तिहीं लोकीं तुझा शिक्का ॥ २ ॥ वाल्हा कोळी अजा-मेळ ॥ पापी केला पुण्यशीळ ॥ ३ ॥ गुणदोष मना नाणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २८२२ ॥ गातां विठोबाची कीर्ती ॥ महापातकें जळती ॥ १ ॥ सर्व सुखाचा आगर ॥ उभा असे विटेवर ॥ २ ॥ आठवितां पाय साचे ॥

मग तुह्मां भय कैंचें ॥ ३ ॥ कायावाचा मनें भाव ॥ जनी ह्मणे गावा देव ॥ ४ ॥

॥ २८२३ ॥ हरिहर ब्रह्मादिक ॥ नामें तरले तिन्ही लोक ॥ १ ॥ ऐसा कथेचा महिमा ॥ झाली बोलायाची सीमा ॥ २ ॥ जपें तपें लाजविलीं ॥ तीर्थें शरणांगत आलीं ॥ ३ ॥ नामदेवा कीर्त्तनीं ॥ ध्वजा आल्या स्वर्गाहुनी ॥ ४ ॥ देव श्रुतीं देती ग्वाही ॥ जनी ह्मणे सांगूं कायी ॥ ५ ॥

॥ २८२४ ॥ येऊं ऐसें जाऊं ॥ जनासंगें हेंचि दाऊं ॥ १ ॥ आपण करूं हरिकीर्त्तन ॥ जाणोनी भक्तीचें जीवन ॥ २ ॥ नाम संशयछेदन ॥ भवपाशाचें मोचन ॥ ३ ॥ जनी ह्मणे हो देवासीं ॥ होईल त्याला कसणी ऐसी ॥ ४ ॥

॥ २८२५ ॥ नाम फुकट चोखट ॥ नाम घेतां नये वीट ॥ १ ॥ जड शिळा ज्या सागरीं ॥ आत्मारामें नामें तारी ॥ २ ॥ पुत्रभावें स्मरण केलें ॥ तया वैकुंठासीं नेलें ॥ ३ ॥ नाम महिमा जनी जाणे ॥ ध्यातां विठ्ठलची होणें ॥ ४ ॥

॥ २८२६ ॥ एक नाम अवघें सार ॥ वरकड अवघें तें असार ॥ १ ॥ ह्मणोनियां परतें करा ॥ आधीं विठ्ठल हें स्मरण ॥ २ ॥ जनी देवाधि देव एक विठ्ठल पंढरिराव ॥ ३ ॥

॥ २८२७ ॥ तो हा भक्तांचे तोडरीं ॥ वाचे उच्चारितां हरी ॥ १ ॥ काम होउनी निष्काम ॥ काम भावभक्ति प्रेम ॥ २ ॥ तो हा पूर्ण काम होय ॥ अखंडित नाम गाय ॥ ३ ॥ काम निष्काम झाला मनीं ॥ वंदी नाचे दासी जनी ॥ ४ ॥

॥ २८२८ ॥ विठ्ठल नामाची नाहीं गोडी ॥ काळ हाणोनि तोंडफोडी ॥ १ ॥ गळां बांधोनी खांबासी ॥ विंचू लाविती जिव्हेसी ॥ २ ॥ ऐसा अभिमानी मेला ॥ नर्ककुंडीं थारा त्याला ॥ ३ ॥ नामा बोध करी मना ॥ दासी जनी लागे चरणा ॥ ४ ॥

॥ २८२९ ॥ नाम विठोबाचें थोर ॥ तरला कोळी आणि कुंभार ॥ १ ॥ ऐसी नामाची आवडी ॥ तुटे संसाराची बेडी ॥ २ ॥ नाम गाय वेळोवेळां ॥ दासी जनीसी नित्य चाळा ॥ ३ ॥

॥ २८३० ॥ माझा शिणभाग गेला ॥ तुज पाहतां विठ्ठला ॥ १ ॥ पाप ताप जाती ॥ तुझें नाम ज्याचे चित्तीं ॥ २ ॥ अखंडित नामस्मरण ॥ बांधूं न शके तया विघ्न ॥ ३ ॥ जनी ह्मणे हरिहर ॥ भजतां वैकुंठीं त्या घर ॥ ४ ॥

॥ २८३१ ॥ काय हें करावें ॥ धनवंतादि अघवे ॥ १ ॥ तुझें नाम नाहीं जेथें ॥ नको माझी आस तेथें ॥ २ ॥ तुजविण बोल न मानी ॥ करी ऐसें ह्मणे जनी ॥ ३ ॥

॥ २८३२ ॥ द्वारकेच्या राया ॥ बुद्धि देगा नाम गाया ॥ १ ॥ मतिमंद तुझी दासी ॥ ठाव देई चरणांपाशीं ॥ २ ॥ तुझे पदरीं पडलें खरी ॥ आतां सांभाळ करी हरी ॥ ३ ॥ नकळे हरिची करणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥




## भक्तिस्वरूप.

॥ २८३३ ॥ भक्ति ते कठीण इंगळाची खाई ॥ रिघणें त्या डोहीं कठीण असे ॥ १ ॥ भक्ति तें कठीण विषग्रास घेणें ॥ उदास पैं होणें जीवें भावें ॥ २ ॥ भक्ति ते कठीण भक्ति ते कठीण ॥ खड्गाची धार बाण न सोसी तया ॥ ३ ॥ भक्ति ते कठीण विचारूनी पाहे जनी ॥ भक्तियोगें संतसमागमीं सर्व सिद्धी ॥ ४ ॥

## स्वरूपस्थितीचें अभंग.

॥ २८३४ ॥ वामसव्य दोहींकडे ॥ देखूं कृष्णाचें रूपडें ॥ १ ॥ आतां खाले पाहूं जरी ॥ चहुंकडे दिसे हरी ॥ २ ॥ चराचरीं जें जें दिसे ॥ तें तें अविद्याची नासे ॥ ३ ॥ माझें नाठवे मीपण ॥ तेथें कैचें दुजेपण ॥ ४ ॥ सर्वांठायीं पूर्ण कळा ॥ दासी जनी पाहे डोळां ॥ ५ ॥

॥ २८३५ ॥ ऐसा आहे पांडुरंग ॥ भोगुनीया निःसंग ॥ १ ॥ अविद्येनें नवल केलें ॥ मायादेहें सत्य केलें ॥ २ ॥ जैसी वांझेची संतती ॥ तैसी संसार उत्पत्ती ॥ ३ ॥ तेथें कैंचि बोधराशी ॥ ब्रह्मीं पूर्ण जनी दासी ॥ ४ ॥

॥ २८३६ ॥ आपणची सारा ॥ पाहावें कीं नारीनरा ॥ १ ॥ पटा कारणें हें जनीं ॥ पांडुरंग तंतु मनीं ॥ २ ॥ भावेंविण भजलें ॥ भिऊनियां झांकी डोळे ॥ ३ ॥ ह्मणे काय पाहूं येतें ॥ भिन्न नव्हे वस्तु जेथें ॥ ४ ॥ भिन्नाभिन्न नाहीं मनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ५ ॥

॥ २८३७ ॥ आक्रोशें ध्यानासीं आणी पुरुषोत्तमा ॥ पृथ्वीयेसी क्षमा उणी आणी ॥ १ ॥ अखंडित शुद्ध असावें अंतर ॥ लोणिया कठोर वाटे मनीं ॥ २ ॥ बोलें तें वचन बहु हळुवट ॥ सुमना अंगीं दाट जडभार ॥ ३ ॥ नाम तें स्मरण अमृतसंजिवनी ॥ ह्मणे दासी जनी हेंचि करा ॥ ४ ॥

॥ २८३८ ॥ चिंतनीं चित्ताला ॥ लावी मनाच्या मनाला ॥ १ ॥ उन्मनीच्या मुखा आंत ॥ पांडुरंग भेटी देत ॥ २ ॥ कवटाळुनी भेटी पोटीं ॥ जनी ह्मणे सांगूं गोष्टी ॥ ३ ॥



॥ २८३९ ॥ पाय जोडुनी विटेवरी ॥ कर ठेउनी कटावरी ॥ १ ॥ रूप सांवळें सुंदर ॥ कानीं कुंडलें मकराकार ॥ २ ॥ गळां माळ वैजयंती ॥ पुढें गोपाळ नाचती ॥ ३ ॥ गरुड सन्मुख उभा ॥ ह्मणे जनी धन्य शोभा ॥ ४ ॥

॥ २८४० ॥ येगे माझे विठाबाई ॥ कृपादृष्टीनें तूं पाही ॥ १ ॥ तुजविण न सुचे कांहीं ॥ आतां मी वो करूं कांहीं ॥ २ ॥ माझा भाव तुजवरी ॥ आतां रक्षी नानापरी ॥ ३ ॥ येई सखये धांउनी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २८४१ ॥ मृदु वाहे पाणी ॥ वृजमानी ऐसे लाणी ॥ १ ॥ क्षमा ऐसी जिवी ॥ क्रोध भूत हें पृथ्वी ॥ २ ॥ गंधमाती सरी ॥ करुनी आपुली कस्तुरी ॥ ३ ॥ गुणदोष मना नाणी ॥ ह्मणे बहिरी होय जनी ॥ ४ ॥

॥ २८४२ ॥ रक्तवर्ण त्रिकुट स्नान ॥ श्रीहाट पाहे श्वेतवर्ण ॥ १ ॥ शामवर्ण तें गोलाट ॥ निळबिंदु औट पीट ॥ २ ॥ वरि भ्रमर गुंफा पाहे ॥ दशमद्वारी गुरु आहे ॥ ३ ॥ नव द्वाराते भेदुनी ॥ दशमद्वारीं गेली जनी ॥ ४ ॥

॥ २८४३ ॥ नित्य हाताने वारावें ॥ हृदय अंतरीं प्रेरित जावें ॥ १ ॥ ऐसा स्वरूपाचा पूर ॥ आला असे नेत्रावर ॥ २ ॥ स्वरूपाचे पूर आला ॥

पाहातां डोळां झाकूळला ॥ ३ ॥ जनी ह्मणे ऐसा पूर ॥ पाहे तोचि रघुवीर ॥ ४ ॥

॥ २८४४ ॥ झाली पूर्ण कृपा आहे ॥ ऐसा पूर जो कां पाहे ॥ १ ॥ ऐसा पूर जो कां पाहे ॥ गुरुपुत्र तोचि होय ॥ २ ॥ पूर्ण पदीं जो स्थापिला ॥ ३ ॥ जनी ह्मणे धन्य झाला ॥ ४ ॥

॥ २८४५ ॥ शून्यावरी शून्य पाहे ॥ तयावरी शून्य आहे ॥ १ ॥ प्रथम शून्य रक्तवर्ण ॥ त्याचें नांव आधःशून्य ॥ २ ॥ ऊर्ध्वशून्य श्वेत-वर्ण ॥ मध्य शून्य शामवर्ण ॥ ३ ॥ महा शून्य वर्ण नीळ ॥ सांत स्वरूप केवळ ॥ ४ ॥ आनुहात घंटा श्रवणीं ॥ ऐकुनी विस्मय जाहली जनी ॥ ५ ॥

॥ २८४६ ॥ जोत पहा झमकळी ॥ काय सांगूं त्याची बोली ॥ १ ॥ प्रवृत्ति निवृत्ति दोघींजणीं ॥ लीन होती त्याच्या चरणीं ॥ २ ॥ परा पश्यंती माधमा ॥ वैखरेंची झाली सीमा ॥ ३ ॥ त्याखाच्या खुंठित जाहाली ॥ सोहं जोती उभारली ॥ ४ ॥ जोत परब्रह्मी जाणा ॥ जनी ह्मणे निरं-जना ॥ ५ ॥

॥ २८४७ ॥ जोत परब्रह्मी होय ॥ खेचरी दर्पणीनें पाहे ॥ १ ॥ ईडा पिंगळा सुशुन्मा ॥ तिन्ही पाहे हृदय भुवना ॥ २ ॥ हळू हळू रीघ करी ॥ सूक्ष्म हृदय अंतरीं ॥ ३ ॥ हृदय कमळावरी जासी ॥ जनी ह्मणे मुक्त होसी ॥ ४ ॥

॥ २८४८ ॥ नाहीं आकाश घडणी ॥ पाहा स्वरूपाची खाणी ॥ १ ॥ स्वरूप हें अगोचर ॥ गुरु करिती गोचर ॥ २ ॥ गोचर करितां ती जाणा ॥ दृष्टि दिश निरंजना ॥ ३ ॥ नाहीं हात पाय त्यासी ॥ जनी ह्मणे स्वरूपासी ॥ ४ ॥

॥ २८४९ ॥ माझे मनीं जें जें होतें ॥ तें तें दिधलें अनंतें ॥ १ ॥ देह नेउनी विदेही केलें ॥ शांति देउनी मीपण नेलें ॥ २ ॥ मूळ हें दिलें क्रोधाचें ॥ ठाणें केलें विवेकाचें ॥ ३ ॥ निज पदीं दिधला ठाव ॥ जनी ह्मणे दाता देव ॥ ४ ॥

॥ २८५० ॥ काम लागे कृष्णापाठीं ॥ केली स्मशानाची गाठी ॥ १ ॥ परम कामें भुलविला ॥ कृष्ण स्मशानासी नेला ॥ २ ॥ भुलविला

मनीं ॥ रुद्र पाहोनी मोहनी ॥ ३ ॥ कन्येचिये पाठीं ॥ ब्रह्म लागे हत-वटी ॥ ४ ॥ काम पराशरालागीं ॥ ज्ञानासी लाविली आगी ॥ ५ ॥ काम गेला शुका पाठीं ॥ ह्मणे जनी मारी काठी ॥ ६ ॥

॥ २८५१ ॥ काळाचिये लेख ॥ नाहीं ब्रह्माविष्णु मुख्य ॥ १ ॥ युगा एक लव झडे ॥ तोही न सरे काळापुढें ॥ २ ॥ अविद्येनें नवल केलें ॥ मिथ्या देह सत्य केलें ॥ ३ ॥ महीपाळ स्वर्गपाळ ॥ तेही ग्रासले समूळ ॥ ४ ॥ वर्म चुकलीं बापुडी ॥ दासी जनी विठ्ठल जोडी ॥ ५ ॥

॥ २८५२ ॥ गगन सर्वत्र तत्वता ॥ त्यासी चिखल लावूं जातां ॥ १ ॥ तैसा जाण पांडुरंग ॥ भोग भोगुनी निःसंग ॥ २ ॥ सिद्ध सन-कादिक ॥ गणगंधर्व अनेक ॥ ३ ॥ जैसी वांझेची संतती ॥ तैसी संसार उत्पत्ती ॥ ४ ॥ तेथें कैचें धरिसी ध्यान ॥ दासी जनी ब्रह्म पूर्ण ॥ ५ ॥

॥ २८५३ ॥ श्रीमूर्ती असे बिंबली ॥ तरी हे देहस्थिति पालटली ॥ १ ॥ धन्य माझा इह जन्म ॥ हृदयीं विठोबाचें नाम ॥ ३ ॥ तृष्णा आणि आशा ॥ पळोनी गेल्या दाही दिशा ॥ ४ ॥ नामा ह्मणे जनी पाहे ॥ द्वारीं विठ्ठल उभा आहे ॥ ५ ॥

॥ २८५४ ॥ दळूं कांडूं खेळूं ॥ सर्व पाप ताप जाळूं ॥ १ ॥ सर्व जिवामध्यें पाहूं ॥ एक आह्मीं होउनी राहूं ॥ २ ॥ जनी ह्मणे ब्रह्म होऊं ॥ ऐसें सर्वांघटीं पाहूं ॥ ३ ॥

॥ २८५५ ॥ जनी दृष्टि पाहे ॥ जिकडे तिकडे हरि आहे ॥ १ ॥ मग ह्मणे हो देवासी ॥ तुमच्या नामयाची दासी ॥ २ ॥ नामयाचा प्रसाद ॥ झाला जनीला आनंद ॥ ३ ॥

॥ २८५६ ॥ बोलती सा नंदाला ॥ पुत्रमुख पाहूं चला ॥ १ ॥ स्नान घालून तयासीं ॥ वस्त्रें दिधलीं ब्राह्मणासीं ॥ २ ॥ परब्रह्म तें पाहुनी मनीं ॥ ब्रह्मीं लीन दासी जनी ॥ ३ ॥

॥ २८५७ ॥ त्या वैष्णवांच्या माता ॥ तो नेणें देवदाता ॥ १ ॥ तिहीं कर्मं हें पूशिलें ॥ अकर्म समूळ नाहींसें केलें ॥ २ ॥ कानाचा हो कान ॥ झालें धरूनियां ध्यान ॥ ३ ॥ डोळियाचा हो डोळा ॥ करुनी झालें प्रेम सोहळा ॥ ४ ॥ तोही वसे नरदेहीं ॥ जनी दासी वंदी पायीं ॥ ५ ॥

॥ २८५८ ॥ संतमहानुभाव येती दिगंबर ॥ नम्रतेचें घर विरळा जाणें ॥ १ ॥ निवाले मीं पण तें जें ठायीं नाहीं ॥ सोहं शब्द सोई तेथें कैंची ॥ २ ॥ पाहतां हा कोण दावितां हा कोण ॥ पाहतां दावितां हे खूण विरळा जाणें ॥ ३ ॥ नामयाची जनी वस्तु झाली ॥ अवघ्यांसी बुडाली परब्रह्मीं ॥ ४ ॥

॥ २८५९ ॥ वैराग्य अभिमानें फिरविलें जातें ॥ ह्मणवोनी यातें भाव खुंटा ॥ १ ॥ संचित मातृका वैरणी घातली ॥ अव्यक्ति दळिली व्यक्ताव्यक्त ॥ २ ॥ नामरूपा आदि दळियेलें सर्व ॥ पीठ भरी देव पंढरीचा ॥ ३ ॥ नवल हा देव बैसला दळणीं ॥ नाहीं केली जनी नामयाची ॥ ४ ॥

॥ २८६० ॥ भ्रांती माझें मन प्रपंचीं गुंतलें ॥ श्रवण मनन होउनी ठेलें ॥ १ ॥ बापें बोधिलें बापें बोधिली ॥ बोधुनी कैसी तद्रुप झाली ॥ २ ॥ निजध्यासें कैसा अवघाची सांपडला ॥ कीं विश्वरूपीं देखिला बाईयांनो ॥ ३ ॥ नामयाची जनी स्वयंबोध झाला ॥ अवघाची पुसिला ठाव देखा ॥ ४ ॥

॥ २८६१ ॥ देव खाते देव पीते ॥ देवावरी मी निजतें ॥ १ ॥ देव देते देव घेते ॥ देवासवें व्यवहारिते ॥ २ ॥ देव येथें देव तेथें ॥ देवाविणें नाहीं रीतें ॥ ३ ॥ जनी ह्मणे विठाबाई ॥ भरुनी उरलें अंतरबाहीं ॥ ४ ॥

॥ २८६२ ॥ अखंडित ध्यानीं ॥ पांडुरंग जपे वाणी ॥ १ ॥ पांडुरंग नाम जपें ॥ हेंचि माझें महा तप ॥ २ ॥ ऐसें आलें प्रत्ययासी ॥ सहज तेणें तत्त्वमसी ॥ ३ ॥ पावलिया हो स्वपद ॥ सहज विराला तो शब्द ॥ ४ ॥ संदेह अवघाची फिरला ॥ जनी ह्मणे उदयो झाला ॥ ५ ॥

॥ २८६३ ॥ चरण विठोबाचे देखिले ॥ साही रिपु हारपले ॥ १ ॥ नाहीं नाहीं ह्मणती आह्मीं ॥ सांगसी त्या लागूं कामी ॥ २ ॥ नाहीं तरी जाऊं देशीं ॥ जनी नामयाची दासी ॥ ३ ॥

॥ २८६४ ॥ जोड झाली रे शिवाची ॥ भ्रांत फिटली जिवाची ॥ १ ॥ आनंदची आनंदला ॥ आनंद बोधची बोधला ॥ धृ० ॥ आनंदाची लहरी उठी ॥ ब्रह्मानंद गिळिला पोटीं ॥ २ ॥ एक पण जेथें पाहीं ॥

तेथें विश्रांति उरली नाहीं ॥ ३ ॥ ऐसी सद्गुरुची करणी ॥ दासी जनी विठ्ठल चरणी ॥ ४ ॥

॥ २८६५ ॥ देहभाव प्राण जाय ॥ तेव्हां हें धैर्य सुख होय ॥ १ ॥ तया निद्रे जे निजलें ॥ भव जागृती नाहीं आलें ॥ धृ० ॥ ऐसी विश्रांति लाधली ॥ आनंद कळा संचारली ॥ २ ॥ तेथें सर्वांग सुखी झालें ॥ लिंगदेह विसरलें ॥ ३ ॥ त्या एकी एक होता ॥ दासी जनी नाहीं आतां ॥ ४ ॥

॥ २८६६ ॥ धरिला पंढरीचा चोर ॥ गळा बांधोनियां दोर ॥ १ ॥ हृदय बंदिखाना केला ॥ आंत विठ्ठल कोंडिला ॥ २ ॥ शब्दें केली जडाजुडी ॥ विठ्ठल पायीं घातली बेडी ॥ ३ ॥ सोहं शब्दाचा मारा केला ॥ विठ्ठल काकुळती आला ॥ ४ ॥ जनी ह्मणे बा विठ्ठला ॥ जीवें न सोडी मी तुजला ॥ ५ ॥

॥ २८६७ ॥ आह्मी आणि संत संत आणि आह्मी ॥ सूर्य आणि रश्मि काय दोन ॥ १ ॥ दीप आणि सारंग सारंग आणि दीप ॥ ध्यान आणि जप काय दोन ॥ २ ॥ शांति आणि विरक्ति विरक्ति आणि शांती ॥ समाधान तृप्ति काय दोन ॥ ३ ॥ रोग आणि व्याधी व्याधी आणि रोग ॥ देह आणि अंग काय दोन ॥ ४ ॥ कान आणि श्रोत्र श्रोत्र आणि कान ॥ यश आणि मान काय दोन ॥ ५ ॥ देव आणि संत संत आणि देव ॥ ह्मणे जनी भाव एक ऐसा ॥ ६ ॥

॥ २८६८ ॥ संत आणि देव मानी जो वेगळें ॥ तेणें येथें आगळें केले दोष ॥ १ ॥ माता ते वेगळी कुच ते उरीचे ॥ ह्मणोनियां त्याचें मर्दन करी ॥ २ ॥ पाप तें वेगळें पुण्य तें आगळें ॥ ह्मणोनी गरळें पितो मद ॥ ३ ॥ दिवस उगवतां पाहों नये त्यातें ॥ जेणें संतांतें द्वेषियेलें ॥ ४ ॥ तयाचा विटाळ वाहे रजस्वला ॥ ह्मणे जनी चांडाळा बोलावूं नका ॥ ५ ॥

॥ २८६९ ॥ पाणी तेंचि मेघ मेघ तेंचि पाणी ॥ काय या दोन्हींपणीं वेगळीक ॥ १ ॥ माती तेचि धूळ धूळ तेचि माती ॥ भेंडा आणि भिंती काय दोन ॥ २ ॥ साखरीं गोडी गोडी साखरेसी ॥ थिजलें तुपासी काय दोन्ही ॥ ३ ॥ डोळा तें बुबुळ बुबुळ तो डोळा ॥ शांति ज्ञानकळा काय भिन्न ॥ ४ ॥ वदन तें ओंठ ओंठ तें वदन ॥ क्षेमआलिंगन काय दोन

॥ ५ ॥ जीभ ते पडजीभ पडजीभ ते जीभ ॥ अशा आणि लोभ काय दोन ॥ ६ ॥ संत तेचि देव देव तेचि संत ॥ ह्मणे जनी मात गोष्टी भिन्न ॥ ७ ॥

---

# देवभक्तांचा कैवारी.

---

॥ २८७० ॥ झाडलोट करी जनी ॥ केर भरी चक्रपाणी ॥ १ ॥ पाटी घेऊनियां शिरीं ॥ नेऊनियां टाकी दुरी ॥ २ ॥ ऐसा भक्तीसी भूलला नीच कामें करूं लागला ॥ ३ ॥ जनी ह्मणे विठोबाला ॥ काय उतराई होऊं तुला ॥ ४ ॥

॥ २८७१ ॥ पक्षी जाय दिगंतरां ॥ बाळकांसी आणी चारा ॥ १ ॥ घार हिंडते आकाशीं ॥ झांप घाली पिल्लांपासीं ॥ २ ॥ माता गुंतली कामासीं ॥ चित्त तिचें बाळापासीं ॥ ३ ॥ वानर हिंडे झाडावरीं ॥ पिलीं बांधुनी उदरीं ॥ ४ ॥ तैसी आह्मासीं विठ्ठल माये ॥ जनी वेळोवेळां पाहे ॥ ५ ॥

॥ २८७२ ॥ भक्त जें जें कर्म करिती ॥ तें तूं होसी कृपामूर्ती ॥ १ ॥ हें तों नवल नव्हे देवा ॥ भूललासी भक्तिभावा ॥ २ ॥ वाग्दोर धरुनी दांतीं ॥ चारी घोडे चहूं हातीं ॥ ३ ॥ धूर्ता लाज नाहीं तुला ॥ दासी जनी ह्मणे भला ॥ ४ ॥

॥ २८७३ ॥ देव भावाचा लंपट ॥ सोडुनी आला हो वैकुंठ ॥ १ ॥ पुंडलिकापुढें उभा ॥ सम चरणांवरी शोभा ॥ २ ॥ हातीं चक्र पायीं वांकी ॥ मुख भक्तांचें अवलोकी ॥ ३ ॥ उभा बैसेना सर्वथा ॥ पाहे कोडें भक्तकथा ॥ ४ ॥ सर्व सुखाचा सागर ॥ जनी ह्मणे शारंगधर ॥ ५ ॥

॥ २८७४ ॥ एकटी तूं गाणें गासी ॥ दुजा शब्द उमटे पाशीं ॥ १ ॥ कोण गे तुझ्या बरोबरी ॥ गाणें गाती निरंतरी ॥ २ ॥ पांडुरंग माझा पिता ॥ रखुमाई झाली माझी माता ॥ ३ ॥ ऐशियाच्या घरीं आल्यें ॥ जनी ह्मणे धन्य झाल्यें ॥ ४ ॥

॥ २८७५ ॥ विठोबाचें पदक गेलें ॥ ब्राह्मण ह्मणती जनिनें नेलें ॥ १ ॥ नाहीं नेलें म्यां जनीनें ॥ सख्या विठ्ठलाची आण ॥ २ ॥ वाकळ

झाडूनियां दावी ॥ पदक पडलें जनीचे ठाईं ॥ ३ ॥ मिळोन दहा विस गडी ॥ पडली जनाईवर उडी ॥ ४ ॥ दंडीं लाविल्या काढण्या ॥ धांव विठ्ठल धांवण्या ॥ ५ ॥ माझे वेळे कोठें गेला ॥ जनी ह्मणे विठ्ठल मेला ॥ ६ ॥ चंद्रभागे रोविला शूळ ॥ आलें जनाईसी मूळ ॥ ७ ॥ त्या शूळाचें झालें पाणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ८ ॥

॥ २८७६ ॥ तुळसीचे बनीं ॥ जनी उकलीत वेणी ॥ १ ॥ हातीं घेऊनियां लोणी ॥ डोई चोळी चक्रपाणी ॥ २ ॥ माझे जनीला नाहीं कोणी ॥ ह्मणुनी देव घाली पाणी ॥ ३ ॥ जनी सांगे सर्व लोकां ॥ हाऊं घाली माझासखा ॥ ४ ॥

॥ २८७७ ॥ साळी सडायास काढी ॥ पुढें जाउनी उखळ झाडी ॥ १ ॥ कांडितां कांडितां ॥ शीण आला पंढरिनाथा ॥ २ ॥ सर्व अंगीं घाम आला ॥ तेणें पितांबर भिजला ॥ ३ ॥ पायीं पैंजण हातीं कडीं ॥ कोंडा पांखडुनी काढी ॥ ४ ॥ हाता आला असे फोड ॥ जनी ह्मणे मुसळ सोड ॥ ५ ॥

॥ २८७८ ॥ जनी बैसली न्हायाला ॥ पाणी नाहीं विसणाला ॥ १ ॥ घागर घेउनी पाण्या गेली ॥ मागें मागें धांव घाली ॥ २ ॥ घागर घेउनियां हातीं ॥ पाणी रांजणांत ओती ॥ ३ ॥ ऐशा येरझारा केल्या ॥ रांजण घागरी भरिल्या ॥ ४ ॥ पाणी पुरे पांडुरंगा ॥ दासी जनीच्या अंतरंगा ॥ ५ ॥

॥ २८७९ ॥ नामदेवा पुत्र झाला ॥ विठो बारशासी आला ॥ १ ॥ आंगडें टोपडें पेहरण ॥ शेला मुंडासा घेऊन ॥ २ ॥ जनी ह्मणे पांडुरंगा ॥ नांव काय ठेवूं सांगा ॥ ३ ॥ माझ्या जिवींच्या जीवना ॥ नाम ठेवीं नारायणा ॥ ४ ॥

॥ २८८० ॥ तुह्मीं सांगा तरी कायी ॥ सखी विनवा विठाबाई ॥ १ ॥ देव ओढिला तोडिला ॥ देव भक्तांनीं पाहिला ॥ २ ॥ भिंती चांदया रचिलें ॥ त्याचें घर शेफारिलें ॥ ३ ॥ झाला नाम्याचा मजूर ॥ मोळी बांधावी पैं थोर ॥ ४ ॥ वरी सांडोनियां पाणी ॥ धन्य भक्त ह्मणे जनी ॥ ५ ॥

॥ २८८१ ॥ दुःशासन द्रौपदीसी ॥ घेउनी आला तो सभेसी ॥ १ ॥ दुर्योधन आज्ञा करी ॥ नग्न करावी सुंदरी ॥ २ ॥ आतां उपाय कृष्णा काय॥ धांवे माझे विठ्ठल माय ॥ ३ ॥ निरी ओढितां दुर्जन ॥ झालें आणिक निर्माण ॥ ४ ॥ ऐसीं असंख्य फेडिलीं ॥ देवीं तितुकीं पुरविलीं ॥ ५ ॥ तया संतां राखिलें कैसें ॥ जनी मनीं प्रेमें हांसे ॥ ६ ॥

॥ २८८२ ॥ ब्राह्मणाचें पोर ॥ मागे दूध रडे फार ॥ १ ॥ माता ह्मणे बालकासी ॥ दूध मागे देवापासीं ॥ २ ॥ क्षिराब्धीची वाटी ॥ ह्मणे जनीं लावी ओंठीं ॥ ३ ॥

॥ २८८३ ॥ एके दिवशीं न्हावयास ॥ पाणी नव्हतें विसाणास ॥ १ ॥ देव धांवोनियां आले ॥ शीतळ उदक घे घे बोले ॥ २ ॥ आपुल्या हातें विसाणीं ॥ घाली जनीच्या डोयी पाणी ॥ ३ ॥ माझ्या डोईच्या केंसांस ॥ न्हाणें नव्हतें फार दिवस ॥ ४ ॥ तेणें मुरडी केसांस ॥ कांगे ह्मणे उगीच बैस ॥ ५ ॥ आपुल्या हातें वेणी घाली ॥ जनी ह्मणे माय झाली ॥ ६ ॥

॥ २८८४ ॥ पंढरीच्या राया ॥ माझी विनवणी पायां ॥ १ ॥ काय वर्णूं हरिच्या गोष्टी ॥ अनंत ब्रह्मांडें याचे पोटीं ॥ २ ॥ सेना न्हावी याचे घरीं ॥ अखंड राबे विठ्ठल हरी ॥ ३ ॥ राम चिंता ध्यानीं मनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २८८५ ॥ पूर्वीं काय तप नेणें पैं हो केलें ॥ निधान जोडिलें पंढरीचें ॥ १ ॥ येऊनियां देव दळूं लागे अंगें ॥ रखुमाईचा संग दूर केला ॥ २ ॥ तैसाचि पैं संगें येउनी बाहेरी ॥ वेंचोनियां भरी शेणी अंगें ॥ ३ ॥ ओझें झालें ह्मणुनी पाठी पितांबरी ॥ घेऊनियां घरीं आणी-तसे ॥ ४ ॥ ऐसें जेथें काम करी चक्रपाणी ॥ तेथें कैंचि जनी नाम-याची ॥ ५ ॥

॥ २८८६ ॥ भिल्लणीचीं फळें कैशीं ॥ चाखोनी वाहातसे देवासीं ॥ १ ॥ भावें तिचीं अंगिकारी ॥ सर्वांहुनी कृपा करी ॥ २ ॥ गुज वान्नरां पुसावें ॥ राक्षसांतें हो जिंकावें ॥ ३ ॥ वान्नर अवघे भूभुःकार ॥ बोलताती रामा समोर ॥ ४ ॥ आज्ञा करावी आह्मांसीं ॥ रावण आणितों तुह्मापासीं ॥ ५ ॥ तुझ्या नामाच्या प्रतापें ॥ हनुमंत गेला जी संतापें ॥ ६ ॥ सीताशुद्धि करुनी आला ॥ दासी जनीस आनंद झाला ॥ ७ ॥

॥ २८८७ ॥ यातिहीन चोखामेळा ॥ त्यासी भक्तांचा कळवळा ॥ १ ॥ त्याचा झाला ह्मणीयारा ॥ राहे घरीं धरी थारा ॥ २ ॥ देह बाटविला त्याणें ॥ हांसे जनी गाय गाणें ॥ ३ ॥

॥ २८८८ ॥ चोखामेळा संत भला ॥ तेणें देव भुलवीला ॥ १ ॥ भक्ति आहे ज्याची मोठी ॥ त्याला पावतो संकटीं ॥ धृ० ॥ चोख्यामेळ्याची करणीं ॥ तेणें देव केला ऋणी ॥ २ ॥ लागा विठ्ठल चरणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ३ ॥

॥ २८८९ ॥ माळियाचा लेक झाला ॥ सेखी कुर्म्यालागीं गेला ॥ १ ॥ चांभारानें जानव्यासी ॥ काढोन दाविलें भटासीं ॥ २ ॥ तुरका घरीं विणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ३ ॥

॥ २८९० ॥ माझा लोभ नाहीं देवा ॥ तुझी करी ना मी सेवा ॥ १ ॥ नाहीं अंगीं थोरपण ॥ मिथ्या धरिसी गुमान ॥ २ ॥ रागा येउनी काय करिसी ॥ तुझें बळ आह्मांपासीं ॥ ३ ॥ नाहीं सामर्थ्य तुज हरी ॥ जनी ह्मणे धरिला चोरीं ॥ ४ ॥

॥ २८९१ ॥ बाळें भोळे ठकविशी ॥ तें तंव नचले आह्मापाशीं ॥ १ ॥ गर्व धरिसी नामाचा ॥ सोहं सोहं गर्जे वाचा ॥ आशा तृष्णा तुह्मांपाशी ॥ नाहीं ह्मणे जनी दासी ॥ ३ ॥

॥ २८९२ ॥ गोणाईनें नवस केला ॥ देवा पुत्र देई मला ॥ १ ॥ ऐसा पुत्र देई भक्त ॥ ज्याला आवडे पंढरिनाथ ॥ २ ॥ शुद्ध देखोनीयां भाव ॥ पोटा आला ब्रह्मदेव ॥ ३ ॥ दामाशेटी हरूपला ॥ दासी जनिनें ओवाळिला ॥ ४ ॥

॥ २८९३ ॥ राजाई गोणाई दोघी सासू सुना ॥ दामा नामा जाणा बापलेक ॥ १ ॥ नारा विठा गोंदा महादा चवघे पुत्र ॥ जन्मले पवित्र वंशीं ज्याचे ॥ २ ॥ लोभाई बहिणाई येसू साखराई ॥ चवघी सुना पाही नामयाच्या ॥ ३ ॥ रंगाबाई लेकी आऊबाई बहिणी ॥ वेडीपिशी जनी नामयाची ॥ ४ ॥

॥ २८९४ ॥ सुंबाचा करदोडा रगड्याची लंगोटी ॥ नामा वाळवंटीं कथा करी ॥ १ ॥ ब्रह्मादिक देव येवोनी पाहाती ॥ आनंदें गर्जती जय-

जयकार ॥ २ ॥ जनी ह्मणे त्यांचें काय वर्णूं सुख ॥ पाहती जे मुख विठोबाचें ॥ ३ ॥

॥ २८९५ ॥ करुनी आरती ॥ नामा आला घराप्रती ॥ १ ॥ तेणें धरियेलें व्रता ॥ अन्न न घ्यावें सर्वथा ॥ २ ॥ ऐसा जाणोनियां नेम ॥ अनुभवी पुरुषोत्तम ॥ ३ ॥ आषाढी एकादशी ॥ विप्रवेषें हृषीकेशी ॥ ४ ॥ आला नामयाचे सदनीं ॥ नाम गाय दासी जनी ॥ ५ ॥

॥ २८९६ ॥ नमुनी ब्राह्मण ॥ ह्मणे मज द्यावें अन्न ॥ १ ॥ नामा ह्मणे एकादशी ॥ इच्छित द्यावें फराळासी ॥ २ ॥ अन्नावांचोनी आतां ॥ मज नको रे सर्वथा ॥ ३ ॥ हातापायांची बेगडी ॥ विप्रें घातली मुरकुंडी ॥ ४ ॥ जीव सोडी चक्रपाणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ५ ॥

॥ २८९७ ॥ जनसमुदाय मिळाला ॥ धिःकारिती नामयाला ॥ १ ॥ विप्र बोलावुनी वेगें ॥ प्रेत नेलें चंद्रभागे ॥ २ ॥ मोठें रचुनी सरण ॥ मध्यें निजविला ब्राह्मण ॥ ३ ॥ शय्यागमनीं पहूडला ॥ ह्मणे अग्नि द्या आह्माला ॥ ४ ॥ अग्नि दिल्या जयाप्रती ॥ देव विमानीं पाहती ॥ ५ ॥ विस्मित झाला चक्रपाणी ॥ प्रगट होय ह्मणे जनी ॥ ६ ॥

॥ २८९८ ॥ अग्नी लागतां अंगासी ॥ घाबरला हृषीकेशी ॥ १ ॥ निजरूपें प्रगटला ॥ चरणीं मस्तक ठेविला ॥ २ ॥ सोनसळा वैजयंती ॥ कोटि सूर्य ते लोपती ॥ ३ ॥ नामा ह्मणे विठोबाला ॥ भला अंत रे पाहिला ॥ ४ ॥ हातीं धरुनी नामयासी ॥ पाठ थापटी हृषीकेशी ॥ ५ ॥ गेला राउळीं चक्रपाणी ॥ भावें वंदी दासी जनी ॥ ६ ॥

॥ २८९९ ॥ मागें संत झाले ॥ नाम्या ऐसें कोण बोले ॥ १ ॥ नामा जातां राउळासी ॥ देव बोले अवघियांसी ॥ २ ॥ केवढें नवल सांगावें ॥ दासी जनीचें पद लिहावें ॥ ३ ॥

॥ २९०० ॥ नामा येऊनियां पाहे ॥ आजि कौतुक दिसताहे ॥ १ ॥ व्रत निवेदी राजाई ॥ लागे नामयाचे पायीं ॥ २ ॥ नामा ह्मणे या द्रव्यासी ॥ आह्मी नातळों मानसीं ॥ ३ ॥ वेगीं बोलवा ब्राह्मण ॥ करूं आतां संतर्पण ॥ ४ ॥ हातीं टाळ दिंडीगान ॥ हेंच आमचें सर्व धन ॥ ५ ॥ ऐसें आश्चर्य देखोनी ॥ जनी हांसतसे मनीं ॥ ६ ॥

॥ २९०१ ॥ आषाढी एकादशी ॥ नामा होता उपवासी ॥ १ ॥ देवें गरुड धाडिला ॥ वेगीं बोलाविलें त्याला ॥ २ ॥ राही ह्मणे पांडुरंगा ॥ कोणें बोलाविलें सांगा ॥ ३ ॥ ऐसा भक्तराज निका ॥ दासी जनिचा आत्मसखा ॥ ४ ॥

॥ २९०२ ॥ पूर आला पंढरीसी ॥ पाणी लागे पायरीसी ॥ १ ॥ संतजन हो मिळाले ॥ उठुनी नाम्याजवळी गेले ॥ २ ॥ नामा सांगे विठोबासी ॥ उतार द्यावा भिवरेसी ॥ ३ ॥ दीनवत्सल महाराज ॥ जनी ह्मणे केलें काज ॥ ४ ॥

॥ २९०३ ॥ सण दिवाळीचा आला ॥ नामा राउळासीं गेला ॥ १ ॥ हातीं धरुनी देवासी ॥ चला आमुच्या घरासी ॥ २ ॥ देव तेथुनी चालिले ॥ नामयाच्या घरा आले ॥ ३ ॥ गोणाईनें उटणें केलें ॥ दामाशेटीनें स्नान केलें ॥ ४ ॥ पदर काढिला माथ्याचा ॥ बाळ पुशिला नंदाचा ॥ ५ ॥ हातीं घेउनी आरती ॥ चक्रपाणी ओंवाळती ॥ ६ ॥ जेऊनियां तृप्त झाले ॥ दासी जनींनें विडे दिले ॥ ७ ॥

॥ २९०४ ॥ वोढिला ताडिला ॥ देव भक्तीनें फाडिला ॥ १ ॥ एका प्रेमा नामासाठीं ॥ भक्ति काढियला कंठीं ॥ २ ॥ झाला नाम्याचा मजूर ॥ मोळ्या बांधाव्याचा थर ॥ ३ ॥ भिंती चांदया रचिले ॥ त्याचें छप्पर शेकारिलें ॥ ४ ॥ वरी सोडूनियां पाणी ॥ धन्य भक्ता ह्मणे जनी ॥ ५ ॥

॥ २९०५ ॥ ज्ञानेश्वर ह्मणे नाम्या सर्वे जेविसी ॥ नाहीं हृषीकेशी ह्मणतसे ॥ १ ॥ सांगितलें एक भलतेंची बोलसी ॥ आहे याची भ्रांति ज्ञानेश्वरा ॥ २ ॥ बाहियलें त्वरें ऐसें कांहीं काम ॥ उठे मेघःशाम तातडीनें ॥ ३ ॥ निरोप येवोनी सांगावा एकांतीं ॥ ह्मणे जनीप्रति पांडुरंग ॥ ४ ॥ देव ह्मणे नाम्या ऐकावें वचन ॥ येईल साधोन वेळ तुझी ॥ ५ ॥ जनी ह्मणे आतां समजलें मज ॥ धरीन उमज येथोनियां ॥ ६ ॥

॥ २९०६ ॥ आतां आह्मी जातों स्वामी ॥ दया असो द्यावी तुह्मी ॥ १ ॥ बहुत दिवस सांभाळ केला ॥ पुन्हां जन्म नाहीं दिला ॥ २ ॥ थोर सुकृताची राशी ॥ तुझे पाय मजपाशीं ॥ ३ ॥ ऐसें नामदेव बोले ॥ ऐकुनी दासी जनी डोले ॥ ४ ॥

॥ २९०७ ॥ गरुड पारापाशीं ॥ नामा उभा कीर्तनासी ॥ १ ॥ येऊनियां पांडुरंग ॥ ताल स्वयें धरी अंग ॥ २ ॥ नाचूं लागे बरोबरी ॥ नाहीं सांगायाची उरी ॥ ३ ॥ शब्द देवाचा उमटला ॥ दासी जनीनें ओळखिला ॥ ४ ॥

॥ २९०८ ॥ नामयाचा गुरू ॥ तो हा सोपान सद्गुरू ॥ १ ॥ करविरीं करुनी वस्ती ॥ ब्रह्मपुरी तिशीं ह्मणती ॥ २ ॥ माझ्या जिवीच्या जीवना ॥ हृदयीं राहे तूं सोपाना ॥ ३ ॥ चित्त उद्धव ज्याची सत्ता ॥ जनी ह्मणे माझ्या ताता ॥ ४ ॥

॥ २९०९ ॥ जात्यावरील गीतासी ॥ दळणमिशें गोवी दासी ॥ १ ॥ देह बुद्धीचें वैरण ॥ बरवा दाणा हो निसून ॥ २ ॥ नामाचा हो कोळी ॥ गुरुआज्ञेत मी पाळी ॥ ३ ॥ मज भरंवसा नाम्याचा ॥ गजर दासी जनीचा ॥ ४ ॥

॥ २९१० ॥ नवरीच्या संगें वऱ्हाडीयांचा सोहळा ॥ मांडे पुरणपोळ्या मिळती अन्न ॥ १ ॥ परिसाचे संगति लोखंडाचें सोनें ॥ तयाचें भूषण श्रीमंतासी ॥ २ ॥ जनी ह्मणे जोड झाली विठोबाची ॥ दासी नामयाची ह्मणोनियां ॥ ३ ॥

॥ २९११ ॥ हिरण्यकश्यपाचे कुळीं नामा प्रऱ्हाद ॥ पद्मीणी नाम माझें श्रेष्ठ दासीचें पद ॥ १ ॥ दुसरा जन्म त्याचा अंगद रामभक्त ॥ मंथरा नाम माझे माथां दिधली लाथ ॥ धृ० ॥ गोकुळीं कृष्णासवें जन्मला उद्धव ॥ कुबज्या नाम माझें उद्धरिलें स्वभावें ॥ २ ॥ कलीत नामदेव विठ्ठल चिंतनीं ॥ त्याचे सेवेलागीं दासी जन्मली जनी ॥ ३ ॥

## कुटाचे अभंग.

॥ २९१२ ॥ अहो मांडियला खेळ ॥ बुद्धि रंग बुद्धिबळ ॥ १ ॥ कैंचा शह आला ॥ प्याद्याखालीं फरजी मेला ॥ २ ॥ शहबाजू झाली ॥ जनी ह्मणे मात केली ॥ ३ ॥

॥ २९१३ ॥ पति जन्मले माझे उदरीं ॥ मी झालें तयाची नारी ॥ १ ॥ पतिव्रता धर्म माझा ॥ सर्व अंगीं पति भोगी ओझा ॥ २ ॥ निर्गुण पति मज आवडे ॥ माया पोटीं निघालीं भावंडें ॥ ३ ॥ पतिव्रता शिरोमणी ॥ क्रीडा करी दासी जनी ॥ ४ ॥

## कर्मावर अभंग.

॥ २९१४ ॥ बगायाला गेले क्रियमाण शिडी ॥ घालूनियां उडी तेथें आले ॥ १ ॥ पुरवी या नवसा ह्मणवी गा देवा ॥ टोंचियेले जीवा गळ देहीं ॥ २ ॥ आठ चारी फेरे फिरविती त्यासी ॥ पाहती नवसासी पुरलें नाहीं ॥ ३ ॥ दुःख सुख तेथें पाहुनी प्रमाण ॥ करिती समान क्रीयमाण ॥ ४ ॥ दुरुनी पाहती दावी जनी दासी ॥ ह्मणे नामयासी पहावें स्वामी ॥ ५ ॥

॥ २९१५ ॥ शेषबाणाते पुसत ॥ कोणे काजा आला येथ ॥ १ ॥ बाण करी अहाकार ॥ मुखें पडलीया धूर ॥ २ ॥ वृक्ष पाडी हो मक्षिका ॥ तैसें येथें झालें देखा ॥ ३ ॥ काय शिखंडीचे बाण ॥ करिती भीष्माचें पतन ॥ ४ ॥ तेथें मागितलें पाणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ५ ॥

## कृष्णजन्माचे अभंग.

॥ २९१६ ॥ गौळण ह्मणे गौळणीला ॥ पुत्र झाला यशोदेला ॥ १ ॥ एक धांवे एकीपुढें ॥ ताटीं वांटी सुंठवडे ॥ २ ॥ सुइणीची गलबल झाली ॥ हेल घाली दासी जनी ॥ ३ ॥

॥ २९१७ ॥ मग ह्मणे नंदाजीला ॥ पुत्रमुख पाहूं चला ॥ १ ॥ स्नान घालोनी त्यासी ॥ वस्त्रें दिधलीं ब्राह्मणासी ॥ २ ॥ परब्रह्म तें पाहुनी ॥ ब्रह्मीं मिळे दासी जनी ॥ ३ ॥

॥ २९१८ ॥ वैकुंठीचा हरी ॥ तान्हा यशोदेच्या घरीं ॥ १ ॥ रांगतसे हा अंगणीं ॥ माथां जावळाची वेणी ॥ २ ॥ पायीं पैंजण आणि वाळे ॥ हातीं नवनीताचे गोळे ॥ ३ ॥ धन्य यशोदा ते माय ॥ दासी जनी वंदी पाय ॥ ४ ॥

॥ २९१९ ॥ ब्रह्मा वंदी ज्याचे पाय ॥ त्याची यशोदा ते माय ॥ १ ॥ साम राज्याचा जो दानी ॥ मागे यशोदेसी लोणी ॥ २ ॥ क्षीरसागर ज्याचे चरणीं ॥ त्याला पायावरतें न्हाणी ॥ ३ ॥ देव ब्रह्मांडपालकीं ॥ त्याची टाळू हातें माखी ॥ ४ ॥ शुक सनकादिक योगी ॥ जनी ह्मणे दळूं लागी ॥ ५ ॥

## तीर्थावळीचे अभंग.

॥ २९२० ॥ जावोनी राउळा जोडूनियां हात ॥ बोले ज्ञानेश्वर विठोबासी ॥ १ ॥ करावीं हीं तीर्थें आवड अंतरीं ॥ द्यावें बरोबरी नामदेवा ॥ २ ॥ ऐकतांचि ऐसें ह्मणे पांडुरंग ॥ न धाडितां राग येईल तुज ॥ ३ ॥ तयाविण मज घडी जरी जाय ॥ युगा ऐसी होय ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥ जनी ह्मणे मग नामया पाचारी ॥ कृपाळू वा हरि मायबाप ॥ ५ ॥

॥ २९२१ ॥ जाय बरोबरी नामया तूं जाय ॥ नचले उपाय कांहीं येथें ॥ १ ॥ करूं काय मज पडिलें सांकडें ॥ उल्लंघेना भीड मज याची ॥ २ ॥ नामा ह्मणे ऐका स्वामी नारायणा ॥ एक विज्ञापना परिसावी ॥ ३ ॥ कटावरी कर नाहीं ज्या देवाचे ॥ न घे मी तयाचें दरुशन ॥ ४ ॥ मारितांचि हाक यावें त्वां झडकरी ॥ बरें ह्मणे हरि नामयासी ॥ ५ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान चांगया ॥ जनी ह्मणे तया सांगतसे ॥ ६ ॥

॥ २९२२ ॥ तुह्मी सकळिक संत आहांत सज्ञान ॥ हें माझें अज्ञान फार आहे ॥ १ ॥ याजबरोबरी चालावी हो वाट ॥ मोडतील कांटे सांभाळावें ॥ २ ॥ हळू हळू जावें करूं नका घाई ॥ चालायाची नाहीं संवय यासी ॥ ३ ॥ लागतांचि भूक न धरी हा निर्धार ॥ द्यावा समाचार क्षणक्षणा ॥ ४ ॥ जनी ह्मणे ऐसें बोलिला घननीळ ॥ नेत्रींहुनी जळ वाहतसे ॥ ५ ॥

॥ २९२३ ॥ वियोग नाम्याचा न साहे गोपाळा ॥ न जाय राउळा पांडुरंग ॥ १ ॥ पद्माळ्यांत तेव्हां राहे विश्वंभर ॥ कळे समाचार रुक्मिणीसी ॥ २ ॥ चलावें मंदिरीं स्वामी पुरुषोत्तमा ॥ येईल गे नामा माझा जेव्हां ॥ ३ ॥ तयाविण मज दाही दिशा ओस ॥ नलगे चित्तास गोड कांहीं ॥ ४ ॥ जनी ह्मणे ऐसी आवड नाम्याची ॥ ह्मणोनियां त्याची झाले दासी ॥ ५ ॥

## हरिश्चंद्र आख्यानाचे अभंग.

॥ २९२४ ॥ अपूर्व कोणे एके काळीं ॥ देव सभेच्या मंडळी ॥ १ ॥ करी त्रैलोक्य भ्रमणा ॥ करीं वाहे ब्रह्मवीणा ॥ २ ॥ देती सर्वही सन्मान ॥ सिद्ध साधु योगी जन ॥ ३ ॥ सांगे अपूर्व काहाणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २९२५ ॥ नारद सांगे मृत्यूलोकीं ॥ हरिश्चंद्र पुण्यश्लोकी ॥ १ ॥ कैसा सत्वाचा समुद्र ॥ ऐसा नाहीं नृपवर ॥ २ ॥ नारदाची ऐकून गोष्ट ॥ सुखावला तो वसिष्ठ ॥ ३ ॥ कोप विश्वामित्रा आला ॥ कैसा वाढविता शिष्याला ॥ ४ ॥ तपतेजें सूर्यराशी ॥ छळीन ह्मणे हरिश्चंद्रासी ॥ ५ ॥ उदय पश्चिमे दिनकर ॥ सत्व ढाळी न नृपवर ॥ ६ ॥ वसिष्ठाच्या ऐकुनी बोला ॥ विश्वामित्रा क्रोध आला ॥ ७ ॥ जरी उतरेल माझ्या तुकीं ॥ देईन आपुल्या तपासी ॥ ८ ॥ ऐसा दोघांचा संवाद ॥ होतां उठला नारद ॥ ९ ॥ इंद्र ह्मणे कां निर्फळ ॥ शब्दाशब्दीं वाढेल कळ ॥ १० ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ जनी ह्मणे केलें गमन ॥ ११ ॥

॥ २९२६ ॥ इंद्रसभे झाला वाद ॥ करूं रायासी सावध ॥ १ ॥ येरीकडे ब्रह्मऋषी ॥ कृपें बोळला शिष्यासी ॥ २ ॥ नवी व्याली जैसी गाय ॥ पक्षी अंडजीं झेपाय ॥ ३ ॥ बाप माझा तैशा परी ॥ होय शिष्याचा साहाकारी ॥ ४ ॥ येऊनियां मागेल तूतें ॥ छळ करील गाधिसुत ॥ ५ ॥ बापा सावध अंतरीं ॥ सत्व ढाळील नानापरी ॥ ६ ॥ धरी श्वापदांच्या झुंडी ॥ तुझ्या देशांत भवंडी ॥ ७ ॥ मानी शब्दाला आमुच्या ॥ वना न जावें ऋषींच्या ॥ ८ ॥ ऐसें बोलोनी रायासी ॥ गेला वसिष्ठ तपासी ॥ ९ ॥ तुझ्या सत्वालागी हानी ॥ करूं इच्छी ह्मणे जनी ॥ १० ॥

॥ २९२७ ॥ विश्वामित्रें तत्क्षणीं ॥ सिद्ध आश्रमा येउनी ॥ १ ॥ बैसे येउनी आश्रमासी ॥ करी मातंग यागासी ॥ २ ॥ सहस्र अवदान आहुती ॥ होतां प्रगटली शक्ती ॥ ३ ॥ विश्वामित्रें तयेवेळे ॥ देवी वर-दानाचे बळें ॥ ४ ॥ व्याघ्र हिंडती रानें रानें ॥ बंद केलें येणें जाणें ॥ ५ ॥ कृषा न जाती कृषीक ॥ तीर्थयात्रेसी पांथिक ॥ ६ ॥ धेनु न जाती वनासी ॥ वाट नाहीं वेव्हारासी ॥ ७ ॥ प्रजा जाऊन राज-सभे ॥ हात जोडूनियां उभे ॥ ८ ॥ ऐसी प्रजेची हे वाणी ॥ राजा विचा-रितो मनीं ॥ ९ ॥ गुरुवचन धरितां चित्तीं ॥ माझी होईल अपकीर्ती ॥ १० ॥ राव निघाला स्वारीसी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ ११ ॥

॥ २९२८ ॥ नाना वाजंत्र्यांच्या ध्वनी ॥ राजा आरूढला वहनीं ॥ १ ॥ राव प्रवेशला वनीं ॥ अवघीं श्वापदें मारुनी ॥ २ ॥ आश्रमीं आणायासी राव ॥ केलें ऋषीनें लाघव ॥ ३ ॥ मृग कनकाचा साजरा ॥ आला रायाच्या सामोरा ॥ ४ ॥ गुणीं लाविलासे बाण ॥ घेऊं पाहे त्याचा

प्राण ॥ ५ ॥ येरु कीलान मारुनी जाय ॥ धरणी न ठेवितो पाय ॥ ६ ॥ राव लागे तया पाठीं ॥ दम न समावे पोटीं ॥ ७ ॥ प्रवेशला तये वनीं ॥ देखे अपूर्व नयनीं ॥ ८ ॥ धेनुव्याघ्र एके स्थानीं ॥ चाटी एकमेकां दोन्ही ॥ ९ ॥ निर्वैर श्वापदगण ॥ राव विस्मय करी देखोन ॥ १० ॥ पुढें जातां सुगंध पाणी ॥ राव स्नानातें करुनी ॥ ११ ॥ भावें पूजिला गिरिजावर ॥ नमन केलें जोडुनी कर ॥ १२ ॥ विश्वामित्रें तया वनीं ॥ दोघी रूपसा नयनी ॥ १३ ॥ राया पुढें नृत्य करी ॥ टाळविणा झणत्कारी ॥ १४ ॥ द्रव्य आणविलें अपारे ॥ राव देतो आपुल्या करें ॥ १५ ॥ नाहीं द्रव्यासी कारण ॥ तुझ्या स्वरूपासी लीन ॥ १६ ॥ बोले मुनिवर्य दासी ॥ राजा कोपला मानसीं ॥ १७ ॥ आज्ञा केली प्रधानासी ॥ मारा बाहेर घाला यांशीं ॥ १८ ॥ रक्तवदन आश्रमासी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ १९ ॥

॥ २९२९ ॥ ऋषि अंगणीं कामिनी ॥ लोळती येउनी दोघी जणी ॥ १ ॥ तुह्मा दिला कोणें त्रास ॥ साचा करीन मी ग्रास ॥ २ ॥ आह्मी बोलिलों रायासी ॥ घेत नाहीं उचितासी ॥ ३ ॥ ऐसें बोलतां वचन ॥ राव कोपला दारुण ॥ ४ ॥ केलें प्रधानें ताडण ॥ बाहेर घातलें मारून ॥ ५ ॥ त्यांच्या परिसोनी बोला ॥ विश्वामित्र कोपें आला ॥ ६ ॥ ह्मणे रायाजी अधमा ॥ माझी प्रताप महिमा ॥ ७ ॥ वसिष्ठाच्या पडिभारें ॥ मातलासी द्रव्यें थोरें ॥ ८ ॥ निर्वैर श्वापदांसी ॥ कां रे मारिलें तयासी ॥ ९ ॥ वधूनियां शेवटीं त्यांसी ॥ मारियेल्या तापस दासी ॥ १० ॥ पुढें रसाळ आहे कथा ॥ निद्रा लागेल नृपनाथा ॥ ११ ॥ स्वप्नीं मागेल दानासी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ १२ ॥

॥ २९३० ॥ विश्वामित्र द्विजचिन्ह ॥ स्वप्नीं प्रगटे आपण ॥ १ ॥ देखोनियां द्विजवरातें ॥ नमियेलें जोडुनी हातें ॥ २ ॥ राव बोले उदारपणीं ॥ काय इच्छा आहे मनीं ॥ ३ ॥ दयावंत धर्ममुर्ती ॥ तुझी तिही लोकीं कीर्ती ॥ ४ ॥ अंकुश कडिया लेखणी ॥ राया वोपी माझ्या पाणी ॥ ५ ॥ उदारपणें देसी जरी ॥ उदक घाली माझे करीं ॥ ६ ॥ कृपा करून आह्मांवरी ॥ आलें पाहिजे नगरीं ॥ ७ ॥ येथें संकल्पावांचून ॥ नाहीं होत माझें येणें ॥ ८ ॥ रायें घेउनी जीवन ॥ ऋषिहस्तकीं घालून ॥ ९ ॥ एक नवल देखे दृष्टी ॥ काळपुरुष उभा पाठीं ॥ १० ॥ लोहदंड घेउनी करीं ॥ घालूं पाहे त्याचे शिरीं ॥ ११ ॥ तेणें झाला

भयाभीत ॥ राव स्वप्नांत बरळत ॥ १२ ॥ राव बैसला उठोन ॥ करी देवाचें स्मरण ॥ १३ ॥ तारामती पुसे राया ॥ कांहो बरळलां स्वामिया ॥ १४ ॥ राज्यदान सुकृतकोटी ॥ एक काळपुरुष पाठीं ॥ १५ ॥ लोह-दंड घेऊन करीं ॥ घालूं पाहे माझे शिरीं ॥ १६ ॥ येरु ह्मणे या जीवनीं ॥ करा स्नानातें जाउनी ॥ १७ ॥ अग्निमुखीं द्यावें दान ॥ स्वप्नदोष नासती जाण ॥ १८ ॥ ह्मणे प्रधान महाराजा ॥ दान करा कांहीं द्विजा ॥ १९ ॥ ऐसें बोलतां वचन ॥ आला विश्वामित्र जाण ॥ २० ॥ राजा बोले कर जोडुन ॥ शयनीं देखियेलें स्वप्न ॥ २१ ॥ ह्याच स्वरूपा प्रमाण ॥ ऐसा देखिला ब्राह्मण ॥ २२ ॥ सिंहासन समेदिनी ॥ राया देगा मज लागोनी ॥ २३ ॥ आतां मागे दक्षणेसी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ २४ ॥

॥ २९३१ ॥ ऋषि ह्मणे रे समर्था ॥ असो स्वप्नींची हे वार्ता ॥ १ ॥ इच्छा धरून आलों येथें ॥ औट तुक दे कनकातें ॥ २ ॥ कृपा करून द्याल जरी ॥ उदक घाली माझे करीं ॥ ३ ॥ दया करा आह्मांवरी ॥ आलें पाहिजे नगरीं ॥ ४ ॥ येथें संकल्पावांचून ॥ नाहीं होत माझें येणें ॥ ५ ॥ रायें घेउनी जीवन ॥ ऋषि हस्तकीं घालून ॥ ६ ॥ विश्वामित्र शिबिकासनीं ॥ राव चालिला घेउनी ॥ ७ ॥ मार्गीं वाद्यांचा लाघव ॥ अयोध्येसी आला राव ॥ ८ ॥ राव प्रवेशला नगरीं ॥ विश्वामित्र बैसला द्वारीं ॥ ९ ॥ दंड पडताळुनी हातीं ॥ लक्षियेली तारामती ॥ १० ॥ उभी थरथरां कांपत ॥ राया जाणविली मात ॥ ११ ॥ राव ह्मणे ऋषेश्वर ॥ कोण्या अन्यायानें मार ॥ १२ ॥ केला संकल्प आह्मांसी ॥ नाहीं दिलें दक्षणेसी ॥ १३ ॥ दान न देतां आह्मांसी ॥ तूं कां गेलासी सदनासी ॥ १४ ॥ हात बांधोनियां राया ॥ दंडहस्तें मारी तया ॥ १५ ॥ तंव आला रोहिदास ॥ चरणीं ठेवी मस्तकास ॥ १६ ॥ येरु रक्तांबर नयन ॥ पुसे कवणाचा कवण ॥ १७ ॥ राव ह्मणे कुळभूषण ॥ आहे आमुचा नंदन ॥ १८ ॥ राजा पाचारी भांडारी ॥ आणा कनकातें झड-करी ॥ १९ ॥ मज दिलें राज्यदान ॥ तेंचि घेसी तूं परतोन ॥ २० ॥ छत्र मुद्रा सिंहासन ॥ ऋषि हस्तकीं ओपून ॥ २१ ॥ हें तों आलें राज्य-दानें ॥ औट भार कनक देणें ॥ २२ ॥ धनवंत सौदागर ॥ उभे रायाचे समोर ॥ २३ ॥ धन देतों जी अपार ॥ सोडा रायाला सत्वर ॥ २४ ॥ विश्वामित्र ह्मणे त्यांसी ॥ काय करावें द्रव्यासी ॥ २५ ॥ क्षितिवरी

जितकें धन ॥ तेंहि माझेंचि संपूर्ण ॥ २६ ॥ नाहीं कोणाचा उपाव ॥ जनी ह्मणे रक्षील देव ॥ २७ ॥

॥ २९३२ ॥ राव ह्मणे अहो ऋषी ॥ काशीखंड वाराणशी ॥ १ ॥ तेथें जाऊनियां आह्मी ॥ ऋण फेडूं तुमचें स्वामी ॥ २ ॥ एक मासाची अवधी ॥ तुह्मी द्यावी कृपानिधी ॥ ३ ॥ ऋषि ह्मणे खरें बोला ॥ नातरी शापीन तिघांला ॥ ४ ॥ रोहिदास ह्मणे त्यासी ॥ गहाण राहीन तुह्मापाशीं ॥ ५ ॥ पितृवचनाचें ऋण ॥ त्यांचा उतराई होईन ॥ ६ ॥ ऋणहत्या आणि वैर ॥ नाहीं चुकत मेल्यावर ॥ ७ ॥ ऐशी बाळकाची वाणी ॥ ऐकुनि दचकला मनीं ॥ ८ ॥ ऋषि बोलला नृपासी ॥ नको राहूं आमुचे देशीं ॥ ९ ॥ निकें निकें त्यासी ह्मणे ॥ बाहेर आलीं तिघें जणें ॥ १० ॥ वनीं निघाला त्वरित ॥ झाला लोकांचा आकांत ॥ ११ ॥ लोट पूर जाती पळा ॥ नेत्रीं उदक ढळढळा ॥ १२ ॥ कैसा ब्राह्मण पहा हो ॥ नृपचंद्रालागीं राहो ॥ १३ ॥ राजा बाहेर दवडुनी ॥ पाहे आमुचाचि धणी ॥ १४ ॥ नगरलोकांसी फिरवुनी ॥ राव निघाला तेथुनी ॥ १५ ॥ अलंकार देखीयेला ॥ मागें विश्वामित्र आला ॥ १६ ॥ माझ्या राज्यांतील संपत्ती ॥ तारामती धरिली हातीं ॥ १७ ॥ घेई भूषण उतरोनी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ १८ ॥

॥ २९३३ ॥ विश्वामित्रें जाउनी पुढें ॥ वणवा लाविला चहूंकडे ॥ १ ॥ धूम्रें दाटलें अंबर ॥ ज्वाळा येती भयंकर ॥ २ ॥ विश्वामित्रें काय केलें ॥ राया बाळातें चुकविलें ॥ ३ ॥ दोघे न पडती दृष्टी ॥ होवोनियां परम कष्टी ॥ ४ ॥ ह्मणे अहा कटकटा ॥ काय लिहिलें अदृष्टा ॥ ५ ॥ मेले वणव्यांत जळोनी ॥ ऐसें आलें तिचे मनीं ॥ ६ ॥ पिटी ललाट करतळें ॥ अंग टाकी धरणी लोळे ॥ ७ ॥ ह्मणे बाळा रोहिदासा ॥ भेट देईंगा पाडसा ॥ ८ ॥ सूर्यवंशीं चुडारत्ना ॥ प्राणपति गा निधाना ॥ ९ ॥ राव दृष्टी न पडतां ॥ अग्नि खाईन तत्वतां ॥ १० ॥ ऐसें विचारिलें मनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ११ ॥

॥ २९३४ ॥ धर्मशिळे आली राणी ॥ ऋषि दचकला मनीं ॥ १ ॥ अग्नि विझवोनी अंगें ॥ सतीपुढें आला रागें ॥ २ ॥ ह्मणे कवणाची कवण ॥ अग्नि खासी कवण्या गुणें ॥ ३ ॥ येरी ह्मणे पांथिकांतें ॥ पति बाळ

चुकले मातें ॥ ४ ॥ तुह्मी असतील देखिले ॥ मज सांगा जी वहिले ॥ ५ ॥ ऋषि बोले तिज लागून ॥ मेले अग्नींत जळून ॥ ६ ॥ तारामती नेउनी तेथें ॥ दाखविलीं दोन्हीं प्रेतें ॥ ७ ॥ त्वचा अंगींची जळाली ॥ हात पाय गोळा झालीं ॥ ८ ॥ देखे नृपाचें हें मढें ॥ पाहे वल्लभा मजकडे ॥ ९ ॥ रुसूं नका बोला वेगें ॥ गुजगोष्टी मजसंगें ॥ १० ॥ रोहिदास कवळी पोटीं ॥ लावी ललाट ललाटीं ॥ ११ ॥ शोक करी तारामती ॥ अस्त झाला तो गभस्ती ॥ १२ ॥ प्रेत कवळी कां निर्फळ ॥ गेला गेला हंस नीळ ॥ १३ ॥ आतां प्राप्त झाली निशी ॥ व्याघ्र भक्षील तिघांसी ॥ १४ ॥ सति-पुढोनियां प्रेत ॥ नेलें ओढोनी परत ॥ १५ ॥ उदर फोडोनी त्वरीत ॥ टाकियेलें काढुनी आर्त ॥ १६ ॥ रागें गुरगुरी तो जाणा ॥ भय दावी क्षणक्षणा ॥ १७ ॥ येरी नेत्र झांकियेले ॥ पंच प्राण आकर्षिलें ॥ १८ ॥ तारामती सांडील प्राण ॥ लटिकें प्रतिज्ञा वचन ॥ १९ ॥ पतिपुत्र दोघे-जण ॥ आला घेउनी ब्राह्मण ॥ २० ॥ नाहीं व्याघ्र ना वणवा ॥ मृगजळाचा हेलावा ॥ २१ ॥ तिघेजणें एक झालीं ॥ दासी जनी आनंदली ॥ २२ ॥

॥ २९३५ ॥ पंथ क्रमितां तिघांसी ॥ आडवा आला कपटवेषी ॥ १ ॥ होवोनियां वृद्ध विप्र ॥ हातीं काठी भार्याकुमर ॥ २ ॥ ह्मणे धन्य रे नृपेशा ॥ तुझा कीर्तिघोष ठसा ॥ ३ ॥ भेरी गर्जती त्रिभुवनीं ॥ धांवून आलों मी ऐकुनी ॥ ४ ॥ आज्ञा करावी जी स्वामी ॥ तुमचे शरणांगत आह्मी ॥ ५ ॥ करुणा दाखवी रायासी ॥ दीन आह्मी तीर्थवासी ॥ ६ ॥ पुढें प्रवास कठीण ॥ पायीं नाहीं पायतण ॥ ७ ॥ तीघां वोपोनियां जोडे ॥ जनी ह्मणे जाती पुढें ॥ ८ ॥

॥ २९३६ ॥ आज्ञा करुनी सूर्यासी ॥ तपवी द्वादश कळेसी ॥ १ ॥ बाप तपाच्या सामर्थ्यें ॥ आज्ञा वंदिली आदित्यें ॥ २ ॥ पर्वताच्या लाह्या होती ॥ असा प्रकाशला गभस्ती ॥ ३ ॥ रोहिदास ह्मणे तात ॥ बहु झालों तृषाक्रांत ॥ ४ ॥ भाकितसे हो करुणा ॥ सत्वर मेळवी जीवना ॥ ५ ॥ प्राप्त न होतां जरी तोय ॥ जीव माझा जाऊं पाहे ॥ ६ ॥ बाळ कडे घेऊनियां ॥ पैल दिसे तेथें छाया ॥ ७ ॥ उदक प्राशन करुनी ॥ पंथ क्रमूं ह्मणे जनी ॥ ८ ॥

॥ २९३७ ॥ पुढें जातां कष्टप्रेम ॥ निर्मी पोह्याचा आश्रम ॥ १ ॥ धर्मपोहेची कुसरी ॥ शोभा रमणिय साजिरी ॥ २ ॥ वृक्ष लागले अंबरीं ॥

डोलताती नानापरी ॥ ३ ॥ फणस कर्दळी गंभेरी ॥ आंबे नारळी खर्जुरी ॥ ४ ॥ चिंचा पपया जांबळी ॥ गुंज खिरण्या रायकेळीं ॥ ५ ॥ सीताफळें कवठें निंब ॥ बोरें परीच्या दाळिंब ॥ ६ ॥ जाई मोगरा सेवंती ॥ चांपा बकुल मालती ॥ ७ ॥ पारिजातक हे चमेली ॥ शेंदू गुलबास मखमली ॥ ८ ॥ तुळसी मंजुळ शोभती ॥ नानापरी पुष्पजाती ॥ ९ ॥ प्राप्त वसंताचा काळ ॥ मधु कुंजती कोकिळ ॥ १० ॥ रंभा ऐशा देवांगना ॥ सर्व शृंगारी भूषणा ॥ ११ ॥ वेलवाळा तोयें सारी ॥ उभ्या तिष्ठताती द्वारीं ॥ १२ ॥ सुगंध वनीं शीतल जळ ॥ ऐसें शोभे रम्यस्थळ ॥ १३ ॥ ऐसी देखोनी वाटिका ॥ चोज नाहीं नृपनायका ॥ १४ ॥ ह्मणती हे धर्मपोये ॥ जनी ह्मणे पुढें जाये ॥ १५ ॥

॥ २९३८ ॥ पोई अव्हेरितां राय ॥ मागें ऋषि धांवताहे ॥ १ ॥ धन्य धन्य रे नरेंद्रा ॥ हातीं धरी हरिश्चंद्रा ॥ २ ॥ उष्ण न ध्यानीं कहार ॥ मार्गीं श्रम झाला फार ॥ ३ ॥ करा आश्रम पुण्यता ॥ आह्मां घडों द्यावें तीर्था ॥ ४ ॥ येथें केलिया आराम ॥ व्यर्थ जाती वांया श्रम ॥ ५ ॥ क्रमा चार दिवस ॥ पहा पोईचा हा वास ॥ ६ ॥ द्यावी आह्मां सर्व जोडी ॥ कृपा कराल ती थोडी ॥ ७ ॥ करा आनंदें भोजन ॥ सुवासित उदकपान ॥ ८ ॥ ह्मणे जावें आश्रमाला ॥ पुढें पंथासी लागला ॥ ९ ॥ त्राहे त्राहे रे जगदीशा ॥ सत्व रक्षिसील कैसा ॥ १० ॥ ऐसा छळक हा ऋषी ॥ नेणों पार कैसा नेशी ॥ ११ ॥ आमची चिंता तुजला हरी ॥ जनी ह्मणे कृपा करी ॥ १२ ॥

॥ २९३९ ॥ ऋषि आश्रमा येउनी ॥ येतां देखे ताराराणी ॥ १ ॥ माव करुनी तात्काळ ॥ कैसा निर्मिला नृपाळ ॥ २ ॥ येउनी आश्रमासी पाहे ॥ डोळां देखियेला राय ॥ ३ ॥ शुद्ध सुमन सेजे नीरा ॥ घालिताती विंझणवारा ॥ ४ ॥ सुगंध चंदन चर्चिती ॥ नानापरीच्या उट्या देती ॥ ५ ॥ रत्नखचिताची झारी ॥ राय घेऊनियां करीं ॥ ६ ॥ करी आनंदें प्राशन ॥ पुढें दिव्यान्न भोजन ॥ ७ ॥ ऐसें करितां अवलोकन ॥ राजा पाहे शामवदन ॥ ८ ॥ नव्हें तेंचि कैसें झालें ॥ सूर्या अंधत्व आलें ॥ ९ ॥ पुष्पभार शेषावरी ॥ कैसा आजि झाला भारी ॥ १० ॥ ध्रुव मेरु गजबजिला ॥ तैसी परि झाली रायाला ॥ ११ ॥ जोडोनियां करपद्मा ॥ ह्मणे बरी केली सीमा ॥ १२ ॥ ऐसें होतें जरी मनीं ॥ तरी कां राज्य

दिलें दानीं ॥ १३ ॥ बुद्धि भविष्यानुसार ॥ मी तों येथें स्थिर ॥ १४ ॥ ह्मणोनियां पुढें जाय ॥ अव्हेरिलें धर्मपोय ॥ १५ ॥ मार्गीं देखियेलें राया ॥ जनी ह्मणे लागे पायां ॥ १६ ॥

॥ २९४० ॥ येतां देखोनियां बाळ ॥ ऋषि धांवला तात्काळ ॥ १ ॥ कडे घेउनी तयाला ॥ ऋषि आश्रमासी आला ॥ २ ॥ तुझें मायबापीं प्रेम ॥ होय पाहोनी आराम ॥ ३ ॥ सुखें करुनी भोजन ॥ सुवासित उदकपान ॥ ४ ॥ करुनी क्रमियेलें पंथा ॥ तिहीं सांगितली वार्ता ॥ ५ ॥ बाळ येतसे मागून ॥ त्याचा परामर्ष करणें ॥ ६ ॥ ह्मणोनी सारिलें विंदान ॥ पुढें वाढिलें दिव्यान्न ॥ ७ ॥ रडे मोकलुनी धाय ॥ येथें कल्पांतीं न राहे ॥ ८ ॥ पुढें लागला पंथासी ॥ ऋषि तटस्थ मानसीं ॥ ९ ॥ वदनीं बोट घाली वोजा ॥ ऋषि करीतसे चोजा ॥ १० ॥ ऐसें सत्वादिकांपुढें ॥ तप खद्योत बापुडें ॥ ११ ॥ काय करणें ऐशियांसी ॥ व्यर्थ मुकलों तपासी ॥ १२ ॥ मार्गीं तिघें एक झालीं ॥ दासी जनी आनंदली ॥ १३ ॥

॥ २९४१ ॥ ऐसें क्रमितां अवधारी ॥ विश्वेश्वराची नगरी ॥ १ ॥ देखियेली वाराणसी ॥ थोर आनंद मानसीं ॥ २ ॥ ह्मणती घ्यावें शिवदर्शन ॥ तेणें श्रम निवारण ॥ ३ ॥ बाप येउनी चौबारा ॥ उभा धरुनी पदरा ॥ ४ ॥ ह्मणे कोठें रे दक्षणा ॥ बरा होसी चुकावणा ॥ ५ ॥ जो का राजा सूर्यवंशीं ॥ छत्र चामरें जयासी ॥ ६ ॥ माथां बांधोनियां तृण ॥ घाली विक्रया आपण ॥ ७ ॥ राणी ह्मणे प्राणेश्वरा ॥ आधीं विक्रा माझा करा ॥ ८ ॥ रोहिदास कर जोडुनी ॥ चरणीं मस्तक ठेवुनी ॥ ९ ॥ आधीं माझिया द्रव्यासी ॥ तुह्मी द्यावें कौशिकासी ॥ १० ॥ ऐसें दोघांचें उत्तर ॥ नवल करी ऋषीश्वर ॥ ११ ॥ काय करा याच्या मोला ॥ ह्मणे वजनीं सोनें घाला ॥ १२ ॥ अग्निहोत्री तो ब्राह्मण ॥ उभा रायापें येउन ॥ १३ ॥ देई तारामती तुक ॥ एक भार हा कनक ॥ १४ ॥ रोहिदास ह्मणे ताता ॥ माता स्नेह माझ्या चित्ता ॥ १५ ॥ राव बोलिला वचन ॥ शीघ्र यावें बा भेटोन ॥ १६ ॥ उभी राहोनी वेल्हाळा ॥ पोटीं बाळाचा उमाळा ॥ १७ ॥ अश्रु ढाळिती लोचन ॥ हा हा शब्दें करी रुदन ॥ १८ ॥ बोलें कौशिक ये माते ॥ स्नेह सोड चाल पंथें ॥ १९ ॥ करूनियां ताडातोडी ॥ पाहे कवतुक आवडी ॥ २० ॥ माता ह्मणे बाळ-

कासी ॥ ममता असूं दे मजपाशीं ॥ २१ ॥ रोहिदास ताराराणी ॥ तेही घेतली ब्राह्मणीं ॥ २२ ॥ मोल देऊनियां दुणें ॥ राव घेतला डोंबानें ॥ २३ ॥ घेऊनियां घरा आला ॥ येऊन सांगतो भार्येला ॥ २४ ॥ सेवक आणिला तुह्मासी ॥ सेवा घ्यावी आवडेल तैसी ॥ २५ ॥ घागर घेऊनियां हातीं ॥ पाणी आणी शीघ्र गती ॥ २६ ॥ कुंभ घेउनी चालिला ॥ खडा हाणोनी फोडिला ॥ २७ ॥ रिक्तपाणी येतां त्यासी ॥ अवघे धुमसिती रायासी ॥ २८ ॥ हा तो पहिलाच शकून ॥ पुढें येणें काय करणें ॥ २९ ॥ ह्मणती हा तो नव्हे भला ॥ यासी ठेवा स्मशानाला ॥ ३० ॥ राव रक्षी स्मशानासी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ ३१ ॥

॥ २९४२ ॥ अनामिक त्यासी पुसे ॥ तुमचें भोजनाचें कैसें ॥ १ ॥ कर संपुष्ट जोडुनी ॥ राव विनवी मधुर वचनीं ॥ २ ॥ जेणें निघे तुमचें काम ॥ राखा माझाही स्वधर्म ॥ ३ ॥ नृपा दिलें कोरें अन्न ॥ सुखें करावें भोजन ॥ ४ ॥ धान्य घेऊनियां करीं ॥ राव आला गंगातीरीं ॥ ५ ॥ स्नान संध्या नेम सारी ॥ राजा स्वयंपाक करी ॥ ६ ॥ गाय अग्नीचा पैं ग्रास ॥ ठाव वाढिला धर्मास ॥ ७ ॥ ग्रास घालावा वदनीं ॥ आला विश्वामित्र मुनी ॥ ८ ॥ बैसावें जों भोजनासी ॥ अकस्मात पावे ऋषी ॥ ९ ॥ एक भाग भक्षियेला ॥ दुजा राजाचा उचलिला ॥ १० ॥ तृप्त होवोनी ऋषेश्वर ॥ उठे देउनी ढेंकर ॥ ११ ॥ पदर कसुनी कटासी ॥ सदा सादर सेवेसी ॥ १२ ॥ निराहार शक्तिहीन ॥ दिसे जैसा रंक दीन ॥ १३ ॥ ऐसा छळी प्रतिदिनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ १४ ॥

॥ २९४३ ॥ येरीकडे ताराराणी ॥ द्विजा घरीं वाहे पाणी ॥ १ ॥ छिद्र पाडोनी रांजणा ॥ पाणी त्यामध्यें थारेना ॥ २ ॥ नाना परीचें गांजणें ॥ देती गाळी हो भदानें ॥ ३ ॥ पाणी वाहणें कीं खेळा ॥ होऊं आली सांजवेळां ॥ ४ ॥ काळ कौशिक ब्राह्मणें ॥ नित्य अग्नि-होत्र करणें ॥ ५ ॥ रोहिदासा आज्ञा करी ॥ समिधा आणाव्या झडकरी ॥ ६ ॥ संगें घेऊनियां गडी ॥ वना चालिला तातडी ॥ ७ ॥ धरूनिया सर्प-वेष ॥ रोहिदासा केला दंश ॥ ८ ॥ येउनी सांगती मातेस ॥ सर्पें खादलें पुत्रास ॥ ९ ॥ गेला चंद्र उतरोनी ॥ दिसे जैसी म्लान वदनी ॥ १० ॥ करुणा आली ब्राह्मणासी ॥ जाय सांभाळी पुत्रासी ॥ ११ ॥ रडे मोक-ळोनी धाय ॥ ह्मणे आतां मी करूं काय ॥ १२ ॥ काय करूं आतां

कैसें ॥ कोठें गेलें हो पाडस ॥ १३ ॥ प्राण राहिला संकटीं ॥ करा पाडसाची भेटी ॥ १४ ॥ निबिड अंधार काळोख ॥ दीर्घस्वरें मारी हाक ॥ १५ ॥ ठेंचा पायीं अडखळत ॥ पुढें पायासी लागत ॥ १६ ॥ बाळ कवळोनी हात ॥ जनी ह्मणे शंख करीत ॥ १७ ॥

॥ २९४४ ॥ वेष धरोनी ब्राह्मण ॥ तिसी करी संभाषण ॥ १ ॥ खेद न करी मानसीं ॥ काय करणें होणारासी ॥ २ ॥ वेगीं संस्कारी याला ॥ दिवसा मागती जा कामाला ॥ ३ ॥ घेऊनियां प्रेतासी ॥ वेगी चेतवी अग्नीसी ॥ ४ ॥ ज्वाळा अवलोकितां नयनीं ॥ राव आला तत्क्षणीं ॥ ५ ॥ ह्मणे कोण गे तूं येथें ॥ येरी ह्मणे तुमचा सुत ॥ ६ ॥ कैंचा सुत कैसा काय ॥ आमचा हाक कोठें आहे ॥ ७ ॥ करुणा ग्लानी करी साची ॥ ह्मणे गोष्ट हें तो कैंची ॥ ८ ॥ बरेंपणें जाई आतां ॥ दंड बैसतील माथां ॥ ९ ॥ घेई प्रेत ओसंगळी ॥ वेगें प्रवेशे देउळीं ॥ १० ॥ आडवें प्रेत झोपीं जाय ॥ ऋषि धांवे लवलाहे ॥ ११ ॥ उदर चिरोनियां नखीं ॥ मांस कवळें घाली मुखीं ॥ १२ ॥ येऊनियां नगरनारी ॥ जनी ह्मणे शंख करी ॥ १३ ॥

॥ २९४५ ॥ धांवा धांवा नगरवासी ॥ लास भक्षिते लेंकुरासी ॥ १ ॥ अवघे होऊनियां गोळा ॥ कोणी न जाती देउळा ॥ २ ॥ जाळ करोनी पाहती ॥ शेण धुळी धोंडे माती ॥ ३ ॥ मारोनी बाहेर घातली ॥ केली डोंबाचे हवाली ॥ ४ ॥ हिच्या करा शिरच्छेदाला ॥ तंव तो आज्ञापी रायाला ॥ ५ ॥ रायें घेऊनियां तिला ॥ आणियेलें ठिकाणाला ॥ ६ ॥ ह्मणे करी हो स्मरण ॥ तुझें कुळदैवत कोण ॥ ७ ॥ खर्ग पुसोनिया धारा ॥ घाव घाली जो शिरा ॥ ८ ॥ ऋषि धांवला सत्वरी ॥ वरच्या वरी कर धरी ॥ ९ ॥ ह्मणे माग मी प्रसन्न ॥ येरी बोले हास्यवदन ॥ १० ॥ रोहिदासा ऐसा पुत्र ॥ हरिश्चंद्र राजा भ्रतार ॥ ११ ॥ याचक विश्वामित्रा ऐसा ॥ जन्मोजन्मीं दे जगदीशा ॥ १२ ॥ बापा भली केली सीमा ॥ तप वोपितों मी तुह्मा ॥ १३ ॥ गगनीं विमानें दाटती ॥ सुमनभार वरुषती ॥ १४ ॥ वेगीं उतरलें विमान ॥ नामयाची जनी ह्मणे ॥ १५ ॥

॥ २९४६ ॥ दूत विनविती करजोडुनी ॥ ह्मणती आरुढावें विमानीं ॥ १ ॥ ऋषि ह्मणे न घडे ऐसें ॥ ह्याची तृप्ति नाहीं आस ॥ २ ॥ पटावरोनी

काढिला ॥ पटीं बैसवीन झाला ॥ ३ ॥ थोर वाजत गाजत ॥ विप्र मंत्रघोष करीत ॥ ४ ॥ विजयी झाला हरिश्चंद्र ॥ आडवा पावला परिवार ॥ ५ ॥ लक्षानुलक्ष आरसा करिती ॥ नगरनारी वोवाळिती ॥ ६ ॥ ऋषि अभिषेकिती रायाला ॥ थोर मनीं आनंदाला ॥ ७ ॥ राया प्राप्ती जाला पट ॥ गुडी उभवी वसिष्ठ ॥ ८ ॥ येथुनी हरिश्चंद्र आख्यान ॥ नामयाची जनी ह्मणे ॥ ९ ॥ हरिश्चंद्र आख्यान संपूर्ण ॥

---

## सेनान्हावी चरित्र.

——:oo:——

॥ २९४७ ॥ सेना न्हावी भक्त भला ॥ तेणें देव भुलविला ॥ १ ॥ नित्य जपे नामावळी ॥ लावी विठ्ठलाची टाळी ॥ २ ॥ रूप पालटोनी गेला ॥ सेना न्हावी विठ्ठल झाला ॥ ३ ॥ काखें घेउनी धोकटी ॥ गेला राजीयाचे भेटी ॥ ४ ॥ आपुले हातें भार घाली ॥ राजियाची सेवा केली ॥ ५ ॥ विसर तो पडला रामा ॥ काय करूं मेघःशामा ॥ ६ ॥ राजा अयनियांत पाहे ॥ चतुर्भुज उभा राहे ॥ ७ ॥ दूत धाडूनिया नेला ॥ राजियानें बोलाविला ॥ ८ ॥ राजा बोले प्रीतीकर ॥ रात्री सेवा केली फार ॥ ९ ॥ राजसदनाप्रति न्यावें ॥ भीतरींच घेउनी जावें ॥ १० ॥ आतां बरा विचार नाहीं ॥ सेना ह्मणे करूं कांई ॥ ११ ॥ सेना न्हावी गौरविला ॥ राजियानें मान दिला ॥ १२ ॥ कितीकांचा शीण गेला ॥ जनी ह्मणे न्हावी झाला ॥ १३ ॥

---

## थालीपाक.

——:oo:——

॥ २९४८ ॥ थालिपाक ऐकतां ॥ हरि वारी जन्मव्यथा ॥ १ ॥ दुर्योधनाच्या घरासी ॥ आला दुर्वास हो ऋषी ॥ २ ॥ सेवें बहुत तोषविला ॥ वर माग तूं इच्छिला ॥ ३ ॥ शिष्यासह रानीं जावें ॥ इच्छाभोजन मागावें ॥ ४ ॥ अंतर शाप द्यावा ॥ आतां जातों वर द्यावा ॥ ५ ॥

हर हर शब्द थोर केला ॥ झाला वनांत गलबला ॥ ६ ॥ नवल सर्वांसी वाटलें ॥ जनी ह्मणे ऋषि आले ॥ ७ ॥

॥ २९४९ ॥ मध्य रात्रीं ऋषीसहित ॥ वना आले अकस्मात ॥ १ ॥ पंडुसुत जागे झाले ॥ ऋषि समस्त वंदिले ॥ धृ० ॥ धर्म भीमाकडे पाहे ॥ सत्वहानि होत आहे ॥ २ ॥ द्रौपदीनें धांवा केला ॥ देव जेवितां उठिला ॥ ३ ॥ ऋषि तृप्त केले वनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २९५० ॥ करचरण प्रक्षाळुनी ॥ उभी ठेली वृंदावनीं ॥ १ ॥ जोडोनियां करकमळ ॥ ह्मणे धांवरे गोपाळ ॥ धृ० ॥ कृष्णा पाहतोसी काय ॥ सत्वहानि होत आहे ॥ २ ॥ ऋषि स्नानासी कोपिष्ट ॥ गेले सांगोनीयां स्पष्ट ॥ ३ ॥ दिवसा कर्माचा उगाणा ॥ सर्व सारोनीयां जाणा ॥ ४ ॥ आतां येतों शीघ्र गती ॥ अन्नें वाढा पात्रावरुती ॥ ५ ॥ अन्न न देखतां डोळां ॥ भस्म करीन सकळां ॥ ६ ॥ गेला घालोनी संकटीं ॥ लाज राखे जगजेठी ॥ ७ ॥ कोणी नाहींरे निर्वाणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ८ ॥

॥ २९५१ ॥ ताट विस्तारी रुक्मिणी ॥ देव बैसले भोजनीं ॥ १ ॥ इतुक्यामध्यें अकस्मात ॥ ध्वनि उमटली कानांत ॥ २ ॥ धांवा ऐकतां श्रवणीं ॥ ताट लोटी चक्रपाणी ॥ ३ ॥ उठिला खडबडोनी कैसा ॥ पावे बहिणीचिया क्लेशा ॥ ४ ॥ उभी वृंदावनीं बाळा ॥ पुढें देखिला सांवळा ॥ ५ ॥ मुगुट कुंडलें मेखळा ॥ वैजयंती वनमाळा ॥ ६ ॥ शंख चक्र आयुधें करीं ॥ दिसे घवघवीत हरी ॥ ७ ॥ झळके पीतांबर कासे ॥ नयनीं कोंदला प्रकाश ॥ ८ ॥ पाहतां आनंदली मनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ९ ॥

॥ २९५२ ॥ वंदोनी श्रीकृष्ण चरण ॥ हरुषें घाली लोटांगण ॥ १ ॥ ह्मणे तूंचि माझ्या मना ॥ स्वस्थ करी गा नारायणा ॥ २ ॥ आश्रमासी येतां ऋषी ॥ तोंवरी आयुष्य प्राणासी ॥ ३ ॥ ऐकतांची हांसे देव ॥ न दीसे प्राप्तीचा उपाव ॥ ४ ॥ अवकाळीं कैंचें अन्न ॥ विचारितां दिसे विघ्न ॥ ५ ॥ त्यांचे असो बळ तैसें ॥ कांहीं वोपावें

आह्मांस ॥ ६ ॥ स्वस्थ नव्हे माझें मन ॥ क्षुधा लागली दारुण ॥ ७ ॥ तार्टी विस्तारिला मेवा ॥ तुझा ऐकोनियां धांवा ॥ ८ ॥ न जेवितां आलों येथें ॥ बहु झालों क्षुधाक्रांत ॥ ९ ॥ सत्वर मेळवी भोजनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ १० ॥

॥ २९५३ ॥ हांसे आलें द्रौपदीसी ॥ बापा वचन परियेसी ॥ १ ॥ सर्व अरिष्ट भंजना ॥ तुजलागीं बाहों कोणा ॥ २ ॥ एक भाव तुझे पायीं ॥ या वेगळें कांहीं नाहीं ॥ ३ ॥ थाळी माजीं पाहतां अन्न ॥ होय क्षुधेचें हरण ॥ ४ ॥ थाळी दाखवी देवासी ॥ कैंचा विश्वास तुजसी ॥ ५ ॥ धांडोळितां कष्टें बहुतें ॥ किंचित शाखापत्र तेथें ॥ ६ ॥ निर्मी कैवल्याचा दानी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ७ ॥

॥ २९५४ ॥ कर पसरीला भगवंतें ॥ घाली द्रौपदी देंटातें ॥ १ ॥ ह्मणे पावो विश्वंभर ॥ बोले द्रौपदी सुंदर ॥ २ ॥ देतां तृप्तीचा ढेंकर ॥ धालें त्रैलोक्य अपार ॥ ३ ॥ दावी कौतुक श्रीपती ॥ पर्वत अन्नाचे पाहाती ॥ ४ ॥ उष्ण घवघवीत कैसी ॥ वाफा उठती आकाशीं ॥ ५ ॥ नानापरिचीं दिव्यान्नें ॥ डोळां दावी नारायणें ॥ ६ ॥ चोज सर्वांचिया मनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ७ ॥

॥ २९५५ ॥ येरीकडे गंगातीरीं ॥ कवतुक दाखवी श्रीहरी ॥ १ ॥ धर्मासहित साहीजण ॥ ऋषीलागीं देती अन्न ॥ २ ॥ रत्नखचित मंडपा आंत ॥ पंगती बैसल्या आनंदभूत ॥ ३ ॥ नानापरिचें दिव्य अन्न ॥ वाढी द्रौपदी आपण ॥ ४ ॥ मिठी पडली वदनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ५ ॥

॥ २९५६ ॥ ह्मणती माथां असतें तोंड ॥ अन्नें भक्षितो उदंड ॥ १ ॥ कैंचीं पोटें आमुचीं लहान ॥ गोड धर्माघरचें अन्न ॥ २ ॥ उदरें सागराच्या ऐसीं ॥ करुनी यावें धर्मापाशीं ॥ ३ ॥ तृप्ति द्रौपदीच्या हातें ॥ नित्य भक्षाया अन्नातें ॥ ४ ॥ वदन करवेना तळीं ॥ वरुती चंद्राची मंडळी ॥ ५ ॥ चंद्री लागलीसे नेत्रा ॥ कोण सांभाळितें धोत्रा ॥ ६ ॥ तरी आवडी भोजनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ७ ॥

॥ २९५७ ॥ ऐशा धाल्या ऋषिपंक्ती ॥ ढेंकर आनंदाचे देती ॥ १ ॥ तृप्ति बाणली सर्वांसी ॥ तरी आवड अन्नापाशीं ॥ २ ॥ उठले हात

प्रक्षाळुनी ॥ विडे घेतले सर्वांनीं ॥ ३ ॥ न बैसवे सुखासनीं ॥ अवघे प्रवर्तले शयनीं ॥ ४ ॥ तें देखोनी निद्रिस्थ ॥ साही जणें झाली गुप्त ॥ ५ ॥ माया निर्मियेली जैसी ॥ आतां गुप्त झाली तैसी ॥ ६ ॥ कोणा न कळे याची करणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ७ ॥

॥ २९५८ ॥ ह्मणे पाचारा भूदेवा ॥ धर्म ह्मणे जावें भिवा ॥ १ ॥ गंगातिरासी येऊन ॥ नमियेले ऋषिजन ॥ २ ॥ त्वरा करा ऋषिजन ॥ पात्रीं विस्तारलें अन्न ॥ ३ ॥ ह्मणती बापा ऐसें नव्हे ॥ पोट आहे किंवा काय ॥ ४ ॥ आतां स्वस्थ प्रसादें ॥ तृप्त झालीं ऋषिवृंदें ॥ ५ ॥ कैंचा नष्ट दुर्योधन ॥ आह्मां धाडिले दुर्जनें ॥ ६ ॥ कष्टी करितां अंबऋषी ॥ चक्र लागलें पाठीसी ॥ ७ ॥ तेचि गोष्टी झाली आतां ॥ शीघ्र पळावें तत्वता ॥ ८ ॥ माझा आशीर्वाद धर्मा ॥ नित्य कल्याणची तुह्मां ॥ ९ ॥ ऋषि निघाले तेथुनी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ १० ॥

॥ २९५९ ॥ प्रपंचीं जो रडे ॥ ब्रह्मवन त्यातें जडे ॥ १ ॥ ऐसा अखंडित ब्रह्मीं ॥ विठ्ठला जो कर्माकर्मीं ॥ २ ॥ पुत्रदेह ध्याया ध्यानीं ॥ कांता धनवो कामिनी ॥ ३ ॥ सिंधूसी सांडावा ॥ जनी ह्मणे गा सदैवा ॥ ४ ॥

॥ २९६० ॥ पाहतां पंढरिराया ॥ साच्या मुक्ति लागे पाया ॥ १ ॥ पुरुषार्थ चारी ॥ साचें मोक्ष आर्जव करी ॥ २ ॥ धन संपत्तीचा दाता ॥ होय पाहतां पंढरिनाथा ॥ ३ ॥ संताचे चरणीं ॥ लोळे नाचे दासी जनी ॥ ४ ॥

॥ २९६१ ॥ बांधोनिया हात गयाळ मारिती ॥ दंड ते करिती मोक्षासाठीं ॥ १ ॥ गेले ते पितर मोक्षालागीं तुझे ॥ आतां देई माझे दक्षिणेसी ॥ २ ॥ बापुडे केंश बोडिती मिशीदाढी ॥ मग दक्षणा हिरडी खातसे हे ॥ ३ ॥ फार काय सांगों मेल्याविण मुक्ती ॥ नाहीं ते वांछिती स्वप्न सुख ॥ ४ ॥ अनंत जन्म मृत्यु होतां जैसें दुःख ॥ त्याहुनी अशेष आहे तेथें ॥ ५ ॥ भांबावले जन धांवे आटाआटीं ॥ सोडूनियां कोटि अनंत पद ॥ ६ ॥ नलगे गाळावें नलगे तळावें ॥ नलगे मरावें मुक्तीसाठीं ॥ ७ ॥ मुक्ति लागे पायां जाऊनियां पाहे ॥ जीव जातां देह जनी नाहीं ॥ ८ ॥

॥ २९६२ ॥ नाना वृत्त तपदान ॥ मुखीं हरीचें स्मरण ॥ १ ॥ येथें असो द्यावा भाव ॥ पुरवी आंतरीचे देव ॥ २ ॥ हाचि विश्वास धरुनी ॥ कृपा करील चक्रपाणी ॥ ३ ॥ भक्तिभाव ज्याचा पुरा ॥ त्यासी धांवतो सामोरा ॥ ४ ॥ लक्ष लावा पायापाशीं ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ ५ ॥

॥ २९६३ ॥ अंगीं हो पैं शांती ॥ दया क्षमा सर्वांभुतीं ॥ १ ॥ जेथें जाऊन पाहे देवा ॥ ब्रह्मादिक करिती सेवा ॥ २ ॥ आवडी असे पैं कीर्त्तनीं ॥ लवे संतांचे चरणीं ॥ ३ ॥ जैसी दया पुत्रावरी ॥ तेंचि पाहे चराचरीं ॥ ४ ॥ बहु अपराध केला ॥ ह्मणे जनी तो रक्षिला ॥ ५ ॥

॥ २९६४ ॥ सिंहाचें तें नख पतिव्रतास्तन ॥ असलिया प्राण प्राप्त नोहे ॥ १ ॥ गजमाथां मोंतीं शेषाचा तो मणी ॥ व्याघ्राचें आसन मृगकस्तुरी ॥ २ ॥ देह बळी गेल्यावांचूनियां पाही ॥ ह्मणे जनाबाई प्राप्त नाहीं ॥ ३ ॥

॥ २९६५ ॥ ऐसा योग घडे ज्यातें ॥ धन्य माता आणि तात ॥ १ ॥ अखंड वासना ॥ ब्रह्मार्पण देवार्चना ॥ २ ॥ ब्रह्मभावें हो देवा ॥ ऐसा पूजी जो भूदेवा ॥ ३ ॥ नम्रता चरणीं ॥ ह्मणे जनी सरली मनीं ॥ ४ ॥

॥ २९६६ ॥ जहाज तारिलें तारिलें ॥ शेवटीं उगमासी आलें ॥ १ ॥ भाव शिडासी लाविला ॥ नाम फरारा सोडिला ॥ २ ॥ कथा भरियेलें केणें ॥ घ्यारे नका दैन्यवाणें ॥ ३ ॥ एका मनाचा विसार ॥ आधीं देउनी निर्धार ॥ ४ ॥ कोण देतो फुकासाठीं ॥ आर्तभूत व्हावें पोटीं ॥ ५ ॥ आर्तभूत व्हारे ॥ जनी ह्मणे केणें घ्यारे ॥ ६ ॥

॥ २९६७ ॥ भृंगीचिया अंगीं कोणतें हो बळ ॥ शरिरें अनाढळ केली आळी ॥ १ ॥ काय तिनें तपमुद्रा धरियेली ॥ ह्मणोनियां झाली भृंगी अंगें ॥ २ ॥ अरे बा शहाणिया तैसा करी जप ॥ संतयोगें पाप नाहीं होय ॥ ३ ॥ नामयाची जनी पिटिती डांगोरा ॥ संदेह न धरा करा पूजा ॥ ४ ॥

॥ २९६८ ॥ झाली जगाचिये सीमा ॥ वस्तुभाव येर व्योमा ॥ १ ॥ पहा हो अधिकारी ॥ नको असोनी भिकारी ॥ २ ॥ पट तंतूचा घडला ॥ घट मृत्तिकेचा झाला ॥ ३ ॥ पहा श्वानसमची पंडित ॥ जनी ह्मणे एकची मात ॥ ४ ॥

॥ २९६९ ॥ हेंचि देवाचें भजन ॥ सदां राहे समाधान ॥ १ ॥ येर अवघें संसारिक ॥ इंद्र देव ब्रह्मादिक ॥ २ ॥ वरकडाचा पाड किती ॥ जनी देवास बोलती ॥ ३ ॥

॥ २९७० ॥ धनियाचें वडपे गेला ॥ जिवें जीव झाला ॥ १ ॥ देहीं देह हारपले ॥ गेह गेहातीत झालें ॥ २ ॥ झाला आश्रम आश्रमा ॥ जनी ह्मणे धरा प्रेमा ॥ ३ ॥

॥ २९७१ ॥ डोईचा पदर आला खांद्यावरी ॥ भरल्या बाजारीं जाईन मीं ॥ १ ॥ हातीं घेईन टाळ खांद्यावरी वीणा ॥ आतां मज मना कोण करी ॥ २ ॥ पंढरीच्या पेठें मांडियेले पाल ॥ मनगटावर तेल घाला तुह्मी ॥ ३ ॥ जनी ह्मणे देवा मी झालें येसवा ॥ निघालें केशवा घर तुझें ॥ ४॥

॥ २९७२ ॥ ऐसी कथेची महिमा ॥ बोली बोलायाची सीमा ॥ १ ॥ नामदेवाचे कीर्तनीं ॥ ध्वजा आल्या स्वर्गींहुनी ॥ २ ॥ जपतपें लाजविलीं ॥ तीर्थें शरणांगत झालीं ॥ ३ ॥ वेद श्रुति देती ग्वाही ॥ जनी ह्मणे सांगूं काई ॥ ४ ॥

॥ २९७३ ॥ व्हावें कथेसी सादर ॥ मन करूनियां स्थीर ॥ १ ॥ बाबा काय झोंपी जातां ॥ झोले चौऱ्यासींचे खाता ॥ २ ॥ नरदेह कैसा रे मागुता ॥ भेटी नव्हे या सीताकांता ॥ ३ ॥ आळस निद्रा उठाउठी ॥ सजा स्वरूपीं घाला मिठी ॥ ४ ॥ जनी ह्मणे हरिचें नाम ॥ मुखीं ह्मणा धरूनि प्रेम ॥ ५ ॥

॥ २९७४ ॥ नाद पडे कानीं ॥ मृग पैज घाली प्राणी ॥ १ ॥ आवडी अंतरीं ॥ गज मेला पडे गारी ॥ २ ॥ चोख पाहे अंग ॥ दिपें नाडला पतंग ॥ ३ ॥ गोडी रसगळा ॥ मच्छ अडकला गळा ॥ ४ ॥ गंधें अलि नेला॥ ह्मणे जनी तोचि मेला ॥ ५ ॥

॥ २९७५ ॥ माझा हा विठोबा येईल गे जेव्हां ॥ जेवीन मी तेव्हां गोणाबाई ॥ १ ॥ जाउनी राउळा तयासीं तूं पाहे ॥ लवकरी बाहे भोजनासी ॥ २ ॥ भरलिया रागें क्रोध त्याचा साहे ॥ लवकरी बाहे भोजनासी ॥ ३ ॥ ज्ञानेश्वराघरीं असेल बैसला ॥ जाउनी विठ्ठला पाहे तेथें ॥ ४ ॥ जनी म्हणे देवा चला पुरुषोत्तमा ॥ खोळंबला नामा भोजनासी ॥ ५ ॥

---

## पदें.

॥ २९७६ ॥ पुण्यवंत पाताळ लोकीं नेला ॥ दरिद्री तो भाग्यवंत केला ॥ चोरट्याचा बहुमान वाढविला ॥ किर्तीवानाचा अपमान केला ॥ १ ॥ धुंद झाला तुझा दरबार ॥ धृ० ॥ वैरीयासी दिधली मोक्षसिद्धी ॥ कपटिया दिधली महानिधी ॥ सेवकाच्या ढुंगा न मिळे चिंधी ॥ चाळकासी त्रैलोक्य भावें वंदी ॥ २ ॥ पतिव्रता ती वृथा गुंतविली ॥ वेश्या गणिका ती सत्यलोका नेली ॥ कळीं स्वकुळा लावियेली ॥ यादववृंदा ही गोष्ट बरी नाहीं केली ॥ ३ ॥ सत्ववानाचा बहु केला छळ ॥ कीर्तीवानाचें मारियेलें बाळ ॥ सखा ह्मणविसी त्याचें नासी बळ ॥ जनी ह्मणे मी जाणें तुझे खेळ ॥ ४ ॥

॥ २९७७ ॥ माझें अचडें बचडें छकुडें ग राधे रुपडें ॥ पांघरूं घाली तीं कुचडें ॥ धृ० ॥ हरि माझा गे सांवळा ॥ पायीं पैंजण वाजे खुळखुळा ॥ यानें भुलविल्या गोपिबाळा ॥ मा० ॥ १ ॥ हरि माझा गे नेणता ॥ करी त्रिभुवनाचा घोंगता ॥ जो कां नांदे त्रिभुवनीं ॥ मा० ॥ २ ॥ ऐसे देवाजीचे गडी ॥ पेंद्या सुदाम्याची जोडी ॥ बळिभद्र त्याचा गडी ॥ मा० ॥ ३ ॥ जनी ह्मणे तूं चक्रपाणी ॥ खेळ खेळतो वृंदावनीं ॥ लुब्ध झाल्या त्या गौळणी ॥ माझें अ० ॥ ४ ॥

॥ २९७८ ॥ ऐका हो नामयाचा जन्म पुर्वसंचित ॥ धृ० ॥ हिरण्यकश्यपकुळीं नामा प्रऱ्हाद ॥ पद्मीणी नाम माझें श्रेष्ठ दासीचें पद ॥ १ ॥ दुसरा जन्म याचा अंगद रामभक्त ॥ मंथरा नाम माझें भरतें मारिली लात ॥ २ ॥ द्वापारीं कृष्णसेवा उद्धव जन्मला ॥ कुवज्या नाम माझें

देवें उद्धार केला ॥ ३ ॥ कलींत नामदेव विठ्ठल चिंतनीं ॥ त्याचीच सेवेलागीं दासी जन्मली जनी ॥ ४ ॥

॥ २९७९ ॥ विठोबा मला मुळ धाडा ॥ धांवत येईन दुडदुडा ॥ चरणीं लोळेन गडबडा ॥ माझा जीव झाला वेडा ॥ धृ० ॥ कर ठेवुनि कटावरी ॥ उभा राहिला विटेवरी ॥ मुकुट घातला सरी ॥ कलगी खोविली वरी ॥ १ ॥ पितांबर नेसूनियां पिवळा ॥ गळां पैं तुळसीच्या माळा ॥ कीं रूप सुंदर सांवळा ॥ तेज झळके झळाळा ॥ २ ॥ नामदेवाचें कौतुक ॥ मला सांपडलें माणीक ॥ विठोबा पाहुनी तुझें मुख ॥ हारपली माझी तहान भूक ॥ ३ ॥ विठोबा तुझी संगती बरी ॥ जैसा चंदन मैलागिरी ॥ संत चालले पंढरी ॥ निशाण पताका जरतारी ॥ ४ ॥ जसी मोहोळासी लुब्ध मासी ॥ तसी तूं सखी माझी होसी ॥ सुख दुःख सांगेन तुजपासी ॥ माझा जीव होईल खुषी ॥ ५ ॥ काळी मध्यान रात्र झाली ॥ फेरी विठ्ठलाची आली ॥ जनी ह्मणे चूक पडली ॥ भेट नाहीं विठ्ठलाची झाली ॥ ६ ॥

॥ २९८० ॥ नवल वर्तलें नवल वर्तलें नवल गुरूचे पायीं ॥ कापुर जळुनी गेला तेथें काजळी उरली नाहीं ॥ धृ० ॥ साखर पेरुनी ऊंस काढिला कान झाला डोळा ॥ निबर बायको भ्रतार तान्हा सासरा तो भोळा ॥ १ ॥ नवल वर्तलें नवल वर्तलें नवल चोजवेना ॥ डोहामाजी मासोळीनें वांचविलें जीवना ॥ २ ॥ नवल वर्तलें नवल वर्तलें अनाम चक्रपाणी ॥ गोकुळ चोरून नेलें तेथें कैंची दासी जनी ॥ ३ ॥

॥ २९८१ ॥ निवृत्ति शोभे मुगुटाकार ॥ ज्ञान सोपान वटेश्वर ॥ धृ० ॥ विठ्ठल पंढरीचें राणे ॥ त्यालें भक्तांचीं भूषणें ॥ १ ॥ शिरीं अंकुश खोविला ॥ तेथें नवलाख साला मिरविला ॥ २ ॥ भाळीं कस्तुरी रेखिली ॥ तेथें मुक्ताई मिरविली ॥ ३ ॥ दंतपंक्तीचा सुढाळ ॥ तोहा संतिदास मैराळ ॥ ४ ॥ खेंचरविसा जगमित्र नागा ॥ कुंडलें जोडा विठोबा जोगा ॥ ५ ॥ कंठीं एक दाणा अविंद ॥ तोहा जोगा परमानंद ॥ ६ ॥ गळा मिरवे वैजयंती ॥ यासी मिराई ह्मणती ॥ ७ ॥ हृदयीं पदक शोभे बापा ॥ तोहा नामा शिंपा ॥ ८ ॥ बाही बाहुवट गोमटे ॥ गोरा सांवता नेटेपाटे ॥ ९ ॥ कवि आसंद सुदामा ॥ वेळा कंकण साजे तुह्मा ॥ १० ॥ जनी ह्मणे कसिला पितांबर ॥ तोहा आमचा कबीर ॥ ११ ॥




## पाळणा.

॥ २९८२ ॥ जो जो जो जो रे गोरक्षा ॥ जगदोद्धारा जगदीशा ॥ १ ॥ शुद्ध सुमनांची सेज ॥ भक्तिभावें आंत नीज ॥ २ ॥ माता उन्मनी केवळ ॥ निजीं निजले गोपाळ ॥ ३ ॥ मागें घालुनी आनंदा ॥ सुखें निजे बा गोविंदा ॥ ४ ॥ अद्वय नाम गीतीं गातां ॥ दासी जनी कैंची आतां ॥ ५ ॥

## धांवा श्रीकृष्णाचा.

॥ २९८३ ॥ क्षीरसागरिंच्या वसणारा ॥ गरुडावर बसणारा ॥ धृ० ॥ सगुणरुप धरुनि मुनिमानस ठसणारा ॥ पूतनागरळ शोषणारा ॥ करुनियां चोरी दहिदुध भक्षणारा ॥ उखळीं मातेसी गवसणारा ॥ नित्य हसणारा ॥ राधेसि नित्य हसणारा ॥ करितांचि गर्व रुसणारा ॥ ठकउनि गवळ्यांच्या पोरीसि फसविणारा ॥ धांवगरुडा ॥ १ ॥ अर्जुन घोड्याच्या आणि पाठि पुसणारा ॥ सुरदासा दिसणारा ॥ एकनाथाच्या घरीं गंध घांसणारा ॥ वाहूनि पाणी उपसणारा ॥ दळण निसणारा ॥ जनी सवें दळण निसणारा ॥ गाउनी गीत पिसणारा ॥ जनी दासीचे गोधडींत घुसणारा ॥ २ ॥

## भुपाळी.

॥ २९८४ ॥ उठा पांडुरंगा प्रभातसमयो पातला ॥ वैष्णवांचा मेळा गरुडपारीं दाटला ॥ १ ॥ गरुडपारापासुनी माहाद्वारापर्यंत ॥ सुरवरांची मांदी उभी जोडुनीयां हात ॥ २ ॥ शुकसनकादिक नारद तुंबर भक्तांच्या कोटी ॥ त्रिशूळ डमरु घेउनी उभा गिरिजेचा पती ॥ ३ ॥ कलियुगींचा भक्त नामा उभा कीर्तनीं ॥ पाठीमागें उभी डोळा लाउनीयां जनी ॥ ४ ॥

॥ २९८५ ॥ प्रेमभावें तुह्मी नाचा ॥ रामरंगें रंगो वाचा ॥ १ ॥ हेंचि मागों देवाजीला ॥ आवडी शांती खरें बोला ॥ २ ॥ जैसी माय तान्हयातें ॥ खेळउनी चुंबी खातें ॥ ३ ॥ तेंचि तुह्मी संतजना ॥ सर्वा

धरावी भावना ॥ ४ ॥ हरि कोठवळा झाला ॥ ह्मणे जनी भक्ति केला ॥ ५ ॥

॥ २९८६ ॥ शरीर हें जायाचें नश्वर आणिकांचें ॥ ह्मणाल जरी त्याचें काय काज ॥ १ ॥ आंबरसें चोखिला बिजसालें सांडिला ॥ पुढें तेणें उभविला दुजा एकू ॥ २ ॥ समूळ साल माया सांडूनियां दिजे ॥ परि अहंबीज जतन करा ॥ ३ ॥ तें बीज भाजोनी करा ओंवाळणी ॥ संतांचे चरणीं समूळ देह ॥ ४ ॥ पुढें त्या बीजांची न करावी दुराशा ॥ न धरावी आशा पुढिलांची ॥ ५ ॥ आहे नाहीं देह धरी ऐसा भाव ॥ ह्मणे जनी देव सहज होसी ॥ ६ ॥

॥ २९८७ ॥ विवेकाची पेंठ ॥ उघडी पंढरीची वाट ॥ १ ॥ तेथें नाहीं कांहीं धोका ॥ उठाउठी भेटे सखा ॥ २ ॥ मरोनियां जावें ॥ शरण विठोबासी व्हावें ॥ ३ ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ देव करा ऐसा ऋणी ॥ ४ ॥

॥ २९८८ ॥ विठ्ठलाचा छंद ॥ वाचे गोविंद गोविंद ॥ १ ॥ हाचि बोला हो सिद्धांत ॥ देव सांगे हो धादांत ॥ २ ॥ जनी ह्मणे सांगेन आतां ॥ कृपें ऐका पंढरिनाथा ॥ ३ ॥

॥ २९८९ ॥ जिव्हा लागली नामस्मरणीं ॥ रित्या मापें भरी गोणी ॥ १ ॥ नित्य नेमाची लाखोली ॥ गुण आज्ञेनें मी पाळी ॥ २ ॥ मज भरंवसा नामाचा ॥ गजर नामाच्या दासीचा ॥ ३ ॥ विटेवरी ब्रह्म दिसे ॥ जनी त्याला पाहतसे ॥ ४ ॥

॥ २९९० ॥ पतंग सुखावला भारी ॥ उडी घाली दीपावरी ॥ १ ॥ परि तो देहांतीं मुकला ॥ दोहीं पदार्थीं नाडिला ॥ २ ॥ विषयाचे संगती ॥ बहु गेले अधोगती ॥ ३ ॥ ऐसे विषयानें भुलविलें ॥ जनी ह्मणे वांया गेले ॥ ४ ॥

॥ २९९१ ॥ जगीं विठ्ठल रुक्मिणी ॥ तुझी अखंड ध्यानी ॥ १ ॥ मग तुज काय उणें ॥ झाले सोयरे त्रिभुवनें ॥ २ ॥ साराचें जें सार ॥ भवसिंधु उतरी पार ॥ ३ ॥ मन ठेउनी चरणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २९९२ ॥ शूराचें तें शस्त्र कृपणाचें धन ॥ विध्वंसिल्या प्राण हातां नये ॥ १ ॥ गजमाथां मोंतीं सर्पाचा तो मान ॥ गेलियाही प्राण हातां नये ॥ २ ॥ सिंहाचें तें नख पतिव्रतेचें स्तन ॥ गेलियाही प्राण हातां नये ॥ ३ ॥ विराल्यावांचून देह अहंभाव ॥ जनी ह्मणे देव हातां नये ॥ ४ ॥

॥ २९९३ ॥ आलिया ब्राह्मणासी दान ॥ द्रव्य दिधलें अपार जाण ॥ १ ॥ गाई ह्मसींचीं खिल्लारें ॥ ब्राह्मणां दिधलीं अपारें ॥ २ ॥ कामधेनूची उभनी ॥ कल्पवृक्षाची दाटणी ॥ ३ ॥ ऐसा आनंदसोहळा ॥ दासी जनी पाहे डोळां ॥ ४ ॥

॥ २९९४ ॥ कीर्त्तनासी जातां मार्गीं टाकी पाय ॥ अमर देह होय कळे त्यासी ॥ १ ॥ आखेद तरी तेथें घडे हिंसा ॥ जन्मवेद भाषा वेदापाशीं ॥ २ ॥ गंगा वाराणशी धरोनी पदरीं ॥ चाललीसे नारी दोहींकडे ॥ ३ ॥ आमच्या बापाची ऐकावया कीर्त्ती ॥ जाऊं ह्मणोन घेती ऐक्य कधीं ॥ ४ ॥ कीर्तनासी जावें कैसें कोणेपरी ॥ असूं द्या अंतरीं गोष्ट हित ॥ ५ ॥ वऱ्हाडी धांवे जैसा प्रयोजनीं ॥ तान्हेलें तें पाणी पुसावया ॥ ६ ॥ व्याकुळ तें एक चुकलें बाळक ॥ त्या धांवे शोकें हाका मारी ॥ ७ ॥ अशी कथे जातां गंगा त्या चरणीं ॥ ह्मणे दासी जनी भाक मानी ॥ ८ ॥

॥ २९९५ ॥ येऊनियां जन्मा एक ॥ करा देहाचें सार्थक ॥ १ ॥ वाचे नाम विठ्ठलाचें ॥ तेणें सार्थक जन्माचें ॥ २ ॥ ऐसा नामाचा महिमा ॥ शेष वर्णितां झाली सीमा ॥ ३ ॥ नाम शास्त्रीं त्रिभुवनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ २९९६ ॥ रत्नाचे मंचकीं पहुडे चक्रपाणी ॥ चोळीत रुक्मिणी चरणांबुज ॥ १ ॥ कानीं पडियले द्रौपदीचे बोल ॥ उठे घननीळ तातडीनें ॥ २ ॥ रुक्मिणी ह्मणे ऐक एक गोष्ट ॥ पडिलें संकटीं तान्हें माझें ॥ ३ ॥ टाकिला गरुड अनवाणी पाय ॥ जनी ह्मणे माय धांविन्नली ॥ ४ ॥

॥ २९९७ ॥ दुर्योधना मारी ॥ पांडवासी रक्षी हरी ॥ १ ॥ पांडवा वनवासी जाये ॥ तयापाठीं देव आहे ॥ २ ॥ उणें न पडे तयाचें ॥

काम पूर्वी हो मनाचें ॥ ३ ॥ जनी ह्मणे विदुराच्या ॥ कण्या भक्षी हो प्रीतीच्या ॥ ४ ॥

॥ २९९८ ॥ जनीचें बोलणें वाची नित्य कोणी ॥ तयाचें आंगणीं तिष्ठतसे ॥ १ ॥ जनीचिया पदा आखंडित गाये ॥ तयाचे मी पाये वंदी माथां ॥ २ ॥ जनीचें आवडे जयासी वचन ॥ तयासी नारायण कृपा करी ॥ ३ ॥ पांडुरंग ह्मणे ऐक ज्ञानदेवा ॥ ऐसा वर द्यावा जनीसाठीं ॥ ४ ॥

॥ २९९९ ॥ पदक विठ्ठलाचें गेलें ॥ ब्राह्मण ह्मणती जनिनें नेलें ॥ १ ॥ अगे शिंपियाचे जनी ॥ नेलें पदक दे आणुनी ॥ २ ॥ देवा समोर तुझें घर ॥ तुझें येणें निरंतर ॥ ३ ॥ म्यां तरी नेलें नाहीं जाण ॥ सख्या विठोबाची आण ॥ ४ ॥ धोतर झाडुनी पाहती ॥ पडलें पदक घेउनी जाती ॥ ५ ॥ जनी वरी आली चोरी ॥ ब्राह्मण करिती मारामारी ॥ ६ ॥ धाविन्नले चाळीस गडी ॥ जनी वरी पडली उडी ॥ ७ ॥ दंडी लाविल्या काढण्या ॥ विठो धांव रे धांवण्या ॥ ८ ॥ चंद्रभागे रोविला शूळ ॥ जनाबाईस आलें मूळ ॥ ९ ॥ हातीं टाळी वाजविती ॥ मुखीं विठ्ठल बोलती ॥ १० ॥ विलंब लागतां ते वेळीं ॥ ह्मणती जनिला द्यारे सुळी ॥ ११ ॥ ऐसा वेळ कोट गेला ॥ जनी ह्मणे विठो मेला ॥ १२ ॥ तंव सुळाचें झालें पाणी ॥ धन्य ह्मणे दासी जनी ॥ १३ ॥

॥ ३००० ॥ धुणें घेउनी काखेसी ॥ जनी गेली उपवासी ॥ १ ॥ मागें विठ्ठल धांवला ॥ ह्मणे कां टाकिलें मला ॥ २ ॥ कांगा धांवोनी आलासी ॥ जाय जाय राउळासी ॥ ३ ॥ चहूं हातें धुणें केलें ॥ जनी ह्मणे बरें झालें ॥ ४ ॥

॥ ३००१ ॥ आतां पुरे हा संसार ॥ कोठें फेडूं उपकार ॥ १ ॥ सांडूनियां थोरपण ॥ करी दळणकांडण ॥ २ ॥ नारिरूप होउनी हरी ॥ माझें न्हाणें धुणें करी ॥ ३ ॥ राना जाये वेंची शेणी ॥ शेवीं वाहे घरीं पाणी ॥ ४ ॥ ठाव मागें पायापाशी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ ५ ॥

॥ ३००२ ॥ आई मेली बाप मेला ॥ मज सांभाळी विठ्ठला ॥ १ ॥ हरिरे मज कोणी नाहीं ॥ माझी खात असे डोई ॥ २ ॥ विठ्ठल ह्मणे रुक्मिणी ॥

माझे जनीला नाहीं कोणी ॥ ३ ॥ हातीं घेउनी तेलफणी ॥ केंस विंचरून घाली वेणी ॥ ४ ॥ वेणी घालून दिधली गांठ ॥ जनी ह्मणे चोळ बा पाठ ॥ ५ ॥ जनी ह्मणे बा गोपाळा ॥ करी दुबळीचा सोहळा ॥ ६ ॥

॥ ३००३ ॥ जनी जाय शेणासाठीं ॥ उभा आहे तिच्या पाठीं ॥ १ ॥ पितांबराची कांस खोवी ॥ मागें चाले जनाबाई ॥ २ ॥ गौऱ्या वेंचुनी बांधली मोट ॥ जनी ह्मणे घावी गांठ ॥ ३ ॥ मोट उचलून डोई-वर घेई ॥ मागें चाले जनाबाई ॥ ४ ॥

॥ ३००४ ॥ सखिये साजणी ॥ ज्ञानाबाई मायबहिणी ॥ १ ॥ कांगा उशीर लाविला ॥ तुजवांचून शीण झाला ॥ २ ॥ वत्साचिये गाय ॥ मज पाडसाची माय ॥ ३ ॥ बैसली दळणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ ३००५ ॥ पंढरीच्या राया ॥ विनवणी तुझ्या पाया ॥ १ ॥ काय वर्णूं हरिच्या गोष्टी ॥ अनंत ब्रह्मांडें याचे पोटीं ॥ २ ॥ सेना न्हावी याचे घरीं ॥ अखंड राबे विठ्ठल हरी ॥ ३ ॥ राम चिंता ध्यानीं मनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ ३००६ ॥ धन्य ते पंढरी धन्य पंढरिनाथ ॥ तेणें हो पतित उद्ध-रिले ॥ १ ॥ धन्य नामदेव धन्य पंढरिनाथ ॥ तयानें अनाथ उद्धरिले ॥ २ ॥ धन्य ज्ञानेश्वर धन्य भाव ॥ त्याचे पाय देव आह्मां भेटी ॥ ३ ॥ नामयाची जनी पालट पैं झाला ॥ भेटावया आला पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ३००७ ॥ एक प्रहर रात्र झाली ॥ फेरी विठ्ठलाची आली ॥ १ ॥ नामा ह्मणे जनी पाहे ॥ द्वारीं उभा कोण आहे ॥ २ ॥ प्रभा घरांत दाटली ॥ एक सराद सुटली ॥ ३ ॥ एकमेका आलिंगन ॥ नामा ह्मणे जनी धन्य ॥ ४ ॥

॥ ३००८ ॥ दळण्याच्या मिषें ॥ विठ्ठल सावकाशें ॥ १ ॥ देहबुद्धीचें वैरण ॥ द्वैत-खंडारे निसून ॥ २ ॥ एकलीच गातां ॥ दुजा साद उमटतां ॥ ३ ॥ कोण तुझे बरोबरी ॥ साद देतो निरंतरी ॥ ४ ॥ खूण कळली नामदेवा ॥ विठ्ठल श्रोता जनिच्या भावा ॥ ५ ॥

॥ ३००९ ॥ वारा पाणी मुसळ धारा ॥ तेणें मोडिलें छपरा ॥ १ ॥ मग विठाई धांवली ॥ हातीं चक्र धांवत आली ॥ २ ॥ वासे लाविले चौफेर ॥ क्षणामध्यें केलें घर ॥ ३ ॥ जागा झाला नामदेव ॥ द्वारी उभे पंढरिराव ॥ ४ ॥ डोयीं ठेवून पायांवरी ॥ दासी जनी चरण चुरी ॥ ५ ॥

॥ ३०१० ॥ राना गेली शेणीसाठीं ॥ वेंचूं लागे विठो पाठी ॥ १ ॥ पितांबर खोचे खोवी ॥ पायीं शोभा पारखावी ॥ २ ॥ रिती बांधितांची मोट ॥ जनी ह्मणे द्यावी भेट ॥ ३ ॥

॥ ३०११ ॥ पाण्या गेली नदी तीरीं ॥ मागें मागें धांवा मारी ॥ १ ॥ ऐशा येरझारा केल्या ॥ रांजण घागरी भरिल्या ॥ २ ॥ पुरे पुरे पांडुरंगा ॥ दासी जनिच्या अंतरंगा ॥ ३ ॥

॥ ३०१२ ॥ पुंडलिकापाशीं ॥ नामा उभा कीर्त्तनासी ॥ १ ॥ येउनीया पांडुरंगें ॥ स्वयें टाळ धरी अंगें ॥ २ ॥ गाऊं लागे बरोबरी ॥ नाहीं बोलायाची उरी ॥ ३ ॥ स्वर देवाचा उमटला ॥ दासी जनिनें ओळखिला ॥ ४ ॥

॥ ३०१३ ॥ जनीनें बोलिलें तैसेंच लिहिलें ॥ साद्य परिसिलें तुह्मी संतीं ॥ १ ॥ अहो ज्ञानदेवा असावें तुह्मा ठावें ॥ येणें काय लहाणीव आणिली आह्मां ॥ २ ॥ माझी मज आण सांगतों प्रमाण ॥ सेवितों चरण तुझे स्वामी ॥ ३ ॥ जनीचे हो बोल स्वानंदाचे डोल ॥ स्वात्मसुखीं बोल दुणावती ॥ ४ ॥ शुद्ध सत्व कागद निस करी शाई ॥ अखंडित लिही जनीपाशीं ॥ ५ ॥ हांसोनी ज्ञानदेवें पिटियेली टाळी ॥ जयजयकार सकळीं केला थोर ॥ ६ ॥

॥ ३०१४ ॥ निवृत्ति पुसत ॥ कोठें होते पंढरिनाथ ॥ १ ॥ खूण कळली हृषीकेशी ॥ सांगों नको निवृत्तीसी ॥ २ ॥ उत्तर दिलें ज्ञानदेवें ॥ नवल केवढें सांगावें ॥ ३ ॥ शिव वंदी पायवणी ॥ नये योगियांचे ध्यानीं ॥ ४ ॥ द्वारीं उभे ब्रह्मादिक ॥ गुण गाती सकळिक ॥ ५ ॥ जनीसवें दळी देव ॥ तिचा देखोनिया भाव ॥ ६ ॥

॥ ३०१५ ॥ मग हांसोनी सकळी ॥ पाहूं देव कैसा बळी ॥ १ ॥ आले नामदेवा घरीं ॥ प्रेमें भूललासे हरी ॥ २ ॥ वाली जातिया वैरण ॥

गाय आवडीचें गाणें ॥ ३ ॥ पुढें देखे ज्ञानेश्वरा ॥ देव झालासे घाबरा ॥ ४ ॥ जनी ह्मणे पंढरिनाथा ॥ जाय राउळासी आतां ॥ ५ ॥

॥ ३०१६ ॥ काकड आरती ॥ करावया कमळापती ॥ १ ॥ भक्त मिळाले सकळ ॥ रितें देखिलें देउळ ॥ २ ॥ ज्ञानेश्वर बोले ॥ आतां देव कोठें गेले ॥ ३ ॥ ठावें जाहलें अंतरीं ॥ देव दळी जनी घरीं ॥ ४ ॥

॥ ३०१७ ॥ वैष्णव तो कबीर चोखामेळा महार ॥ तिजा तो चांभार रोहिदास ॥ १ ॥ सजन तो पठाण बाया तो कसाब ॥ वैष्णव तो शुद्ध एकनिष्ठ ॥ २ ॥ कमाल फुलार मुकुंद जो हरी ॥ जिहीं देवद्वारीं वस्ति केली ॥ ३ ॥ राजाई गोणाई आणि तो नामदेव ॥ वैष्णवांचा राव ह्मणवीतसे ॥ ४ ॥ त्या वैष्णवाचरणीं करी ओंवाळणी ॥ तेथें दासी जनी शरीराची ॥ ५ ॥

॥ ३०१८ ॥ वर स्कंधीं ऋषि तो वाहिला ॥ बळीनें द्वारपाळ केला ॥ १ ॥ भक्ता आधीन होसी ॥ त्याच्या वचनीं वर्त्तसी ॥ २ ॥ त्याचे गर्भवास सोसी ॥ कष्टी होता अंबऋषी ॥ ३ ॥ सर्व दुःखासी साहिलें ॥ जनी ह्मणे बरवें केलें ॥ ४ ॥

॥ ३०१९ ॥ जाय जाय राउळासी ॥ नको येऊं आह्मापाशीं ॥ १ ॥ जाऊं आह्मी बरोबर ॥ झाला तिचा हो चाकर ॥ २ ॥ तिजसंगें काम करी ॥ ऐसा जाणा देव हरी ॥ ३ ॥ चहू हातीं धुणें केलें ॥ जनी ह्मणे बरें झालें ॥ ४ ॥

॥ ३०२० ॥ भक्तीसाठीं याति नाहीं ॥ नाहीं तयासी ते सोई ॥ १ ॥ रोहिदास तो चांभार ॥ त्याचा करी कारभार ॥ २ ॥ जो कां भक्त यातिहीन ॥ देव करी त्याचा मान ॥ ३ ॥ त्यासी भक्ताचा आधार ॥ वाट पाहे निरंतर ॥ ४ ॥ जनी ह्मणे भक्तीसाठीं ॥ विठो सदा गोण्या लोटी ॥ ५ ॥

॥ ३०२१ ॥ जनीचिया बोलें करी नित्य काम ॥ वसवी तिचें धाम लक्ष्मीसी ॥ १ ॥ जनीचिया गोष्टी प्रेम ज्याचे मनीं ॥ तयाचे चरणीं

ओढवी माथा ॥ २ ॥ महेशादि देव तेहि तया ध्याती ॥ जे आवडे गति जनी ध्याती ॥ ३ ॥

॥ ३०२२ ॥ संत आले महाद्वारीं ॥ चोर पडले देवावरी ॥ १ ॥ नवल झालें पंढरपुरीं ॥ अखंड दासी बैसे घरीं ॥ २ ॥ जगामध्यें कीर्ति झाली ॥ दासी जनी प्रगटली ॥ ३ ॥

॥ ३०२३ ॥ चोखामेळा अनामिक ॥ भक्तराज तोचि एक ॥ १ ॥ परब्रह्म त्याचे घरीं ॥ न सांगतां काम करी ॥ २ ॥ रोहिदास तो चांभार ॥ पाहे मोमिन कबीर ॥ ३ ॥ नेमी जनी नीच दासी ॥ रंगीं वेढी नांगर पिशी ॥ ४ ॥

॥ ३०२४ ॥ हाटीं जायाची तांतडी ॥ नामा होता पैल थडी ॥ १ ॥ ह्मणे जा गे आणा त्यासी ॥ नाहीं तरी मी उपवासी ॥ २ ॥ जनी धांवत चालली ॥ मागें विठ्ठल माउली ॥ ३ ॥

॥ ३०२५ ॥ यातीहीन चोखामेळा ॥ त्यास भक्तीचा जिव्हाळा ॥ १ ॥ त्याचा झाला ह्मणीयारा ॥ राहे घरीं धरी थारा ॥ २ ॥ देव बाटविला यानें ॥ जनी हांसे गाय गाणें ॥ ३ ॥

॥ ३०२६ ॥ एके दिवशीं वाडियांत ॥ देव आले अवचित ॥ १ ॥ अवघीं पायांस लागलीं ॥ देवें त्यांवरी कृपा केली ॥ २ ॥ बाहेर कामासी गुंतल्यें ॥ देवें मजला विचारिलें ॥ ३ ॥ बाहेर आहेस वो बोलती ॥ देव मजला हाटकिती ॥ ४ ॥ हात धुउनी जवळ गेल्यें ॥ कोण गे जनी हांसून बोले ॥ ५ ॥

॥ ३०२७ ॥ देव तारक तारक ॥ देव दुष्टांसी मारक ॥ १ ॥ गीतेमध्यें आदि अंत ॥ ऐसें बोले तो भगवंत ॥ २ ॥ शत्रूलागी आधीं मारी ॥ भक्तसंकटीं रक्षी हरी ॥ ३ ॥ जनी ह्मणे कृपा करी ॥ भाव पाहोन अंतरीं ॥ ४ ॥

॥ ३०२८ ॥ पांडवांचे घरीं ॥ रात्रंदिवस मुरारी ॥ १ ॥ तैंच सखा नामयाचा ॥ एके ठायीं जेवायाचा ॥ २ ॥ त्याच्या उच्छिष्टाचा ग्रास ॥ जनी हात उचली त्यास ॥ ३ ॥

॥ ३०२९ ॥ देव भक्ताचा अंकित ॥ कामें त्याची सदा करित ॥ १ ॥ त्याचें पडों नेदी उणें ॥ होय रक्षिता आपण ॥ २ ॥ जनी ह्मणे भक्तिभाव ॥ देवदास ऐक्य जीव ॥ ३ ॥

॥ ३०३० ॥ देव भावाचा भुकेला ॥ नीच कामें करूं लागला ॥ १ ॥ जनी झाडलोट करी ॥ चक्रपाणी केर भरी ॥ २ ॥ पाटी घेऊनियां शिरीं ॥ नेउनी टाकी दुरिच्या दुरी ॥ ३ ॥ जनी ह्मणे विठोबाला ॥ काय उतराई होऊं तुला ॥ ४ ॥

॥ ३०३१ ॥ जनी जाय पाणीयासी ॥ मागें धांवे हृषीकेशी ॥ १ ॥ पाय भिजों नेदी हात ॥ माथां घागरी वहात ॥ २ ॥ पाणी रांजणांत भरी ॥ सडासारवण करी ॥ ३ ॥ धुणें धुऊनियां आणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ ३०३२ ॥ अगा रुक्मिणी नायका ॥ सुरा असुरा प्रिय लोकां ॥ १ ॥ ते तूं धांवे माझे आई ॥ सखे साजणी विठाबाई ॥ २ ॥ अगा शिवाचिया जपा ॥ मदन ताता निष्पापा ॥ ३ ॥ आपुली ह्मणउनी ॥ अपंगावी दासी जनी ॥ ४ ॥

॥ ३०३३ ॥ द्रौपदी कारणें ॥ पाठीराखा नारायण ॥ १ ॥ गोरा कुंभाराच्या संगें ॥ चिखल तुडवूं लागे अंगें ॥ २ ॥ कबिराच्या बैसोनी पाठीं ॥ शेले विणितां सांगे गोष्टी ॥ ३ ॥ चोख्यामेळ्यासाठीं ॥ ढोरें ओढी जगजेठी ॥ ४ ॥ जनीसंगें दळूं लागे ॥ सुरवर ह्मणती धन्य भाग्य ॥ ५ ॥

॥ ३०३४ ॥ पाणियाचे वाटे ॥ विठो धांव घाली नेटें ॥ १ ॥ घागर घेउनी हातांत ॥ पाणी ओती डेरियांत ॥ २ ॥ ऐशा येरझारा करी ॥ भरल्या रांजण घागरी ॥ ३ ॥ पाणी पुरे पांडुरंगा ॥ दासी जनिच्या अंतरंगा ॥ ४ ॥

॥ ३०३५ ॥ एके रात्रीचे समयीं ॥ देव आले लवलाही ॥ १ ॥ सुखशेजें पहुडले ॥ जनीसवें गुज बोले ॥ २ ॥ देव गुज बोलतां बोलतां ॥ निद्रा आली अवचिता ॥ ३ ॥ उठा उठा चक्रपाणी ॥ उजाडलें ह्मणे जनी ॥ ४ ॥

॥ ३०३६ ॥ पदक माळा सकलाद ॥ तेथें टाकिली गोविंदें ॥ १ ॥ देव तांतडी निघाले ॥ वाकळ घेउनी पळाले ॥ २ ॥ भक्त येती महाद्वारीं ॥ चोर पडले देव्हारीं ॥ ३ ॥ नवल झालें पंढरपुरीं ॥ देव रावे दासी घरीं ॥ ४ ॥ त्रिभुवनांत मात गेली ॥ दासी जनी प्रगटली ॥ ५ ॥

॥ ३०३७ ॥ देव ओढिला ताडिला ॥ देव भक्तांनीं पाहिला ॥ १ ॥ झाला नाम्याचा मजूर ॥ मोळी बांधा त्याची थोर ॥ २ ॥ भिंती चांदया रचिले ॥ त्याचें घर शाकारिलें ॥ ३ ॥ वरी सांडोनियां पाणी ॥ धन्य भक्त ह्मणे जनी ॥ ४ ॥

॥ ३०३८ ॥ शेठ्या झाला हरी ॥ द्रव्य गोणी लोटी द्वारीं ॥ १ ॥ बुद्धि सांगे राजाईसी ॥ तुह्मीं न छळावें नाम्यासी ॥ २ ॥ अवघ्या वित्तासी वेंचावें ॥ सरल्या मजपासी मागावें ॥ ३ ॥ विठ्ठलशेट नाम माझें ॥ नामयाला सांगावें ॥ ४ ॥ आतां उचित दासी ॥ ऐसे बोले राजाईसी ॥ ५ ॥ ऐसे बोलोनियां गेला ॥ ह्मणे जनी नामा आला ॥ ६ ॥

॥ ३०३९ ॥ जनी ह्मणे पांडुरंगा ॥ माझ्या जीवींच्या जीवलगा ॥ विनविते सांगा ॥ महिमा साधुसंताची ॥ १ ॥ कैसी वसविली पंढरी ॥ काय महिमा भीमातीरीं ॥ पुंडलिकाच्या द्वारीं ॥ कां उभा राहिलासी ॥ २ ॥ कैसा आला हा गोविंद ॥ कैसा झाला वेणुनाद ॥ येउनी नारद कां राहिला ॥ ३ ॥ कृपा करा नारायणा ॥ सांगा अंतरीच्या खुणा ॥ येऊं दे करुणा ॥ दासी जनी विनवितसे ॥ ४ ॥

॥ ३०४० ॥ निराकारीचें नाणें ॥ शुद्ध ब्रह्मीचें ठेवणें ॥ १ ॥ प्रयत्नें काढिलें बाहेरी ॥ संतसाधु सवदागरीं ॥ २ ॥ व्यास वसिष्ठ नारद मुनी ॥ टांकसाळ घातली त्यांनीं ॥ ३ ॥ उद्धव अक्रुर स्वच्छंदीं ॥ त्यांनीं आटविली चांदी ॥ ४ ॥ केशव नामयाचा शिका ॥ हारप चाले तिन्ही लोकां ॥ ॥ ५ ॥ पारख नामयाची जनी ॥ वरती विठोबाची निशाणी ॥ ६ ॥

॥ ३०४१ ॥ शके संवत्सर अक्राशें नव्वद ॥ निवृत्ति आनंद प्रगटले ॥ १ ॥ व्याण्णवाच्या सालीं ज्ञानेश्वर पाहिले ॥ सोपान देखिले शाण्णवांत ॥ २ ॥ नव्याण्णवाच्या सालीं मुक्ताई पाहिली ॥ जनी ह्मणे केली मात सांनीं ॥ ३ ॥

॥ ३०४२ ॥ अरे विठ्या विठ्या ॥ मूळ मायेच्या कारट्या ॥ १ ॥ तुझी रांड रंडकी झाली ॥ जन्मसावित्री चुडा ल्याली ॥ २ ॥ तुझें गेलें मढें ॥ तुला पाहून काळ रडे ॥ ३ ॥ उभी राहुनी आंगणीं ॥ शिव्या देत दासी जनी ॥ ४ ॥

॥ ३०४३ ॥ जनीं डोईनें गांजली ॥ विठाबाई धाविन्नली ॥ १ ॥ देव हातें बुचडा सोडी ॥ उवा मारीतसे तांतडीं ॥ २ ॥ केंश विंचरुनी मोकळे केले ॥ जनी ह्मणे निर्मळ झालें ॥ ३ ॥

॥ ३०४४ ॥ भूत झालें ऋषि पोटीं ॥ लावियेलें मृगापाठीं ॥ १ ॥ विश्वामित्रा घाला घाली ॥ पोटीं शकुंतला आली ॥ २ ॥ भगांकित केला ॥ इंद्र भूतानें झडपिला ॥ ३ ॥ तेंचि झालें हें भारत ॥ ह्मणे जनी केली मात ॥ ४ ॥

॥ ३०४५ ॥ राधा आणि मुरारी ॥ क्रीडा कुंजवनीं करी ॥ १ ॥ राधा डुल्लत डुल्लत ॥ आली निजभुवनांत ॥ २ ॥ सुमनाचे सेजेवरी ॥ राधा आणि तो मुरारी ॥ ३ ॥ आवडीनें विडे देत ॥ दासी जनी उभी तेथ ॥ ४ ॥

॥ ३०४६ ॥ भक्त जें जें कर्म करिती ॥ तें तूं सोसिसी कृपामूर्ती ॥ १ ॥ नवल नोहे जी देवा ॥ तूं भूललासी भक्तिभावा ॥ २ ॥ वागदोर धरुनी हातीं ॥ चारी घोडे चहूं हातीं ॥ ३ ॥ धुतां लाज नाहीं तुला ॥ दासी जनी ह्मणे भला ॥ ४ ॥

॥ ३०४७ ॥ सोपानाची ऐसी मुर्ती ॥ विश्वकर्त्ता ब्रह्म ह्मणती ॥ १ ॥ ऐसें बोलें पुराणांत ॥ सृष्टिकर्त्ता जो भगवंत ॥ २ ॥ जनी ह्मणे हा सोपान ॥ ब्रह्मा अवतरला पूर्ण ॥ ३ ॥

॥ ३०४८ ॥ सदाशिवाचा अवतार ॥ स्वामी निवृत्ति दातार ॥ १ ॥ महा विष्णूचा अवतार ॥ सखा माझा ज्ञानेश्वर ॥ २ ॥ ब्रह्मा सोपान तो झाला ॥ भक्तां आनंद वर्तला ॥ ३ ॥ आदि शक्ति मुक्ताबाई ॥ दासी जनी लागे पायीं ॥ ४ ॥

॥ ३०४९ ॥ दोहीकडे दोन्ही जाया ॥ मध्यें गोरोबाची शय्या ॥ १ ॥ गोरा निद्रिस्थ असतां ॥ कपट करिती त्याच्या कांता ॥ २ ॥

गोरोबाचे दोन्ही हात ॥ आपुल्या हृदयावरी ठेवित ॥ ३ ॥ जागा झाला गोरा भक्त ॥ जनी ह्मणे सा निद्रित ॥ ४ ॥

॥ ३०५० ॥ नामदेवाचे घरीं ॥ चौदाजण स्मरती हरी ॥ १ ॥ चौघे-पुत्र चौघी सुना ॥ नित्य स्मरती नारायणा ॥ २ ॥ आणिक मायबाप पाही ॥ नामदेव राजाबाई ॥ ३ ॥ आऊबाई लेकी निंबाबाई बहिणी ॥ पंधरावी ती दासी जनी ॥ ४ ॥

॥ ३०५१ ॥ माझा नामा मज देई ॥ जीव देईन तुझे पायीं ॥ १ ॥ पुडंलिका भूलविलें ॥ तैसें माझिया बाळा केलें ॥ २ ॥ तें गा न चले मजपाशीं ॥ देगा माझ्या नामयासी ॥ ३ ॥ तुझ्या संगें जे जे गेले ॥ ते त्वां जितेची मारिले ॥ ४ ॥ विठ्ठल ह्मणे गोणाबाई ॥ नामा तुझा घेवोनी जाई ॥ ५ ॥ हातीं धरोनिया आली ॥ दासी जनी आनंदली ॥ ६ ॥

॥ ३०५२ ॥ वेदांतीं हें बोलिलें ॥ सिद्धांतीं हें नेमियेलें ॥ १ ॥ लागा लागा भक्तिवाटा ॥ धरा हेंचि नेमनिष्ठा ॥ २ ॥ वेदबाह्य तें कर्म ॥ सांडी न करी अधर्म ॥ ३ ॥ तोचि एक होय ज्ञानी ॥ देवनिष्ठ ह्मणे जनी ॥ ४ ॥

॥ ३०५३ ॥ जन्मा येऊनियां देख ॥ करा देहाचें सार्थक ॥ १ ॥ वाचे नाम विठ्ठलाचें ॥ तेणें सार्थक देहाचें ॥ २ ॥ ऐसा नामाचा महिमा ॥ शेषा वर्णितां झाली सीमा ॥ २ ॥ नाम तारक त्रिभूवनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ ३०५४ ॥ भक्तिभावें वळे गा देव ॥ महाराज पंढरिराव ॥ १ ॥ पंढरीसी जावें ॥ संतजना भेटावें ॥ २ ॥ भक्ति आहे ज्याचें चित्तीं ॥ त्याला पावतो निश्चिती ॥ ३ ॥ भाव धरा मनीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ ३०५५ ॥ नाम विठोबाचें घ्यावें ॥ मग पाउल टाकावें ॥ १ ॥ नाम तारक हें थोर ॥ नामें तारिले अपार ॥ ३ ॥ आजामेळ उद्धरिला ॥ चोखामेळा मुक्तीस नेला ॥ ३ ॥ नाम दळणीं कांडणीं ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ ३०५६ ॥ मांडियेला खेळ ॥ बुद्धि रंगाचें बुद्बळ ॥ १ ॥ कैंचा शह झाला ॥ प्यादा फर्जीसवें मेला ॥ २ ॥ शह बाजी झाली ॥ ह्मणे जनी मात केली ॥ ३ ॥

॥ ३०५७ ॥ वैष्णव तो एक इतर तीं सोंगें ॥ ठसे देउनी अंगें चिता-रिती ॥ १ ॥ जिचे योनि जन्मला तिसी दंडूं लागला ॥ तीर्थरूप केला देशधडी ॥ धृ० ॥ नाइकोनी ब्रह्मज्ञान जो का दुराचारी ॥ अखंड द्वेष करी सज्जनांचा ॥ २ ॥ विद्येच्या अभिमानें नाइके कीर्त्तन ॥ पाखांडी हें ह्मणे करिती काई ॥ ३ ॥ पंचरस पात्रा कांता हे बडविती ॥ उद्धरलों ह्मणती आह्मीं संत ॥ ४ ॥ कीर्त्तनाचा द्वेष करी तो चांडाळ ॥ तयाचा विटाळ मातंगीसीं ॥ ५ ॥ वैष्णव तो एक चोखामेळा महार ॥ जनी ह्मणे निर्धार केला संतीं ॥ ६ ॥

॥ ३०५८ ॥ सोयरिक सांडियली सर्वांची ॥ जोडी केली विठ्ठलाची ॥ १ ॥ लोभ सांडिला सर्वांचा ॥ संग धरिला विठोबाचा ॥ २ ॥ जालों निधडा निःशंक ॥ गायनाचें कौतुक ॥ ३ ॥ प्रेमभरित सर्वदा ॥ मुखीं नाम हरि गोविंदा ॥ ४ ॥ ऐसा सर्वकाळ गाय ॥ भावें विठोबाचे पाय ॥ ५ ॥ नामा ह्मणे ऐके हरी ॥ दासी जनीची वाट करी ॥ ६ ॥

॥ ३०५९ ॥ देहभाव सर्व जाय ॥ तेव्हां विदेही सुख होय ॥ १ ॥ तया निद्रें जे पहुडले ॥ भवजागृति नाहीं आले ॥ २ ॥ ऐसी विश्रांति लाधली ॥ आनंदकळा संचरली ॥ ३ ॥ त्या ऐक्यीं एक होतां ॥ दासी जनी कैंचि आतां ॥ ४ ॥

॥ ३०६० ॥ सोंग सोंगा जाय ॥ नवल जाउनी हांसताहे ॥ १ ॥ हांसोनियां बडवी टिरी ॥ कोण नाठवी हे परी ॥ २ ॥ हा नाठवी आपणा ॥ ह्मणे जनी भुललें जाणा ॥ ३ ॥

॥ ३०६१ ॥ शब्दाचें ब्रह्म लौकिकीं हो दिसे ॥ जैसे ते फांसे मई-दांचे ॥ १ ॥ ज्ञानी तो कोण विज्ञानी तो कोण ॥ दोहींचा आपण साक्ष-भूत ॥ २ ॥ स्वयें सुखें घाला आपणातें विसरला ॥ तो योगी राहिला नाहीं येथें ॥ ३ ॥ नामयाची जनी सागरीं मिळाली ॥ परतोनी मुळीं केवीं जाय ॥ ४ ॥

॥ ३७६२ ॥ नम्रतेवीण योग्यता मिरविती ॥ ते केवीं पावती ब्रह्मसुख ॥ १ ॥ लटिके नेत्र लाऊनि ध्यान पैं करिती ॥ ते केवीं पावती केशवातें ॥ २ ॥ एक संत ह्मणविती नग्न पैं हिंडती ॥ अंतरींची स्थिति खडबड ॥ ३ ॥ झालेपणाचे गुण दिसताती सगुण ॥ वस्तु ते आपण होउनी ठेली ॥ ४ ॥ सागरीं गंगा मिळोनी गेली जैसी ॥ परतोनी तियेसी नाम नाहीं ॥ ५ ॥ नामयाची जनी निर्गुणीं बोधिली ॥ ठेवा जो लाधली पांडुरंग ॥ ६ ॥

॥ ३०६३ ॥ अर्थ जे काढिती उपनिषदांमाजीं ॥ सांडोनियां गोड भाजी घेती माठ ॥ १ ॥ भूगोलाचा स्वामी सुप्रसन्न झाला ॥ त्यासी मागे गोळा भाजीचा तो ॥ २ ॥ पुंडलिकें धन जोडिलें असतां ॥ प्रार्थोनियां देतां न घेती हे ॥ ३ ॥ मग गडी हो पाहे देवची येथोनी ॥ जवळी होती जनी फावलें तिये ॥ ४ ॥

॥ ३०६४ ॥ ऋषि ह्मणती धर्मदेवा ॥ आमचा आशिर्वाद घ्यावा ॥ १ ॥ पांडव पाळक गोविंद ॥ तिहीं लोकीं गाजे ब्रिद ॥ २ ॥ भक्तिभावें केला वश्य ॥ हरि सांभाळी तयास ॥ ३ ॥ रात्रंदिवस तुह्मांपासी ॥ दुजा ठाव नाहीं त्यासी ॥ ४ ॥ देव द्रौपदीतें सांभाळी ॥ उभा पाठीसीं वनमाळी ॥ ५ ॥ वनीं सांभाळी पांडवासीं ॥ सुदर्शन त्याजपासीं ॥ ६ ॥ हरिभक्ति जाहला ऋणी ॥ ह्मणे नामयाची जनी ॥ ७ ॥

॥ ३०६५ ॥ मांडियेला डाव ॥ कौरवानीं दुष्ट भाव ॥ १ ॥ टाकियेला फांसा ॥ पांडव गेले वनवासा ॥ २ ॥ वना गेले पांडवबळी ॥ दिनकरें दिधली थाळी ॥ ३ ॥ पांडवांची कृष्णाबाई ॥ जनी ह्मणे माझी आई ॥ ४ ॥

॥ ३०६६ ॥ ऐशापरी पांडवांतें ॥ रक्षियेलें दीनानाथें ॥ १ ॥ शंखचक्र आयुधें करीं ॥ छाया पीतांबर करी ॥ २ ॥ हस्त ठेऊनियां माथां ॥ सुखी असा निर्भय चित्तां ॥ ३ ॥ आज्ञा घेउनी सर्वांची ॥ देव गेले द्वारकेसी ॥ ४ ॥ सरला थालिपाक आतां ॥ पुढें सावधान श्रोतां ॥ ५ ॥ कथा पुढील गहन ॥ घोषयात्रा निरूपण ॥ ६ ॥ येथुनी अध्याय कळस ॥ जनी ह्मणे झाला रस ॥ ७ ॥

॥ ३०६७ ॥ ऐसी कीर्तनाची गोडी ॥ वैकुंठींहुनी घाली उडी ॥ १ ॥ आपण वैकुंठींच नसे ॥ भक्तांपासीं जाण वसे ॥ २ ॥ जनी ह्मणे कृपानिधी ॥ भक्तभावाची मांदी शोधी ॥ ३ ॥

॥ ३०६८ ॥ येरे येरे माझ्या रामा ॥ मन मोहन मेघःश्यामा ॥ १ ॥ संतमिसें भेटी ॥ देई देई कृपा गोष्टी ॥ २ ॥ आमची चुकवी जन्मव्याधी ॥ आह्मां देई हो समाधी ॥ ३ ॥ जनी ह्मणे चक्रपाणी ॥ करी ऐसी हो करणी ॥ ४ ॥

॥ ३०६९ ॥ अहो नारायणा ॥ मजवरी कृपा कां कराना ॥ १ ॥ मी तो अज्ञानाची राशी ॥ ह्मणोन आलें पायांपाशीं ॥ २ ॥ जनी ह्मणे आतां ॥ मज सोडवी कृपावंता ॥ ३ ॥

॥ ३०७० ॥ तुझी नाहीं केली सेवा ॥ दुःख वाटतसे जीवा ॥ १ ॥ नष्ट पापीण मी हीन ॥ नाहीं केलें तुझें ध्यान ॥ २ ॥ जें जें दुःख झालें मला ॥ तें तूं सोशिलें विठ्ठला ॥ २ ॥ क्षमा करी देवराया ॥ दासी जनी लागे पायां ॥ ४ ॥

॥ ३०७१ ॥ ज्याचा सखा हरी ॥ त्यावरी विश्व कृपा करी ॥ १ ॥ उणें पडों नेदी साचें ॥ वारें सोसी आघाताचें ॥ २ ॥ तयावीण क्षणभरी ॥ कदा आपण नव्हे दुरी ॥ ३ ॥ आंगा आपुले ओढोनी ॥ त्याला राखे जो निर्वाणीं ॥ ४ ॥ ऐसा अंकित भक्तांसी ॥ ह्मणे नामयाची दासी ॥ ५ ॥

॥ ३०७२ ॥ सुखें संसार करावा ॥ माजी विठ्ठल आठवावा ॥ १ ॥ असोनियां देहीं ॥ छाया पुरुष जैसा पाहीं ॥ २ ॥ जैसा सूर्य घटाकाशीं ॥ तैसी देहीं जनी दासी ॥ ३ ॥

॥ ३०७३ ॥ चोरा संगतीनें गेला ॥ वाटे जातां नागवला ॥ १ ॥ तैसी सांडोनियां भक्ती ॥ धरीं विषयाची संगती ॥ २ ॥ अग्नि सवें खेळे ॥ न जळे तो परी पोळे ॥ ३ ॥ विश्वासला चोरा ॥ जनी ह्मणे घाला वरा ॥ ४ ॥

॥ ३०७४ ॥ कोणे एके दिवशीं ॥ विठो गेला जनीपाशीं ॥ १ ॥ हळूच मागतो खायासी ॥ काय देऊं बा मीं तुसी ॥ २ ॥ हातीं धरून

नेला आंत ॥ वाढी पंचामृत भात ॥ ३ ॥ प्रेमसुखाचा ढेंकर दिला ॥ जनी ह्मणे विठो धाला ॥ ४ ॥

॥ ३०७५ ॥ लोलो लागला अंबेचा ॥ विठाबाई आनंदीचा ॥ १ ॥ आदि ठाणें पंढरपूर ॥ नांदे कान्हाई सुंदर ॥ २ ॥ गोणाईनें नवस केला ॥ देवा पुत्र देई मला ॥ ३ ॥ शुद्ध देखोनियां भाव ॥ पोटीं आले नामदेव ॥ ४ ॥ दामाशेटी हरुषला ॥ दासी जनींस आनंद झाला ॥ ५ ॥

॥ ३०७६ ॥ बाईगे मी लिहिणें शिकलें सद्गुरुरायापासीं ॥ धृ० ॥ ब्रह्मीं झाला जो उल्लेख ॥ तोचि नादाकार देख ॥ पुढें ओंकाराची रेख ॥ तुर्या ह्मणताती तिसीं ॥ १ ॥ माया महत्वाचें सुभर ॥ तीन पांचाचा प्रकार ॥ पुढें पंचविसांचा भार ॥ गणती केली छत्तीसीं ॥ २ ॥ बारा सोळा एकविस हजार ॥ आणीन साशांचा उभार ॥ माप चाले सोहंकार ॥ वळखीन बावन्न मात्रेसीं ॥ ३ ॥ चार खोल्या चार घरीं ॥ चौघे पुरुष चारी नारी ॥ पाहुनी चौघांचे विचारीं ॥ बैसलें पांचव्यापासीं ॥ ४ ॥ पांच शहाणे पांच मूर्ख ॥ पांच चाळक असती देख ॥ पांच बखेडखोर आणिक ॥ ओळखिलें दोघांसीं ॥ ५ ॥ बीजापासून अंकूर ॥ होय वृक्षाचा उभार ॥ शाखापत्रें फळ फुलभार ॥ बीजापोटीं सामावें ॥ ६ ॥ तंतूच्या धारें कांति काढून ॥ वरी क्रीडा करिती जाण ॥ शेखी तंतूच गिळून ॥ एकली राहीन आपैसी ॥ ७ ॥ वेदशास्त्र आणि पुराणा ॥ याचा अर्थ आणिला मना ॥ कनकीं नगाच्या भूषणा ॥ अनुभव जीवासीं ॥ ८ ॥ नामदेवाच्या प्रतापांत ॥ शिरीं विठोबाचा हात ॥ जनी ह्मणे केली मात ॥ पुसा ज्ञानेश्वरासी ॥ ९ ॥

॥ ३०७७ ॥ विठोबा चला मंदिरांत ॥ गस्त हिंडती बाजारांत ॥ धृ० ॥ रांगोळी घातली गुलालाची ॥ शेज म्यां केली पुष्पांची ॥ वि० ॥ १ ॥ समया जळती अर्ध रात्रीं ॥ गळ्यांमधें माळ मोत्यांची ॥ वि० ॥ २ ॥ नामदेवाला सांपडलें माणिक ॥ घेतलें जनीनें हातांत ॥ वि० ॥ ३ ॥ घेउनी गेली राउळांत ॥ गस्त हिंडती हकिमाची बाजारांत ॥ वि० ॥ ४ ॥

॥ ३०७८ ॥ झडतो नामाचा चौघडा ॥ ध्रु० ॥ धरा सतराचा हो मेळा ॥ कारखाना झाला गोळा ॥ वाजविती आपुल्या कळा ॥ प्रेमबळां

आनंदें ॥ १ ॥ झडतो नामाचा चौघडा ॥ ब्रह्मी ब्रह्मरूपीचा हुडा ॥ संत ऐकताती कोडां ॥ प्रेमबळा आनंदें ॥ २ ॥ जनाबाई घड्याळ मोगरीं ॥ घटका भरतां टोला मारी ॥ काळ व्यर्थची गेला तरी ॥ गजर करी आनंदें ॥ ३ ॥ नामादामा दोनी काळू ॥ नारा विठा दमामे फैलू ॥ चौघी सुना चारी हेलू ॥ कडकडां बोल उमटती ॥ ४ ॥ गोंदा म्हादा करणी करी ॥ नादें दुमदुमली पंढरी ॥ आऊबाई तुतारी ॥ मंजुळस्वर उमटती ॥ ५ ॥ गोणाबाई नौबतपल्ला ॥ नाद अंबरीं कोंदला ॥ राजाई झांज मंजुळ बोला ॥ मंजुळ स्वर उमटला ॥ ६ ॥

---

# नामदेव बावांचे अभंगाची पुरवणी.

॥ ३०७९ ॥ बांधिलें राहीना वैरलें खाईना ॥ दवडिलें जाईना जाणते हो ॥ १ ॥ तया खुंटा नांदावें सौरसें बांधावें ॥ कशानें करावें वोढाळें हो ॥ २ ॥ तया नेत्र ना पाय तिन्ही एक पाहे ॥ न देखावे ते ठाय देखताहे ॥ ३ ॥ नामा ह्मणे श्रोता विचारावें ज्ञानीं ॥ केशवाचे नयनीं उतरला ॥ ४ ॥

॥ ३०८० ॥ न पाहे गे माय विठाईविण डोळां ॥ सर्वस्वें कंटाळा आणिकांचा ॥ १ ॥ विठोबावीण कांहीं नायके मीं कानीं ॥ जडली चरणीं चित्तवृत्ती ॥ २ ॥ आणिकांचे मार्गीं न चालोत पाय ॥ जीव वोढे सय पांडुरंग ॥ ३ ॥ नामा ह्मणे करी आणिकांची पूजा ॥ न करी गरुडध्वजा वाचूनियां ॥ ४ ॥

॥ ३०८१ ॥ जीवप्राणें एक विठ्ठलची व्हावा ॥ ऐसिया मी भावा रातलिया ॥ १ ॥ आवडे पंढरी आवडे चंद्रभागा ॥ येती यमुनागंगा प्रतिदिनी ॥ २ ॥ आवडे पद्मतीर्थ आवडे गरुडपार ॥ राउळीं माहेर पांडुरंग ॥ ३ ॥ नामा ह्मणे अहो विठाईरुक्माई ॥ आणिकांपाशीं नाहीं चित्त माझें ॥ ४ ॥

॥ ३०८२ ॥ मंत्रयंत्र दीक्षा सांगतील लक्ष ॥ परि राम प्रत्यक्ष न करी कोण्ही ॥ १ ॥ प्रत्यक्ष दावील राम धरीन त्याचे पाय ॥ आणिकांची काय चाड मज ॥ २ ॥ सर्व कर्मीं राम भेटविती मातें ॥ जीवेंभावें त्यातें

ओवाळीन ॥ ३ ॥ नामा ह्मणे आह्मां थोर लाभ झाला ॥ सोइरा भेटला अंतरींचा ॥ ४ ॥

॥ ३०८३ ॥ विठाई सांवळे डोळसे रंगा येई हो ॥ धृ० ॥ कानीं कुंडलांची प्रभा ॥ जैसे चंद्रसूर्य नभा हो ॥ विठाई० ॥ १ ॥ गळा वैजयंती माळा ॥ कांसे पीतांबर पिंवळा हो ॥ वि० ॥ २ ॥ नामा ह्मणे कृपावंता ॥ झडकरी यावें पंढरिनाथा हो ॥ विठा० ॥ ३ ॥

॥ ३०८४ ॥ कृष्णा राहे बा उगला ॥ नाहीं तरी सांगेन त्या बागुला ॥ घुसळणासी उशीर झाला ॥ रवि सोडी गोविंदा ॥ धृ० ॥ पहिला बागुल तो ऐसा ॥ तया नाम ह्मणती मासा ॥ शंखासुर वधिला कैसा ॥ चारी वेद आणिले ॥ कृ० ॥ १ ॥ दुसरा बागुल बोलती ॥ त्यासी कूर्मरूप ह्मणती ॥ त्यानें पृष्ठीस धरिली क्षिती ॥ पाय पोटासी धरियले ॥ कृ० ॥ २ ॥ तिसरा बागुल बोलती ॥ त्यासी वराहरूप ह्मणती ॥ त्यानें दाढेंत धरिली क्षिती ॥ थोर दैत्य वधोनिया ॥ कृ० ॥ ३ ॥ चौथा बागुल नरहरी ॥ तो तंव खांबामध्यें गुरगुरी ॥ दैत्य वधुनी दानव वरी ॥ भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ कृ० ॥ ४ ॥ पांचवा बागुल ब्रह्मचारी ॥ तो तंव उभा बळीच्या द्वारीं ॥ भिक्षा मागूनिया निर्धारी ॥ बळीचें द्वार रक्षीतसे ॥ कृ० ॥ ५ ॥ साहावा बागुल बोलती ॥ त्यासी परशराम ह्मणती ॥ त्यानें वधिलें मातेप्रती ॥ पित्याचें वचन ऐकोनियां ॥ कृ० ॥ ६ ॥ सातवा बागुल तो साचा ॥ राम ह्मणती दशरथाचा ॥ रावण वधिला दहा मुखांचा ॥ मग ती जानकी सोडविली ॥ कृ० ॥ ७ ॥ आठवा बागुल बोलती ॥ तो तर गोकुळीं आहे ह्मणती ॥ त्यानें वधिलें कंसाप्रतीं ॥ असुर मारिले भारी ॥ कृ० ॥ ८ ॥ नववा बागुल बोलती ॥ त्यासी बौध्यरूप ह्मणती ॥ त्याची कोणासी कळेना गती ॥ बोध्यरूप प्रगटूनियां ॥ कृ० ॥ ९ ॥ दहावा बागुल बोलती ॥ नाम कलंकी ह्मणती ॥ थोर थोर करील ख्याती ॥ अश्वारूढ होईल ॥ ॥ १० ॥ कृ० ॥ होतां कलंकीचा अंत ॥ वेगीं येईल धांवत ॥ नामा ह्मणे पंढरिनाथ ॥ ऐसा बागुल जाणावा ॥ कृ० ॥ ११ ॥

॥ ३०८५ ॥ भस्म तो होतसे आला जो आकारा ॥ नासे प्रपंच सारा नाममय ॥ १ ॥ झाला अनुभव प्रपंचींच ब्रह्म ॥ झाला निश्चय मना संतकृपें ॥ २ ॥ ह्मणोनिया संतां जावोनी शरण ॥ साधुनी निजधन नामब्रह्म ॥ ३ ॥ नामदेव ह्मणे संताचेनी कृपें ॥ हृदयीं नाम सोपें नांदतसे ॥ ४ ॥

॥ ३०८६ ॥ नीर समुद्र तो कोण ॥ कोठें क्षीराब्धि आसन ॥ दधि समुद्र कोण्याठायीं ॥ खारा समुद्र कोण्या गृहीं ॥ १ ॥ रत्न समुद्र तो कोण ॥ कोठें मदनाचें आसन ॥ २ ॥ मन समुद्र कोठें आहे ॥ नामा ह्मणे शोधुन पाहे ॥ ३ ॥

॥ ३०८७ ॥ नेत्र नीर समुद्र देखा ॥ क्षीर सत्रावी ओळखा ॥ १ ॥ दधिसमुद्र नाकीं आहे ॥ खारा शरिरीं तो पाहे ॥ २ ॥ नाभी रत्नाकर देखा ॥ माथां मदन ओळखा ॥ ३ ॥ नामा ह्मणे सांगूं काय ॥ मन समुद्र हृदयीं आहे ॥ ४ ॥

---

## नामदेवाची बहीण—आऊबाईचे अभंग.

—:oo:—

॥ ३०८८ ॥ शून्य साकारलें साध्यांत दिसे ॥ आकार नासे तेथें शून्याकार दिसे ॥ १ ॥ शून्य तें सार शून्य तें सार ॥ शून्यीं चराचर सामावलें ॥ २ ॥ नामयाची बहिण आउबाई शून्यीं सामावली ॥ विठ्ठलीं राहिली चित्तवृत्ती ॥ ३ ॥

---

# नामदेवाचे समकालचे साधूंचे अभंग.

## कान्होपात्राचे अभंग.

—:oo:—

॥ ३०८९ ॥ जन्मांतरीचें सुकृत आजीं फळासीं आलें ॥ ह्मणोनी देखिले विठ्ठलचरण ॥ १ ॥ धन्यभाग्य आजी डोळिया लाधलें ॥ ह्मणुनी० ॥ २ ॥ धन्य चरण माझे या पंथीं चालिले ॥ ह्मणुनी० ॥ ३ ॥ येऊनिया देहासी धन्य आजी झालें ॥ ह्मणुनी० ॥ ४ ॥ घाली गर्भवासा कान्होपात्रा ह्मणे ॥ जन्मोजन्मीं देखेन विठ्ठलचरण ॥ ५ ॥

॥ ३०९० ॥ कणवाळू तूं माय माउली ॥ धांउनी भेटली विठाबाई ॥ १ ॥ निवारिलें विघ्न दुरितें पळालीं ॥ धांउनी० ॥ २ ॥ जोडोनिया

कर विठाई विनविली ॥ धांउनी० ॥ ३ ॥ शरण कान्होपात्रा चरणीं निमाली ॥ धांउनी० ॥ ४ ॥

॥ ३०९१ ॥ पतित पावन ह्मणविसी आधीं ॥ तरी कां उपाधि भक्तामागें ॥ १ ॥ तुझें ह्मणवितां दुजें अंगसंग ॥ उणेपणा सांग कोणाकडे ॥ २ ॥ सिंव्हाचें भातुकें जंबूक पै नेतां ॥ थोराचिया माथां लाजवाटे ॥ ३ ॥ ह्मणे कान्होपात्रा देह समर्पणें ॥ करावा जतन ब्रिदासाठीं ॥ ४ ॥

॥ ३०९२ ॥ ज्ञान वैराग्य भजिन्नले तुमतें ॥ आमुतें पंढरिनाथें न विसरिजे ॥ १ ॥ दंभ प्रपंच भजिन्नले तुमतें ॥ आमु० ॥ २ ॥ विनवी कान्होपात्र पंढरीरायातें ॥ आमुतें० ॥ ३ ॥

॥ ३०९३ ॥ सर्व सुखाचें जें निजसुखाचें सार गे माय ॥ तो हा पंढरिराय विटेवरी ॥ १ ॥ सकळ साराचें सार गे माय ॥ तोहा० ॥ २ ॥ सर्व साधनाचें जें कां निजसाधन गे माय ॥ तोहा० ॥ ३ ॥ जे कां जीवांचे जीवन कान्होपात्राचे निजधन गे माय ॥ तोहा० ॥ ४ ॥

॥ ३०९४ ॥ अगा वैकुंठीच्या राया ॥ अगा विठ्ठल सखया ॥ १ ॥ अगा नारायणा ॥ अगा वसुदेवनंदना ॥ २ ॥ अगा पुंडलिक वरदा ॥ अगा विष्णु तूं गोविंदा ॥ ३ ॥ अगा रखुमाईच्या कांता ॥ कान्होपात्रा राखी आतां ॥ ४ ॥

॥ ३०९५ ॥ विठु दीनाचा दयाळ ॥ वागवीं दासाची कळवळ ॥ १ ॥ देव कृपावंत मोठा ॥ उणें पडों नेदी तोटा ॥ २ ॥ देव भक्तांचा अभिमानी ॥ वाहे चिंता सकळ मनीं ॥ ३ ॥ देव भावाचा भूकेला ॥ कान्होपात्रा आनंद जाहला ॥ ४ ॥

॥ ३०९६ ॥ नामें दोष जळती ॥ नामें पापी उद्धरती ॥ १ ॥ हें तो आलें अनुभवा ॥ सत्यजीवा प्रत्यया ॥ २ ॥ नामें अपार तारिलें ॥ नामें जीवनमुक्त केले ॥ ३ ॥ कान्होपात्रा नाम घेतां ॥ पायीं जडली तत्वतां ॥ ४ ॥

## विसोबा खेचराचे अभंग.

:oo:

॥ ३०९७ ॥ तुझें निजसुख तुजपासी आहे ॥ विचारुनी पाहे मना माजी ॥ १ ॥ विवेकवैराग्य शोधूनियां पाहे ॥ तेणें तुज होय ब्रह्मप्राप्ती ॥ २ ॥ ज्ञानाचा प्रकार सहजची झाला ॥ आहे भाव गेला गळोनियां ॥ ३ ॥ खेचर विसा ह्मणे जेथें ओंकार निमाला ॥ सहजची झाला ब्रह्ममूर्ती ॥ ४ ॥

॥ ३०९८ ॥ जरी ह्मणसी देव देखिला ॥ तरी बोल भला नव्हे नाम्या ॥ १ ॥ जोंवरी मीं माझें नतुटे ॥ तंव आत्माराम कैसेनी भेटे ॥ धृ० ॥ खेंचर साह्यानें मीं कांहीं नेणें ॥ जीवाया जीव ईतुलें मीं जाणें ॥ २ ॥

॥ ३०९९ ॥ काय करिसी ते तीळ तुळसी दर्भ ॥ द्वैत पदें क्षोभें नाडलासी ॥ १ ॥ भुकेनें मरसी जेथीचारे तेथें ॥ तरी केशवराव तूतें आवडेना ॥ धृ० ॥ नाहीं तया दान ईश्वर भजन ॥ वायांविण स्नान करिसी ॥ २ ॥ हरि भक्तिवीण जन्मासी तर ॥ ह्मणे विसा खेंचर अरे नाम्या ॥ ३ ॥ सड ना सांजावण खुंटा ना दावें ॥ गाये ना वासरूं काय तेथें व्हावें ॥ ४ ॥ आपे गाये आपण ॥ आपण दोहे आपण प्रकाश ॥ ५ ॥ खेंचर विसादेहे पांच हीं गाई ॥ लेकी नाहीं तेथें कैंचा घरजांवई ॥ ६ ॥ मेघेवीण जळ कीं जळेविण पूर ॥ परि नाहीं उतार तेथें नख न भिजे ॥ ॥ ७ ॥ आहे तें तें बुडें नाहीं तें तें तरे ॥ लटकीयाचें खरें वाढविसी ॥ ह्मणे खेचर विसा तूं झालासी पीसा ॥ यद्दष्याची आशा तूं सांडी नाम्या ॥

॥ ३१०० ॥ सुखाचें सुखरूप घेउनी जा तरी ॥ विठ्ठलनामें भरी तिन्ही लोक ॥ १ ॥ आशापाश याहीं वासना पोखी ॥ विठ्ठलनाम शेखीं घेउनी राहे ॥ २ ॥ नलगती सायास करणें काया क्लेश ॥ आपण वैकुंठ येईल सवें ॥ ३ ॥ नाठवी संसार नाठवी देहभाव ॥ रोहिणीची माव नकळे काय ॥ ४ ॥ कुल्लाळकुसरीं भ्रमत चक्र ॥ आयुष्या आवर्त मापा करी ॥ ५ ॥ खेंचर विसा ह्मणे येथूनी काढिलें ॥ तें तुज दिधलें जारे नाम्या ॥ ६ ॥

॥ ३१०१ ॥ जळ स्थळ काष्ठ पाषाणू ॥ पिंड ब्रह्मांड अणुरेणू ॥ सर्वस्वें आपणू ॥ साक्ष असें ॥ १ ॥ हें जाणूनियां या परतें ॥ जाणें आप आपणि-





यातें ॥ खेचर ह्मणे नामयातें ॥ अवघाची देव ॥ २ ॥ श्रवणीं सांगितली मात ॥ मस्तकीं ठेविला हात ॥ पदपिंड विवर्जित ॥ केला नामा ॥ ३ ॥ खेचर विसा ॥ प्रेमाचा हो पिसा ॥ नामा कैसा ॥ उपदेशिला ॥ ४ ॥ सांगितलें गुज ॥ दाखविलें निज ॥ पाल्हाळीं हो तुज ॥ काय चाड ॥ ५ ॥ खेंचर ह्मणे मज ॥ ज्ञानराज हे गुरू ॥ तेणें अगोचरू ॥ नामा हा केला ॥ ६ ॥

॥ ३१०२ ॥ भवजलधि अगाध तुरावया दुस्तर ॥ रचिलें पंढरपुर चंद्रभागीं ॥ १ ॥ तारूं पंढरीनाथ मोलेविण उतरितु ॥ उभला असे तिष्ठतु वाट पाहे ॥ २ ॥ बुडतयाचें भय नाहीं संसारीं ॥ कलीमाजीं पंढरी नाव थोर ॥ ३ ॥ राव रंक दोन्ही बैसउनी वरी ॥ उतरी पैलतिरीं भरंवसेनी ॥ ४ ॥ आठराही आवले जे नावेसि लागले ॥ साही खण भरले मिरवताति ॥ ५ ॥ चौमुखीं वर्णितां नकळे याचा पार ॥ वेदा अगोचर सहस्रमुखा ॥ ६ ॥ सडियांतें कांसें लावित आपण ॥ कुटुंबिये जाण नावेरी ॥ ७ ॥ प्रेमाचे पेटे बांधोनियां पोटीं ॥ उतरी जगजेठी पैलपारू ॥ ८ ॥ आप आंगें उवाडी बुडत्यातें कडे काढी ॥ ऐसें लक्षकोडी तारियले ॥ ९ ॥ सहस्र नाम पेटे बांधे मज पोटीं ॥ तरी जगजेठी लावी कांसे ॥ १० ॥ ऐसे पक्षी कीट गुल्मल तारिले ॥ खेंचर विसा ह्मणे तारी माते पुंडलिक ॥ आदि करोनी सर्वही तारिले ॥ उतरुनी तारिले पैलतिरीं ॥ ११ ॥

॥ ३१०३ ॥ पर्वतप्राय पापराशी होती दग्ध ॥ वाचेसी मुकुंद उच्चारितां ॥ १ ॥ अच्युत हरे केशव हरे ॥ माधव हरे रामकृष्ण ॥ २ ॥ नामाचें साधन करिशील पूर्ण ॥ तैं प्रपंच भान उरों नेदी ॥ ३ ॥ उदासीन वृत्ति आवरावें मन ॥ नाहीं गुणधर्म मायालोभ ॥ ४ ॥ ऐसा अनकळीत मार्ग साधेल जरी तुज ॥ खेंचर विसा गुज सांगें नाम्या ॥ ५ ॥

॥ ३१०४ ॥ दश चत्वार कराचा नव आननाचा ॥ त्रींविंश नयनाचा द्वीपुच्छ द्वैश्रृगांचा ॥ ह्मणवी ईश तो सरोज शयनाचा ॥ १ ॥ नाशापुट अठराचा षोडश ॥ करणीं नवाश शिरसींचा ॥ दहा पदें ही साला ॥ कोण असाजी कथाजी सरसाचा ॥ आंगुलांचा भुजा मुळु वदनाचा ॥ उधानू नेत्राचा स्वामि माझा ॥ पोकू वेडावले सेली बोभावले ॥ अन्य थक्कित झाले ॥ वर्णवेना ॥ २ ॥ केवळ काठीं मुगुट घूर्जेटी ॥ पाय तळवटी

चरण ज्याचे ॥ ३ ॥ दकार वदनाचा आला वर्णाया ॥ जिव्हा चिरोनिया झाल्या दोन ॥ ४ ॥ आवारु जोडोनी ॥ करितो विनवणी ॥ खेचर विसा चरणीं विनटला ॥ ५ ॥

---




## सावता माळी यांचे अभंग.

:oo:

॥ ३१०५ ॥ समयासीं सादर व्हावें ॥ हरि त्वां लवकर यावें ॥ धृ० ॥ कोणें दिवशीं बसून हत्तीवर ॥ कोणें दिवशीं पालखी सुभेदार ॥ कोणें दिवशीं पायांचे चाकर ॥ चालून जावें ॥ १ ॥ कोणें दिवशीं बैसूनियां चिंतन ॥ कोणें दिवशीं घरांत नाहीं धान्य ॥ कोणें दिवशीं द्रव्याची सांठवण ॥ कोणें सांठवावें ॥ २ ॥ कोणें दिवशीं यम येती चालून ॥ कोणें दिवशीं प्राण जाती घेऊन ॥ कोणें दिवशीं स्मशानीं चालून ॥ एकटें जावें ॥ ३ ॥ कोणें दिवशीं होईल गुरूची कृपा ॥ कोणें दिवशीं चुकतील जन्मखेपा ॥ कोणें दिवशीं सांवत्याच्या बापा ॥ दर्शन द्यावें ॥ ४ ॥

॥ ३१०६ ॥ नामाचिया बळें न भिऊं सर्वथा ॥ कळिकाळाच्या माथां सोटे मारूं ॥ १ ॥ वैकुंठीचा देव आणूंया कीर्तनीं ॥ विठ्ठल गाउनी नाचो रंगीं ॥ २ ॥ सुखाचा सोहळा करुनी दिवाळी ॥ प्रेमें वनमाळी चित्तीं धरूं ॥ ३ ॥ सांवता ह्मणे ऐसा भक्तिमार्ग धरा ॥ तेणें भक्ति द्वारा वोलंगती ॥ ४ ॥

॥ ३१०७ ॥ कां बा रुसलासी कृपाळू बा हरी ॥ तुजवीण दुसरी भाकूं तीं कोण ॥ १ ॥ दीन रंक पापी हीन माझी याती ॥ सांभाळा श्रीपति पांडुरंगा ॥ २ ॥ मोह आशा माझ्या लागलीसे पाठीं ॥ काळ क्रूरदृष्टि पाहात असे ॥ ३ ॥ सांवता ह्मणे देवा नका ठेवूं येथें ॥ उचलोनी अनाथा न्यावें मज ॥ ४ ॥

---

## गोरा कुंभार यांचे अभंग.

——:oo:——

॥ ३१०८ ॥ रोहिदासां शिवराईसाठीं ॥ दिली पुंडलिका भेटी ॥ १ ॥ पुंडलिका झाला अनुताप ॥ धन्य सद्गुरु मायबाप ॥ २ ॥ जन्मा येउनी काय केली करणी ॥ व्यर्थ शिणविली जननी ॥ ३ ॥ नऊ महिने ओझें वागवून ॥ नाहीं गेला तिचा शीण ॥ ४ ॥ ऐसा झालों अपराधी ॥ क्षमा करा कृपानिधी ॥ ५ ॥ ऐसा पुंडलिका भाव ॥ उभा केला पंढरिराव ॥ ६ ॥ भक्ता पुंडलिकासाठीं ॥ उभा भींवरेच्या तटीं ॥ ७ ॥ कटावरीं ठेउनी कर ॥ उभा नीट विटेवर ॥ ८ ॥ ऐसा भाव धरी मनें गोरा ॥ तीर्था जा फजीतखोरा ॥ ९ ॥

॥ ३१०९ ॥ नामा ऐसें नाम तुझिया स्वरूपा ॥ आवरण अरूपां कोण ठेवी ॥ १ ॥ तूं शुद्ध चैतन्य नित्य वस्तु जाण ॥ रहित कारण स्वयंभूप्रकाश ॥ २ ॥ याही शब्दांमाजीं वाचा न लागे ॥ मार्ग पै न लागे निर्धारितां ॥ ३ ॥ ह्मणे गोरा कुंभार आत्मया नामदेवा ॥ चिद्रूप अवघा दिससी साचा ॥ ४ ॥

॥ ३११० ॥ स्थूळ होतें तेंचि सूक्ष्म पै झालें ॥ मन हें बुडालें महा सुखीं ॥ १ ॥ माझें रूप माझे विरालेसे डोळां ॥ समाविलें बुबुळा माझें ज्ञान ॥ २ ॥ ह्मणे गोरा कुंभार नवल जहाली भेटी ॥ नाम्या तुह्मा आह्मा तुटी उरली नाहीं ॥ ३ ॥

॥ ३१११ ॥ अंतरींचें गूज बोलूं ऐसें कांहीं ॥ वर्ण व्यक्ति नाहीं शब्द शून्य ॥ १ ॥ जयजय झनकून जयजय झनकून ॥ अनुहात जंगट नाद गर्जे ॥ २ ॥ परतल्या श्रुति ह्मणती नेती नेती ॥ त्यांही नादा अंतीं स्थिर राहती ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार सत्रावीचें नीर ॥ सेवी निरंतर नामदेव ॥ ४ ॥

॥ ३११२ ॥ एकमेकामाजीं भाव एकविध ॥ असे एक बोध भेदरहित ॥ १ ॥ तूं मज ओळखी तूं मज ओळखी ॥ मीं तुज देखत आत्मवस्तू ॥२॥ आत्मवस्तु देहीं बोलतां लाज वाटे ॥ अखंडता विघडे स्वरूपाची ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार अनुभवाचा ठेवा ॥ प्रत्यक्ष नामदेवा भेटलासी ॥ ४ ॥

॥ ३११३ ॥ सरितेचा ओघ सागरीं आटला ॥ विदेहीं भेटला मनोमन ॥ १ ॥ कवणाचे सांगातें पुसावया कवणातें ॥ सांगतों ऐक तें तेथें कैचें ॥ २ ॥ नाहीं दिवस राती नाहीं कुळयाती ॥ नाहीं माया भ्रांति अवघेची ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार परियेसी नामदेवा ॥ सांपडला ठेवा विश्रांतीचा ॥ ४ ॥

॥ ३११४ ॥ निर्गुणाचे भेटी आलों सगुणासंगें ॥ तंव झालों प्रसंगें गुणातीत ॥ १ ॥ मज रूप नाहीं नांव सांगूं काई ॥ झाला काई बाई बोलूं नये ॥ २ ॥ बोलतां आपुली जिव्हा पैं खादली ॥ खेचरीं लागली पाहतां पाहतां ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार नाम्या तुझी भेटी ॥ सुखासुखीं मिठी पडली कैसी ॥ ४ ॥

॥ ३११५ ॥ वंदावें कवणासी निंदावें कवणासी ॥ लिंपावें गगनासी कवण लिंपी ॥ १ ॥ नाहीं जया रूप नाहीं जया ठाव ॥ तेंचि व्यालें सर्व सांगतसें ॥ २ ॥ जीवनीं चंद्रबिंब बिंबलें पैं साच ॥ परी नाहीं तिंबिलें जळें जेवीं ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार नाम्या जीवलगा ॥ आलिंगन देगा मायबापा ॥ ४ ॥

॥ ३११६ ॥ केशवाचे भेटीं लागलें तें पिसें ॥ विसरले कैसे देहभाव ॥ १ ॥ झाली झडपणी झाली झडपणी ॥ संचरलें मनीं आदि रूप ॥ २ ॥ न लिंपेची कर्मीं न लिंपेची कर्मीं ॥ न लिंपे गुणधर्मीं पुण्य पापा ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार सहज जीवन्मुक्त ॥ सुखरूप अद्वैत नामदेवा ॥ ४ ॥

॥ ३११७ ॥ काया वाचा मन एकविध करी ॥ एक देह धरी नित्य सुख ॥ १ ॥ अनेकत्व सांडी अनेकत्व सांडी ॥ आहे तें ब्रह्मांडीं रूप तुझें ॥ २ ॥ निर्वासना बुद्धि असतां एकपणें ॥ सहज भोगणें ऐक्य राज्य ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार नाहीं रूपरेखा ॥ तेंचि तुझें सुख नामदेवा ॥ ४ ॥

॥ ३११८ ॥ कासयास बहु घालिसील माळ ॥ तुज येणेंवीण काय काज ॥ १ ॥ एकपणें एक एकपणें एक ॥ एकाचें अनेक विस्तारलें ॥ २ ॥ एकत्व पाहतां शिणले धरणीधर ॥ न चुके येरझार संसाराची

॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार कोणी नाहीं दुजें ॥ विश्वरूप तुझें नामदेवा ॥ ४ ॥

॥ ३११९ ॥ निर्गुणाचा संग धरिला जो आवडी ॥ तेणें केलें देशधडी आपणांसी ॥ १ ॥ आणिकत्व नेलें आणिकत्व नेलें ॥ एकलें सांडिलें निरंजनीं ॥ २ ॥ एकत्र एकत्व पाहतां अवघेंची लटिकें ॥ जें पाहें तितुकें रूप तुझें ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार ( नामदेवा ) सर्व रूप तुझें ॥ नामरूपाचें ओझें कैचें तुह्मां ॥ ४ ॥

॥ ३१२० ॥ कैसें बोलणें कैसें चालणें ॥ परब्रह्मीं राहणें अरे नामा ॥ १ ॥ जेविस्राची खूण वादितोची जाणें ॥ येरा लाजिरवाणें अरे नामा ॥ २ ॥ ह्मणे गोराकुंभार अनुभवितो जाणें ॥ आह्मांतें राहणें रशी अरे नामा ॥ ३ ॥

॥ ३१२१ ॥ मुकीया साखर चाखाया दिधली ॥ बोलतां हे बोली बोलवेना ॥ १ ॥ ते काय शब्द खुंटला अनुवाद ॥ आपुला आनंद आधारा या ॥ २ ॥ आनंदी आनंद गिळुनी रहाणें ॥ अखंडित होणें न होनीया ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार जीवन्मुक्त होणें ॥ जग हें न करणें शहाणे बापा ॥ ४ ॥

॥ ३१२२ ॥ कवण स्तुति करूं कवणीया वाचे ॥ बोध संकल्पाचे गिळिले चित्तें ॥ १ ॥ मन हें झालें मुकें मन हें झालें मुकें ॥ अनुभवाचें हें सुख हेलावलें ॥ २ ॥ दृष्टीचें पाहणें परतलें मागुती ॥ राहिलीं निवांत नेत्रपातीं ॥ ३ ॥ ह्मणे गोराकुंभार मौन्य सुख घ्यावें ॥ जीवें ओवाळावें नामयासी ॥ ४ ॥

---




## चोखामेळा याचे अभंग.

:oo:

॥ ३१२३ ॥ ऐसा पुत्र देगा देवा ॥ जग ह्मणे त्याला बावा ॥ १ ॥ कन्या ऐसी तरी देई ॥ जैसी मिरा मुक्ताबाई ॥ २ ॥ ऐसा भक्तराज गुंडा ॥ त्याचा तिहीं लोकीं झेंडा ॥ ३ ॥ इतकें न देवें तुझ्यानें ॥ माझें

करीना निसंतान ॥ ४ ॥ दोही माजीं एक लेख ॥ बोलो केवळ दास चोखा ॥ ५ ॥

॥ ३१२४ ॥ करी सूत्र शोभे कटावरीं ॥ तोचि हा सोनार नरहरी ॥ १ ॥ बरवे दिसती जानू ॥ तेथें मिरवे पात्र कान्हो ॥ २ ॥ पायीं वाजती रुणझुण घंटा ॥ तोचि नामयाचा नागर विठा ॥ ३ ॥ काम चरणींचा तोडरू ॥ परिसा ऊठतसे डिंगरू ॥ ४ ॥ दक्षिण चरणींचा तोडरू ॥ जयदेव पदाचा गजरू ॥ ५ ॥ विटेवरी चरणकमळा ॥ तो हा आना चोखा-मेळा ॥ ६ ॥

॥ ३१२५ ॥ टाळी वाजवावी गुढी उभारावी ॥ वाट ते चालावी पंढरीची ॥ १ ॥ हरिनाम गर्जतां नाहीं भयचिंता ॥ ऐसें बोले गीता भागवत ॥ २ ॥ पताकाचे भार मिळाले अपार ॥ जयजयकारें भरलें भीमातीर ॥ ३ ॥ पंढरीचा हाट कवुलाची पेंट ॥ मिळाले चतुष्ट वारकरी ॥ ४ ॥ खटनट यावें शुद्ध होउनी जावें ॥ दंवडी पिटी भावें चोखामेळा ॥ ५ ॥

॥ ३१२६ ॥ धांव घाली विठू आतां चालूं नको मंद ॥ बडवे मज मारिती ऐसा कांहींतरीं अपराध ॥ १ ॥ विठोबाचा हार तुझे कंठीं कैसा आला ॥ शिव्या देउनी ह्मणती महारा देव बाटविला ॥ २ ॥ अहोजी महाराज तुमचे द्वारीचा कुतरा ॥ नकाजी मोकलूं चक्रपाणी दुजें दारा ॥ ३ ॥ जोडूनियां कर चोखा विनवितो देवा ॥ बोलिला उत्तरीं परी राग नसावा ॥ ४ ॥

॥ ३१२७ ॥ कोणे देखियेलें जग ॥ पांडुरंग मी नेणें ॥ १ ॥ मौन्य पारुषली वाणी ॥ शब्द खाणी विराली ॥ २ ॥ एक आधीं कैची दोन ॥ मजपासून मी नेणें ॥ ३ ॥ चोखामेळा संत ॥ हेंही मात उपाधि ॥ ४ ॥

॥ ३१२८ ॥ ऊंस डोंगा परी नोव्हे डोंगा ॥ काय भूललासी वरलिया रंगा ॥ १ ॥ कमान डोंगी परी तीर नाहीं डोंगा ॥ काय भूललासी वरलिया रंगा ॥ २ ॥ नदी डोंगी परि जळ नोव्हें डोंगे ॥ काय भूललासी वरलिया रंगें ॥ ३ ॥ चोखा डोंगा परी विठ्ठल नाहीं डोंगा ॥ काय भूललासी वरलीया रंगा ॥ ४ ॥

॥ ३१२९ ॥ देहीं देखिली पंढरी ॥ आत्मा अविनाश विटेवरी ॥ १॥ तो हा पांडुरंग जाणा ॥ शांति रुक्मिणी निजांगना ॥ २ ॥ आकारलें तितकें नासे ॥ आत्मा अविनाश विठ्ठल दिसे ॥ ३ ॥ ऐसा विठ्ठल हृदयीं ध्यायी ॥ चोखामेळा जडला पायीं ॥ ४ ॥

॥ ३१३० ॥ येई येई गरुडध्वजा ॥ विटेसहित करीन पूज्या ॥ १ ॥ धूपदीप पुष्पमाळा ॥ तुज समर्पूं गोपाळा ॥ २ ॥ पुढें ठेवोनिया पान ॥ वाढी कुटुंबीं तें अन्न ॥ ३ ॥ तुह्मां योग्य नव्हें देवा ॥ गोड करूनिया जेवा ॥ ४ ॥ विदुराघरच्या पातळ कण्या ॥ खासी मायबापा धन्या ॥ ५ ॥ द्रौपदीच्या भाजीपाना ॥ तृप्ति झाली नारायणा ॥ ६ ॥ तैसी झाली येथें परी ॥ ह्मणे चोखयाची ह्मारी ॥ ७ ॥

॥ ३१३१ ॥ देवा प्रसाद देई झडकरी ॥ सद्गुरुराया ॥ ध्रु० ॥ वासुदेव दिंडीगान ॥ प्रसाद मागूं आले दान ॥ आणिक आले कोण कोण ॥ त्यांचीं नांवें परिसावीं ॥ १ ॥ ब्राह्मण क्षत्रिय शूद्र वाणी ॥ मागूं आल्या चारी खाणी ॥ लिहिणार जोशी पंडित गणी ॥ चाटे भाट आले ते ॥ २ ॥ गोंधळ डफगाण बहीरव जोगी ॥ बाळसंतोषी आणि बैरागी ॥ फकीर डाकुलता तो वेगी ॥ कानफाड्या आला तो ॥ ३ ॥ सार मडपी आलासे ॥ राहा विनोदें बोलतसे ॥ चोखा महार जोहार करीतसे ॥ प्रसाद देई ह्मणोनी ॥ ४ ॥

---




## सेना न्हावी याचे अभंग.

:oo:

॥ ३१३२ ॥ वाचे सोपान ह्मणतां ॥ चुके जन्म मरण चिंता ॥ १ ॥ वस्ति केली कऱ्हेतीरीं ॥ पुढें शोभे त्रिपुरारी ॥ २ ॥ सोपान देव सोपान देव ॥ नाहीं लागावें भेव ॥ ३ ॥ सोपान चरणीं ठेउनी माथा ॥ सेना होय विनविता ॥ ४ ॥

॥ ३१३३ ॥ ही माझी मिरासी ॥ पांडुरंग पायांपासी ॥ १ ॥ करीन आपुलें जतन ॥ वागवितो अभिमान ॥ २ ॥ जुनाट जुगादीचे ॥ वडिलें

साधियेले साचें ॥ ३ ॥ सेना ह्मणे कमळापती ॥ पुरातन हे माझी वृत्ती ॥ ४ ॥

॥ ३१३४ ॥ ब्रह्मीयाचा अवतार ॥ तो हा सोपान निर्धार ॥ १ ॥ याचें घेतां मुखीं नाम ॥ हरे सकळ श्रम ॥ २ ॥ समाधीपासुनी भागीरथी ॥ स्नानालागी नित्य येती ॥ ३ ॥ अष्टोत्तर तीर्थांचा मेळा ॥ नाम कऱ्हाबाई वेल्हाळा ॥ ४ ॥ वैष्णवांमाजी डिंगर ॥ सेना तयाचा किंकर ॥ ५ ॥

॥ ३१३५ ॥ उदार तुह्मी संत ॥ मायबाप कृपावंत ॥ १ ॥ केव्हडा केला उपकार ॥ काय वाणूं मी पामर ॥ २ ॥ जड जीवा उद्धार केला ॥ मार्ग दाविला सुपंथ ॥ ३ ॥ सेना ह्मणे उतराई ॥ होता कांहीं दिसेना ॥ ४ ॥

॥ ३१३६ ॥ सुखें घालीं जन्मासी ॥ हेंचि बरें कीं मानसीं ॥ १ ॥ वारी करीन पंढरीची ॥ जोडी साची ही माझी ॥ २ ॥ हरिदासाची करीन सेवा ॥ तेणें सुख फार जीवा ॥ ३ ॥ सेना ह्मणे सर्व संग ॥ केला त्याग यासाटीं ॥ ४ ॥

॥ ३१३७ ॥ तेचि एक संत जाणा ॥ नारायणा आवडती ॥ १ ॥ पांडुरंगा वांचुनि कांहीं ॥ न जाणें पाहीं दुसरें ॥ २ ॥ मुखीं नाम अमृत वाणी ॥ धाले मनीं डुलती ॥ ३ ॥ सेना ह्मणे पायीं माथा ॥ त्याच्या आतां ठेविला ॥ ४ ॥

॥ ३१३८ ॥ घेतां नाम विठोबाचें ॥ पर्वत जळती पापांचे ॥ १ ॥ ऐसा नामाचा महिमा ॥ वेद शिणला झाली सीमा ॥ २ ॥ नामें तारिले अपार ॥ महापापी दुराचार ॥ ३ ॥ वाल्हाकोळी ब्रह्महत्यारी ॥ नामें तारिला निर्धारी ॥ ४ ॥ सेना वैसला निवांत ॥ विठ्ठल नाम उच्चारीत ॥ ५ ॥

॥ ३१३९ ॥ श्री ज्ञानराजें केला उपकार ॥ मार्ग हा निर्धार दाखविला ॥ १ ॥ विटेवरी उभा वैकुंठनायक ॥ आणि पुंडलिक चंद्रभागा ॥ २ ॥ अविनाश पंढरी भूमीवरी पेंठ ॥ प्रत्यक्ष वैकुंठ दाखविलें ॥ ३ ॥ सेना ह्मणे चला जाऊं तया ठाया ॥ पांडुरंग सखया भेटावया ॥ ४ ॥

॥ ३१४० ॥ अळंकापुरवासिनी ॥ ज्ञानबाई मायबहिणी ॥ १ ॥ लेकुराची चिंता ॥ वागवावी कृपावंता ॥ २ ॥ मी तो आहे यातीहीन ॥ माझा राखा अभिमान ॥ ३ ॥ करुनि विनवणी ॥ सेना लागतो चरणीं ॥ ४ ॥

॥ ३१४१ ॥ धन्य अळंकापुर धन्य सिद्धेश्वर ॥ धन्य तें तरुवर पशुपक्षी ॥ १ ॥ धन्य इंद्रायणी धन्य भागीरथी ॥ तेथें स्नान जे करिती धन्य जन्म ॥ २ ॥ धन्य तो प्रयाग धन्य ते त्रिवेणी ॥ वाहती येउनी गुप्त-रूपें ॥ ३ ॥ धन्य ते भूमि धन्य ते प्राणी ॥ जे देखती नयनीं ज्ञानदेवा ॥ ४ ॥ धन्य ते भाग्याचे जाती अळंकापुरा ॥ त्याच्यानें निर्धार धन्य-वंशा ॥ ५ ॥ धन्य दासानुदास अळंकापुरीचा ॥ सेना व्हावी त्याचा रजःकण ॥ ६ ॥

॥ ३१४२ ॥ विष्णूचा अवतार ॥ सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥ चला चला अळंकापुरा ॥ संतजनांच्या माहेरा ॥ २ ॥ करितां स्नान इंद्रायणीं ॥ मुक्ति लागती चरणीं ॥ ३ ॥ ज्ञानेश्वराचे चरणीं ॥ सेना आला लोटां-गणीं ॥ ४ ॥

॥ ३१४३ ॥ धन्य महाराज पुंडलिक मुनी ॥ वैकुंठीचा सखा आणिला भूतळालागोनी ॥ १ ॥ केला उपकार जग तारिलें सकळ ॥ निरसली भ्रांति तूंचि माउली स्नेहाळ ॥ २ ॥ आली चंद्रभागा गर्जना करीत ॥ तुझिया भेटीलागीं उतावीळ धांवत ॥ ३ ॥ जोडोनियां पाणी सेना करी विनवणी ॥ ह्मणे धन्य पुंडलिका माथा ठेविला चरणीं ॥ ४ ॥

॥ ३१४४ ॥ ऐसी आवडी आहे माझ्या जीवा ॥ तुजसी केशवा निवेदिलें ॥ १ ॥ पांडुरंगा ऐसें वाटतसे [illegible] ॥ करीन संतसेवा अहर्निशीं ॥ २ ॥ नलगे वित्त गोत वैकुंठीं राहणें ॥ सायुज्य सदनीं चाड नाहीं ॥ ३ ॥ करुणास्वरें सेना बाहे विठ्ठला ॥ पुरवावा हेत [illegible]चा ॥ ४ ॥

॥ ३१४५ ॥ तुह्मी करा कृपादान ॥ येईं [illegible] ॥ १ ॥ घेईन संतांची भेटी ॥ सांगेन सुखाचिया गोष्टी ॥ २ ॥ जैसें मातेपासीं बाळ ॥ सांगेन जीवींचें सकळ ॥ ३ ॥ सेना ह्मणे हरे ताप ॥ देखोनी माझा मायबाप ॥ ४ ॥



॥ ३१४६ ॥ धन्य धन्य दी ॥ तुमचें झालें दर्शन ॥ १ ॥ आज भाग्य उदया आलें ॥ संत पाऊल देखिलें ॥ २ ॥ पूर्व पुण्य फळा आलें ॥ माझें माहेर भेटलें ॥ ३ ॥ सेना ह्मणे झाला ॥ धन्य दिवस आज भला ॥ ४ ॥

॥ ३१४७ ॥ धन्य महाराज अलंकापुरवासी ॥ साष्टांग तयासी नमन माझें ॥ १ ॥ या ज्ञानदेवाचें नाम घेती वाचें ॥ उद्धरती त्याचें सकळकुळ ॥ २ ॥ इंद्रायणी स्नान करिती प्रदक्षिणा ॥ उद्धरती जाणा कुळें त्यांचीं ॥ ३ ॥ सेना ह्मणे धन्य झालें माझे जार्णे ॥ ज्ञानदेव दर्शनें मुक्त होती ॥ ४ ॥

---

# नामदेव–पुरवणी.

—:००:—

## भुपाळी.

॥ ३१४८ ॥ जन तुह्मी करारे उदीम, व्यवें स्मरा नारायण ॥ तो तुह्मा चुकवील जन्ममरण, मायाभ्रमण चुकवील ॥ १ ॥ तारूं करुनी शरिराचें, केणें भरिलें हरिनामाचें ॥ शिड उभविलें सत्वाचें, वल्हें पडती धर्माचें ॥ २ ॥ अ[illegible]ची करुनी कुवे काठीं, वारा लागतो जगजेठी ॥ तारूं चाले थोर [illegible], विठ्ठल भेटी पंढरीये ॥ ३ ॥ तारवा सांपडलें बंदर, राया विठोबाचें नगर ॥ तें बा संताचें माहेर, विष्णुदास ह्मणे नामा ॥ ४ ॥

